# प्राचीन महाराष्ट्र

## त्याचा राजकीय आणि सांस्कृतिक इतिहास

आणि तदर्थ

## जागतिक इतिहास



# शातवाहनपर्व



## विभाग पहिला

## कुरुयुद्धापासून शकारंभापर्यंत


लेखक

**डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर**, एम्. ए., पीएच्. डी.,

संपादक, महाराष्ट्रीय ज्ञानकोश व अनेक ग्रंथांचा कर्ता



प्रकाशक

**महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड तर्फे डॉ. श्रीधर व्यं. केतकर,**

**आशास्थान, पुणें ४.**

प्रकाशनवर्ष शालिवाहनाचें १८५६; इसवी १९३५.

मुद्रकः—**मं. ना. कुळकर्णी,** कर्नाटक प्रिंटिंग प्रेस, कर्नाटक हाऊस, चिराबझार, मुंबई.

( मूल्य दहा रुपये )


*Résumé in English Pages 43–49.*

# प्रस्तावनाविश्लेषण.



# विभागपरिचय

१ कुरुयुद्धकाळ जरी निश्चित नसला तरी त्या काळापासून शकारंभापर्यंत झालेल्या घडामोडी निश्चित आहेत. कुरुयुद्धकाळींच अश्मक, क्रथ, कैशिक ( विदर्भ ) अपरांत, कुंतल इत्यादि अनेक राज्यें महाराष्ट्रांत प्रस्थापित होतीं, आणि भोई, कोळी, महार, रट्ट ( कुणबी ) यांहींकरून प्रदेश वसला होता. द्राविडवंशीय जनता आणि आर्यनूवंशीय जनता यांचा कुरुयुद्धपूर्वकाळींच मिलाफ झाला होता. या काळानंतर म्हणजे कुरुयुद्धापासून "कैकेय" ऊर्फ इराणी लोकांचा भारतीयांशीं संबंध कसा होता, "रामकथा" कशी संवृद्ध झाली, इराणी वर्चस्वाला धक्का देणारा बुद्धापूर्वी अडीचशें वर्षे असलेला नरवीर उदयन याची दक्षिणेंत स्वारी झाली असतां त्याला महाराष्ट्र कां वगळावें लागलें, कुरुयुद्धापासून मगध आणि महाराष्ट्र यांचे युद्धसंबंध केव्हां आणि कां उत्पन्न झाले, अखिल भारतांत सामाजिक व्यवहार आणि नीति यांच्या दृष्टीनें महाराष्ट्राचें गौरव कसें प्रस्थापित होत गेलें वगैरे गोष्टी यांत सविस्तर वर्णिल्या आहेत.

२ सांस्कृतिक इतिहास या ग्रंथांत पुष्कळच आला आहे. वैदिक वाङ्मयाची संघटना झाली ती कशी झाली, पौराणिक वाङ्मय कसें विकास पावलें, सूत वर्ग आणि संस्कृत पंडित यांच्या ऐक्याचे वाङ्मयावर आणि एकंदर आयुष्यक्रमावर काय परिणाम झाले, तसेंच या दोहोंची फारकत झाली तेव्हां काय परिणाम झाले याचें विवेचन यांत आलें आहे.

३ कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंतच्या दीर्घ काळांतील प्रतिष्ठान आणि विदर्भ या दोन राजघराण्यांपैकीं प्रतिष्ठानचे नरसिंह, त्रिविक्रमसेन, विक्रमसिंह, प्रसेनजित्, पृथ्वीरूप हे बहुतकरून अश्मकवंशीय राजे, दक्षिणापथाचे म्हणून प्राचीन कथागायकांत प्रसिद्ध असलेले सिंहबल आणि धर्म हे राजे, त्याप्रमाणेंच कुंडिनपूर येथील राजा रोलदेव, यांच्या ज्या मनोहर, भीषण किंवा आश्चर्यकारक कथा आज कथावाङ्मयांत शिल्लक आहेत, त्यावरून बुद्धपूर्वकाळच्या महाराष्ट्राच्या सांस्कृतिक स्थितीची जी कल्पना होते ती पाल्हाळाच्या आक्षेपास उपेक्षून विस्तारानें मांडली आहे.

४ कुरुयुद्ध आणि बुद्ध या मधल्या काळांत महाराष्ट्रांतील कांहीं राजे इतर देशांचे विजेते होते, पण महाराष्ट्रावर देखील आक्रमणें झालेलीं आहेत. त्यांतील पुढील आक्रमणें यांत वर्णिलीं आहेतः—

( १ ) नरसिंहाचें परतविलेलें आक्रमण.

( २ ) शकांचें आक्रमण.

( ३ ) दक्षिणापथविजेता विक्रमादित्य याचें आक्रमण.

( ४ ) कलिंगराज शुद्रक याचें आक्रमण.

या महाराष्ट्रावरील आक्रमणाविषयीं माहिती प्रथमच या ग्रंथांत दृष्ट होईल. त्याप्रमाणें मौर्यांच्या पूर्वी नंदांनीं प्रतिष्ठान जिंकला होता काय याविषयीं चर्चा यांत प्रथमच केलेली आहे.

५ प्रस्तुत ग्रंथांत वररुचि याचा काळ निश्चयात्मक बुद्धपूर्व आहे, असें सप्रमाण मांडलें आहे आणि वररुचि बुद्धपूर्वकालीन असल्यामुळें व महाराष्ट्री भाषेचा विकास त्याच्यापूर्वी दोनचारशें वर्षे धरल्यास महाराष्ट्राच्या भाषावैशिष्ट्याचा आणि सांस्कृतिक वैशिष्ट्याचा काल ख्रिस्तपूर्व १००० वर्षे इतका मागें जात आहे, आणि त्याचा सामाजिक इतिहास पुष्कळच उपलब्ध होत आहे. तो कांहीं या भागांत तर कांहीं पुढील भागांत येत आहे.

६ या मधल्या काळांत इराणी वर्चस्व वाढलें आणि नाहींसें झालें. त्याबरोबर पैशाची वाङ्मय उत्पन्न झालें आणि नष्ट झालें. त्या वाङ्मयाच्या उत्कर्षाचीं दर्शकें मांडलीं आहेत. आजचे धंदेवाईक धार्मिक पुरुष ज्याप्रमाणें इंग्रजींतून आपलें साधुत्व जाहिरातूं लागले आहेत, त्याप्रमाणें राजकीय महत्त्व असलेल्या इराणी लोकांची भाषा जी

पैशाची तींत गौतमबुद्धासारखे संघ-संस्थापक आपला उपदेश करीत होते काय हा प्रश्न चर्चिला आहे. शक, पारसीक आणि कैकेय यांच्या पराभवास कारण झालेले उदयन आणि प्राचीन बुद्धपूर्वकालीन विक्रमादित्य यांचें कार्य वर्णिलें आहे. हें वर्णन करतांना त्याचें साहित्य जें बृहत्कथा तिचें अत्यंत सूक्ष्म परीक्षण या ग्रंथांत आहे. इराणी वर्चस्वाच्या काळांत "मग" नामक इराणी उपाध्यायांचा वर्ग महत्व पावला आणि पुढें शाकद्वीपी ब्राह्मण या नांवानें लोकांस मान्य झाला; त्या मगांच्या भारतीय इतिहासाचें स्वरूप यांत सविस्तरपणें मांडलें आहे.

७ या काळामध्यें जे मोठे सामाजिक फेरफार झाले त्यांचें पूर्ण वर्णन यांत आलें नाहीं. इतर भागांतून त्यासंबंधानें आणखी माहिती येईल; तरीहि ब्राह्मणांनीं आपल्या विद्येचें ऐक्य करून जनतेचें ऐक्य कसें संपादिलें व आपली समाजविस्तारक विद्या कशी आचरली हें स्पष्ट होईल.

८ खालील लेखांचें मूळ भाषांतर आलें आहेः—

( १ ) अशोकाचे गिरनार, सोपारें, धौली, बैरट येथील लेख.
( २ ) दारियस हिस्टास्पिस याचे बेहिस्थान येथील लेख.
( ३ ) कोंकणचा उल्लेख करणारे नाशिक व जुन्नर येथील लेख.
( ४ ) शातवाहनांचे नानाघाट येथील व इतर ठिकाणचे कांहीं लेख.
( ५ ) खारवेलाचा लेख.
( ६ ) चालुक्याचे दोन लेख.

९ प्राचीन इतिहासाचें एक मोठें साहित्य जातिवर्णनात्मक होय. त्यापासून जातीचीं भ्रमणें स्थित्यंतरें हीं काढतां येतात. भारतीयसमाजांत जाती आपल्या स्वतंत्र अस्तित्वाचें सातत्य अनेक शतकें किंवा सहस्रकें चालू ठेवतात. मत्स्यजीवी जातींचें भ्रमण आणि त्यांची महाराष्ट्रभर आणि इतर भागांत झालेली वांटणी अत्यंत प्राचीन काळाच्या इतिहासाची कशी दर्शक आहे हें यांत दाखविलें आहे.

१० प्राचीन आयुष्यावर संस्कार होऊन जी संस्कृति तयार होते तिचाच परिणाम संस्कृत भाषा वाङ्मय आणि धर्मशास्त्रोक्त रीती हीं असल्यामुळें मूलग्राही संशोधकानें प्राकृत विद्येच्या अभ्यासाकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे हें तत्त्व या ग्रंथांत सोदाहरण आलें आहे, पण या तत्त्वाचा अधिक उपयोग पुढील भागांत झालेला दिसेल.

श्री. व्यं. केतकर

# प्रस्तावना

—:०:—

## १. शातवाहनपर्व आणि अश्मककाल.

१. शातवाहनपर्व हें नांव ज्या कालास देणें योग्य होईल, तो काल बराच विस्तीर्ण असला तरी या पर्वात जो काल विवेचनासाठीं घेतला आहे तो त्याहूनहि विस्तीर्ण आहे. कुरुयुद्धापासून बुद्धाच्या अंतापर्यंतचा काल १००० वर्षे, बहुतेक नंदकालापर्यंतचा काल १२०० वर्षे इतका विस्तीर्ण एक काल धरून त्याला कांहीं तरी नांव द्यावें लागेल. या कालास उत्तरेच्या इतिहासांत "इक्ष्वाकु-पौरव-बार्हद्रथ" काल असें नांव दिलें तर दक्षिणेच्या इतिहासांत अश्मक काल हें नांव द्यावें लागेल.

नंदकालापासून शातवाहनांच्या म्हणजे आंध्रांच्या अंताचा काल फारतर सातशें अगर आठशें वर्षेच येईल. या कालाच्या शेवटीं त्यांचें अखिल भारतीय सार्वभौमत्व किंवा महत्त्व नाहींसें झालें. शातवाहनांच्या वंशाचें सातत्य मुसलमानी विजयापर्यंत चालूच होतें, आणि यासाठीं शातवाहनांच्या कथांचें सूत्र पुष्कळ दूरपर्यंत ओढतां येईल.

कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंत किंबहुना नंदापर्यंतच्या कालाला अश्मककाल असें नांव देण्यास हरकत नाहीं. तथापि अश्मकाचें सातत्य देखील अंशेंकरून वाकाटकांच्या कालाच्या शेवटापर्यंत चालू होतें, ही गोष्ट विसरतां कामा नये. अश्मकांच्या इतिहासास जें साहित्यभूत झालें असतें असें वैदर्भीरीतीचें प्रतिनिधिभूत झालेलें संस्कृत महाकाव्य आपणांस अजून उपलब्ध झालें नाहीं. जेव्हां तें उपलब्ध होईल, तेव्हां अश्मककालावर निराळा प्रकाश पडेल, व प्रस्तुत भागांत मांडलेल्या इतिहासास कांहीं पुष्टि मिळेल, त्याप्रमाणेंच त्यांतील चुका दुरुस्त होऊन कथासूत्र अधिक व्यवस्थित होईल, अशी प्रस्तुत लेखकाची अपेक्षा आहे.

## २. अश्मकोपपर्व, अथवा शातवाहन-पर्वाचें मुखपर्व.

२. अश्मकांच्या इतिहासाचा धागा कुरुयुद्धापूर्वीपासून वाकाटकांच्या काळापर्यंत म्हणजे अनेक शतकें किंबहुना दोन सहस्रकें चालू दिसतो. कुरुयुद्धांत अश्मकराज पडला हें जरी खरें नसलें तरी महाभारताला राष्ट्रीय नव्हे तर अखिल सांस्कृतिक महाकाव्याचें स्वरूप जेव्हां देण्यांत आलें त्या कुरुयुद्धापासून दूर नसलेल्या कालांत अश्मकादि अनेक दक्षिणेकडील राज्यें व्यासशिष्यपरंपरेस ज्ञात होतीं, हें स्पष्ट आहे. अश्मक राज्य, चंद्रहास्याचें कुंतलराज्य, भीष्मकाचें विदर्भ राज्य आणि "क्राथ" (बहुतकरून वर्धेच्या पूर्वेकडील विदर्भाचें) राज्य हीं राज्यें अस्तित्वांत होतीं, गोमंतकापर्यंत यादव पोंचले होते, वगैरे विधानें पुराणाच्या साहाय्यानें करतां येतील. अश्मक राजे "कुरुयुद्धापासून नंदापर्यंत" पुराणें सांगतात त्याप्रमाणें पंचवीसच असतील असें नाहीं, तर पुराणकारांना नंदकाळीं अश्मकांचे पंचवीसच राजे ठाऊक असावेत एवढेंच आपणांस गृहित धरतां येईल. अश्मक राजाचा इतिहास यांत अत्यंत त्रोटक दिला आहे म्हणून त्याचें नांव पर्वास स्वतंत्रपणें दिलें नाहीं. तथापि अश्मकोपपर्व हें शातवाहनपर्वाच्या प्रारंभास नांव दिलें तर अयोग्य होणार नाहीं.

### ३. अश्वहीन महाराष्ट्राची प्राचीनता; विदर्भाचें अप्रामुख्य.

३. अश्मक राज्याच्या प्रारंभकालांत महाराष्ट्रांत घोडे नसावेत अशी स्थिति नरसिंहकथेवरून स्पष्ट होत आहे. इतक्या प्राचीन काळापर्यंत बृहत्कथा आपली दृष्टि पोंचवीत आहे. नरसिंह अश्मकच असेल अशी आमची खात्री नाहीं. कदाचित् त्याचें अस्तित्व कुरुयुद्धपूर्वकालांतहि जाईल; तथापि अधिक उत्तरकालीन जें राज्य त्या राज्याचीच आठवण टिकली असें केवळ गृहित धरून नरसिंह अश्मक राजा असावा अशी कल्पना केली आहे. विदर्भाचा मगधाशीं युद्धसंबंध कुरुयुद्धकालीं दिसत होता, त्याचें सातत्य अश्मक राज्यांत देखील दिसत आहे. अश्मक राज्यांत अनेक शतकें संस्कृतिविकास दिसत आहे आणि विदर्भास दुय्यमत्व आलेलें दिसत आहे. बृहत्कथेंत कुंडिनपुराच्या जरी कांहीं कथा असल्या तरी विदर्भास फारसें महत्त्व दिसत नाहीं. आणि यावरून कुरुयुद्धानंतरच्या काळांत विदर्भराज्य कांहीं काल प्रतिष्ठानकांचें, तर कांहीं काल मागधांचें, तर कांहीं काल अवंतिराजाचें मांडलिक राज्य असावें असें दिसतें. 'अवंतिराजाचें मांडलिक राज्य होतें.' याचा अर्थ विदर्भावर अवंतीच्या लोकांचा वरचष्मा होता असें मुळींच नाहीं. किंबहुना दक्षिणेचा राजा अवंतीवर स्थापन करण्यांत विदर्भानें मदत केली होती असाहि प्रकार असेल.

### ४. प्राचीनकाल आणि दायादराज्यपद्धति.

४. दक्षिणेकडील आणि उत्तरेकडील अनेक राज्यें दायादांत वाटलीं जात असत, त्यामुळें जरी मध्यवर्ती राज्य परचक्रानें येऊन जिंकलें तरी इतर दायाद राज्यें बलवान् असल्यामुळें त्या राज्यास पूर्वस्थितिस्थापकता सहज असे; नंदासारख्या उत्तरेकडील राजानें एखादे वेळीं अश्मकांस जरी जिंकलें तरी अश्मकांस आपली सत्ता पुन्हा स्थापन करणें अशक्य मुळींच झालें नाहीं.

### ५. विभागविषय अश्मकराज्य; अश्मकांपासून शातवाहनांकडे अधिकार जाणें आणि शातवाहनसत्तेचा अखिलभारतीय विस्तार आणि इतक्या विस्तृत काळांतील व क्षेत्रांतील सांस्कृतिक इतिहास; पूर्वेकडे प्रसार.

५. अश्मकांपासून शातवाहनांकडे राज्य आलें असावें, व तें कांहीं तरी अद्भुत रीतीनें आलें असावें, असा इतिहास त्यांवर उत्पन्न झालेल्या दंतकथा सांगूं पहात आहेत. तथापि अशोककालांत शातवाहन राज्य करीत होते हें स्पष्ट आहे. शातवाहनांच्या राज्याचा विस्तार मौर्य काळांतच बराच झालेला दिसतो. खारवेलाच्या काळांतच मगधाला शह देण्याचा आणि अखिल भारतीय साम्राज्यपद हस्तगत करण्याचा प्रयत्न थोडासा स्तंभित झाला व त्यांची आकांक्षासिद्धि कांहीं दिवस दुरावली एवढाच राजकीय इतिहास प्रस्तुत विभागांत आला आहे. ह्या विभागांत आलेला राजकीय इतिहास ऊर्फ सांस्थानिक इतिहास थोडाच आहे असें वाचकांस वाटल्यावेरीज राहाणार नाहीं. शातवाहनांचा मगधविजय, शातवाहनांच्या आणि क्षत्रपांच्या स्पर्धेचा इतिहास, शालिवाहनाच्या शकाची स्थापना, विक्रमसंवताचा शातवाहनांशीं संबंध, शातवाहनकालीन सामाजिक स्थिति, काव्य, नाट्य, आणि शासनशास्त्र या सर्वांचा परामर्श शातवाहनसत्तेच्या विकासाशीं अधिकाधिक परिचय करून देतांना दिला जाईल. अर्थात् गुप्त, भारशिव आणि वाकाटक हे शातवाहनांचे उत्तराधिकारी कसे झाले यासंबंधानें विवेचन त्यानंतरोवर होईलच.

### ६. कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंत संस्कृतिवाहक भाषेची घटना.

६. राजकीय इतिहासाचें अल्पत्व जरी असलें तरी

सांस्कृतिक इतिहासाविषयीं माहिती अल्प नाहीं. कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंतच्या काळांत संस्कृत वाङ्मयाचें संवर्धन होत होतें. वैदिकांनीं वेदांगवाङ्मय तयार केलें, आणि त्यांतीलच एका वर्गानें सूतवाङ्मयाचें संस्कृतीकरण केलें. सूतवाङ्मयाची प्राकृत भाषा वैदिक भाषेशीं सदृश असली पाहिजे आणि त्यामुळें प्राकृतवाङ्मयाचें संस्कृतीकरण करण्याच्या प्रयत्नांतच आजची संस्कृत भाषा तयार झाली असें दिसतें. वेदांच्या भाषेंत जे धातु नसतील व सूतांच्या भाषेंत असतील त्यांचा समावेश येणेंप्रमाणें संस्कृतमध्यें झाला असावा. आणि संस्कृत भाषेचीं प्राकृतमूलक भिन्न रूपें भिन्न स्थानीं तयार झालीं असलीं पाहिजेत. वररुचीच्या प्राकृत व्याकरणाचें जें स्वरूप आहे तें प्राकृत भाषा विवेचक नसून केवळ संस्कृतीकरणाचें कार्य शिकविणारें आहे. कारण त्याच प्रकारच्या व्याकरणाची विद्वान् समाजास आवश्यकता होती. प्राकृतांतील साहित्य एका सर्वमान्य भाषेंत आणणें हेंच मोठें कार्य वाङ्मयक्षेत्रांतील वर्गापुढें होतें.

## ७. प्राकृत भाषांची स्पर्धा व तींतील यशस्वी भाषा.

७. संस्कृत भाषेंतील वाङ्मयाचा इतिहास लिहिला गेला आहे, पण तो लोकस्थितिदर्शक अगर विकासदर्शक इतिहास नव्हे. लोकांचें वाङ्मय चोहोंकडे प्राकृतच होतें. त्यांतील आज थोडेंच उरलें असल्यामुळें त्याचा इतिहास आज सूचक संस्कृत अवशेषांवरून निगमनपद्धतीनेंच काढला पाहिजे. संस्कृत आणि प्राकृत यांची वाढ बरोबरच होत होती. प्राकृत कवी आणि पंडित आपल्या भाषेचें नियमन अलंकरण करूं पहात असतां त्या चढाओढींत ज्या एका प्राकृत भाषेस यश आलें तीच वैदिकांची प्राकृत ऊर्फ संस्कृत होय. प्रत्येक भाषेंत वाङ्मयविकास बराच झाला तरी वैदिक प्राकृत भाषेच्या अभ्यासकांशिवाय इतर प्राकृत भाषांच्या उपासकांमध्यें व्याकरणनियमन थोडेंच होतें. प्राकृतांनीं आपल्या भाषेचें व्याकरणनियमन केलें नाहीं. अलंकरण आणि वाङ्मयसंवर्धन मात्र केलें. तथापि वाङ्मयाचें रक्षण करणें आणि व्याकरणाच्या नियमांनीं त्याचें अक्षरान्अक्षर तपाशीत बसणें या क्रिया इतर प्राकृतांच्या अभ्यासकांकडून झाल्या नाहींत. वाङ्मय जिवंत ठेवील असा त्यांच्यामध्यें सूतांचा वर्ग होताच. त्यास राजाश्रयहि असावा. पण सूतांच्या वर्गानें जमविलेलें वाङ्मय जेव्हां संस्कृत पुराणग्रंथांत निविष्ट करण्यांत आलें, तेव्हां संस्कृत भाषेचें महत्त्व वाढून पौराणिकांचें महत्त्व वाढलें असलें पाहिजे आणि सूतांचें कमी झालें असलें पाहिजे.

## ८. कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंतच्या इतिहासाचें अस्तित्त्व; तथापि संस्थानिक इतिहासाविषयीं भारतीयांची उदासीनता.

८. कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंतच्या मधल्या सहस्रकाचा इतिहास अज्ञात आहे. पण तो अज्ञात राहिला पाहिजे असें मुळींच नाहीं. त्या कालचेहि अवशेष शिल्लक नाहींत असें नाहीं. प्रत्येक काळांतील विकासाचें ग्राह्यफळ संरक्षून ठेवण्याइतपत प्राचीन भारतीयांची संस्कृति जागरूक होती. आणि या दीर्घकालांतील झालेल्या विकासाचें फल प्राचीनांनीं प्रयत्नपूर्वक संरक्षून ठेवलें आहे. प्राश्चात्य ग्रंथकार ज्या प्रकारचे इतिहासग्रंथ तयार करीत आहेत तशा तऱ्हेची कृति प्राचीन भारताचा इतिहासग्रंथ होणार नाहीं. आणि त्यास मुख्य कारण इतिहासविषय जे भारतीय लोक त्यांची व त्यांच्या संस्कृतीची विशिष्टता हेंच होय. भारतीय संस्कृतीमध्यें सांस्थानिक घटना हा जरी एक महत्त्वाचा भाग आहे तरी एकंदर भारतीय इतिहासामध्यें सांस्थानिक घटनेचें महत्त्व कमी आहे असें प्राचीन ग्रंथकारांस वाटलें. राज्य किंवा संस्थान हें सर्व सामाजिक आयुष्यक्रमाचें केन्द्रस्थान कधींच नव्हतें. ब्राह्मणविद्या संस्था-

नाश्रयनिरपेक्ष होती, राजेलोकांनीं विद्येला मदत करावी, केली तर बरेंच आहे, नाहीं केली तरी आपल्या विद्येचें सातत्य चालू ठेवलें पाहिजे अशा भावनेंत ब्राह्मणविद्या विकसित झाली, आणि त्यामुळें संस्थानें आलीं कोणतीं व गेलीं कोणतीं याला महत्त्व देखील ब्राह्मणी दृष्टीनें कमीच होतें. समाजाच्या गंभीर संस्कृतीच्या म्हणजे विज्ञानाच्या विकासाला ब्राह्मणपरिश्रम व ब्रह्मबल हींच कारण होत होतीं. राजेलोकांच्या आश्रयानें ब्राह्मणविद्या फारशी वाढली नाहीं. राज्य कोणतेंहि येवो ब्राह्मण-विद्या आपलें कार्य चालवीतच होती. तोच कायदा, तीच राज्यव्यवहारपद्धति, अशी परिस्थिति असतां अमुक राजघराणें आलें आणि तमूक गेलें तर ब्राह्मण काय पण इतर लोकांना देखील त्यांत फिकीर वाटत नसे. प्राकृत भाषांच्या भिन्न विकासामुळें जर भिन्न राष्ट्रीयता उत्पन्न झाली असती तर भाषामूलक राष्ट्राचा अभिमान उत्पन्न झाला असता; पण प्रांतिक भाषांच्या प्रगतीपेक्षां अखिल सांस्कृतिक भाषा उत्पन्न करून व तिलाच संस्कृ-तियान बनवून सर्व देशांत संस्कृतांनीं ऐक्य उत्पन्न केलें होतें. त्यामुळें विशिष्ट राज्य किंवा प्रदेश हा कवितेचा किंवा अलंकरणाचा विषयच झाला नाहीं. संस्कृतीचें संपूर्ण क्षेत्र जें भारत तें मात्र अभिमानाचें आणि तन्मूलक काव्याचें आश्रयस्थान झालें.

## ९. सांस्कृतिक इतिहासाविषयीं जागरूकता.

९. संस्कृतीचें आश्रयस्थान अखिल भारत झालें. सांस्थानिक देशाभिमान कमी महत्त्वाचा झाला आणि त्यामुळें अभिमान ज्याविषयीं निर्माण करण्यांत आला, त्या गोष्टी म्हटल्या म्हणजे एकंदर देश व त्याची संस्कृति हीं होत. यामुळें म्लेंच्छ, यवन यांविषयीं मात्र थोडीबहुत द्वेषबुद्धि भारतीय ग्रंथांतून दिसत आहे, ती देखील थोडीच दिसत आहे; कारण जे आज यवन आहेत, ते ब्राह्मणानुयायी झाले म्हणजे उद्यां क्षत्रिय होणार ही शक्यता ब्राह्मणांस दिसत होती.

भिन्न संस्कृतीच्या लोकांचें राज्य येऊं नये म्हणून क्षत्रियांनीं प्रयत्न करावा, तर राजा भिन्न संस्कृतीचा आला तर त्याला आपल्या संस्कृतीच्या छत्राखालीं आणावें असा प्रयत्न ब्राह्मणांनीं आणि त्यांच्या विद्येनें करावा. अशा तऱ्हेनें नवीन नवीन उत्पन्न होणाऱ्या राजकीय आणि सामाजिक प्रश्नांना तोंड देण्याची क्रिया चालली होती.

## १०. सांस्कृतिक इतिहास; कुरुयुद्धपूर्व व कुरुयुद्धोत्तर घडामोडी.

१०. इतिहास हा समाजाच्या सर्व अंगांचा लिहावयाचा असतो; भारतीय इतिहासामध्यें सांस्थानिक इतिहास हा त्या इतिहासाचें केवळ एक अंग आहे. सांस्कृतिक इतिहासामध्यें सांस्थानिक इतिहास हा दुय्यम महत्त्वाचा आहे, ही जाणीव ज्या लोकांमध्यें होती त्या लोकांकडून साहित्यरक्षण त्याच कल्पनांच्या अनुसार व्हावयाचें, व तसेंच झालें. संस्थानाच्या म्हणजे विशिष्ट राज्याच्या वाढीबरोबर कांहीं ललितसंस्कृतीची वाढ होत असते. ती वाढ मात्र मधूनमधून कायम संस्कृतीचा भाग होई.

सात्त्विक, राजस आणि तामस असे वाङ्मयाचे भेद रामदास करतो आणि राजस कवितेस दुय्यम प्रतीची समजतो आणि राजाश्रयानें वाढलेली कविता तो 'राजस' वर्गांत घालतो. राजधानींत संस्कृत्यंतर्गत ललित अंगाचा विकास होतो तर समाजास खरें मह-त्त्वाचें जें वैज्ञानिक वाङ्मय त्याची वाढ हिंदुस्थानांत राजसत्तानिरपेक्ष अशी झालेली दिसत आहे. त्याच प्रकारचें म्हणजे राजसत्तानिरपेक्ष कविता व इतर वाङ्मय हीं उच्च प्रतीचीं अशी भावना रामदास व्यक्त करीत आहे. ही भावना एकंदर ब्राह्मणी परंपरेला अनुसरून आहे. राजसत्तेचा व तीबरोबर वाढलेल्या संस्कृतीचा इतिहास जरी आपणांस व्यवस्थितपणें उपलब्ध झाला नाहीं तरी ब्राह्मणी व्यापक दृष्टि मधून-

मधून राजसत्ताप्रेरित ललितसंस्कृतीचें संग्रहण करी. वैज्ञानिक वाङ्मय आणि ब्राह्मणावलंबी संस्कृतीची प्रगती मात्र एकसारखी दिसत आहे. वेदपूर्व काळापासून मुसलमानी स्वाऱ्यांपर्यंत संस्कृतिविकासाचा अत्यंत सविस्तर इतिहास म्हणजे संस्कृतिविकासांतील निरनिराळ्या पायऱ्या व त्यांची पूर्वोत्तरता हीं सविस्तर देतां येण्याजोगीं आहेत, आणि त्या संस्कृतिविकासाचीं कांहीं अंगें प्रस्तुत विभागांत स्पष्ट केलीं आहेत.

कुरुयुद्धकालीं पूर्वी वेदांचें संहितीकरण बरेंचसें झालें असावें आणि ऋग्वेदांतील बहुतेक सूक्तें कुरुयुद्धापूर्वींच रचलीं गेलीं असावींत व संग्रहित केलीं गेलीं असावींत. तेव्हांपासून संग्रहित वाङ्मयाचा अभ्यास आणि संप्रदायास अनुरूप अशा संग्रहित साहित्याच्या निरनिराळ्या संहिता तयार करणें इत्यादि क्रिया होऊं लागल्या; तथापि संग्रह तयार करून त्यांचा पद्धतशीर अभ्यास करणें या क्रियेस चालना कुरुयुद्धोत्तर कालीं झाल्याकारणानें श्रौतस्मार्तसंस्कृतिघटनेचा सर्व इतिहास या कुरुयुद्धोत्तर कालांतच मोडतो. ब्राह्मणांचा प्रयत्न सांस्कृतिक भाषा आणि वाङ्मय यांच्या संवर्धनाकडे झाला, त्यामुळें सांस्थानिक घडामोडींकडे त्यांनीं फार बेताचेंच लक्ष दिलें. रक्षणीय भाषा संस्कृत झाली, परक्या भाषा व देशी भाषा या दोन ब्राह्मणांच्या दृष्टीनें प्राकृत होत्या. त्यामुळें त्यांच्याविषयीं तो वर्ग उदासीन होता.

## १०. अ. प्राकृतभाषेतिहासदृष्टकाल.

१०. अ. कुरुयुद्धोत्तर कालांतील प्राकृत भाषांच्या प्रामुख्याच्या दृष्टीनें काल पाडले तर ते राजकीय इतिहासाचे बरेचसे बोधक होतील. ते म्हटले म्हणजे:—

१. पैशाची व महाराष्ट्री यांच्या प्रामुख्याचा ऊर्फ वररुचिपूर्वकाल.

२. मागधी, शौरसेनी यांच्या महत्त्ववृद्धीचा काल ऊर्फ वररुचिकाल.

३. पाली व अर्धमागधी यांच्या प्रामुख्याचा काल. हा काल वररुचिनंतरचा आणि बौद्ध व जैन यांच्या सामाजिक प्रामुख्याचा काल होय.

कुरुयुद्धापासून वररुचिकालपर्यंत देशी भाषांस आपलें कार्यक्षेत्र बरेंच मर्यादित करावें लागलें असलें पाहिजे. त्यांच्या प्रतिस्पर्धी भाषा म्हटल्या म्हणजे दोन होत्या; धर्मकारणांत संस्कृत भाषेची स्पर्धा होती आणि राजकारणांत पैशाची भाषेची स्पर्धा होती. त्या स्पर्धेत राजकारणामुळें प्रामुख्य पावलेल्या पैशाची भाषेंतील ग्राह्य भाग सांस्कृतिक भाषेंत जतन करून ठेवला गेला. प्राचीन कथांचे लोण प्रथम देशी प्राकृत नंतर पैशाची व नंतर संस्कृत या भाषांच्या मार्फत आजपर्यंत पोंचविलें गेलें आहे. आणि त्यामुळें पैशाचींतील संस्कृतमध्यें आलेलें वाङ्मय आपणांस मध्यकालीन इतिहासाच्या दृष्टीनें म्हणजे कुरुयुद्धोत्तर व बुद्धपूर्व इतिहासासाठीं अत्यंत महत्त्वाचें आहे. आणि तें यथावबोध प्रस्तुत इतिहासांत वापरलें गेलें आहे.

कुरुयुद्धपूर्वकालांतील सांस्कृतिक इतिहास हा कांहीं बाबतींत ज्ञात आहे तर कांहीं बाबतींत अज्ञात आहे. वैदिक संस्कृतीच्या घटनेची पूर्वरूपाची मांडणी त्या इतिहासाचा विषय होतो. त्या भागाची चर्चा प्रस्तुत ग्रंथाच्या आदिपर्वांत केलेली आहे.

## ११. कुरुयुद्धोत्तर कालापासून बुद्धकालापर्यंतच्या इतिहासांत परकीय लोकांचें प्रामुख्य आणि त्याचे भारतीय संस्कृति आणि वाङ्मय परिणाम.

११. या कालांत परकीय लोकांचें प्रामुख्य असून त्याचा परकीयपणा भासत होता. आणि त्यामुळें ज्या कालच्या इतिहासाचें भाटांकडून अभिमानपूर्वक रक्षण झालेलें नसावें. भाटांनीं लोभानें जरी परकीयांची स्तुति केली असली तरी तिचा स्वीकार ब्राह्मणांनीं आपल्या वाङ्मयांत केला नसला पाहिजे. मोगल बादशहांचें गुणगौ-

रव देखील भाट करीत. शिवाजीचा भाट जो भूषण त्याचा भाऊ औरंगझेबकडे होता ही गोष्ट विसरतां यावयाची नाहीं. तथापि जे लोक केवळ विद्येचा विकास करण्यासाठीं आपल्या गरजा संपुष्टांत आणणारे होते त्यांना या भाटांची वृत्ति ठेवणें शक्य नव्हतें. भाटकाव्याविषयीं तुच्छता ब्राह्मणांत असावी व तीच वृत्ति उत्तरकालीं संतवाङ्मयांत दिसूं येऊं लागली. भाटांच्या परिश्रमाचा सामाजिक उपयोग नव्हता असें मात्र नाहीं. जेव्हां भाटांनीं अनेकदां काव्य गाऊन जो परकीय पुरुष गौरवला असेल तो कालांतरानें देशी झाला म्हणजे त्या देशाचे लोक देखील त्याचा अभिमान बाळगूं लागतात असाहि अनुभव आहे. इंग्लंडचा राजा पहिला रिचर्ड हा जणुं काय इंग्रज आहे अशीच इंग्रज लोकांची भावना असते. पण तो आपल्याला देशी लोकांतला समजत नव्हता तर नार्मन समजत होता. तशा प्रकारच्या क्रिया इतिहासांत वारंवार झाल्या आहेत. परक्या राजांचा परकेपणा गेला म्हणजे ते देशी लोकांना प्रिय होऊं लागतात.

कुरुयुद्धोत्तर काळांतील अनेक शतकें परकीय लोकांचा पगडा देशावर असावा. त्या लोकांच्या वाङ्मयाचा प्रथम सामान्य आणि कथाप्रिय जनतेनें स्वीकार केल्यानंतर कालांतरानें तें वाङ्मय संस्कृतस्वरूप धारण करून राष्ट्रीय वाङ्मयांत समाविष्ट होतें झालें. या दृष्टीनें पैशाचींतून संस्कृतमध्यें आलेल्या वाङ्मयाकडे पाहिलें पाहिजे. ब्राह्मणांची वृत्ति या काळांत देशीराजे व परके लोक यांसंबंधानें कांहीं अंशीं सदृश तर कांहीं अंशीं भिन्न होती. देशी राजांस व लोकांस ते प्राकृतजन समजत तर परकीय लोकांस म्लेच्छ समजत. दोहोंमध्यें फरक होता. प्राकृतजन ब्राह्मणांस मोठे मानणारे तर परकीयजन ब्राह्मण संस्कृतीचे विध्वंसक. पण परकीयजन देखील जर ब्राह्मणांस मानूं लागले तर त्यांचा विरुद्ध भाव स्वाभाविकपणें कमी होत जाणारच. कैकेयांच्या भाषेसारखी भाषादेखील प्राकृतसारखीच संस्कृतशीं संबद्ध पण थोडीशी दुरावलेली. पण गांधार, बाल्हिक, कैकेय इत्यादि परक्या लोकांचें राज्य आलें तर ब्राह्मणांस त्यांविषयीं दूरता वाटत नसे. याप्रकारच्या कारणामुळें पैशाची आणि महाराष्ट्री या दोन्ही भाषांस प्राकृत म्हणावें यांत आश्चर्य नाहीं. पैशाचींतील वाङ्मयाकडेसच आपण वळूं.

## १२. बृहत्कथा आणि त्या संग्रहाचें ऐतिहासिक महत्त्व.

१२. पैशाचींतील मुख्य विश्रुत ग्रंथ म्हटला म्हणजे बृहत्कथा होय. तो कुरुयुद्धोत्तर इतिहासाचा संरक्षक आणि त्याबरोबरच इतिहासविपर्यासाचा संरक्षक आहे. त्यामुळें प्रस्तुत ग्रंथांत बृहत्कथेपासून इतिहासनिष्कर्षणाचा पद्धतशीर प्रयत्न केलेला आढळेल. ऐतिहासिक कथासूत्राच्या शोधाच्या अनुषंगानें अनेक प्रश्न विवेचनास घेतले गेले आहेत. त्यांपैकीं एक प्रश्न म्हटला म्हणजे बृहत्कथेच्या कालासंबंधींचा होय. बृहत्कथेच्या दोनच आवृत्त्या विवेचनास घेतल्या आहेत. आणि तिसरी आवृत्ति म्हणजे "श्लोकसंग्रह" ही वगळली आहे. ती आवृत्ति वररुचीच्या प्रयत्नांशीं संबद्ध नाहीं त्यामुळें तिच्या कालाविषयीं कोणतेंच अनुमान करतां येत नाहीं. ही आवृत्ति इतकी भिन्न आहे कीं, आधारभूत झालेली मुख्य कथा एकच होती असें म्हणतां येत नाहीं. उदयनकालीं ज्या कथा त्याच्या कुलाविषयीं सूतवर्गांत प्रचलित होत्या, त्या वर्गापैकीं कांहीं कथा त्याच्या कुलाविषयीं भिन्न भिन्न संप्रदायांच्या हातीं लागून भिन्न संग्रह तयार झाले आणि एका संग्रहाचें संवर्धन आणि व्यवस्थीकरण वररुचीकडून झालें तर दुसऱ्या संग्रहाचें संवर्धन दुसऱ्या कोणाकडून तरी झाल्यानंतर त्या संग्रहासही बृहत्कथा हेंच नांव लावलें गेलें. आधारास असलेल्या एका गोष्टीची विकृति होत होत काश्मिरी बृहत्कथा आणि बुधस्वामीची बृहत्कथा या दोन ग्रंथांची निर्मिति झाली असें मुळींच दिसत नाहीं.

वररुचीच्या कालांत जें रूपांतर झालें त्या रूपांतराला गुणाढ्य वगैरेंचे हात लागून कांहीं फरक झाले असावे. अशा फरकांपैकीं एक उदाहरण नागार्जुनाचें नांव आलें तेव्हां त्याचें ऐक्य बौद्ध नागार्जुनाशीं आहे असें समजून कोणी तरी केलेले फरक होत. बृहत्कथा अखिल भारतीय कथांचा संग्रह असल्यामुळें आणि त्यांमध्यें प्रतिष्ठान कथा व दक्षिणापथ कथा, कुंडिनपुर कथा येत असल्यामुळें महाराष्ट्राच्या इतिहासास त्या संग्रहाचा उपयोग करणें प्राप्त झालें. हा संग्रह तयार करण्यांत वररुचीचा हात असल्यामुळें आणि वररुचि हा महाराष्ट्राच्या भाषेचा आद्य वैय्याकरण असल्यामुळें वररुचीविषयीं अधिक विधानें करणें प्राप्त झालें. वररुचि हा बुद्धोत्तरकालीं होता असें समजण्यास निश्चयात्मक आधार कोणताच नाहीं. कारण प्राकृतप्रकाशामध्यें जे समाजविषयक आणि भाषाविषयक उल्लेख आले आहेत त्या उल्लेखांमध्यें बौद्ध संप्रदायाच्या अस्तित्वाच्या दर्शक उल्लेखांचा पूर्णपणें अभाव दिसतो. वररुचीच्या व्याकरणांतील रूपें पालीरूपांहून भिन्न आहेत हें खरें आणि डॉ. बापट म्हणतात त्याप्रमाणें संस्कृत शब्दाशीं पाली शब्दाचें सादृश्य अधिक निकट आहे; पण त्या दोन भिन्नस्थलीय भाषा आहेत, आणि त्यामुळें बौद्ध ग्रंथांतील पालीरूपें आणि प्राकृतप्रकाशांत सांगितलेलीं रूपें यांचा मेळ घालून प्राकृतप्रकाशांतील भाषेची पालीग्रंथाहून उत्तरकालीनता सिद्ध करणें शक्यच नाहीं. बौद्ध पालीग्रंथांतील रूपाहून वररुचीच्या महाराष्ट्रांतील रूपें उत्तरकालीन आहेत असें सांगू पाहणें म्हणजे आधाराशिवाय निर्णय काढणें आहे. वररुचीची महाराष्ट्री बुद्धपूर्व आहे आणि वररुचीचें व्याकरण पाली किंवा अर्धमागधी या भाषांच्या उदयापूर्वीचें आहे, असें आमचें मत आहे. आणि पैशाची भाषेचें प्रामुख्य ज्या काळांत होतें तो काल वररुचीच्या व्याकरणानें दिग्दर्शित होत आहे. वररुचीच्या कालापूर्वी कांहीं पिढ्या पैशाची ही वाङ्मयाची भाषा होती. त्या काळांत पालीचें अस्तित्वच नव्हतें, बुद्धाचेंहि अस्तित्व नव्हतें; तथापि, महाराष्ट्री भाषा प्रगल्भ झाली होती आणि प्राकृत भाषांत तीच प्रमुख होती हेंच स्पष्ट आहे. या प्रगल्भतेचा काल अर्थात् वररुचीच्यापूर्वी दोनतीनशें वर्षें इतका तरी होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. वररुचीचें व्याकरण वाचकांसमोर पूर्णपणें असावें, यासाठीं त्याचीं सर्व सूत्रें मूळ भाषांतर व स्पष्टीकरणात्मक टीपा यांसह परिशिष्टांत दिलीं आहेत. वररुचीच्या कालीं महाराष्ट्र या शब्दाचें अस्तित्व होतेंच असें आम्हीं खात्रीपूर्वक म्हणत नाहीं, कारण वररुचीच्या प्राकृत प्रकाशाच्या कात्यायनी आवृत्तींत आजचा संपूर्ण प्राकृतप्रकाश येत नाहीं आणि त्यामुळें शौरसेनी पैशाची आणि मागधी, यांचेंही व्याकरण येत नाहीं. व त्यामुळें प्राकृतप्रकाशांतील शेवटचें सूत्र "शेषं" महाराष्ट्रीवत् वररुचीच्या कालीं अस्तित्वांत असेलच असें म्हणतां येत नाहीं; तथापि नसेल असेंहि म्हणतां येत नाहीं. उलट महाराष्ट्र हा शब्द चालू असणें हेंच अधिक शक्य वाटतें; कारण कात्यायन हा जर दाक्षिणात्य टीकाकार असला तर तो फक्त दक्षिणेकडील प्रचलित असलेल्या प्राकृत भाषेच्या स्पष्टीकरणापुरती टीका लिहून आपल्या विद्यार्थ्यांची गरज भागविता झाला असेल. त्यावरून प्राकृत प्रकाशाच्या उत्पत्तीच्या कालीं चारही प्राकृत भाषांचें व्याकरण असणें, आणि "महाराष्ट्र" हा शब्दही अस्तित्वांत असणें हें पूर्ण संभवनीय वाटतें.

एवंच महाराष्ट्राच्या इतिहासाचा एक मोठा उजेडाचा कालविभाग म्हटला म्हणजे वररुचीचा काल होय. या वररुचीचें अस्तित्व पाणिनीच्या कालाहून दूर नसावें आणि वररुची व पाणिनि हे दोघेही जवळजवळ समकालीन असल्यामुळें ते दोघेही एका गुरूचेच शिष्य होते ही कल्पना उद्भूत होऊन आणि विद्वान् वर्गाच्या आख्यायिकासंग्रहांत शिरून ती कथापीठ-

लंबकांत समाविष्ट झाली असावी. औदयनकथासंग्रहाचा काल बुद्धाच्या पूर्वी आणि उदयनाच्यानंतर केव्हांतरी होऊन गेला असावा आणि कथापीठलंबकरचनेचा काल मौर्यराज्याच्या प्रारंभाचा असावा, असें आमचें मत आहे; आणि त्यामुळें बृहत्कथेचा आणि वररुचीच्या प्राकृतप्रकाशाचा उपयोग त्या दृष्टीनेंच केलेला प्रस्तुत ग्रंथांत सांपडेल. वररुचीनें ज्या वाङ्मयाचा संग्रह केला तें वाङ्मय आजची काश्मीरी बृहत्कथा आहे, आणि तींत संग्रहीत झालेल्या गोष्टी वररुचीपूर्वीच्या असल्या पाहिजेत असें सामान्यतः गृहित धरलेलें सांपडेल. अर्थात् बृहत्कथेस आम्ही बरेंच मोठें ऐतिहासिक महत्त्व दिलें आहे.

## १३. सूतवाङ्मय आणि पैशाची वाङ्मय.

१३. प्राचीनकालापासून वाङ्मयाचा संग्रह करणारी परंपरा सूतांची होय. त्या परंपरेनें निर्माण केलेलें साहित्य पुराणांत शिरलें आणि सूत वृत्तांचें संस्कृतीकरण झालें या गोष्टी आज बहुतेक विद्वानांकडून स्वीकारल्या गेल्या आहेत. सूतांची परंपरा मात्र नष्ट झाली नाहीं. ती उत्तर हिंदुस्थानांत एकसारखी चालू राहिली आणि त्या भाटांस नवीन नवीन आलेल्या राजकुलांनीं व मुसलमान बादशाहांनीं देखील आश्रय दिला. अशी जी सूत वर्गाची परंपरा तिचा आणि पौराणिकांचा विशिष्ट कालीं संबंध तुटला आणि पौराणिक वाङ्मय तीर्थोपाध्यायांच्या तावडींत जाऊन अखिल भारतीय प्रदेशांतील खऱ्या अगर मनःकल्पित कथांचें संग्रहण करूं लागलें. हें संग्रहण सुरू झाल्यानंतर पौराणिक वर्गाची आणि सूत वर्गाची कायमची फारकत झाली, व सूत वर्गाच्या वाङ्मयाचें संग्रहण करण्याचा प्रयत्न उत्तरकालीं पौराणिकेतर लोकांकडून झाला. हा प्रयत्न विशेषतः पैशाची भाषा वापरणाऱ्या कैकेयांनीं अगर इराणी लोकांनीं केला असावा असें दिसतें.

## १४. पैशाची भाषेच्या महत्त्वाचा काल.

१४. कैकेयांनीं हिंदुस्थानांमध्यें कुरुयुद्धोत्तरकालीं बराच धुमाकूळ माजविला असावा यांत शंका नाहीं. कैकेयांचें केंद्रस्थान बल्क ऊर्फ बाल्हिक हें होतें. त्यासच ग्रीक ग्रंथकार बॅक्ट्रिया म्हणत. आद्य इराणी साम्राज्याची मूळ राजधानी पार्सागडी अगर पर्सोपोलिस ही नसून बल्क हीच होती, आणि तेथून कैकेयांचा पगडा इराणवर त्याप्रमाणें हिंदुस्थानावरच मधून मधून स्थापन होई. याच प्रदेशाला शकस्तानहि म्हणत होते. कैकेयांचा पगडा मथुरेवर कांहीं पिढ्या असल्या खेरीज शौरसेनी भाषा जिची प्रकृति आहे अशी पैशाची भाषा तयार झाली नाहीं. कैकेयांची भाषा पैशाची आणि शूरसेनांतीलही पैशाचीच. पण हे दोन एका भाषेचेच पोटभेद समजले जात. यावरून कैकेयांनीं व्रजदेशाच्या क्षेत्रांतील भाषेची थोडी विकृति करून हिंदुस्थानच्या भाषेवर रचलेला एक इराणी अपभ्रंश तयार केला होता असें दिसतें. या अपभ्रंशाचें सादृश्य शौरसेनीशीं आहे असें वररुचीला दिसलें व त्याचें सादृश्य कैकेय भाषेशीं आहे असें मार्कंडेयास दिसलें. एवंच मथुरेवर कैकेय संस्कृतीचा संस्कार वररुचीच्या पूर्वी अनेक पिढ्या झाला होता आणि उदयनाच्या पूर्वी अनेक पिढ्या पारसीकांचा हिंदुस्थानांत पगडा होता, आणि त्यांचा पराभव चक्रवर्ती उदयनानें करून त्यांचें महत्त्व कमी केलें असा इतिहास दिसत आहे.

महाराष्ट्रास कैकेयांचा उपद्रव नव्हता.

उत्तरेकडे कैकेयांचा धुमाकूळ अनेक शतकें चालला असावा आणि त्यामुळें उत्तरेकडच्या प्राकृत भाषांमध्यें शौरसेनी व मागधी या दोहोंच्याहीपेक्षां किंवा दोहोंच्याही बरोबरीनें पैशाचीला प्रामुख्य आलें असावें आणि त्यामुळें शौरसेनी व मागधी यांचा विकास थांबला असावा आणि दक्षिणेस कैकेयांचा उपसर्ग

न झाल्यामुळें महाराष्ट्री प्रमुख भाषा झाली असावी आणि अव्याहतपणें वाढली गेली असली पाहिजे असा इतिहास आपणांस निष्कर्षावा लागत आहे. महाराष्ट्रास वळसा घालूनच उदयनास पारसीकांवर जावें लागलें यावरून दक्षिणापथाचें राज्य बलाढ्य होतें आणि आपल्या संस्कृतीचें संवर्धन उदयनकालींच करीत होते ही गोष्ट स्पष्ट आहे. आणि त्या प्रदेशाला " महाराष्ट्र " हें नांव पडण्याला अवश्य होणारीं कारणें पूर्वींच होऊन गेलीं होतीं.

## १५. महार आणि रठ्ठ यांचें एकराष्ट्रीकरण ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकांत.

१५. महाराष्ट्र हा शब्द व भाषा वररुचीच्या कालीं होती आणि वररुचीच्या कालीं ही भाषा संवर्धित झाली होती आणि वररुचीचा काल ख्रिस्तपूर्व ८०० पासून ६०० पर्यंत केव्हांतरी असा धरला तर महाराष्ट्राची स्वतंत्र भाषा अगोदर दोनतीनशें वर्षें तरी विकसित होत असली पाहिजे. म्हणजे ख्रिस्तपूर्व पहिल्या सहस्रकाच्या पूर्वींच म्हणजे ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकांत महाराष्ट्राच्या आद्यविकासाचा काल जातो. आणि या भाषेच्या नांवास कारण झालेले जे महार आणि रठ्ठ यांचें एकराष्ट्रीकरण तें ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकांत झालें असावें असें दिसतें. अश्मकराजा कुरुयुद्धांत पडला आणि कुरुयुद्धापासून अश्मकांचें सातत्य आहे तर महार आणि रठ्ठ यांचें एकराष्ट्रीकरण आणि अश्मकराजाचें सातत्य याची संगति लावण्याचा प्रयत्न अवश्य होतो. दोन राष्ट्रें एकत्र व्हावयाचीं तीं एकावर दुसऱ्याच्या विजयानें होतात. महार आणि रठ्ठ यांची देशभर मारामारी होऊन एकराष्ट्र होण्याची क्रिया अश्मकांचें राज्य चालू असतां घडणें शक्य नाहीं. तर अश्मकराज्य सुरू होण्यापूर्वींच महारांच्या देशांत रठ्ठांचा प्रसार होऊन महाराष्ट्र बनलें असावें आणि त्यांच्या संयुक्त जनतेंत अश्मक राजकुल उत्पन्न झालें असावें असाच इतिहास असावा असें दिसतें. म्हणजे महाराष्ट्राच्या वैशिष्ट्यास (म्हणजे) महार आणि रठ्ठ यांच्या एकत्रीकरणास आरंभ कुरुयुद्धापूर्वींच झाला असला पाहिजे आणि कुरुयुद्धाच्या कवींनीं महाराष्ट्र हा शब्द न वापरतां अश्मक राज्य, कुंतल राज्य, असे शब्द जरी वापरले असले तरी महार आणि रठ्ठ या दोहोंचें एकीकरण कुरुयुद्धाच्या अगोदरच होत होतें हें असिद्ध होत नाहीं.

## १६. भोजांचें महार व रठ्ठ यांशीं पौर्वापर्य.

१६. जो आपणापुढें कठीण प्रश्न आहे तो भोयांच्या संबंधाचा आहे भोई ऊर्फ भोज हे कुरुयुद्धपूर्वकालीं महाराष्ट्रांत होते यांत शंका नाहीं आणि महार आणि रठ्ठ यांचें एकत्रीकरण कुरुयुद्धाच्या पूर्वींच झालें असल्यास भोई, महार आणि रठ्ठ यांच्या आगमनामध्यें पौर्वापर्य कोणाचें, याविषयीं विचार करतां आम्हांस वृत्तानुक्रम पुढीलप्रमाणें असावा असें वाटतें. (१) अत्यंत प्राचीन कालीन आगमन भोजांचें असावें आणि त्यांनीं अखिलमहाराष्ट्र आणि कर्नाटक यांत त्यांचा प्रसार झाला असावा. (२) महार हे शकवंशीय म्हणजे ज्यांची भाषा मूळची आर्यन् पण ज्यांवर असुरधर्माचा संस्कार झाला आहे असे लोक असावेत आणि त्यांचा प्रसार सर्व महाराष्ट्रभर कुरुयुद्धपूर्वकालीं झाला असावा. महारांच्या शिवाय जी जात प्रसरण पावली असावी ती जात रठ्ठांची होय. हस्तिनापुरांतील रठ्ठपाल, पंजाबांतील आरठ्ठ, सौराष्ट्रांतील सूरठ्ठ, भरोचमधील भरुरठ्ठ, हीं देशनामें रठ्ठांच्याच प्रसाराचीं द्योतक आहेत. आजचे कुणबी म्हणविणारे लोक बहुतकरून त्या रठ्ठांचेच वंशज आहेत. रठ्ठांचेंच अपरनाम कुणबी किंवा कणबी असावें आणि कुटुंबी हें त्यांचें संस्कृतीकरण असावें.

## १७. विदर्भ आणि बेडर.

१७. विदर्भामध्यें मनुष्यभ्रमणें स्वतंत्रपणें अव-

लोकिलीं पाहिजेत; ( ३ ) बेडर ऊर्फ बेरड ही जात आद्यकालीं विदर्भांत असून नंतर भोई, महार व रठ यांचें आगमन झालें असेल काय, व बेडर जातीपासूनच विदर्भ हें नांव पडलें असेल काय याविषयीं आज कोणताच निर्णय करतां येत नाहीं; पण कांहीं लेखक समजतात तितका बेदर या गांवाचा जर विदर्भाशीं संबंध जुळत असेल तर बेडर या जातीशीं तितकाच संबंध आहे यांत शंका नाहीं.

## १८. आंध्र आणि मान्य.

१८. वर उल्लेखिलेल्या जातींशिवाय अधिक जाती प्राचीन विदर्भांत दिसून येतात. ( ४ ) आंध्र हें नांव दक्षिणेस बऱ्याच प्रदेशाला लागलें आहे व आज आंध्र आणि तैलंगी या दोहोंचें समीकरण करण्यांत येतें; तथापि आंध्र ही जात मूळची महाराष्ट्रीय असली पाहिजे आणि पूर्व विदर्भ आणि आंध्रदेश हा एकमेकांहून फारसा भिन्न नसावा. ज्यावेळेस शातवाहन आंध्र म्हणून समजले गेले त्या वेळेस ते तैलंगणाचेच राजे असले पाहिजेत असें निश्चयेंकरून सांगतां येत नाहीं. शतपथब्राह्मणांत आंध्र जातीचा उल्लेख येतो त्यावेळेस आंध्रांची मर्यादा समुद्रापर्यंत नसावी तर महाराष्ट्राच्या आग्नेय भागापुरताच त्या जातीचा पगडा असेल असें दिसतें. आजही "आंध" जात यवतमाळ व चांदा या जिल्ह्यांतच विशेषेंकरून आहे आणि या जातींतले कांहीं लोक मराठी बोलतात तर कांहीं तैलंगी बोलतात. या आंध जातींचेंच आंध्र हें संस्कृतरूप असावें. ( ५ ) आतांपर्यंत सांगितलेल्या जातीखेरीज आणखी एक जात म्हटली म्हणजे मान्यांची होय; आज मराठ्यांत माने हें जरी आडनांव असलें तरी पूर्वी माने ही जात होती. अजूनही माने ही जात वऱ्हाडांत आहेच. तिला माने किंवा माने कुणबी म्हणतात. या माने जातीचा उल्लेख अगस्त्याच्या सूक्तांत मान्य या नांवानें आहे आणि अगस्त्याचीं सूक्तें वऱ्हाडांत रचलीं गेलीं असलीं पाहिजेत; या गोष्टी या ग्रंथाच्या आदिपर्वांत विवेचलेल्या सांपडतील. मान, मानपुरी, वगैरे गांवें वऱ्हाडांत आहेत आणि तीं आणि मालखेड ऊर्फ मान्यखेट हीं सर्व माने जातीच्या अज्ञात इतिहासाचीं स्मारकें आहेत. या मान्यांचें प्रामुख्य अगस्त्यसूक्तकालीं होतें यांत शंका नाहीं आणि राजकन्या लोपामुद्रा बहुतकरून बेरड जातीची नसून या माने जातीची असली पाहिजे असें वाटतें. अगस्त्याच्या काळापूर्वींच विदर्भांतून बेरडांचें उच्चाटण होऊन मान्यांचें वर्चस्व स्थापन झालें असलें पाहिजे; कारण मान्य मांदार्यांचेच उल्लेख त्याच्या सूक्तांत प्राचुर्यानें आहेत.

## १९. कोळी जातीकडून महाराष्ट्राची प्राचीन काळीं व्याप्ति.

१९. प्राचीन काळींच प्रदेश व्यापणाऱ्या जातींचा आढावा घेतांना कोळ्यांस विसरून मुळींच चालवयाचें नाहीं. ( ६ ) कोळीजातीचा प्रसार भोयांइतक्याच प्राचीन काळीं झाला किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं. कोळीजातीचा प्रसार कच्छापासून मलयापर्यंत आणि आंत भंडाऱ्यापर्यंत भोयांबरोबरच झालेला दिसत आहे. कच्छामध्यें हें आपणांस कोडी म्हणवितात व या शब्दाचीं कोरी, कोडी आणि कोळी, हीं तिन्ही रूपें प्रचारांत आहेत. मूळ सिंधूनदाचा फाटा असलेल्या कोरी नदीच्या आसमंतांतील प्रदेशांतून हे पसरत गेले असल्यामुळें त्यांना कोरी हेंच नांव लागू झालें व तें कर्नाटकेतर प्रदेशांत चालू राहिलें असें दिसतें. या कोऱ्यांची ऊर्फ कोळ्यांची वस्ती देखील महाराष्ट्रांत चोहोंकडे आहे. अनेक प्राचीन दैवतस्थानांचे पुजारी कोळीच आहेत. आणि पंढरपूरवर देखील आपलें स्वामित्व आहे अशा तऱ्हेचा त्यांचा -आग्रह आहे व त्यासाठीं त्यांनीं एक कृत्रिम लेखदेखील तयार केला असावा असें दिसतें.

कोरी आणि भोई यांचें भ्रमण बरोबरच झालें

नसलें तरी बऱ्याच प्राचीन कालीं झालें असलें पाहिजे; अगोदर कोळी व भोई यांनीं नदीकांठ व्यापावा व नदी कांठची शेतकी करावी. ही क्रिया सुरू झाल्यानंतर मग महारांनीं येऊन इतर प्रदेश व्यापावा आणि नदीकांठच्या खेरीज इतर भागांत वस्ती करावी व शेतकी करावी. अशी क्रिया झाल्याखेरीज मत्स्यघात आणि कृषिकर्म यांची महाराष्ट्रभर झालेली जात्यनुसार वांटणी शक्य दिसत नाहीं.

## २०. महार आणि कुणबी यांच्या एकीकरणाचा प्रयत्न.

२०. एवंच भोई, कोळी, महार, रठ्ठ, मान्य इत्यादि मत्स्यघात आणि कृषिकर्म करणाऱ्या जाति महाराष्ट्रांत कुरुयुद्धकालींच होत्या, आणि त्यांपैकीं महार आणि रठ्ठ यांचेंच संख्याबल अधिक असल्यामुळें त्यांचें नांव देशास पडलें असावें अशाच कल्पनेस यावें लागतें. आज महार आणि कुणबी या जाति स्वतंत्र आहेत आणि एका काळीं या दोन जातींच्या एकीकरणाचा प्रयत्न झाला होता यांत शंका नाहीं. दोन राष्ट्रांचें, दोन लोकांचें नांव राज्यास देणें इत्यादि क्रिया राजाच्याच इच्छेनें होतात. एकाद्या जातीचा राजा दुसऱ्या जातीच्या राजाला जिंकतो, व जित लोकांना देखील आपलेसे करून घेण्याकरितां राष्ट्रनाम संयुक्त करतो आणि जित राष्ट्राच्या राजकन्येशीं लग्न करतो. अशा क्रिया वारंवार होतातच. महार आणि रठ्ठ यांच एकीकरण ज्या काळांत होऊं लागलें असेल त्या कालांत दोघांमध्यें सामान्य आडनांवांचा देखील विकास झाला असेल. कोंकणस्थांचीं अनेक कुळें देशस्थांत मिळून गेल्यामुळें बर्वे, गोडबोले, इत्यादि नांवें आजच्या देशस्थांत ज्याप्रमाणें उपलब्ध होतात, त्याप्रमाणें कांहीं रठ्ठांचीं कुळनामें महारांत जाणें आणि महारांचीं कुळनामें रठ्ठांत जाणें हें संभवनीय दिसतें. एका जातीचीं आडनांवें दुसऱ्या जातींत जाण्याची क्रिया परस्पर लग्नव्यवहार मान्य नसतांहि होते. पुरुषाच्या जातींत मुलांचें संग्रहण न झाल्यास तें आईच्या जातींत होतें ! आणि पुरुष अधिक प्रतिष्ठित असल्यास मुलें बापाचींच आडनांवें लावतात पण आईच्या समाजांत मिळतात. आपटे, साठे वगैरे ब्राह्मणांचीं आडनांवें मराठ्यांत आणि 'दावर' वगैरे पारशी आडनांवें दुबळे कुणब्यांत अशींच आलेलीं दिसतात. जेव्हां दोहोंच्या एकत्रीकरणाची चाड बाळगणारें राजकुल नाहींसें झालें असेल किंवा अगदीं परकें राज्य आलें असेल तेव्हां दोहोंचें होऊं लागलेलें एकीकरण बंद पडून दोन्ही जाती पुन्हा पृथक् पृथक् झाल्या असाव्यात असें दिसतें. भिन्न संस्कृतीच्या लोकांचें वैवाहिक एकीकरण व दोन्ही जातींचें आचारसादृश्य यांची वाढ बरोबरच होते असें नाहीं.

विवाह करणारीं कुळें आपले आचार एकमेकांशीं जुळवून घेतील, पण सामान्य जनतेचे आचार एकमेकांपासून भिन्न आहेत ते राहणारच. या प्रकारच्या परिस्थितीमुळें महार आणि रठ्ठ यांचें एकीकरण पुरें झालें नाहीं.

## २१. महार आणि रठ्ठ यांच्या एकीकरणाचें स्तंभन आणि त्या स्तंभनाचा काळ.

२१. महार आणि रठ्ठ यांच्या एकीकरण प्रयत्नांचा काल कोणता आणि त्या प्रयत्नांच्या विघाताचा काल कोणता या गोष्टी अगदीं निश्चयानें सांगतां येत नाहींत. तथापि थोडीशी कल्पना करतां येते. अत्यंत प्राचीन काळीं म्हणजे कुरुयुद्धाच्या कालीं महाराष्ट्रावर असुरांचें आक्रमण होत होतें; जरासंध विदर्भापासून चौथ घेऊं पहात होता तर त्याच्याशीं स्पर्धा करणारे यादव हे शूरसेन व सौराष्ट्र हीं ताब्यांत घेऊन विदर्भाकडे जात होते. यादव हेच गवळी होत आणि वऱ्हाडांतील गाविलगड हा त्यांचा आहे. या यादवांचें आक्रमण महाराष्ट्रावर एकीकडून होत होतें, तर जरासंधाच्या मागध सैन्याचें आक्रमण दुसऱ्या बाजूनें होत होतें. महाभारतांतील

दिसत आहे त्याप्रमाणेंच प्राचीन भारतांत व पूर्व आशियांत प्रचलित होती. तेथेंही उपाध्यायवर्ग एक-जातीय असणें शक्य नाहीं. निरनिराळ्या देवतांचे उपासक निरनिराळे असत आणि देवतांसंबंधानें विविध कृत्यें करणारे लोक विविधजातीय असत. त्यामुळें अनेक प्रकारचे परमार्थसाधनोद्यमी वर्ग प्राचीन पश्चिम एशियांत त्याप्रमाणेंच प्राचीन पश्चिम भारतांत असले पाहिजेत; शिवाचे गुरव पुजारी, निरनिराळ्या देवतांचे कोळी किंवा ब्राह्मणेतर पुजारी आज आहेत त्यांचा अधिकार प्राचीन स्थितीचा दर्शक आहे. ब्राह्मणांनीं त्यांच्या पुजारीपणास व्याघात न करतां त्यांचीं कर्मे आपल्या संयुक्तधर्मास जोडून सर्व लोकांस एका विस्तीर्ण धर्मछत्राखालीं आणलें. आपला दसरा आणि यहूद्यांचा किप्पूर एकाच दिवशीं येतो; महारांमध्यें यहूद्यां-प्रमाणें शूकरमांसनिषेध आहे. बऱ्याचशा ब्राह्मणेतर जातींत दूध आणि मांस एकाच जेवणांत खाण्याविषयीं निषेध प्रचलित आहे, इत्यादि गोष्टी आजच्या महाराष्ट्रांत यहूदी लोकांच्या धर्माशीं सदृश आहेत आणि या गोष्टी हिंदुस्थानामध्यें यहुद्यांची वसाहत होती त्यामुळें सुरू झाल्या असें जरी नसलें तरी ज्या जाती हिंदुस्थानांत आहेत त्यांचें आणि यहुदी लोकांचें एकवंशसंभवत्व वरील गोष्टी सुचवितात यांत शंका नाहीं. जनता याप्रमाणें आर्यन् आणि सेमेटिक वंशांतल्या असल्यामुळें पश्चिम हिंदुस्थानांत धर्मैक्यस्थापनेची जी कामगिरी झाली ती कामगिरी अत्यंत विविध प्रकारची होती. सेमेटिक आचार असलेल्या जातींस हिंदुसमाजांत संग्रहित करून घेण्या-साठीं झालेल्या क्रिया अनेक होत्या. प्राचीन असीरियन व बॅबिलोनियन रम्मन या देवाचें एका थोर भारतीय व्यक्तीशीं ऐक्य स्थापन करणें, दक्षिणेकडचा सेमेटिक लोकांपासून उत्पन्न झालेला पशुयागधर्म भारतीय-यागपद्धतींत समाविष्ट करून घेणें, निरनिराळ्या जातींस निरनिराळ्या स्थानिक देवतांचें ऐक्य एकमे-कांशीं स्थापन करून त्या सर्व देवतांच्या पूजकांस एकधर्मछत्राखालीं आणणें; या गोष्टींचा पूर्वी झालेल्या ऐक्यवर्धक प्रयत्नांत समावेश होतो. अनेक विधींचें एकीकरण झालें असावें. मौंजीबंधन आणि सुंता यांचें एकीकरण झालें असावें त्याप्रमाणेंच जीं स्थळें पवित्र झालीं असतील किंवा ज्या स्थानिक कथा उत्पन्न झाल्या असतील त्यांचा एकमेकांशीं संबंध जोडून त्या प्रतिष्ठित वाङ्मयांत समाविष्ट करणें या-सारख्या क्रिया महाराष्ट्रांत झाल्या. या क्रिया प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचें एक अत्यंत प्रधान अंग आहेत.

अश्मक हें देशनाम किंवा कुलनाम होतें याविषयीं निश्चयानें विधान करतां येत नाहीं. अश्मक हा वंश इक्ष्वाकु राजा मित्रसह ऊर्फ कल्मापपाद याचा क्षेत्रज मुलगा होता आणि तो मदयंतीस वशिष्ठाकडून झाला होता, असें वर्णन वायु, ब्रह्मांड आणि विष्णु या पुराणांत त्याप्रमाणेंच भागवत पुराणांत सांपडतें. अश्मक देश आणि अश्मनगर यांचे उल्लेख पुराणांतून पुष्कळ आहेत. रावणाची बहीण शूर्पणखा हिचा नवरा कालकेयाधिपति विद्युज्जिव्ह हा अश्म नगरांत मारला गेला आणि त्यामुळें ती लंकेंत आली आणि त्यानंतर आपला मावसभाऊ खर याच्याकडे दंडकारण्यांत राहा-वयास गेली इत्यादि कथा वाल्मिकिरामायणाच्या उत्तर-कांडांत ( अध्याय २३-२४ ) आली आहे. यावरून असें दिसतें कीं, 'अश्म' नगरापासून पुढें अश्मक देश आणि राज्य आणि राजवंश हीं निर्माण झालीं. अश्म अथवा अश्मक वंश हा अत्यंत प्राचीन काळीं दक्षि-णेंत होता तो मूलतः असुरजातीय असावा आणि पुढें त्याचा किंवा त्या वंशानंतर त्याच राष्ट्रावर आलेल्या कोण-त्यातरी अन्य वंशाचा रामपूर्वज मित्रसह राजा याच्याशीं संबंध जोडला गेला. अश्मक राष्ट्र स्थापन झाल्यानंतर राज-कुलास अश्मक नांव मिळणें ही क्रिया स्वाभाविकपणें व्हावयाचीच. सध्या अश्म हें स्थळ कोठें होतें हें सांगतां

येत नाहीं. त्याचप्रमाणें अश्मक राजानें निराळें पौदन्य नांवाचें जें नगर वसविलें तें कोठें आहे हेंहि सांगतां येत नाहीं. तथापि पुढीलप्रमाणें क्रियाक्रम सूचित होतो.

( १ ) महाराष्ट्रांत कोणत्यातरी ठिकाणीं अश्म नांवाचें नगर स्थापित झालें असावें.

( २ ) या अश्म नगरामध्यें जें राजकुल स्थापित झालें, त्या राजकुलास त्याप्रमाणेंच या शहराच्या आसपास असलेल्या प्रदेशास अश्मक हें नांव असावें.

( ३ ) या अश्म नगरामध्यें ज्या लोकांचें प्राधान्य असावें तें लोक एका काळीं असुर असावेत. आणि त्या असुरांचें घराणें कालकेय नांवानें प्रसिद्ध असावें.

( ४ ) या कालकेय घराण्याचा आरंभ दाशरथि रामाच्या कालापूर्वी कित्येक पिढ्या असावा.

( ५ ) अश्मक राज्य फार जुनाट आहे आणि त्याचा काळ रामाच्यापूर्वी अनेक पिढ्या जातो हें ज्ञान पुराणसाहित्यसंकलनाच्या कालीं होतें आणि पौराणिकांना सर्व राजघराण्यांमध्यें एकवंशीयता स्थापन करावयाची असल्यामुळें अश्मकांस इक्ष्वाकुकुलीन त्यांनीं बनविलें असावें.

## २४. अगस्त्यकाल आणि त्या कालांत मूळ महाराष्ट्रीयांचें आणि वैदिकधर्मीय लोकांचें ऐक्य होण्यास झालेला प्रारंभ.

२४. अगस्त्यकालीं सामान्यजनभाषा विदर्भात त्याप्रमाणेंच पश्चिम महाराष्ट्रांत वैदिक भाषेपासून भिन्न असली पाहिजे आणि वैदिक भाषा कांहीं नियमित नवीन आलेल्या लोकांचीच असली पाहिजे. ज्याप्रमाणें हिंदुस्थानांत इंग्रजांनीं अँग्लोइंडियन वाङ्मय तयार केलें, त्याप्रमाणेंच अगस्त्यानुयायांनीं वैदिक भाषेंत सूक्तें रचलीं. वैदिकांचा समूह त्यावेळेस विदर्भात बराच मोठा असला पाहिजे. कारण, वैदिकभाषेंत नाटकें चालू असावींत असें दाखविणारा पुरावा आहे तो अगस्त्य आणि लोपामुद्रा यांचा संवाद दाखविणारें जें सूक्त अस्तित्वांत आहे त्याचा होय. तें सूक्त स्वाभाविकपणें निर्माण झालेलें नाहीं; उत्तरकालीनांनीं अगस्त्याच्या ठायीं कांहीं तरी अद्भुत गुणांचा आरोप करावा या हेतूनें तें तयार केलें असावें असें स्पष्ट दिसत आहे. स्वस्त्रीशीं गमन केलें यांत आपला मुनिधर्म ढळला आणि स्त्रीशीं लग्न करावयाचें तें मैथुनासाठीं नसून सस्त्रीक करावीं लागणारीं धर्मकृत्यें व्हावींत शक्य एवढ्यासाठींच करावयाचें; आणि स्वस्त्रीशीं मैथुन करणें यांत आपला धर्मभ्रंश झाला असें आपण समजतों अशा प्रकारची वृत्ति अगस्त्याच्या ठायीं त्या सूक्तांत दाखविली आहे. अर्थात् इतकें ढोंग करण्याचें साहस अगस्त्य करीत नसून उत्तरकालीनांनीं पावित्र्याची अतिशयोक्तीची कल्पना अगस्त्याच्या ठायीं आरोपित करण्याच्या हेतूनें तें सूक्त तयार केलें आहे. हें सूक्त उत्तरकालीनांचें एक सामान्य गाणें असो किंवा नाटक असो. ती भाषा बोलणारी किंवा समजणारी जनता बरीच असल्याशिवाय तसलें लौकिक गाणें त्या भाषेंत संभवत नाहीं. यावरून आपणांस असें दिसतें कीं वैदिक कालांत वैदिक सूक्तें करणारांचा प्रचार जेव्हां चोहोंकडे झाला होता तेव्हां त्यांचा बराचसा जमाव विदर्भातही आला होता, आणि त्यामुळें विदर्भात देखील वैदिक भाषेंत नवीन वाङ्मय उत्पन्न होत होतें. नवीन आलेल्या लोकांच्या आणि जुन्या लोकांच्या धर्माचें ऐक्य घडवून आणण्याची क्रिया सामाजिक ऐक्य घडवून आणण्याच्या क्रियेमुळें आवश्यक झाली. अगस्त्य सूक्तांत दिसून येणाऱ्या दाक्षिणात्य वैशिष्ट्यामुळें वैदिक आणि मूळ महाराष्ट्रीय अशा लोकांचें ऐक्य अगस्त्यकालांत वऱ्हाडांत स्थापन होत असलें पाहिजे, आणि वैदिक भाषा आणि अत्यंत प्राचीन महाराष्ट्रभाषा यांच्या मिश्रणास सुरवात त्याच कालांत झाली असली पाहिजे.

## २५. मरुद्देव आणि इंद्र.

२५. दाक्षिणात्यामध्यें मरुत देव होते, पण अगस्त्य

ज्या कालांत आला त्या कालांत देखील मरुत् देवांचीं दोन स्वरूपें असलीं पाहिजेत. एक शिष्टवर्गीय स्वरूप आणि दुसरें लोकप्रिय स्वरूप. शिष्टवर्गीय स्वरूप म्हणजे याज्ञिकांचें स्वरूप होय; आणि लोकप्रिय स्वरूप म्हणजे पौराणिकांचें स्वरूप होय. याज्ञिकांच्या स्वरूपांत मरुत् देव अनेक आहेत तर पौराणिकांच्या स्वरूपांत मरुत् हा एकच देव आहे. त्याला अंजना नांवाची बायको आहे, आणि मारुति नांवाचा पुत्र आहे. अगस्त्यांनीं जरी मरुत्देव आणि इंद्र यांचें ऐक्य जुळवून आणलें तरी पौराणिक केवळ इंद्राबरोबर हविर्भाग मरुतांनाही मिळणार यावर खूप नव्हते. सामान्यांचा धर्म अधिक मूर्तिप्रधान असणार. त्यांच्यामध्यें इंद्र आणि मरुत् यांचें युद्ध, त्यांत इंद्रानें मरुत्देवाच्या पुत्रांस मारण्याचा व्यर्थ प्रयत्न करणें आणि मुलांचा कैवार घेऊन मरुत् देवानें स्तंभन केल्यामुळें इंद्रादि देवांनीं जेरीस येणें, इत्यादि कथा येऊन मरुत्देव आणि इंद्र यांचें सख्य संस्थापित झालें आहे. हे दोन प्रयत्न भिन्न झाले यावरून असें दिसतें कीं, ज्या कालांत अगस्त्यादि वैदिक आले त्या कालांतील महाराष्ट्रांत मरुतांस देव समजणाऱ्यांत दोन वर्ग भिन्न होते. त्या दोन्ही वर्गांमध्यें अगस्त्याबरोबर आलेल्या वैदिकांहून भिन्न दैवतें प्रचलित होतीं त्याप्रमाणेंच भाषाहि भिन्न भिन्न असाव्यात. एका वर्गाची भाषा वैदिक भाषेशीं सदृश असावी व दुसऱ्या वर्गाची प्राकृत असावी; म्हणजे अगस्त्यकालींच संस्कृत व प्राकृत यांचें संमेलन समाजांत होत असलें पाहिजे.

अगस्त्यकालाच्या नंतर जेव्हां ब्राह्मण ग्रंथांचा काल आला तेव्हां विदर्भांतील संस्था आदर्शभूत म्हणून मांडण्याचा प्रयत्न देखील झालेला दिसतो. यज्ञांत क्षत्रियांनीं सोमपान करूं नये, हें विदर्भांतील रूढींवरून सिद्ध करण्यांत आलें होतें आणि विदर्भांतील चालींचा उत्तरेकडे प्रचार करण्यांत आला आणि विदर्भ व उत्तरेकडील राष्ट्रें यांचें सांस्कृतिक ऐक्य चालूच राहिलें. विदर्भिकौण्डिण्यासारखे अभ्यासक उत्तरेकडे जात; गालवासारखे विदर्भदेशीय मतप्रचारक उत्तरेकडे दिसूं लागत.

वैदिकांची जी लाट आली तिनें शूरसेन, मगध, त्याप्रमाणेंच महाराष्ट्र देखील व्यापून टाकला. तथापि वैदिकांच्या आगमनापूर्वींच्या भाषा निरनिराळ्या असाव्यात आणि त्या मूलतः जरी एकमेकांशीं बऱ्याच सदृश आणि वैदिक भाषेशीं अल्पांशानें सदृश अशा असल्या तरी त्यांत एकमेकांपासून भिन्नत्व आणि भिन्नसंस्कृतित्व ऋग्वेदकालींच होतें यांत शंका नाहीं. वेदकालीं या तिन्ही प्राकृत भाषांत साहित्य असावें आणि तें नंतरच्या काळांत मृत झालें असलें पाहिजे आणि वैदिकांनीं तेवढें आपलें साहित्य जिवंत ठेवलें आणि त्यांच्या तालमींत तयार झालेल्या पंडितवर्गानें स्वभाषेतील आणि प्राकृत भाषेतील साहित्य संग्रहणानें तें वाढविलें असें दिसत आहे.

वैदिक भाषेपासून निघालेली संस्कृत भाषा जशी चोहोंकडे पसरत चालली तशी प्रत्येक ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या संस्कृत भाषेच्या स्थानिक स्वरूपांत फरक उत्पन्न होऊं लागले, व त्यामुळें दाक्षिणात्यांची चेष्टा औदिच्यांनीं करावी, औदिच्यांची दाक्षिणात्यांनीं करावी असे प्रकार उत्पन्न झाले. समाजाच्या अधिक प्रतिष्ठित भागांत पसरलेल्या संस्कृत भाषेची वाढ आणि स्थानिक विकृति याप्रमाणें होत असतां प्राकृतभाषा स्वस्थ बसल्या नव्हत्या. त्यांचीही वाढ होतच होती. लांब लांब समासाची पद्धत त्यांच्यामध्यें दृष्टीस पडे; आणि असेंही शक्य वाटतें कीं समासयुक्त शब्दांची योजना प्राकृतामध्यें वाढत होती तथापि व्याकरण मात्र वाढत नव्हतें. व्याकरण वाढण्याची क्रिया संस्कृतमध्यें झाली आणि पुढें संस्कृतामध्यें उत्पन्न झालेलें व्याकरणशास्त्र प्राकृत भाषेस लावलें गेलें.

अगस्त्यानें मरुत् आणि इंद्र यांचा विरोध काढून टाकला तरी तेवढ्यामुळें देवमूलक भिन्नत्वाचा प्रश्न आटोपण्याजोगा नव्हता. इंद्र व मरुत् हे ज्याप्रमाणें वादळाचे देव होते, त्याप्रमाणेंच रम्मन हाही वादळाचा देव होता, आणि वादळाच्या देवाचीच उपासना समुद्रसंचारी फोनीशियन लोकांनीं करणें अधिक स्वाभाविक होय. फोनीशियन लोकांनीं रम्मन हा वादळाचा देव देशांत स्थापन केल्यानंतर त्याची वादळाचे स्थानिक देव मरुत् व इंद्र यांच्याशीं स्पर्धा उत्पन्न होणें स्वाभाविक होतें ती तशी झालेली असली पाहिजे; आणि ती स्पर्धा मरुताचा मुलगा मारुति हा उपासनाविषय करून आणि यासच रामाचा भक्त बनवून रामायणकारांनीं थोपविली असली पाहिजे.

## २६. महिषासुरमर्दिनीची कथा आणि वालिकथा यांच्या कथांची आसुर राष्ट्राशीं संबंधाची शक्यता.

२६. महिषासुरमर्दिनीची कथा केवळ स्थानिकच आहे कीं त्या कथेचे तसेच वालिकथेचे धागे असुर राष्ट्राच्या कथांशीं जुळवितां येण्याजोगे आहेत हें आतांच सांगतां येत नाहीं. महिषासुरमर्दनाचें कथानक ऐतिहासिक स्पष्टीकरण मागत आहे. महिषासुरमर्दनाचा दसऱ्याशीं संबंध असल्यामुळें आणि दसरा तोच यहूद्यांचा किप्पुर, ही शक्यता फार मोठी असल्यामुळें महिषासुरमर्दनाचा असुरकथांशीं म्हणजे सेमेटिक लोकांच्या प्राचीन कथांशीं संबंध पोहोंचतो काय ही गोष्ट विचारणीय आहे. त्याप्रमाणेंच वालिकथा रामायणांत कां अंतर्भूत केली गेली, तिच्या पाठीमागें इतिहास काय होता, हाही प्रश्न विचारांत घेण्याजोगा आहे.

रामायणाविषयीं असें विधान करतां येईल कीं, जेव्हां आर्ष संस्कृत भाषेचा काल आला तेव्हां अनेक प्रकारचें प्राकृत वाङ्मय संस्कृत रूपांतरें पावूं लागलें. देशांतील स्थानिक कथा आणि उपासना यांचें एकीकरण व प्रसिद्धि या क्रियांस चालना मिळाली. देश्यधर्मसंहितीकरणाची क्रिया रामायणाच्या निर्मितींत व्यक्त झाली आहे. कथासंग्राहक वर्ग एकच नव्हता. रामायणग्रंथांत आणि महाभारतांत अनेक कथा सारख्याच पण थोड्या फरकानें आहेत. त्यावरून निरनिराळ्या संग्राहकांच्या परंपरा कार्य करीत होत्या हें दिसत आहे.

## २७. श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माची निर्मिति आणि ब्राह्मणजातीचा इतिहास.

२७. या अत्यंत व्यापक अशा विषयाची अंशेंकरून मांडणी या विभागांत आली आहे. ती अधिक विस्तृतपणानें आदिपर्वांत विवेचिलेली आढळेल.

## २८. सांस्कृतिक इतिहासाचे कालविभाग.

२८. इतिहास जेव्हां एखाद्या संस्थानाचाच लिहावयाचा असतो तेव्हां तें संस्थान कसें वाढलें किंवा संकुचित झालें असल्यास कोणत्या कारणांनीं होत गेलें हा विषय प्रधान असतो. पण मोठ्या प्रदेशाचा आणि बऱ्याच काळाचा इतिहास लिहावयाचा असतो तेव्हां निरनिराळे कोणते वंश एका जागेवर आले आणि ते आपला सामुच्चयिक आयुष्यक्रम कसा आचरिते झाले, हाच मुख्यत: विवेचनविषय होतो. पुराणकारांनीं वंशविषयक प्रश्नांना प्राधान्य दिलें आहे, त्याचें कारण ते फार विस्तृत असा कालविभाग विचारांत घेत होते हें होय. कुळें विस्तृत होऊन त्यांचे वंश होणें या क्रियांचा इतिहास देण्याची खटपट पुराणांनीं केली आहे. प्रस्तुत ग्रंथांत पुराणापेक्षांहि अधिक विस्तृत असा कालविभाग विवेचनास घेतला आहे. पुराणांनीं ज्या प्राचीन आठवणी रक्षून ठेवल्या, त्याचा खरा ऐतिहासिक अर्थ काढणें आणि पुराणांचें विवेचन संपल्यानंतर हजार दीडहजार वर्षांचा इतिहास त्यांत घालून चालुक्यांपर्यंत कथासूत्र आणणें हेंच प्रस्तुत प्रसंगीं साध्य असल्यामुळें पुराणकारांची

किंबहुना त्यांहून अधिक अशी व्यापक दृष्टि प्रस्तुत इतिहासांत घ्यावी लागत आहे. पुराणें आदिमानवापासून उत्पत्ति काढण्याच्या भानगडींत पडलीं आहेत आणि तितक्या प्राचीन काळापासून कथासूत्र ओढण्याचा विचार करीत आहेत. 'आदिमानवा'पासून इतिहाससूत्र ओढण्याची क्रिया येथें नाहीं, तथापि दोन हजारांहून अधिक वर्षांचा इतिहास जेव्हां आपणांस विचारास घ्यावा लागतो, तेव्हां त्यांत क्रांतिकारक गोष्टींनीं मोठाले कालविभाग पाडून कथासूत्र ओढावें लागतें.

कुरुयुद्धापासून ख्रिस्तोत्तर पहिलें शतक इतक्या दीर्घ काळापर्यंतच्या इतिहासाचें कथासूत्र या ग्रंथांत आलें आहे या दीर्घकाळांत चार कालविभाग आले आहेत. एक काल म्हटला म्हणजे कुरुयुद्धापासून शतानीक व उदयन यांचा काल. दुसरा कालविभाग म्हटला म्हणजे उदयनापासून बुद्धापर्यंतचा काल आणि तिसरा कालविभाग म्हणजे बुद्धापासून मौर्यागमाचा काल आणि चवथा म्हटला म्हणजे मौर्यागमापासून शकारंभापर्यंतचा. या चारहि कालांचा इतिहास यांत दिला जात आहे. खुंटाचें व त्या भोंवतालच्या प्रदेशाचें वर्णन करणें हें जितपत प्रदेशवर्णन होईल तितकेंच कालखंडकारक व्यक्ति व त्यांच्याशीं संबद्ध असलेल्या गोष्टींचें वर्णन हें इतिहासकथन होईल. तथापि जुन्या आठवणी संरक्षूं पहाणाऱ्यांस पुष्कळदां कालखंडकारक व्यक्तींच्या चरित्रापलीकडे फारसें जातां येत नाहीं.

चारहि कालांतील इतिहास या ग्रंथांत आला आहे.

**१. कुरुयुद्धापासून उदयनापर्यंत** ( ख्रि. पू. १५०० पासून ८०० पर्यंत ).

सूतविद्येचे पौराणिकांकडून संग्रहण व पुराणरचनेंत तीर्थोपाध्यायांच्या धर्माचा मिसळ.

वेदांचा शाखाविभाग आणि चरणविभाग, वैदिक धर्माची पौराणिक धर्माशीं संगति.

पैशाची भाषेचें व इराणी लोकांचें वाढतें महत्त्व.

**२. उदयनापासून बुद्धापर्यंत** ( ख्रि. पू. ८०० पासून ५५० )

पाणिनि, वररुचि यांचें अस्तित्व, पैशाचीच्या महत्त्वाचा काल. महाराष्ट्रीच्या महत्त्वाचा काल. तक्षशिला आणि गांधार यांचा सांस्कृतिक महत्त्वाचा काल.

**३. बुद्धापासून नंदोच्छेदापर्यंत** ( ५५० पासून ३२५ ).

पैशाचीच्या महत्त्वाची समाप्ति, पाली आणि अर्धमागधी यांच्या महत्त्वाचा काल. दक्षिणेंत महाराष्ट्री वाङ्मयाची जोपासना. संस्कृत वाङ्मयाच्या भरभराटीच्या काळास आरंभ.

**४. नंदोच्छेदापासून शकवर्षारंभापर्यंत** (ख्रि. पू. ३२५ पासून—ख्रिस्तोत्तर ७८ ).

दक्षिणेकडे पाली आणि बौद्धधर्म यांच्या प्रसारामुळें महाराष्ट्रीचा थोडाबहुत संकोच. संस्कृत वाङ्मयाचें महत्त्व चालू.

## २९. दीर्घकालीन अवलोकन आणि त्याचें समाजशास्त्रांत महत्त्व.

२९. व्यापारी कंपनी वर्षाचा ताळेबंद करते आणि अहवाल प्रसिद्ध करते, आणि आपलें नफानुकसान मोजण्याचा प्रयत्न करते. जें नफानुकसान थोडक्या दिवसांत समजत नाहीं तें वर्षाच्या आढाव्यांत त्यांच्या नजरेस येतें. राज्याचा मंत्री राज्याचा जमाखर्च पहातो. आणि अनेक वर्षांचा अहवालसुद्धां प्रसिद्ध करतो आणि तेवढ्या काळामधील प्रगति आणि राज्याची सुस्थिति यांविषयीं विधान करतो. राज्याच्या मंत्र्याची दृष्टि पुष्कळदां आपल्या संस्थानाच्या उत्पन्नाच्या आंकड्यांवरच खिळलेली असते. प्रजेची वृद्धि किंवा

उत्कर्ष साधला न जातां प्रजेपासून पैसे काढून संस्थानाची तिजोरी भरणें किंवा शिल्लक वाढविणें ही संस्थानाची प्रगति नव्हे हें मुत्सद्यांना कबूल असलें तरी त्याकडे दुर्लक्ष होतें. यासाठीं संस्थानांतील एकंदर संपत्तीची मोजदाद करणें, शिरोगणति करणें, यासारख्या क्रिया कराव्या लागतात. संस्थानाचें कर्तव्यक्षेत्रदेखील मर्यादित आहे. जागतिक प्रगतीच्या दृष्टीनें संस्थानाची प्रगति मोजावयाची असते. एखाद्या संस्थानानें आपल्याच देशामध्यें लोकसंख्या वाढविली आणि दुसरे देश ओस पाडले म्हणजे त्या संस्थानानें मोठें चांगलें कृत्य केलें असें नाहीं. हुशार लुटारू म्हणून त्या संस्थानाची कीर्ति होईल एवढेंच. अर्थात् केवळ संस्थानवर्धनाची दृष्टि पुरेशी नाहीं. मानवी प्रगतीच्या एकंदर विकासांत अधिक कार्य करणें हें राष्ट्राचें कर्तव्य आहे आणि यासाठीं मानवी प्रगतीच काय झाली हें आपणांस पाहिलें पाहिजे. समजा, चालुक्यांनीं राष्ट्रकूटांचा मुलूख अगदीं बेचिराख केला तर त्यांत शहाणपणा काय झाला असेंच उत्तरकालीन लोक विचारणार. यासाठीं दीर्घकालीन दृष्टीनें ज्या योग्यायोग्यतेच्या कल्पना तयार होतील त्या कल्पनांनीं विशिष्ट कालाच्या आणि विशिष्ट स्थलाच्या म्हणजे राष्ट्राच्या नीतीचें परीक्षण झालें पाहिजे. दीर्घकालीन इतिहासाचें महत्त्व यासाठींच आहे.

भारतीय इतिहासाचा दीर्घकालीन अवलोक आपण केला असतां एकसारखी प्रगति दिसत आहे. राजकारणाच्या बाबतींत भारतवर्ष मागासलेलें मुळींच नसून पुढें आहे. यूरोपापेक्षां अधिक जलद भारतानें एकराष्ट्रीयता घडवून आणली. ती इंग्रजांनीं घडविली नाहीं. इंग्रज भारतीयांच्या हातांतलें आणि तत्त्वज्ञानांतलें एक निमित्त कारण झाले. मनुष्यामनुष्याचा सामाजिक संबंध सदृश आचारावर असावा. तो देवता कोणची पूजितो आणि कोणत्या प्रवक्त्याला मान देतो यावर नसावा, या तत्त्वाला भारत देश एक हजार वर्षांपूर्वीं म्हणजे चालुक्योदयकालीं पोंचला. पाश्चात्य जग त्या तत्त्वाला अजून पोंचलें नाहीं. योग्य धार्मिक वृत्ति आणि योग्य राजकीय वृत्ति यांचेंच अधिष्ठान भारतांत झालें आहे असा सर्व धार्मिक आणि राजकीय इतिहास पाहिल्यावर म्हटल्याखेरीज राहवत नाहीं. सध्यांच्या पारतंत्र्यांच्या स्थितींत हें म्हणणें लोकांस पटणार नाहीं. तथापि अत्यंत मोठा जनतासमूह एका शासनसत्तेखालीं आणण्याचें श्रेय भारतास आहे. भारतीयांच्या इच्छेचें साधन करण्याचें श्रेय इंग्रजांनीं मिळविलें ही गोष्ट खरी आहे; पण इंग्रजांस हें जें यश आलें तें भारतीयांच्या इच्छेशिवाय आलें नाहीं. राज्य कोणाचेंहि येवो, भाषा कोणाचीहि येवो, धर्मसंप्रदाय कोठलाहि येवो, त्या सर्वांच्या योगानें होणारी गैरसोय दूर करतां येण्याजोगी आहे. पृथ्वी समुद्रापर्यंत एकराट् झाली म्हणजे त्या "कामप्रि" राजाचे सभासद विश्वेदेव होतील तर जगाचें एकीकरण हें अंतिमसाध्य आहे हें भारतीयांनीं जाणलें आणि त्या साध्यास त्यांनीं सक्रिय मदत केली आहे.

हिंदुस्थाननें राजकारणांत एक शासनशास्त्रीय असा संप्रदाय उत्पन्न केला कीं महत्त्वाकांक्षी मनुष्यानें राजाचें पद कायम ठेवावें आणि त्याचें कारभारीपण अगर दिवाणगिरी मिळवावी, आणि या रीतीनें दिवाणगिऱ्या एकत्र करून देश एकसत्ताक करावा. हीच भारतीय घटना इंग्रजांनीं स्वीकारली आणि वापरली. त्यांना त्यांच्या अगोदर बाळाजी बाजीरावाचें उदाहरण होतेंच. बाळाजी बाजीरावानें साताराची पेशवाई मिळविली आणि नंतर विश्वासरावानें १७६१ सालीं दिल्लीच्या पातशाहीची देखील पेशवाई मिळविली. ईस्ट इंडिया कंपनीनें तीच योजना अनुकरिली आणि जें पेशव्यांनीं संकल्पिलें तें या कंपनीनें करून दाखविलें. त्यांनीं प्रथम बंगालची दिवाणी मिळविली आणि नंतर

सातारच्या महाराजांची पेशवाई संपादन केली आणि त्या दोहोंच्या एकीकरणानें अखिल भारताचा कारभार त्यांच्या हातीं आला. ईस्ट इंडिया कंपनी परकीय संस्था होती एवढेंच नव्हे तर ती परतंत्र होती, त्यामुळें हिंदुस्थानाचें कारभारीपण परतंत्र झालें. तें पारतंत्र्य थोड्याच काळांत नष्ट होण्याजोगें आहे आणि तें होतां होतां भारतीय राजकीय विद्येचें सर्व जगांत उच्चत्व स्थापन होणार आहे.

### ३०. भिन्न संस्कृतीचें एकीकरण आणि तें साध्य करण्यांत भारतीयांचें कौशल्य.

३०. प्रत्येक देश प्रत्येक कालांत आगमन–निर्गमनाचा विषय असतो. देशांत परके लोक येण्याची क्रिया नेहमीं चालू असते, त्याप्रमाणेंच आलेल्या लोकांत देशी संस्कृतीचा स्वीकार करण्याचें कार्य देखील चालतच असतें. तें तसें चालत असलें व नवागतांनीं जरी देशी संस्कृतीचा स्वीकार केला, तरी आडनांवें, व्यक्तींचीं नांवें, पूजनपद्धति, खाद्यें, पेयें यांतील पूर्वकालीन किंवा पूर्वदेशीय आयुष्यक्रमाचा कांहींतरी अंश शिल्लक रहातोच. यासाठीं देशांतील लोकांचा पूर्ण आयुष्यक्रम समजण्यासाठीं त्या देशाच्या आसपासच्या लोकांच्या संस्कृतींचा अभ्यास आपणांस आवश्यक आहे. हिंदुस्थानांत मुसलमान आले त्याच्या पूर्वी अनेक परकीय लोक एकसारखे येतच होते. ती परकीयांच्या आगमनाची परंपरा आलेक्झांडरच्या काळानंतर सुरू झाली आणि त्याच्या अगोदर दारियस हिस्टास्पिसची स्वारी काय ती झाली आणि त्याच्या पूर्वी वेदकालापर्यंत जणूं काय कांहींच झालें नाहीं अशी समजूत झालेली दिसते. पण तशी समजूत करून घेण्याचें कारण नाहीं. वेदपूर्वकालापासून परकीय लोकांचें देशांत आगमन एकसारखें चालूं आहे. आणि नवीन आलेल्यांना देश्य करून घेण्याची क्रिया स्वाभाविकपणें तशीच प्रयत्नपूर्वक चालू आहे. वैदिक आर्यन् लोकांचा धर्म स्थानिक आर्यन् लोकांपासून भिन्न होता, तथापि देश्य आणि वैदिक संस्कृतींची भिन्नता कालांतरानें दूर करण्यांत आली. कुरुयुद्धाच्या कालीं वैदिक धर्माची घटना झाली होती, एवढेंच नव्हे तर वैदिक ऐतिहासिक आणि पौराणिक संस्कृतींचा मिलाफ होत होता असा देखावा आपणांस दिसत आहे.

देशांतील भिन्न संस्कृतींची एकमेकांशीं जुळणी करावी आणि जी सामान्य घटना तयार करावी ती परकीयांच्या आगमनानें पुन्हां उपद्रवित व्हावी असा प्रकार वारंवार होई आणि वाङ्मयसेवकांचें लक्ष परकीयांच्या प्रवेशानें किंवा आघातानें देश्य संस्कृतीचें वस्त्र फाटूं न देतां त्यांतच परकीय लोक गुंडाळावेत आणि गुंडाळतां गुंडाळतां त्यांचें आवेष्टन काढून तेंच आपल्या संस्कृतिवस्त्रांशीं संयुक्त करावें अशा तऱ्हेचा प्रयत्न चालू असे. भारतीय वाङ्मयाच्या इतिहासांत ही क्रिया चालू राहिली आहे आणि समाजवृद्धि, वाङ्मयवृद्धि आणि परकीयांचें स्वात्मीकरण याहि क्रिया एकसारख्या चालू आहेत. आणि त्या क्रियेचीं अंगें आपणास सामाजिक रीतींत आणि वाङ्मयांत शोधून आपलें समाजशास्त्र आपणास समजून घ्यावयाचें आहे.

### ३१. साम्राज्याचा स्वाभाविक परिणाम; जनतेच्या साम्राज्यसंस्थेपासून अपेक्षा.

३१. स्वकीय संस्कृतीचें सातत्य देशांत चालू ठेवणें, त्या संस्कृतीचा भिन्न संस्कृतीशीं संबंध आला असतां दोन्ही संस्कृतींचा मिलाफ करणें, यासारख्या क्रियांचा खेळ हिंदुस्थानांत एकसारखा चालू आहे; त्यामुळें भिन्नांचें भिन्नत्वहि नाहींसें झालें आहे आणि भिन्नतेविषयीं असहिष्णुता समाजांत उत्पन्न झाली नाहीं. लोकांनीं लग्नव्यवहार असदृश लोकांशीं केलाच पाहिजे असें नाहीं. भिन्न जातीशीं लग्नव्यवहार फारसा होत नसावा, तथापि राजे लोकांना भिन्न भिन्न

देशींच्या राजकन्यांशीं लग्नें करण्यास हरकत नाहीं, अशी प्रवृत्ति असावी. प्रत्येक मनुष्याचा धर्म त्याच्या वर्णावर म्हणजे सामाजिक कार्यावर आणि त्या कार्यानें उत्पन्न केलेल्या पदवीवर अवलंबून असतो. भिन्नकर्मरत लोकांस एकसारखेच आचार लावण्याची आवश्यकता नाहीं. इत्यादि मतें भारतीयांच्या धर्मशास्त्रांत उत्पन्न झालीं आणि उपास्यें आणि मतें यांस अगदींच दुय्यमता आली. राजकारण आणि उपास्य आणि मतें यांची गुंतागुंत क्वचित्‌च झालेली दृष्टीस पडेल. जेव्हां मनुष्य सम्राट होतो तेव्हां त्यास सर्वच धर्मांचा सत्कार करावा लागतो आणि आपल्या सर्व प्रजेस सारखें वागवावें लागतें. अशोक हा तर 'परपापंड ( मत ) पूजा' म्हणजे इतरांच्या धर्ममतांचा सन्मान आपल्या प्रजेस उपदेशीत आहे. सम्राटास सर्व लोक सारखे असले तरी विशिष्ट जातीचा किंवा संप्रदायाचा अभिमान धरणारी नोकरशाही जेव्हां सम्राट आणि प्रजा यांच्यामध्यें उत्पन्न होते तेव्हां ती आपलें वर्चस्व राखण्यासाठीं स्पर्धापर असलेल्या वर्गांत तंटे लावूं पहाते आणि त्यामुळें भिन्नधर्मानुयायित्व साम्राज्यांत दुःखप्रद होतांना दिसत. एरव्हीं सम्राटाचें विशिष्ट धर्मानुयायित्व देखील दुःखकर होत नाहीं. या कारणामुळें राजाचें किंवा सम्राटाचें दैवत किंवा धार्मिक मत महत्त्वाचें रहात नाहीं ही गोष्ट प्राचीनांस वारंवार अनुभवाची झाल्यामुळें धार्मिक मनुष्याला राजकारणाविषयींची अनास्था उत्पन्न झाली. ही अनास्था त्या दृष्टीनें खरोखर योग्य होती. नवीन आलेले राजें किंवा अधिकारी देशांतील देव आणि धर्म यांचा सन्मान ठेवूं लागले म्हणजे त्यांचा परकेपणा जातो. तर परका राजा आला तर त्यांत नुकसान होतें तरी कोणाचें ? बलहीन राजापेक्षां बलवान् राजा चांगला ही गोष्ट जर सत्य आहे तर नवीन राजा परकीय रक्ताचा एवढ्याबद्दलच त्याविषयीं जुगुप्सा बाळगणें ही गोष्ट अयोग्य नाहीं काय ? पृथ्वी समुद्रापर्यंत एकराट् व्हावी म्हणजे सर्व जग एका सत्तेखालीं यावें हेंच ध्येय जर प्राचीनांचें होतें आणि यामुळें कोणीहि कां राजा असेना अशी वृत्ति त्यांस ठेवावी लागली आणि त्यामुळें हिंदूंस देशाभिमान नाहीं अशा तऱ्हेची वेडी समजूत झाली. हिंदूंच्या उदार वृत्तीचें फल त्यांस मिळालें नाहीं असें नाहीं. इतका मोठा लोकसमूह एका सत्तेखालीं येऊन त्यास शांतता मिळणें ही क्रिया हिंदुस्थानांत सिद्ध झाली.

मोठें साम्राज्य तयार व्हावें या तऱ्हेचें धोरण प्राचीनांचें होतें. राजे लोकांनीं आपलें साम्राज्य वाढवावें, शेजारचे प्रदेश जिंकावे ही त्यामुळें अत्यंत स्वाभाविक आणि प्रशंसनीय महत्त्वाकांक्षा समजली गेली. सर्व जग एका सत्तेखालीं आलें म्हणजे धार्मिक भिन्नतेमुळें जगास मुळींच उपद्रव होणार नाहीं आणि जगत्सम्राटाला सर्व धर्मांचा सत्कार सारखाच करावा लागणार तर जगानें केव्हांतरी जगत्साम्राज्याचा पल्ला गांठला पाहिजे, व ती महत्त्वाकांक्षा साध्य करून घेण्यासाठीं क्षत्रियांना उत्तेजन दिलें पाहिजे, अशी प्राचीनांची वृत्ति होती आणि पृथ्वीपति, आसमुद्रक्षितीश अशा प्रकारचीं विशेषणें तयार होऊं लागलीं आणि कवींकडून वापरलीं गेलीं. राजसूय, अश्वमेध यासारख्या यज्ञांना महत्त्व उत्पन्न झालें. "राजसूय" या शब्दाचा अर्थ राजांनीं ज्या यज्ञाची असूया करावी असाहि असूं शकेल. *

सार्वराष्ट्रीय राजनीतिशास्त्र अजून चांगलेंसें तयार झालें नाहीं. त्याचे प्रवक्ते निर्माण होण्याचा काळ यापुढचा आहे. आजपर्यंत जो विचार झाला त्याची अत्युच्च मर्यादा विल्सननें ज्या चौदा तत्त्वांची घोषणा केली तीं तत्त्वें होत. त्या तत्त्वांमध्य मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे सर्व जग एका घटनेखालीं आणावयाचें.

---

* अत्यंत प्राचीनकाळच्या शब्दांचे अर्थ लावतांना संस्कृत व्याकरण लावण्याचा आग्रह धरतां येणार नाहीं. मूळ शब्द प्राकृत असून त्याचें कसेंतरी संस्कृतीकरण होऊन तो शब्द आज आपल्या हातीं येतो ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे.

कुरुयुद्धाच्या काळीं जरी हें तत्त्व बोललें जात होतें तरी सर्व जगभर या तत्त्वाचा डांगोरा पिटल जाण्यास जागतिक महायुद्ध व्हावें लागलें. तें झालें तेव्हां जगाच्या ऐक्याचें तत्त्व पुढें आलें. त्या तत्त्वाचा खराखुरा विजय होण्याचा काल दूरचा आहे. तो काल जगाचें सांस्कृतिक ऐक्य झाल्याखेरीज यावयाचा नाहीं. त्या एकीकरणाची क्रिया समजून घ्यावयाची म्हणजे भारतीयांचा पूर्वेतिहास समजून घेणेंच आहे.

## ३२. भिन्न लोकांच्या एकीकरणांत ब्राह्मणांचें कार्य आणि त्यांची जागतिक दृष्टि.

३२. भिन्न लोकांचें एकीकरण राजसत्तेनें त्याप्रमाणेंच ब्राह्मणी विद्येनें प्राचीनकालीं करण्यांत येऊन एकसंस्कृतिभाक् जनता तयार करण्यांत आली. त्या जनतेमध्यें अनेक राज्यें उत्पन्न झालीं व निमालीं; व त्यांतीलच अश्मकराज्य, कुंतल राज्य इत्यादि राज्यें होत. आणि ब्राह्मणांनीं जी सामान्यजनता संस्करणास घेतली, ती त्यांच्या निकट नात्यांतली नव्हती. ब्राह्मण-क्षत्रियादिवर्ग एकाच जनतेंतील खरे. ब्राह्मण आणि महार हे एकाच पूर्वजाचे वंशज असतील, पण त्यांचें वंशैकत्व इतकें प्राचीन असेल कीं कुरुयुद्धकालीं देखील हजारों वर्षांपूर्वींची आणि विस्मृत अशी ती गोष्ट असेल. आज आपण त्यांची एकवंशीयता ज्या केवळ भाषाशास्त्रीय कारणांवरून प्रतिपादितों तें कारण म्हटलें म्हणजे महारा-रट्ठांची भाषा वैदिक भाषेशीं बऱ्याच अंशीं जुळती आहे हें होय. पण वररुचीच्या कालींच ज्या भाषेला द्विवचन नव्हतें ती भाषा बोलणारे लोक वैदिक भाषा बोलणाऱ्या लोकांपासून हजारों वर्षे वाढलेल्या भिन्नतेनें दूरावले होते यांत शंका नाहीं.

प्रत्येक ठिकाणीं प्रत्येक ठिकाणच्या लोकांचे चार वर्ण पडले असें समजण्यांत अर्थ नाहीं. तर ब्राह्मण हे जात या नात्यानेंच चोहोंकडे पसरले असावे. त्यांनीं स्वभाषासदृश अशा लोकांत त्याप्रमाणेंच स्वभाषेशीं विसदृश अशा भाषा बोलणाऱ्यांत वास्तव्य ख्रिस्तपूर्व हजारों वर्षें अगोदर केलें असलें पाहिजे. द्राविडांच्या भाषेस ब्राह्मणी संस्कार अत्यंत प्राचीन कालीं झालेला दिसतो आणि तो संस्कार ख्रिस्तपूर्व हजार वर्षें झाला होता असें खात्रीपूर्वक सिद्ध करणें आज शक्य होणार नाहीं, तरी त्याच्या विरुद्धही सिद्ध करतां येणार नाहीं. द्राविडी भाषांचे ख्रिस्तपूर्व एक हजार वर्षें किंबहुना कुरुयुद्धकालीन नमुने शिल्लक नसल्यामुळें द्राविडांचा आर्यन भाषांशीं संबंध किंवा असंबंध या दोन्ही गोष्टी सिद्ध करतां येत नाहींत. तथापि आर्यन भाषा बोलणारांचें परिभ्रमण कोंकणकिनाऱ्यानें वेदपूर्वकालीन आहे ही गोष्ट अनेक गोष्टी घेऊन सिद्ध करतां येण्याजोगी आहे. महल भाषा म्हणजे त्रिवेंद्रम आणि उत्तरसीलोन याशीं समांतर असलेल्या मिनीकॉय बेटाची भाषा बह्वंशानें आर्यन आहे. मालदीवची भाषा आर्यन आहे, आणि सिंहली भाषा आर्यन आहे. पण त्या वैदिक संस्कृतीपासून अत्यंत दुरावलेल्या आहेत. या गोष्टींवरून वैदिक लोकांच्या पूर्वींच्या कालच्या आर्यन लोकांचें परिभ्रमण सिंहलद्वीपापर्यंत झालें होतें ही गोष्ट सहज सिद्ध होते आणि ज्याअर्थी आर्यन लोकांचें परिभ्रमण पश्चिम किनारा आणि सिंहलद्वीप यांत झालेलें दिसतें, त्याअर्थीं आर्यन भाषांचा परिणाम द्राविड भाषांवर कुरुयुद्धकालीं किंवा तत्पूर्वकालीं झाला असावा हेंच अधिक शक्य वाटतें. अत्यंत प्राचीन तामिल कवि ज्याअर्थी संस्कृत भाषेशीं संबद्ध असलेले शब्द आपलेच आहेत असें गृहित धरून चालतात त्याअर्थी आर्यन भाषा बोलणाऱ्यांचा परकेपणा नष्ट होऊन अनेक शतकें झालीं असलीं पाहिजेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे आर्यन लोकांचें परिभ्रमण व त्यांतल्या त्यांत ब्राह्मणांचें परिभ्रमण द्राविड भाषांच्या सर्व प्रदेशांत अत्यंत प्राचीनकालीं म्हणजे कुरुयुद्धकालींच झालें असावें आणि आसपासच्या द्वीपांत देखील त्यांची

वस्ती झाली असावी आणि त्यांच्याकडून भाषासंस्करण आणि जनतासंस्करण यासारख्या क्रिया होत असल्या पाहिजेत. भारतीय युद्धानंतर थोडक्या पिढ्यांत म्हणजे अधिसीमकृष्णाच्या कालापर्यंत अखिलभारतीय कथान्वेषण आणि जनतान्वेषण होऊन उपलब्ध झालेलें ज्ञान महाभारतांत समाविष्ट केलें गेलें. त्यावेळेस अखिलभारतीय संस्कृतीचें ऐक्य स्थापन झालें होतें. असें म्हणण्यास कोणतीच अडचण उपस्थित होत नाहीं.

कुरुयुद्धाच्यापूर्वी ब्राह्मणांनीं यादव, भोज, महार, रट्ठ इत्यादि सर्व जाती आपल्या संस्कृतिछत्राखालीं आणल्या होत्या आणि त्यांना समाजशासनात्मक नियम देण्यास सुरवात केली होती. तर त्यांनीं महाराष्ट्रामध्यें आपलें धर्मशास्त्र आणि नीतिशास्त्र हीं कशीं लावलीं आणि तीं लावण्यांत त्यांस कसें काय यश आलें याचाहि आपणांस विचार अवश्य आहे आणि त्या विचारांचीं कांहीं अंगें प्रस्तुत ग्रंथांत मांडलीं आहेत.

## ३३. ग्रंथसंगति ऋणोल्लेख.

३३. प्रस्तुत विभाग कुरुयुद्धापासून शकारंभाच्या काळापर्यंत कथासूत्र आणीत आहे. तरी विक्रम आणि शालिवाहन यांच्या शकासंबंधाची चर्चा वगळली आहे. वैदिक आणि पौराणिक साहित्यापासून निघणारा इतिहास मुख्यत्वेंकरून आदिपर्वांत जाणार आहे; त्याप्रमाणें आर्यद्राविडसंस्कृतिसंनिकर्षाचें विवेचन त्याच विभागांत जाईल. त्याचप्रमाणें बरेच महत्त्वाचे कुरुयुद्धकालीन विषय आदिपर्वांतच येतील.

ललितवाङ्मयाचा इतिहास भवभूतीच्या कालापर्यंत शातवाहनपर्वाच्या पुढील भागांत देतां येईल.

जातिविषयक आणि वांशिक आणि सामाजिक इतिहास चारहि भागभर पसरलेला आढळेल आणि त्या इतिहासांत आजच्या स्थितीचें प्राचीन कारणांवरून स्पष्टीकरण केलेलें आढळेल.

ग्रंथ तयार करीत असतां अमेरिकेपासून जपानपर्यंत सर्व ठिकाणच्या पंडितांचें साहाय्य झालेलें आहे. तें केवळ त्यांच्या प्रसिद्ध लेखांचें नाहीं. पत्रव्यवहार, तोंडी चर्चा इत्यादि प्रकारचें साहाय्य पुष्कळच झालेलें आहे. महाराष्ट्रांतील उच्चविद्यालयांतील अध्यापकवर्ग व इतर विद्वान यांचें साहाय्य त्यांतल्या त्यांत विशेष झालें आहे. त्या साहाय्याचें विभागवार वर्गीकरण करतां येणार नाहीं. त्याचा निर्देश संपूर्ण ग्रंथ समाप्त झाल्यावर करतां येईल.

या पुस्तकांत आलेल्या चित्रांपैकीं बरींच चित्रें येथील आर्किआलाजिकल खात्यानें पुरविलीं, त्याबद्दल त्या खात्यांतील अधिकाऱ्यांच्या कृपेचा निर्देश करणें अवश्य आहे.

वररुचीचें संपूर्ण व्याकरण ऊर्फ प्राकृतप्रकाश भाषांतरासह येथें देण्यांत येणार होता, तथापि स्थलसंकोचामुळ तो वगळला गेला तथापि; पुढच्या भागांत देण्यांत येईल.

या भागांत जे ग्रंथसंक्षेप दिले आहेत त्यांचें स्पष्टीकरण यांतच सांपडेल. आधार ग्रंथ आणि उल्लेखित ग्रंथ यांचा एकत्रित उल्लेख पुढच्या कोणत्या तरी भागांत करण्यांत येईल.

# शातवाहनपर्व विभाग १ ला

## अनुक्रमणिका

### प्रकरणांची यादी.

# प्राचीन महाराष्ट्र

# शातवाहनपर्व



## विभाग १-ला; प्रकरणें १-५५; परिशिष्ट

### ग्रंथाच्या परिच्छेदांची सूची



प्रकरण २२ वें.

## उदयनकाल आणि बुद्धकाल.



प्रकरण २३ वें.

## प्राचीन अपरांत



प्रकरण २४ वें.

## बृहत्कथेंतील रामायण आणि त्यापासून निघणारा सामाजिक इतिहास.



प्रकरण २५ वें.

## रामायण आणि बाह्य संस्कृतीचे परिणाम.

# RÉSUMÉ

This volume forms a part of a series which is intended to give the history of Ancient Maharashtra from the remotest past to about 700 A. D., by which period the world received its modern form, viz. when Western Asia became Mahomedan territory, Europe Christian, Eastern Asia Budhist, and India Brahmanic [Chaps. 1, 2.]

This volume tries to depict the political course of events and the literary progress from the Great Kuru war to the beginning of the Śaka Era. The discussions regarding the date of the Kuru war and the causation of the Vikrama and Śaka eras are not, however, taken up herein. The first volume is expected to deal with the problems relating to the Kuru war, and also with the period of Asur domination, which seems to have existed for centuries before the Kuru war and has left its traces in the period after that war. Discussion about the political tangle, intimately connected with the discussion about the two eras, is also reserved for the next volume wherein the era problems will be discussed fully.

The period that stretches between these two terminal points, viz. the Kuru war and commencement of the Śaka era, is a long one of about thirteen centuries or more.

*Earliest memories ; Asur pirates and their connection with the most ancient dynasty.*

We find, at the beginning of recorded memories of the Western coast, that it was infested by Asur or Assyrian pirates, and the Asuras had somewhere in Western India a town called Aśmanagara which afterwards developed into the state [see introduction......] called Aśmaka, whose king is mentioned in Mahabharata as taking part in the Kuru war, and the continuity of which for twenty-five generations is recorded in the Puranas, and the ruling dynasty of which is recorded as having been brought to an end by the Nandas of Magadha several decades prior to Alexander's invasion. This dislocation of the Aśmaka dynasty by the Nandas seems to have been temporary, as the Aśmakas again show their existence as a separate state even until the fourth or fifth century of the Christian era. An attempt has been made to give the history of the ancient kings of Pratisthana who, according to the opinion of the author, ruled during some portions of the period that stretched between the Kuru war and Buddha's birth.

*Kingdoms in Mahārashtra during the Kuru War ; the Aśmakas.*

At the time of the Great War we find various kingdoms in Deccan (1) Kuntala, Kratha, Kaisika, Konkana, and Aparānta. From the time of the Kuru war to that of the Nandas, i. e. about 400 B. C., as many as twenty-five Aśmaka kings ruled in the Deccan. The kings of Pratishthana, whose stories are given by Bṛhatkathā, must have belonged to this dynasty. Some of these stories are very significant, and are given in detail [Chaps. 7, 8, 16, 17]. The story of Narasimha, for example, illustrates how the Pratishthāna king, although his army was too ill-equipped to fight with the army of Magadha which had numerous elephants and horses, still won the victory by putting preponderating numbers into the field. That story probably illustrates the period when the Deccan did not have horses, a fact of considerable interest, since Deccan horsemen became so well-known in the latter-day history of India.

*Passing from Aśmakas to Śatavāhanas.*

The first Lambaka of Bṛhatkathā proposes to tell us the story of the first Śātavāhana king. The Śātavāhana king-

dom is here shown to be in Paithan (Pratishthāna), and betrays the period of the manufacture of the story as the pre-Andhra period in the Śātavāhana history. The Ashmakas were succeeded by the Śātavāhanas. When the Śātavāhanas did actually begin their career cannot definitely be stated. Puranas mention Simuka as the first King of the Dynasty. Simuka again is mentioned in the Nanaghat inscription, which is dated approximately at 250 B. C. on palæographic grounds. Simuka, however, from that inscription does not appear to be a ruler of a small kingdom, but an emperor of a territory stretching on both sides of Vindhya. The Nanaghat inscription [Chap. 49] is interpreted by the author differently from the interpretations of previous students. The various names of Kumaras and Kumarawara Vedishri, which appear in the inscription, are, in the opinion of the author, names of princes who died as Governors, and one of them as a Governor-General. The attempts, therefore, of scholars like Bühler, Jayaswal, Bakhle and others to identify these names with names in the Śātavāhana or Andhra dynasty mentioned in the Puranas are deemed by the author as misdirected and unfortunate. The author therefore regards that the beginnings of Śatavāhana power must be dated generations before the period of Śimuka [Chap. 48].

The Śatavāhanas, therefore, have a career stretching from the period of the Maurya accession to the Magadha throne, and the first Śātavahana is held, in the absence of contrary evidence, to be a contemporary of the last Nanda, displaced by Chandragupta. The progress of the Śātavāhanas, in which they became masters of the various parts of the whole of India, wherein they show themselves at different times as winners of one terri. tory and losers of another, but extending their sway or influence at the same time from Kashmir to Cape Comorin and from the Indus to Cambodia, is reserved for treatment in the next volume. Their struggles with the Kshatrapas also will be dealt with in the next volume, as that account is so intimately connected with the questions relating to the prevailing eras of the North and the South. Khāravela inscription is given and discussed in Chap. 50.

*Period of the Kaikeya Domination.*

Attention to the history of Persia becomes somewhat necessary, although the history ot the period after the Kuru war is rather chaotic as far as Persia is concerned.

*Ikshvākus and their Persian Character.*

The periods of the history of Persia have parallel periods in the history of Northern India (Chapters 6, 10 and 11). The mythological period of Persia ends with the career of Cyrus, so the second mythological period in India ends with that of Buddha.

During the Pauranic period the influence of both Asuras and Persians must have been great in India. The antiquity of the Persian influence goes rather far. Even the dynasty of Ikshvākus may have been of Persian origin. This dynasty, more than any other, had names of kings whose name ended in *aśva* horse. In Ancient India riding on horses was not the custom. Warriors fought in chariots. It was the Iranian custom to fight on horse back. In Persia the masked warrior was known by his horse, so we find in Ancient Persian names an abundance of those which end in *aspa* (horse). The dynasty of Ikshvākus was not only originally Persian, but one which kept up Persian traditions. The step-mother of Rama is given as Kaikeyi, and her brother is given as Aśvapati Kaikaya, who not only figures in the Rama story, but also in the intellectual life of India, and is mentioned in an Upanishad. The Maga, or the Magi influence in India, had also existed from pre-Vedic times, long before the Maga Brahmanas, who are shown in the Bhavishya Purâna as introduced by Śāmba, the son of Krishna. Their history is given from the remotest past till to-day by giving stray facts of different periods [Chap. 28]. It is significant that even the present Raja of Ayodhya, the capital of the Ikshvakus, is a Maga or Sākadwipi Brah-

mana. It is not unlikely that Rama's family, after having taken up local purohits, became thoroughly Indian, and the Maga priests who came with them became ordinary land holders in course of time.

*Rama's Deification and its connection with the Semitic God Ramman.*

Regarding the great epic of Ramayana it is shown in this work (Chapter 24 and 25 and introduction) that the story of Rama is the result of piecing together a number of different stories. The Rama story in Bṛhatkathā differs in various details from the story as given in the Ramayana, but by the time the story of Rama, as found in the Bṛhatkathā was formulated, the deification of Rama had already taken place. The deification of Rama was a result, not simply of the appreciation of the great achievements of Rama of Ayodhya, but was due to his being identified with the god Ramman, who must already have been introduced into India by the Phœnicians, and whose ideograph was pronounced as Adar, or Adad, a word which became further changed to Adam in latter-day Semitic languages. Hence we find the name Adam's Bridge or Rama's Bridge for the rocks which appear to connect India with Ceylon. Shāla, consort of Ramman, is a field-deity, whereas Sita is the daughter of Earth. Ramman was a storm god, so were the Maruts in the Deccan. The conflict between Maruts and Ramman was to be avoided, and is avoided by making Maruti a devotee of Rama.

*Kaikeyas, a constituent race of Modern Persians and their history in India. Did they speak Paiśachi?*

During the period that stretched between the Kuru war and Buddha the Persians, especially the Bactrians, had spread throughout India and were known by the name Kaikeyas. References to them are found in Mahabharata as well as in Ramayana. The territory round Mathura was already Persianised by them, inasmuch as a language called Paisachi came into existence which had Saurseni (language of Mathura) as its basic language. This linguistic fact was known to the grammarian Vararuchi. That Paiśachi was the language of the Kaikeyas is a fact mentioned by the grammarian Markandeya, who gives three varieties of Paisachi, namely Kaikeyi, Śaurseni and Pānchālī. The grammarian Markandeya has also noticed that, whereas every language has its metropolitan and rural forms, Paiśachi did not have a rural form [para. 84.] By mentioning this he bears witness to the social fact that the Kaikeyas were a foreign tribe which did not occupy country regions, but settled only in cities. That the Kaikeyas were really Persians is known also from the fact that a large number of Persian kings used to have Kai prefixed to their names, and that the descriptions of the route to Kaikeya territories in Upanishads and Puranas point to the same direction. Since the language of the Kaikeyas was Paisachi, Buddha also probably lectured in Paisachi, the language of the dominant class, just as the professional saints and swamis of to-day prefer to deliver their important speeches or publish their epistles in English, i.e. in the language of the dominant class. That the language of Theravada, the most orthodox of Buddhist schools, was Paisachi is mentioned by a writer viz. Vinitadeva.

*Evidence of Vararuchi's Grammar.*

In Vararuchi's grammar we find Paisachi mentioned as an important language, and the names Pali and Ardhamagadhi are non-existent. Vararuchi [Chaps. 38, 39] therefore lived in a period prior to that when Pali and Ardhamagadi were created as literary languages. That Vararuchi dealt with literary languages only is clear from his grammar, which seems to have been mainly designed to enable Sanskritists to utilise literatures in the four languages he treats. In the numerous words which Vararuchi has given there is not a single word which Bauddha and Jain literatures have utilised for their creeds. Vararuchi's grammar, especially his collection of

words, is useful therefore to illustrate the social and political life after the Kuru war, but prior to Buddha.

*Historical value of the great story Brhatkathā.*

Apart from Vararuchi's grammar, the material that is most valuable for the study of the period stretching between the Kuru war and Buddha is Bṛhatkathā, and especially its version Katha Saritsāgara. The fact that Katha Saritsāgara, or Kashmirian Bṛhatkathā, is a cycle of literature greatly elaborated by several generations, need not prevent us from regarding it as useful for pre-Buddhistic history, because it is most likely that, although the penultimate editor of these stories from the second Lambaka onwards may have been Gunādhya, the bulk of the collection must have been made by Vararuchi, who, for the very sake of his grammar, was expected to have collected a considerable amount of literature in the four Prakrits, namely Maharastri, Saurseni, Magadhi and Paisachi. Considerable portion of this work is devoted to interpreting Bṛhatkathā for historical purposes.

*Why Paiśachi became a prime literary language.*

The reason why Paisachi became the language of the collection of the Indian stories is not difficult to imagine. Just as Mahomedans collected a large number of local stories and traditions about ancient India and incorporated them in Arabic and Persian works (and during the British period the largest collection of Indian literature becomes available through English and not through any Indian vernaculars) so, in the territory under Persian domination, stories and histories about more ancient kings and people became collected in Paisachi, and they became incorporated in one book through the efforts of collectors like Vararuchi. A large number of stories must have been in existence in Paisachi in the period prior to Udayana, who is given the credit, by Bṛhatkathā, of killing the Pārasika king. Among the stories that were available to the collectors and editors of Bṛhatkathā there were a number of stories relating to kings of Pratishthāna and Dakshināpatha and of Kundinpura, which give material evidence for the history of the great unknown millennium that stretched between the great war and the birth of Buddha.

*Persian influence in Hindu Royal families.*

Darius I should, therefore, not be regarded as the first Persian invader of India, but probably the last of the important Persian invaders. Udayana, who defeated and killed the Persian king, must be dated at least two hundred years prior to Buddha. His own family, although credited with the conquest of the Persians, is not free from Persian influence. His son's name is given in Sanskrit versions of Bṛhatkathā as Naravāhanadatta, but in the Purāṇas his name is given as Vahînara, which is really a Persianised form of Naravāhana (Vah-i-nara). Udayana's account is interesting to students of southern history on account of his conquest in the south, in the description of which the fact that he omitted the entire territory of Mahārastra is pertinent to us. [Chaps. 20, 21, 22].

*Encyclopaedism and its service in unification of religions.*

The religious history of the period under consideration is considerably detailed in this volume. How Ṛgveda, Yajurveda, Śamaveda and Atharvaveda were originally different religions of different peoples, and how the great encyclopaedist Vyāsa united the literatures and practices of these different religions and made them all branches of one common sacrificial religion, is not completely described, but only indicated, reserving thorough treatment of it for volume I, entitled Adiparva. The Vedic religions, or rather the sacrificial religions after they were combined into one whole, became associated with the "Remembered traditions" (Smṛtis) and the "Antiquities" (the Purānas) which included also history

Itihāsa, still further unified the cultures of various peoples. This task was accomplished by the ancient group of encyclopaedists known as Vyāsas, amongst whom Krishna Dvaipāyana was the foremost.

The collection of the traditions of all cultures, and their sympathetic inclusion in literatures, made the cultures of different peoples into one whole; and thus the task of cultural unification of the then known world was accomplished by these encyclopaedists. The most important of them is naturally and actually given the name encyclopaedist " i. e. Veda-Vyāsa (arranger of knowledge.") How the Vedic religion became associated with the non-Vedic is explained in Chaps. 34, 35. How the tribal priesthoods and all-pervading Brahminic priesthood adjust their relationship when Brahminism begins to influence various tribes in the country, by Brahmins assuming only a fraction of priestly function, confining themselves specially to ritualism, leaving temple worship, exorcism, management and oracles to others, is explained therein. It is also shown that even at the time of the Kuru war the rudiments of the present Puranic religion existed throughout India and beyond, and the chief task which Brahmins, or rather the great encyclopaedist of the past, accomplished, was to convert the varied religious life into one organic whole. It is shown that this organic process had a fair start even before the days when composing of mantras came to an end, and must have advanced a great deal after the Kuru war, and the literary preparation for the process was fairly completed in the time of Adhisīma-Kṛshna, who lived within, or just after, one century from the time of Pāriskshit Janamejaya. [Chaps. 13, 14].

*Dating of additions in Puranas*

The literary elaborations of Mahābhārata and Purānas can be dated by periods with the help of about forty-six editions and Mss. described by Pargiter in his "Purāna texts." These elaborations had a social function to perform, namely the unification of India and its entire religious phenomena. Notwithstanding the ancient comprehensive and absorbing methods, Buddhism and Jainism kept their distinctness, not because the Brahmanic methods of absorption ceased to operate upon them, but because these religions, having internal organisation of their own, Brahminism was able to act on them only partially in India and Indo-China and South Eastern islands, and not at all in territories to which Brahmins never migrated but to which Buddhism spread.

*Original Character of Jainism.*

Jainism, in its origin, must have been a religion of the trading class who stretched from the borders of Mesopotamia to the Brahmaputrā, and they must have been originally worshippers of Jins. Jins must have been originally the gods of Arabia, who, in the period after the prophet, became devils of Islamic demonology. In the period prior to Udayana Jainism existed, as Bṛhatkathā tells us. This Jainism was without Mahāvira as it was prior to Mahāvira. It was not then a religion of any special principles that were propounded, but primarily a Jin-worshipping cult, having for its gods Kuber and Manibhadra. The Vidyādharas appear very prominent in Jain literature. These Vidhyādharas practically appear nowhere in Purānas. Mahābharata appears to have been a compilation when the stories of gods and demigods were stories of the past. Purānas were also sealed, thus there was no room for the inclusion of the stories of the Jins who were being brought into the country by the trading classes. Literature about the Jins naturally was a necessity. That necessity was supplied by Paisāchi literature. The language of the foreigners was naturally the most suitable medium for the inclusion of the unrecognised gods, and so the Jin worshippers' stories were expressed in Paisāchi. [Chap. 27.]

Paisāchi literature was a confluence of several streams with the original flow of Kaikeya traditions. The stream of Jin-worshippers' literature mingled, and that stream was further augmented by Indian stories whose continuity was kept up by suta class, whose literature for some time was taken up by Antiquity-writers (Paurānikas), who, after their task of getting literature about the kings proximate to the Kuru war was accomplished, became attentive to incorporating the traditions of the sacred places, so that their social purpose of cultural and social unification of India was accomplished. Śatānika appears to be the last king who is dealt with by Paurānikas. Udayana, the son of Satānika the second, but deemed through mistake to be the son of Śātānika the first, becomes a centre of attention in the Paisāchi collection. This fact shows that by this time the class of story tellers, who were losing listeners from the class of Purana elaborators, got listeners from another class, namely that of Paisāchi writers and story collectors and thus the literature of India was able to maintain its continuity.

*Relative position of the Vedic Hymns in the history of Asura cult.*

The writer considers that the most ancient portion of the Vedic hymns was only a latter-day event in the history of the word Asura. Hymns in Ṛgveda, wherein Asura, is used, not in the sense of demon but in the sense of God or supreme god, are recognized by scholars to be the older portion of Ṛgveda. When the Assyrians held sway over Iran, Asura or Ahura became an Iranian deity, and when Iranians came to India the word Asura was naturally used, in the hymns they composed, to denote the mightiest god, and this fact alone should give us the relative position of the Vedic hymns in the history of the Asura cult. The Vedic Indians used the word Asura to denote the highest god. This evidently arose out of common Indo-Iranian traditions, but the common Indo-Iranian tradition itself was changed with the idea of the pre-eminence of Asura, which undoubtedly arose through the sway of Assyria over Iran. Asuras evidently conquered Iran and were troubling the Western coast of India also. Asura deities must have been the deities of India at one time, otherwise the name Purve-deva, or the older gods, for the Asuras cannot be explained.

*Anthropological History of Maharashtra.*

This volume has something to say about the anthropological history of Maharashtra. The author thinks it most likely that the name of the country is derived from the combination of two tribal names *Mahar* and *Ratta* (Chap. 4.) It is possible that the present kunbis are the descendents of the rattas, and the joint name arose out of the policy of combining the two tribes. This policy must have come to an end during the rule of strangers i.e. during the Aśmaka period, i.e. probably before the Kuru war, and hence there is no currency of the name Maharashtra in earlier literature. Mahars and rattas however could not have been the oldest known inhabitants. Before either mahars or rattas there must have been *Bhois* and *Kolis* i.e. tribes who occupied the country during the country's fishing civilization and have continued to live near the sea and the river banks. Bhois are known in Sanskrit literature as Bhojas (Chaps. 41-42). In Berar the still older tribes must have been *Mānyas* and *Bedars.* Mānyas are referred to in the Agastya hymns in Ṛgveda. They have left traces in place-names like Mānyakheta and Mānapuri, and still continue as a separate caste called *Mane* or *Mane Kunbi.*

*Some other topics discussed.*

Out of the other topics discussed in the book the following may be mentioned.

The extent of Hindu influence throughout India and beyond is discussed in Chap. 26.

There are several Chapters, from 31 onwards, regarding Shātavāhanas exclusively, but they incidentally discuss some topics of general interest, e. g. migration of stories is discussed in Chap. 31.

Vararuchi, his work and his place in cultural history are discussed in Chaps. 38-39.

Maurya power in Maharashtra is dwelt upon in Chaps. 43, 44, 45.

The political tangle after the death of Aśoka is dealt with in Chap. 46.

How Kalidasa's statements in the drama Mālavikāgnimitra, are not useful for interpreting political conditions after the fall of the Mauryas is fully discussed in Chap. 47.

Additional points in the constitution of Ancient Hindu civilization are detailed in Chapters 51, 52, 53, 54.

A complete summary of the book is not attempted here, only what the writer has to say, to some extent, in contradiction of the existing ideas, or what may even be regarded as the author's new contribution, (if the writer's ideas are accepted by the scholarly world) may partially be illustrated from this résumé.

# चित्रसूचि

—०—

देशी भाषेवरी वा अकपट मनिंचें प्रेम मित्रांस ठावें
कल्याणातें तयांच्या मनिं वसत असे ज्यास इच्छा स्वभावें
त्याच्या इच्छेप्रमाणें घडुनि किमपि ये त्यासहि होय शंका
त्याचें त्यातें न ठावें अधिक मग वृथा सांगणें काय लोकां

# शातवाहनपर्व



## प्रकरण १ लें

## पर्वकालांतील जगद्विकास

१. केवळ विश्वास ठेवून आम्ही सांगतों तें खरें धरा, असें वाचकांस कोणीच इतिहासकार म्हणणार नाहीं; तथापि कथनाच्या प्रारंभीं "केवल-निवेदन"पद्धति प्रत्येक लेखकास अंगीकारावी लागते. वाचकांस मुख्य कथासूत्राचा परिचय प्रथम करून द्यावा, नंतर कथासूत्राचीं अंगें सविस्तर सांगावींत, तो प्रसंग येईतोंपर्यंत पुराव्याच्या प्रदर्शनांत पडूं नये, तो प्रसंग आला म्हणजे मात्र विधानास पुरावे द्यावेत, आणि अवश्य असल्यास विरुद्ध मतांचें खंडनहि करावें, या प्रकारची वृत्ति ग्रंथाची सुलभता आणि विश्वासार्हता वाढविण्यासाठीं अवश्य असते.

सुगमता आणि विश्वासार्हता हे दोन्ही गुण इतिहास-ग्रंथास अवश्य आहेत. हे गुण भिन्न प्रकारच्या लेखन-पद्धतींची अपेक्षा करतात, आणि इतिहासलेखकास दोन्ही प्रकारच्या अपेक्षा पुऱ्या कराव्या लागतात. कथेचें मुख्य सूत्र अगोदर अधिकारी वाणीनें सांगून नंतर एकेका अंगाचें साधार विवेचन करणें या प्रकारची क्रिया केली, तर सरलकथन आणि विश्वाससंपादन या दोन्ही गोष्टी साध्य होतात. तर तीच निवेदनपद्धति येथें अवलंबिली आहे.

इतिहासास व लोकस्थितिवर्णनांस चित्राची उपमा वारंवार देतात. चित्रास ज्याप्रमाणें बाह्यरेषादि असतात, त्याप्रमाणें ऐतिहासिक वृत्तास देखील बाह्यरेषा, आंतील रेषा आणि रंगभरणी, हीं आहेतच; आणि इतिहास ज्या अर्थी राजकीय आणि सांस्कृतिक आहे, त्या अर्थी त्या प्रत्येक प्रकाराला देखील बाह्यरेषा आणि अंतर्गत रेषा आहेत. राजकीय इतिहासांत जेव्हां एका राज्याचा व्यवस्थित विकास झालेला असतो तेव्हां त्या राज्याच्या वृद्धिसंकोचदर्शक ठळक गोष्टी बाह्यरेषा म्हणाव्या लागतील आणि तो बाहेरचा इतिहास होत असतां ज्या अंतर्घटनात्मक गोष्टी झाल्या असतात, त्यांना आंतील अंतर्गत प्रधान-रेषा म्हणावें लागेल. जेव्हां आंतल्या आंत घटनात्मक स्थित्यंतरें होत असतात, तेव्हां त्या स्थित्यंतरांस कारण झालेले थोर पुरुष, व त्यांशीं स्पर्ध्यमान असलेले पुरुष, व या दोघांच्या मनोभावना आणि त्यामुळें उत्पन्न झालेली अरिमित्रता यांना आंतील रंगभरणी म्हणतां येईल.

जेव्हां एखाद्या राज्याची वाढ किंवा विनाश हाच वर्णनविषय नसेल, आणि एका स्थलावर अनेक आक्रमणें चित्रावयाचीं असतील, तेव्हां प्रत्येक क्रांतिवर्णन हें त्या इतिहासचित्राची बाह्यरेषा समजावें लागेल, आणि अनेक स्पर्ध्यमान शक्तींनीं एकंदर कार्य काय केलें हें प्रथम सांगून दृष्ट होणाऱ्या एकंदर परिणामांत प्रत्येक शक्तीचें कार्य समजावून द्यावें लागेल.

अनेक स्पर्ध्यमान शक्तींचें विशिष्ट क्षेत्रावरील कार्य समजून घ्यावयाचें झालें म्हणजे त्या सर्व स्पर्ध्यमान शक्ती ज्या एकंदर क्षेत्रांत स्पर्धा करीत असतात त्या सबंध क्षेत्रांतील क्रियांचें अवलोकन हवें. तें केल्याशिवाय विषय स्पष्टच व्हावयाचा नाहीं. हिंदुस्थानचा इतिहास व त्या-बरोबर महाराष्ट्राचा या काळचा इतिहास मुख्यतः भारतीय, इराणी, ग्रीक व सेमेटिक संस्कृतींच्या रणकंदनाचा खेळ आहे असें दिसून येईल. यासाठीं महाराष्ट्राच्या इतिहासाच्या अवगमनासाठीं या संस्कृतिसंग्रामामुळें होणाऱ्या एकंदर स्थित्यंतरांचा आढावा घेणें अवश्य होतें.

२. ख्रिस्तपूर्व ६०० वर्षें आणि ख्रिस्तोत्तर सुमारें ६०० वर्षें हा इतका दीर्घ काल शातवाहनपर्वात विवेचावयाचा आहे. प्राचीन इतिहासाच्या क्षेत्रांत या कालास खरोखर उत्तर कालच म्हटलें पाहिजे. कारण या कालाच्या शेवटीं समाजास आणि संस्कृतीस बऱ्याच बाबतींत अर्वाचीनत्व आलें आहे. या कालाच्या इतिहासास शककर्त्या शातवाहनांचें नांव दिलें आहे, त्याचें कारण असें आहे कीं, या सहस्रकांत अगर शतक-द्वादशींत अत्यंत दीर्घकालापर्यंत ओढला गेलेला राजकीय धागा शातवाहनांच्या सत्तेशिवाय दुसरा कोणताही सांपडणार नाहीं. या कुळाचा उदय, त्याचें प्रामुख्य आणि त्याचा विलय त्याप्रमाणेंच या

कुळापासून उत्पन्न झालेले उपवंश, या सर्व गोष्टींच्या इतिहासानें ख्रि. पू. २५० याच्या पुढचा सुमारें सहा सातशें वर्षांचा काल व्यापला जातो, आणि या कालांत अनेक सामाजिक आणि सांस्कृतिक घडामोडी झालेल्या दृष्टीस पडतात. या घराण्याचें अस्तित्व ख्रिस्तपूर्व २५० या सुमारास दिसत आहे तरी त्या कालच्या सामाजिक स्थितींत ज्या विशेष गोष्टी दिसतात त्यांचा प्रारंभकाल पहावयाचा झाला, तर आणखी २५० वर्षे पाठीमागें जावें लागतें. प्रत्यक्ष शातवाहनराज्याचा आरंभकाल मौर्यपूर्व कालांतहि जाऊं शकेल.

राष्ट्रांत आला होता या कथेवर मात्र संशोधकांचा विश्वास नाहीं.* तथापि त्या कल्पनेस बाधक असा पुरावा देखील उपलब्ध नाहीं. महाराष्ट्राच्या त्याचप्रमाणें जगाच्या सांस्कृतिक इतिहासांतदेखील बुद्धाची कारकीर्द क्रांतिकारक झाली. त्यामुळें बुद्धजीवनकाल एकंदर जगाच्या इतिहासांत कालखंड पाडणारा आहे. महाराष्ट्राचा त्यावेळचा इतिहास इतर प्रदेशापासून अलग नाहीं आणि त्यामुळें सर्व धागेदोरे समजण्यासाठीं शातवाहनकालीन जागतिक विकासाच्या इतिहासकथनास बुद्धजीवनकालापासून सुरुवात करावी लागत आहे.

३. शातवाहनांचें नांव राजकीय आणि त्याप्रमाणेंच सांस्कृतिक इतिहासांत जरी मोठें आहे आणि त्यांचा शक हिंदुस्थानांत तसाच हिंदुस्थानाबाहेरील भारतीय संस्कृतीच्या देशांत जरी अजून चालू आहे, तरी जागतिक इतिहासाच्या दृष्टीनें आणखी एक भारतीय नांव त्याहूनहि मोठें आहे, आणि तें म्हटलें म्हणजे गौतम बुद्धाचें होय.

दक्षिणेच्या सांस्कृतिक इतिहासाला बुद्धानें स्थापन केलेल्या संप्रदायामुळें निराळें स्वरूप मिळण्यास शातवाहनपूर्व कालांतच सुरवात झाली होती असें नानाघाटांतील शातवाहनांच्या अत्यंत प्राचीन अंकित लेखांवरूनच दिसून येत नसलें तरी त्या काळांत बौद्धसंप्रदाय दक्षिणेंत प्रविष्ट झाला होता असें जवळ जवळ त्याच काळच्या, किंबहुना अगोदरच्या अशोकाच्या लेखावरून निश्चित होतेंच. तथापि दक्षिणेच्या ज्ञात इतिहासाला सुरुवात शातवाहनापासून आणि त्याच सुमाराच्या अशोकलेखापासून न करितां बुद्धाच्या आयुष्यकालांतच न्यावी लागेल. बुद्धाच्या कालांतच सोपाऱ्याचा व्यापारी म्हणून प्रसिद्ध असलेल्या पूर्ण नांवाच्या त्याच्या शिष्यानें अपरांतांतील म्हणजे कोंकणांतील द्राड लोकांची सुधारणा करण्याचें प्रथम अंगीकारिलें होतें ही गोष्ट बौद्ध वाङ्मयांत विश्रुत आहेच. तथापि गौतमबुद्ध पूर्णाच्या आमंत्रणानें महा-



**अमरावती येथील एका शिळेवरील बौद्धांचें खोदकाम वि. पू. २०० पासून ख्रिस्तोत्तर ३०० पर्यंतचीं कामें म्हणजे स्मारकें एकाच शिळेवर आहेत असें तज्ज्ञांचें मत आहे. चि. १.**

४. बुद्धजीवनाच्या कालांत किंवा त्याच्या अगदीं निकटच्या कालांत सर्व जगभर क्रांति चालली होती, आणि जुनें जग नाहींसें होऊन नवीन जग डोकावूं लागलें होतें. इतिहासाची पौराणिकता जाऊन त्याला खरी ऐतिहासिकता येण्याचा काळ सर्व जगभर हाच होता असें म्हणतां येईल. बुद्धाचा जन्म ख्रि. पू. ५५७ मध्यें किंवा त्याच्या आसपास झाला. त्याच सुमारास राजकीय दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची गोष्ट इराणांत घडून आली, ती म्हटली म्हणजे अकिमिनियन ऊर्फ हखामणी घराण्याच्या राज्यास आरंभ होय. बुद्धजन्म आणि हखामणी राज्यारंभ या दोन्ही गोष्टी जगाचें स्वरूप पालटणाऱ्या झाल्या. हें राज्य ख्रि. पू. ५५८ ला सुरू झालें, आणि त्याचे परिणाम ईजिप्तपासून पंजाबपर्यंत झाले. या घराण्याच्या उदयाबरोबर इराणचा इतिहास पौराणिक किंवा स्थानिक स्वरूपाचा राहिला नाहीं. राष्ट्रविषयक लिखाणांत अधिक निश्चयात्मक विधानांची आवश्यकता उत्पन्न झाली आणि त्या इतिहासाचा ऐतिहासिक काल सुरू झाला. आणि इराणच्या जागतिक महत्त्वाचा काल आला. हखामणी घराणें किंबहुना त्याचा आद्य संस्थापक कुरुस् ( Cyrus ) हा मोठा विजेता असल्यामुळें एशियाच्या विविध भागांत मोठाले फेरफार

* ( Burnouf—L' Introduction a Histoire du Buddhism Indien. )

झाले. ज्याप्रमाणें हिंदुस्थानांत बुद्धजन्मोत्तर कालीं जुना परंपरागत धर्म बाजूस पडून त्यास अल्प काल मांद्य प्राप्त झालें त्याप्रमाणेंच असुर देशांत प्राचीन धर्मास मांद्य आलें, पण तें हिंदुस्थानाप्रमाणें देश्य संस्कृतींतून निघालेल्या विशिष्ट संप्रदायाच्या प्रसारामुळें आलें नसून अन्य कारणामुळें आलें. असुर देशावर परराज्य आणि परधर्म, या दोहोंचा पगडा बसला. इ. स. ५६० मध्यें बाबिलोनचा राजा नेबुचद नझ्झर हा मेहुण्याकडून मारला गेला, आणि त्याच्या नंतर जी अनधिकारी आणि त्यामुळें दुर्बळ राजांची परंपरा सुरू झाली, तीमुळें राज्यास दौर्बल्य प्राप्त झालें. त्याचा आणखी परिणाम असा झाला कीं ५३९ मध्यें इराणचा कुरुस् राजा बाबिलोनमध्यें जेता या नात्यानें प्रवेश करता झाला. जुनें असुरी बाबिलोनी राज्य नष्ट होऊन तें इराणी साम्राज्याचा एक प्रांत झालें, आणि जरी इराणनें तेथील धर्म आणि उपासना यांस धक्का दिला नाहीं, तरी इराणी वर्चस्वामुळें या कालापासूनच तेथील प्राचीन धर्मांचा लोप होण्यास सुरवात झाली.* दैवतांस महत्त्व कमी, व संप्रदायसंस्थापक व्यक्तीचें महत्त्व अधिक अशी स्थिति हिंदुस्थान व असुर देश या दोन्ही ठिकाणीं उत्पन्न झाली, पण संप्रदायसंस्थापक हाहि परका असणें ही आणखी एक आपत्ति असुर देशावर आली.



**चि. २. रामेसस् मिसरदेशीय देव.**

५. बुद्धजीवनकाल हा आफ्रिकेच्या इतिहासाच्या दृष्टीनें देखील स्थित्यंतराचाच काल आहे. या काळांत उत्तर आफ्रिकेखेरीज आफ्रिकेचा इतर भाग अगदीं वन्य स्थितींत होता. उत्तर आफ्रिकेपैकीं ईजिप्त हा अत्यंत सुसंस्कृत भाग होता आणि त्याच्या संस्कृतीचें सातत्य अगदीं प्राचीन काळापासून होतें. प्राचीन ईजिप्त याच काळांत नष्ट होण्याच्या मार्गास लागलें आणि या स्थित्यंतरास देखील कारण इराणचें वाढतें साम्राज्यच झालें. ईजिप्तचें सव्विसावें राजघराणें या कालांत नष्ट होऊन तेथें इराणी सत्ता स्थापन झाली, आणि इराणी सत्तेच्या संस्थापनेबरोबर परकीय धर्मांचें वर्चस्व आलेंच. जेव्हां देव अगर देवता स्थानिक आधिपत्याच्या दर्शक होत्या, तेव्हां त्यांचें महत्त्व राज्यक्रांतीबरोबर कमी झालें यांत नवल नाहीं. जिंकणाऱ्याचें दैवत अधिक बलवान ही कल्पना संवर्धित होऊन राष्ट्रीय दैवतांच्या उपासनेस उतरती कळा विजयामुळें लागावयाचीच. इराणच्या वाढत्या सत्तेमुळें ईजिप्तच्या स्थानिक देवतापूजनास व संस्कृतीस दैन्य आलें. या कालानंतर मिसरदेशांत देश्य संस्कृति फोंफावली नाहींच असें म्हटलें तरी चालेल.

प्राचीन भारताइतक्या किंबहुना त्यापेक्षांहि जास्त जुन्या संस्कृति म्हणून ज्या संस्कृतींचा उल्लेख करण्यांत येतो त्या मिसर आणि असुर येथील संस्कृती बुद्धजीवनकाळीं वाढत असलेल्या इराणी सत्तेमुळें आणि त्या सत्तेमुळें इराणच्या राष्ट्रधर्मास आणि तदंतर्गत झरथुष्ट्र संप्रदायास जें प्रामुख्य आलें त्यामुळें नष्टप्राय झाल्या.

६. हिंदुस्थानांत देखील इराणी साम्राज्यानें कांहीं भाग हस्तगत करून घेतला होता. तथापि त्यामुळें धार्मिक परिणाम काय झाले असावेत हें नक्की सांगतां येत नाहीं. हिंदुस्थानांत झरथुष्ट्रीय धर्म या काळांत प्रविष्ट झाला नाहीं तथापि इराणी लोकांत प्राचीन कालापासून प्रचलित असलेला " मग " नामक उपाध्याय वर्गानें पुरस्कार केलेला धर्म कांहीं तरी परिणाम करता झाला असावा असें दिसतें. यावेळेस हिंदुस्थानचा जो भाग इराणनें घेतला तो पंजाब आणि सिंध हाच असला पाहिजे, आणि त्या काळच्या विजयाचीं स्मारकें जर या भागांत सूक्ष्मपणें शोधावयास आपण लागलों तर अजूनही सांपडतील. खरोष्ठी लिपीचें अस्तित्त्व पंजाबांत सर्वत्र आहे, पंजाब खेरीज हिंदुस्थानभर ब्राह्मी लिपीचें अस्तित्त्व आहे, आणि या गोष्टी मौर्य कालापूर्वीच स्थापन झाल्या आहेत ही प्राचीन वस्तुस्थिति इराणच्या भारतावरील

* The Religion of Babylonia and Assyria; by Morris Jastrow; p. 45.

वर्चस्वाची द्योतक आहे काय याचा विचार पुढें केलाच आहे. लिपिविषयक स्थितीचा पुरावा इराणच्या विजयाबरोबर उत्पन्न झालेल्या सांस्कृतिक वर्चस्वाचा द्योतक नसला तरी मगांच्या धर्मास तात्पुरत्या मिळालेल्या महत्त्वाचा पुरावा उपेक्षणीय नाहीं. मगधर्माचा हिंदुस्थानांत प्रवेश वेदपूर्वकाळीं झाला. वेदत्रयी तयार होत असतां प्राचीन मगधर्म हिंदुस्थानांत व इराणांत भिन्न रूपांनीं विकास पावला. हिंदुस्थानांत जुना मगधर्म कांहीं अंशीं अथर्ववेदरूपानें वेदचतुष्टयींत समाविष्ट होऊन त्याची भारतीय धर्मापासून भिन्नता कमी झाली; तथापि इराणच्या आणि भारताच्या मगधर्मांतच भिन्नता उत्पन्न झाली होती. नवीन झालेल्या विजयामुळें येथील मगधर्मावर किंबहुना एकंदर भारतीय धर्मांवर इराणी तऱ्हेचे संस्कार थोडेसे तरी झाल्याशिवाय राहिले नाहींत. ते संस्कार थोडाच वेळ टिकले; कारण इराणचें पंजाबवर वर्चस्व देखील अगदीं थोडा वेळ टिकलें होतें.

७. इराणच्या सत्तावर्धनाचा परिणाम जातीय आणि स्थानविशिष्ट किंवा विशिष्ट शक्तिद्योतक देवतांच्या आणि धर्मांच्या शैथिल्याकडे झाला असला तर एकेश्वर धर्माच्या आणि विशिष्ट विचारांचा संग्रह ज्यांत आहे अशा धर्मांच्या संवर्धनास त्यामुळें काळ अनुकूल झाला. संप्रदायसंस्थापक इराणांत त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत उदयास आले आणि जगभर परिणाम करते झाले. मगधर्माचें अवलंबन करणारा पण त्यांत महत्त्वाचें स्थित्यंतर करणारा झरथुष्ट्र संप्रदाय स्थापन झाला. त्याप्रमाणें महावीर व बुद्ध हे महत्त्वाचे संप्रदायप्रवर्तक भारतीय संस्कृतीचें स्थित्यंतर करूं लागले. महावीर, बुद्ध आणि झरथुष्ट्र हे अगोदरचे संप्रदायप्रवर्तक होत, आणि येशू, मणि, आणि महंमद हे उत्तरकालीन होत. झरथुष्ट्र हा बुद्धापूर्वी होऊन गेला असें समजण्यास मुळींच आधार नाहीं. तथापि बराच नंतर झाला असेंहि खात्रीपूर्वक म्हणतां येत नाहीं. संप्रदायप्रवर्तकांचें युग सुरू होऊन, दैवतांचें व राष्ट्रधर्मांचें युग नष्ट झालें, दिवस, रात्री, नक्षत्र देवता, सृष्ट चमत्कारांच्या देवता सिंहनागादि संहारक पशुपक्ष्यांच्या देवता यांचा लोप होऊन आध्यात्मिक भावनांचें किंवा त्यांच्या दर्शक देवतांचें महत्त्व वाढूं लागलें. या क्रियेस पर्वकालाच्या आरंभीं सुरुवात झाली, आणि तिची पूर्णता या युगाच्या अंतिम काळांत झाली. यांतील शेवटचा संप्रदायप्रवर्तक जो महंमद तो या कालाच्या अंतिम भागांत होऊन गेला. संप्रदायप्रवर्तकांची उत्पत्ति एशिया खंडांतच झाली असल्यामुळें जगाच्या धार्मिक स्थित्यंतरास आरंभ किंबहुना स्थित्यंतर हा अर्थात् एशियाच्याच सांस्कृतिक विकासेतिहासाचा भाग होय. एशियांत उत्पन्न झालेल्या संप्रदायाचें यूरोप हें केवळ एक प्रचारक्षेत्र होतें. आणि राष्ट्रीय दैवतधर्मांचा विनाश करून किंवा त्यास दुय्यमपणा देऊन वैयक्तिक विचारावर रचलेल्या संप्रदायाचें स्वागत करण्याची क्रिया एशिया आणि युरोप यांमध्यें होऊन जगाचा धार्मिक नकाशा चालुक्योदयकालीं जो तयार झाला त्यांत आजपर्यंत थोडेच फेरफार झाले आहेत असें म्हणतां येईल. नवीन संप्रदायप्रसाराच्या इतिहासांत देखील कांहीं वैशिष्ट्यें दिसतात. हिंदुस्थानाबाहेरील वैयक्तिक संप्रदाय त्यांच्या तावडींत सांपडलेल्या राष्ट्रीय जीवनपद्धतींचा आणि संस्कृतींचा नाश



चि. ३. मिसरदेशीय देवता समुच्चय.

करून आपलें महत्त्व स्थापन करते झाले, तर बौद्ध संप्रदाय राष्ट्रीय आणि जातीय आयुष्यक्रमाचा विघात न करतां आपलें अधिष्ठान स्थापित करता झाला. राजकीय दृष्टीनें ग्रीस व रोम यांनीं जरी एशियावर आक्रमण केलें तरी धार्मिक बाबतींत एकंदर पाश्चात्य समाज पौरस्त्य संस्कृतीचाच आश्रयी बनला.



चि. ४. पश्चिम एशियांतील नागदेवता.

८. बुद्धकालापासून चालुक्योदयाच्या कालापर्यंत हा धार्मिक दृष्टीनें सर्व जगाचा स्थित्यंतराचा काल होता असें म्हणण्यास अर्थात् हरकत नाहीं. या कालाच्या प्रारंभानंतर जगभर चोहोंकडे प्राचीन धर्मांचा नाश होत होता. या काळाच्या पूर्वीचे पश्चिमेकडील महत्त्वाचे धार्मिक संप्रदाय म्हटले म्हणजे मगधर्म, मिसर धर्म, आसुर धर्म, आणि यहुद्यांचा राष्ट्रधर्म हे होत. ग्रीक आणि रोमन लोकांचे राष्ट्रधर्म त्यांच्या देशांत चांगलेच विलसत होते आणि अरबस्तानांत पैगंबराच्या करणीमुळें नष्ट झालेल्या साबिअन धर्मांचें देखील अस्तित्व बुद्धकाळांत होतें. वरील राष्ट्रधर्मांपैकीं यहुद्यांचा धर्म काय तो पुढच्या काळीं शिल्लक राहिला पण तोहि मूळच्या राष्ट्रधर्मरूपांत शिल्लक राहिला नाहीं. हिंदुस्थानखेरीज पूर्वेकडील इतर सर्व देशांत दैवतमूलक धर्मसंप्रदाय नष्ट झाले. हा प्राचीनधर्मविनाशकाल चालुक्यपूर्व आहे. हिंदुस्थानांत सर्व देवतांचें एकीकरण झालें तें भिन्न देवतांत अन्योन्याश्रय उत्पन्न करणारा पौराणिक स्वरूपाच दैवतेतिहास तयार होऊन झालें. देवतांतील विरोध नष्ट झाला, आणि देवतांच्या पूजनायजनास देखील तत्त्वज्ञानाच्या प्रसारामुळें दुय्यमपणा आला.

बुद्धाच्या कालाचें क्रांतिकारकत्त्व केवळ एशिया पुरतेंच नाहीं तर यूरोपांत देखील तो काल त्यांच्या विशिष्ट संस्कृतीच्या उगमाच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. यूरोपामध्यें ग्रीस आणि रोम हीं राष्ट्रें सांस्कृतिक दृष्टीनें अधिक महत्त्वाचीं होतीं, आणि इतर यूरोप त्या मानानें असंस्कृत होता. ग्रीस आणि रोम या अधिक संस्कृत राष्ट्रांच्या संस्कृतिवैशिष्ट्यस्थापनांचा काल म्हटला म्हणजे त्यांच्या लोकसत्तात्मक राज्याचा काल होय. ग्रीकांच्या लोकसत्तात्मक राज्यास म्हणजे त्यांच्या वैशिष्ट्यास सुरवात खि. पू. ४८० मध्यें म्हणजे बुद्धनिर्वाणाच्या वर्षी झाली. रोमन लोकांमध्यें राजसत्ताक काल जाऊन लोकसत्ताक राज्यास सुरवात खि. पू. ५१० मध्यें म्हणजे बुद्धाच्या वृद्धपणींच झाली. म्हणजे सुसंस्कृत यूरोपाचा संस्कृतिविकासकाल देखील बुद्धोत्तर कालांतच पडतो.

९. अनेक देशांत साधर्म्य उत्पन्न व्हावयाचें तें इतरत्र व्यक्तिनिष्ठ विशिष्ट संप्रदायांच्या प्रसारामुळें निर्माण झालें तर तें हिंदुस्थानांत अनेक दैवतें आणि उपासनापद्धती यांच्या संहितीकरणामुळें झालें. हें संहितीकरण होतांना कर्मांचें एकत्रीकरण, वाङ्मयाचें एकत्रीकरण आणि दैवतांचें ऐक्य हीं उत्पन्न होत होतीं. हिंदुस्थानामध्यें चार किंवा त्याहूनहि अधिक यज्ञसंप्रदायांचें ऐक्य होऊन प्रथम चतुर्वेदपद्धति निर्माण झाली. पुढें त्या पद्धतीच्या एकंदर विधेस "श्रौत" हें समुच्चयात्मक नांव पडलें. दुसऱ्या अनेक कर्मांच्या पद्धती होत्या, त्यांचें आणि श्रौत पद्धतींचें मीलन झालें. त्या पद्धतींना स्मार्त आणि पौराण हीं नांवें प्राप्त झालीं आहेत. या सर्व गोष्टी होऊन हिंदुस्थान हें उच्छेदीकरणानें नव्हे तर एकत्रीकरणानें एका अत्यंत व्यापक संस्कृतीचें अधिष्ठान तयार झालें. ही क्रिया देखील याच कालांत झाली आहे. संकर्षणोपासना वैदिक दैवतांच्या उपासनेबरोबर होत होती ही गोष्ट आपणांस अत्यंत जुने ब्राह्मी शातवाहनकालीन लेख स्पष्ट शब्दांनीं सांगत आहेत. व्यापक संस्कृति तयार करण्याची क्रिया हिंदुस्थानांत धार्मिक विद्यांच्या एकीकरणानें केली तर इतरत्र व्यक्तिनिष्ठ धार्मिक संप्रदायांच्या प्रसारानें केली. त्या स्थित्यंतराचा आदिकाल वर वर्णिलाच आहे. शेवटीं चालुक्योदयकालीं काय झालें हें सांगितलेंच आहे. त्या स्थित्यंतरांतर्गत प्रगतीच्या मधल्या पायऱ्या थोडक्यांत वर्णिल्या पाहिजेत. त्याप्रमाणेंच या संस्कृती आपल्या भवितव्याच्या सीमेकडे जात असतां त्या संस्कृतींच्या पोटांत साम्राज्यांनीं आणि राष्ट्रांनीं काय क्रिया केल्या तें देखील स्पष्ट केलें पाहिजे.

१०. संस्कृतिस्वरूपनिर्णायक कामगिऱ्या साम्राज्यांनीं काय केल्या असा प्रश्न विचारला तर थोडक्यांत असें उत्तर देतां येईल कीं इराणी साम्राज्यानें मगधर्म पसरविला, झरथुष्ट्र-धर्म पसरविला असें म्हणतां येत नाहीं. मगधर्म पसरविला तो प्रचारकार्यास मदत करून पसरविला असें मात्र नाहीं. धर्माकरतां सक्ती इराणी सम्राट मुळींच करीत नव्हते. जिकडे ते जात तेथील देवतांस ते मानीत. क्झरसीझ हा ग्रीक देवतांना देखील मानतो हें ग्रीकांनीं सांगितलेंच आहे. ग्रीक साम्राज्यानें विशेष धर्मप्रचारकाचें कार्य मुळींच केलें नाहीं. त्यांनीं आपली नाट्यकला, वेश्यामंदिरें, आपलें मूर्तिकौशल्य हीं पसरवलीं. पण ग्रीक साम्राज्यच हा संप्रदाय स्वीकारला गेला. ईजिप्त देश हा ख्रिस्ती संप्रदायाचें एक महत्त्वाचें क्षेत्र बनला. इराणनें ख्रिस्तपूर्व ३४० च्या सुमारास ईजिप्त देश जिंकून घेतला, तथापि प्राचीन ईजिप्त नाहींसा झाला नाहीं. इराणच्या हातून आलेक्झांडरनें लवकरच म्हणजे आठ वर्षांनींच हिसकावून घेतला. त्यानंतर सुमारें तीनशें वर्षें ग्रीक राजे टालेमी यांच्या ताब्यांत इजिप्त राहिला आणि पुढें तो रोमन लोकांच्या ताब्यांत गेला. रोमन लोकांनीं ख्रिस्ती शतकाच्या चौथ्या शतकांत तेथें ख्रिस्ती संप्रदाय सुरू केला. तीनशें वर्षें ख्रिस्ती संप्रदायाचा तेथें पुरस्कार होत राहिला आणि पुढें ६१६ मध्यें मुसलमानांच्या ताब्यांत जाऊन तेथें




**चित्रांक ५. वैभवकालीन इराणी साम्राज्य.**

फार थोडा वेळ टिकलें. ग्रीकांचें ईजिप्तमधील साम्राज्य ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकापर्यंत टिकलें होतें. ग्रीकांचें एशियांतील साम्राज्य प्रथम मौर्यांनीं मर्यादित केलें आणि नंतर ग्रीक संस्कृतीनें युक्त अशा पार्थिवांचें ( पार्थियन् ) साम्राज्य उदयास येऊन ग्रीक साम्राज्य लयास गेलें. पण त्याचा देखील धार्मिक परिणाम फारसा झाला नाहीं. पुढें अस्सल इराणी साम्राज्य पुन्हा स्थापन झालें. पण त्याचें कार्यक्षेत्र इराणबाहेर फारसें वाढलें नाहीं. रोमन साम्राज्यांत जेव्हां ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार झाला तेव्हां मात्र धर्मसंप्रदाय-संवर्धनाच्या बाबतींत राजसत्तेची मदत घेण्यास सुरवात झाली, आणि ख्रिस्ताचा संप्रदाय आयर्लंडपासून मेसापोटोमेयापर्यंत पसरला. उत्तर आफ्रिकेंतील कांहीं भागांत देखील मुसलमानी धर्माचा प्रसार होऊं लागला. एवंच ईजिप्तची स्थिति आज चालुक्योदयकालीन आहे.

चालुक्योदयाच्याच कालांत महंमद पैगंबर उत्पन्न झाला. पैगंबराच्या सत्तेचा आणि संप्रदायाचा स्पर्श हिंदुस्थानाला दीडशें वर्षांनंतर झाला. या मधल्या काळांत हिंदुस्थानावर परकीयांच्या स्वाऱ्या झालेल्या दिसत नाहींत. हिंदुस्थानला हीं मधलीं दीडशें वर्षें जें स्वास्थ्य मिळालें त्याचें कारण कांहीं अंशीं पश्चिम एशियांत ही नवीन शक्ति उत्पन्न होऊन तिनें हिंदुस्थान ताब्यांत घेण्याचे इराणचे बेत जागच्याजागीं बसविले असेंच असावें. पश्चिम एशियांत या काळांत शक्तीचें स्थानांतर होण्यास सुरवात झाली होती. झरथुष्ट्राचा संप्रदाय बुद्धपूर्व आहे कीं बुद्धोत्तर

आहे ही गोष्ट जरी अनेकांच्या दृष्टीनें वादग्रस्त होती तरी आज त्यास बुद्धपूर्वकालीन करण्याकडे प्रवृत्ति नाहीं. झरथुष्ट्राचा आश्रयदाता विष्टप हा व दारियसचा बाप हिस्टास्पिस हे एकच होते असें मत झालें आहे.* तरी बुद्धापासून फार अर्वाचीन काळाकडे कोणी झरथुष्ट्रास आणीत नाहीं, असें मात्र नाहीं. †† चालुक्योदयाच्या कालांत बुद्धाचें हिंदुस्थानांतील महत्त्व आणि त्याप्रमाणेंच झरथुष्ट्राचें इराणांतील महत्त्व संपुष्टांत आलें होतें. इ. स. ६३० मध्यें इराणी सस्सन घराणें नष्ट झालें आणि इसलामी सत्ता इराणांत स्थापित झाली आणि प्राचीन झरथुष्ट्रीय धर्माच्या अस्तित्त्वाचें महत्त्वाचें स्थान हिंदुस्थानच झालें. हिंदुस्थानांत बौद्ध संप्रदायाचा जरी लोप होत आला होता तरी इ. स. ५३८ मध्यें बौद्ध धर्म जपानपर्यंत जाऊन पोंचला आणि चालुक्योदयाच्या कालांत तिबेटांत देखील तो पूर्णपणें स्थित झाला होता. म्हणजे हिंदुधर्म बौद्धधर्म आणि पार्शीधर्म यांची भौगोलिक स्थिति जवळ जवळ आजच्याप्रमाणेंच होती. यूरोपचा धार्मिक इतिहास पाहतां असें दिसून येईल कीं, बुद्धकाल आणि चालुक्योदयकाल हे दोन्ही काल यूरोपीयांतहि महत्वाचे ठरतात. त्यांच्या संस्कृतिवैशिष्ट्यास सुरवात बुद्धकाळीं झाली तर वैशिष्ट्याची पूर्णता चालुक्योदय काळीं झाली. इ. स. ३३७ सालीं रोमन बादशाहा स्वतः ख्रिस्ती झाला, आणि ५ व्या शतकांत रोमच्या बिशपला रोमन साम्राज्यांतील सर्व बिशपांत प्रामुख्य मिळालें आणि रोमन कॅथलिक चर्च बलवान झालें. आणि ख्रिस्ती संप्रदायाची वाढ ग्रेटब्रिटनपर्यंत झाली होती. आणि ख्रिस्ती संप्रदायाचे जे रोमन आणि ग्रीक असे दोन मुख्य भेद ते स्थापन झाले होते. इ. स. ४४५ च्या सुमारास आयर्लंडच्या राजपुत्रानें ख्रिस्तीधर्म स्वीकारून आपल्या देशांत प्रसृत केला. इ. स. ५९७ च्या सुमारास इंग्लंड देखील ख्रिस्ती होण्यास चांगलीच सुरवात झाली होती म्हणजे ख्रिस्ती संप्रदायानें दुसऱ्या कोणत्याहि संप्रदायाचें बस्तान बसणार नाहीं इतकें यूरोपचें आक्रमण चालुक्योदयकाळीं केलें होतें. येणेंप्रमाणें चालुक्योदयकालीन जगाच्या अवलोकनाचा अर्थ असा निघतो कीं, जगाचें आजचें धार्मिक स्वरूप निश्चित झालें, व चालुक्योदयानंतर झालेले धार्मिक फेरफार थोडे आहेत.



चि. ६. पर्सोपोलीस येथील क्झरसीझच्या जिन्यावरील चित्र.

११. बुद्धापासून चालुक्योदय कालाच्या अकरा शतकांत भारतीय संस्कृतीची पूर्णपणें वाढ झाली आणि एकंदर हिंदुस्थानास सांस्कृतिक दृष्टीनें एकस्वरूपता आली व ती एकस्वरूपता जवळ जवळ कायम टिकली. या कालांतील प्रगतीची जर आपण रोमन आणि ग्रीक संस्कृतींच्या इतिहासाशीं तुलना केली तर आपणांस कित्येक महत्त्वाचीं सादृश्यें आणि विसादृश्यें दिसून येतात. रोमन साम्राज्याच्या विस्तारांत दोन संस्कृति समाविष्ट झाल्या. एक संस्कृति म्हटली म्हणजे ग्रीक आणि दुसरी म्हटली म्हणजे ख्रिस्ती संप्रदाय. साम्राज्यासारखा एक मोठा प्रदेश एकसूत्री झाला म्हणजे त्या साम्राज्यांत एकरूपतेचें संवर्धन होतें. यूरोपांत एकरूपतेचें जें संवर्धन झालें त्याला रोमचा साम्राज्यविस्तार आणि रोमन बादशहांनीं केलेला ख्रिस्ती धर्मस्वीकार हीं कारणें झालीं यांत शंका नाहीं. तथापि हिंदुस्थानांत जी समाजसरूपता निर्माण झाली तिचें कारण राजसत्ता हें खास नव्हतें. राजे लोकांना धार्मिक भावना नव्हत्या असें नाहीं; त्यांना धार्मिक भावना होत्याच. तथापि त्यांचा राजकारणावर फारसा परिणाम झाला होता

* *Vishtaspa*. by Professor Ernst Herzfeld Modi Memorial Volume, Bombay 1930.

†† Trois conferances sur les Gatha de E'Avesta Paris 1925. या पुस्तकांत त्याचा कर्ता A. Meillet हा ख्रिस्तपूर्व दीडशेंपासून दोनशें इतक्या अर्वाचीन काळापर्यंत झरथुष्ट्रास आणीत आहे. प्रो. हर्झफेल्ड यानीं उत्तर काळीं मांडलेल्या प्रश्नाचा प्रस्तुत लेखकानें थोडक्यांत पूर्वीच विचार केला आहे. तथापि त्याची मांडणी समाधानकारक नाहीं.

असें दिसत नाहीं. याचें कारण ब्राह्मणांच्या प्रयत्नानें भिन्न लोकांच्या वैशिष्ट्यांचें एकत्रीकरण हेंच बुद्धिवानाचें धार्मिक कर्तव्य म्हणून ठरलें गेलें. तेथें विशिष्ट संप्रदायप्रवर्तनासाठीं शासनशक्ति वापरणें हें अयोग्यच झालें असतें. "आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवा सभासदः" या वेदोक्त वृत्तीचा अगोदरच प्रचार झाला असल्यामुळें सर्व प्रकारच्या धर्मसंप्रदायांना सारखें वागवावें हेंच धोरण अशोकासारख्या बौद्ध संप्रदायाच्या प्रवर्तकांस देखील स्वीकारावें लागलें होतें. धार्मिक छळ ही गोष्ट हिंदुस्थानांत जवळ जवळ अज्ञात होती, तथापि ज्या गोष्टींनीं देश्यसंस्कृतीचें एकीकरण होत होतें ती गोष्ट म्हटली म्हणजे ब्राह्मणपुरस्कर्तृत्त्वाखालीं होत असलेला विद्याप्रसार होय. या विद्याप्रसाराबरोबर आणि बहुतकरून त्यामुळेंच संस्कृत भाषेचा देखील प्रसार झाला, आणि बौद्धांना देखील आपल्या वाङ्मयाचें संस्कृत रूपांतर करणें भाग पडलें.



चि. ७. सस्सन घराण्यांतील पहिला शापूर इराणचा सम्राट.

पैतृक धर्मांच्या आधारावर वैयक्तिक स्वरूपाचे संप्रदाय स्थापन झाले, तथापि हिंदुस्थानांत त्या वैयक्तिक संप्रदायाचे खेळ पुरे होऊन समाज आपल्या मूळच्या संस्कृतीच्या विकासास लागला तर इराणांत तेवढ्या काळांत त्या वैयक्तिक संप्रदायाचा आणि त्यास मूलभूत असलेल्या मगधर्माचा देखील संपूर्ण लोप झाला, याचें कांहीं अंशीं कारण ज्या अनेक धार्मिक आणि वाङ्मयविषयक क्रिया होऊन भारतीय दृढता आली होती तसल्या क्रिया इराणांत झाल्या नाहींत हें एक असावें. त्याप्रमाणेंच इराण अरबस्थानच्या अगदीं निकट असल्यामुळें त्याच्या प्रथम भक्ष्यस्थानीं तें पडलें हें दुसरें एक कारण असावें. हिंदुस्थानांत देखील मगधर्माचें प्राबल्य एकाकालीं स्थापन होऊं लागलें होतें तथापि तें ब्राह्मणांच्या व्यापक संस्कृति निर्माण करण्याच्या प्रयत्नामुळें जिरून गेलें असावें व मग ग्रंथदेखील नष्ट होण्यास हिंदु राजांचे प्रयत्न कारण झाले असतील.



चि. ८. झरथुष्ट्र संप्रदायी प्रार्थना करतांना.

**आधारग्रंथः**—प्रस्तुत लेखांत सर्व जगाच्या एकंदर चळवळींचें स्थूलपणें पर्यालोचन आहे, त्यामुळें प्रत्येक देशाच्या संप्रदायाच्या आणि संस्कृतीच्या इतिहासावरील ग्रंथ हे या पुस्तकाचे आधार वाङ्मय होत. विशेष विवेचन पुढील प्रकरणांत येणार असल्यामुळें या प्रकरणांत आलेल्या शातवाहन, मिसर संस्कृति, असुर आणि इराणी संस्कृति, इत्यादि विषयांवरील वाङ्मयाचें वर्णन येथें देत नाहीं.

प्रकरण २ रें.

# भारतीय संस्कृतिविकासाचें अवलोकन.

१२. बुद्धकाळापासून चालुक्योदय काळापर्यंत हिंदुस्थानाचा आणि महाराष्ट्राचा इतिहास समजून घेण्याची पूर्वतयारी म्हणजे त्या काळांतील बाहेरच्या जगाचा इतिहास समजून घेणें ही झालीच आहे. आतां या बाराशें वर्षांत झालेल्या भारतांतील स्थित्यंतराचा स्थूल आढावा घेऊं.

१३. हिंदुस्थानाबाहेरील जगाचा आढावा येथें सहेतुक घेतला आहे. हिंदस्थानाच्या इतिहासावर बाह्य जगाचा परिणाम अत्यंत प्राचीनकालापासून एकसारखा होत आहे आणि तसाच हिंदुस्थानचा बाह्य जगावर परिणाम झाला आहे. विशिष्ट ऐतिहासिक घडामोडींचें आकलन करण्यास केवल स्थानिक अवलोकन करून चालेल; तथापि दीर्घकालीन वृत्तविकासाची कारणमीमांसा आपण करूं लागलों म्हणजे आपणांस आपलें अवलोकनक्षेत्रहि विस्तृत केलें पाहिजे. भारतांतील राजकीय आणि धार्मिक त्याचप्रमाणें कलाविषयक घडामोडींचा जागतिक इतिहासाशीं संबंध इतका आहे कीं, तो सांगितल्याशिवाय भारतीय घडामोडींचें ऐतिहासिक स्पष्टीकरण होणार नाहीं, ही गोष्ट पुढें वारंवार दृष्टीस पडणार आहे. चेंडूच्या माळेंतील एका टोंकाच्या चेंडूस ठोका मारला म्हणजे तो धक्का शेजारच्या चेंडूस लागतो आणि त्यामार्फत त्याच्या पलीकडच्या चेंडूस लागतो हा नियम राष्ट्रां हासांत देखील कार्य करीत आहे. फरक एवढाच आहे कीं वरील नियमाशिवाय दुसरेहि नियम कार्य करीत आहेत. प्रत्येक राज्य चेंडूप्रमाणें निर्जीव नसून स्वेच्छेनें चलनवलन करण्यास, दुसऱ्यास धक्का देण्यास, आलेल्या धक्क्याचा प्रतिकार करण्यास किंवा धक्का देणाऱ्यावरच



**चित्र ९. शातवाहन आणि क्षत्रप यांचें एक संग्रामस्थान; जुन्नरजवळ शिवनेरी टेकडीवरील एक लेण्यांचा समुदाय. अगदीं वरची पडकी इमारत शिवाजीचें जन्मस्थान होय.**

उलटण्यास समर्थ असूं शकतें. आघात करणारा चेंडू पुढील चेंडूचें स्थान न घेतां त्यास किंवा पुढील अनेकांस बाजूला सारून स्वतः पुढें जातो तसाहि प्रकार होतो. एखादा मोठा जेता झाला म्हणजे तो आपली विजयसेना तयार करतो. तिचे विजय फार दूरवर जातात. एवंच या बाराशें वर्षांच्या दीर्घ कालांत महाराष्ट्राचा अगर हिंदुस्थानाचा इतिहास लिहितांना बाहेरच्या घडामोडींकडे एकसारखें लक्ष ठेवलें पाहिजे.

परदेशगमन निश्चित होतें, त्याप्रमाणें धार्मिक व्यवहाराचा एकंदर आयुष्यक्रमावर फारच परिणाम होतो. पूज्य विषय कोणते, त्यांचें संरक्षण किंवा अलंकरण कसें करावें, उत्सवदिन कोणते पाळावे, व त्या उत्सवदिनाच्या प्रसंगीं खर्च कोणत्या प्रकारचा करावा हें देखील धार्मिक चळवळींच्यामुळें ठरत असतें. त्यामुळें सर्व आयुष्यक्रमावर ज्या चळवळीचा परिणाम होतो त्या चळवळींचा जितका प्रारंभापासून इतिहास मिळवावा तितका चांगला. परदेशीं जो व्यापार चालतो



**चित्र १०. जुन्नर येथील मानमोडी लेण्यांतील अंबिका संघांतील चैत्य लेणें.**

१४. शातवाहनकालाच्या प्रारंभींच्या भागांतच महाराष्ट्रांत बुद्धसंप्रदाय स्थापन झालेला दिसत आहे त्याअर्थी शातवाहन कालाची सामाजिक स्थिति जाणावयाची असल्यास बुद्धाच्या कालापासूनच सुरवात करावी लागेल. हें मागें सांगितलेंच आहे. लोकांचे एकमेकांशीं आर्थिक व्यवहार सामाजिक तसे राजकीय कारणांनीं नियमित होत असतात. आणि यामुळें सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनें देखील धार्मिक आणि राजकीय स्थित्यंतरास प्राधान्य द्यावें लागतें. परराष्ट्रीय व्यापाराविषयीं राजाची ज्याप्रमाणें वृत्ती असेल तिच्या अनुरूप व्यापारी लोकांचें आगमन आणि त्याचा धार्मिक मतांशीं संबंध असतोच. उदाहरणार्थ साबुदाणा हा उपासाला चालतो त्यामुळें साबुदाण्याच्या व्यापारास महाराष्ट्रांत आजहि महत्त्व आहे. यासाठीं शातवाहनकालीन समाजस्वरूपनिर्णायक गोष्टी समजावून घ्यावयाच्या झाल्यास बौद्ध संप्रदायाच्या प्रसारास महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. आणि सामाजिक इतिहासास बुद्धकालापासून सुरवात केली पाहिजे. महाराष्ट्रांतील बरीचशी कला, दानप्रवृत्ति, सामाजिक कर्तव्यासंबंधानें बुद्धि या सर्व गोष्टी बौद्ध संप्रदायाच्या अनुषंगानेंच वृद्धिंगत झाल्या. शातवाहनांच्या कालाचा अगदीं प्रारंभकाल म्हणजे सिमुक शातवाह-

नाचा काल जरी आपण घेतला तरी देखील त्याच्या पूर्वीच बौद्ध संप्रदायाची वाङ्मयविषयक प्रगति पुष्कळच झालेली आहे. अशोकाच्या कालांत मौर्य राज्य कोंकणांत आलें आणि त्याच कालांत सिंहलद्वीपांत बौद्ध संप्रदायानें प्रवेश केला. बौद्ध संप्रदायाच्या प्रसारासाठीं अशोकाची खटपट भोजक व पेतनिक आणि राष्ट्रिक यांच्या प्रदेशांत धार्मिक इतिहासाकडे आणि त्यांतल्या त्यांत बौद्ध संप्रदायाच्या विस्तारसंकोचाकडे लक्ष देणें आपणांस अवश्य आहे. बौद्ध राज्य फार पिढ्या टिकलें नाहीं याच्या योगानें बुद्धसंप्रदायास ताठरपणा उत्पन्न होण्यास अवकाश सांपडला नाहीं, आणि यूरोपांत ज्याप्रमाणें धर्मच्छल लांबलचक इतिहासाचा विषय झाला तसा तो हिंदुस्थानांत झाला नाहीं.



चित्र ११. जुन्नर येथील मानमोडी लेणीं; भूतलिंग समूह. चंद्र नामक यवनाचा लेख यांत आहे.

१५. या दीर्घ कालांत पश्चिमेचा परिणाम महाराष्ट्रावर कांहींच झाला नसेल असें समजणें योग्य होणार नाहीं. जेव्हां दोन लोक एकत्र येतात तेव्हां एकमेकांच्या संस्कृतीचा एकमेकांवर परिणाम घडतोच. तो तसा घडत नसला तर परस्परव्यवहार मुळींच शक्य होणार नाहीं. परदेशाशीं व्यापार हें सामाजिक आयुष्यक्रमाचें स्थित्यंतर करण्यास बरेंच कारण होत असतें. आणि ज्या लोकांचा एकमेकांशीं व्यापार असतो त्या लोकांचा एकमेकांवर परिणाम झालाच पाहिजे. ज्याप्रमाणें आपल्या देशांतील माल परदेशीं गेला तर त्याच्या बदला परदेशाचा कांहीं तरी माल हा आपल्याकडे आलाच पाहिजे, त्याप्रमाणेंच सामाजिक व्यवहाराचें आहे. परदेशाचा परिणाम अधिक होण्यास माणसांचा व्यापार हें एक मोठें कारण प्राचीनकाळीं होतें. तें कारण अस्तित्वांत असतां कार्य झालें नाहीं असेंकसें समजावें ? प्राचीनकालीं स्त्रियांचा व्यापार चालत होता. इकडील स्त्रिया परदेशीं विकल्या जात होत्या त्याप्रमाणें परदेशाच्या स्त्रिया इकडे विकल्या

सत्कर्मप्रसाराच्या रूपानें चालली होती याबद्दल पुरावा आपणांस अशोकलेखांतच आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां ख्रिस्तपूर्व ५०० वर्षें या कालापासून ख्रिस्तोत्तर पांचसहाशें वर्षें या कालापर्यंत एक हजार वर्षें महाराष्ट्रांतील

जात होत्या. या स्त्रियांच्या व्यापाराचा धार्मिक भावनांवर व समजुतीवर किती परिणाम होत होता ही गोष्ट देखील विचार करण्याजोगी आहे. आणि तीसंबंधानें कांहीं चर्चा पुढें येईलच. महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाच्या अव-

गमनासाठीं पश्चिम किनाऱ्याशीं जगाचें जें दळणवळण होतें त्याचा व त्याजबरोबर नौकानयनाचा आणि चांचेगिरीचा इतिहास देखील जवळ करावा लागतो.

१६. पश्चिम एशियाचा राजकीय इतिहास हिंदुस्थानच्या इतिहासाशीं संबद्ध आहे आणि ग्रीक व रोमन साम्राज्यांचा इतिहास पश्चिम एशियाशीं संबद्ध आहे. पश्चिम एशिया किंवा मध्य एशियांत जी शक्ति उत्पन्न होई ती शक्ति पूर्व यूरोपास तशीच हिंदुस्थानास जाणवे, हें शक, हूण आणि इस्लाम यांच्या इतिहासावरून दिसून येतें. बुद्धोत्तर सहस्रकांत हिंदुस्थानांत दोन तीन घराणीं होतीं. तीं म्हटलीं म्हणजे मौर्य, शातवाहन गुप्त, आणि वाकाटक होत, तर याच झालें नाहीं. ग्रीस देशांत जेव्हां अलेक्झांडर उत्पन्न झाला तेव्हां तो इराणी साम्राज्य पादाक्रांत करून गंगेच्या थडीपर्यंत येऊन पोहोंचला. ग्रीकांस जिंकणाऱ्या रोमन साम्राज्याची हिंदुस्थानाशीं सत्तावर्धनार्थ झटापट झालेली नाहीं; तथापि हिंदुस्थानचा व्यापार रोमपर्यंत होता आणि हिंदुस्थानच्या राजांना रोमशीं राजकारण देखील करावें लागत होतें. कारण प्रथम ग्रीक सत्तेच्या छत्राखालीं व नंतर स्वतंत्र पृथूंचें व इराणी साम्राज्य स्थापन झालें तेव्हां त्याला एका बाजूनें रोम तर दुसऱ्या बाजूनें हिंदुस्थान हे दोन शेजारी होते. आणि बराच कालपर्यंत इराणकडून हिंदुस्थानाला उपद्रव झाला नाहीं याचें कारण रोमची वाढती सत्ता हेंच



**चित्र १२. देल्फायचें देऊळ ग्रीक लोकांचें एक प्रसिद्ध संमेलनस्थान.**

कालांतील हिंदुस्थानाबाहेरच्या मोठ्या स्पर्धमान सत्ता म्हटल्या म्हणजे रोमन साम्राज्य, ग्रीक संस्थानसंघ, इराणी साम्राज्य आणि शकराज्य या होत. या सर्व सत्तांचा हिंदुस्थानशीं संबंध आला आहे आणि हिंदुस्थानच्या सम्राटास त्या विविध सत्तांशीं झगडावें लागलें आहे. इराणी साम्राज्य हिंदुस्थान व ग्रीस या दोन बाजूंनीं सत्ता वाढवूं पहात होतें. आणि दरायसनें हिंदुस्थानचा कांहीं भाग आपल्या ताब्यांत ठेवलाहि होता. या काळांतील इराणी आणि हिंदु यांच्या सामाजिक संबंधाचा इतिहास शोधण्याकडे संशोधकाचें लक्ष लागूं लागलें आहे.* तथापि संशोधन सुफल असलें पाहिजे. इराणास तंबी देण्यांत हिंदुस्थानानें रोमशीं सहकारिता केली काय वगैरे प्रश्न साहित्याच्या अभावीं सोडवितां येण्याजोगे नाहींत. तथापि त्या प्रकारची शक्यता वाटण्यास कारक अशा गोष्टी पुष्कळच आहेत.

१७. बुद्धापासून चालुक्यांच्या कालापर्यंत हिंदुस्थानांत बौद्धसंप्रदायाचा उगम, भरभराट आणि लय हीं सर्व पाहिलीं. त्याप्रमाणें त्याच कालामध्यें इराणानें झरथुश्ट्र धर्माचा विकास आणि विनाश हीं पाहिलीं. या कालामध्यें हिंदुस्थानांत त्याप्रमाणेंच इराणांत ग्रीकांच्या स्वारीचे परिणाम झाले. इराण ग्रीकांनीं व्यापला तर हिंदुस्थान व्यापला गेला नाहीं एवढेंच. तथापि इराणवर ग्रीक संस्कृतीचें आवरण पक्कें बसलें तरी त्यामुळें इराणी साम्राज्यांतील जातींस भारतजेतृत्व उत्पन्न झालें, आणि ग्रीक आणि इराणी या दोहोंच्या मिश्रणानें झालेली

* Iranian influence on Indian Culture by K. F. Sitaraman M. A. Journal Cama Ori. Institute Bombay 1922.

पृथुयवन ज्ञाति हिंदुस्थानावर राज्यकर्ती झाली. पृथुयवनांच्या संस्कृतीला दार्ढ्य नव्हतें त्यामुळें त्याची स्वतंत्र संस्कृति हिंदुस्थानावर परिणाम करती झाली नाहीं, तर तीं परकीय कुळें भारतीय संस्कृतीचींच अंशभाक बनलीं. सत्याश्रय पुलकेशीच्या सुमारास इराणी प्राचीन धर्माचें महत्त्व अजीबाद नष्ट झालें आणि इराण हें महंमदीय बनलें. भारताची आणि इराणची या हजार वर्षांची तुलना करतां असें म्हणतां येईल कीं या कालांत या दोन्ही प्रदेशांत उत्पन्न झालेले संप्रदायधर्म त्या जागेवर टिकले नाहींत. पण त्याचीं कारणें भिन्न होतीं. इराणांतील झरथुष्ट्रधर्म ग्रीक सत्तेच्या काळांत दुर्बल झाला आणि बौद्ध संप्रदायास ब्राह्मणी संस्कृतीच्या व सत्तेच्या उदयाबरोबर हिंदुस्थानांत दौर्बल्य येण्यास प्रारंभ झाला.

१८. शातवाहनांच्या सत्तेचा काल अनेक शतकें आहे असें विधान मागें केलें आहेच. आज त्या सत्तेचा इतिहास सातत्यानें देतां येणार नाहीं, तथापि त्याच्या कालाविषयीं माहिती खरीखोटी पुष्कळच आहे, आणि तिच्या सत्यतेचा आज जरी निर्णय करितां आला नाहीं तरी प्रश्न अनेक उपस्थित करण्याइतकें आज साहित्य जमा झालें आहे ही गोष्ट देखील उपेक्षणीय नाहीं. ख्रिस्तपूर्व २५० च्या सुमारास या कुलाचें अस्तित्व दिसलें तरी त्यास शककर्तृत्व पुष्कळ उशीरानें आलें आहे. शालिवाहन यांनीं राज्य कोठें कोठें केलें, शातवाहनांच्या नांवावर शक स्थापन झाला आहे, पण तो त्यांनींच स्थापन केला, कीं दुसऱ्यांचा शक चुकून यांच्या खात्यावर पडला, शातवाहन बौद्ध कितपत होते, जैन कितपत होते, आणि ब्राह्मणानुयायी कितपत होते, यांच्यामध्यें मातृसत्ताक कुटुंबपद्धति व मातृकन्यापरंपरा हीं होतीं काय, असल्यास किती कालपर्यंत होतीं, हे ब्राह्मण होते कीं हे शूद्र होते, यांच्या घराण्यास आंध्रभृत्य हें नांव केव्हां पडलें व कां पडलें, यांना "आंध्र" असें तरी नांव कां पडलें? यांनीं यज्ञसंस्थेचा पुरस्कार कोणत्या कालांत केला व कोणत्या कालांत तो त्यांनीं सोडून दिला, संस्कृत वाङ्मयांत यांचें नांव अल्प कां असावें, आणि जैन वाङ्मयांत त्यांच्या कालासंबंधानें उल्लेख विपुल कां असावेत, त्यांचा आणि विक्रमादित्यांचा संबंध काय होता, विक्रमादित्य आणि शालिवाहन हे एका कुळांतील होते कीं शत्रु होते, त्यांचा पंजाबशीं संबंध काय होता, पंजाबांत पतियाळा संस्थानांत कलहत मुक्कामीं सालवाहनाचीं चार देवळें आहेत, अलाहाबाद जवळ झालेल्या खणतींत त्यांच्या अधिकाऱ्यांचे शिक्के सांपडले आहेत. या गोष्टी कोणत्या कालाच्या व इतिहासाच्या दर्शक आहेत, पंजाबांतील प्राचीन कालचे लेखांवर शक वर्ष दिलें आहे, त्यावरून काय समजावयाचें, हे शकांचे जेते असून राजे झाले होते काय, यांस शकराज देखील कां म्हटलें आहे, यांचा सिंधू नदापलीकडे अंमल होता काय, असल्यास किती वर्षें किंवा पिढ्या होता, यांचा पैठण, नाना घाट, कोल्हापूर, इत्यादि ठिकाणांशीं काय संबंध होता, यवतमाळ जिल्ह्यांतील आंध जात हिचा प्राचीन "आंध्रां"शीं व शातवाहनांशीं काय संबंध आहे, शातवाहनाचा काश्मीरच्या राजघराण्याशीं काय संबंध आहे? कोकणांतील कुंभार आपणांस शातवाहन-वंशीय म्हणवून कांहीं अंशी उपाध्येपणाहि करतात, तर या गोष्टींचा शातवाहनांनीं ब्राम्हण्यावरील सांगितलेल्या हक्काशीं आणि तसाच लोककथेंत त्यांस मिळालेल्या कुलालत्त्वाशीं काय संबंध आहे, शातवाहनसेवक असलेल्या शूद्रक नांवाच्या एका शूर ब्राह्मणाच्या कथाचरित्रांत कितपत तथ्य आहे, त्यांचा प्राकृत भाषेचा अभिमान त्यांच्या असंस्कृतत्त्वाचा दर्शक कितपत होता, वगैरे प्रश्नांवर कांहीं तरी विवेचन करणें भागच आहे. खास राजकारणाच्या क्षेत्रांत उत्पन्न होणारे प्रश्न म्हटले म्हणजे नवीन सार्वभौमाचे जुन्या राजांशीं आणि मांडलिकांशीं संबंध आणि त्या राजघराण्याचे इतर राजांशीं संबंध, या गोष्टींवर पूर्ण प्रकाश आज जरी पडला नाहीं तरी अनुमानशक्तीला थोडासा ताण दिला तर उल्लेखिलेल्या प्रश्नावर आणि शातवाहनांच्या साम्राज्याचें अखिल भारतीयत्व यांवर देखील थोडींशीं टिपणें लिहितां येतात. हाल सातवाहन यानें संग्रह केलेल्या सप्तशतीच्या ७०० गाथा तत्कालीन सामाजिक स्थितीविषयीं काय अनुमानें दर्शवितात. शातवाहनकालीन म्हणून मान्य झालेले ब्राह्मी लिपींतील सुमारें ४०० अंकित लेख महाराष्ट्रांत आहेत व शातवाहनाशीं संबद्ध अनेक अंकित लेख बाहेर आहेत; त्यांपासून शातवाहनकालाविषयीं काय ऐतिहासिक सत्य हातीं लागतें, या विषयावर आजच्या कोणाहि इतिहासलेखकाला बरेंच लिखाण करावें लागणार यांत शंका नाहीं.

शातवाहनांचे राजकीय संबंध म्हणजे अरिमित्रता ज्या राजघराण्यांशीं आलीं आहेत, त्यांतील मोठालीं घराणीं म्हटलीं म्हणजे मौर्य, पांड्य, चेर, विदर्भ, क्षत्रप, खारवेल, काण्व, शक, मुरुंड इत्यादि होत. शातवाहनांच्या मांडलिकांतून पुढें भारशिवांचें घराणें त्याचप्रमाणें गुप्तांचें घराणें निघालें असणें शक्य आहे. या सर्व गोष्टींचा इतिहास लिहितां लिहितां सबंध भारताचाच इतिहास लिहिणें प्राप्त होतें. एवंच केवळ भारताचा इतिहास आणि महाराष्ट्राचा इतिहास यांत फरक

एवढाच उरतो कीं इतर भारतभागांपेक्षां महाराष्ट्राची माहिती महाराष्ट्राच्या इतिहासांत अधिक द्यावी लागेल. व्यापक-क्षेत्राच्या अवलोकनाशिवाय म्हणजे भारताच्या किंबहुना जगाच्या इतिहासांतील मुख्य गोष्टी लक्षांत घेतल्याशिवाय महाराष्ट्राच्या इतिहासाचें स्पष्टीकरणच होणार नाहीं.

१९. बुद्धजन्मकाल हा जगाच्या अर्वाचिनीकरणाचा आरंभ-बिंदु धरला तर चालुक्योदयकाल हा ती क्रिया पूर्ण झाल्याचा बिंदु धरतां येईल. बुद्धपूर्व कालीं जग जातिदैवतें, स्थानिक दैवतें आणि विशिष्ट शक्तिदैवतें यांच्या उपासनांनीं भरलें होतें, तें आतां व्यक्तिसंस्थापित विचारयुक्त संप्रदायांनीं व्यापिलें गेलें आहे. चालुक्यांच्या उदयकालाच्या स्थितीचें स्थूलपणानें जरी पर्यालोचन केलें तरी त्या काळांत जग अर्वाचीनत्त्व कसें पावलें होतें हें स्पष्ट होतें. आज पूर्व एशिया बौद्ध आहे, पश्चिम एशिया मुसलमान आहे. इराणी मगधर्म जवळ जवळ नष्ट झाला आहे. त्यांतील झरथुष्ट्र-संप्रदाय मात्र उरला आहे आणि त्याचें मुख्य निवासस्थान हिंदुस्थानचा पश्चिम किनारा झालें आहे. आयर्लंडपासून ग्रीसपर्यंत सर्व प्रदेश ख्रिस्ती आहे. हिंदुस्थानाबाहेर जातिधर्म, कुलधर्म आणि राष्ट्रधर्म हे नष्ट होऊन विशिष्ट संस्थापकनिर्मित संप्रदायधर्मांचेंच प्राबल्य चोहोंकडे आहे. यहूद्यांचा धर्म जातिधर्म राहिला, पण त्यांत अनेक दैवतें नष्ट झालीं आणि प्रवक्त्यांच्या उपदेशास महत्त्व आलें. धार्मिक अगर सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीनें चालुक्योदय कालानंतर झालेले मुख्य फेरफार तीन आहेत. ते म्हटले म्हणजे अमेरिका, आफ्रिका व आस्ट्रेलेशिया. या प्रदेशांचा शोध आणि त्या प्रदेशांची ख्रिस्ती यूरोपीयांकडून वसाहत; हिंदुस्थानांत मुसलमानी संप्रदायांची वाढ, आणि उत्तर यूरोपांत ख्रैस्त्याचा प्रसार, या तीन गोष्टी वगळल्या तर आजचें जग चालुक्योदयकालीन आहे, आणि त्यास तें स्वरूप यावयास प्रारंभ बुद्धकाळीं झाला. हिंदुस्थानांत देखील जातिदैवतें वगैरे अगदीं नष्ट झालीं नसलीं तरी दुय्यम झालीं. पण तीं दोन कारणांनीं झालीं. एक गोष्ट म्हटली म्हणजे अनेक देवतांना आहुति आणि हविर्भाग देणारा यज्ञधर्म नाहींसा होऊन त्यांच्या जागीं आरण्यकीय धर्म आला, आणि त्याबरोबर सर्वव्यापी परमेश्वराची कल्पना अधिक लोकप्रिय झाली. दुसरें कारण म्हटलें म्हणजे पौराणिक वीरांचा उदय होय. त्यांच्या पूज्यतास्थापनामुळें जुन्या जातिदेवतांचें पूजन मागें पडलें.

केवळ महाराष्ट्रविकासापुरता विचार करतां प्रस्तुत पर्वकाळाचें वैशिष्ट्य पुढीलप्रमाणें सांगतां येईल. या काळांत महाराष्ट्राचें संघटन झालें, आणि त्यामुळें या काळास "महाराष्ट्रसंघटना काळ" म्हणतां येईल. वेदांत आलेला शब्द दक्षिणापथ हा बौद्ध कालांत देखील वापरला जात होता असें सुत्तनिपातांत आलेल्या एका उल्लेखा ( ९७६ ) वरून स्पष्ट होतें. या दक्षिणापथांत पतिट्ठान येत होतें, तथापि दंडकारण्य किंवा दक्षिणापथ यांत विदर्भ येत नव्हता व अपरांत येत नसावा. कोंकण, देश आणि वऱ्हाड या तिन्ही नांवाचा उपयोग अजून चालू आहे आणि महाराष्ट्र हा शब्द सर्वांना लावण्याचा आग्रह धरण्याची आवश्यकता अजून ज्या अर्थी महाराष्ट्राच्या अभिमान्यांना वाटते त्या अर्थी महाराष्ट्राचें ऐक्य अजून सर्वमान्य झालें नाहीं हें उघड आहे. चालुक्योदयकालांत "महाराष्ट्र" शब्द प्रचलित दिसतो आणि तीन महाराष्ट्रकें यांचा उल्लेख चालुक्य लेखांत आला आहे, तर "महाराष्ट्र" कल्पना या कालांत दक्षिणपथापासून विकास पावत होती हें स्पष्ट आहे. "महाराष्ट्र" ही कल्पना विकास पावत होती असें म्हणतांना त्या विधानांत आपण कांहीं भाषाविषयक सत्य सूचित करीत आहों. राष्ट्र हा शब्द भाषाविशिष्ट समुच्चयास लावला जात नाहीं. तरी लोकांची सामाजिक कल्पना म्हणजे "एकलोककल्पना" भाषानुसारी आहे हें खचित. चालुक्योदयकालांत देशभाषांना प्राधान्य देण्याचा काल येऊं लागला होता व कानडीला देखील महत्त्व येऊं लागलें होतें.

२०. धार्मिक स्थित्यंतरें अगर विकास होत असतां त्यांच्या अनुषंगानें दुसरे विकास होतच असतात. बाराशें वर्षांत धार्मिक बाबतींत झालेलें स्थित्यंतर कांहीं प्रवृत्ति दाखवून नियमांच्या रूपानें देतां आलें. पण एकंदर प्रगतीच्या आणखी दुसऱ्या कोणत्या तरी बाबतींत कांहीं जगद्विकासविषयक किंवा संस्कृतिविकासविषयक सत्य सांगतां येईल काय हेंहि पाहिलें पाहिजे. राजकीय व धार्मिक चळवळीबरोबर व स्थित्यंतरांबरोबर कित्येक भाषाविषयक चळवळी व पालट देखील स्वाभाविकपणें होतात. यासाठीं एकंदर कालस्वरूप लक्षांत येण्यास आपणांस भाषाविषयक संक्रमणें पाहिलीं पाहिजेत, आणि त्यांचा राजकीय आणि धार्मिक कृतिसमूहाशीं संबंध अवगमिला पाहिजे. भाषाविषयक अर्वाचीन काळ येण्यास सुरवात कांहीं अंशीं चालुक्योदय काळांत झाली असली तरी अर्वाचीन भाषांना सुसंस्कृत स्थिति चालुक्योदय काळीं नव्हती. ती येण्यास त्यानंतर तीनचारशें वर्षांनीं सुरवात झाली. आजच्या भारतीय आर्यन भाषा आणि यूरोपीय भाषा यांचा उदयकाल दहाव्या शतकानंतर येतो. हा मधला काल एक सांस्कृतिक भाषा निर्माण करून तिच्याखालीं जगाचा जितका जास्त भाग आणतां येईल

तितका आणण्याचा होता, आणि त्यामुळें चालुक्योदय कालापासून पुढचा पांचशें वर्षांपर्यंतचा काल कांहीं प्रतिष्ठित भाषांस जागतिक महत्त्व देण्याचा होता. हा प्रतिष्ठितपणा पावलेल्या भाषा म्हटल्या म्हणजे पाली, संस्कृत, आरबी आणि लाटिन या होत. व्यापक जनता आणि प्रदेश यांत प्रसाराच्या दृष्टीनें या चार भाषांस चालुक्योदयानंतरच्या कालांत महत्त्व आलें.

२१. दीर्घकाल सातत्य असलेल्या अनेक क्रियांचें महत्व आपणांस त्यांच्या विकासाच्या उत्तरकालांत दिसून येतें. पूर्वकालांत जरी तें नजरेस आलें नाहीं तरी त्या क्रियांचा विकास पूर्वीच्या कालांत होतच असतो. आणि यामुळें जेव्हां केवळ उत्तरकालीन स्थिति दृग्गोचर होत असेल तेव्हां ती पाहून मागें जाण्याची क्रिया करावी लागते.

ज्या भाषा पुढें चालुक्योदयानंतरच्या कालांत व्यापक झाल्या त्यांना व्यापक क्षेत्रांत कार्यकर्त्या बनविण्याची लायखी अगोदरच्या कालांत म्हणजे शातवाहनपर्वाच्या विषयीभूत कालांत झाली हें उघड आहे. तर त्या दृष्टीनें पुढील विकासांचे पूर्वेतिहास शोधून ते मांडणें हें देखील या इतिहासाचें एक महत्त्वाचें कर्तव्य होतें. देशीभाषा व संस्कृत यांच्या परस्परांवरील परिणामांचे धागे आपणांस फार जुन्याकाळापासून लावले पाहिजेत. संस्कृत भाषा ही चालुक्योदय कालापूर्वी पुरी विकास पावली होती. तिचा प्रसार हिंदुस्थानांत सर्व देशभर झाला होता. त्या प्रसाराचा इतिहास या पर्वाच्या काळांत पडतो व तो आपणांस मननीय आहे.

संस्कृत भाषेचा प्रसार देशभर किंबहुना पूर्व एशियाभर झाला होता, आणि शकस्थान व इराणी साम्राज्य यांतहि बौद्ध संप्रदायाबरोबर झाला होता. तर प्रश्न असा उत्पन्न होईल कीं संस्कृत भाषा एशियाभर जें कार्य करीत होती, तें कार्य देशी भाषांस अपकर्षक होतें काय ? या गोष्टीचा विचार विकासशोधक दृष्टीच्या मनुष्यांकडून काळजीपूर्वक झाला पाहिजे. कारण अर्वाचीन भाषांच्या अभिमान्यांनीं अनेक प्रसंगीं प्रतिष्ठित भाषांच्या विरुद्ध भावना स्वकीय भाषेच्या अभिमानानें प्रदर्शित केली आहे. तसेंच लाटिन भाषा यूरोपभर पसरत होती तेव्हां ती इतर भाषा दडपून टाकण्याचेंच कार्य करीत होती काय ? प्रस्तुत प्रश्नहि आपणांस विचार करण्याजोगा आहे. या प्रश्नांचें दोन्ही प्रदेशांच्या बाबतींत "नाहीं" असेंच उत्तर दिलें पाहिजे. प्रतिष्ठित भाषांचें कार्य देशी समाजांना सुशिक्षित करून ते समाज उच्च वाङ्मयाचा उपयोग करणारे बनविणें आणि पुढें देशी भाषांमध्येंच उच्च वाङ्मयाचा विकास होण्याची पूर्व तयारी करून ठेवणें, हें झालें, ही गोष्टच विकासवेत्त्यांच्या लक्षांत येईल. हें थोर सामाजिक कार्य चालुक्यपूर्व काळांत झालें. त्याचीं अंगें प्रसंगानुसार स्पष्ट होतीलच.

आपल्याकडे कानडी, तेलुगु, तामिल हे समाज वाङ्मयग्राहक बनविले; यूरोपांत क्रिया त्याप्रमाणेंच झाली. जर्मन, आंग्लोसाक्सन इत्यादि समाज प्रथम लाटिन भाषेमार्फत आणि रशियन समाज ग्रीक भाषेमार्फत अगोदर सुशिक्षित बनले. त्यांच्या बौद्धिक गरजा वाढल्या, आणि त्या वाढलेल्या गरजा पुरविण्यास देशी वाङ्मय तयार होऊं लागलें. ज्या समाजांची भाषा संस्कृतसदृश होती, त्या समाजांत देशी भाषांचा विकास उशीरां झाला असें वरवर पहाणारास दिसतें. खरोखर पहातां सामाजिक विकास थांबला नव्हता. देशी वाङ्मय देखील वाढत होतें; तथापि कालांतरानें "अशिष्ट वाङ्मयाचें शिष्टीकरण" ही क्रिया होऊन देशी वाङ्मयाचें फळ संस्कृत वाङ्मयांत समाविष्ट झाल्यामुळें अनेक प्रकारचें देशी लौकिक वाङ्मय नष्ट झालें असावें. देशी भाषांची वाढ "प्राकृत" भाषांच्या क्षेत्रांत न होण्यास दुसरींहि कारणें होतीं. महाराष्ट्रांतील लोकांना संस्कृत सहजच येत होतें. प्राकृत शब्दांचेंच कांहीं नियमांनीं भिन्न रूप केलें म्हणजे संस्कृत बनलें, अशा तऱ्हेची स्थिति ज्या ठिकाणीं होती त्या ठिकाणीं देशी भाषांचा विकास होण्यास आवश्यक भूमिका जेव्हां देशी भाषा संस्कृतपासून फार दूरावली तेव्हांच उत्पन्न झाली.

२२. बुद्धजीवनाच्या काळापासून चालुक्योदयाच्या काळापर्यंत हिंदुस्थानांत जो भाषाविषयक इतिहास झाला तो थोडक्यांत येणेंप्रमाणें मांडतां येईल. मगध आणि महाराष्ट्र या दोन भागांत देशी भाषा निरनिराळ्या कारणांनीं डोकें वर काढूं लागल्या. मगधांत देशी भाषा धार्मिक कारणानें पुढें आली तर महाराष्ट्रांत राजकीय कारणामुळें म्हणजे शातवाहन सत्ताविकासामुळें पुढें आली. दोन्ही भाषा कार्यकर्त्या झाल्या. महाराष्ट्री ही काव्याची आणि राजव्यवहाराची महत्वाची भाषा झाली, आणि मगधाची पाली ही संप्रदायप्रसारामुळें म्हणजे धार्मिक कारणामुळें महत्व पावली. प्राकृत भाषा कानडी वगैरे भाषांवर जे परिणाम करिती झाली, तो परिणाम तद्भव शब्दांचा संग्रह म्हणून कानडींत अद्याप शिल्लक आहे. महाराष्ट्री भाषा व धार्मिक संप्रदाय यांचा देखील संबंध उत्पन्न झाला होता. जैनांची प्राकृत ही महाराष्ट्राचीच एक उपभाषा होती असें म्हणतां येईल. महाराष्ट्री कांहीं काळ राजकीय महत्वामुळें

इतरत्र पसरली, पण पुढें तिचें महत्व नष्ट झालें. बौद्ध जैनादि संप्रदायांस जें सातत्य मिळालें तें राजव्यवहारास मिळालें नाहीं. त्यामुळें राजव्यवहाराची प्रतिष्ठित भाषा म्हणून या भाषेचें व्यावहारिक सातत्य राहिलें नाहीं, तरी धार्मिक म्हणजे सांप्रदायिक महत्त्वामुळें सातत्य राहिलें आणि त्यामुळें महाराष्ट्राच्या भाषेंत विशिष्ट प्रकारचें वाङ्मय संवृद्ध झालें.

२३. हिंदुस्थानांत आपल्या इष्ट भाषेला स्थैर्य देण्यांत तीन सत्ता झगडत होत्या. राजसत्ता, संप्रदाय सत्ता आणि पांडित्य सत्ता. बौद्ध संप्रदायाच्या अनुषंगानें देशी म्हणजे पाली भाषेंत पांडित्य थोडेंसें वाढलें, पण पांडित्याची खरी भाषा संस्कृत झाली होती. शिक्षा, व्याकरण, निरुक्त, छंद इत्यादि शास्त्रें याच भाषेच्या सहाय्यानें वाढलीं होतीं. प्राकृतमध्यें जें निर्माण होईल तें स्वीकारून संस्कृत वाङ्मय वाढवावें ही संस्कृत भाषेच्या अभिमानी पंडित वर्गाची रीत होती, आणि त्यामुळें पाली भाषेचा पूर्ण विकास होण्यापूर्वीच बौद्धांनीं देखील संस्कृतग्रंथरचनेस सुरवात केली, आणि या तिन्ही स्पर्धमान शक्तींत संस्कृत भाषा सरते शेवटीं श्रेष्ठत्व पावली, आणि राजव्यवहाराला देखील प्राकृतच्या ऐवजीं तीच उपयोगास येऊं लागली. एवंच संस्कृत भाषेस जें प्राधान्य चालुक्योदयाच्या काळांत आलें त्याची पूर्व तयारी म्हणजे स्पर्धमान देशी भाषांवर विजय ही गोष्ट वुद्धोत्तर चालुक्यपूर्व काळांतच झाली, आणि देशांतील इतर भाषांवर जो या सुप्रतिष्ठित भाषेनें विजय संपादन केला त्या विजयास साधक असा त्या भाषेचा विकास बुद्धपूर्वकाळांतच झाला, आणि या विजयाचें फळ संस्कृत भाषेस चालुक्योत्तर काळांतहि चारशें वर्षें निर्वेध उपभोगितां आलें. या काळानंतर संस्कृत भाषेच्या महत्वास दोन बाजूंनीं धक्का बसला. एक धक्का म्हणजे संस्कृतीची भाषा व राजभाषा म्हणून आरबीचा आणि फारसीचा उदय झाला त्यामुळें बसला आणि देशी भाषेच्या उदयामुळें दुसरा धक्का बसला. असा संस्कृत भाषेचा देशी भाषांशीं झालेल्या संबंधासंग्रामाचा इतिहास आहे. आणि या एकंदर इतिहासापैकीं संस्कृत भाषेकडून झालेल्या सर्वदेशव्याप्तीचा इतिहास सांगणें व त्याचे होत असलेले परिणाम सांगणें हा शातवाहनपर्वाचा विषय आहे.

२४. चालुक्योत्तर काळांत चारशें वर्षें संस्कृत भाषेस निर्वेध राज्य करतां आलें; पण पुढें बाहेरच्या शक्ति आणि देशी भाषांच्या शक्ति एकवटून संस्कृत भाषेचें महत्व नाहींशा करत्या झाल्या. ज्या शक्ति पुढें स्पर्धा करूं लागल्या त्यांचा उद्भव चालुक्योदय काळीं झालाच होता. हिंदुस्थानांत शेजारचें राज्य जें इराणचें त्याची संस्कृति त्या राज्याच्या विस्ताराच्या काळांत जरी मोठी असली तरी त्या संस्कृतीचें तेज भारतीय भाषांच्या पुढें टिकलें नाहीं. इराणी साम्राज्य जरी बुद्धजन्मकाळीं अस्तित्वांत आलें होतें तरी त्या साम्राज्याच्या भाषेचा पूर्वीचा सांस्कृतिक इतिहास फारसा महत्वाचा दिसत नाहीं. संस्कृत भाषेला आणि ब्राह्मणी परंपरेला स्पर्धमान अशी ती शक्ति नव्हतीच. इराणचें राज्य पूर्वेकडे वाढलें असतें तर राज्याचा मध्यबिंदु गांधारांत किंवा भारतांत म्हणजे पंजाबांत येऊन इराणवरच संस्कृत भाषेचें आवरण अधिक पक्कें झालें असतें हीच शक्यता अधिक होती. इराणनें साम्राज्य स्थापन केलें त्या वेळेस त्यांची भाषा इतर भाषांपेक्षां प्रगल्भ झालेली नव्हती. असुरी बाबीलोनी लोकांचें प्रचंड वाङ्मय त्यांच्या समोर होतें, आणि त्यांनीं जी लिपि वापरली ती देखील जवळच्या असुरांची कीलाकृति वापरली. त्यांची भाषा विकासाच्या मार्गावर असेल, पण त्यावेळेस हिंदुस्थान हा ग्रांथिक संस्कृतीच्या बाबतींत अधिक प्रगल्भ असल्यानें इराणच्या भाषेचें महत्व हिंदुस्थानावर स्थापन झालें नाहीं. ग्रांथिक बाबतींत इराण फारच मागें राहिला. तो इतका कीं आज इराणच्याच वैभवाची साक्ष ग्रीक ग्रंथांनीं पटत आहे. इराणचें स्वतःचें वाङ्मय टिकून राहिलें नाहीं.

२५. बुद्धजीवनकाळीं स्वतंत्र मोठ्या राजसत्ता म्हणजे इराणी साम्राज्य आणि आसुरी साम्राज्य याच होत्या. त्यांतील दुसरी नष्ट झाली. वरिष्ठ सत्ता एकदोनच असल्या तरी स्वतंत्र अधिराज सत्तेच्या खालीं ज्यांचा सामाजिक आयुष्यक्रम पूर्णपणें संरक्षित झाला आहे अशीं राष्ट्रें अनेक होतीं. त्यांपैकीं कांहीं चांगलीं सुसंस्कृत होतीं. निरनिराळ्या भाषा अस्तित्वांत होत्या, आणि त्यांत वाङ्मयनिर्मिति होत होतीच; अशा सुसंस्कृत लोकांतच आरब आणि यहुदी यांचा उल्लेख करावा लागेल. सेमेटिक संस्कृतीचीं तीन काळचीं तीन वाङ्मयें आहेत. त्यांतील आसुरी–बाबीलोनी वाङ्मय अत्यंत प्राचीन, हिब्रु वाङ्मय त्याच्या नंतरच्या काळचें तरी देखील बरेंचसें प्राचीन, आणि आरबी हें सर्वांत अर्वाचीन–अरबांची संस्कृति आणि वाङ्मय अर्वाचीन म्हणजे महंमदानंतरचें असें मात्र नाहीं. इराणी सत्तेखालीं या सर्व सेमेटिक लोकांचा समुदाय आला. इराणच्या सत्तेखालीं या तिन्ही भाषा चालूच होत्या, आणि ते लोक सेमेटिक लोकांच्या व्यापक संस्कृतीच्या छत्राखालीं आपापली विशिष्ट संस्कृति संरक्षून आपला आयुष्यक्रम चालवीतच होते.

२६. आरबी संस्कृतीचें जुनें वाङ्मय आज तरी अस्तित्वांत नाहीं; तथापि तें अस्तित्वांत होतें आणि भाषा चांगली विकास पावली होती, यांत शंका नाहीं. नाहीं तर कुराणासारखा ग्रंथ निर्माणच झाला नसता. इराणी साम्राज्य विशिष्ट संस्कृतीचें प्रचारक नव्हतें, त्यामुळें एका व्यापक सत्तेखालीं निरनिराळ्या संस्कृति वाढत होत्या. वाङ्मययुक्त यहुद्यांचें राष्ट्र आपल्या तऱ्हेनें प्रगति पावत होतें आणि त्यांत निघणाऱ्या एका महापुरुषाच्या म्हणजे येशूच्या संप्रदायाचा प्रसार होण्यासाठीं पूर्व तयारी हें हिब्रूंचें राष्ट्र करीत होतें. त्यांत, एकेश्वरी धर्म आणि प्रवक्त्यांच्या उपदेशाचें संरक्षण या दोन क्रिया एकसारख्या होत होत्या. इराणी साम्राज्यांत विशिष्ट जातीय संस्कृतीचा प्रचार करावा अशी भावना नसल्यामुळें साम्राज्य-नाशाबरोबर त्यांची भाषा देखील गतमहत्त्व झाली, आणि पुढें मुसलमानी संप्रदायाचा संस्कार पावल्यानंतर ती पुन्हां एक नवीन प्रकारचा विकास पावली.

२७. ग्रीक आणि रोमन या भाषांपैकीं ग्रीक ही प्रथम केवळ राष्ट्रीय तथापि सांस्कृतिक भाषा होती. नंतर ती साम्राज्यभाषा झाली आणि नंतर ती साम्राज्यभाषा राहून धार्मिक महत्त्वाची भाषा झाली. हींच स्थित्यंतरें रोमन लोकांच्या लाटिन भाषेचीं झालीं आहेत आणि या भाषांच्या वृद्धिसंकोचाच्या इतिहासाचें स्पष्टीकरण बऱ्याच बाबतींत हिंदुस्थानांतील भाषांच्या इतिहासांच्या दाखल्यांनीं स्पष्ट होणार आहे. बुद्धोत्तर आणि चालुक्योदयपूर्व या काळांत या दोन्ही भाषा संस्कृताप्रमाणें आत्यंतिक महत्त्व पावल्या, आणि यांचा पगडा जर कमी झाला असेल तर तो यूरोपांतील देशी भाषांच्या म्हणजे राष्ट्रभाषांच्या विकासामुळेंच होय. सेमेटिक संस्कृतीचा धक्का संस्कृताप्रमाणेंच दोन भाषांना देखील पोंचला; पण यांना पोंचलेला धक्का हिंदुस्थानाला मिळालेल्या धक्क्यापेक्षां पुष्कळच सौम्य होता.

२८. या विशिष्ट भाषांच्या गौरवलाघवाच्या इतिहासाकडे देखील लक्ष पुरविलें तरी जगाच्या इतिहासाचे तत्त्वयुक्त कालविभाग पाडतां येतील, आणि त्या कालविभागांकडे पाहिलें असतां महाराष्ट्राच्या इतिहासाचा जगाच्या इतिहासाशीं विशिष्टभाषा-गौरव-लाघवाच्या दृष्टीनेंहि निकट संबंध दिसून येईल. त्या संबंधाचें विवेचन पुढें प्रसंगानुसार येणारच आहे.



**चित्रांक १३. भाजे येथील एक चैत्य लेणें सामान्य देखावा.**

प्रकरण ३ रें.

# महाराष्ट्र, दक्षिणापथ आणि अपरांत.

## २९ विषयप्रवेश. इतिहासकथनापूर्वीचें भूगोलवर्णन.

२९. बुद्धकालापासून चालुक्योदय कालापर्यंतच्या शतकद्वादशींतील फेरफारांचें स्थूल अवलोकन झालें. प्रथम जगाचें व नंतर भारताचें व त्यांतल्या त्यांत महाराष्ट्राचें स्थूल अवलोकन झाल्यानंतर कथासूत्राकडे वळण्यापूर्वी आपल्या वर्णनविषयक भागांना भिन्न काळांत कोणतीं नांवें प्रचारांत होतीं याचा विचार प्रारंभींच करणें योग्य होईल.

विदर्भाचे उल्लेख येथें वगळतों. कारण विदर्भाचा इतिहास बऱ्याच प्राचीन काळापासून सांगतां येण्याजोगा आहे. अत्यंत प्राचीन काळापासून आजतागाईत तें नांव चालत आलें आहे, तथापि विदर्भेतर महाराष्ट्राचें वर्णन निरनिराळे ग्रंथकार कोणत्या शब्दांनीं करीत असत याचा आढावा येथें प्रारंभींच दिलेला बरा.

बुद्धोत्तर काळांत पाणिनीस घेतां येत नाहीं, तथापि त्याची बुद्धपूर्वता फारशी जुनी नसावी; म्हणून पाणिनीपासून चालुक्यापर्यंत लेखांचा आढावा येथें घेण्यांत येत आहे. पाणिनि, कौटिल्याचें अर्थशास्त्र, कात्यायन म्हणजे वररुचि, बौधायनस्मृति, सुत्तनिपात महावंश यांसारखे बौद्ध ग्रंथ, महाभारत, रामायण, शिलालेख, ग्रीक भूगोलवेत्ते, चिनी प्रवासी फाइहान इत्यादि लेख व लेखक आपणांस वर्णनविषय प्रदेशांचा –दक्षिणापथ, महाराष्ट्र, अपरांत, प्रतिष्ठान इत्यादि स्थानांचा– उल्लेख करते झाले आहेत; उल्लेखांचा आढावा घेण्याचें काम एका लेखकानें* अगोदरच बरेंच चांगल्या तऱ्हेनें करून ठेवल्यामुळें सोपें झालें आहे. या बाबतींत जवळजवळ त्यांचेंच विधान थोडेंसें भिन्नमतदर्शनात्मक किंवा स्पष्टीकरणात्मक फेरफार करून पुढें मांडलें आहे. प्रस्तुत विवेचन इतिहासकथनापूर्वी अवश्य होणाऱ्या भूगोलवर्णनांच्या स्वरूपाचें आहे, असें समजावें.

## ३० दक्षिणापथाविषयीं पाणिनि, बौधायन, चाणक्य, पेरिप्लस व फाहिआन यांची माहिती.

३०. पाणिनीच्या सूत्रांत 'दक्षिणापथ' असें म्हटलेलें आढळत नाहीं; पण त्या सूत्रांत असलेल्या हजारों स्थानिक नावांत दोन नांवें दक्षिणेंतील प्रदेशांसंबंधींचीं आहेत. अष्टाध्यायींत कलिंग व अश्मक या दोन प्रांतांचा उल्लेख आहे.† कलिंगासंबंधानें प्रश्नच उपस्थित होत नाहीं. तथापि त्या राष्ट्राच्या अर्वाचीन प्रतिनिधींसंबंधानें निश्चय करण्यास सहायक प्रस्तुत लेखकास थोडीशी नवीन माहिती पुरवितां येईल; ती अशी, कीं, ओरिसाचा कांहीं भाग आणि उत्तर तैलंगण याला कलिंग म्हणत असले पाहिजेत; कारण आज येथें कालिंगी म्हणून एक शूद्र समजली जाणारी पण स्वतःस क्षत्रिय म्हणविणारी व जानवें घालणारी जात बरीच जमावानें दृष्टीस पडते. या जातीची मंडळी कांहीं तैलगी बोलतात तर कांहीं उडिया बोलतात. ही जात प्रमुख असतां देशाला कलिंग हें नांव असावें आणि नंतर उत्कल किंवा उड्र हीं नांवें मिळालीं असावींत, असें वाटतें.

पाणिनीनंतरचा पण महत्त्वाचा प्राचीन उल्लेख निरुक्ताचा होय. तो उल्लेख असें दाखवितो कीं, दक्षिणेकडील चालीरीतींचें व व्यवहारधर्माचें ज्ञान या कालीं वेदाभ्यासकांस होतें. दक्षिणेकडे ज्या स्त्रियांस भाऊ नसतील त्या स्त्रिया पिंडदानादि कर्मासाठीं बापाच्या घरीं येतात. त्या संतानोत्पादनाची क्रिया आपल्या पैतृक कुटुंबाच्या हितासाठींच करतात, पतीकडे नसतात. याशिवाय स्त्रियांच्या हक्काविषयीं देखील विधान आहे. दक्षिणेकडे गर्तारोहणाची म्हणजे राजापुढें किंवा सभेपुढें गर्तेमध्यें (पिंजऱ्यांत साक्षीदार येतो त्याप्रमाणें) उभें राहून आपला हिस्सा स्त्रियांनीं मागावा अशी चाल असावी. धनभाग मागणाऱ्या स्त्रियांमध्यें ज्या स्त्रिया अपुत्रा किंवा अपतिका असतात त्या जेव्हां येतील तेव्हां त्यांना अक्षांनीं मारावें (ढेंकळें मारावींत?) आणि तसें त्यांनीं मारलें म्हणजे मात्र त्यांस पोटगी (रिक्थ) मिळावी!! या प्रकारच्या चालींचा उल्लेख दाक्षिणात्य आणि औदीच्य यांच्यांत बराच व्यवहार उत्पन्न झाला होता अशा काळाचा द्योतक आहे (अभ्रातृकेव पुंसः पितॄनेत्याभिमुखी संतानकर्मणे पिंडदानाय न पतिं गर्तारोहिणीव धनलाभाय दाक्षि-

---

* पांडुरंग वामन काणे. Ancient Geography and Civilization of Maharashtra, JBBRAS. लेखांक XXI.

† "साल्वावयवप्रत्यग्रथकलकूटाश्मकादिञ्" पा० ४. १. १७३ 'द्व्यञ् मगधकलिंगसूरमसादण्' पा० ४. १. १७०.

णाजी...तं तत्र याऽपुत्रा याऽपतिका साऽऽरोहति, तां तत्राक्षैराघ्नन्ति, सा रिक्थं लभते.—निरुक्त ३. ५.)

सुप्रसिद्ध ग्रंथ कौटिल्यकृत अर्थशास्त्र यांत निरनिराळ्या प्रदेशांतील पावसाचें मान सांगितलें आहे; व तें सांगतांना अश्मक व अपरांत यांचा उल्लेख आला आहे.

**षोडशद्रोणं जांगलानां, वर्षप्रमाणमध्यर्धमानूपानां देशवापानाम्, अर्धत्रयोदशमश्मकानाम्, त्रयोविंशतिरवंतीनाम्, अमितमपरांतानाम्, हैमन्यानां च कालतः**—अधिकरण दुसरें.

अश्मक या देशामध्यें अर्धत्रयोदशात्मक द्रोण आणि अपरांतांत अपरिमित हें पावसाचें मान अजूनहि आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. दोन इंच म्हणजे एक द्रोण असें धरलें तर वावगें होणार नाहीं असें वाटतें. कौटिल्याचा प्रस्तुत उल्लेख पाऊस मोजण्याची क्रिया अपरांतांत आणि त्याचप्रमाणें अश्मकांत देखील होत होती असें दाखवितो आणि प्राचीन महाराष्ट्राच्या विकसित संस्कृतीची साक्ष देतो.

अश्मकांचा उल्लेख बौद्ध ग्रंथांत पुष्कळच आहे. अजंठा लेण्यांच्या भोंवतालच्या प्रदेशास 'अश्मक' असें नांव होतें, असें रा. काणे म्हणतात; पण 'अश्मक नांवानें मोडला जाणारा प्रदेश फार विस्तृत होता' असें बौद्ध ग्रंथाच्या पुराव्यावर ऱ्हीस डेव्हिड्स म्हणत आहेत. अश्मक राष्ट्र आवंत्यांच्या बरोबर उल्लेखिलें जात आहे असें ऱ्हीस डेव्हिड्स दाखवितात.* पाणिनि कोणत्या अश्मक प्रदेशासंबंधीं लिहीत असावा याविषयीं निश्चयात्मक विधान करतां येत नाहीं. अश्मक शब्दाच्या उपयोगासंबंधीं असें म्हणतां येईल कीं, ज्या काळांत हा शब्द प्रामुख्यानें दिसतो त्या काळांत विदर्भ शब्दाचा उल्लेख सांपडत नाहीं. अश्मक हें एखादें राजकुल असलें तरी त्याचें नांव देशास लागून त्या राज्याच्या वृद्धीबरोबर वाढत्या प्रदेशाला पुढें तें लागू शकतें. 'अश्मक' हें जरी जातिनाम असलें तरी देखील तें कुलनाम होऊन पुढें त्या कुळाच्या ताब्यांत आलेल्या विस्तृत प्रदेशाचें नांव होतें. पुढें हें दाखविलें जाईल कीं, **विदर्भाचा** अंतर्भाव अश्मकांत होत होता, आणि विदर्भ किंवा **क्रथकैशिक** हीं पुराणांत अत्यंत प्रसिद्ध असलेलीं नांवें कमी महत्त्वाचीं होऊन ज्या काळांत अश्मक शब्दाचेंच महत्त्व होतें तोच काळ मुख्यतः शातवाहन पर्वाचा विषय आहे.

'दक्षिणापथ' हा अत्यंत सुप्रसिद्ध शब्द अतिशय प्राचीन म्हणून मान्य असलेल्या अशा एका पुस्तकांत म्हणजे बौधायनस्मृतींत मुद्दां आलेला आहे. या स्मृतींत भाल्लवींच्या गाथेंतून उतारा घेतला आहे. तो असाः—[ बौधायन स्मृति. आनंदाश्रम प्रत. ]

**अथाप्यत्र भाल्लविनो गाथामुदाहरन्ति ।**
**अवन्तयोऽगमगधा सुराष्ट्रा दक्षिणापथाः ।**
**उपावृत्सिंधुसौवीरा एते संकीर्णयोनयः ।**

कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्यें पाटलिपुत्राहून दक्षिण व उत्तर दिशांकडे पसरलेल्या रस्त्यांपैकीं व्यापारी दृष्टीनें जास्ती फायद्याचे रस्ते कोणते या संबंधींचा एक मजेदार वाद झाला आहे. चाणक्य दक्षिणेकडील व्यापाराचा पुरस्कर्ता होता.

**स्थलपथेऽपि हैमवतो दक्षिणापथाच्छ्रेयान् 'हस्त्यश्वगंधदन्ताजिनरूप्यसुवर्णपण्यास्मारवत्तरा' इत्याचार्याः। नेति कौटिल्यः कम्बलाजिनाश्वपण्यवर्जाः शंखवज्रमणिमुक्ताः सुवर्णपण्याश्च प्रभूततरा दक्षिणापथे ।** अधिकरण सातवें.

प्रस्तुत उताऱ्याच्या अर्थाची चर्चा सविस्तर पुढें येणारच आहे. चाणक्यास दक्षिणेकडेसच सोनें रत्नें हिरे व शंख यांचे बाजार सपाटून दिसत होते व यावरून दक्षिणेकडील उच्च सांपत्तिक स्थितीचा लौकिक उत्तरेकडे चांगलाच पसरला होता असें दिसतें; तथापि दक्षिणेकडे घोडे नाहींत अशीहि प्रसिद्धि त्याकाळांत होती, एवढेंच त्या उल्लेखांतून सध्यां घेऊं.

महाभारतांत 'दक्षिणापथ' हा शब्द अनेक वेळां आला आहे. पांड्यदेश जिंकून सहदेव दक्षिणापथांत गेला, असें सभापर्वांत म्हटलें आहे. वनपर्वावरून असें दिसतें कीं, अवंती व ऋक्ष पर्वत ओलांडून दक्षिणापथांत जावें लागतें.

**एते गच्छंति बहवः पंथानो दक्षिणापथम् ।**
**अवंतीं ऋक्षवंतं च समतिक्रम्य पर्वतम् ॥**
**एष विंध्यो महाशैलः पयोष्णी च समुद्रगा ।**
**एष पंथा विदर्भाणामसौ गच्छति कोसलान् ॥**
**अतःपरं च देशोऽयं दक्षिणे दक्षिणापथे ।**

नल दमयंतीला बापाच्या घरीं जाण्यासाठीं सूचना करीत असतां प्रस्तुत भौगोलिक माहिती सांगत आहे.

भीष्म पर्वांत म्हटलें आहे, कीं, माहिष्मतीचा राजा नील हा दक्षिणापथांतील नीलायुधांच्या सेनेसह कौरवांच्या बाजूनें लढला. (कल० प्रत १८३४; श्लोक ५७५). नानाघाटच्या शिलालेखांत ( No. 1 in A S W 1, Vol. v, p. 60) वेदिसिरी हा 'दक्षिणापथा'चा राजा होता, असें म्हटलें आहे.

* त्यांच्या मतासाठीं "बुद्धिस्ट इंडिया" हें पुस्तक किंवा महाराष्ट्रीय ज्ञानकोश विभाग ४ बुद्धोत्तर जग. पृ. १७७ पहावें.

रामायणांत सौराष्ट्राबरोबर दक्षिणापथाचाहि उल्लेख आहे. पतंजलि आपल्या महाभाष्यांत म्हणतो कीं, सरसि नांव मोठ्या तळ्यांना 'दक्षिणापथां'त आहे. (दक्षिणापथे हि महान्ति सरांसि सरस्य इत्युच्यन्ते). हाच ग्रंथकार दाक्षिणात्यांच्या तद्धितप्रियतेविषयीं टीका करीत आहे. गिरनार येथील क्षत्रप रुद्रदाम्याच्या शिलालेखांत शातकर्णी हा दक्षिणापथाचा राजा होता, असें म्हटलें आहे. नाशिकच्या एका शिलालेखांत 'दक्षिणापथ' हेंच नांव आढळतें. अलाहाबाद येथील शिलास्तंभावरील लेखांत सम्राट् समुद्रगुप्तानें जिंकलेल्या पुष्कळ राजांचीं नांवें 'दक्षिणापथां'तील म्हणून दिलीं आहेत. यापेक्षां अलीकडील खिस्ती चौथ्या शतकांतील ग्रंथकारांचे उतारे देण्याची गरज दिसत नाहीं. परदेशीय ग्रंथकारांतून 'पेरिप्लस' हाच पहिल्यांदा दखिनबेडसचा (दक्षिणापथाचा) उल्लेख करितो. फाहिआन हा (इ. स. ३९९ ते ४१५ हिंदुस्थानांत होता) टा–थ्सिन (Ta-Thsin) म्हणजे दक्षिण नांवाच्या प्रदेशासंबंधीं लिहित आहे. तो म्हणतो कीं "या पुढें दोन योजनें दक्षिणेकडे गेल्यावर तिथें एक टा–थ्सिन नांवाचा प्रदेश आहे. पूर्वीच्या बुद्धकाश्यपाचा इथें एक 'संघाराम' (Sanghäräm) मोठा पर्वत पोखरून तयार केला आहे......या टा–थ्सिन प्रदेशांत पुष्कळ डोंगर व कडे आहेत व रस्तेहि वाईट आहेत." याप्रमाणें 'दक्षिणापथ' या शब्दाचा माग बौधायन स्मृतीच्या काळापासून तो थेट समुद्रगुप्त व फाहिआनच्या काळापर्यंत देतां येतो. बौधायन कौटिल्य आणि भाल्वी यांच्या काळापासून तों फाहिआनच्या काळापर्यंत देशी ग्रंथकारांस त्या प्रमाणेंच परकीय ग्रंथकारांस 'दक्षिणापथ' हा शब्द अधिक परिचित होता असें दिसतें. तथापि त्यावरून आपण असें समजूं नये कीं 'महाराष्ट्र' हें नांव त्यावेळेस अस्तित्वांत नव्हतें. राजकीय दृष्ट्या जें क्षेत्रनाम महत्त्वाचें होतें तेंच क्षेत्रनाम अधिक उल्लेखिलें जातें. आज देखील 'मुंबई इलाख्या'चा उल्लेख महाराष्ट्राच्या उल्लेखापेक्षां देखील अधिक आहे. सरकारी दप्तरांत 'महाराष्ट्र' या शब्दाचा उल्लेख करणारे प्रसंग क्वचित् येतात.

## ३१ कात्यायन व अशोक यांनीं उल्लेखिलेलीं राष्ट्रें.

३१. आतां आपण दक्षिणेंतील इतर स्थळांचा उल्लेख प्राचीन वाङ्मयांत कोठें कोठें येतो तें पाहूं.

'कात्यायन' हा आपल्या वार्तिकामध्यें महत्त्वाचे पुष्कळ उल्लेख दक्षिणेंतील ठिकाणांविषयीं करतो. तो महिष्मान् व पांड्य नांवाच्या देशाबद्दल लिहितो. आतां या महिष्मान् प्रदेशाचा, भारत व पुराणें यांतून आलेल्या माहिषकाचा व महावंशांत आलेल्या महिसमंडळाचा आणि नर्मदेच्या तीरावरील माहिष्मती शहराचा संबंध जोडणें योग्य होईल कीं म्हैसूरशीं संबंध जोडतां येईल, यासंबंधानें मतभेद आहे. या वैयाकरणाच्या कंबोजादिगणांत केरल व चोल यांचा समावेश होतो, व पारस्करादिगणांत किष्किंधेचा उल्लेख आहे. अशोकाचीं शासनें दक्षिण हिंदुस्थानविषयीं अनेक उल्लेख देतात. दुसरें शासन चोल, पांड्य, सतियपुत व केतल–(केरळ) पुत या देशांचीं नांवें दाखवितें.* पांचवा शिलालेख रिस्टिक, पेतनिक व अपरांत देशाविषयीं सांगतो.† हे रिस्टिक कोण? 'राष्ट्रिक' या संस्कृत शब्दाशीं याचें बरेंच साम्य दिसतें. यावरूनच हे लोक ज्या प्रदेशांत होते, त्या प्रदेशाला 'महाराष्ट्र' हें नांव पडलें असावें, असें कोणी समजतात. तथापि या प्रश्नावर ते महाराष्ट्रीय होते असें एकमत नाहीं. तें सुराष्ट्राचें (काठेवाडचें) नांव असावें असें जनरल कनिंग्ह्याम म्हणतो. रिस्टिकांचा खरोखर महाराष्ट्र किंवा सुराष्ट्र यांपैकीं फक्त एका प्रदेशाशीं संबंध लावण्याची कल्पनाच अयोग्य आहे. ही जात ज्या प्रदेशांत पसरली असावी त्यांत आमच्या मतें 'महाराष्ट्र' व 'सुराष्ट्र' दोन्ही प्रदेश येत होते.

'प्रतिष्ठान' (आजचें पैठण) या नांवावरून पेतेनिक हें नांव पडलें असावें, असें संस्कृतपासून प्राकृत शब्द काढूं पहाणाऱ्या पुष्कळच संशोधकांचें मत आहे. जर "अन्ये अपराता" हे कालशी, गिरनार व धौली येथील पांचव्या शिलालेखांत आलेले शब्द "इतर पश्चिमेकडील देश" या अर्थीं घेतले तर असें अनुमान करण्यास हरकत नाहीं कीं, रिस्टिक व पेतेनिक नांवाचे लोक पश्चिमेला रहात असावेत. तेराव्या शासनांत चोल, पांड्य, आंध्र, पुलिंद व त्याच बरोबर भोज व पेतेनिक इतक्यांचा उल्लेख आहे.‡ भोजांचें राज्य वऱ्हाडमध्यें पुष्कळ शतकें होतें.

---

* **यथा चोडा पाडा सतीयपुतो केतलपुतो आ तंबपणी अंतियको योनराजा** (शासन २ रें)

† **योणकंबोजगंधारानं रिस्टिकपेतणिकानं ये वा पि अंञे अपराता** गिरनार शासन ५ वें.

‡ **योनकंबोजेषु नाभकनाभपंतिशु भोज पितिनिक्येषु आंध्र पारिंदेसु सबत.** (नभकांमध्यें आणि नभितांमध्यें, योनामध्यें व कांबोजांमध्यें, भोजांमध्यें पितानिकामध्यें आंध्रांमध्यें आणि पारिदांमध्यें सर्वत्र. शासन तेरावें.) गिरनार येथील शासनांत यांतील अनेक शब्द गेले आहेत, पण अन्य शासनांत जे सांपडले त्यांवरून जुळणी करण्यांत आली आहे.

कात्यायनाच्या वार्तिकामध्यें भोजांना क्षत्रिय म्हटलें आहे;* पण तो उल्लेख महाराष्ट्राच्या इतिहासाला साधक होईल अशी खात्री नाहीं. कारण भोज महाराष्ट्राबाहेरहि होते.

दक्षिणेकडील अनेक नगरांचे व ग्रामांचेहि प्राचीन उल्लेख उपलब्ध आहेत. मध्यप्रांतांतील भारहुत स्तूपांतील एका स्तंभावरील शिलालेखांत नाशिकच्या गोरखित (गोरक्षित) पासून मिळालेल्या दानाबद्दल माहिती आहे. (नासिक गोरखितय थभो दान वसुकस भारियाय). बाहेरचे उल्लेख महत्त्वाचे असले तरी देशांतीलच प्राचीन वस्तुवास्तूंचे अवशेष अधिक महत्त्वाचे होत. ते पुष्कळच आहेत. मुख्य महाराष्ट्रांत अशोकलेख मुळींच सांपडला नाहीं. महाराष्ट्राच्या सरहद्दींवर म्हणजे सोपारा व मस्की येथें मात्र सांपडले आहेत, ते इतिहासज्ञानसंवर्धक आहेत. नानाघाटचे व जुन्नरचे शिलालेख दाखवितात कीं, जुन्नरच्या जवळपासचा प्रदेश म्हणजे ब्राह्मणी संस्कृतीचा केंद्र होता. पतंजली आपल्या महाभाष्यांत कांचीपुर, केरल, नासिक्य (नाशिक) व विदर्भ यांच्याबद्दल सांगतो. सुत्तनिपाताच्या† एका गोष्टींत असें दाखविलें आहे कीं, भावरीचे शिष्य उत्तरेकडे पतिट्ठाणाला (अलकेंतील) पहिल्यांदा गेले; नंतर महिष्मतीला व उज्जेनीस पोंचले. पेरिप्लसमध्यें पिथाना (पैठण) व तगर हीं दोन दखिनाबेडस (दक्षिणापथ) मधील मोठीं व्यापाराचीं शहरें आहेत, असें सांगितलेलें आढळतें. टालेमी सुद्धां पैठण (बैठण) हें राजधानीचें शहर असें म्हणतो. वरील सुत्तनिपातांतील व इतर उल्लेखांकडे पुनरवलोकन करावें लागणारच आहे.

अशोकाच्या लेखांत पेतनिक आले आहेत, त्याचप्रमाणें सतीयपुत्त आले आहेत. त्या सतीयपुत्तांचा शातवाहनांशीं संबंध जोडावयाचा आणि पेतनिकांचा पैठणकरांशीं संबंध जोडावयाचा अशा खटपटी करण्यांत आल्या आहेत, त्यांचाहि यथाशास्त्र विचार पुढें येईलच. येथें हें एक सांगितलें पाहिजे, कीं, शब्दांचें संस्कृतीकरण करण्यांत चुका होतात आणि त्यामुळें आभासात्मक इतिहास तयार होतो. 'पेतनिक' हा पैठणक याचा मागधी लेखकाच्या तोंडीं झालेला उच्चार असणें अशक्य नाहीं. तथापि त्यास 'प्रतिष्ठानक' याचा अपभ्रंश बनविणें हा बाष्कळपणा आहे. 'प्रतिष्ठानक' हें बरेंच उत्तरकालीन संस्कृतीकरण आहे. अनेक जैन ग्रंथांत 'पतिठ्ठान' असा शब्द येतो. 'पइठण' याचें खरें संस्कृत रूप 'पतिस्थान' असेंच असलें पाहिजे. मूलरूप 'पडिट्ठाण' हें असतें तर त्याचें प्रतिष्ठान असें संस्कृतीकरण योग्य झालें असतें. 'पतिस्थान' हा शब्द काय इतिहास सुचवितो याचा विचार पुढें आला आहेच.

दक्षिणापथसंबंधीं व इतर निरनिराळ्या स्थळांविषयीं जी वर माहिती दिली आहे तींत रा. काणे यांनीं केलेल्या विधानापेक्षां जराशीं निराळीं विधानें केलीं आहेत तरी स्वतःच्या विधानांवरून रा. काणे यांनीं जो निर्णय काढला तो प्रस्तुत लेखकास मान्य आहे. रा. काणे जो निर्णय काढतात तो हा कीं, इसवीसनापूर्वी पुष्कळ शतकें हिंदुस्थानचा दक्षिणभाग म्हणजे कन्याकुमारीपासून तों नर्मदेपर्यंतचा प्रदेश उत्तरेकडील लोकांस ज्ञात होता व त्यावेळीं दक्षिणेकडे मोठमोठीं शहरें होतीं व सर्व प्रदेशभर निरनिराळीं व्यवस्थित राज्यें होतीं.

**३२ दक्षिणापथाची व्याप्ति,—पांड्य देश त्यांत नव्हता. अपरांत म्हणजे कोंकण हें त्यांत धरण्यासंबंधानें भिन्न मतें होतीं.**

३२. आतां आपण या दक्षिणापथांत किती प्रदेश मोडत होतो हें पाहूं.

सेतूपासून नर्मदेपर्यंतच्या सर्व प्रांताला दक्षिणापथ हा शब्द लावीत, असें कांहीं ठिकाणीं आढळून येतें. पूर्व चालुक्यांचा पहिला राजराज 'विष्णुवर्धन' यानें दिलेल्या दानांत असें म्हटलें आहे, कीं, 'विष्णुवर्धन' या मूळपुरुषानें सेतु व नर्मदा यांमधील सप्तलक्षांचा दक्षिणापथ जिंकला. "सेतुनर्मदामध्यं सार्धसप्तलक्षं दक्षिणापथं पालयामास." (See Ep. Ind. Vol. IV. p. 305) राजशेखर आपल्या बालरामायणांत म्हणतो कीं, नर्मदा ही आर्यावर्त व दक्षिणापथ यांमधील विभागरेषा आहे. (या किल भगवती आर्यावर्तदक्षिणापथयोः विभागरेषा) समुद्रगुप्ताच्या शिलालेखांत पिष्ठपुर (आजचें 'पिठापुरम्' मद्रास इलाखा), ऐरंडपल्ल, (एरंडोल, तैलंगणांतील), कांची, वेंगी, व देवराष्ट्र इत्यादि भाग म्हणजे कन्याकुमारी ते नर्मदेपर्यंतचा सर्व प्रदेश दक्षिणापथांत मोडतो, असा भाव आला आहे. 'देवराष्ट्र' हें कोठें होतें, याविषयीं जयस्वाल राजवाडे, गुप्ते वगैरे मंडळींनीं भिन्न मतें व्यक्त केलीं आहेत त्यांचा विचार स्वतंत्रपणें पुढें आपणास करावा लागणार आहेच. पुराणांतूनहि त्याचा वरील अर्थ निघतो. (पहा. वायु ४५, १९५, मत्स्य ११४, ब्रह्म २७, ५४). पण कमी व्यापक अर्थानेंहि हा शब्द आला आहे. दक्षिणापथांत सर्वसाधारणपणें खालील स्थळांशिवाय बाकी सर्व प्रदेशाचा समावेश होई. मलबार व तामील प्रदेश त्यांत नसावा असें दिसतें. मध्यप्रांत, निजामचें राज्य व कोंकणव्यतिरिक्त सर्व महाराष्ट्र त्यांत येई, म्हणजे नर्मदेच्या

---

* पाणिनि ४. १. ८०. वरील वार्तिक.

† सेक्रेड बुक्स ऑफ दी ईस्ट व्हा. १० भाग २, पृ. १८८.

खालचा व कृष्णेच्या वरील सगळा प्रदेश ही त्याची मर्यादा झाली. महाभारतांतील सहदेवाच्या दक्षिणदिग्विजयाच्या वर्णनांत पुढील प्रमाणें श्लोक आहेत.

**युयुधे पांड्यराजेन दिवसं नकुलानुजः ।**
**तं जित्वा स महाबाहुः प्रययौ दक्षिणापथम् ॥**
**गुहामासादयामास किष्किंधां लोकविश्रुताम् ।**
**ततो रत्नान्युपादाय पुरीं माहिष्मतीं ययौ ॥**

–सभापर्व अ० ३१ श्लोक १६–१८.

या श्लोकांवरून असें दिसतें कीं, पांड्य हा दक्षिणापथाचा भाग नव्हता.

सह्यपर्वतांत उत्पन्न होणाऱ्या दक्षिणापथांतील नद्या म्हणून कृष्णा व गोदावरींचा उल्लेख आहे, पण त्यांत तापी व नर्मदा येत नाहींत, असा वायुपुराणाचा आशय आहे. त्या विधानावरून तापीतट प्रदेशाचा दक्षिणापथांत अंतर्भाव होत नव्हता असें वायुपुराणाचें मत आहे असा निर्णय रा. काणे यांनीं कसा काढला हें स्पष्ट होत नाहीं. दक्षिणापथाच्या व्याप्तीच्या विषयावर आपणांस परकीय पण महत्त्वाचें अन्य मत उपलब्ध आहे. पेरिप्लस मात्र बरीगाझा ( भडोच ) पासून नौरा व टिन्डिस ( व्यापाराचीं मुख्य केंद्रें ) पर्यंतचा प्रांत म्हणजेच दखिनबेडस असें म्हणतो. नौरा व टिंडिस ह्या द्राविडांतील म्हणजे पेरिप्लसच्या 'डामिरिकां'तील त्या काळांतील सुप्रसिद्ध पेठा होत्या. * आज सुद्धां 'दख्खन' हा शब्द कन्याकुमारी ते नर्मदेपर्यंतच्या सर्व प्रदेशाला लावतात. कामसूत्राचा भाष्यकार म्हणतो कीं, नर्मदेच्या दक्षिणेचा प्रदेश म्हणजेच दक्षिणापथ. नर्मदा व कृष्णा यांमधील प्रदेश असा सुद्धां त्यांचा अर्थ कधीं कधीं करितात. महाराष्ट्र व दक्षिणापथ यांत कांहींच अंतर नाहीं अशी वृत्ति कांहीं लेखकांनीं दाखविली असें वाटतें. † दक्षिणापथांत कोणता प्रदेश येत नाहीं याविषयीं विधान करतांना रा. काणे यांनीं त्यांत कोंकणचा उल्लेख केला आहे. त्या विधानास त्यांनीं आधार दिला नाहीं. रा. काणे यांचें मत चुकीचेंच आहे असें म्हणतां येत नाहीं, किंबहुना ज्याप्रमाणें आजहि प्रदेशनामाच्या व्याप्तीसंबंधानें भिन्न मतें आहेत त्याचप्रमाणें प्राचीन काळांतहि असणें शक्य आहे. कोंकणाला दक्षिणापथांत घालणारा एक उल्लेख कथासरित्सागरांत आहे, त्याकडे रा. काणे यांचें लक्ष गेलें नसावें.

* Sehoff's Periplus p. 44.

† इंडियन अँटिक्वरी ग्रंथ १६. पृ. ४

**तत्र चाधीतविद्यास्ते त्रयोऽप्यानाथ्यदुःखिताः ।**
**ययुः स्वामीकुमारस्य दर्शने दक्षिणापथम् ॥**
**तत्र ते चिंचिनी नाम नगरीमंबुधेस्तटे ।**
**गत्वा भोजिकसंज्ञस्य विप्रस्य न्यवसन् गृहे ‡ ॥**

आतांपर्यंतच्या विवेचनावरून ज्याला 'महाराष्ट्र' म्हणूं लागले त्या देशाला इसवी सनापूर्वी अनेक शतकें व त्या सनानंतरहि अनेक शतकें 'दक्षिणापथ' हा शब्द प्रचलित होता असें दिसून येईल.

**३३ महाराष्ट्र शब्दाचा उपयोग. रामायण व महाभारत यांजकडून अग्रलेख. पुराणांतून ( वायु, ब्रह्म, मार्कंडेय ) उल्लेख महावंश, वीनय पीटक, सामंतप्रासादिक, वगैरे बौद्ध ग्रंथाचा कसवा. वराहमिहिर व अंकित लेख.**

३३. आतां महाराष्ट्राबद्दल प्राचीन उल्लेख कोणते आहेत, या प्रश्नाकडे आपण वळूं. आज उपलब्ध असलेल्या व ज्याचा काल निश्चित आहे अशा इसवी सनापूर्वीच्या अनेक ग्रंथांपैकीं कोणत्याहि ग्रंथांत 'महाराष्ट्र' हा शब्द कोणत्या तरी प्रदेशाला लावला आहे असें दाखविणारा उतारा उपलब्ध नाहीं. रामायणांत व महाभारतांत तर याचा उल्लेख मुळींच नाहीं; पण पुराणांतून महाराष्ट्र देशाचा उल्लेख आहे. ( वायुपुराण ४५, ११०; ब्रह्मपुराण २७, ५५; मार्कंडेय ५७, ४६; ) यांतून महाराष्ट्राच्या नंतर माहिषिक अथवा माहिष्क असें नांव आलें आहे. असें जें नांव येतें तें महाराष्ट्राचें म्हैसूरशीं सामीप्य सुचवितें. मत्स्यपुराणांत (अ. ११४) महाराष्ट्राच्या अगोदर नवराष्ट्र असें नांव सांपडतें. त्यावरून मात्र नवराष्ट्राच्या स्थानाविषयीं कांहीं निर्णय काढतां आला नाहीं.

महाराष्ट्र देशाबद्दलचा सगळ्यांत जुना पण अत्यंत स्पष्ट उल्लेख सीलोनमधील महावंश या ग्रंथांत आला आहे. §

‡ ते विद्या संपवून अनाथपणामुळें पीडलेले दक्षिणपथांत स्वामीकुमाराच्या दर्शनासाठीं गेले. तेथें समुद्रकाठीं चिंचिणी नांवाच्या नगरीस जाऊन भोजिक नांवाच्या विप्राच्या घरीं राहिले.

§ या ग्रंथाचा काळ इ. स. ४५९ ते ४७४ असल्याचें सांप्रदायिक मत आढळतें. पण डॉ. फ्लीट यांचें असें मत आहे कीं, महावंश हा ग्रंथ ५२० ते ५४० चे दरम्यान रचला असावा. ( Vide R. A. S. 1907 p. 5 1); याशिवाय गायगर आणि बोडे यांनीं संपादिलेल्या महावंशाची प्रस्तावना पहा. धातुसेन हा ख्रिस्तानंतर सहाव्या शतकाचे आरंभीं राज्य करीत होता. याच सुमारास हा ग्रंथ लिहिला गेला, असें मत रा. काणे व्यक्त करतात.

मौर्य चक्रवर्ती अशोक राज्यावर बसल्यानंतर सतरा वर्षांनीं मोगलिपुत्त तिष्य यानें कांहीं 'थेर' * या पदवीचे धर्मोपदेशक निरनिराळ्या देशाला पाठवून दिले असें महावंशांत म्हटलें आहे. "त्यानें थेरो मज्जहंतिकाला काश्मीर व गांधारदेशाकडे पाठविलें, व थेरो महादेवाला महिसमंडलाकडे धाडलें; त्याच प्रमाणें थेरो रखिताला वनवासीकडे, थेरो योनधम्मरखिताला अपरांतकाला, थेरो महाधर्मरखिताला महारट्टाकडे पाठविलें व थेरो महारखिताला योन देशाला धाडलें. (टर्नरचा महावंसो. पा. ७१; गायगरचा महावंश पा. ८२ व ८५); त्याचप्रमाणें विनयपिटक (ओल्डेनबर्ग) ग्रं. ३. पा. ३१४ पहा. (समंतपासादिकांतहि याच देशांचीं धर्मोपदेशकांचीं नांवें आलीं आहेत.) तसेंच या ग्रंथांत म्हटलें आहे कीं, "महाधम्मरखितानें महारट्टांतून जातांना महानरद कस्सपोजातकाचा उपदेश केला." †

मूळचा परकीय पण भारतीयांस मान्य असा वराहमिहिर आपल्या बृहत्संहितेंत महाराष्ट्रीयांसंबंधीं थोडेंसें फाजीलपणानें लिहितो. "भाग्ये रसविक्रयिणः पण्यस्त्रीकन्यका महाराष्ट्राः" (बृहत्संहिता, कर्नची प्रत १०, ८) ऐहोली एथील शिलालेखांत (इ. नं. ६३४) असें म्हटलें आहे कीं, चालुक्यांचा सत्याश्रय पुलकेशी (दुसरा) तीनहि महाराष्ट्रांचा सार्वभौम राजा झाला व त्याबद्दल या लेखांत पुढील शब्दांत त्याची स्तुतिहि केली आहे.

**अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणाम् ।**
**नवनवतिसहस्रग्रामभाजां त्रयाणाम् ॥**

इंडियन, ॲ. व्हा. ८. पृ. २४१.

हिंदुस्थानच्या इतिहासकारांस ज्याला कधींच विसरतां येणार नाहीं, असा प्रसिद्ध चिनी प्रवासी हुएनत्स्यांग (हा ६२९ ते ६४५ च्या दरम्यान हिंदुस्थानांत होता) महाराष्ट्राला 'मोहोलोश' असें म्हणतो व या देशाविषयीं विस्तृत व उपयोगी माहिती देतो. त्या माहितीचा अर्थ लावण्याची खटपट बऱ्याच जणांनीं केली आहे. ‡

वात्स्यायनाच्या कामसूत्रांत व्यंग्योक्तीनें महाराष्ट्रांतील स्त्रियांच्या चालीरीति सांगितलेल्या आहेत. वररुचि आपल्या प्राकृत व्याकरणांत महाराष्ट्रांतील भाषेला उत्तम प्राकृत असें म्हणतो.

महाराष्ट्री ही जेव्हां नामाभिधान पावली तेव्हां महाराष्ट्राचें अस्तित्व अगोदरच सिद्ध झालें. दण्डी स्पष्टपणें महाराष्ट्राच्याच भाषेला गौरवाचे शब्द लावीत आहे. §

वरील उताऱ्यावरून असें स्पष्टपणें सिद्ध होतें कीं, इसवी सनापूर्वींच अनेक शतकें 'महाराष्ट्र' हा शब्द प्रचारांत होता. वैयाकरण वररुचि हा नंदकालीन होता, हें बृहत्कथेचें सांगणें जर अमान्य करण्यास आपणांस सबळ कारण दाखवितां येणार नाहीं तर वररुचि ज्या महाराष्ट्री भाषेचें वर्णन 'प्रतिष्ठित भाषा' म्हणून करतो त्या महाराष्ट्राचें अस्तित्व नंदपूर्वकाळीं कांहीं शतकें असलें पाहिजे, यांत संशय नाहीं. तें बुद्ध पूर्वकालीनहि असूं शकेल. जेव्हां प्रचारक नेमले गेले तेव्हां 'महाराष्ट्र' अस्तित्वांत होतेंच. त्या काळीं प्रचारकांच्या नांवाशीं जीं देशनामें जोडलीं गेलीं तीं तशींच्या तशींच उत्तर काळापर्यंत चालत येऊन ग्रंथीं समाविष्ट झालीं. 'महावंश' हा ग्रंथ परंपरागत वृत्ताच्या आधारें लिहिलेला आहे. तेव्हां त्यांत बुद्ध धर्माचीं केंद्रें व त्यांच्या उपदेशकांचीं क्षेत्रें म्हणून सांगितलेलीं शहरें व देश हे कल्पित नसून त्या वेळचीं तीं खरीं स्थलनामें असावींत, हें कोणीहि नाकारीत नाहीं. परक्या ठिकाणचा ग्रंथकार परंपरागत आलेलीं नांवेंच देईल; त्यांत फेरफार करण्याचें स्वातंत्र्य घेणार नाहीं. फेरफार करील तर ते नकळत अपभ्रंशरूपीच करील. त्याअर्थी जेव्हां प्रचारकथा सिंहलद्वीपांत गेल्या तेव्हां 'महारट्ठ' हें नांव अस्तित्वांत होतें हें उघड होतें.

**आधारग्रंथ**— हे जागोजाग दिलेलेच आहेत. 'दक्षिणापथ' या शब्दाचा उपयोग वारंवार कथासरित्सागरांत येतो. त्या ग्रंथांतील कथांचा सविस्तर परामर्श पुढें घेतलाच आहे.

---

* थेर=स्थविर=वृद्ध. थेर या शब्दाचें तिरस्कारव्यंजक रूप थेरडा हें आज प्रचलित आहेच.

† टर्नर महावंसो, पृ. ७४.

‡ Beal's Buddhist Records of the Western world, Vol. II, p.255. ff. Beal's Life of Hiouen Thsang, p. 146; Bom. Gaz. I. part II, p. 184; Cunningham's Ancient Geography of India p. 553

§ महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः (काव्यादर्श १. ३४)

प्रकरण ४ थें.

# महाराष्ट्र आणि महारट्ठ.

### ३४ महारट्ठ लोकनामाची प्राचीनता. राष्ट्रिकांचें आगमन व त्यावर राजवाड्यांचें मत.

३४. महाराष्ट्रांत अत्यंत प्राचीन काळीं कोणत्या जाती होत्या, त्यांचें पुढें काय झालें आणि जातींची घटना आणि विघटना कशी होते, हा एक स्वतंत्र विषय आहे. त्याचें विवेचन स्वतंत्रपणें येईलच. येथें एवढेंच सांगत आहें कीं, अत्यंत प्राचीन काळीं, कोळी, भोई, महार आणि रठ्ठ यांची वस्ती महाराष्ट्रांत होती, व त्यामुळेंच स्थलनामें व भाषानामें निश्चित झालीं आहेत.

भाषेचें नांव, देशनाम त्याचप्रमाणें लोकनामहि शातवाहन काळीं निश्चित झालें होतें, असें उपलब्ध पुराव्यावरून स्पष्ट म्हणतां येतें.

'महारठ्ठ' हें 'मराठे' या शब्दाचें पूर्वरूप असून तें ब्राह्मी लिखाणांच्या काळापासून एकसारखें उपयोगांत आहे. नानाघाट, भाजें, कार्ली व कान्हेरी येथील शिलालेखांतून दान करणाऱ्या पुरुषांच्या नांवाच्या पाठिमागें 'महारठि' व स्त्रियांच्या नांवाच्या पाठिमागें 'महारठिनी' असें लिहिलेलें असतें. नानाघाट क्रमांक १ शिलालेख यांत "वेदिसिरिस....महारठिनो" हे शब्द आले आहेत. आवे. ५. पृ. ६०. तसेंच बर्जेस व भगवानलाल यांच्या "पश्चिम हिंदुस्थानांतील लेणीं" यांत पान २४ वर 'महारठिस कोसकीपुतस विण्हुदतस (भाजें लेख) आणि 'महाभोयबालिकाय महादेविय महारठिनिय' (बेडसें लेणें २) हे शब्द आहेत. तसेंच महारठिस गोतिपुत्रस अगिमित्रणकस (कार्लें लेणें आवे ५. पृ. २८) महाभोजिय बालिकाय महाठिणिय; (कान्हेरी लेणें आवे ५. पृ. ८६) असे शब्द आले आहेत. हे सर्व महारठ शब्दाचे उपयोग महाराष्ट्राचे देश व लोक या नात्यानें अस्तित्व निःसंशय सिद्ध करतात.

प्रसिद्ध इतिहास संशोधक राजवाडे आपल्या 'महाराष्ट्राचा वसाहतकाल'* या लेखांत आणि राधामाधवविलासचंपूच्या प्रस्तावनेंत † महाराष्ट्र नांवाची व्युत्पत्ति व महाराष्ट्रीयांच्या पूर्वजांचीं परिभ्रमणें देण्याचा आणि वंश निश्चय करण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या मतें मगध देशाधिपति महाराजांचे जे भक्त ते महाराष्ट्रिक बौद्ध क्रांतीला कंटाळून दक्षिणारण्यांत शिरले. त्यांच्या दक्षिण प्रवेशाचा काळ राजवाडे यांच्या मतें शकपूर्व सहाशें असा आहे. अशोकाच्या शिलालेखांत उल्लेखिलेले राष्ट्रिक (रिस्टिक) आणि महाराष्ट्रिक



चित्रांक १४. भाजाच्या विहारलेण्यांत दिसून येणारें एक स्तंभशीर्षक.

अगदीं निरनिराळे होत. या महाराष्ट्रिकांनीं नर्मदेपासून भीमेपर्यंतचा सह्याद्रिकिनारा आणि देवगिरीपासून पैठणचा प्रांत व्यापिला. कालांतरानें महाराष्ट्रिकांच्या खालच्या भागांतले वैराष्ट्रिक आणि राष्ट्रिक यांचाहि समावेश महाराष्ट्रिकांत होऊन या तिघांचे देश मिळून त्रिमहाराष्ट्रिक बनलें. सोळाशें वर्षेंपर्यंत दक्षिणेंत महाराष्ट्रिकांनीं स्व (?) धर्मसंरक्षणाचें काम केलें. इत्यादि इत्यादि.

राजवाडे यांनीं 'महा' शब्दाचें स्पष्टीकरण 'महार' शब्दा व्यतिरिक्त करण्यासाठींच मागध महाराजांचा आश्रय महाराष्ट्रीयांच्या पूर्वजांस घडविला काय अशी शंका येते. शिवाय 'शकपूर्व सहाशें वर्षें या कालाच्या पूर्वी महाराष्ट्रांत

* इतिहास आणि ऐतिहासिक मासिक ऐतिहासिक विविध विषय पृ. २९०.

† परिच्छेद ८४ पासून पुढें ग्रंथप्रकाशक चित्रशाळा.

मनुष्यवस्ती फारशी नसावी ’ ही कल्पना त्यांच्या मनांत असल्यामुळें त्यांना बाहेरचे लोक आणण्याची इच्छा झाली आणि त्या लोकांना येण्याचें कारण दाखविलें पाहिजे म्हणून मगधाधिपतीच्या महाराजांच्या भक्तांना बौद्ध क्रांतीला कंटाळण्याचें श्रेय राजवाड्यांनीं दिलें आहे. महाराष्ट्रिकांना बौद्ध धर्माची एवढी जुगुप्सा असती तर दक्षिणेंत पुढें मोठमोठे पर्वतीय बौद्ध विहार कसे उत्पन्न झाले असते, याविषयीं शंका राजवाड्यांच्या मनास शिवली नसावी, असें दिसतें. अशोकाच्या लेखांतलें राष्ट्रिक हेंच जर महाराष्ट्रीयांचें आद्यजनक घेतलें तर ‘ महा ’ शब्दाचें स्पष्टीकरण होत नाहीं; म्हणून मगध महाराजांकडे जावें लागलें आणि त्यानंतर उत्तर कालीन वस्तुस्थितीशीं म्हणजे पुराव्याशीं विसंगत अशी अनुमानपरंपरा राजवाडे यांस चिकटवावी लागली.

राजवाडे यांनीं आपल्या विधानाला समाधानकारक आधार दिला नाहीं. माझ्या मतें ‘ राष्ट्रिकांचें आगमन त्याहूनहि अत्यंत प्राचीनकाळीं असावें’ असें आहे. ‘ महाराष्ट्र ’ हें नांव राष्ट्रिकांमुळें आलें असें गृहीत धरलें, तर वररुचीच्या कालाच्या पूर्वी अनेक शतकें या प्रदेशांत राष्ट्रिकांचें म्हणजे रट्ठांचें आगमन होऊन त्यांचेंच नांव देशाला मिळावें, इतकें तेथें त्यांचें जुनेपण झालें असलें पाहिजे. ‘ महाभोज ’ आणि ‘ महारठि ’ अशीं दोन नांवें दिसतात या गोष्टीस देखील महत्त्व आहे. दोन्ही नांवें संयुक्त समाजाचीं द्योतक आहेत. एका ठिकाणीं महार आणि भोज म्हणजे भोई यांचं एकत्व होऊन संयुक्त समाज स्थापन झाला असावा आणि दुसऱ्या ठिकाणीं महार आणि राष्ट्रिक यांचा संयुक्त समाज झाला असावा. महारांचा उल्लेख हालाच्या सप्तशतींत नाहीं. ‘ महार ’ हेच प्राचीनकाळीं ‘ हलिक ’ या नांवानें प्रसिद्ध असावेत. हलिकांप्रमाणेंच भोई आणि भोइणी यांचा उल्लेख सप्तशतींत आहे, आणि महाभोजांचा उल्लेख अनेक अंकित लेखांत आहे. त्यांपैकीं एकाचें अवतरण वर केलेंच आहे. त्या अवतरणांतील ‘ भोय ’ या शब्दाचा अर्थ ‘ भोई ’ असा करणें अत्यंत अग्राह्य आहे, असेंहि अनेक वाचकांस वाटण्याचा संभव आहे. तथापि येथें केवळ मतनिर्देशापलीकडे जातां येत नाहीं. मतसिद्धीचा उपक्रम पुढें होणारच आहे.

### ३५ ‘ महारट्ठ ’ या शब्दाच्या अर्थाविषयीं मतभेद.

३५. डॉ. स्टीव्हन्सन व डॉ. भगवानलाल हे दोन अभ्यासक गृहस्थ ‘ महारठि ’ याचा अर्थ ‘ मोठा योद्धा ’ व ‘ महारठिनी’ याचा अर्थ ‘ वीरपत्नी ’ असा करतात; पण यांच्याशीं विरोध दाखवून रा. काणे असें दाखवितात कीं, त्यांनीं लावलेल्या अर्थांना पुष्कळ विरोध आहे. पहिली गोष्ट ही कीं, असल्या लहान अर्पणपत्रिकेंत कोणालाहि ‘ महारठि ’ (महारथि) म्हणण्याचें प्रयोजनच नाहीं. वरें, आतांपर्यंत उपलब्ध असलेले अनेक शिलालेख जर आपण लक्षपूर्वक वाचले तर असें आढळून येईल, कीं, दान करणाऱ्या गृहस्थाचें नांव, गांव, त्याचा मानमरातब, धंदा, कूळ, व त्याचा इतर लोकांशीं असलेला संबंध याशिवाय कांहींहि नसतें. या दृष्टीनें पाहतां ‘ महारठि ’ चा अर्थ ‘ महारठांत रहाणारा वा त्या जातीचा ’ असा करणें अधिक सयुक्तिक व योग्य आहे.* पुनः ‘ महारठि ’ हा शब्द ज्या नांवांच्या पाठीमागें लावलेला ते सर्वच या मोठ्या मानास योग्य होते, असें म्हणण्यास आधार नाहीं. उलट त्यांतले पुष्कळ युद्धास अननुरूप पेशाचेच होते, असें दिसतें. असेंहि दिसून येईल कीं, वरील सर्व शिलालेखांतून दान करणाऱ्याच्या नांवांच्या पाठीमागें बहुतेक त्यांचें रहाण्याचें ठिकाण पंचमी विभक्तींत घातलेलं असतें, किंवा त्यांच्या नांवाबरोबर एकादा सन्मानदर्शक शब्द असतो. असो. रा. काणे यांचा आक्षेप ‘ महारठि शब्द ’ आलेल्या सर्व ठिकाणीं सयुक्तिक वाटत नाहीं तरी तो महत्त्वाचा आहे.

‘महाराष्ट्र’ हा शब्द इसवी सनानंतर ५०० वर्षांनीं उपयोगांत आला, असें गृहीत धरून ‘ महारठि ’ या शब्दाचा निराळाच अर्थ लावला पाहिजे, असा अनेकांचा आग्रह आहे. हे लोक ‘महाराष्ट्र’ हा देशशब्द या नात्यानें ख्रिस्ती शक ५०० पूर्वी नव्हता ही गृहीत गोष्टच आक्षेपणीय आहे, हें विसरतात.

### ३६ महाराष्ट्र शब्दाची व्युत्पत्ति. ‘ महार ’ जातीचा संबंध महाराष्ट्राशीं लावण्याबद्दल कांहीं पाश्चात्य ग्रंथकारांचा आग्रह व देशी ग्रंथकारांचा विरोध.

३६. हिंदूंतील ‘महार’ या अस्पृश्य जातीवरून ‘महाराष्ट्र’ हें नांव पडलें असावें, अशा तऱ्हेचा अर्थ मोल्स्वर्थ साहेबांनीं आपल्या मराठी शब्दकोशांत सांगितला आहे. याच अर्थाची पुनरावृत्ति जॉन विल्सन यांनींहि केली. ( इंडि. अँटि. ग्रंथ ३ पृ. २२१ ) आपल्या अर्थाच्या पुष्टयर्थ त्यांनीं ‘गांव आहे तेथें महारवाडा आहे ’ या म्हणीचा आधार सांगून गुर्जर–राष्ट्र, सौराष्ट्र वा सौर–राष्ट्र ( शूरांचें राष्ट्र ) या शब्दाशीं त्याची तुलना केली आहे. या विद्वानांची अशी समजूत आहे कीं, आजच्या महाराष्ट्राचे मूळचे रहिवासी म्हणजेच महार. त्यांना उत्तरेकडच्या लोकांनीं जिंकलें व त्यांनीं ‘महार’ या मूळ जातीवरून या प्रदेशाला ‘महाराष्ट्र’ असें नांव

* उदाहरणार्थ ‘ महारठकोसिक ’ ( मुंबई रा. ए. चें नियतकालिक, वर्ष ग्रंथ ५. पृ. १५३ ).



चित्रांक १५. बेडसें येथील चैत्यगृह, जिल्हा पुणें.

दिलें. मोल्स्वर्थ आणि विल्सन यांचें मत आजच्या महाराष्ट्रीयांस रुचिकर वाटत नाहीं, यांत शंका नाहीं; तथापि या कल्पनेस जे आक्षेप भांडारकर, काणे, वगैरे मंडळींनीं घेतले आहेत तेहि समाधानकारक नाहींत.

'महाराष्ट्र हा महारांचा देश' ही कल्पना वरील मराठी म्हणी वरून कशी सुचते, असें रा. काणे चौकसतात. त्यांना उत्तर असें कीं, ती म्हण महारांच्या वसतीच्या व्यापकतेची सूचक आहे. जेथें अगोदर वसती असते तिच्या शेजारींच नवीन वसती येते, आणि नवीन वर्ग जेता असला म्हणजे आपली वस्ती हा मुख्य ग्राम समजतो आणि जुनी वसती त्या गांवाच्या 'नेटीव क्वारटर्स' समजतो, ही गोष्ट आजहि दिसत आहे. त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील वसाहतीची स्थिति झालेली आहे. प्रत्येक ठिकाणीं गांव आहे व तो महारवाड्याच्या शेजारीं वसलेला आहे, व त्यामुळें 'जेथें गांव तेथें महारवाडा' या तऱ्हेची म्हण स्वाभाविक आहे. महारांचा महाराष्ट्राशीं संबंध जोडण्यासाठीं जे प्रयत्न झाले आहेत त्यांतील कित्येक दूरान्वयाचे व कांहीं इतिहासाशीं पारखे असणारांचे झाले आहेत, आणि त्यांच्या प्रयत्नांतील दोषांमुळें 'महार' शब्दाचा महाराष्ट्राशीं संबंध असावा ही कल्पना बऱ्याच लोकांना हास्यास्पद झाली आहे.

'महारांचा संबंध महाराष्ट्राशीं असावा' ही कल्पना खोडून काढण्यासाठीं गस्टाव्ह आपर्ट या एका खुळ्या लेखकाचें मत रा. काणे यांनीं अवतरिलें आहे. आपर्ट महार व मल्ल यांचा संबंध जोडतो व महाराष्ट्राला 'मल्लराष्ट्र' म्हणत असें सांगतो. पुढें म्हणतो कीं, "मल्ल व मारा एकच. मारा हे मार किंवा म्हार म्हणून प्रसिद्ध आहेत. म्हार म्हणूनच महार हा शब्द झाला व हे दोन्ही शब्द मराठींत आजसुद्धां प्रचारांत आहेत. म्हणूनच मल्लराष्ट्र व महाराष्ट्र हे दोन्ही शब्द उपयोगांत होते. पहिला शब्द उपयोगांत येईनासा झाला व पुढें महारांचा पाडाव झाल्यानें महाराष्ट्राचा व त्यांचा संबंध विस्मृत होऊन महाराष्ट्राचा 'मोठें राज्य' असा अर्थ निघाला. मल्लांचा व महारांचा देश हें नांव नाहींसें झालें." (भारतवर्षांतील मूळचे रहिवासी. १८९३, पा. २२ टीप). या पेक्षां उथळ उतारा सांपडणें शक्य नाहीं. या तऱ्हेनें रा. काणे यांनीं ह्या लेखकाच्या मताची थोडक्यांत संभावना केली आहे.

डॉ. आपर्ट या कल्पनेच्या भराऱ्या मारणारा व लक्ष देण्यास निरुपयोगी अशा लेखकाचें जादा विधान खोडलें म्हणजे मूळ विधान खोडलें असें होत नाहीं. रा. काणे पृच्छा करतात "महाराष्ट्रांत महारांचें राज्य होतें याविषयीं डॉ. आपर्टनीं एकादा तरी लेख पुढें आणला आहे काय? भाषाशास्त्रांतील कोणत्या नियमानुसार त्यांनीं 'मल्ल' व 'म्हार' यांचा संबंध जोडला? 'मल्ल' हे आजच्या महाराष्ट्रांत रहात होते, हें दाखविण्यास त्यांनीं कोणत्या जुन्या संस्कृत ग्रंथाचा आधार सांगितला आहे?" 'आपण मुळचे रहिवासी' असें महार म्हणतात. केवळ त्यांवर विश्वास ठेवून 'महाराष्ट्र' हें नांव त्यांच्या नांवावरून ठेविलें गेलें असेंहि गृहीत धरण्याचा आरोप रा. काणे यांनीं प्रतिपक्षावर केला आहे. मल्लांशीं असंबंध सिद्ध करण्यापुरती रा. काणे यांची टीका ग्राह्य आहे; पण महारांचें जेतृत्व सिद्ध करण्यास त्यांनीं केलेलें आव्हान स्वीकारणें अनवश्य आहे.

### ३७ महारांचें नांव देशास मिळालें या विधानास महारांच्या हीन स्थितीचा पुरावा अपकर्षक होत नाहीं.

३७. एकाद्या विशिष्ट लोकांचें अगर जातींचें नांव देशाला पडलें असें म्हणण्यास ते लोक त्या देशाचे जेते होते, असें मुळींच होत नाहीं आणि त्यामुळें महारांच्या नेतृत्वास प्रमाण रा. काणे मागतात, त्याप्रमाणें तें दाखविण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. उलटपक्षीं जितलोकांचेंच नांव देशास जेत्याकडूनहि दिलें जातें. 'हिंदुस्थान' हें नांव शेजाऱ्यांनीं हिंदुस्थानास दिलें व तेच शेजारी इराणी व अफगाण पुढें जेते झाले. अमेरिकेमध्यें आज जीं अनेक संस्थानांचीं नांवें आहेत तीं रेड इंडियन लोकांच्या जातींचीं नांवें आहेत. उदाहरणार्थ, डाकोटा. 'डाकोटा' या नांवाची एक जात होती किंवा राष्ट्र होतें त्यावरून 'डाकोटा' हें नांव संस्थानास पडलें. अमेरिकेंतील संस्थाननामांखेरीज अनेक स्थलनामें रेड इंडियन जातींचींच आहेत. उदाहरणार्थ केयूगा, कननडैग्वा वगैरे. ज्या देशांत जे लोक प्रमुख असतील किंवा बऱ्याच जमावानें असतील त्या लोकांचें नांव देशाला पडतें. जेता परका असला तरी तो पुढें तेथील लोकांचाच अग्रणी होतो. संस्कृत वैयाकरण लोकनामच राजास आहे असा नियम सांगत आहेत. आंध्र म्हणजे आंध्र जातीचे लोक किंवा आंध्रांचा राजा. एवंच महार लोकांचें राज्य तें महारराज्य होय. 'महाराज्य, भोज्य' असे शब्द ब्राह्मणांत येऊन गेलेच आहेत. महाराज्य, म्हणजे महारांचें राज्य म्हणजे महाराष्ट्र व भोज्य म्हणजे भोजांचें म्हणजे भोयांचें राज्य, असा अर्थ घ्यावयास मला अजून हरकत दिसत नाहीं. संवयीमुळें भोई, कोळी, हीं राष्ट्रस्वरूपी जातींचीं नांवें धंद्याचीं नांवें आहेत, अशी बऱ्याच लोकांची समजूत झाली आहे, ती चुकीची आहे. भोई किंवा कोळी या शब्दांचा अर्थ मासे पकडणारे असा होत नाहीं, व भोई याचा पालखीवाहक असाहि होत नाहीं.

'महाराष्ट्र' हें नांव केव्हां पडलें याचा शोध करतां करतां आपणांस वररुचीच्या काळापूर्वी पर्यंत गेलें पाहिजे. त्या काळांत येथील लोक आपणांस महार म्हणवीत नसतील कशावरून? त्या वेळेस प्रथम महारांची वस्ती असणें व मागाहून भोयांची वस्ती असणें हा अत्यंत शक्य असा इतिहास वाटतो. म्हारांखेरीज सर्व महाराष्ट्रभर पसरलेली अशी दुसरी जातच प्राचीनकाळीं नसावी. आज मराठ्यांचीं जात जरी महाराष्ट्रभर पसरलेली आढळते तरी ही जात मूलतः भिन्न-वंशीय असून नुकतीच कोठें एकजीव होऊं लागली आहे. 'महारठ्ठ' किंवा 'मराठे' हें नांव पुण्याच्या आसपासच्या लेखांत सांपडतें; परंतु या नांवाची व्याप्ति जुन्या काळांत थोडी होती.

'मराठे' या नांवाची व्यापकता कशी वाढत गेली व आज-सुद्धां कशी वाढत आहे, याचें वर्णन अन्यत्र केलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे असें सांगतां येईल, कीं, 'महारठी' या नांवाचा एक केंद्रीभूत वर्ग अत्यंत प्राचीन-कालीं म्हणजे शातवाहनकालीं होता, यांत शंका नाहीं; तथापि कुणबी वर्गानें तो शब्द मुळींच स्वीकारला नव्हता. सर्व भोंव-तालच्या कुणबी जाती आपणांस पेशानें कुणबी (कुटुंबी-प्रतिष्ठित गृहस्थ) म्हणवी. 'महाराष्ट्र' हें कधींच राष्ट्रनाम नसल्या-मुळें सर्व कुणबी लोकांना 'महारठ्ठ' म्हणवून घेण्याचा काळ आला नाहीं. सर्व कुणब्यांनीं 'मराठा' म्हणवून घेण्याची चळवळ अलि-कडील आहे. 'मराठा' हा आतां जातिविषयकच शब्द बनत असून त्याला राजकीय स्वरूप नाहीं. अशा काळाची कल्पना करा कीं, ज्या काळांत महारांचीच वस्ती होती अशा वेळेस भोंव-तालचे लोक त्या प्रदेशास काय म्हणणार? अर्थात् 'महारांचें राष्ट्र' म्हणणार, हें उघड आहे. 'महार' हे त्या वेळेस कुटुंबी ऊर्फ कुणबी हें नांव धारण न करतां 'हलिक' हें नांव धारण करीत असले पाहिजेत. त्या वेळचा सर्व जानपद वर्ग महारच असावा व तो आणि त्यांतील शिष्ट वर्ग आपणांस 'हलिक' म्हणवीत असावा. महारांचें सामाजिक स्थित्यंतर शातवाहनो-त्तरकाळीं झालें असावें. जे हलिक असतील ते महारच असा-वेत, ही शक्यता आहे. यासंबंधाचें विवेचन पुढें येणारच आहे. सध्यां एवढें म्हणणें प्राप्त आहे कीं, महारांचें राष्ट्र किंवा महार आणि रठ्ठ हें स्पष्टीकरण नाकारण्यास किंवा विक्षिप्त ठरविण्यास कोणताहि महत्त्वाचा पुरावा अजून आलेला नाहीं. 'महार' आणि 'रठ्ठ' यांच्या संयोगानें झालेल्या शब्दाचें संस्कृतीकरण झाल्यानंतर शब्दाचें अर्थांतर होऊं लागावें, यांत नवल नाहीं. 'महारांचें राष्ट्र' हें स्पष्टीकरण कांहीं भोळ्या अभिमानी मंडळीस अरुचिकर वाटत असलें तरी तेवढ्यावरून महारांचा देश शब्दांशीं संबंध असिद्ध होत नाहीं.

## ३८ महार, मिहिर आणि मैत्रक यांचा असंबंध.

३८. राजश्री काणे हे मिहिर व म्हार यांचा एकमेकाशीं संबंध नाहीं, असें दाखविण्यासाठीं जें लिहितात तें स्वीकारण्याजोगें आहे. महारांना चांगली स्थिति होती हें दाखविण्यासाठीं 'महारांचें राष्ट्र' या स्पष्टीकरणाच्या अभिमान्यांनीं विना-कारण ज्या बाष्कळ कल्पना उत्पन्न केल्या त्यांपैकींच मिहिर आणि महार यांच्या संबंधाची आहे, आणि तें मत खोडण्यास रा. काणे यांनीं शब्द खर्च केले आहेत.

महारांचे मिहिर व मैत्रक लोकांशीं संबंध जोडणारे विद्वान् आहेत, ते मिहिरांच्या गुजराथेंतील विजयी कारकीर्दीचा पुरावा देऊन महाराष्ट्रविजय सिद्ध करूं पहातात. मिहिर हे लोक 'हूण' जातीचेच घटक होत. यांनीं तोरमाण व मिहिर कुल यांच्या आधिपत्यकाळीं (काठेवाडांत वल्लभीच्या) गुप्तांना पराजित केलें, व नंतर सेनापति भट्टारकानें त्यांच्याशीं सामना दिला. एवढाच ऐतिहासिक पुरावा पुढें आणतात. रा. काणे मिहिरांचे गुजराथेंतील विजय मान्य करून त्यावरून महाराष्ट्रविजय सिद्ध होत नाहीं, असें दाख-वितात, आणि 'महाराष्ट्र' हें नांव त्याच्या नांवावरून पडणें शक्य नाहीं, असें आपलें मत देतात. मिहिर व मैत्रक लोकांनीं सिंध, रजपुताना, व काठेवाड वगैरे प्रांत काबीज केले याला पुरावा असला तरी ते लोक महाराष्ट्रांतहि आले होते, असे कोठें उल्लेख नाहींत. शिवाय 'महार' हे इतके उत्तरकालीन असून जर मैत्रकासारखे जेते होते तर ते पुढें समाजांत हीन स्थितीला कसे पोंचले, हें आपणांस पुराव्यानें दृश्य व्हावयास पाहिजे; पण हें आपणांस दिसत नाहीं. अशा तऱ्हेची टीका करून रा. पांडुरंगपंत सांगतात कीं 'महाराष्ट्र' हें नांव अगोदरच्याच काळांत पडलें त्याअर्थी महारांचा व मैत्रकांचा संबंध जोडून त्यांच्यावरून 'महाराष्ट्र' हें नांव पडलें, हें मत अग्राह्य ठरविण्यास जास्ती कारणें दाखविण्याची गरजच नाहीं. तोरमाण व मिहिरकुल यांच्या हाताखालीं हूण लोकांनीं गुप्त राजाशीं इ. स. नंतर ५ व्या शतकाच्या उत्तरार्धांत लढाई दिली; पण त्याच सुमारास रचल्या गेलेल्या महावंशांत महारठ्ठ नांवाच्या प्रदेशाचें नांव आलें आहे, हें आपणांस माहीत आहे. तोरमाणाच्या अधिपत्याखालीं जेव्हां हूण लोक स्कंधगुप्ताशीं लढत होते त्याचवेळीं 'महाराष्ट्र' हें नांव प्रचारांत होतेंच.

मिहिरावरून 'महाराष्ट्र' हें नांव निघालें नाहीं, हें रा. काणे यांचें मत ग्राह्य धरूनहि महारांचा महाराष्ट्राशीं शब्दोत्पादक संबंध नाकारतां येत नाहीं. काणे आणखी एक आक्षेप आणतात, कीं, दक्षिणेंतील स्वाऱ्यांच्या वेळीं

औदीच्यांनीं महारावरून 'महाराष्ट्र' हें नांव दिलें, हें खरें धरल्यास विंध्याद्रीच्या दक्षिणेकडील प्रदेशावरील उल्लेखांत (प्राचीन) महाराष्ट्राचें नांव आल्याविना राहिलें नसतें; पण त्या ऐवजीं 'अश्मक' व 'दक्षिणापथ' हीं नांवें येतात. याला उत्तर एवढेंच कीं, 'महाराष्ट्र' हा शब्द 'दक्षिणापथ' आणि अश्मक या शब्दांइतका जुना आहे; आणि वररुचीच्या काळीं त्या शब्दांचें अस्तित्व होतें आणि ज्या कारणामुळें 'महाराष्ट्र' हें नांव निर्माण झालें तें कारण, म्हणजे महारांकडून देशाची वसाहत, हें वररुचीच्या पूर्वीं अनेक शतकें उत्पन्न झालें होतें. अर्थात् इतक्या जुन्या काळचें वाङ्मयच अस्तित्वांत नाहीं आणि त्यामुळें 'महाराष्ट्र' शब्दाच्या जन्मास कारण झालेल्या महारांच्या आगमनासाठीं प्रमाण मागणाऱ्यास

**कथं स लक्ष्यप्रभवो भविष्यति**

असेंच उत्तर द्यावें लागेल.

## ३९ महारांचें प्राचीनत्व आणि त्यांचें नाग, हलिक आणि राष्ट्रिक यांशीं नातें.

३९. 'महाराष्ट्र' हा शब्द वररुचीच्या म्हणजे कात्यायनाच्या काळाच्या पूर्वींचा असल्यामुळें त्याचा उगम पहावयाचा झाल्यास बुद्धाच्या पूर्वींच्या काळाची सामाजिक व राजकीय स्थिति लक्षांत आणून त्यावर विचार केला पाहिजे; पण त्या काळाचीं इतिहाससाधनें या प्रश्नावर प्रकाश पाडीत नाहींत. 'त्या काळाच्या इतिहासाचीं साधनें कोणतीं' असें विचारलें असतां तीन चार साधनांचा उल्लेख करतां येईल. प्राचीनतम-वाङ्मयांतील प्राचीनतम आठवणी या कालाच्या इतिहासास साधनीभूत होतील. महाराष्ट्रांतील अत्यंत प्राचीन वाङ्मय म्हणजे हालांची सप्तशती होय. तीवरून असें दिसतें कीं, त्या वेळेस प्रमुख जानपद हलिक होते. गोदातट आणि विंध्य पर्वत हे दोन्ही प्रदेश वाङ्मयांत येत होते. भाषेला नांव प्राकृत हेंच अधिक प्रिय होतें. या वाङ्मयांत रट्ठांचा उल्लेख कोठेंच येत नाहीं व महारांचाहि येत नाहीं. म्हणजे महाराष्ट्र शब्दाचा इतिहास शोधणारास तो सातशें गाथांचा संग्रह फारशी मदत करीत नाहीं. वाङ्मयाशिवाय दुसरें साधन म्हटलें म्हणजे त्या काळची भाषा. तिचा सामाजिक इतिहासास उपयोग पुष्कळच होतो; पण जुनी मानववंशशास्त्रीय माहिती देण्याइतका महाराष्ट्री व इतर प्राकृतांचा अभ्यास वाढलेला नाहीं. प्राचीनकालचें जेव्हां साहित्य उपलब्ध नसतें तेव्हां त्या काळचें सातत्य आज ज्या परंपरांत आहे त्या परंपरांच्या आजच्या प्रतिनिधींची तपासणी अवश्य होते. त्या काळच्या लोकांचा आजपर्यंत आलेला वंश याच दृष्टीनें अभ्यासार्ह आहे. या दृष्टीनें जातींचे इतिहास महत्त्वाचे आहेत; पण ते अजून जातिमहत्त्वस्थापकांच्या तडाक्यांतून सुटून ऐतिहासिकांच्या कक्षेंत आले नाहींत. अनेक जातींचें सातत्य ५।६ शें वर्षें पर्यंत अभ्यासतां येतें; पण अधिक पाठीमागें जातां येत नाहीं. भाषेच्या दृष्टीनें पहातां सर्वांचीच भाषा स्थित्यंतर पावली आहे. महार हे इतर जातींप्रमाणें मराठी भाषा बोलणारे आहेत आणि या दृष्टीनें महारांचें भाषासातत्य बिघडलें आहे, असें म्हणतां येत नाहीं. त्यांचें स्थलांतर झालें असेंहि म्हणतां येत नाहीं. ज्या काळांत महाराष्ट्री ही भाषा होती ती भाषा बोलणारे लोक हे महारच असतील या कल्पनेस बाधक असा पुरावा नाहीं! महाराष्ट्रीची मराठी कशी व केव्हां झाली हें अजून आपणांस सांगतां येत नाहीं. मराठी चालुक्योत्तर काळीं झाली, असें अर्वाचीन मत आहे; तथापि महाराष्ट्री व मराठी यांच्या दरम्यान अपभ्रंश होता त्याचा काल कोणता त्याच्या मर्यादा निश्चित नाहींत. पैशाचीचें देखील थोडेंसें आक्रमण झालें असेल आणि त्यामुळें प्रतिष्ठित महाराष्ट्री भाषा नष्ट होऊन शातवाहनाच्या काळांत अपभ्रंश भाषेचा उदय झाला असेल अशी शंका उपस्थित होते व ती होण्याचें कारण शातवाहनांच्या काळीं अपभ्रंशाचें अस्तित्व होतें, अशी साक्ष बृहत्कथा देत आहे हें होय.

औदीच्य घराण्यांशीं संबंध बरींच राजघराणीं लावतात. मराठ्यांच्या जातीचा रजपुतांशीं संबंध बराचसा दिसतो तथापि रजपुतांचीं आडनांवें मराठ्यांप्रमाणें महारांतहि आढळतात. महारांमध्यें कुलपरंपरा कमी अबाधित राहिली असल्यामुळें आज विधान करणें कठीण जाईल, तथापि एवढें म्हणतां येईल कीं, महाराष्ट्रांतील अत्यंत प्राचीन लोकांचे वंशज महार असावेत, आणि त्यांचा नागांशीं संबंध त्या प्राचीनतेचा द्योतक असावा. जेत्यांनीं नागांस जिंकलें असे उल्लेख वारंवार दिसतात. पुराणांतील नागांचीं कुलनामें महारांत आडनांवें या रूपानें शिल्लक आहेत, असें राजवाडे यांनीं 'कोंकण व नागलोक' या इतिहाससंग्रहांतील लेखांत दाखविलें आहेच. एवंच अत्यंत प्राचीन वसाहत नागांची म्हणजे महारांची असल्यास 'महाराष्ट्र' म्हणजे 'महारांचें राष्ट्र' या प्रकारच्या व्युत्पत्तीस अधिक बळ येईल, यांत शंका नाहीं. महारांची वसती अत्यंत जुनी आहे, व 'नाग' म्हणून उल्लेखिलेल्या लोकांचे प्रतिनिधि तेच आहेत.

वर उल्लेखिलेल्या अनेक मतांची येथें केवळ मांडणी केली आहे त्यांची ग्राह्याग्राह्यता पुढें तपासली आहेच.

'महाराचें महाराष्ट्र' असें म्हणणें नाकारणारे लेखक आहेत, त्यांत कै. सर रामकृष्ण भांडारकरांचा समावेश होतो. त्यांचें

म्हणणें असें आहे कीं " राष्ट्रिक ऊर्फ रट्ट नांवानें प्रसिद्ध असे लोक होते. राष्ट्रिक तेच रट्ट व त्यांचेंच संस्कृत रूप राष्ट्रिक. रट्ट या जातीचे लोकच पुरातन कालापासून दक्षिणापथाच्या ( दक्षिणेच्या ) राजकारणांत सर्वांपेक्षां जास्ती दृग्गोचर होतात, व चालुक्यांच्या उदयापूर्वींच त्यांच्या जातींतील एक पोट-जात 'राष्ट्रकूट' या नांवाखालीं या देशावर राज्य करीत होती. तदनंतर 'रट्ट' या नांवाचे राजे बेळगांव जिल्ह्यांतील सुगंधवर्ति किंवा सौंदत्ति एथें राज्य करीत होते. भोज राजे विदर्भ व दक्षिणेचा इतर भाग यांवर अधिकार चालवीत होते, हें आपणांस माहीत आहे.........ज्याप्रमाणें भोज आपणांला 'महाभोज' असें म्हणत त्याप्रमाणेंच हे राष्ट्रिक रट्टि, रट्टि अथवा रट्ट लोक स्वतःला महारट्टि अथवा महारट्ठ असें म्हणत. म्हणून त्यांच्या देशाला ' महारट्ठ ' असें नांव पडलें. यालाच संस्कृतमध्यें महाराष्ट्र म्हणतात." डॉ. भांडारकरांचें म्हणणें स्वीकारलें नाहीं तथापि येथें दिलें आहे. जेव्हां अत्यंत प्राचीन नांवाची उत्पत्ति संशयातीत नाहीं तेव्हां भिन्न स्पष्टीकरणें वाचकांपुढें ठेवणें अवश्य आहे म्हणूनच भांडारकरांचें स्पष्टीकरण दिलें आहे. यावर रा. काणे यांचें भाष्य पुढीलप्रमाणें आहे.

### ४० महाराष्ट्र, दंडकारण्य आणि महाकांतार यांचा संबंध.

४०. महाराष्ट्र शब्दाची उपपत्ति लावतांना त्याचा राष्ट्र-कूटांशीं संबंध जोडण्याची जी पद्धति आहे तींतील मुख्य दोष रा. काणे यांच्या मतें कालदूरतामूलक असंबंधाचा होय. राष्ट्रकूट राजे इ. स. नंतर आठशें वर्षांनीं उदयास आले व 'महाराष्ट्र' हा शब्द त्यांच्या आगमनापूर्वी निदान तीनशें वर्षें लोकांत प्रचलित होता. इ. स. पू. २०० वर्षांपासून ते इ. स. नंतर ७५० वर्षेंपर्यंत अनुक्रमानें आंध्रभृत्य ( किंवा शातवाहन ), वाकाटक, आणि चालुक्यांनीं दक्षिणेंत राज्य केलें तर उत्तर कालीनांचें नांव देशाला कसें चिकटेल, अशी रा. काणे यांच्या मनांतली शंका आहे. महाराष्ट्राच्या राष्ट्रिकांचा संबंध नाकारणारी जी काणे यांची टीका आहे ती आमच्या मतें चुकीची आहे. कारण राष्ट्रिकांचा संबंध देशनामाशीं जोड-ण्यास राष्ट्रकूटाचें राजत्व आवश्यक नाहीं. केवळ जमावानें अस्तित्व पुरे आहे. शिवाय वररुचिपूर्वकाळीं राष्ट्रिक ही राष्ट्र-स्वरूपी जाति असावी.

डॉ. भांडारकरांचें म्हणणें चूक ठरवून रा. काणे आपलें मत मांडतांना ते दर्शनी अर्थाचेंच समर्थन करीत आहेत, असें दिसतें. ते म्हणतात, महाराष्ट्र म्हणजे 'मोठें अथवा विस्तृत राष्ट्र'. हाच दर्शनी अर्थ इतिहाससूचक आहे, असें समजून सांगतात कीं, इतिहासाला ज्ञात असलेल्या अगदीं प्राचीन काळापासून दक्षिणेंत महाकांतार, दण्डकारण्य अथवा महाटवी नांवाचें एक सुप्रसिद्ध अरण्य होतें, हळुहळू या अरण्याचा नाश होऊन तेथें वसाहत झाली; शहरें, गांवें वाढलीं व त्याला 'महाराष्ट्र' हें नांव मिळालें !! तसेंच त्याला महाकांतारहि म्हणत. "रामाच्या वनवासाची माहिती "* या लेखांत पार्गिटर म्हणतो कीं " बुंदेलखंडापासून कृष्णेपर्यंत पसरलेल्या सर्व प्रदेशाला 'दण्डक' हें नांव लावीत" रा. काणे यावरून अनुमान काढतात, कीं ( वनपर्व अ. ८५, ४०–४२ ) मध्य हिंदुस्थान व तापी, पयोष्णी या नद्यांच्या मध्यें कुठेंतरी दण्डकारण्य असावें. रामायणांत दण्डकारण्यांतील वैजयन्त या शहराचा पुढीलप्रमाणें उल्लेख आला आहे.

**दिशामास्थाय कैकेयी दक्षिणां दण्डकान् प्रति ।**
**वैजयन्तमिति ख्यातं पुरं यत्र तिमिध्वजः ॥**

( अयोध्याकाण्ड ९, १२ ).

मार्कंडेय पुराणांत दण्डकाबरोबर विदर्भाचाहि उल्लेख आहे ( विदर्भा दण्डकैः सह ). हुएनत्स्यांग आपल्या प्रवासवृत्तांत कांग–किन्नांपुलो ( कोंकणपुर ) व मोहोलाच ( महाराष्ट्र ) या मधील एका अरण्याबद्दल लिहितो.

### ४१ 'महाराष्ट्र' हें नांव शातवाहनाच्या राज्य-विस्तारामुळें मिळालें या विधानाची अग्राह्यता.

४१. दंडकारण्याचें राष्ट्र पुन्हां कधीं आणि कोणामुळें झालें याविषयीं रा. काणे आपली समजूत अशी दाखवितात कीं, बहुतकरून आंध्रभृत्य अथवा सातवाहनांच्या वेळींच 'महाराष्ट्र' असें म्हटलें असावें. ( म्हणजे इ. स. पू. २०० वर्षें ) सातवाहन राजे बलाढ्य होते व त्यांचें राज्य कारोमंडल किनाऱ्यापासून पश्चिमेस घाटापर्यंत पसरलें होतें, आणि ज्या अर्थी सातवाह-नांचें राज्य म्हणजे राष्ट्र मोठें होतें त्या अर्थी त्यास ' महा ' हा शब्द लावणें स्वाभाविकपणेंच आहे आणि ज्याअर्थी त्याची राजधानी मराठी प्रदेशांत म्हणजे पैठण येथें होती त्या अर्थी तोच प्रदेश 'मोठें राज्य' म्हणजे 'मोठें राष्ट्र' बनला; ' महा ' हा शब्द ' महा 'कांतार शब्दाकडून वारसा हक्कानें आला, आणि जेथें अटवी होती तेथें एका राजकुलाच्या अवधींत मोठें राष्ट्र स्थापन होऊन तें मोठें असल्यामुळें ' महा ' शब्द तसाच चालू राहिला, असा राजश्री काणे यांचा आशय दिसतो.

---

* Geography of Rama's Exile, J. R. A. S. १८९४. पृ. २४२.

पुष्कळ देशांचें अंत्यपद नेहमीं 'राष्ट्र' हा शब्द आहे; पण आद्यपद मात्र नीटसें कळत नाहीं, असे जे दुसरे शब्द आहेत त्यांच्याशीं संगति लावण्याचाहि प्रयत्न रा. काणे यांनीं केला आहे. ते सांगतात–फार प्राचीन काळापासून काठेवाडाला 'सौराष्ट्र' हें नांव आहे. बौधायन स्मृति, पाणिनीय शिक्षा व रामायण यांतून सौराष्ट्रासंबंधीं थोडाबहुत उल्लेख आहे. दशरथ राजाचे सहकारी सौराष्ट्र होते असें सांगितलें आहे.* रा. काणे कबूल करतात कीं, या देशाला 'सुराष्ट्र' असें नामाभिधान कां पडलें हें कांहीं आपणास माहीत नाहीं. हा प्रदेश सुपीक व संपन्न म्हणून हें नांव पडलें असावें अशा तऱ्हेची एक कल्पना मांडून 'सुराष्ट्र' शब्द सिद्ध करूं पहातात; आणि महाराष्ट्राच्या शब्दसिद्धीसाठीं दुसरीहि एक कल्पना रा. काणे मांडतात. ती अशी कीं, 'राष्ट्र' या शब्दानें ज्या देशाचें अगर राज्याचें वर्णन केलें आहे, अशीं अनेक राज्यें 'महाराष्ट्रां'त समाविष्ट होत होतीं. प्राचीन ग्रंथांतून कर्मराष्ट्र, गोपराष्ट्र, देवराष्ट्र आणि पूर्वराष्ट्र इत्यादि देश दिले आहेत, पण ते कोठें होते हें समजत नाहीं. (चालुक्याच्या दानपत्रांत 'कर्मराष्ट्र' असें आलें आहे. 'गोपराष्ट्र' म्हणजे नाशिक असावें. 'देवराष्ट्र' हा दक्षिणापथाचा भाग असें लिहिलें आहे. ( Cor. Ins. I, Vol. III, p. 7 ) अरंग एथील श्रीमहाजयराजाच्या ताम्रलेखांत 'पूर्वराष्ट्र' हें नांव आढळतें. वरील उल्लेखावरून असें दिसतें कीं, दक्षिणापथांत हे सर्व प्रदेश मोडत असत. वरील विवेचनावरून 'महाराष्ट्र' शब्दाचा मूळ अर्थ 'विस्तृत प्रदेश' असाच रा. काणे यांच्या मतें आहे.

'महार' शब्दाचा महाराष्ट्रांशीं संबंध नाकारणाऱ्या दोन मतांचें विवरण झालें. महाराष्ट्र शब्दाची आमच्या मताची उपपत्ति देण्यापूर्वी 'सौराष्ट्र' ... शब्दाच्या स्पष्टीकरणासंबंधानें एक मत व्यक्त करण्याचें धैर्य करतों. सौराष्ट्र याची व्युत्पत्ति 'सौर'+राष्ट्र अशी देतां येईल. सौरधर्माचा काठेवाडांत एकाकाळीं फारच प्रचार होता. 'सुराष्ट्र' हा शब्द 'सौराष्ट्र' याच्या अगोदरचा समजण्यास बिलकुल आधार नाहीं. 'सोरठ' हा प्राकृत शब्द असून त्याचें प्रथम संस्कृतीकरण 'सौराष्ट्र' होऊन नंतर 'सुराष्ट्र' या शब्दाची निर्मिति झाली असावी.

'महाराष्ट्र' या शब्दासंबंधानें वर दिलेलीं कै. भांडारकर व रा. काणे यांचीं स्पष्टीकरणें आम्ही मान्य करीत नाहीं.

* "प्राचीनान्सिन्धुसौवीरान् सौराष्ट्रेयांश्च पार्थिवान् (१, १३, २७) 'द्राविडाः सिन्धुसौवीराः सौराष्ट्रा दक्षिणापथाः। (२, १०, ३७). वगैरे.

प्रस्तुत वादांत दोन प्रश्न उपस्थित होतातः—

एक प्रश्न 'महा' या पूर्वभागासंबंधानें आहे, तर दुसरा 'राष्ट्र' किंवा 'रट्ठ' यांच्या अर्थासंबंधानें आहे.

'महारांचें राष्ट्र' या स्पष्टीकरणाला कांहीं मंडळी असा आक्षेप घेतील कीं, राष्ट्र हें सामान्य नाम नाहीं. लोकांचें विशेष नाम आहे त्या अर्थी 'महा' हा शब्द विशेषणार्थींच घेतला पाहिजे.

उलटपक्षीं 'राष्ट्र' या शब्दांत विशिष्टजातिता नाकारणारे रा. काणे यांसारखे लेखक राष्ट्रशब्द विशिष्टलोकविषयक न धरितां केवळ सामान्य नाम धरूनहि 'महा' या शब्दाचा जातिविषयक अर्थ घेण्याचें नाकारतात आणि तो शब्द विशेषणच धरतात. 'महा' शब्दाचें विशेषणत्व नाकारणारा वर्ग थोडा आहे. 'राष्ट्र' शब्दात्मक संयुक्त शब्द अनेक होते आणि त्या सर्वांचा महाराष्ट्रांत अंतर्भाव होतो असें एक वर्ग धरीत आहे, तर 'राष्ट्र' हा शब्द सामान्यनाम नसून विशिष्ट नाम आहे. राष्ट्रिक नांवाचे लोक होते त्यांसच रट्ठ किंवा रिस्टिक म्हणत असत. त्यापासून देशनाम निघालें असावें असा दुसरा पक्ष आहे. या दुसऱ्या पक्षास देखील 'महा' हा शब्द जातिवाचक किंवा लोकवाचक शब्दापासून निघाला असेल त्याला ही कल्पना मान्य नाहीं. तथापि 'महार' शब्दाशीं महाराष्ट्र न जोडण्याला इच्छेपेक्षां निराळें कारण दाखवितां आलें नाहीं. 'राष्ट्र' हा शब्द विशेषनाम धरल्यास 'महा' हा शब्द विशेषणच केला पाहिजे, असें नाहीं तर दोन्ही विशेषनामें संयुक्त होऊन दशनाम तयार होऊं शकतें. अनेक राष्ट्रनामें दोन राष्ट्रांच्या किंवा जातींच्या नांवाच्या संयोगापासून निघालीं आहेत. उदाहरणार्थ 'कुरुपांचाल' 'क्रथ-कैशिक' 'सिंधु सौवीर' इत्यादि नांवें देतां येतील. महारट्ठ यांत महार आणि रट्ठ या दोन राष्ट्र जातींच्या नामांचा संयोग होऊन 'महाराट्ठ' असें रूप तयार झालें आणि त्याचें पुढें महाराष्ट्रिक कालांतरानें महाराष्ट्र असें संस्कृतीकरण झालें असें माझें याविषयीं अंतिम विधान आहे. 'रट्ठ' या नांवाचे लोक चोहोंकडे हिंडत होते आणि त्यांच्या भ्रमणाचीं स्मारकें चोहोंकडे आहेत. सौराष्ट्र ऊर्फ सोरठ, आरट्ट वगैरे उदाहरणें रट्ठांच्या भ्रमणाचीं स्मारकें आहेत. 'रट्ठ' या शब्दाचा अर्थ 'राष्ट्र' किंवा 'लोक' असाच असावा. पुष्कळ राष्ट्रांचीं विशेष नामें तपासून पाहिलीं तर असें दिसून येईल कीं, त्या नामांचा मूळचा अर्थ त्या जातीच्या भाषेंत 'लोक' असाच आहे.

## प्रकरण ५ वें.

# महाराष्ट्रक्षेत्रनिर्णय.

### ४२ महाराष्ट्राच्या विस्तारासंबंधानें ग्रंथकाराचें विधान.

४२. प्राचीन काळच्या महाराष्ट्राचा विस्तार व त्याच्या चतुस्सीमा यांविषयीं थोडी चर्चा करणें अवश्य आहे.

वररुचि व शातवाहन यांच्या काळीं महाराष्ट्राचा म्हणजे महाराष्ट्री भाषा ज्या प्रदेशांत वापरली जात होती त्या प्रदेशाचा विस्तार केवढा होता हें बिनचूक सांगणें अवघड आहे. मराठी भाषेच्या विस्तारावरून आजच्या महाराष्ट्राची कल्पना करणें सोपें आहे. पश्चिमेस दमण पासून गोव्यापर्यंत, उत्तरेस नर्मदेच्या बाजूनें तापी नदीस क्वचित् भेटत, पण गुजराथेपासून अलग अशी महाराष्ट्राची हद्द जाते. बैतुल छिंदवाडा यांतील भाग घेऊन ईशान्येकडे ती बालाघाटापर्यंत जाते. पूर्वेच्या अंतिम टोंकाकडून ती दक्षिणेला चांद्याकडे वळते व पुनः पैनगंगेच्या कांठानें पश्चिमेस जाते. तेथून गोदावरीकडे धांवत जाऊन वळसे घेतघेत दक्षिणेकडे वळून सोलापूर व विजापुरावरून कृष्णानदीस भेटते. अशा तऱ्हेनें ती पुनश्च गोव्यांत येते. पूर्वेकडे 'वाईनगंगा' ही एक महाराष्ट्राची हद्द धरण्यांत येते; पण आज वाईनगंगेच्या आसमंतात् हिंदी वस्ती वाढत आहे. भाषेच्या विस्तारावरून एकाद्या देशाची मर्यादा ठरविण्याचा मार्ग त्या शब्दाची प्राचीन काळची व्याप्ति दाखविणारा खात्रीपूर्वक नसल्यास त्याचें कारण एवढेंच कीं, लोक शब्द नेहेमीं अनश्चित व्याप्तीनें लावीत असतात. तरीसुद्धां भाषेच्या विस्तारावरून विशिष्ट प्रकारच्या लोकांच्या विस्ताराचें अनुमान पुष्कळसें बरोबर करतां येईल. लोकांच्या मनांतील सामाजिक कल्पना भाषानुसारी होती, यांत शंका नाहीं. प्राचीन महाराष्ट्राचा विस्तार जवळजवळ आजच्या महाराष्ट्रा एवढाच असणें शक्य आहे.

### ४३ महाराष्ट्राच्या सीमानिर्णयास सिलोनच्या महावंशाचा पुरावा.

४३. महावंशांत सांगितल्याप्रमाणें मोंग्गलिपुत्त तिस्सानें ज्या देशांना आपले बुद्धधर्मोपदेशक पाठविले त्यांच्या नांवावरून महाराष्ट्राचें विस्तारमान ठरविण्यास थोडीशी मदत होते.

बुद्धधर्मोपदेशक ज्या देशांना गेले त्यांचीं नांवें:—काश्मीर, गांधार, महिसमंडळ, वनवास, अपरांतक, महारठ्ठ, योन, हिमालयाचा प्रदेश आणि सुवन्नभूमि. (पहा, महावंश अध्याय बारावा) महिसमंडळाच्या पुढें येणारे तिन्ही देश दक्षिणापथांत येतात. नर्मदा नदीवरील माहिष्मतीभोंवतालचा प्रदेश म्हणजेच महिसमंडळ.* वनवास देश म्हणजेच वनवासी (उत्तर कानडा) च्या प्राचीन राज्याचा विस्तार, व अपरांतक म्हणजे सह्याद्रि व अरबी समुद्र यांमधील कोंकण. यावरून 'महारट्ट' हा देश म्हणजेच उत्तरेस नर्मदा, पश्चिमेस कोंकण व दक्षिणेस वनवासी राज्य यांमधील प्रदेश, असें म्हटल्यानें कांहीं दोष येणार नाहीं.

### ४४ महाराष्ट्राचें व्यापकत्व, त्यांत वऱ्हाड येत होता काय?

४४. प्राचीन महाराष्ट्र किती विस्तृत होता आणि कितपत गजबजलेला होता याविषयीं विचार झाला आहे, आणि तो सांप्रतच्या मराठी भाषेच्या (कोंकणाव्यतिरिक्त) विस्ताराएवढाच असावा, असें रा. काणे यांनीं मत व्यक्त केलें आहे. ऐहोळी येथील शिलालेखांत (इ. स. ६३४) ९९००० गांवें (एकूण) असणारे तीन महाराष्ट्र होते, असें म्हटलें आहे. महाराष्ट्राचे हे तीन विभाग कोणते ही गोष्ट अजून बरीचशी वादग्रस्त आहे. पुष्कळ दानपत्रांवरील लेखांवरून † असें दिसतें, कीं, गांवें आतांच्या एवढींच मोठीं होतीं. असें असण्याचा संभव आहे, कीं, प्राचीन गांवांचें क्षेत्रफळ आतांपेक्षां मोठें असावें; पण वस्ती दाट नसावी. पुढें त्याच गांवांचीं लहान लहान गांवें बनत. मग महाराष्ट्रांतील ९९००० गांवें (शतक ७ वें) आतांच्या गांवाएवढींच होतीं, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सिंध व देशी संस्थानें वगळल्यास मुंबई इलाख्यांत जास्तींत जास्ती ४४००० खेडीं आहेत, असें डॉ. फ्लीट यांचें म्हणणें आहे. ‡ आतां ९९००० खेडीं महाराष्ट्रांत यावयाचीं म्हटल्यास त्याचा विस्तार उत्तरेस नर्मदेपर्यंत, दक्षिणेस कृष्णेपर्यंत, मध्यप्रांत, व निजामचे राज्यांत दूरवर असला पाहिजे. हुएनत्स्यांगच्या प्रवासवृत्तांत महाराष्ट्र कोंगकिन्नपुलापासून वायव्येस २४०० अगर २५०० ली (Li) म्हणजे ४००

---

* (Dr. Fleet in J. R. A. S. 1911. p. 816)

† हा निर्णय रा. काणे यांनीं शके ४१५ मधील बगुम्राचा, व शके ९४८ मधील कळस बुद्रुकचा, या दोन ताम्रपटांवरून काढला आहे.

‡ बॉंबे ग्या. व्हाल्यूम १, भाग २, पृ. २९८.

मैल (कनिंगह्याम मतें) आहे व त्याचा विस्तार ५००० ली आहे, असें दिलें आहे. तो पुढें म्हणतो कीं, "या देशाची राजधानी एका मोठया नदीतीरावर आहे, व महाराष्ट्रांतून १००० ली गेल्यावर पश्चिमेकडे व नैमोटो (Naimoto) नर्मदा ओलांडल्यावर आपण Polukeichepo (भरुकच्छप म्हणजे भडोच) या राज्यांत येतों. पुढें तो असें लिहितो, कीं, महाराष्ट्राच्या पूर्व सीमेवर एक डोंगर पोखरून तयार केलेला बुद्धविहार आहे. हींच अजिंठ्याचीं लेणीं असावींत." या वरील उताऱ्यावरून त्याच्या महाराष्ट्राच्या कल्पनेची कल्पना येते; तींत मध्यप्रांत व वऱ्हाड येत नाहींत; कारण अजिंठा हें पूर्व सीमेवरचें ठिकाण म्हणून सांगितलें आहे. हुएनत्स्यांगच्या चरित्रांत सुद्धां अगदीं असेंच वर्णन आहे. फक्त भडोच वायव्येला आहे, असें चरित्रांत म्हटलें आहे व प्रवासांत पश्चिमेस; असें आहे.

हुएनत्स्यांग जरी विदर्भास महाराष्ट्रांतून वगळीत असला तरी तें मत त्यावेळेच्या सर्वांचें होतें, असें समजण्याचें कारण नाहीं.

### ४५ राजशेखराकडून विदर्भाचा महाराष्ट्रांत अंतर्भाव.

४५. राजशेखराच्या बालरामायणांत असें वर्णन आहे कीं, राम व सीता लंकेहून अयोध्येला पुष्पक विमानांतून येतांना सुग्रीव रामाचें लक्ष महाराष्ट्राकडे वळवितो व राम स्वतः सीतेला विदर्भदेशाच्या वैभवाचें वर्णन करून सांगतो व कुंतल देश म्हणजे मदनाचें स्थान असें म्हणतो.

**सुग्रीवः—भरताग्रज, अयमग्रे महाराष्ट्रविषयः**

**रामः—**

**यत्क्षेमं त्रिदिवाय वर्त्म निगमस्यांगं च यत्सप्तमम्**
**स्वादिष्ठं च यदैक्षवादपि रसाच्चक्षुश्च यद्वाङ्मयम् ।**
**तद्यस्मिन् मधुरं प्रसादि रसवत्**
**कान्तं च काव्यामृतं**
**सोऽयं सुभ्रु पुरो विदर्भविषयः**
**सारस्वतीजन्मभूः ॥ ७४ ॥**

**किंच—**

**रतविद्याविदग्धानां विभ्रमोल्लेखलंपटः ।**
**नित्यं कुंतलकान्तानां किंकरो मकरध्वजः ॥ ७५ ॥**

**सीताः—जहि उप्पण्णा मे पिदामहससुरस्य घरिणी इंदुमदीः—**

**त्रिजटा—**

**कीदृकेलिकस्य किल भगवति सखी सुखधाम ।**
**का च सुता शशितिलकस्य विन्ध्यमहीधरधाम ॥**

**सीताः—नर्मदा.**

सीता मध्येंच म्हणते, कीं, विदर्भ हा आपले श्वशुर दशरथ यांची आई इंदुमतीचा देश आहे. इतक्यांत त्रिजटा सीतेला नर्मदेविषयीं एक उखाणा घालते. राजशेखर हा स्वतःच महाराष्ट्राचा कवि आहे. कारण तो म्हणतो कीं, 'महाराष्ट्रचूडामणि' अकालजलद याच्या वंशांतील चौथा पुरुष आपण स्वतः आहों. याशिवाय त्याला महाराष्ट्रांतीलच ठरविण्यास दुसरींहि अनेक कारणें आहेत.

या रामायणांत विदर्भ व कुंतल हे नर्मदेच्या अलिकडे आहेत, असें दर्शविलें आहे.

राजशेखराच्या वरील उताऱ्याचें महत्त्व हें आहे कीं, विदर्भाचा समावेश महाराष्ट्रांत होत होता, अशी तो आपल्या-वेळच्या लोकांची भावना त्यांत व्यक्त करीत आहे.

प्रस्तुत विवेचनाचा थोडक्यांत सारांश असा कीं, 'महाराष्ट्र' हा शब्द जवळ जवळ दंडकारण्य आणि दक्षिणापथ या शब्दांइतका जुना आहे. तो बुद्धकालापासून राजशेखराच्या कालापर्यंत वापरला जात होता. राजशेखर त्यांत वऱ्हाडचा अंतर्भाव करीत होता. महाराष्ट्राचा विस्तार भाषेच्या विस्तारा-इतका समजण्याची प्रवृत्ति प्राचीन काळांत नव्हती, असें समजण्यास आधार नाहीं.

ज्या अर्थी भाषेस 'महाराष्ट्री' हें नांव दिलें आहे त्या अर्थी 'महाराष्ट्र' या शब्दाचा विस्तार ज्ञात आहे आणि त्या प्रदेशांत एक भाषा आहे, ही गोष्ट वररुचीच्या काळच्या लोकांच्या मनांत असली पाहिजे. महाराष्ट्राची भाषा म्हणजेच जर महाराष्ट्री, तर जेथें महाराष्ट्री भाषा बोलली जाते तोच 'महाराष्ट्र' होय. महाराष्ट्राच्या अन्य व्याख्येची गरजच नाहीं. ज्या अर्थी वररुचीच्या काळांत भाषेला 'महाराष्ट्री' हें नांव होतें असें दिसून येतें, त्या अर्थी 'महाराष्ट्र' हा शब्द त्याच्या पूर्वींच अनेक पिढ्या प्रचलित असला पाहिजे आणि ज्या कारणामुळें तें नांव त्या प्रदेशाला मिळालें, तें कारण त्याच्याहि पूर्वीं अनेक पिढ्या अगोदरच उत्पन्न झालें असलें पाहिजे.

### ४६ दंडकारण्य व दक्षिणापथ शब्दाची व्याप्ति.

४६. 'महाराष्ट्र' हें नांव जरी वररुचीच्या पूर्वीं अनेक शतकें प्रचारांत असलें तरी देखील तें नवेंच आहे. पूर्व महाराष्ट्रास 'विदर्भ' हें नांव होतें आणि त्या विदर्भाचा बिस्तार दक्षिणेकडे बेदरपर्यंत असावा, अशी कित्येक संशोधकांची कल्पना आहे. मराठी मध्यप्रांत हा तर विदर्भांतच मोडत असे. पूर्वेकडील महाराष्ट्राला दंडकारण्य आणि दक्षिणापथ हीं नांवें अत्यंत

प्राचीन काळीं होतीं किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं. नलोपाख्यानांत विदर्भ दक्षिणापथाच्या बाहेर आहे, अशीच कल्पना व्यक्त केली आहे. कोंकणपट्टीला अपरांत म्हणून नांव होतें. 'कोंकण' हा प्रदेश मात्र सुधारलेला म्हणून बऱ्याच काळापासून ठाऊक होता. कोंकणचा दक्षिणापथांत अंतर्भाव होतो, असें कथासरित्सागर गृहीत धरीत आहे. 'महाराष्ट्र' हें नांव प्रथम उत्पन्न कोठें झालें, हें सांगतां येत नाहीं. दंडकारण्यामध्यें म्हणजे पश्चिम भागांत रट्टांची वसती वाढूं लागली असेल म्हणजे तेथील लोक महारच असतील आणि त्यामुळें 'देश' या भागालाच महार व रट्ट हीं दोन्हीं नांवें संयुक्त होऊन 'महाराष्ट्र' हें नांव लागलें असावें.

'महाराष्ट्र' या शब्दाला अंकित लेखांचा पुरावा शोधतां सातव्या शतकापूर्वीचा नाहीं. 'महाराष्ट्र' हें नांव आपणांस प्रथमतः चालुक्य राजा सत्याश्रय पुलकेशी याच्या एका अंकित लेखांत सांपडतें; त्यांत त्यानें 'तीन महाराष्ट्रकें' जिंकल्याचें लिहिलें आहे. तें वाक्य मागें आलेंच आहे. तीन महाराष्ट्रकें कोणतीं हें त्यांत स्पष्ट नाहीं, तरी हें शक्य आहे कीं, 'महाराष्ट्र' या शब्दाची जी आपणांस व्यापक कल्पना आहे तशीच कल्पना पुलकेशीच्या मनांत असावी; तथापि विदर्भ त्यानें जिंकला होता, याला दुसरा निःसंशय पुरावा अजून उपलब्ध नाहीं. असो.

### ४७ 'महाराष्ट्र' शब्दाचा व दंडकारण्य या शब्दाचा विदर्भाकडून स्वीकार.

४७. सातव्या शतकांत जर 'महाराष्ट्र' हें नांव अंकित लेखांत वापरलें गेलें, आणि महाराष्ट्री ही भाषा जर विदर्भांत होती, तर विदर्भानें 'महाराष्ट्र' हा शब्द केव्हां तरी स्वीकारणें अवश्य आहे; तथापि ती क्रिया सोपी नव्हती. नागडा निग्रो ज्याप्रमाणें कपडे घालूं लागला म्हणजे हॅट पाटलोन घालतो; पण हिंदूस धोतर टाकून पाटलोन घालणें जड वाटतें; त्याप्रमाणें दंडकांतील आरण्यकांना 'महाराष्ट्र' हें मूलतः दोन जातींच्या संयोगानें उत्पन्न झालेलें पण गोंडस नांव चट्कन् घेतां आलें. तथापि राजकारण, धार्मिक चळवळी, वाङ्मय, व शास्त्र यांमध्यें विदर्भीयांचें नांव झालें असल्यामुळें विदर्भीयांस 'वैदर्भ' हें नांव सोडून देऊन 'महाराष्ट्रीय' हें नांव धारण करतां आलें नाहीं. त्यांची वृत्ति 'वैदर्भ' हें नांव राखून महाराष्ट्रीय म्हणवून घेण्याकडेसच राहिली ती आजपर्यंत तशीच आहे, असें म्हणतां येईल.

'महाराष्ट्र' शब्द हा पूर्वेकडे पसरत चालला होता हें खास. 'महाराष्ट्र' या शब्दाची आवड सीताबर्डी येथें शके १००८ मध्यें उत्पन्न झाली होती, असें स्पष्ट दिसून येतें. नागपूरच्या म्यूझियममध्यें एक सीताबर्डीहून नेलेला खोदलेला स्तंभ आहे, त्या स्तंभावरील लेख पूर्वी प्रसिद्ध झाला आहे (एपिग्राफिका इंडिका व्हा. ३, लेखांक ४२). या लेखावरून असें दिसतें, कीं, नागपूर प्रांतावर एका महासामंताचें राज्य होतें. तो महासामंत आपणास 'महाराष्ट्रकूट' वंशांतला म्हणवून घेई आणि तो चालुक्य राजा सहावा विक्रमादित्य याचा मांडलिक होता. प्रस्तुत सामंतास आपल्या कुळास 'महा' हें पूर्व पद लावण्यांत 'महाराष्ट्र' या शब्दाशीं आपल्या कुलाचा आणि आपल्या सत्तेखालीं असलेल्या प्रदेशाचा संबंध जोडण्याची इच्छा असावी.

दंडकारण्यानें 'महाराष्ट्र' हें नांव घेतलें व विदर्भानें देखील महाराष्ट्रीयत्व पत्करलें त्याचा परिणाम 'दंडकारण्य' या शब्दाच्या लोकप्रियतेवर झालेला दिसतो. जसजशी नागपूरपर्यंत महाराष्ट्राची कल्पना वाढत गेली, तसतशी 'दंडकारण्य' या नांवाची व्याप्ति देखील अधिकाधिक होऊं लागली. चांद्या जवळच्या बस्तर संस्थानांत दंतेश्वर येथें दिक्पालदेवाचा शिलालेख (इ. स. १७०२) आहे. (एपिग्रा. इं. व्हा. १२. लेखांक ३०) त्या शिलालेखांत दंडकारण्य आणि महाराष्ट्र हीं एकच धरून आणि महाराष्ट्राची हद्द चांद्यापर्यंत धरून 'दंडकारण्यनिकटबस्तरदेशे' असे शब्द वापरले आहेत. यावरून खालील गोष्टी स्पष्ट होतात.

### ४८ प्रदेशाच्या नांवाचा थोडक्यांत इतिहास.

४८. महाराष्ट्राचे मुख्यतः तीन विभाग आहेतः— (१) विदर्भ, (२) अपरांत, (३) दंडकारण्य. या सर्वांत विदर्भ हा जुना वसलेला आहे.

२. दंडकारण्यास हलुहळू 'महाराष्ट्र' हें नांव लागूं लागलें आणि त्यास सुरवात वररुचीच्या कालापूर्वी म्हणजे बुद्धकालांतच झाली.

३. 'महाराष्ट्र' हें नांव हलुहळू नागपूरपर्यंत पसरविण्याचा प्रयत्न राजशेखराच्या काळांत झाला.

४. 'महाराष्ट्र' हें नांव दंडकारण्याकडून गेलें असल्यामुळें विदर्भीयांनीं पुढें 'दंडकारण्य' या नांवाचा देखील स्वीकार केला. दंडकारण्य हें नांव चांद्यापर्यंत पसरलें.

५. प्राचीन विदर्भीयांना स्वतंत्र इतिहास असल्यामुळें त्यांची प्रवृत्ति 'वैदर्भत्व' न सोडतां महाराष्ट्रीयत्व स्वीकारण्याची होती.

### ४९ महाराष्ट्रांतील विविध भागांस लागत असलेलीं नांवें.

४९. 'महाराष्ट्र' हें नांव जरी बरेंच जुनें आहे तरी प्राचीन काळीं सर्व महाराष्ट्राचें राज्य एकच, असे प्रसंग थोडेच येत;

त्यामुळें अनेक देशनामें प्रचारांत होतीं, त्यांचें सिंहावलोकन येथें उपयुक्त होईल.

१. विदर्भ— वऱ्हाडचें जुनें नांव; याचा विस्तार अजिंठ्या पासून वाईन गंगेपर्यंत असावा. 'विदर्भा' नदीचें अजून अवगमन झालें नाहीं.

२. क्रथकैशिक— हेंहि वऱ्हाडचेंच जुनें नांव होतें. कालिदासानें याचा उल्लेख केला आहे. यांतहि 'क्रथ' आणि 'कैशिक' अशीं दोन प्रदेशनामें होतीं. भारती युद्धांत लढणाऱ्या देवावृधानें आपणांस 'क्राथ' हें आडनांव घेतलें आहे. 'कैशिक' या नांवावरून 'कैशिकी' ही नाटकाची रीती प्रचारांत आली.

३. भोजकट— हेंहि वऱ्हाडचेंच नांव आहे. हें पुराणांत आणि वाकाटकांच्या चम्मक ताम्रपटांत उल्लेखिलें आहे. ज्या प्रदेशांत महार आणि भोज या दोन जातींची वसती असेल त्या प्रदेशास 'महाभोज' हें नांव लावलें गेलें असेल.

४. वरदातट— हेंहि वऱ्हाडचेंच नांव आहे. यापासून 'वऱ्हाड' शब्द निघाला असावा, अशी एक कल्पना आहे.

५. कुंतल— हें दक्षिण महाराष्ट्रदर्शक देशनाम आहे.

६. अश्मक— बौद्ध ग्रंथांत व त्याचप्रमाणें दण्डीनें उल्लेखिलेलें राष्ट्र. हें विदर्भाचें मांडलिक राज्य होतें. कदाचित् बौद्ध कालांत विदर्भ नांव मागें पडून अश्मक हेंच नांव प्रचारांत आलें असावें.

७. मुरल— विदर्भाचें एक मांडलिक राज्य.

८. ऋचीक— हेंहि विदर्भाचें मांडलिक राज्य.

९. कोंकण— 'कोंकण' हा शब्द कधीं कधीं सुरतेपासून मलबारपर्यंतच्या समुद्रकांठाला लावला जाई तर कधीं अल्पक्षेत्रीय अर्थानें तो वापरला जाई.

१०. अपरांत— उत्तर कोंकण.

११. सासिक्य— हा दण्डीनें दशकुमारचरित्रांत उल्लेखिला आहे. त्यांत हा विदर्भाचा मांडलिक म्हणून दाखविला आहे.

१२ सेउणदेश— देवगिरीच्या जाधवांच्या राज्याचें पहिलें नांव. जाधवांना 'सेवन' अशा शब्दानें देखील उल्लेखिलें आहे.

१३. दण्डकारण्य— बस्तरपर्यंत प्रदेशास देखील हा शब्द लावलेला आढळतो.

१४. गोपराष्ट्र— गोवें व त्या आसपासचा मुलूख.

१५. मिरिंजदेश— मिरजेच्या आसपासचा मुलूख.

१६. कुंडीदेश— याचा नक्की स्थाननिश्चय आज करतां येत नाहीं.

१७. प्रतिष्ठानभुक्ति— पैठण जिल्हा.

१८. पेतनिकः— हा शब्द अशोकाच्या शासनलेखांत वापरला आहे, तो पैठणच्या लोकांविषयीं, असा समज आहे.

१९. दक्षिणापथ— शातकर्णी यास दक्षिणापथचा राजा असें अनेक शिलाशासनांत म्हटलें आहे.

२०. दाक्षिणात्य देश.

२१. महाकांतार.

२२. महाटवी.

२३. जनस्थान रामायणांत उल्लेखिलें आहे. 'जनस्थान' हा शब्द वापरणाऱ्या कवीच्या मनांत कोणता प्रदेश होता याचा पूर्ण निश्चय अजून झालेला नाहीं.

ही यादी पुरी नाहीं. याशिवाय अनेक नांवें ग्रंथांत आढळतील.

### ५० आजचा महाराष्ट्र आणि पूर्वकालीन महाराष्ट्र.

५०. आजचा महाराष्ट्र आहे त्याचाच इतिहास दिला जात आहे कीं कांहीं अन्य प्रदेशाचा इतिहास दिला जात आहे, याविषयीं प्रश्न विचारला असतां एवढेंच उत्तर देतां येईल, कीं, चालुक्यकाळचा महाराष्ट्र आणि आजचा महाराष्ट्र यांत फारसा फरक नसावा; तथापि हें शक्य आहे, कीं, महाराष्ट्र पूर्वीपेक्षां जरासा दक्षिणेस सरकला असावा. जेथें आज मराठी भाषा आहे तेथें एकाकाळीं कानडी अधिक प्राधान्यानें असावी.

आज नेमाडी वगैरे भाषा आहेत तेथें एका काळीं महाराष्ट्री असावी. कदाचित् उज्जयिनीपर्यंत देखील महाराष्ट्रीचाच प्रचार असावा. नेमाडी भाषेचें हिंदीपेक्षां मराठीशींच साम्य दाखविणारे नामांचे व क्रियापदांचे प्रत्यय पुष्कळच आहेत.

आजच्या महाराष्ट्राचें एक लक्षण पाहिलें तर आपणांस असें दिसतें, कीं, मराठी भाषेला स्वाभाविक सरहद्द नाहीं. प्राचीनकाळीं महाराष्ट्री भाषेला कदाचित् स्वाभाविक सरहद्द असावी. ती विंध्याद्रि असावी. हालाच्या सप्तशतींत गोदातटाचा उल्लेख जसा येतो तसा विंध्याचाहि येत आहे. त्यावरून महाराष्ट्री भाषेचें क्षेत्र विंध्यापासून दक्षिणेकडे गोदातटापर्यंत होतें, असें अनुमान करतां येईल. मराठी व गुजराथी या दोहोंमध्यें स्वाभाविक सरहद्द आहे, ती म्हटली म्हणजे जव्हारचा डोंगराळ मुलूख होय. जव्हारच्या उत्तरेस डहाणू वगैरे जो मुलूख आहे, तो महाराष्ट्राचा गुजराथेच्या लगतचा भाग आहे व तेथील महाराष्ट्रीयपणा कच्चा आहे. तेथें अगदीं निराळ्या जाती दृष्टीस पडतात. उदा०–माशींची जात घ्या. ही जात आज अर्धीमुर्धी शेतकरी तर अर्धीमुर्धी मत्स्यजीवी अशी आहे. कांहींचा धंदा मासे पकडण्याचा तर कांहीं शेतकी करतात.

माशींची व मांगेल्यांची भाषा मराठी व गुजराथी यांचें मिश्रण आहे, व सुशिक्षित जातीच्या देखील नेहमींच्या भाषणांत गुजराती अंश येतोच. महाराष्ट्राची आग्नेय सरहद्द आहे तिलाहि स्वाभाविक मर्यादा नाहीं. कानडी व तेलगू या ज्या दोन भाषा महाराष्ट्राच्या आग्नेयीकडे आहेत त्या भाषांचा मराठीशीं स्वाभाविक संबंध कांहीं नाहीं, तर भिन्न भाषा एकाएकीं सुरू झाली, असें तेथें दिसतें. ती सरकणारी सरहद्द असून भाषाविषयक कलहाचें आज स्थान झाली आहे.

### ५१ ऐतिहासिक भूगोलवर्णनाचें महत्त्व.

५१. भूगोलविषयक प्रकरणें प्रारंभींच घेतलीं व त्यांत केवळ उल्लेख देणारें विवेचन केलें, त्यावरून एक गोष्ट दिसून येईल, कीं, देशाचीं नांवें वारंवार बदलत होतीं. देशाचें नांव बदलतें त्यास कारणें अनेक असतात. कुलाचें नांव त्या कुलानें जिंकलेल्या प्रदेशास लागतें किंवा जेव्हां देशांमध्यें विशिष्ट लोकांचें प्राधान्य होतें तेव्हां त्या देशाचें नांव बदलतें. 'महाराष्ट्र' हा देश विस्तीर्ण आहे. लोकसमाज देखील विविध आणि पुष्कळ आहेत, त्यामुळें निरनिराळ्या भागांस निरनिराळीं नांवें पडावींत. मोठ्या देशभागास देखील लोकेच्छेप्रमाणें नांवें भिन्न यावींत, ही गोष्ट स्वाभाविक आहे. मोठीं शहरें, आहार आणि विषय यांचीं नांवें राज्यकर्त्यांच्या इच्छेनें आणि त्यांच्या सोईसाठीं बदलतात; पण लहान लहान गांवांचीं नावें फार काळपर्यंत टिकतात, असें दिसून येईल. प्राचीन महाराष्ट्राचें अवगमन आजच्या महाराष्ट्रावरून करावयाचें झालें तर ग्रामनामें आणि त्यांचा इतिहास यांकडे लक्ष दिलें पाहिजे. तसें लक्ष कै. विश्वनाथ राजवाडे यांनीं दिलें आहे, व महाराष्ट्राच्या वसाहतकालाविषयीं अनुमानें काढलीं आहेत. तो स्वतंत्र अभ्यास आहे आणि त्याच्या काळाकडे आपणांस स्वतंत्रपणें लक्ष द्यावें लागणारच आहे. देशाच्या स्थितीपैकीं कांहीं गोष्टी जलद बदलतात, तर कांहीं बराच काळ बदलत नाहींत. भूस्वरूपांत होणाऱ्या फेरफारांचें ज्ञान दाखविणारा एक भवभूतीचा श्लोक आहे व तो महाराष्ट्राविषयींच आहे. त्याचें अवतरण येथें करणें उपयोगीं होईल.

**पुरा यत्र स्रोतःपुलिनमधुना तत्र सरितां**
**विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम् ।**
**बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदं**
**निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥**

### ५२ प्राचीन नांवें आणि आजचीं नांवें यांची संगति.

५२. प्राचीन भूगोलवर्णनविषयक चर्चेंत अभ्यासकाचा प्रयत्न प्राचीन काळचें नांव आणि आजचें नांव यांची संगति लावण्याकडे असतो. तोच प्रयत्न खरोखर पहातां सर्वच इतिहासांत असतो. इतिहासाचा हेतूच हा असतो कीं, प्राचीन काळच्या उल्लेखांच्या साहाय्यानें अर्वाचीन काळ स्पष्ट करणें. या हेतूमुळें प्राचीन काळाचें वर्णन लिहिण्यांत दिशा उत्पन्न होते.

महाराष्ट्राच्या प्राचीन भौगोलिक नांवाची आणि आजच्या नांवाची संगति लावण्याची क्रिया फारसें यश पावली नाहीं.

महाराष्ट्रांतल्या आजच्या नदी पर्वतांची आणि ग्रंथोक्त नदी पर्वतांची संगति अजून लागली नाहीं. महाराष्ट्राच्या उत्तर भागास असलेला सातपुडा पर्वत याचा ग्रंथांत उल्लेख नाहीं. 'सत्तीय पुत म्हणून अशोकाच्या लेखांत जो शब्द येतो तो सातपुड्याच्या लोकांविषयीं उल्लेख आहे काय?' असा एक प्रश्न मनांत येतो. ग्रंथांत मुख्यतः दोनच पर्वतांचे उल्लेख येतात आणि ते म्हटले म्हणजे विंध्याद्रि व सह्याद्रि हे होत. बालाघाट नांवाचा जो गिरिसमुच्चय सातपुडा व सह्याद्रि यांनीं होणाऱ्या त्रिकोणाच्या पोटांत आहे त्याच्या विषयीं संस्कृत ग्रंथांत विधान कोठें आढळत नाहीं किंवा विधान झालें असल्यास त्याचा बरोबर अर्थ लावला गेला नाहीं. नद्यांच्या नांवांसंबंधानें घोटाळा फारच आहे. त्या घोटाळ्याविषयीं भाष्य करण्याचे वेळीं दोन पुराणांतील नद्यांच्या संबंधांचे उल्लेख येथें अवतरितों.

**वायुपुराणांत** पुढील श्लोक आहेतः—

**तापी पयोष्णी निर्बंध्या मद्रा च निषधा नदी ।**
**वेण्वा वैतरणी चैव शितिबाहुः कुमुद्वती ॥**
**तोया चैव महागारी दुर्गा चान्तशिला तथा ।**
**विन्ध्यपादप्रसूताश्च नद्यः पुण्यजलाः शुभाः ॥**
**गोदावरी भीमरथी कृष्णा वैण्यथ वञ्जुला ।**
**तुङ्गभद्रा सुप्रयोगा कावेरी च तथापगा ।**
**दक्षिणापथनद्यस्तु सह्यपादाद्विनिस्सृताः ॥**

**ब्रह्मपुराणांत** देखील नद्यांचा उल्लेख आहेः—

**नर्मदा सुरमाद्याश्च नद्यो विन्ध्यविनिःसृताः ।**
**तापी पयोष्णी निर्विन्ध्या कावेरीप्रमुखा नदीः ।**
**ऋक्षपादोद्भवा ह्येताः श्रुतास्तापं हरन्ति याः ।**
**गोदावरी भीमरथी कृष्णावेण्यादिकास्तथा ।**

नदी व पर्वत यांच्या संबंधानें विशेष खोल चौकशी सध्यांच करण्याचें कारण नाहीं. जेव्हां प्रसंग उत्पन्न होईल तेव्हां भौगोलिक

तपासणी करावी लागेलच. येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, पुराणांत उल्लेखिलेल्या नद्या सांपडत नाहींत, त्याप्रमाणेंच अंकित लेखांतून ज्यांचा उल्लेख येतो अशा नद्यांचीं नांवें आणि आजचीं नांवें यांची संगतिहि जुळली नाहीं. उमेहना-कटक, धेनुकाकटक हे ग्राम दोन नद्यांचीं नांवें सुचवितात; पण त्या नद्या निश्चित झाल्या नाहींत. भोळसर संशोधकां-कडून धेनुकाकट तेंच धरणी–कोट अशी परंपरागत आलेली समजूत स्वीकारली गेल्यामुळें धेनुका–नदी महारा-ष्ट्रांत कोठें होती हें शोधण्याचा परिश्रमहि झाला नाहीं.

## ५३ प्रस्तुत पर्वाचा विषय.

५३. एवंच महाराष्ट्राचा इतिहास बुद्धकाळापासून सुरू करून चालुक्याच्या काळापर्यंत आणावयाचा आहे. हा एक-सारख्या प्रगतीचा इतिहास आहे; पण त्या प्रगतीच्या मधल्या पायऱ्या द्यावयाच्या आहेत आणि प्रगतीचीं कारणें स्पष्ट करावयाचीं आहेत. 'दंडकारण्य' या शब्दानें सूचित झालेल्या स्थितीपासून नव्याण्णव हजार ग्रामांचें राष्ट्र कसें झालें हें सांगावयाचें आहे. याच्या प्रगतीचा इतिहास पाटलिपुत्र-स्थापनेच्या पूर्वींपासून सुरू होतो. कथासरित्सागर आपणांस सांगत आहे, कीं, पाटलिपुत्र या शहराचा उत्पादक राजा पुत्रक हा मुंबईजवळील ' चिंचिणी ' या नगरीचा ब्राह्मण होता, आणि त्याचा बाप दाक्षिणात्य द्विज असून आजा कनखल येथें रहात होता. म्हणजे पाटलिपुत्राच्या स्थापनेच्या पूर्वीं-पासून किंबहुना बुद्धपूर्वकाळापासून चिंचिणी नगरीचें अस्तित्व आहे, असा बृहत्कथाकारांचा समज ग्रंथांत व्यक्त झाला आहे व यावरून दक्षिणेकडील ब्राह्मण उत्तरेकडे व उत्तरे-कडील दक्षिणेकडे अशीं भ्रमणें चाललीं होतीं, व पाटलि-पुत्राच्या स्थापनेच्या पूर्वींच दक्षिणेकडे एक सुविद्य ब्राह्मणांचा वर्ग होता त्याची आठवण सरित्सागर रक्षीत आहे.

हा एकसारखा वृद्धिंगत होत असलेला प्रदेश अर्थात् कार्यकर्त्या लोकांचा होता. त्या लोकांचें कार्य अगोदर भारत-वर्षांत आणि भारतवर्षामार्फत ज्ञात जगांत बरेंच मोठें झालें आहे, आणि तेंच कार्य शातवाहन पर्वाचा विषय होय.

## ५४ महाराष्ट्रांतील वृत्तांचा व लोकस्थितीचा जगाशीं संबंध.

५४. जगांतील एकंदर क्रियाग्राम लक्षांत घेऊन त्यांचा भारतीय वृत्तांशीं संबंध पहाणें आणि भारतीय क्रियाग्रामामध्यें महाराष्ट्राचा एकंदर क्रियाग्रामांशीं संबंध शोधणें, या गोष्टी केल्या नाहींत तर जगांतील एक घटक या नात्यानें आपल्या देशानें जें कार्य केलें त्याच्या इतिहासाचें अवगमन करण्याचें चुकविलें असें होईल. जगाचा विकास अनेक तऱ्हांनीं होत होता; निरनि-राळ्या भागांचें एकमेकांशीं दळणवळण वाढत होतें; व्यापार वाढत होता; सौंदर्यकल्पना, धार्मिक कल्पना यांची देवघेव होत होती; साहसी लोक दूर दूर जाऊन आपल्या विद्येला अगर कलेला मान अगर आश्रय मिळवीत होते; धार्मिक भावनांनीं प्रेरित होऊन लोक आपल्या संप्रदायाचा प्रचार करीत होते; सर्व जगास संयुक्त करावें या प्रकारची वृत्ति कांहींमध्यें होती तर 'आपलें जाऊं देऊं नये व नवें येऊं देऊं नये' या भावनांनीं देखील लोक प्रेरित होत होते. तमाशे, नाटकें आणि वेश्या या बाबतींत देखील जगाचा बाजार एक होऊन भिन्नराष्ट्रीय स्पर्धेची जोपासना होत होती. येणेंप्रमाणें जगांतील एकंदर भिन्न स्थितींचें मिश्रण होत असतां शालिवाहनकालीन महाराष्ट्रानें जगाच्या संस्कृतीस कांहीं निश्चित तऱ्हेनें चालना दिली आहे. त्या चालनेचा अत्यंत मनोरम इतिहास जगांतील अत्यंत अभिमानी राष्ट्रास देखील मत्सर उत्पन्न करील असाच आहे.

प्रकरण ६ वें.

# बुद्धकालापासून महंमदी विजयापर्यंतच्या मन्वंतरांतील निरनिराळे काळ.

## ५५ इराणच्या इतिहासाच्या कालविभागाचें महत्व.

५५. बुद्धापासून चालुक्यापर्यंतचें जें मन्वंतर प्रस्तुत पर्वाचा विषय त्याचे कांहीं कालविभाग करणें अवश्य आहे. या दीर्घ काळांतील भारतीय इतिहास अत्यंत गुंतागुंतीचा आहे. त्या इतिहासाचा जागतिक इतिहासाशीं संबंध इराणच्या इतिहासापेक्षां कमी आहे; तथापि इराणच्या इतिहासाला स्वकीय साहित्य अगदीं थोडें आहे. भारताच्या इतिहासाला अत्यंत भरपूर आहे. सर्व जगाचा इतिहास ज्या इतिहासाशीं संबद्ध आहे आणि ज्यांतील वृत्तांचे काल निश्चित आहेत, अशा इतिहासाच्या कालानुक्रमाशीं भारतीय ऐतिहासिक वृत्ताची जुळणी केली तर जगांतील स्थित्यंतरें आणि त्यांचा भारताशीं संबंध या गोष्टी समजणें सोपें जाईल; यासाठीं प्रथम इराणच्या इतिहासाचा कालानुक्रम मांडतों.

‘बुद्धोत्तर जग’ या ज्ञानकोशाच्या विभागांत (पृ. ३८–३९) इराणाच्या इतिहासाचे सात काळ पाडले आहेत. त्यांपैकीं पहिले तीन काळ १ पर्शुभारतीय काल, २ इराणचा वसाहतकाल आणि ३ पौराणिक काल, हे होत. पौराणिक कालाचा बराचसा इतिहास शहानाम्यांतील कथांच्या रूपानें शिल्लक आहे. हे तीन काल प्रस्तुत विभागाचा विषय नाहींत. त्यांतील चवथ्या कालापासून सातव्या कालापर्यंतचा भारतीय इतिहास हा शातवाहन पर्वाचा विषय होय. तर इराणी इतिहासाचे वरील चवथ्यापासून सातव्या पर्यंत चार कालविभाग घेऊन प्रत्येक विभागांत भारतीय घडामोडी काय झाल्या आणि त्यांचा बाहेरच्या जगाशीं व विशेषतः इराणशीं संबंध कसा काय आला तें पाहूं.

## ५६ इराणच्या ऐतिहासिक घडामोडी व भारतांतील ऐतिहासिक घडामोडी.

५६. इराणच्या इतिहासाचा **चवथा काळ** म्हटला म्हणजे अकिमिनियन ऊर्फ हखामणी घराण्याचा काळ होय. हाच इराणच्या सत्तावर्धनाचा खरा काळ होय. या काळाचे अवशेष आज इराणांत पुष्कळच शिल्लक आहेत. त्यांचें वर्णन पुढें देण्यांत येईल. या काळाचें मुख्य साहित्य ग्रीक आहे, आणि त्या इतिहासास पुरवणीदाखल म्हणून उपलब्ध अवशेषांचें साहित्य उपयोगी पडत आहे. या काळाचा विस्तार ख्रि. पू. ५५८ पासून ३३० पर्यंत आहे. हिंदुस्थानच्या ऐतिहासिक काळाशीं तुलना करावयाची झाल्यास याला बुद्धापासून मौर्योदयाचा काळ म्हणतां येईल. या काळांत दक्षिणेंत सातवाहनसत्ता अगोदरच संस्थापित झाली होती, असें वाटतें. हें मत सर्वमान्य नाहीं म्हणून सविस्तरपणें पुढें दिलें जाईल. **पांचवा काळ** हा ख्रि. पू. ३३० पासून ख्रिस्तपूर्व २४८ पर्यंतचा म्हणजे ८२ वर्षांचा काळ आहे. याला ग्रीक सत्तेचा काळ म्हणतां येईल. हिंदुस्थानच्या इतिहासांत हा ऐन मौर्य काळ होय. या काळाच्या आरंभीं शातवाहनांची सत्ता होती, असें आमचें मत आहे. तथापि या काळाच्या अंतिम भागांत ती होती, ही गोष्ट सर्वमान्य आहे. या काळाच्या इतिहासाला साधनें ग्रीक त्याप्रमाणेंच भारतीय आहेत. इराणचे अवशेष देखील अनेक आहेत. याच्या पुढील म्हणजे **सहावा काळ** म्हटला म्हणजे पृथूंचा होय. या राजांची कारकीर्द आणि शातवाहनांच्या प्रामुख्याची कारकीर्द जुळते. शिमुक शातवाहनाचा काळ जर ख्रि. पू. २५० धरला तर आंध्रांच्या म्हणजे शातवाहनांच्या मगधावरील वर्चस्वाच्या समाप्तीचा काळ ख्रिस्तोत्तर २२७ च्या आसपास धरतात. पार्थियन राजांची कारकीर्द देखील ख्रि. पू. २४८ पासून ख्रिस्तोत्तर २२९ पर्यंत होती. या काळांतील बरींचशीं खरोष्ठी लिखाणें उपलब्ध आहेत. इराणच्या इतिहासांतील **सातवा काळ** म्हटला म्हणजे सस्सन राजांचा काळ होय. हा काळ म्हटला म्हणजे चवथ्या काळांतील हखामणी राजांप्रमाणें अस्सल इराणी लोकांच्या प्रामुख्याचा काळ होय. याच काळांत हिंदुस्थानांमध्यें यज्ञांचा आणि शैव वैष्णव धर्मांचा पुरस्कार करणाऱ्या भारशिवांचें, वाकाटकांचें आणि गुप्तांचें राज्य होतें. येणेंप्रमाणें इराणचे कालविभाग पाहिले तर त्याच्या सदृश हिंदुस्थानांतहि कालविभाग तसेच पडतात. इराण व हिंदुस्थान या दोन्ही देशांत कर्मठ देश्य संस्कृतीचा वरचढपणा होता, हें दोन्ही देशांतील सांस्कृतिक सारूप्य लक्षांत ठेवण्याजोगें आहे. तर हें कालविभागांतील सादृश्य केवळ काकतालीय न्यायानें उत्पन्न झालें आहे किंवा त्यांत कांहीं राजव्यवहारात्मक म्हणजे ऐतिहासिक स्वरूपाचीं कारणें आहेत, याचा विचार पुढें प्रसंगानुसार येणारच आहे.

**५७ हखामणी साम्राज्याच्या काळांतील भारताची स्थिति.**

५७. प्रथम हखामणी साम्राज्याच्या कालांतील एकंदर क्रियाकलापांचें विवेचन करणें ही गोष्ट क्रमप्राप्त होते. हा काळ ख्रिस्तपूर्व ५५८ पासून ३३० पर्यंत म्हणजे सवादोन शतकांचा काळ आहे, आणि या काळांतील हिंदुस्थानचा इतिहास घेतल्यास बुद्धापासून मौर्योदयाचा हा काळ आहे, हें वर सांगितलेंच आहे.

बुद्धाच्या काळांत उत्तर हिंदुस्थानांत चार मोठालीं राज्यें होतीं. तीं म्हटलीं म्हणजे (१) मगध, (२) कोसल, (३) वत्स, व (४) अवंती हीं होत. मगध राज्याची राजधानी राजगृह येथें होती, ती पुढें पाटलिपुत्र येथें नेण्यांत आली. कोसल राज्याची राजधानी श्रावस्ती येथें होती. तिसरें राज्य वत्स उर्फ वंश होय. त्याची राजधानी कौशांबी येथें होती व त्याच्याहि दक्षिणेस अवंतीचें राज्य होतें. त्याची राजधानी उज्जयिनी येथें होती. या काळांत शैशुनाग घराण्यांतील बिंबिसार आणि अजातशत्रु हे राजे बुद्धकाळीं झाले आणि त्या घराण्यांतून पुढें नंद घराणें निघालें आणि नंदघराण्यांतून पुढें मौर्य घराणें निघालें; अशा प्रकारचा इतिहास पुराणकार आपणांस समजावीत आहेत.

पुराणांप्रमाणें पौराणिक काळापासून नंदाच्या विजयापर्यंत झालेलीं राजघराणीं व त्यांच्या राजांची संख्या येणेंप्रमाणें आहे. २४ ऐक्ष्वाकु, २७ पांचाल, २४ काशीचे राजे, २८ हैहय, ३२ कलिंग राजे, २५ अश्मक राजे, ३६ कुरु, २८ मैथिल, २३ शूरसेन आणि २० वीतिहोत्र हीं होत. यांपैकीं सर्वांत दक्षिणेकडील राज्य अश्मकांचें होतें, असें म्हणतां येईल. वर उल्लेखिलेल्या शैशुनाग, वत्स, वगैरे कांहीं घराण्यांखेरीज इतर घराण्यांचीं नांवें देण्यापलीकडे येथें फारशी क्रिया करतां येत नाहीं.

इराणच्या इतिहासांतील आणि भारतीय इतिहासांतील कालैक्यें अवलोकिल्यानंतर भिन्न कालांतील इतिहासासाठीं साहित्याचीहि थोडीशी पहाणी केली पाहिजे.

**५८ हखामणी साम्राज्याशीं समकालीन भारतांतील घडामोडींचें स्थूल अवलोकन.**

५८. बुद्धाच्या काळांत मगधाच्या दोन राजांचा उल्लेख बुद्धचरित्रविषयक ग्रंथांतून येतो. ते राजे म्हटले म्हणजे बिंबिसार आणि त्यास मारून त्याचें राज्य घेणारा त्याचा मुलगा अजातशत्रु हे होत. हे राजे शैशुनाग घराण्यांतील होते आणि या राजकुलापासून मौर्यांपर्यंत एका तऱ्हेचें वंशसातत्य आहे. शैशुनाग कुलांतील शेवटचा राजा महानंदि यास त्याचा दासीपुत्र महापद्म नंदि यानें मारून राज्य घेतलें. तो महापद्म आणि त्याचे आठ मुलगे हे मिळून नवनंद म्हणून प्रसिद्ध आहेत.* या नवनंदांच्या नंतर त्यांचा संहार करून चंद्रगुप्त मौर्य हा चाणक्याच्या साहाय्यानें राजा झाला आणि या राजाचा नातु अशोक याचा काळ आणि शातवाहन घराण्यांतील पहिला ज्ञात राजा सिमुक किंवा शिशुक याचा काळ जवळ जवळ एकच असावा. एवंच बुद्धकालीन बिंबिसारापासून मौर्योदयापर्यंतचा काल हखामणी राज्याशीं समकालीन आहे. इराणी राजांना या राजाशीं शत्रुत्व किंवा मित्रता करावी लागली असेल. इराणी राजांचा प्रत्यक्ष संबंध भारतांतील पश्चिमेकडील राजांशीं आला असला पाहिजे. त्यांचा आज आपणांस पूर्ण इतिहास उपलब्ध नाहीं; तथापि वत्सराज उदयन याच्या दिग्विजयाची हकीगत उपलब्ध असून तींत पारसीकांचा पराभव वर्णिला आहे. त्या गोष्टीचा कालनिश्चय अजून निःसंशय झाला नाहीं. उदयनास बुद्धाशीं समकालीन धरण्यास जो पुरावा पुढें आला आहे त्यांत दोष पुष्कळ आहेत.

शातवाहनाच्या इतिहासाला प्रारंभ नवनंदकालांतच झाला असणें शक्य आहे. तेथपासून सुरवात केली असतां स्वाभाविक कालखंड म्हटला म्हणजे गौतमीपुत्र शातकर्णीच्या कालापर्यंत होय आणि त्यानंतर कालखंड म्हटला म्हणजे त्यांच्या मगधविजयाच्या कालापर्यंतचा होय. शातवाहनांनीं म्हणजे पुराणांत ज्यांना 'आंध्र' म्हटलें आहे, त्यांनीं आपली विजयी सेना मगधांत नेली त्या वेळेस मौर्य आटपले होते. मौर्यांला ठार मारून राजा झालेल्या पुष्यमित्राचा शुंगवंशहि आटपला होता आणि शुंगानंतर स्वामिद्रोहाच्या परंपरेनें राज्यावर आलेल्या कण्वांचा पराभव करून त्यांचें साम्राज्यपद शातवाहनांनीं घेतलें. हा सर्व इतिहास शातवाहनांच्या दीर्घ काळाचा दुसरा कालखंड आहे. मगधांत त्यांचें राज्य इसवी सनाच्या तिसऱ्या शतकाच्या पूर्वार्धांत किंबहुना प्रथम पादांत नष्ट झालें असें गणित अनेकांनीं केलें आहे. बुद्धजन्म ख्रि. पू. ५५६ च्या सुमारास झाला तर शातवाहनांच्या कालास आरंभ ख्रिस्त पूर्व २५० च्या सुमारास झाला, असें सध्याचें प्रचलित मत आहे. म्हणजे सुमारें तीनशें वर्षेंपर्यंत दक्षिणेकडील इतिहास जवळजवळ अज्ञात स्थितींत आहे; असें समजण्याची प्रवृत्ति आहे ती माझ्या मतें चुकीची आहे. माझें मत असें आहे, कीं, शातवाहनांचा इतिहास शोधीत नंदांच्या काळापर्यंत तर जातां येतेंच; पण नंदपूर्व काळांत जरी आपण दृष्टिफेंक केली तरी ती अशास्त्रीय होणार नाहीं. बुद्धोत्तर दोनशें वर्षेंच दक्षिणचा राजकीय इतिहास बराच

* जयस्वाल 'नवनंद' याचा अर्थ 'नऊ'नंद असा न करतां नवीन नंद असा करतात.

अज्ञात असला तरी त्या काळांतील सामाजिक स्थितीविषयीं कांहीं निश्चयात्मक विधानें करणें शक्य आहे, व राजकीय स्थितीच्या ज्ञानाचा पूर्ण अभाव आहे असें नाहीं.

या तीनशें वर्षांच्या दीर्घ काळांत बाहेरच्या एकंदर जगाची काय स्थिति होती याचें सामान्य वर्णन तरी हिंदुस्थानच्या त्यांतल्या त्यांत दक्षिणेकडील स्थितीच्या अवगमनास साहाय्यक होईल. त्या कालांत दक्षिणेंत काय स्थिति असावी याविषयीं साहित्यमूलक विधायक कल्पना केली तर तिचा शातवाहनांच्या अगदीं प्रारंभाच्या शतकाच्या इतिहासज्ञानास उपयोग होईल.

हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील या तीनशें वर्षांतील स्थित्यंतरें आपणांस पुष्कळच स्पष्टपणें उपलब्ध आहेत. या तीनशें वर्षांत जगज्जेतृत्वाचा मान इराणच्या हखामणी वंशाकडे प्रथम येऊन व नंतर त्यांच्याकडून तो नाहींसा होऊन ग्रीकांकडे गेला. या कालांतील भारतीय परिणाम आपणांस सविस्तर समजले पाहिजेत. अत्यंत सदृश पण परकीय लोकांचा हा सन्निकर्ष असल्यामुळें तो सांस्कृतिक महत्त्वाचा होता. अशोकाच्या काळामध्यें सिंधुनदापासून ग्रीस व इजिप्तपर्यंतचा मुलुख ग्रीकांच्या ताब्यांत होता. हखामणी साम्राज्याचा सबंध आयुष्यक्रम मौर्यपूर्वकाळांत पडत असल्यामुळें या साम्राज्याचा हिंदुस्थानशीं आणि त्यांतल्यात्यांत महाराष्ट्राशीं जो संबंध आला असेल तो विशदीकरण करण्याचा एक महत्त्वाचा विषय होय. हिंदुस्थान व इराण या दोन शेजाऱ्यांचा राजकीय संबंध होताच; कारण या साम्राज्यानें हिंदुस्थानचा कांहीं भाग जिंकला होता. पण अलेक्झांडरच्या काळांत येथें स्वतंत्र हिंदु राजे होतेच. दारियसनें हिंदुस्थानचा भाग जिंकणें, मगधर्माचा प्रसार होणें, हिंदुराजे दारियसच्या ताब्यांतून सुटणें, मगधर्माच्या महत्त्वाचा लोप होणें, या क्रिया दारियस व आलेक्झांडर यांच्या मधल्या काळांत झाल्या. या मधल्या काळांतील इतिहास कितपत काढतां येईल तो काढला पाहिजे. प्रत्येक साधनाचा उपयोग करून घेणें तर आवश्यकच आहे; पण विशेषतः सांस्कृतिक विचारांत संबंध घेतला पाहिजे.

## ५९. भारतीय साहित्याचा स्थूल आढावा.

५९. आपणांस या काळासंबंधाचें भारतीय साहित्य आहे, त्याप्रमाणेंच इराणी व ग्रीकहि साहित्य आहे. हिंदुस्थानी साहित्यांत देखील ब्राह्मणी साहित्य आणि बौद्ध व जैन साहित्य असे भाग करावे लागतात, करितां या सर्वांकडे दृष्टिक्षेप करणें अवश्य आहे. बुद्धकाळापासून यवनविजयाच्या काळापर्यंतचा इतिहास जाणण्यासाठीं या काळांतील वाङ्मय बरेंचसें निश्चित केलें पाहिजे, आणि त्या काळाचा इतिहास सांगणारें वाङ्मय देखील निर्देशिलें पाहिजे. दुसऱ्या वर्गांतलें वाङ्मय पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

(१) ऐतिहासिक वृत्तांत सांगणारा एक पुरावा पुराणें हा होय. ब्रह्मांड, विष्णु, भागवत आणि मत्स्य हीं पुराणें या काळची राजावलि देतात. इतर पुराणें देखील कांहीं अंशीं देत आहेत. प्रत्येक पुराणांत कांहीं अंशीं इतर पुराणांशीं सरूपता आहे, तर कांहीं अंशीं प्रत्येक पुराणांत थोडीबहुत निराळी माहिती आहे.

(२) सिंहलद्वीपांतील प्राचीन इतिहास सांगणारा ग्रंथ महावंश होय. यांत मगध देशांतील राजांची यादी येते. त्यांत बिंबिसारापासून चंद्रगुप्तापर्यंत जी दहा राजांची यादी दिली आहे तींतील कांहीं नांवें पुराणांतील याद्यांशीं मिळतात तर कांहीं मिळत नाहींत.

(३) बौद्ध ग्रंथ दिव्यावदान यांत देखील अनेक राजांचीं नांवें आलीं आहेत.

(४) जैन ग्रंथ कल्पद्रुमकलिका हा देखील या कालांतील राजे लोकांची माहिती देत आहे.

राजावलीसंबंधानें पुरावा देणारें साहित्य वर दिलें एवढेंच सध्यां तरी उपलब्ध आहे; तथापि राजावलि म्हणजे इतिहास नव्हे. शिवाय राजावलि किती झालें तरी विशिष्टस्थानीय आहे. राज्यें अनेक होतीं आणि त्यांची कांहींतरी माहिती सांपडतेच. एकंदर संस्थानसमूहांतील सामाजिक स्थिति लक्षांत घेतल्याखेरीज हिंदुस्थानांतील कोणत्याहि भागाचा इतिहास चांगल्या तऱ्हेनें समजणार नाहीं. सामाजिक स्थितीवर बौद्ध वाङ्मयाच्या साहाय्यानें तशाच पुराण वाङ्मयावरून बऱ्याच पुरवण्या जोडतां येतात; पण सर्वच प्रकारच्या वाङ्मयाचें अवलोकन केलें पाहिजे व त्याबरोबर इराणी साहित्याकडे नजर फेंकली पाहिजे.

## ६० इराणच्या साम्राज्येतिहासाचें साहित्य.

६०. इराणचें साम्राज्य मोठें झालें त्यामुळें साम्राज्याखालीं आलेल्या लोकांचें साहित्य काय तें त्यांच्या यशोवर्णनास उपयोगी पडत आहे. त्यांचें स्वतःचें साहित्य फार थोडें उरलें आहे, हा एक विचित्र दैवयोग आहे. इराणचें अवशेषरूपी साहित्य शोधावयाच्या प्रारंभास जवळजवळ एक शतक लोटलें. हखामणी राज्याच्या लिखाणांचा संग्रह

प्रसिद्ध झाल्यास ऐशींच्या वर वर्षें झालीं. Les Inscrisptions des Achèmènides M. J. Oppert Paris 1851 (Journal Asiatique) या पुस्तकांत बरेच लेख आले आहेत; पण आज नवीन संकलनाची आवश्यकता आहे. Darius the Great यावर आज नवीन ग्रंथ व्हावयास हवा. पूर्वीच्या अनेक प्रयत्नांत, अॅबट नांवाच्या एका ग्रंथकारानें पुस्तक लिहून ठेवलें आहे, त्याचा उल्लेख करतां येईल. तें पुस्तक मुख्यतः ग्रीक आधारावरच लिहिलें गेलेलें आहे. इराणच्या इतिहासाविषयीं खुद्द इराणचे आधार वर उल्लेखिलेल्या अंकित लेखाशिवाय पहावयाचे तर फर्दूसीच्या शहानाम्याकडे वळलें पाहिजे. विषयकाळींच झरतुष्ट्र होऊन गेला, या कथेस शहानाम्याचा पुरावा आहेच; पण शहानामा पहिल्या दारियसच्या राज्याचा उल्लेख करीत नाहीं, तर खुसरूच्या नंतर लेहरास्प १२० वर्षें राज्य करता झाला, असें दाखवितो. येथील पारशीसमाजामध्यें देखील प्राचीन इराणच्या इतिहासासंबंधानें हवी तशी जागृति नाहीं. त्यांनीं देखील त्या दिग्विजयी पुरुषावर चांगला ग्रंथ लिहिला नाहीं. खरोखर पहातां इराणी लोकांचा संबंध भारतीय लोकांच्या पौराणिक काळापासून एकसारखा चालू आहे, त्याचें स्थूल तरी अवगमन हवें. तेव्हां दारियसचा काळ आपणांस समजून घेतां येईल. नाहीं म्हणायला श्री. जमशेटजी पालणजी कापडिया यांनीं 'दारयवुश वीस्ताश्प' यावर अनेक लेख गुजराथी वर्तमानपत्रांत लिहिले. त्यांच्या तुकड्यांचें पुस्तक कामा मेमोरियल इन्स्टिट्यूट मध्यें आहे.

### ६१ कुरुस पासून हिंदुस्थानावर इराण्यांच्या स्वाऱ्या होत होत्या काय ?

६१. इराणचे सम्राट् हिंदुस्थानांत केव्हां येऊं लागले या विषयीं बरीच अनिश्चितता आहे. कुरुस (Cyrus) हा हखामणी घराण्यांतील पहिला राजा. तेव्हां त्याच्या काळापासून हिंदुस्थानावर स्वारी किंवा राज्य करण्याचें श्रेय इराणला अनेक ग्रंथकार देऊं पहात आहेत. प्राचीन ग्रीकांकडूनच या संबंधाचा मुख्य पुरावा आहे, आणि त्यांत आणखी गोष्ट अशी आहे, कीं, ग्रीकांचे खरे प्राचीन ग्रंथ मुळींच उपलब्ध नाहींत. प्राचीन ग्रंथकारांनीं लिहिलेल्या ग्रंथांतील उत्तरकालीन ग्रंथकारांनीं घेतलेले उतारे तेवढे आज आपल्यापुढं पुरावा म्हणून आहेत. त्या अनेक पुराव्यांचें मंथन करून कोलंबिया युनिव्हर्सिटीचे प्रो. जॅकसन केंब्रिजच्या भारतेतिहासांतील 'उत्तर हिंदुस्थानांतील इराणचें वर्चस्व' या प्रकरणांत सांगत आहेत कीं, 'कुरुस' आणि 'कंबायासिस' हे हिंदुस्थानाच्या हद्दीपर्यंत आले असतील; पण त्यांनीं हिंदुस्थानचा भाग जिंकला नसेल. हिंदुस्थान जिंकलें असें सांगणारा मुख्य ग्रंथकार म्हटला म्हणजे 'झेनोफन' हा होय. त्यानें आपल्या पुस्तकाला सायरसचें म्हणजे कुरुसचेंच नांव 'सायरोपिडिया' असें दिलें आहे.* सायरसनें हिंदुस्थान जिंकला असें जरी नसलें तरी हिंदुस्थानच्या राजांकडून करभार घेतल्याचें आणि हिंदुस्थानची वकीली स्वीकारल्याचें विधान झेनोफननें केलें असल्यामुळें लोकांमध्यें तशी समजूत पसरण्यास कारण झालें. 'कपिश' नांवाच्या एका शहराचा या कुरुस्नें नाश केला, अशी कथा प्लीनीनें दिली आहे. त्या कथेचा अर्थ हिंदुस्थानाच्या जवळजवळ कुरुस आला होता, एवढाच प्रो. जॅकसन घेतात.

इराणनें किंवा त्याच्या साम्राज्यांत अंतर्भूत न झालेल्या कैकेय, पारसीक इत्यादि नावांनीं ज्ञात असलेल्या स्वतंत्र टोळ्यांनीं भारतीय प्रदेश कुरुसच्या काळांत किंवा त्याच्या पूर्वी जिंकला असणें शक्य आहे, असें आमचें मत अनेक प्रकारच्या भारतीय पुराव्यावरून झालें आहे. त्याची सविस्तर मांडणी पुढें होणारच आहे.

कुरुसच्या मृत्यूनंतर कंबुयासिस आला. त्याला इजिप्त जिंकण्याचें म्हणजे खरोखर ताब्यांत ठेवण्याचें काम पडलें होतें व त्याला हिंदुस्थानकडे लक्ष द्यावयास सवडच नव्हती. त्याचा काल कर्तृत्ववान् बापानें आपल्या अमलाखालीं आणलेल्या लोकांनीं बंड केल्यानंतर त्यांना परत जिंकण्यांतच

*झेनोफन (Xenophon) यानें जो सायरोपिडिया लिहिला आहे त्याच्या आवृत्त्या अनेक आहेत. होल्डेन (H. A. Holden) यांची आवृत्ति (१८८७–९०) ही त्यांतल्या त्यांत अर्वाचीन आहे. सायरोपिडियाचें इंग्रजी भाषांतर झेनोफनच्या संपूर्ण इंग्रजी भाषांतरांत उपलब्ध होईल. भाषांतरकार रा. (H. G. Dakyns) डाकिन्स होत. (१८९०–९४).

या सायरोपिडियाला इतिहास म्हणण्यापेक्षां कादंबरी म्हटलें तर अधिक योग्य होईल, असा शेरा झेनोफनवर ब्रिटानिकांत लेख लिहिणारानें मारला आहे (१४ वी आवृत्ति). या पुस्तकांत साक्रेटीसच्या शिक्षणपद्धतीचें समर्थन केलें असून प्लेटोच्या शिक्षणविषयक कल्पनांना उत्तरादाखल हें पुस्तक आहे. ग्रंथकारास आपल्या शिक्षणविषयक कल्पना मांडून त्यांचें समर्थन करावयाचें होतें म्हणून ही कादंबरी लिहिली असें वाटतें. सायरसविषयींच्या हिरोडोटसच्या लेखांत आणि याच्या लेखांत तफावत आहे. हिरोडोटस सायरस युद्धांत पडला असें दाखवीत आहे, तर प्रस्तुत पुस्तक सायरस हा घरीं अंथरुणांतच पडून वारला असें दाखविलें आहे.

कांहीं नीतितत्त्वें स्थापित करण्यासाठीं एखादी काल्पनिक गोष्ट लिहावी, तथापि त्या गोष्टीवर विश्वास जडल्यामुळें इतिहासाच्या क्षेत्रांत घोंटाळा उत्पन्न व्हावा तसाच प्रकार या झेनोफनच्या कृतीनें झाला आहे.

गेला आणि आपले प्रांत जास्त वाढविण्याचें काम पुढें दारियसलाच करावें लागलें.

बेहिस्तानचा लेख दारियसच्या २७ प्रांतांत हिंदुस्थान समाविष्ट करीत नाहीं; त्यावरून तो प्रसिद्ध लेख ज्या वेळेस कोरला गेला त्यावेळीं 'हिंदुस्थान' इराणच्या ताब्यांत आला नव्हता. बेहिस्तानचा लेख कोरण्याचें काम ख्रि.पू. ५२० ते ५१८ अशीं दोन वर्षें चालू होतें. त्यावरून भारतविजयाचा काळ ५१८ नंतरचा आहे, असा अजमास काढण्यांत आला आहे.*

बेहिस्तानचा विस्तृत लेख मुळासह पुढें दिलाच आहे.

हिंदुस्थान हा दारियसचा विसावा प्रांत होता. हिंदुस्थानचा प्रदेश जिंकला तो किती मोठा होता याची कल्पना नक्की देतां येत नाहीं, व इतर संशोधकांनीं काढलेलीं अनुमानें देखील मनास पटत नाहींत. हिरोडोटस सांगतो कीं, हिंदुस्थानच्या राज्याची लोकवस्ती इतर ठाऊक असलेल्या प्रदेशांपेक्षां अधिक आहे, आणि हिंदुस्थानचें उत्पन्न एकंदर साम्राज्याच्या उत्पन्नाच्या एकतृतीयांश होतें, व हिंदुस्थानचे लोक इतरांपेक्षां अधिक करभार देत. तीनशें साठ टालेंट इतकी सुवर्णमृत्तिका त्यास द्यावी लागे. या सुवर्णमृत्तिकेच्या किंमतीचा हिशोब प्रो. जॅक्सन यांनीं दहा लाख साव्हरिन इतका केला आहे.

जर उत्पन्न इतकें दांडगें होतें तर बराच मोठा प्रांत दारयवहूनें आपल्या कबज्यांत आणला असला पाहिजे; तथापि त्याच्याविषयीं आज मत असें झालें आहे, कीं, सिंधुनदी व तिला मिळणाऱ्या पूर्ववाहिनी नद्या हा प्रांत दारियसनें घेतलाच असला पाहिजे; तथापि सिंधूच्या पूर्वेकडील फारसा भाग घेतला नसावा, अशीच समजूत बरीच प्रचलित आहे. इराणच्या राजाच्या वैभवाचे दर्शक बायबलामध्यें जे उल्लेख आहेत त्यांत सिंधुनदीचा म्हणजे पर्यायानें हिंदुस्थानचा उल्लेख येतो; पण ते उल्लेख इतके अपूर्ण आहेत कीं, ते आपणांस याविषयीं खऱ्या इतिहासाचें अवगमन करण्यास साहाय्यक होत नाहींत.

दारियसच्या राज्याची सरहद्द सिंधूच्या पलीकडे फक्त झेलम नदीपर्यंतच असावी, असा विचार उत्पन्न करणारी एक गोष्ट आहे, आणि ती गोष्ट म्हटली म्हणजे झेलम नदीचें नांव होय. या नदीचें संस्कृत नांव 'वितस्ता' आहे आणि ग्रीक नांव Hydaspes म्हणजे 'हिडास्पिस' असें आहे. हा शब्द Hystaspes च्या इतका जवळ आहे कीं, एक दुसऱ्याचा अपभ्रंश आहे, अशी शंका मनांत सहज उद्भुत होते. हिस्टास्पेसचें खरें इराणी रूप 'विश्तास्प' असें होतें. हें रूप देखील झेलमनदीचें संस्कृत नांव 'वितस्ता' या रूपाशीं मिळतें आहे. यावरून 'हिडास्पिस' हें नांव इराणी राजांनीं आपल्या बापाच्या स्मरणार्थ दिलें असावें काय, असा विचार मनांत येतो. राजाचें नांव राष्ट्राला लागतें आणि राष्ट्राचें नांव देखील नदीस लागतें. उलटपक्षीं राष्ट्र पुष्कळदां मुख्य नदीच्या नांवानें ओळखलें जातें, त्याप्रमाणें विश्तस्पाचें नांव त्या प्रदेशास लागून नदीस पुढें चिकटलें असावें. उलटपक्षीं कित्येक असेंहि म्हणतील, कीं, इराणच्या राजानें आपल्या मुलाचें नांव ठेवतांना राष्ट्राचें नांव ठेवावें असा प्रकारहि झाला असेल. या अनेक गोष्टींपैकीं कांहीं झालें असेल काय याविषयीं निश्चयात्मक विधान करतां येत नाहीं.

'वितस्ता' हा शब्द ऋग्वेदांत येतो, ही गोष्ट वितस्ता शब्दाचा संबंध जोडण्यास 'वितस्ता' नांव इराणी राज्याच्या वर्धनाची खूण होती, असें धरण्यास मारक आहे. तथापि ऋग्वेदांतील नदीसूक्तांतच या नदीचा उल्लेख आहे. सिंधु नदाच्या अत्यंत नजीकच ही नदी असून तें नांव एकदांच कां येतें हा प्रश्न आहे. या शिवाय 'आर्जिकीया' हें ऋग्वेदांतील नांव याच नदीचें आहे असा समज हिलेब्रँन्ट सारख्या संशोधकांचा आहे. अत्यंत उत्तरकाळीं सूक्त तयार होऊन संहिती करणाऱ्या वेळीं तें वेदांत शिरलें ही शक्यता नाकारतां येत नाहीं; हें नदीसूक्त अनेक जणांनां अनेक कारणामुळें उत्तर कालीन भासलें होतें.

दारियसनंतर क्झर्क्सिस सम्राट् झाला. त्याचा वेळ ग्रीकांशीं लढण्यांतच गेला त्यामुळें त्याला भारतीय साम्राज्य वाढविणें शक्य झालें नाहीं; तथापि त्याचें राज्य हिंदुस्थानांत असलें पाहिजे, असा निर्णय प्रो. जॅक्सन यांनीं काढला आहे, व त्या निर्णयास प्रमाण म्हणून त्याच्या फौजेंत हिंदु लोक होते ही गोष्ट उल्लेखिलेली आहे. तथापि या पुराव्यावरून त्याचें राज्य हिंदुस्थानांत होतें असा निर्णय काढतां येत नाहीं. आयुधजीवी लोकांचे अनेक संघ त्यावेळेस निरनिराळ्या देशीं हिंडत असत, आणि हिंदुस्थानावर इराणी सम्राटाचें राज्य नसतां देखील इराणी सम्राटाच्या फौजेंत हिंदी लोक असणें शक्य आहे.

इराणी साम्राज्याच्या नाण्यांवरून हिंदुस्थानविषयक फारच थोडी माहिती मिळण्याजोगी आहे. इराणी नाण्यांवरील महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे "The Coinage of Lydia and Persia" (लंडन १८७७) हा होय. इ. बाबेलोन यानें फ्रेंचमध्यें हखामणीराज्यावर लिहिलेल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेच्या वीस पृष्ठांत नाण्यांची बरीच माहिती दिली आहे. (पारीस १८९३).

*हिंदुस्थान जिंकण्याचा काळ निश्चित केला तें पुस्तक जर्मनमध्यें 'Weissbach' यांनीं लिहिलें आहे. त्याचा आधार देऊन जॅक्सन यांनीं कालनिर्णयाची वाट लावली आहे. हा कालनिश्चय न तपासतां केवळ 'आप्तवाक्य' अवतारित करण्यापलीकडे प्रस्तुत लेखकास जातां आलें नाहीं.

## ६२ दारियसच्या भारतीय विजयापूर्वीच्या इराणी स्वाऱ्यांविषयीं विधान.

६२. इराणी नाणें 'सिगलोई'† यावरील चिन्हें आणि प्राचीन हिंदुस्थानचीं नाणीं यांवरील चिन्हें यांत सादृश्य दाखविण्याची खटपट प्रो. रापसन यांनीं केली (जर्नल रा. ए. सो. १८९५) व इराणीसाम्राज्याच्या अस्तित्वाला भारतीय आधार सांपडल्यासारखें वाटूं लागलें; तथापि त्याचें महत्त्व पुढें नाहींसें झालें. इराणच्या नाण्यांची प्रतिकृति म्हणून मानलेल्या नाण्यांच्या भारतोपलब्धीविषयीं संशय उत्पन्न झाला. इराणचीं सोन्याचीं नाणीं हिंदुस्थानांत फार खेळलीं नाहींत, याला कारण आहे. इराणी नाण्यांची किंमत फार होती व हिंदुस्थानांत सोनें स्वस्त होतें त्यामुळें अतिशय किंमत देऊन तिकडचें सोन्याचें नाणें घेतो कोण? प्राचीन काळीं हिंदुस्थानांत सोन्याच्या नाण्याची किंमत किती कमी होती याविषयीं डॉ. जॉर्ज माकडोनल्ड हे केंब्रिज इतिहासांतील आपल्या लेखांत दाखवितात, कीं, सोन्याची किंमत आठ रुपये तोळा होती तर तोळा वजनाच्या नाण्याला तेरा पूर्णांक तीन दशांश इतके रुपये पडत. त्यामुळें रुप्याचें इराणी नाणें हिंदुस्थानांत खेळे. सोनें स्वस्त असल्यामुळें आणि सोन्याचें परकीय नाणें महाग असल्यामुळें तें व्यवहारांत आणण्याच्या भानगडींत लोक पडत नसत. सोनें प्राचीन काळीं इतकें स्वस्त होतें, कीं, तें कधीं कधीं म्हणजे उदाहरणार्थ मार्कोपोलोच्या काळांत पांच चांदीच्या तोळ्यास एक तोळा सोनें मिळे. हिंदुस्थानास अशा वेळेस 'सुवर्णभूमि' म्हणत त्यांत फारसें आश्चर्य नाहीं.

आपणांस या हखामणी राज्याशीं समकालीन असलेल्या बुद्धकालाच्या अगोदरच्या कालाकडे प्रथम वळलें पाहिजे. इराणच्या इतिहासांत हा जर पौराणिक स्वरूपाचा काळ धरला असला तर भारताच्या इतिहासांत या काळास आपण "देवयोनि काळ" किंवा 'अद्भुत कथाकाळ' असें नांव देऊं.

† बाबू दुर्गाप्रसाद यांनीं बडोदें येथें भरलेल्या प्राच्य विद्या परिषदेच्या सान्निध्यानें भरलेल्या मुद्राविज्ञानींच्या परिषदे पुढें जें व्याख्यान दिलें त्यांत दारियसच्या सिगलोईवर ज्या खुणा सांपडतात त्यांत सिंधु संस्कृतींतील लिपीमुळें ज्या खुणा भारतांत स्थापित झाल्या त्या आहेत, असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे ( ३० डिसेंबर १९३३ रोजींचें व्याख्यान) सध्याच्या संशोधनाच्या स्थितींत या त्यांच्या विधानावरून निश्चयात्मक निर्णय कोणताच काढतां येत नाहीं.



यवन नगरी ( जुन्नर ) जवळील मानमोड्या लेण्यांतील सुंदर विहारसमुच्चय.

## प्रकरण ७ वें.

# प्रतिष्ठानचा नरसिंह.

### ६३ महाराष्ट्राचा राजा नरसिंह याविषयीं मगधाची ईर्ष्या.

६३. महाभारतीय आणि इतर पौराणिक कथा वगळतां दक्षिणेंतील राजाचा सर्वांत जुना उल्लेख म्हटला म्हणजे प्रतिष्ठान येथील नरसिंह राजाचा होय. या प्रतिष्ठानविषयक कथेचें अस्तित्व उदयनपुत्र नरवाहनदत्त याच्या काळापूर्वी होतें अशी साक्ष गुणाढ्य देत आहे. नरवाहनदत्त हा कथाप्रिय होता, आणि त्यामुळें त्याला ज्या कथा सांगण्यांत आल्या आहेत, त्यांपैकीं एक प्रतिष्ठानचा राजा नरसिंह आणि पाटलिपुत्राचा राजा विक्रमादित्य यांच्या स्पर्धेची आहे. 'विक्रमादित्य' हा जयिष्णु होता; पण त्याचें प्रतिष्ठानच्या नरसिंहापुढें कांहीं चालत नव्हतें, तरी त्यानें 'नरसिंहाला जिंकीन' अशी प्रतिज्ञा केली होती, आणि ती प्रतिज्ञा तत्त्वतः नाहीं तरी शाब्दिक दृष्टीनें कशीबशी पुरी केली, आणि ती पुरी करण्यांत एका वेश्येची मदत घेतली, असा त्या कथेचा मुख्य विषय आहे. त्या कथेंत अद्भुत मिसळलें गेलें आहे, त्यामुळें आणि विक्रमादित्य हें अनेक चमत्काराच्या कथांशीं संबद्ध झालेलें नांव ज्याअर्थी त्या कथेंत येतें त्यामुळें कथेच्या सत्यतेविषयीं शंका येणारच आणि त्याअर्थी त्या कथेंतील मुख्य आशय जो मगध आणि महाराष्ट्र यांची स्पर्धा तो विषय तरी कितपत स्वीकारावा अशी शंका उत्पन्न होईल. त्या शंकेचा विचार पुढें करूंच. परंपरागत आलेली माहिती जशीच्या तशीच अगोदर स्वीकारून नंतर त्या कथेच्या परीक्षणाकडे वळलें पाहिजे. ती कथा येणेंप्रमाणें:— (रत्नप्रभालंबक तरंग ४ था).

### ६४ मागध विक्रमादित्याची कथा.

६४. "पाटलिपुत्र नगरांत विक्रमादित्य राजा असून हयपति व अश्वपति असे त्याचे दोन प्रिय मित्र होते. त्यांच्यापासून त्याला पुष्कळ हत्ती व घोडे मिळत. त्या मानी राजाचा नरसिंहनामक प्रतिष्ठानचा बलाढ्य राजा मोठा शत्रु असे. त्याच्यापाशीं अगणित पायदळ होतें. एकदां त्याच्यावर रागाऊन अतिशय गर्वित झालेल्या विक्रमादित्यानें एकाएकीं अशी प्रतिज्ञा केली:—" मी त्या राजाला असा जिंकीन कीं, बंदी व मागधद्वारामध्यें त्याला माझा सेवक म्हणतील." (तथा मया विजेतव्यो राजा नरपतिर्यथा। स बंदिमागधैर्द्वारि सेवको मे निवेद्यते।) अशी घोर प्रतिज्ञा करून व आपल्या त्या दोघां परम मित्रांना बोलावून त्यांच्या सहवर्तमान घोडे व हत्ती यांच्या योगानें पृथ्वीला क्षुब्ध करीत तो त्या नरसिंह राजावर निघाला. तो प्रतिष्ठान नगराजवळ आला आहे, असें कळतांच नरसिंह राजा आपल्या विशाल सैन्यासह बाहेर आला. त्यानंतर दोघांचें विस्मयजनक युद्ध झालें. गज व अश्व यांवरील योद्ध्यांशीं पदाती लढूं लागले. (ततस्तयोरभूद्युद्धं राज्ञोर्जनितविस्मयम्। गजाश्वेन समं यत्र युद्ध्यंते स्म पदातयः) बराच वेळ संग्राम झाल्यावर नरसिंहाच्या शूर शिपायांनीं विक्रमादित्याच्या लोकांचा पराभव करून त्यांस अश्व व गज यांसह दशदिशांस पिटाळून लाविलें. तेव्हां विक्रमादित्यहि पळून आपल्या नगरास परत आला व त्याचे मित्र आपआपल्या राजधानीस गेले. इकडे नरपति-नरसिंहहि बंदीजन त्याच्या पराक्रमाची स्तुति करीत असतांना आपल्या प्रतिष्ठान नगरींत शिरला. (नरसिंहो नरपतिर्जितशत्रुर्निजं पुरम्। प्रविवेश प्रतिष्ठानं बंदिभिस्तुतविक्रमः।).

पाटलिपुत्र नगरांत परत आल्यावर, कार्य न साधल्यामुळें विक्रमादित्य चिंताग्रस्त झाला, आणि 'शस्त्रानें अजिंक्य असलेल्या राजाला मी आपल्या बुद्धिसामर्थ्यानें जिंकतों, त्यामुळें कित्येक माझी निंदा करतील, पण ते ती खुशाल करोत. मी माझी प्रतिज्ञा कशीतरी पुरी करणार' असा विचार करून व राज्यभार योग्य मंत्र्यावर टाकून, एका बुद्धिवर नामक मुख्य मंत्र्याला व कांहीं राजपुत्रांना बरोबर घेऊन तो गुप्तपणें आपल्या नगरांतून निघाला. संन्याशाचा वेष घेतलेले पांच कुलीन शूर क्षत्रियहि त्याच्याबरोबर होते. अशा प्रकारच्या परिवारासह तो शत्रूच्या प्रतिष्ठान नगरास गेला. तेथें 'मदनमाला' या नांवाच्या एका वेश्येचें राजाच्या मंदिरासारखें रमणीय घर होतें. त्या मंदिराच्या उंच प्रासादशिखरावर लावलेल्या ध्वजांचीं वाऱ्यानें हालणारीं वस्त्रें त्यांना जणूं काय बोलावीतच होतीं. त्या मंदिराच्या मुख्य पूर्वद्वारावर वीस सहस्र सशस्त्र शिपायी पहारा करीत होते. बाकीच्या तीन दिशांतील तीन द्वारांवर दहा दहा सहस्र शूर उभे होते. द्वारावर जाऊन राजानें प्रतिहाराला आपला आंत जाण्याचा उद्देश कळविला. त्यानें मदनमालेची आज्ञा घेऊन त्यांना आंत सोडिलें. त्या सुंदर घरांत प्रवेश करतांच तें कोठें अनेक जातिवंत घोड्यांनीं सुशोभित झालें आहे; कोठें बांधलेल्या हत्तींच्या

संघानें दुःसंचर झालें आहे, कोठें आयुधांच्या राशींनीं गंभीर आकारवान् झालें आहे, कोठें रत्नांच्या प्रभेनें देदीप्यमान झालेल्या कोषगृहांनीं उज्ज्वल दिसत आहे, कोठें त्यांतील सेवकसमूहानें एकसारखें मंडल बांधिलें आहे, कोठें तें उंच स्वरानें स्तुतिपाठ करणाऱ्या बंदिजनांच्या कोलाहलानें व्याकुळ झालें आहे व कोठें सतत चाललेल्या गायनाच्या व मृदंगांच्या ध्वनीनें नादित झालें आहे, असें त्याला आढळलें. त्या भव्य मंदिरांत सात चौक होते. त्या विचित्र गृहाचें चांगलें निरीक्षण करीत, राजा आपल्या परिवारासह तिच्या उंच मंदिरांत गेला.

आपल्या सेवकांच्या तोंडांतून, या पाहुण्यानें निरनिराळ्या चौकांतील अश्वादि निरनिराळ्या वस्तूंचें सूक्ष्म निरीक्षण केलें, असें ऐकून हा कोणी गुप्त वेषानें आलेला राजा असावा असें तिनें अनुमान केलें. ती उठून सामोरी गेली व साभिलाष आणि सकौतुक प्रणाम करून तिनें त्याला आंत नेलें, व राजाला उचित अशा आसनावर बसविलें. तिचें रूप, लावण्य व विनय यांनीं ज्याच्या चित्तास आकर्षण करून घेतलें आहे, अशा विक्रमादित्यानें 'मी कोण आहें' हें न सांगतांच तिचें अभिनंदन केलें. त्यानंतर मदनमालेनें स्नान, पुष्पें, अनुलेपन, उंची वस्त्रें, आभरणें इत्यादिकांच्यायोगानें राजाचा मोठा सत्कार केला. त्याच्या अनुयायांस त्या दिवसाचा शिधा देऊन सचिवासह राजाला उत्तम भोजन दिलें. मधुपानादिकांत तो दिवस तिनें त्याच्या बरोबर घालविला. दर्शन होतांच वश झालेल्या तिनें त्याला आपणां स्वतःला समर्पण केलें. तो राजा जरी तेथें गुप्त रीतीनें राहात होता, तरी चक्रवर्ती राजाला उचित अशाच थाटानें तो राहात असे. तो याचकांना प्रत्यहीं जितकें व जें जें कांहीं देई, तें तें ती स्वतः त्याला पुरवीत असे. त्याच्या उपभोगानें आपलें शरीर व धन कृतार्थ होत आहे, असें समजून ती इतर पुरुषांविषयीं विरक्त झाली. तिच्या प्रेमामध्यें आसक्त झालेल्या राजा नरसिंहाचेंहि तिनें युक्तीनें निवारण केलें (आयान्तं नरसिंहं च वारयामास युक्तिभिः).

याप्रमाणें ती सेवा करीत असतांना एकदां राजा एकांतांत आपल्या सहचर बुद्धिवरास म्हणालाः-"मंत्रिन्, वेश्या म्हणजे नेहमीं द्रव्याचा लोभ करणारी, हें प्रसिद्ध आहेच. तिचा लोभच विधात्यानें याचकांस वांटून दिला आहे; पण ही मदनमाला किती उदार आहे पहा. मी हिच्या सर्वस्वाचा उपभोग घेत असतांनाहि ही अतिस्नेहामुळें मजविषयीं विरक्त होत नाहीं, तर उलट संतुष्टच होते, तर आतां मी हिच्यावर कोणत्या रीतीनें प्रत्युपकार करूं सांग, व त्यामुळें माझी प्रतिज्ञाहि सिद्ध होईल असा कांहीं उपाय शोधून काढ." राजाचें हें भाषण ऐकून मंत्री म्हणाला :-"महाराज, असें जर असेल तर प्रपंचबुद्धि भिक्षूनें जीं अमूल्यरत्नें आपल्याला दिलीं आहेत, त्यांतील कांहीं तिला द्या."

तें ऐकून राजा म्हणालाः—"मित्रा, त्यानें दिलेलीं सर्व रत्नें जरी मीं तिला दिलीं, तरी हिच्या उपकारांची फेड होणें शक्य नाहीं." त्यावर मंत्री विचारूं लागलाः—"देव, आपल्याला तीं रत्नें भिक्षूनें कशीं दिलीं, त्याविषयीं मला तर मोठें कौतुक वाटत आहे." तें ऐकून राजा तत्संबंधीं वृत्त सांगूं लागला.

"मागें तो भिक्षु रोज मजजवळ येऊन एकेक लांकडी बंद केलेला संपुट मला देत असे. मीहि तो न उघडतां जशाचा तसाच एक वर्षपर्यंत खजीनदाराच्या स्वाधीन करीत असें. तोहि त्याला तशाच व्यवस्थेनें ठेवी. एकदां प्रपंचबुद्धीनें मला आणून दिलेला एक संपुट दैववशात् माझ्या हातांतून खालीं पडला, व त्याचे दोन तुकडे झाले. त्याबरोबर त्यांतून निखाऱ्यासारखें रत्न बाहेर पडलें. तें पाहतांच मला मोठें आश्चर्य वाटलें. मी त्या भिक्षूनें दिलेलीं संपुटें फोडून त्यांतील अनेक अमूल्य रत्नें बाहेर काढिलीं आणि विस्मयानें त्या भिक्षूस म्हटलें 'महाराज, असल्या ह्या अमूल्य रत्नांनीं माझी सेवा कां करितां?' तेव्हां तेथल्या सर्व लोकांस जाण्यास सांगून तो मला म्हणाला 'येत्या कृष्णचतुर्दशीस रात्रीं स्मशानांत जाऊन मी कांहींएक विद्या संपादन करणार आहें. यास्तव हे वीरा, तेथें येऊन तूं माझें सहाय्य कर; कारण, वीराच्या साहाय्यानें निर्विघ्न झालेली कोणतीहि सिद्धि सुलभ होत असते.'

तें ऐकून मी त्याला साहाय्य करण्याचें अभिवचन दिलें, त्यामुळें तो भिक्षु आनंदित होऊन गेला. कांहीं दिवसांनीं कृष्णचतुर्दशी आली. मला आपल्या वचनाचें स्मरण होतेंच. त्यामुळें मी आपलीं सर्व दैनिक कृत्यें आटोपून प्रदोष कालाची वाट पहात राहिलों. पण स्नानसंध्या करितांच दैववशात् मला झोंप लागली; तेव्हां स्वप्नांत भगवान् श्रीहरि गरुडावर बसून व कमलेला मांडीवर घेऊन माझ्यापाशीं आला, आणि म्हणाला 'राजन्, तो दुष्ट प्रपंचबुद्धि आज तुला स्मशानांत नेऊन मंडलपूजनांमध्यें तुझा बलि देणार आहे. यास्तव तुझा घात करण्याकरितां तो जें कांहीं तुला करावयास सांगेल, 'तें तूं स्वतः अगोदर करून दाखीव म्हणजे मग मी तसें करीन' असें तूं त्याला सांग, व तो तें करूं लागला असतां योग्य अवसर पाहून तूं त्याला मार. असें केल्यानें त्याला मिळणारी सिद्धि तुला मिळेल' इतकें सांगून भगवान्

विष्णु गुप्त झाला आणि मी जागा झालों, 'श्रीहरीच्या अनुग्रहानेंच मला तो भिक्षु कपटी व वध्य असल्याचें कळलें; नाहींतर फुकट प्राणास मुकलों असतों' असें मनांत म्हटलें. नंतर त्या रात्रीचा पहिला प्रहर समाप्त झाला असतां, हातांत खड्ग घेऊन मी एकटाच स्मशानांत गेलों. तेथें एकीकडे मंडलांत बसून पूजन करीत असलेल्या त्याला मीं पाहिलें व जवळ गेलों. तेव्हां मजकडे पाहून त्यानेंहि माझें अभिनंदन केलें. कांहीं वेळानें अवशिष्ट पूजा आटोपून तो शठ मला म्हणाला, 'राजन्, डोळे मिटून व अंग पसरून तूं येथें उघडा पड, म्हणजे आम्हां दोघांनाहि सिद्धी मिळेल.' तें ऐकून मीं त्याला म्हटलें 'योगिन्, कृपा करून तूं मला अगोदर कसें निजावयाचें तें दाखव, म्हणजे लागलीच मीसुद्धां तसें करीन!"

हें माझें म्हणणें ऐकून तो मूढ संन्यासी भूमीवर हातपाय पसरून तोंड खालीं करून पडला. तेव्हां मींहि, त्याच्या वेषाला फारसा मान न देतां, दुर्गुणांकडेच दृष्टि ठेवून, त्याचें शिर आपल्या तीक्ष्ण शस्त्रानें एका क्षणांत उडविलें. त्या बरोबर अंतरिक्षांतून 'राजन्, या पापी भिक्षुकाला मारलेंस, हें फार चांगलें केलेंस. गगनांतून गमन करणें ही सिद्धि याला पाहिजे होती; पण आतां ती तुला प्राप्त होईल. तुझ्या या धैर्यानें मी कामचारी कुबेर तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. तुला हवा असेल तो आणखी एक वर मागून घे. अशी आकाशवाणी झाली, व तो देव कुबेर तत्काल प्रगट झाला, त्या बरोबर मी प्रणाम करून म्हटलें, 'त्यावेळीं मला कांहीं नको; पण मला कांहीं लागेल त्यावेळीं मी आपलें स्मरण करीन, त्यावेळीं आपण दर्शन देऊन माझें इष्ट मला द्यावें.' त्यावर 'बरें आहे,' असें म्हणून तो गुप्त झाला; व अद्भुतसिद्धि प्राप्त झाल्यामुळें मींहि एकदम आपल्या मंदिरांत आलों. असो, मंत्रिन्, असा तो वृत्तांत आहे. त्या कुबेराच्या वरानें मी हिच्यावर प्रत्युपकार करण्याचा प्रयत्न करतों. यास्तव बुद्धिवरा, तूं गुप्तवेषानें हा राजपुत्रांचा परिवार घेऊन अगोदर पाटलिपुत्रास जा. तों मीहि माझ्या या प्रियेवर अपूर्व परोपकार करून मागोमाग येतों." असें सांगून व सर्व परिवारासह त्याला पाठवून राजा त्या रात्रीं तिच्याबरोबर तेथें आनंदानें राहिला. आतां आपला कांहीं काळ वियोग होणार आहे, हें मनांत आल्यामुळें, त्याला मोठी चिंता लागली होती व राजा आपणांपासून दूर होणार आहे, असें तिला तिच्या हृदयानेंच कळविल्यामुळें तिला रात्रभर झोंपसुद्धां आली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं राजा सर्व प्रातःकृत्यें करून जपाच्या निमित्तानें देवघरांत गेला व तेथें त्यानें एकांतांत बसून कुबेराचें स्मरण केलें. त्याबरोबर तो त्याच्याजवळ आला. त्याला समोर पाहतांच प्रणाम करून राजा त्यास म्हणालाः— "देवा, मागें मला अभिवचन दिल्याप्रमाणें पांच सोन्याचे अक्षय पुरुष दे. त्यांच्या अंगांचें सोनें काढून जरी त्याचा व्यय केला तरी ते पुनः पुनः भरून यावेत." राजाची ही वरप्रार्थना ऐकून व 'तथास्तु' म्हणून धनद गुप्त झाला व लागलेच पांच मोठे सुवर्णपुरुष त्याच्या देवघरांत उत्पन्न झाले. त्यांना पाहून राजास मोठा आनंद झाला. नंतर तो राजा आपल्या प्रियेला न सांगतांच आकाशमार्गानें पाटलिपुत्र नगरास परत आला. तेथें पौरजन, मंत्री व अंतःपुरवर्ग यांनीं त्याचें उत्तम स्वागत केलें. नंतर आपलें सर्व लक्ष प्रतिष्ठानांत ठेवून तो राजकार्यें पहात कांहीं दिवस तेथें राहिला.

इकडे प्रतिष्ठानांत आपला प्रिय परत कां येत नाहीं, असें म्हणून उत्कंठित झालेली मदनमाला त्याला पाहण्याकरितां देवघरांत शिरली; पण तिला तेथें आपला कांत न दिसतां पांच उंच सुवर्णाचे पुतळे दिसले. तेव्हां अतिशय दुःखित होऊन ती मनांत म्हणाली "खरोखर तो माझा प्रिय कोणी विद्याधर अथवा गंधर्व असावा. त्यानें मला सोन्याचे पांच पुरुष ठेवून दिले व आपण निघून गेला; पण त्याच्यापासून दूर झालेल्या मला, या भारांना घेऊन काय करावयाचें आहे?" इतकें मनांत आणून ती विव्हल झाली व सेवकांना आणि राजाला शोधीत सर्व घरभर हिंडली. खालीं, वर, आंत, बाहेर, कोनांत, सांधींत इत्यादि सर्व ठिकाणीं तिनें त्याला पाहिलें; पण कांहीं पत्ता लागला नाहीं. तेव्हां ती फार कष्टी झाली, व वियोगदुःख असह्य झाल्यामुळें शरीरत्याग करण्याचा तिनें निश्चय केला, तों इतक्यांत 'देवि, असा विषाद करूं नकोस, तुझा प्रिय कोणी कामचर देवच आहे असें समज. तो पुनः तुजकडे येईल, तूं अगदीं चिंता करूं नकोस' इत्यादि अनेक आशाजनक भाषणें करून तिच्या वृद्ध व अनुभवी परिजनांनीं तिचें सांत्वन केलें. तेव्हां मदनमालेनें अशी प्रतिज्ञा केली कीं 'सहा महिन्यांच्या आंत जर त्यानें मला पुनः दर्शन दिलें नाहीं, तर मी हें सर्वस्व देऊन टाकून अग्नींत प्रवेश करीन.' नंतर आपल्या चित्ताचें मोठ्या धैर्यानें स्तंभन करून, प्रत्यहीं यथेच्छ दानें देत व आपल्या प्रियकराचें ध्यान करीत ती एकेक दिवस घालवूं लागली.

एकदां त्या सोन्याच्या पुरुषांतील एकाचे हात तोडून केवल दानतत्पर झालेल्या तिनें ते ब्राह्मणांस अर्पण केले; पण दुसऱ्या दिवशीं पहाते तों तसेच हात पुनः उत्पन्न झाले आहेत, असें तिला दिसलें. तो चमत्कार पाहून अर्थातच

तिला मोठा विस्मय वाटला, व क्रमानें तिनें इतर चार पुरुषांचेहि हात दानांकरितां तोडविले. तों तेसुद्धां तसेच पुनः उत्पन्न झालेले तिला दिसले. तो चमत्कार पाहून अर्थातच हे पांचहि पुरुष अक्षय आहेत असें तिनें ताडिलें, व वारंवार त्यांच्या अंगांचें सोनें काढून ती वेदवेत्त्या विद्वानांस व अध्यापकांस नित्य दानें देऊं लागली. थोडक्याच कालांत तिची ख्याती चोहोंकडे पसरली, व ती ऐकून संग्रामदत्त नांवाचा ब्राह्मण पाटलिपुत्र नगराहून तेथें आला. तो मोठा गुणी व चतुर्वेदवेत्ता, पण दरिद्री होता. त्या वेश्येपासून प्रतिग्रह घेण्याची इच्छा करणारा तो तिच्या द्वारावर आला. द्वारपालांनीं मदनमालेची आज्ञा घेऊन त्यास आंत नेलें. तेव्हां व्रताच्या योगानें जिचें शरीर कृश झालें आहे व प्रिय-विरहामुळें जिचा वर्ण पांडुर झाला आहे, अशा मदनमालेनें पूजा करून त्याला सोन्याचे चार हात दिले. नंतर दुःखार्त झालेल्या परिवाराच्या तोंडून तिच्या महाघोर प्रतिज्ञेसह तिचा सर्व वृत्तांत ऐकून घेऊन, हृष्ट व उद्विग्न झालेला तो ब्राह्मण ते सोन्याचे हात दोन उंटावर लादून पाटलिपुत्रास परत गेला. तेथें पोंचल्यावर 'राजाच्या साहाय्यावांचून माझें हें सोनें सुरक्षित राहणार नाहीं,' असा मनांत विचार करून तो राजाकडे गेला व सभास्थानीं बसलेल्या राजाचें दर्शन घेऊन, पुढीलप्रमाणें विनंती करूं लागला.

"महाराज, मी याच नगरांत राहणारा एक ब्राह्मण आहें. दारिद्र्यानें पीडित असल्यामुळें मी दक्षिणेकडे द्रव्य मिळविण्याच्या उद्देशानें निघालों; पण नरसिंह राजाच्या प्रतिष्ठानपुरास पोंचतांच दानशीलत्वामुळें जिचें नांव सर्वांच्या मुखीं झालें आहे अशा 'मदनमाला' नांवाच्या वेश्येच्या घरीं मी प्रतिग्रहाच्या इच्छेनें गेलों. तिच्यापाशीं कोणी एक दिव्य पुरुष कांहीं काल राहून व पांच सोन्याचे अक्षय पुरुष ठेवून कोठें निघून गेला. त्याच्या विरहानें ती उद्विग्न झाली आहे, व तिनें जीव देण्याचा निश्चय केला आहे. जीवित ही विषवेदना आहे, देह हा निष्फळ आयास आहे व आहार घोर यातना आहे, असें समजणाऱ्या तिचें धैर्य नाहींसें झालें; पण तिच्या सेवकांनीं तिला पुष्कळ धीर दिला, तेव्हां 'माझ्या प्रियानें जर सहा महिन्यांत मला भेट दिली नाहीं तर मी अग्नींत प्रवेश करीन,' अशी घोर प्रतिज्ञा करून ती यथेच्छ दानें देऊं लागली. त्या दिवसापासून तिनें आहार व निद्रा अगदीं कमी करून शरीर अति शुष्क करून घेतलें आहे; पण तिच्या अंगावर दिसणारें विलक्षण तेजच ती कोणी असामान्य स्त्री आहे, असें सहज सुचवितें. तिचे हात दानोदकानें एकसारखे ओले असतात. ज्या धन्य व कामी पुरुषानें तिला सोडिलें, तो विषयवितृष्णेमुळें वंद्यहि आहे, व त्याच्याकरितां जी सुंदरी प्राण देण्यास तयार झाली आहे अशा प्रियेला सोडल्यामुळें तो निंद्यहि आहे, असें मी समजतों. असो; सारांश अशा त्या दानशील बाईनें मी चार वेदांस जाणतों म्हणून मला सोन्याच्या पुरुषांचे चार हात दिले आहेत. मी आतां मोठें सत्र करण्याची इच्छा करीत आहें, पण आपण मला तें करण्याचें अभिवचन दिलें पाहिजे. राजाश्रयावांचून असलीं धर्मकृत्यें सुरक्षित पार पडत नसतात."

संग्रामदत्ताच्या तोंडचा वृत्तांत ऐकून विक्रमादित्य उद्विग्नचित्त झाला. त्यानें आपल्या प्रतिहाराला 'या ब्राह्मणाला सर्व प्रकारें सहाय्य कर' अशी आज्ञा केली; आणि मंत्र्यांवर राज्यकारभार टाकून आपल्या प्रेमामुळें जिनें आपलें जीवित तृणासारिखें तुच्छ समजून, थोड्याच दिवसांत त्याला घालविण्याचा निश्चय केला आहे, त्या प्रिय मदनमालेकडे तो राजा आकाशमार्गानें गेला. प्रतिष्ठान नगरींतील तिच्या भव्य घरांत शिरतांच जिनें शुभ्रवस्त्र परिधान केलें आहे, आभरणें व केशादि-संस्कार यांचा त्याग केला आहे, व दानधर्मांत जी आपला काल घालवीत आहे अशा त्या कृश झालेल्या आपल्या कांतेस कृशचंद्रकलेप्रमाणेंच त्यानें पाहिलें. अकस्मात् समोर येऊन उभा राहिलेला आपला प्रियकर पहातांच मदनमालेलाहि क्षणभर मूर्च्छा आली. ती वेडी झाली. मी कोठें आहें व काय करीत आहें याचें तिला भान नाहींसें झालें. कांहीं वेळानें थोडीशी शुद्धीवर आल्यावर जणुं काय तो पुनः पळून जाईल, या भीतीनेंच ती त्याला घट्ट आलिंगन देऊन बसली. तिनें त्याच्या गळ्यांत भुज-लतापाश अडकविले. "हे निष्करुण कांत, मज निरपराधी अबलेला सोडून आपण कां गेलां?" असें ती दाटून आलेल्या कंठानें अस्पष्ट बोलली. तेव्हां 'चल मी तुला सर्व सांगतों,' असें म्हणून तो तिला एकांतांत घेऊन गेला. तेथें कोणी दुसरें नाहीं असें पाहून, त्यानें आपण कोण, येथें कशा-करितां आलों, कुबेराच्या वरामुळें पांच सुवर्ण पुरुष कसे मिळाले, व ब्राह्मणाच्या तोंडची वार्ता ऐकून आजच्या आज येथें परत कसा आलों, तें सर्व त्यानें आपल्या प्रतिज्ञेसह सांगितलें, आणि पुनः म्हटलें "प्रिये, नरसिंहराजा अति बलाढ्य आहे. सैन्याच्या योगानें त्याला जिंकतां येणें शक्य नाहीं. द्वंद्वयुद्ध करून व स्वतः आकाशांत राहून भूमीवर असलेल्या त्याला जिंकणें माझ्यासारख्या सुक्षत्रियाला शोभत नाहीं. यास्तव, दारावर उभे असलेले बंदिजन तो आला आहे, असें मला येऊन कळवितील व सामान्य राजाप्रमाणें मी द्वारावर त्याची संभावना करीन, ही माझी प्रतिज्ञा युक्तीनें

पूर्ण करण्याकरितां मी येथें आलों होतों. अजूनसुद्धां माझा तो निश्चय ढळलेला नाहीं.

राजानें असें सांगितलें असतां ' खरोखर मी धन्य आहें' इतकेंच बोलून मदनमालेनें काय काय करावयाचें त्याचा राजाच्याच संमतीनें निश्चय केला, आणि आपल्या बंदीजनांस व प्रतिहारांस बोलावून म्हटलें:—"राजा नरसिंह जेव्हां माझ्या येथें येईल, तेव्हां तुम्ही द्वारावरच सावधपणें रहा. 'राजा नरसिंह आपल्यावर अनुरक्त व आपला भक्त आहे,' असें वारंवार म्हणा. 'येथें कोण आहे' असें त्यानें विचारल्यास 'राजा विक्रमादित्य आहे' असें त्यास सांगा. तें ऐकून व 'बरें आहे' असें म्हणून सर्व तेथून निघून गेले.

इतक्यांत राजा नरसिंह हा मदनमालेची दानाविषयींची ख्याती ऐकून तिला प्रत्यक्ष पाहण्याच्या लालसेनें तिच्या येथें आला. तेव्हां प्रतीहारानें प्रतिबंध केला नाहीं, म्हणून तो आंत शिरूं लागला. तों इतक्यांत गणिकेनें शिकवून ठेविल्याप्रमाणें तिचे बंदिजन मोठ्यानें वारंवार म्हणूं लागले. तेव्हां त्याला मोठा क्रोध व संशयहि आला, आणि "येथें कोणरे आहे ?" असें त्यानें विचारलें तेव्हां 'राजा विक्रमादित्य' असें त्यांनींहि तत्काळ उत्तर दिलें. त्याबरोबर तो सुज्ञ राजा मनांत असा विचार करूं लागला कीं "वाहवा, या राजानें माझ्याच घरांत शिरून आपली प्रतिज्ञा पूर्ण करून घेतली. खरोखर तो मोठा तेजस्वी आहे, यांत संशय नाहीं. आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें त्यानें आज मला युक्तीनें जिंकलें आहे. यावेळीं हा एकटाच माझ्या घरांत सांपडला आहे, हें खरें, पण अशा अवस्थेंत त्याला मारणें योग्य नव्हे. यास्तव त्याला आंत जाऊन भेटावें हें बरें."

असा विचार करून बंदिजनांनीं ज्याचें आगमन आंत कळविलें आहे असा तो राजा अंतःपुरांत गेला. तेव्हां हंसत हंसत येत असलेल्या राजास विक्रमादित्यानेंहि हंसत हंसत आलिंगन दिलें, व आसनावर आणून बसविलें. मदनमाला बाजूला उभी असतांनाच त्यांनीं एकमेकांस कुशल प्रश्न विचारले. नंतर बोलतां बोलतां नरसिंहराजानें विक्रमादित्यास त्या पांच अक्षय सुवर्णपुरुषांविषयीं प्रश्न विचारला. तेव्हां त्या उदार राजानें पहिल्यापासून आपला अद्भुत वृत्तांत त्यास सांगितला. त्यावरून तो आकाशांतूनहि जाणारा राजा महाशक्तिमान् आहे, असें जाणून नरसिंहानें त्याच्या विषयींची पापबुद्धि सोडली व मित्र होण्याविषयीं विनंती केली. विक्रमादित्यानेंहि त्याचें मित्रत्व मान्य केलें. तेव्हां नरसिंहानें आपल्या येथें नेऊन त्याचा सर्वोत्कृष्ट सत्कार केला. नंतर कांहीं दिवस पाहुणचार घेऊन नवीन मित्र झालेल्या शूर राजानें अनुज्ञा दिली असतां, विक्रमादित्य मदनमालेच्या येथें परत आला.

कांहीं दिवसांनीं ज्यानें आपला दुर्वह प्रतिज्ञाभार केवल बुद्धिसामर्थ्यानें कमी केला आहे, असा तो विक्रमादित्य राजा आपल्या नगरास परत जाण्याचा विचार करूं लागला. तेव्हां त्याचा विरह सहन करण्यास असमर्थ असलेल्या मदनमालेनेंहि तें नगर सोडण्याचा निश्चय केला, व आपलें भव्य गृह सत्पात्र ब्राह्मणास दिलें. त्यानंतर अनन्यचित्त अशा तिला आपल्याबरोबर घेऊन तिच्या हत्ती, अश्व इत्यादि सर्व परिवारासह विक्रमादित्य राजा, आपल्या पाटलिपुत्र नगरीस परत आला आणि त्या दिवसापासून नरसिंहराजाशीं मित्रभाव ठेवून, विक्रमादित्य केवळ प्रेमबद्ध होऊन स्वदेशत्याग करणाऱ्या त्या मदनमालेसहवर्तमान सुखानें राज्य करीत राहूं लागला."

## ६५ मागधस्पर्धेच्या कथेंत सांगितलेला महाराष्ट्राचा इतिहास.

६५. प्रस्तुत कथा ज्या गोष्टी सांगत आहे त्यांत पुढील गोष्टीस महत्त्व आहे. प्रतिष्ठानचें राज्य महत्त्वाचें आणि त्याच्या पराजयाविषयीं बढाई मारावी असें मगधराजास वाटत होतें. आणि या राज्याच्या सैन्याची भिस्त मुख्य पायदळावर होती आणि या राज्याची लोकवस्ती पुष्कळच होती, असें होतें. या तीन गोष्टी प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत. नरसिंहाची कथा कोणत्या काळांत पडते याविषयीं विवेचन पुढें केलेंच आहे.

महाराष्ट्रांतील राष्ट्रांविषयीं जे पौराणिक व भारतीय उल्लेख आहेत त्या उल्लेखांपासून कथासूत्र घेऊन त्यांचे प्रथम कथासरित्सागरांतील म्हणजे बृहत्कथेंतील कथांशीं तंतू जुळवावे लागतील. त्याच्या योगानें बुद्धपूर्व कालाविषयींच्या अज्ञानाचें मोठें छिद्र भरून काढण्यास थोडीबहुत मदत होईल.

प्रकरण ८ वें.

# शातवाहनेतर पैठणचे राजे.

## ६६ नरसिंहकथेंतील सत्याचें परीक्षण.

६६. शातवाहनांचें नांव पैठणच्या राज्याशीं दंतकथांनीं निगडित केलें आहे; तथापि शातवाहनाच्या पूर्वीचा देखील इतिहास जाणण्याचा प्रयत्न शक्यतेच्या मर्यादेबाहेर नाहीं. तसेंच प्रतिष्ठानविषयक कथा ज्या वाङ्मयांत उपलब्ध होतात, त्यांचें ऐतिहासिकतेच्या दृष्टीनें परीक्षण करणें ही गोष्ट देखील आवश्यक असून संशोधकांना चुकविण्याजोगी नाहीं.

विक्रमादित्य हें पाटलिपुत्राच्या राजाचें नांव म्हणून आतांच दिलेल्या कथेंत आलें आहे; तथापि आपणांस जी मगधाच्या राजांची यादी उपलब्ध आहे तीमध्यें विक्रमादित्य हें नांव मुळींच सांपडत नाहीं. पैठणच्या 'दीपकर्णी' राजाच्या अगोदरच्या राजांचीं नांवेंच आपणांस उपलब्ध नाहींत. त्यामुळें नरसिंह नामक राजा नरवाहनदत्ताच्या कालापूर्वी होऊन गेला काय व होऊन गेला असल्यास किती काळापूर्वी होऊन गेला याविषयीं आपणास परीक्षणास साधन नाहीं.

प्रतिष्ठानच्या राजांची प्राचीन काळापासून आपल्यापाशीं यादी नाहीं तरी मागध राजांची यादी उपलब्ध आहे, तींतील विक्रमादित्य या नांवाचा अभाव ही कथा एकदम त्याज्य धरण्यास प्रेरक होत नाहीं. कारण अनेक राजे अपरनामें धारण करीत असत, आणि कित्येक जीं बिरुदें वापरीत तीं देखील व्यक्तिनामासारखींच असत. त्याप्रकारें 'विक्रमादित्य' हेंहि अपरनाम किंवा बिरुदनाम असणें अशक्य नाहीं. 'नरसिंह' हें नांव दाक्षिणात्य राजांच्या नांवासारखें दिसतें व त्या प्रकारच्या नांवाची लोकप्रियता महाराष्ट्रांत बुद्धपूर्व कालीं असणें अशक्य नाहीं. कथासरित्सागरांत आणखी एक नागपूरचा नरसिंह राजा आणला आहेच. प्रस्तुत कथा खरी असल्यास प्रतिष्ठान व मगध यांत स्पर्धाभावना होती ही गोष्ट पटते. विदर्भ आणि मगध यांमध्यें असलेल्या व भारतांत उल्लेखिलेल्या जितजेतृसंबंधामुळें होणाऱ्या स्पर्धाद्रोहादि भावना एकाकाळीं अस्तित्त्वांत होत्या व त्या भावनांचें लोण प्रतिष्ठानपर्यंत पोंचलें होतें, ही गोष्ट या नरसिंहकथेनें स्पष्ट होत आहे. ही स्पर्धाभावना नरवाहनदत्ताच्या पूर्वीच्या काळांत होती, असें आपणांस मान्य केलेंच पाहिजे. ज्याअर्थी एका मताप्रमाणें उदयन व नरवाहनदत्त हे राजे बुद्धकालीन होते, त्याअर्थी त्या मताप्रमाणें मगधराज विक्रमादित्य व प्रतिष्ठानचा नरसिंह हे बुद्धकालापूर्वी कांहीं तरी पिढ्या असले पाहिजेत. आमच्यामतें उदयन हा बुद्धापूर्वी दीड दोनशें वर्षें अगोदर होता तर नरसिंह हा बुद्धापूर्वी तीनशें वर्षें अगोदर असणें शक्य आहे. प्रस्तुत अनुमानास विरोधक असें कोणतेंहि वृत्त ज्ञात नाहीं, नरसिंहकथेशिवाय दुसऱ्या अनेक कथा सरित्सागरांत आहेत त्यामुळें महाराष्ट्राच्या इतिहासांतील बुद्धाच्या अगोदरचा एक कथासमुच्चय हातीं लागला असें आपणास म्हणावें लागेल.

## ६७ दाक्षिणात्य राजे आणि त्यांचें प्राचीन युद्धवैशिष्ट्य.

६७. या दोघांच्या युद्धांत एक वैशिष्ट्य दिलें आहे. तें इतिहासदर्शक असणें शक्य आहे. पैठणच्या राजापाशीं जें सैन्य होतें तें पदातिसैन्य होतें. त्यांत घोडे नव्हते व हत्तीहि नव्हते; आणि असें असतांहि त्यांनीं घोडे व हत्ती यांसह लढणाऱ्या विक्रमाला जिंकलें, ही गोष्ट त्या कथेच्या वैशिष्ट्यामुळेंच आश्चर्यकारक आणि महत्त्वाची म्हणून संरक्षिली गेली आहे. म्हणजे या काळांतील महाराष्ट्राची लढण्याची पद्धति अशी होती, कीं, हत्ती व घोडे यांची कमतरता असली तरी माणसें असंख्य लावून जय मिळवावयाचा. (क्रमाच्च नरसिंहस्य कोटिसंख्यपदातिभिः । भग्नं तद्विक्रमादित्यबलं नरपतेर्बलैः ।) शकांचें वैशिष्ट्य घोडेस्वारांत होतें. मराठ्यांचें वैशिष्ट्य पुढें घोडेस्वारांतच झालें; आणि घोड्यावर बसून लढण्याचें कौशल्य मराठ्यांना आहे किंवा होतें म्हणूनच मराठ्यांचा सिथियन म्हणजे शकवंश धरण्यास यूरोपीय लेखक प्रवृत्त झाले. पुढच्या काळांत महाराष्ट्रांत घोड्यांची देखील निपज झाली; पण ही नरसिंहाची कथा महाराष्ट्र घोडे वापरूं लागण्यापूर्वीची कथा आहे. प्रस्तुत कथा लिहून काढतांना किंवा भाषांतरतांना थोडा प्राचीन स्वरूपभ्रंश झालेला दिसतो. दक्षिणेंत घोडे व हत्ती लढाईला नव्हते, असें वर्णन आल्यानंतर मदनमालेचें वैभव वर्णितांना तिच्या महालांत हत्ती व घोडे आणलेले आहेत; दोन विधानांतील असंगति उघडच आहे.

या नरसिंहकथेमध्यें पाटलिपुत्राचा विक्रमादित्य याचा पैठणच्या राजानें पराभव केला, असें दिलें आहे. याच कथेवरून उत्तरकाळीं जेव्हां उज्जयिनीचा विक्रमादित्य पुढें अधिक विख्यात झाला आणि प्रतिष्ठानचे राजे शातवाहन

एवढेंच लोकांच्या लक्षांत राहिलें तेव्हां मगधाधिपति विक्रमादित्य याच्या पराभवाची पूर्वविश्रुत कथा विक्रमादित्याचा संवत्सर मागें कसा पडला याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं खर्चिण्यांत आली असा स्वाभाविक तर्क होतो. शातवाहनीय दंतकथांच्या इतिहासांत देखील ही नरसिंहाची कथा लक्षांत घेणें अत्यंत अवश्य आहे.

उज्जयिनीच्या विक्रमादित्याच्या कथेंत प्रस्तुत कथेंतील एक कथाभाग गोंवला गेला आहे. वेतालानें सिद्धी मिळवूं पहाणाऱ्या योग्याच्या संकल्पापासून उज्जयिनीच्या विक्रमास वांचविलें असें सध्यांच्या उपलब्ध वेताळपंचविशींत लिहिलें आहे. वेताळपंचविशी कथासरित्सागरांत समाविष्ट आहे; तथापि तींत विक्रमादित्य न आणतां त्रिविक्रमसेन आणला आहे, आणि त्यास प्राचीनतर विक्रमादित्याचा अवतार बनविलें आहे. त्रिविक्रमसेन हा अवंतीचा राजा नसून प्रतिष्ठानचाच राजा आहे, असें दाखविलें आहे.

निरनिराळ्या सदृश दिसणाऱ्या कथांतील फरक लक्षांत घेऊन सर्वांत जुनी कथा कोणती असावी, हें ठरविण्यास कांहीं पद्धति तयार झाली आहे. त्या पद्धतीनें कथापरीक्षण करून कथेंतील निरनिराळ्या अंगांचा समावेश, बदल किंवा उच्चाटन हीं कशीं झालीं हें पहाणें इतिहासज्ञानसंवर्धक आहे. विक्रमविषयक विवेचनांत ती पद्धति वापरावी लागेलच.

## ६८ महाराष्ट्राची उदयनकाळीं बलाढ्यता.

६८. या नरसिंहभूपतीचें आख्यान ऐतिहासिक दृष्टीनें महत्त्वाचें वाटण्यास दुसरें एक कारण आहे. कथेचा श्रोता नरवाहनदत्त याचा बाप उदयन यानें जेव्हां दिग्विजय केला तेव्हां महाराष्ट्रखेरीज इतर भागावर केला ही गोष्ट त्या दिग्विजयाच्या वर्णनावरून स्पष्ट होत आहे. या दिग्विजयांत महाराष्ट्र वगळला गेला याचे दोन अर्थ निघतात. एक अर्थ महाराष्ट्र हा त्यावेळेस वसला नव्हता, किंवा दुसरा अर्थ असा होईल कीं, महाराष्ट्र दुर्जय होता. बौद्ध ग्रंथांवरून पतित्थान हें एक महत्त्वाचें स्थान होतें, हें निघतच आहे. आणि नरसिंहाच्या दुर्जयतेवरून महाराष्ट्र त्यावेळेस दुर्जय होता म्हणूनच वगळला गेला हें अधिक शक्य दिसतें. हा नरसिंह नरवाहनदत्ताच्या अगोदर किती वर्षें झाला या प्रश्नाला जरी उत्तर देतां येणार नाहीं तरी ती कथा नरवाहनदत्ताच्या कानीं आली तेव्हां अद्भुतमिश्रित झाली त्याअर्थी नरवाहनदत्तापूर्वी अनेक शतकें तो अगोदर असला पाहिजे असेंच समजण्याचें कारण नाहीं. अक्कलकोटचे स्वामी, देव मामलेदार, नारायण महाराज संती ( केडगांवकर ) यांच्या विषयीं अद्भुत कथा आजहि प्रचलित आहेत. अद्भुताचें मिश्रण व्यक्तीस प्राचीनत्व मुळींच देत नाहीं, व त्यामुळें नरवाहनदत्ताच्या फार अगोदर विक्रम-नरसिंह-विग्रह-कथेस नेण्याचें कारण नाहीं. ख्रिस्तपूर्व ६००–७०० च्या सुमारास हा प्रतिष्ठाननृपति नरसिंह होऊन गेला असावा, असा अजमास वाटतो. विक्रमादित्य–नरसिंह-विग्रहाची कथा ऐतिहासिक असून, तीमुळें ज्या कांहीं अद्भुत कथा उत्पन्न झाल्या असतील त्या पुढें पुढें उत्तरकालीन इतर थोर व्यक्तींवर संस्थापित झाल्या असल्या पाहिजेत.

## ६९ नरसिंहाची शकपूर्वता.

६९. विक्रम-नरसिंहयुद्धाची कथा नरवाहनदत्तास सांगितली गेली आणि नरवाहनदत्त बुद्धकालीन, कदाचित् बुद्धपूर्वकालीन होता, एवढ्याच गोष्टीवर या कथेचें प्राचीनत्व ठरविलें नाहीं, तर दक्षिणेंत घोडेस्वार लढाईंत वापरले जाण्याच्या पूर्वीच्या काळाची ती गोष्ट दर्शक आहे, हें एक वैशिष्ट्य त्या गोष्टीच्या प्राचीनत्वाचें दर्शक आहे. शकांच्या आगमनानंतर महाराष्ट्रांत घोड्यावरून लढण्याचा प्रघात आला असणें शक्य आहे.

नरवाहनदत्तास सांगितलेल्या गोष्टी अशा नात्यानें या ग्रंथांत उपलब्ध असलेल्या सर्वच कथांना नरवाहनापेक्षां प्राचीनतरता देतां येत नाहीं. कारण उघड उघड उत्तरकालीन अनेक कथा त्यांत समाविष्ट केल्या गेल्या असणें शक्य आहे आणि त्यासाठीं कथासरित्सागराचें त्या दृष्टीनें सविस्तर परीक्षण पुढें येणारच आहे. वेतालपंचविंशतिका म्हणून जो कथासंग्रह यांत समाविष्ट केला आहे त्याचें थोडेंसें तरी परीक्षण येथें अवश्य आहे.

## ७० वेताळपंचविशीचें परीक्षण.

७०. या कथासंग्रहांत त्रिविक्रमसेन नांवाच्या प्रतिष्ठानच्या राजाला वेतालानें २४ कथा सांगितल्या, असें सांगितलें आहे, आणि इतर आवृत्त्यांमध्यें उज्जयिनीच्या विक्रमास त्या कथा सांगितल्या असें दिलें आहे. तर आपणांपुढें प्रश्न आहेत कीं “ वेतालपंचविंशतिकेच्या अत्यंत प्राचीन स्वरूपांत तींतील चोवीस कथा प्रतिष्ठानच्या राजाला सांगितल्या गेल्या कीं उज्जयिनीच्या राजाला सांगितल्या गेल्या ? कारण ही कथा प्रतिष्ठानच्या आणखी एका प्राचीन राजाचें नांव आपणांस पुरवीत आहे आणि त्यामुळें सरित्सागरांतील संग्रहाचें आपणांस महत्त्व आहे. ही कथा वाचून इतिहाससंशोधकास प्रश्न उत्पन्न होतात कीं पैठणला त्रिविक्रमसेन हा राजा केव्हां होऊन गेला, आणि वेतालपंचविशी पैठणविषयीं ऐतिहासिक सत्य काय सांगत आहे ? ”

या प्रश्नांवर चौकशी करतांना प्रथमतः वेतालपंचविंशतिका हा ग्रंथ कोणत्या निमित्तानें सरित्सागरांत अवतरिला गेला हें पाहूं. त्या कथा नरवाहनदत्ताला म्हणून कोणी प्रत्यक्ष सांगितल्या नाहींत. तर कथासरित्सागराचा १२ वा लंबक **शशांकवती** लंबक म्हणून आहे त्यांत ललितलोचना नांवाच्या एका दिव्य स्त्रीनें नरवाहनदत्ताचें हरण केलें आणि पुढें त्या स्त्रीबरोबर विहार करीत असतां ती एकाएकीं गुप्त झाली, तेव्हां विशंग नांवाच्या एका मुनीनें मृगांकदत्ताची कथा त्याला सांगितली. एवढीच प्रस्तावना देऊन मृगांकदत्ताच्या कथेचें एक सबंध महाकाव्य त्यांत सामील केलें आहे. त्यांत मृगांकदत्ताचा एक सेवक कांहीं काळ नाहींसा झाला होता तो पुढें आकाशमार्गानें त्याला येऊन मिळाला, असा आणखी कथाभाग आहे. हा त्याचा मित्र आकाशमार्गानें येऊं शकला; कारण त्यास वेताल प्रसन्न झाला होता. कारण त्यानें वेताळास प्रसन्न करून घेण्याचा मंत्र एका उपकृत वृद्धापासून घेतला. मृगांकदत्ताचा सेवक प्रथम वेताळ प्रसन्न करून घेण्याचा मंत्र घेतहि नव्हता तेव्हां वेताळ प्रसन्न करून घेण्यानें काय फायदा होतो हें दाखविण्यासाठीं वेताळ पंचविशी वृद्धमुखानें अवतीर्ण झालेली आहे. त्रिविक्रमसेनानें वेताळ प्रसन्न करून घेऊन आपला फायदा कसा करून घेतला हें सांगितलें आहे आणि त्यानंतर त्रिविक्रमसेनाची कथा दिली आहे. त्रिविक्रमसेनानें वेताळाच्या सहाय्यानें विद्याधरांचें ऐश्वर्य मिळविलें असेंहि सांगितलें आहे. विद्याधरत्व किंवा त्यांचें आधिपत्य हीं मिळविणें हा थोर पुरुषार्थ आहे, या कल्पनेचा आरोप तितक्या प्राचीन काळापर्यंत भिडविला आहे. आणि त्रिविक्रमसेनाची कथा पुढीलप्रमाणें सांगितली आहे.

गोदावरीच्या काठीं प्रतिष्ठान या नांवाचा एक देश आहे. तेथें मागें विक्रमसेनाचा त्रिविक्रमसेनसंज्ञक पुत्र, राजा होता. त्याची कीर्ति सर्व देशभर पसरली होती. त्याला एक योगी दररोज फळ आणून देत असे व त्यांत रत्न असे. या प्रकारची कथा याच्या बाबतींत देखील सांगितली आहे. तो योगी भिक्षु कांहीं मंत्र साधन करीत होता त्यांत त्रिविक्रमसेनाचा उपयोग करून घेऊन त्याचा बलि द्यावयाचा विचार होता आणि तो हेतु मागें विक्रमादित्याच्या कथेंत सांगितलेल्या उपायानेंच विध्वंसित झाला, आणि योगी सिद्धि मिळवूं इच्छीत होता ती त्रिविक्रमसेनास प्राप्त झाली. व ती सिद्धि म्हटली म्हणजे आकाशांतून हिंडण्याची होती. मात्र या त्रिविक्रमसेनाला कुबेर प्रसन्न व्हावयाच्या ऐवजीं महेश्वर प्रसन्न झाला ( शशांकवती लंबक तरंग ३२ ) असें दाखविलें आहे.

महेश्वर विक्रमास म्हणतो, " मी प्रथमतः तुला आपल्या अंशानें म्लेंच्छ रूपानें अवतीर्ण झालेल्या असुरांना शांत करण्यासाठीं विक्रमादित्य निर्मिलें होतें, व आतां पुन्हां दुर्वृत्त आणि उद्दाम लोकांचें दमन करण्यासाठीं मीच तुज त्रिविक्रमसेनासारख्या राजाला पुन्हा निर्माण केलें आहे. यास्तव, द्वीपें आणि पाताळ यांसह पृथ्वीला आधीन करून घेऊन तूं लवकरच विद्याधरांचा राजा होशील. तेथें फार दिवस दिव्य भोग स्वेच्छेनें भोगून तूं उद्विग्न होशील व आपल्या इच्छेनें त्यांचा त्याग करून शेवटीं माझ्या सायुज्यास प्राप्त होशील. यांत कांहीं संशय नाहीं."

**त्वमादौ विक्रमादित्यः सृष्टोभूः स्वांशतो मया**
**म्लेच्छरूपावतीर्णानामसुराणां प्रशांतये**
**अद्यचोद्दामदुर्वृत्तदमनाय मया पुनः**
**त्वं त्रिविक्रमसेनाख्यो वीरः सृष्टोऽत्र भूपतिः**
**अतः सद्वीपपातालां स्थापयित्वा महीं वशे**
**विद्याधराणामचिराद्धिराजो भविष्यसि**

हें पुढें पंचविंशतिकेच्या अंतिम भागांत लिहिलें आहे. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं शंकरानें दिलेल्या खड्गाच्या वीर्यानें त्या भूपतीनें सर्व पृथ्वी जिंकून घेतली ( सद्वीपां सरसातलांच भुभुजे निष्कंटकां मेदिनीं ) व शत्रुरहित अशा तिचा दीर्घकाळ भोग घेतला. पुढें शंकराच्या आज्ञेनें त्याला अति मोठी विद्याधरेशता प्राप्त झाली व तिचाहि दीर्घकाळ उपभोग घेऊन शेवटीं तो कृतकृत्य राजा भगवत्सायुज्यास प्राप्त झाला.

## ७१. वेताळपंचविशी कोणत्या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास सांगत आहे ?

७१. येणेंप्रमाणें वेताळपंचविशीचा नायक प्रतिष्ठानचा त्रिविक्रमसेन याची कथा त्या कथांच्या सरित्सागरांत सांपडते.

प्रस्तुत ऐतिहासिक अर्थ काय लावावयाचा हा एक प्रश्न आहे. बृहत्कथेचें मूळ हस्तलिखित जोंपर्यंत उपलब्ध झालें नाहीं तोंपर्यंत इतिहासोत्पादक अनुमान सदोष होण्याचा संभव आहे, ही शक्यता लक्षांत घेतली तरी प्रस्तुत गोष्टीवर पुढील विचार करणें अवश्य आहे.

त्रिविक्रमसेनाची दिलेल्या प्रकारची कथा नरवाहनदत्ताच्या काळीं श्रुत असणें अशक्य आहे काय ?

त्रिविक्रमसेन हा असुरांस शांत करणारा विक्रमादित्याचाच नवीन अवतार होता. म्हणजे पौर्वापर्य पुढीलप्रमाणें उत्पन्न होतें.

( १ ) नरवाहनदत्ताच्या पूर्वी मृगांकदत्त हा एक चक्रवर्ती राजा होऊन गेला.

( २ ) मृगांकदत्ताच्यापूर्वी त्रिविक्रमसेन हा प्रतिष्ठानचा राजा चक्रवर्ती म्हणून विश्रुत होता. त्यानें दुष्टांचा संहार केला.

(३) या त्रिविक्रमसेनाच्यापूर्वी विक्रमादित्य नांवाचा एक राजा होऊन गेला, त्यानें म्लेंच्छांचा नायनाट केला.

(४) म्लेंच्छांचा प्रलय याच्यापूर्वींच झाला होता, पण प्रतिष्ठानच्या त्रिविक्रमाच्या काळीं ही गोष्ट केवळ परंपरागत वार्ता म्हणून राहिली होती.

(५) म्लेंच्छ हे मूळचे असुर पण ते म्लेंच्छ या रूपानें अवतरले होते.

## ७२. वेताळपंचविशीच्या विधानांत आक्षेपार्हता कोठें आहे ?

७२. या विधानमालिकेच्या स्वीकारास आक्षेपक काय आहे याचा विचार केला पाहिजे. वेताळास प्राप्त करून घेऊन त्यांमार्फत सिद्धि मिळविण्याचें श्रेय ज्या राजास द्यावयाचें तो राजा खिस्तीशकाच्या सुमारास असला पाहिजे आणि अगोदर कधीं नसेल असें मानणें अयोग्य होईल. म्लेंच्छांची स्वारी केव्हां झाली आणि त्यांचा विक्रमादित्यानें केव्हां पराभव केला हाच प्रश्न मुख्य आहे आणि त्या वृत्ताचा काळ खिस्तपूर्व पहिल्या शतकापासून खिस्तोत्तर पांचव्या शतकापर्यंत नेण्यांत आला आहे. तथापि आतांपर्यंत कोणतेंहि विधान समाधानकारक नाहीं. विक्रमशक खिस्तपूर्व ५६ मध्यें सुरू होतो त्याअर्थी त्याच्या अगोदर विक्रमकथा प्रचलित असणें शक्य नाहीं ही कल्पना बुडाशीं दिसते. खि. पू. ५६ च्या सुमारास कोणीच विक्रम प्रसिद्ध नाहीं, त्यामुळें विक्रमादित्य नांवाचा गुप्तांचा राजा उज्जयिनीस स्थापन झाला त्याच्याच पदरीं कालिदास असला पाहिजे ही कल्पना आली आहे, आणि त्यामुळें संशोधकांच्या मनांत आज कल्पना आहेत त्या अशा कीं, अद्भुत कथांचा नायक असलेला विक्रम आणि कालिदासाचा विक्रम हे एक आहेत, आणि ज्याअर्थी खि. पू. ५६ च्या सुमारास उज्जयिनीस विक्रम दिसत नाहीं त्याअर्थी सर्व विक्रमकथा चंद्रगुप्त विक्रमादित्य याच्याच संबंधाच्या असल्या पाहिजेत. म्लेंच्छसंहारक विक्रम उज्जयिनीस असून तो बुद्धपूर्वकालीं झाला असेल या शक्यतेचा आजपर्यंत कोणीच विचार केलेला नाहीं. शकांचा उपद्रव बुद्धपूर्वकालीं होता हा विचार एका प्रकरणांत मांडलाच आहे; तर शकारिता आणि बुद्धपूर्वता या दोन्ही आमच्या मतें प्रस्तुत विक्रमास असणें अशक्य नाहीं. आणि त्या बुद्धपूर्व विक्रमाचाच उत्तरावतार प्रतिष्ठानच्या त्रिविक्रमास समजण्यांत चूक होणार नाहीं.

विक्रमविषयक ज्या कथा आहेत त्यांपैकीं कोणत्या कथांना प्राथम्य आणि प्राधान्य हीं द्यावयाचीं हा प्रश्न आहे. आणि येथें आम्ही असा पक्ष घेत आहोंत कीं, गुणाढ्याच्या ग्रंथाचें प्रामाणिक अवतरण सोमदेवानें केलें आहे, विक्रम शक किंवा शालिवाहन शक यांपैकीं कांहींच ठाऊक नसलेल्या गुणाढ्याच्या ग्रंथांत आलेल्या कथा सर्वांत जुन्या आहेत आणि त्या कथांशीं विसंगत अशी कथा सांपडली तर दुसऱ्या ठिकाणच्या कथा उत्तरकालीन व बनावट आहेत. गुणाढ्यानें उल्लेखिलेले सर्व विक्रमादित्य उदयनपूर्वकालीं झाले असणें अशक्य नाहीं. आणि त्यांचा शककर्त्या विक्रमाशीं संबंध नाहीं. गुणाढ्यानें उल्लेखिलेले विक्रम पुढीलप्रमाणें आहेतः—

( १ ) मगधराजा विक्रमादित्य.

( २ ) महेंद्रादित्याचा मुलगा म्लेंच्छसंहारक विक्रमादित्य-त्रिविक्रमसेनाचा पूर्वावतार असलेला विषमशीललंबकांतील पिशाचशासक विक्रमादित्य हा उज्जयिनीस राजा होता. याला वेताळ पंचविशीचा नायक इतर पुस्तकांनीं केला असला तरी कथासरित्सागरानें केला नाहीं. गुणाढ्यानें या दोन्ही विक्रमादित्यांच्या पदरीं शककर्तृत्व दिलें नाहीं, आणि ते दोन्ही विक्रम नरवाहनदत्ताच्या पूर्वी झाले नाहींत किंवा त्यांच्या कथा नरवाहनदत्ताच्या पूर्वी निदान गुणाढ्याच्या पूर्वी नव्हत्या असें म्हणण्यास आधार नाहीं.

## ७३. दक्षिणापथ व प्रतिष्ठान यांच्या शातवाहनपूर्व राजांतील पूर्वोत्तरता सांगण्यास अडचणी.

७३. गेल्या प्रकरणांत उल्लेखिलेला नरसिंह आणि या प्रकरणांत आलेला त्रिविक्रमसेन या प्रतिष्ठानच्या दोन राजांत पूर्वोत्तरता काय आहे हा प्रश्न आतां विचारार्थ घेतला पाहिजे. या दोन राजांपैकीं नरसिंह हाच अधिक प्राचीन काळचा असावा अशी कल्पना होते. नरसिंहाच्या कथेंत जो विक्रमादित्य आला आहे त्याची कथा त्रिविक्रमसेनाच्या कथेचें पूर्वरूप दिसतें. त्या कथेंत भिक्षु स्वतःला सिद्धि मिळविण्यासाठीं राजाचा बलि संकल्पितो; पण राजाच त्या भिक्षूचें डोकें तोडतो, इतका भाग दोघांनाहि सामान्य आहे. फरक एवढाच आहे कीं, मगधराजा विक्रमादित्य यास कुबेरानें भिक्षूचा दुष्ट हेतु कळविला तर त्रिविक्रमसेनाच्या कथेंत त्याला भिक्षूचा दुष्ट हेतु प्रत्यक्ष शंकरानें कळविला, असें आलें आहे. मावळती देवता विक्रमादित्याच्या कथेंत आली आहे, आणि त्रिविक्रमाच्या कथेंत चालु देवता आली आहे, त्याअर्थी

त्रिविक्रमकथा विक्रमादित्याच्या कथेपेक्षां उत्तरकालीन असावी, असें वाटतें. ज्याअर्थी भिक्षुवधाची कथा वेतालपंचविशीच्या बाहेरहि आहे, तेव्हां ती कथा स्वतंत्र स्वरूपांत ज्या काळीं होती तो काळ प्राचीनतर असावा, अशीहि एक कल्पना येते. राजानें भिक्षुवध केला अशा तऱ्हेच्या कथा अत्यंत प्राचीन काळापासून प्रचलित असाव्यात आणि शंबूकवध रामानें केला ती कथा देखील त्याच कथेचें एक अन्यरूप असावें अशी कल्पना होते.

एवंच नरसिंह हा प्रतिष्ठानचा लोकविख्यात पहिला राजा होऊन गेला. त्याच्यानंतर केव्हांतरी चक्रवर्ति त्रिविक्रमसेन झाला असावा, आणि त्याच्यानंतर किंवा अगोदर बृहत्कथेंत उल्लेखिलेले प्रतिष्ठान, दक्षिणपथ, कुंडिनपुर व नागपूर येथील राजे आले असावेत व शेवटीं शातवाहनांच्या पूर्वीचा राजा दीपकर्णी हा होऊन गेला असावा, असा कथासरित्सागरांतील अनुक्रम अत्यंत संभाव्य आणि त्यामुळें पूर्णपणें ऐतिहासिक वाटतो.

नरसिंहास प्राचीनत्व दिलें आहे, तथापि प्रतिष्ठान आणि दक्षिणापथ यांतील अनेक राजे कथामय गुणाढ्यग्रंथांत उल्लेखिलेले आहेत. त्या सर्वांनाच शातवाहनपूर्वत्व गुणाढ्यग्रंथ देत आहे. त्या एकंदर राजावलींत नरसिंह अत्यंत प्राचीन असलाच पाहिजे अशी खात्री देतां येत नाहीं. त्याचें प्राचीनतमत्व त्याच्या युद्धपद्धतीवरच आज अवलंबून आहे. विविध राजांची पूर्वोत्तरता दाखविण्यास दुसरें कोणतेंहि साधन उपलब्ध नाहीं.

---



**चित्रांक १७—गुप्त नाण्यावरील कमलासनेचें चित्र.**

# प्रकरण ९ वें.

# महाराष्ट्र आणि शकविजय.

## ७४. दारियसच्या अगोदरच्या नजीकच्या काळांत शकांची स्वारी.

७४. हिंदुस्थानाच्या राजकीय इतिहासास सुरवात परकीय स्वाऱ्यांच्या संदर्भानें घ्यावी लागते व दारियस हिस्टास्पिस याच्यापूर्वी पण जवळच्याच काळांत शकांची स्वारी झाली होती काय, हें पाहिलें पाहिजे. या चौकशीची आवश्यकता वाटण्याचें एक कारण बुद्धाचें शाक्यत्व होय. इराण आणि हिंदुस्थान यांच्या कालविभागाचें ऐक्य शकांच्या स्वारीविषयींच्या इतिहासाची चौकशी करतांना पटतें; कारण एकाच काळीं शकांच्या चळवळीनें दोन्ही देश पीडले गेले असणें शक्य आहे. इराणी लोकांच्या स्वारीच्या अगोदर शकांची स्वारी किंवा अनेक आगमनें झालीं होतीं काय हा प्रश्न आपणांस वांशिक इतिहासाच्या दृष्टीनें देखील महत्त्वाचा आहे. दारियसनंतरच्या काळांत इराणवर व नंतर हिंदुस्थानवर ग्रीकांची स्वारी झाली, व ती गोष्ट देखील दोन्ही देशांच्या इतिहासाचे सारखेच काळ पाडणारी झाली.

## ७५. शकराज्य आणि मुसलमान लेखक.

७५. तुराण देशाचा प्रसिद्ध राजा 'आफ्रासियाब' यानें कैकुशरूच्या पूर्वी इराण जिंकला होता आणि पुढें त्यालाच रुस्तुमनें पराजित करून दूर चीनकडे घालवून दिलें, असा त्याचा इतिहास सांगितला गेला आहे. याच तुराणच्या राजानें हिंदुस्थान जिंकला असावा, विशेषेंकरून तो बंगालांत आला होता अशा तऱ्हेची माहिती रियाज आणि फेरिस्ता या मुसलमान ग्रंथकारांनीं दिली आहे. बंगालमधील एका काळीं प्रसिद्ध असलेलें शहर 'गौड' याच्या संस्थापनेसंबंधानें रियाझ असें सांगत आहे कीं, 'शांगलदीप' हा कोचच्या आसमंतांतून निघाला आणि त्यानें किडारांवर जय मिळविला आणि गौड शहराची स्थापना केली.*

याच शांगलदीपाविषयीं फेरिस्ता पुढीलप्रमाणें लिहीत आहे. "राजा किडार ब्राह्मण याच्या राज्याच्या अंतिमकालीं कोचच्या आसमंतांत किडारावर शांगलानें जय मिळविला आणि गौड शहराची स्थापना केली. शांगल यानें ४००० हत्ती, एक लाख स्वार आणि पांच लाख पायदळ इतकी फौज खडी केली, आणि तुराणचा ऊर्फ सिथियाचा राजा आफ्रासियाब याला खंडणी पाठविणें बंद केलें, आणि त्यामुळें आफ्रासियाबनें रागावून आपला मुख्य सेनापति पिरान विसह यास पन्नास हजार घोडेस्वार घेऊन शांगलला मार देण्यास पाठविलें."†

वरील हकीकत खरोखर झाली असल्यास ती केव्हां झाली याविषयीं काल देणें आपणांस 'आफ्रासियाब' या नांवावरून सोपें झालें आहे; कारण या विजेत्याचें नांव इराणच्या इतिहासांत पूर्ण परिचित आहे. बंगालच्या जयासंबंधानें फेरिस्ता वगैरे ग्रंथकारांनीं दिलेला पुरावा उपेक्षिण्याजोगा नाहीं, कारण त्यानें त्याप्रमाणें रियाझनें हा कथाभाग कोणत्या तरी विश्वसनीय आधारावर लिहिला असणें शक्य आहे. इराणच्या इतिहासवृत्ताशीं वंगविजयाची संगति कशी लावावयाची हा विचार आपणांस अवश्य होतो.

शांगलदीप हें शाकलाधिप आणि शांगल हें शाकल याचें रूपांतर होय असें बाबू नरेंद्रनाथ सेन हे आपल्या ग्रंथांत‡ म्हणत आहेत, आणि या वृत्ताचा अर्थ ते असा सांगत आहेत कीं, जुन्या शकांना नवीन शक राजांनीं जिंकलें.

## ७६. गौतमबुद्ध आणि शकविजय.

७६. आपणांपुढें मुख्य प्रश्न आहे तो हा कीं, गौतम बुद्धाच्या अगोदरच्या काळांत या शकांची स्वारी हिंदुस्थानवर झाली होती काय? शकांनीं जर बंगाल काबीज केला असता तर ते एकतर चीनकडून म्हणजे तिबेटाकडून येऊन बंगाल जिंकते झाले असले पाहिजेत, किंवा त्यांनीं अगोदर पंजाब, मग गंगथडी आणि मग बंगाल अशा क्रमानें बंगाल घेतला असला पाहिजे. दुसरी शक्यता स्वीकारल्यास शकांचा विजय अत्यंत विस्तृत स्वरूपाचा झाला होता असें म्हणावें लागेल आणि हा विजय त्यामुळें अखिल भारतीय इतिहासाचा भाग होतो. ही दुसरी शक्यता आपण लक्षांत घेतली असतां आपणांस हाहि विचार करावयास पाहिजे कीं, शकांनीं उत्तरहिंदुस्थान जसा जिंकला तसा दक्षिण भागहि जिंकला होता

* Riyaz; translated by Maulvi Abdus Salam, Asiatic Society Edition, p. 53, 54.

† Ferista Vol. II, p. 223, यांतून अब्दुस सलाम यानें घेतलेला उतारा.

‡ The Archaeological Survey of Mayurabhanja. Vol. I, page vii."

काय? आणि तसा जिंकला असल्यास किंवा दक्षिणेकडे आक्रमणें केलीं असल्यास त्याचीं कांहीं स्मारकें राहिलीं आहेत काय? शकविजयाचीं स्मारकें सीलोनमध्यें देखील अनेक आहेत, असें मत वारंवार मांडिलें गेलें आहे. सिंहली लोकांत बहिणभावांच्या लग्नांच्या ज्या कथा आहेत त्या कथा शकांच्या वर्चस्वाच्या कालाच्या दर्शक आहेत. कारण शकांमध्यें ही चाल होती. सिंहलद्वीपामध्यें जर शक गेले असले तर ते समुद्रमार्गानें गेले असले पाहिजे आणि ते तसे गेले असल्यास त्यांनीं मार्गानें कोंकणामध्यें व कोंकण मार्फत महाराष्ट्रांत प्रवेश करणें शक्य आहे.

### ७७. मराठे आणि शक.

७७. हा प्रश्न आपणांस महत्त्वाचा असण्याचीं कारणें दोन आहेत. एक कारण म्हटलें म्हणजे इराणच्या स्वारीपूर्वीच शकांची स्वारी पश्चिम हिंदुस्थानांत झाली असल्यास अत्यंत प्राचीन शातवाहनचा देखील शकांशीं संबंध असणें अशक्य नाहीं हें होय, आणि महाराष्ट्रीयांचें वर्णन करतांना सर हर्बर्ट रिसले यांनीं मराठे लोक शक आणि द्राविड यांच्या मिश्रणानें झाले आहेत असें जें मत व्यक्त केलें त्या मताचा विचार करणें प्राप्त होतें.*

शकांच्या इतिहासांचे अधिक धागे दोरे आपणांस उपलब्ध होतील तेव्हां महाराष्ट्रांत त्यांचा प्रवेश हिस्टास्पिसच्या काळापूर्वी झाला होता किंवा नाहीं याचा विचार करणें शक्य होईल. आज तो प्रश्न संदिग्धच ठेवावा लागत आहे.

### ७८. मगांचें आगमन शकांबरोबर कीं इराण्यांबरोबर?

७८. शकांसंबंधानें दुसरा एक प्रश्न उत्पन्न होत आहे तो हा कीं, मग म्हणून जे एक याजक म्हणून हिंदुस्थानांत प्रविष्ट झाले ते शकांच्या साहाय्यानें झाले कीं इराणी लोकांच्या साहाय्यानें झाले? मग हे दोन्ही जातींचे याजक होते ही गोष्ट आज सर्वमान्य आहे.

वेदपूर्वकालांत 'मग' या देशांत होते या विषयीं प्रमाणें मागें ज्ञानकोशांत दिलींच आहेत. त्यांत ऋग्वेदांतील विश्वामित्र सूक्तांतली (ऋ० ३. ५४. १४) "कीकटांतील इंद्रास पायस न देणाऱ्या मगंदांचें धन लुटून आम्हांस दे." ही प्रार्थना आधारार्थ दिली आहे. तेथें मगंद याचा अर्थ मगांस दान देणारे शक असा धरला आहे. अत्यंत प्राचीन कालीं आलेले 'मग' हिंदुस्थानांत ब्राह्मणस्वरूप पावल्यानंतर व मगधांतील व्रात्यस्तोमादि विधींनीं त्यांस समाजमान्यता मिळाल्यानंतर पुन्हां भिन्न स्वरूपाचे दुसरे 'मग' आपल्याकडे आले होते हें स्पष्ट आहे, आणि त्यांचें आगमन पुराणग्रंथांनीं श्रीकृष्णपुत्र सांब याच्या कालांत झालें व सांबास झालेली रक्तपिती सूर्योपासनेनें घालविण्यासाठीं शाकद्वीपाहून ते आले असें दाखविलें आहे आणि या मगांनीं सूर्यपूजकता देशांत आणिली असें सांगितलें आहे. या उत्तरकालीन मगांचा कालनिर्णय करणें वगैरे गोष्टी आपणांस आवश्यक आहेत. या मगांना शाकद्वीपापासून आणिले असा उल्लेख आहे आणि हे अजूनहि आपणांस शाकद्वीपी म्हणून घेतात.† तर प्रश्न असा आहे कीं, या मगांचें आगमन स्वतंत्रपणें किंवा भारतीयांच्या आमंत्रणानें झालें, अगर हें आगमन त्यांच्या क्षत्रियांबरोबर म्हणजे शक अगर पारसीक यांच्या विजयसेनेबरोबर झालें? म्हणजे मगांचें अस्तित्व शकांच्या स्वारीचें दर्शक आहे कीं काय? या प्रश्नाचा निर्णय करण्यास पुरावा पूर्णपणें उपलब्ध नाहीं. शकांची स्वारी हिंदुस्थानांत गौतमबुद्धाच्या नजीकच्या पूर्वकाळांत होऊन त्यांच्या वंशापैकीं गौतमबुद्ध होता कीं, तो वेदांत उल्लेखिलेल्या मगांस दान देणाऱ्या कीकटांतील मगंद म्हणजे मगानुयायी लोकांपैकीं होता, ही गोष्ट आपणास विचारार्ह आहे. पण त्याविषयीं देखील निश्चयात्मक मत देतां येत नाहीं. गौतम बुद्ध ज्या अर्थी शाक्य म्हणजे ज्या लोकांचा अभिजन म्हणजे मूळ देश शक होता असल्या लोकांपैकीं (शकोऽभिजनो यस्य स शाक्यः) होता त्याअर्थी देशांत शकांची वसति देखील फार प्राचीन आहे यांत शंका नाहीं.

### ७९ शक आणि महाभारताचा पुरावा.

७९. शाकलद्वीप आणि शकराष्ट्र याविषयीं जी माहिती महाभारतांत आहे ती इतिहाससातत्य शोधण्याच्या दृष्टीनें

---

* सर हर्बर्ट रिसले यांनीं १९०१ च्या सेन्ससच्या पहिल्या विभागांत जातीवर जें प्रकरण लिहिलें त्या प्रकरणामध्यें यांनीं वरील मताची प्रदर्शना केली आहे. मी आपल्या "हिस्ट्री ऑफ् कास्ट इन् इंडिया" भाग १ यामध्यें तें मत खोडून काढिलें आहे. माझी टीका बरोबर आहे असें रिसले यांनीं पत्रद्वारें मला कळविलें होतें आणि आपल्या मतास विशेष आधार नाहीं व तें केवळ सूचनात्मक आहे असेंहि त्यांत कबूल केलें होतें. प्रस्तुत पत्र रिसले यांच्या मृत्यूनंतर लंडनच्या रॉयल ॲन्थ्रापॉलॉजिकल सोसायटीच्या सेक्रेटरी पाशीं रक्षणार्थ दिलें.

† यांची वस्ती गयेंत बरीच आहे. गुजराथी ब्राह्मणांत देखील कांहीं शाकद्वीपी आहेत पण त्यांची गुजराथेंत वस्ती अगदीं थोडी आहे.

उपेक्षणीय नाहीं. महाभारतांतील उताऱ्यांत परस्पर विरुद्धता आहे; पण ती देखील विचार करण्याजोगी आहे. एका यादीवरून अनेकांचे हात फिरले म्हणजे असंगति उत्पन्न व्हावयाचीच; पण जें शक, शाकल व शाकलद्वीप या विषयीं आहे तें पाहिलें पाहिजे.

पश्चिमेकडे सहदेव गेला आणि त्याच्या दिग्विजयांत शक आणि शाकल हे देश आणले आहेत.

अर्जुन उत्तरेस गेला तेव्हां त्याला शाकलद्वीप मार्गांत लागलें आहे.

पूर्वेकडे भीम दिग्विजयासाठीं गेला तेव्हां देखील त्यास शक मार्गांत लागले आहेत.

म्हणजे केवळ दक्षिण सोडून सर्व दिशांना 'राजे' या नात्यानें किंवा 'देश' या नात्यानें 'शक' पांडवांना मार्गांत लागले अशी कल्पना कवीनें मांडली आहे. पण महाराष्ट्र हा पश्चिमेंत अंतर्भूत होत असल्यामुळें महाराष्ट्रांत शक राजे असावेत या कल्पनेस शक्यता उत्पन्न होते.

महाभारतांतील निरनिराळे भाग निरनिराळ्या काळीं लिहिले गेले असल्यामुळें प्रस्तुत उल्लेख कोणत्या काळांतील आहे हें समजण्यास मार्ग नाहीं; तथापि या उल्लेखांचा अर्थ सबंध उत्तर हिंदुस्थान आणि महाराष्ट्र यावर एका काळीं शकांचें आक्रमण झालें असून त्या आक्रमणाचें दूरीकरण झाल्यानंतर त्यांचीं लहान लहान राज्यें इतस्ततः विखुरलीं होतीं असाच निघेल. शकांचा अत्यंत व्यापक प्रसार यांत दृष्ट होत आहे. अडचण एवढीच कीं, ही परिस्थिति कोणत्या काळाची दर्शक आहे हें स्पष्ट होत नाहीं. भारती युद्धापासून दूर अशा काळांत तो शकविजय घालविण्याचेंहि कारण नाहीं.

पारसीक ऊर्फ पर्शु यांच्यापूर्वी शकांचें आक्रमण अखिल भारतावर आणि त्या बरोबर महाराष्ट्रांतहि झालें असणें अशक्य नाहीं, आणि महारांमध्यें शकांप्रमाणें शूकरमांसजुगुप्सा आहे, ती महारांचा शकांशीं वांशिक अगर सांस्कृतिक संबंध असल्याची द्योतक आहे, कीं प्राचीन काळीं केव्हां तरी सेमेटिक लोकांशीं शक्य असलेल्या संबंधाची दर्शक आहे याविषयीं निश्चयात्मक विधान आज करतां येणार नाहीं.

आतां इराणी लोकांच्या स्वारीकडे आणि त्यापासून उत्पन्न झालेल्या संबंधाकडेसच वळूं.

ज्ञानकोश विभाग तिसरा बुद्धपूर्व जग पृ. ६२-६३ यांत मगांच्या प्राचीनकाळीं अस्तित्वाच्या संबंधानें पुराव्यांचें विवेचन आहे.

## ८०. बृहत्कथेचा शकांच्या आगमनासंबंधानें पुरावा.

८०. उदयनाच्या अगोदरच्या कालांत शकांचें आगमन जरी नाहीं तरी सरहद्दीवर आक्रमण दाखविणारी एक कथा कथासरित्सागरांत म्हणजे त्याच्या अगोदरच्या बृहत्कथेंत आली आहे. त्या कथेंत चंद्रप्रभ या नांवाचा एक मद्रदेशाचा राजा दाखविला आहे. त्या राजाची राजधानी शाकलपुरी * होती आणि ही भारतीय वाङ्मयांत मद्रराजधानी म्हणून ज्ञात नाहीं! यावरून कांहींकाळ पर्यंत तरी मद्रदेशांत शाकल नांवाचें पुर स्थापन झालें होतें यांत शंका नाहीं. हा चंद्रप्रभ राजा एकीकडे चीन† तर दुसरीकडे कोंकण अशा दूरदूरच्या प्रदेशांशीं संबंध जोडणारा होता. कोंकण आणि महाराष्ट्र यांतील राजकन्या सूर्यप्रभानें केल्यामुळें त्याचा उल्लेख पुढें येणारच आहे. हा चंद्रप्रभ राजा व त्याचा मुलगा सूर्यप्रभ हे मूळचे शक असणें अशक्य नाहीं. यांचा संबंध मयासुराशीं दाखविला आहे आणि यांचें एकंदर क्षेत्र आणि वागणुकीची पद्धत थोडीशी बाह्य वळणाची दिसते आहे.

---

* शाकलं नाम मद्रेषु बभूव नगरं पुरा। चंद्रप्रभाख्य तत्रासीद्राजांगारप्रभात्मजः॥
(कथासरित्सागर सूर्यप्रभलं. तरंग १, श्लोक १७).

मद्रेषु शाकलपुरे राजा चन्द्रप्रभोऽभवत्। इन्द्रस्थाने सुरस्त्रीभिर्गीयते यत्पराक्रमः॥
(बृहत्कथा मंजरी, सूर्यप्रभलं. तरंग १, श्लो. १३.)

† चीनदेशपते राज्ञः सुरोहस्यात्मसंभवा। हारिहेमावदाताङ्गी विद्युन्मालेति पञ्चमी॥
(कथासरित्सागर, सूर्यप्रभलं. तरंग १, श्लो. ४६)

प्रकरण १० वें.

# कैकेयांचें आगमन.

## ८१ भारतीयांस परिचित इराणी नांवें.

८१. प्राचीन इराणी लोकांना नांव कोणतें होतें हा एक प्रश्न आहे. आपल्या वाङ्मयांत पर्शु, पारसीक आणि कैकेय हीं तीन नावें आलीं आहेत. "प्राचीं गव्यंतो पृथुपर्शवो ययुः" या ऋग्वेदांतील (७. ८३. १) पृथु व पर्शू यांसंबंधाच्या उल्लेखांवरून ही नांवें अत्यंत प्राचीन काळापासून चालत आल्याचें दिसतें. पृथूचें पार्थव हेंहि एक रूप मधून मधून दृष्टीस पडतें. पार्थिअन लोक म्हणून ज्यांचा उल्लेख पाश्चात्यांकडून झालेला दृष्टीस पडतो तेच हे पृथु होत. यांनाच पुढें पल्हव हें नांव मिळालें व भाषेस देखील 'पेहेलवी' हा शब्द लावण्यांत येऊं लागला. इराण याशीं सदृश शब्द संस्कृतमध्यें नाहीं याचें कारण इराण यांतील लोकवाचक 'इर' शब्द हाच 'आर्य' या शब्दाचें अन्यरूप असणें शक्य आहे. 'इर+आन' याचा अर्थ आर्यस्थान असा होईल. 'पारसीक' हा शब्द कथासरित्सागरांत आणि त्याप्रमाणें रघुवंशांत आलेला आहे. या सर्वांपेक्षां अधिक महत्त्वाचा शब्द 'कैकेय' होय. पिशाच हेंहि एक नांव त्यांना होतें; तथापि 'पिशाच' हा शब्द एका अतिमानुष योनीसहि लावण्यांत येत असल्यामुळें पिशाचांसंबंधानें उल्लेख इराणी लोकांसंबंधानें कितपत घ्यावे हा प्रश्न प्रत्येक प्रसंगीं मोठ्या काळजीपूर्वक विचारांत घेतला पाहिजे.

इराणी लोकांचा संबंध ज्या काळांत प्राचीन भारताशीं नव्हता, असा काळच सांपडणें कठीण आहे. प्राचीन भारतांतील अनेक प्रसिद्ध घराणीं मूळचीं इराणी असावींत अशी शंका उत्पन्न होते. दाशरथी रामाच्या घराण्याविषयीं शंका घेण्याचें कारण पुढें दिलेंच आहे. इराणाशीं संबंध दाखविणारीं अनेक विधानें झालेलीं आहेत. त्या सर्व विधानांत ऐतिहासिक सत्य असेल असें खात्रीनें सांगतां येत नाहीं. संबंधाची शंका आली म्हणजे मनुष्य लहानसहान सादृश्यांस देखील महत्व देऊं लागतो. इराणशीं असलेल्या संबंधाविषयीं अशीच गोष्ट झालेली आहे. डॉ. देवदत्त भांडारकर यांनीं कालकावनाचा झारखंडाशीं आणि कालकेचा असुरवैश्वानराशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे. हा असुरवैश्वानर इराणीच होता असें भांडारकरांचें मत आहे*.

भांडारकर यांचा प्राचीन पुराणकथा आणि इराणी कथा यांशीं संबंध जोडण्याचा आणखी प्रयत्न म्हटला म्हणजे 'प्राच्य' म्हणून उल्लेखिलेल्या लोकांसंबंधीं होय. 'प्राच्य' देश तोच यांच्या मतें 'मगध' देश होय. जरासंध याला महाभारतांत असुर म्हटलें आहे. त्यावरून तेथें असुर-संस्कृति, कुरुयुद्धकाळीं शिल्लक होती, अशी भारतकारांची साक्ष आहे. जरासंधाचें असुरत्व ही गोष्ट देखील प्राचीन भारताच्या पाश्चात्य जगाशीं संबंधाची द्योतक आहे. भांडारकरांचे हे उल्लेख हिंदुस्थानचा असुराशीं संबंध दाखविणारे आहेत यांत शंका नाहीं. भारताचा असुराशीं संबंध म्हणजे इराणशीं संबंध नव्हे. तथापि असुराशीं संबंध तो इराणशींच संबंध डॉ. देवदत्तांनीं बनविला आहे. कारण "अहुर" आणि "असुर" या दोन देवनामांतील संबंध होय!! भांडारकरांनीं दाखविलेले हे उल्लेख असुरांचा व भारतीयांचा संबंध व्यक्त करतील, पण इराणी लोकांशीं संबंध खास सिद्ध करणार नाहींत. भांडाकरांना पुरावा जरी चांगला देतां आला नाहीं तरी ख्रिस्तपूर्व हजार वर्षें इतक्या प्राचीन काळीं इराणशीं संबंध होता ही त्यांची कल्पना बरोबर आहे. इराणी लोकांशीं संबंधाचें सातत्य इतकें आहे कीं, खुद्द दाशरथी रामाचें कुळ मूळचें इराणी असावें अशी शंका येते. अशी शंका येण्याचें कारण असें आहे कीं, अश्व हा शब्द ज्यांच्या नांवाचा अंत्यभाग आहे अशीं राजनामें सूर्यवंशीय राजांत अधिक आढळतात. उदा. विश्वगश्व, युवनाश्व, बृहदश्व, कुवलाश्व, दृधाश्व, हर्यश्व, संहताश्व, पृषदश्व, व्युषिताश्व, वगैरे. अश्वशब्द उत्तरभाग आहे, अशीं नांवें यादव, हैहय, पौरव, कान्यकुब्ज, काशीवंश, विदेहवंश, दिष्टवंश, द्रिमीढवंश, अनुवंश, मगधवंश या निरनिराळ्या वंशाच्या कुरुयुद्धपूर्व नावांच्या दर्शक राजांच्या ज्या याद्या उपलब्ध आहेत त्यांतून क्वचितच सांपडतात. काशीवंशांत एक हर्यश्व असा अश्वान्त शब्द आला आहे. तो देखील संशयित व्यक्ति आहे. आणखी एक हर्यश्व विदेहवंशांत आहे. भृम्यश्व आणि वध्र्यश्व उत्तर पांचालांत सांपडतात. त्याशिवाय रुचिराश्व दक्षिण पांचालांत सांपडतो. विदेहवंशांत एक बहुलाश्व सांपडतो. तसेंच दिष्टवंशांत एक कृशाश्व सांपडतो.† ऋग्वेदांत मात्र‡ अघाश्व, ऋज्राश्व,

(* The Annals of the Bhandarkar Oriental Research Institute; Vol. XII, Part II, 1931.)

† ज्ञानकोश, विभाग ३, पूर्वार्ध पृष्ठ ५२२–५२३ पहा.

‡ तोच ग्रंथ पृ. ६९–११५ पहा.

निंदिताश्व, मारुताश्व, वध्र्याश्व, वृषणश्व, वैयश्व, व्यश्व, शावाश्व हीं तसलीं अश्वान्त नांवें आलीं आहेत. पण तीं येथें स्वाभाविक आहे. ऋग्वेद पंजाबांतील वाङ्मय असून इराणी संस्कृतीपासून कमी दूरावलेल्या लोकांचें आहे.

एकट्या सूर्यवंशांत अश्वान्त नामाचें प्राचुर्य आणि इतर वंशांत त्या प्रकाराच्या नांवाचा जवळ जवळ अभाव ही गोष्ट उपेक्षणीय नाहीं. आमच्या मतें ही गोष्ट या सूर्यवंशाच्या इराणीपणाची दर्शक आहे. त्या कुलाला सूर्यवंश हें नांव पडलें आणि सूर्यापासून यांची उत्पत्ति झाली अशा कल्पना मांडल्या जाण्याचें कारण त्यांच्यामधील सूर्यपूजा असावी व येथील लोकांना सूर्य त्यांचें देवक वाटलें असावें. अनेक देवकें पुढें गोत्रें बनतात. आणि तीं गोत्रनामें पुढें पूर्वजांचा कृत्रिम इतिहास तयार होण्यास कारण होतात ही गोष्ट आपल्या परिचयाचीच आहे. वैदिक आणि पौराणिक काळांत म्हणजे कुरुयुद्धपूर्वकाळीं इराणशीं संबंध सिद्ध झाल्यानंतर दारियसच्या काळापर्यंतचा संबंधसातत्याचा इतिहास आज अज्ञात आहे, पण दोन देशांत संबंधाचें सातत्य होतें यांत शंका नाहीं.

१ "कैकेय" या नांवाचें स्मारक इराणी लोकांत राहिलें आहे. इराणी राजे आपल्या नांवापूर्वी 'कै' हें पूर्वपद जोडीत असत. उदाहरणार्थ कै–कोबाद, कै–गुस्तास्प, कै–खुश्रु वगैरे.

## ८२ दारियससंबंधीं माहितीचीं साधनें.

८२. हखामणी राजांच्या पूर्वीच्या कालांतील हिंदुस्थान व इराण यांच्या संबंधाविषयीं माहिती आपणांस उपलब्ध नाहीं. त्यामुळें आपणांस भारतीय माहितीस दुजोरा देणारें इराणी अगर ग्रीक साहित्य उपलब्ध नाहीं. तथापि दारयवहूच्या कालांवरील साहित्याचें स्थूल अवलोकन या प्रसंगीं अवश्य आहे.

डेरीयस हिस्टास्पिस या नांवानें ज्याचा हिरोडोटस् व इतर पाश्चात्य ग्रथकार उल्लेख करीत आहेत, त्या इराणच्या सम्राटानें ख्रिस्तपूर्व ५१८ च्या सुमारास हिंदुस्थानावर स्वारी केली ही गोष्ट आपणांस अनेक वर्षें माहीत आहे. तथापि या स्वारीसंबंधानें विशेष माहिती उपलब्ध नाहीं. हिरोडोटसचा ग्रंथ जेवढी माहिती देता झाला त्यापेक्षां अधिक माहिती खुद्द इराणच्या लेखांतूनहि उपलब्ध नाहीं. या स्वारीचा हिंदुस्थानावर परिणाम काय झाला व या स्वारीचीं स्मारकें आपल्या वाङ्मयांत आहेत किंवा नाहींत यासंबंधीं फारसा विचार झालेला नाहीं, तथापि तो विचार वाढत आहे. यासंबंधीं संशोधकांचे प्रयत्न झाले त्यांचें फल देतांना माझें स्वतःचेंसुद्धां झालेलें संशोधन त्यांतच समाविष्ट करीत आहें. माझें स्वतःचें एकंदरींत असें मत झालें आहे कीं, दारियस हिस्टास्पिसच्या अगोदर अनेक पिढ्या इराणीलोकांच्या स्वाऱ्या, निदान इराणी लोकांचें हिंदुस्थानांत आगमन मधून मधून चालू असलें पाहिजे. वेदपूर्वकालांत व वैदिक सूक्तांच्या कालांत जीं आगमनें झालीं त्यांच्या नंतर एकदम या दारयवहूची स्वारी झाली! मधल्या काळांत जणूं काय भटक्या साहसी टोळ्या नव्हत्या आणि खैबर घाट व कैकेयी घांट बंद पडले होते!! तथापि ६०० वर्षांपूर्वीचा काल हा प्रस्तुत विभागाचा विषय नसल्यामुळें दारयवहूच्या कालाकडेच लक्ष विशेष द्यावें लागत आहे.

दारीयसनें हिंदुस्थान ('इंडियन्स'ना) जिंकलें अशी माहिती हिरोडोटसनें दिली आहे (पुस्तक ४ थें, परिच्छेद ४४ वा.), आणि ती मुख्य धरूनच आजपर्यंत इराणनें हिंदुस्थान जिंकल्याची कथा दिली जात आहे. त्या माहितीला पुरवण्या फारच थोड्या जोडल्या गेल्या. शोधकांचा प्रथम प्रयत्न त्या हिरोडोटसच्या विधानांचा अर्थ निश्चित करण्याकडे झाला. 'इंडियन्स'चा अर्थ रॉलिन्सननें (हिरोडोटस आवृत्ति लंडन १८६२) 'पंजाब' आणि कदाचित् 'सिंध' असा केला आहे, तथापि त्या अनुमानाविषयीं अनेक लेखकांस खात्री वाटत नाहीं. केंब्रिज विद्यापीठानें तयार केलेला इतिहास यांत यांनीं या प्रकरणावर लेख लिहिला आहे. त्यांत प्रो. जाक्सन यांनीं इराणनें सिंधुनदाजवळचाच मुलूख घेतला, असें दिलें आहे. त्यांत देखील लेखकाची मिस्त मुख्यतः ग्रीक ग्रंथकारावरच असावी. कारण हिरोडोटसनें त्यासंबंधानें जें विधान केलें आहे तें असें आहे कीं, त्यानें अगोदर सिंधुनद समुद्रास कोठें मिळतो याचा शोध लावला (After the Voyage was completed Darius conquered the Indians and made use of the sea in these parts.) आणि नंतर इंडियन लोकांना जिंकून त्या भागांतील समुद्राचा उपयोग केला. याचा अर्थ असा होतो कीं, दारियसनें पश्चिम किनाऱ्याशीं व्यापार संकल्पून त्यासाठीं सिंधुनदाच्या आसपासचे लोक जिंकले. एवंच हिंदुस्थानांतील कोणता भाग दारियसनें जिंकला यासंबंधीं आधारादाखल विधान अजूनहि इराणकडून मिळालें नसून उपलब्ध विधान हिरोडोटसचें म्हणजे ग्रीक आहे, आणि आपणांस त्यापासूनच अर्थनिष्पत्ति करावयाची आहे. इराणचें साहित्य मुळींच नाहीं असें नाहीं. पर्सेपोलिस म्हणजे पार्सागाडी येथें जो लेख सांपडला आहे, त्यांतच फक्त त्याच्या प्रांतांमध्यें हिंदुस्थानचें नांव सांपडतें. पण बेहिस्तान येथील लेखांत त्याचप्रमाणें नक्ष-इ-रुस्तुम येथें सांपडत नाहीं. नवीन म्हणजे

१९३३ मध्यें सांपडलेल्या पेटिकालेखांत देखील हद्द सिंधुनदाचीच दिली आहे.

दारियसनें हिंदुस्थानचा भाग किती जिंकला होता याविषयीं निश्चयात्मक मत देतां येत नाहीं. आपल्या लेखांमध्यें दारियस स्वतः हिंदुस्थानांतील विशिष्ट भागाचा राजा म्हणवून घेत नाहीं. आपण 'गांधार' जिंकला आहे असें तो बेहिस्तानच्या लेखांत सांगतो. त्यांत तेवीस प्रदेशांचीं नांवें आलीं आहेत, तथापि गांधाराखेरीज हिंदुस्थानच्या कोणत्याहि भागाचें नांव नाहीं आणि गांधाराचा देखील हिंदुस्थानांत समावेश हिंदुस्थानची व्याख्या बरीच व्यापक करूनच करावा लागेल. तथापि दारीयस गांधार व हिंदुस्थान हे भिन्न देश समजत होता. गांधाराखेरीज हिंदुस्थानच्या कोणत्या तरी भागांत दारियसचा जेता म्हणून प्रवेश झाला होता याला प्रमाण आहे, तें त्यानें जो राजवाडा बांधला त्याच्या हकीकती होत. सुसा येथें नवीन सांपडलेल्या लेखांत ही माहिती सविस्तर आली आहे. त्यांत त्यानें राजवाड्याला लागलेले हस्तीदंत हिंदुस्थानां (हिदाव) तून आणि कुशांतून आणि आरकोचियांतून आणले, असें सांगितलें आहे.*

दरायस ऊर्फ दारयवहु याचे लेख अधिकाधिक सांपडूं लागले आहेत. बेहिस्तान येथील लेख बऱ्याच जुन्या काळापासून लोकपरिचित आहेत. बेहिस्तान येथील लेखांच्या अनेक आवृत्ति उपलब्ध आहेत.†

या सुप्रसिद्ध लेखाचें जवळ जवळच्या शब्दांत संस्कृतीकरण कामा मेमोरिअल इन्स्टिट्यूटच्या १९३१ च्या वार्षिकांत कै. प्रो. होडीवाला यांनीं तयार केलेलें प्रसिद्ध केलें आहे. त्याचें अवतरण पुढें देणारच आहें.

दारियसचे जे लेख आहेत त्यांत एक महत्त्वाची भर नुकतीच पडली आहे. त्याच्या सिंहासनमंदिराच्या भागांत युनिव्हर्सिटी ऑफ शिकागो मार्फत अपदन (पर्सीपोलिस) येथें जें खणणें चाललें आहे त्या खणतींत ८ सप्टेंबर १९३३ रोजीं एक पेटी सांपडली. तीवर तीन (इराणी, बाबीलोनी आणि एलामाइट) भाषांत एक लेख सांपडला.‡ या लेखांत "महाराज दारियस राजांचे राजे सामंतांचे राजे हिस्टासपिस याचे पुत्र हखामणी वंशाचे. राजा दारियस म्हणत आहे कीं, ज्या राज्यावर मी राज्य करतों तें हें राज्य आहे. जें सोगु याच्या आसमंतात राहणाऱ्या साकेत पासून कुशापर्यंत आहे आणि सिंधुनदापासून स्पार्डापर्यंत आहे आणि हें राज्य मला सर्व देवांत थोर जो अहुर मझ्द त्याच्या कृपेनें लाभलें आहे. अहुर मझ्द माझा आणि माझ्या घराण्याचा पाठीराखा होवो."

इराणमध्यें नवीन शोधासाठीं खनित्रकार्य चालूच आहे. त्यामुळें हिंदुस्थानविषयक माहितींत भर पडेल अशी अपेक्षा भविष्यकालासंबंधानें करणें गैरवाजवी होणार नाहीं.

## ८३ इराणी विजयाचीं भारतीय स्मारकें—स्मारकें शोधण्यासाठीं एकजीव झालेल्या संस्कृतीचें पृथक्करण करण्याची आवश्यकता.

८३. इराण आणि हिंदुस्थान यांचा दरायसच्या काळांत जो संबंध उत्पन्न झाला त्याचें स्मारक हिंदुस्थानांत कांहींच राहिलें नाहीं काय असा प्रश्न अवश्य आहे. तो काळ फार प्राचीन आहे म्हणून स्मारक राहिलें नसेल असा पूर्वग्रह करून चालणें योग्य होणार नाहीं. प्राचीन साहित्य टिकून रहातें तेव्हां तें त्यावर तात्कालिक झालेले अनेक परिणाम संरक्षून रहातें. भारतीय पौराणिक वाङ्मयांत इराणशीं संबंध दाखविणारे उल्लेख अनेक आहेत. त्यांचा प्राचीन इतिहासासाठीं उपयोग करून घेतांना जें कार्य आपणांस करावयाचें तें म्हटलें म्हणजे कोणत्या उल्लेखांची कालदृष्ट्या संगति दरायसच्या काळाशीं लागेल, हें शोधून काढणें. हिंदुस्थान आणि इराण यांचा संबंध म्हणजे सदृश लोकांचाच एकमेकांशीं संबंध असल्यामुळें इराणच्या संबंधाचे झालेले परिणाम एकजीव झालेल्या संस्कृतीचें पृथक्करण करीत शोधले पाहिजेत, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां तें संशोधन सोपें जाईल. जे कथाभाग पुराणांत घातले आहेत त्यांकडे संशयानें पाहण्याची आवश्यकता आहे. पौराणिकांनीं इराणांतील राजांचा आणि व्यक्तींचा

---

* हे लेख ज्या खनित्रकार्याचा परिणाम आहेत त्या खनित्रकार्याचा अहवाल इराणांतील पुराण-वस्तु-संशोधन कार्याच्या स्मरणवह्यांतून Memoirs de la mission archeologique de Perse. या नांवाखालीं प्रसिद्ध होत आहेत. त्याचे ग्रंथ विसांपेक्षां अधिक झाले आहेत. एकविसाव्या ग्रंथांत हखामणी राज्याचे लेख प्रसिद्ध केले आहेत. त्या लेखांची एक छोटेखानी आवृत्ति भाषांतरासह डॉ. ऊनवाला यांनीं प्रसिद्ध केली आहे—The ancient Persian Inscriptions of the Acheaemenides found at Susa. Paris, 1929.

†त्यांतल्या त्यांत पुढील आवृत्ति उपयुक्त होईल. The sculptures and the Inscription of Darius the Great, on the Rock of Behist in Persia; A new Collation of the Persian, Susian, and Babylonian texts with English translations &c. Agents British Museum London 1907. या पुस्तकांत सुसी भाषेंत, बाबिलोनी भाषेंत आणि इराणी भाषेंत मूळ छापलें आहे. चित्रें, प्रस्तावना, आणि विशेष नामांची सूची यांत आहे. मूळ त्याचें रोमन लिपींत रूपांतर आणि भाषांतर या सर्व गोष्टी यांत आहेत.

‡ टाईम्स ऑफ् इंडिया, १४ नोव्हेंबर १९३३.

संबंध जरी अत्यंत प्राचीन वृत्तांताशीं लावला असला तरी तो तसा असलाच पाहिजे असें मानणें अयुक्त होईल. रामायणासारख्या प्राचीनतम कालाचें वृत्त सांगण्याचा बाणा अगर बहाणा करणाऱ्या ग्रंथांत देखील इराणी काळाचे अवशेष सांपडणें शक्य आहे. रामायण हें काव्य आहे, आणि तें काव्य तयार करतांना कवीनें भिन्नदेशीय माहिती आपल्या काव्यांत घालून त्यास सत्यकथनाची खुमारी आणण्याचा प्रयत्न केला आहे. रामकथा मूळची अगदीं लहान होती, तींत पितृप्रतिज्ञा-पूर्तीसाठीं रामानें पत्करलेला वनवास असेल, पण रावणकथा आणि दक्षिणेंतील वर्णन हीं दोन्ही मागाहून घातलीं गेलीं असावींत व इतर अनेक कथा नवीन घातल्या असाव्यात. त्या कथांचा इराणी स्वारीनंतरच्या काळाशीं कितपत संबंध दिसतो हाहि विचार आपणास अवश्य होणार आहे. या दृष्टीनें रामायणपरीक्षण हा एक स्वतंत्र विषय होणार असल्यामुळें इतर गोष्टींकडे अगोदर वळतों.

बुद्ध, महावीर यांचा काळ आणि इराणी स्वारीचा काळ हे एकच असल्यामुळें कांहीं महत्त्वाचे परिणाम झाले. परंपरागत ब्राह्मण्यास दोन बाजूंनीं धक्के बसले. बुद्ध आणि महावीर यांचे संप्रदाय मगधांत ब्राह्मणांच्या श्रौतस्मार्त पद्धतीस विरोध करूं लागले, तर मंत्रनिर्मिति ज्या स्थळीं झाली आणि ऋग्वेदाचें आद्यवाङ्मय ज्या ठिकाणीं तयार झालें त्या पंजाबांतच परकीय सत्ता आली. या परकीय सत्तेचा आघात फार दूरवर पोंचला नसेल, व ती सत्ता थोडका काळ असेल; त्यामुळें परिणाम त्या मानानें कमी झाले असतील; पण एकंदर परिणामांची व्यापकता पहातां—कार्य मोठें आहे, त्या अर्थी कारण होणारा व्याघातहि मोठाच असला पाहिजे, असें वाटल्यावांचून राहवत नाहीं. शिकंदरनें स्वारी केली, पोरसशीं लढाई केली, अनेक किल्ले घेतले आणि पंजाबचा बराचसा भाग घेतला इत्यादि गोष्टी आपणांस ग्रीक इतिहासकारांनीं सांगितल्या आहेत. त्यावरून ग्रीक संस्कृतीच्या परिणामावर बरेंच पांडित्य झालें आहे, तरी ग्रीकांच्या आक्रमणाचे परिणाम मशाल घेऊनच शोधावे लागत आहेत; तथापि पर्शूंच्या म्हणजे पारसीकांच्या विस्तारकाळाचे परिणाम हिंदुस्थानवर पुष्कळच झाले आहेत, यांत शंका नाहीं. त्यांचें साकल्यानें अवलोकन केलें असतां असें दिसतें कीं, त्याचा परिणाम फार मोठा झाला आहे. ब्राह्मणविद्येवर, क्षत्रियविद्येवर, वैश्यविद्येवर पर्शूंचा इतका स्पष्ट परिणाम झालेला दिसत आहे कीं, जरी परकीय स्वारीमुळें झालेल्या स्थित्यंतरास भारतीयत्वाचीं पुटें पुष्कळ दिल्यामुळें आक्रमणाची आठवण अजीबाद गेली असली तरी इतिहासकाराच्या दृष्टीला त्या काळाचीं अनेक स्मारकें दृष्टीस पडून काळामुळें किती रूपांतर घडून येतें याबद्दल चमत्कृति वाटल्याखेरीज रहात नाहीं.

इराणचे सम्राट् थोर होते, कार्यकर्ते होते, अन्य लोकांच्या धर्माचे उच्छेद करणारे नव्हते तर दुसऱ्यांच्याहि दैवतांना मान देणारे होते; तर त्यांची आठवण कोणत्याना कोणत्या तरी रूपानें राहिली असली पाहिजे आणि इतिहासावर दंतकथेचीं पुटें पडून रूपांतर किती झालें हें लक्षिलें पाहिजे.

वेदकालापासून किंबहुना त्याच्या पूर्वीच्या कालापासून आपल्या देशांत वाङ्मयाचें सातत्य आहे आणि त्यामुळें प्रत्येक काळाचें देशांत कांहींतरी स्मारक असणें अधिक संभवनीय आहे. विशिष्ट काळाचें स्मारक नाहीं, असा पक्ष घेण्याची ज्याची इच्छा असेल त्यांनीं कांहींतरी कारण दाखविलें पाहिजे. अभाव सिद्ध करतां येणार नाहीं हें खरें आहे, तरी अभावाच्या पुरस्कर्त्यानें देशांतील वाङ्मयप्रवर्तकांच्या प्रवृत्ति लक्षांत घेऊन आपलें मत बनविलें पाहिजे आणि प्रत्येक स्मृतिरक्षणाची क्रिया, कांहींतरी कारणामुळें त्या काळांत एवढेंच नव्हे तर त्या काळासंबंधानें उत्तरकाळीं देखील बंद होती काय याचा विचार करून त्यानें आपली मांडणी केली पाहिजे. ज्या वेळेस इराण अत्यंत जागृत होतें आणि ज्या काळांत हिंदुस्थानमध्यें बौद्धसंप्रदायाचा प्रसार चालू असून वाङ्मय अनेक बाजूंनीं वाढत होतें, त्या काळांत जें इराणचें आक्रमण हिंदुस्थानावर झालें, तें आपल्या आक्रमणाचें स्मारक वाङ्मयांत शिल्लक ठेवल्याशिवाय कसें राहिलें? शोध करूं लागलें असतां असें दिसून येईल कीं, तें आक्रमण परिणाम केल्याशिवाय राहिलें नाहीं आणि प्रयत्नानें सर्व प्रकारच्या आठवणींचें संरक्षण करणाऱ्या भारतीयांनीं इराणच्या आक्रमणाचीं देखील स्मारकें कायम ठेवण्याची क्रिया चांगल्या तऱ्हेनें केली आहे. इराणचें आक्रमण त्यांस कोणत्याहि तऱ्हेनें लज्जाकारक वाटण्याचा संभव नव्हता, आणि आठवणी सहेतुक पुसून टाकण्याची क्रिया त्यांच्या हातून झालेली नाहीं. आठवणी पुसून टाकण्याची क्रिया जेव्हां सहेतुक होते तेव्हां त्या प्रयत्नांत कांहीं तरी अपूर्णता रहाते, आणि त्यामुळें आठवणी राहून तीं पुसटण्याच्या प्रयत्नाचीं स्मारकें देखील शिल्लक रहातात. येथें जुन्या आठवणी शिल्लक आहेत, त्या बुजविण्याच्या प्रयत्नाचीं स्मारकें शिल्लक नाहींत.

पौराणिक वाङ्मय आणि वैदिक वाङ्मय यांत जें अंतर दिसून येतें तें बऱ्याच अंशीं मूलतः निराळ्या अशा देश्य संस्कृतीच्या वैशिष्ट्यामुळें दिसून येत असेल तर कांहीं अंशीं तें नवीन अनुभवांच्या संस्कारांमुळें असेल. नवीन राजघराण्यांचे वृत्तांत भविष्य म्हणून ज्याअर्थी पुराण वाङ्म-

यांत उल्लखिले गेले आहेत आणि ज्याअर्थी अनेक पुराणें अत्यंत प्राचीन काळापासून इतिहास देण्याचा बाणा बाळगतात त्याअर्थी कोणताहि विशिष्ट इतिहास मुद्दाम पुराणकारांनीं वगळला असें म्हणतां येणार नाहीं. याशिवाय परकीय स्वाऱ्यांचे कांहीं तरी सामाजिक परिणाम होणारच. त्या सामाजिक परिणामांचा वाङ्मयावर परिणाम होणार नाहीं कसा? जर परिणाम दिसलाच नाहीं तर त्यावरून निदान एवढें तरी काढतां येईल कीं, सामाजिक परिणाम इतका कमी महत्त्वाचा होता, कीं, त्याचा वाङ्मयावर परिणाम दिसत नाहीं; परंतु इराणी आक्रमणाचा परिणाम समाजावर आणि वाङ्मयावर देखील स्पष्ट झालेला आहे. त्याचें विवेचन आणखीहि पुढें येणारच आहे. तथापि फार पुढें जाण्यापूर्वी दारियसच्या सुप्रसिद्ध लेखांपैकीं एका लेखाकडे विशेष लक्ष देण्यांत येईल आणि त्यावरून आपणांस भारतविषयक कोणत्या महत्त्वाच्या गोष्टी समजतात त्यांचा आढावा घेण्यांत येईल.

इराणी लोकांच्या आक्रमणाचे जे परिणाम आपल्या ष्टीस पडतात ते शोधतां शोधतां असें वाटूं लागतें कीं, ारियसच्या पूर्वी इराणींच्या कांहीं स्वाऱ्या झाल्या असाव्यात. इराणी लोकांचा उच्छेद करणारा तथापि आपल्या दिग्विजयांत महाराष्ट्र वगळणारा चक्रवर्ती राजा उदयन हा दारियसच्याहि पूर्वी झाला नाहीं कशावरून? हा प्रश्न विचारास घेतलाच पाहिजे. शिवाय या उदयनाच्या पूर्वीचा महाराष्ट्राचा इतिहास कांहींच उपलब्ध नाहीं काय? जर कांहीं कथाभाग उदयनपूर्वकालीन आहे असें संस्कृत ग्रंथकार परंपरेचें म्हणणें असलें तर तें विचारांत घ्यावयास नको काय? अर्थात् घेतलेंच पाहिजे. तसें करणें कदाचित् नवीन शोधास आपणांस प्रवृत्त करील.

### ८४ भाषेवर इराणी आक्रमणाचे परिणाम.

८४. विशिष्ट विजयामुळें महत्त्वाचे जे फेरफार होतात त्यांत भाषेंत स्थित्यंतर हा एक आहे. साक्सन लोकांवर जेव्हां नार्मन लोकांचें आक्रमण झालें तेव्हां आजच्या इंग्लिश भाषेची निर्मिति दोन्ही भाषांतील अंशांच्या एकीकरणामुळें झाली. आपणांकडे भाषाशास्त्र जेवढें प्राचीन काळांतच विकसित झालें तितकें प्राचीन किंवा अर्वाचीन (गेलीं १०० वर्षें वगळतां) कोणत्याहि राष्ट्रांत संवृद्ध झालें नाहीं, आणि त्यामुळें आपल्याकडे भाषाविषयक स्थित्यंतराची माहिती देण्यास साहित्य मुबलक आहे. इराणची ही जी स्वारी हिंदुस्थानावर झाली, तिचे लोकभाषेवर आणि तीमुळें प्राकृत भाषांच्या शास्त्रांवर, आणि भाषांचा उपयोग नाटकांत होतो म्हणून नाट्यशास्त्रावर काय काय परिणाम झाले आहेत तें पाहूं; आणि हा भाषाशास्त्रीय पुरावा कोणता इतिहास सांगत आहे, तो ऐकूं.

शातवाहन राजे प्राकृत भाषेचे पुरस्कर्ते होते अशी त्यांची ख्याति आहे. पैशाची ही एक प्राकृत भाषाच होती. शातवाहनांनीं पैशाचीचा अनादर केला त्या अर्थी ते देशी भाषेचे खरे पुरस्कर्ते नव्हते, असें म्हणतां येणार नाहीं. पैशाची ही आजच्या उर्दूप्रमाणें शूरसेनांच्याच देशांत म्हणजे व्रजदेशांत जी भाषा होती त्या भाषेचीच विकृति होती. पैशाचीची प्रकृति शौरसेनी आहे असें वररुचि सांगतच आहे. शूरसेन देश म्हणजेच मथुरा ऊर्फ व्रजदेश होय आणि उर्दूची प्रकृति देखील व्रजभाषाच होय, असें उर्दूचे अभ्यासक सांगत आहेत. व्रजभाषेस प्राचीन काळांत जें इराणी विकृतीचें स्वरूप मिळालें तें पैशाचीचें होय. आणि जें मुसलमानी काळांत स्वरूप मिळालें तें 'उर्दू' होय. प्राचीन पैशाचीचा आणि आजच्या उर्दूचा संबंध केवळ एकस्थानमूलकतेचा आहे, कीं त्याहून अधिक आहे, याविषयीं आज सांगतां येत नाहीं. व्रजभाषेच्या पैशाची विकृतीचें दीर्घकाळ अस्तित्व होतें त्यामुळें पुढें त्या पैशाचीचेंच सातत्य कांहीं अंशीं उर्दूंत रहाणें अशक्य नाहीं. शहरांतल्या बकाल वस्तींतच ही पिशाचभाषा असावयाची. पैशाची ही नागरिक भाषा होती असें (प्राकृतसर्वस्वकार) वैय्याकरण मार्कंडेय

**कैकेयं शौरसेनं च, पांचालमितिच त्रिधा।**
**पैशाचो नागरा यस्मात् ते नाप्यन्या न लक्षिताः।**

या शब्दांत सांगतच आहे. या भाषेवर वैय्याकरणांच्या विचारांचें पौनःपुन्य ज्या अर्थी हेमचंद्राच्या काळापर्यंत दिसून येत होतें, त्या अर्थी ही पिशाचभाषा बराच काळ जीव धरून होती व मुसलमानी स्वारी आल्यानंतर ही बकाल वस्तीचीच परकीय शब्द स्वीकारणारी भाषाच उर्दूंत परिणति पावली असणें अशक्य नाहीं. ज्या भाषेच्या उगमाचा पत्ता लागत नाहीं ती पैशाचीचें पर्यवसान तर नसेल ना? तिच्यांतून उर्दूचा उद्भव स्वाभाविक वाटतो.

### ८५ वैय्याकरणांचा स्पष्ट पुरावा.

८५. प्राचीन भारतीय वैय्याकरणांनीं जें व्याकरण शास्त्र तयार केलें, त्यांत त्यांनीं भाषांचें वर्गीकरण करतांना निरनिराळीं तत्त्वें वापरलीं. एक तत्त्व म्हटलें म्हणजे भाषेचा स्थानाशीं संबंध पाहून भाषांचे स्थानमूलक भेद करणें. महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी हे भेद त्याच प्रकारचे आहेत. वैय्याकरणांनीं स्थानमूलक भेदांशिवाय दुसरा एक भेद ओळखला होता. भाषा केवळ स्थानपरत्वें बदलते एवढेंच नव्हे तर ती

जात्यनुसार बदलते. असंस्कृत जातींच्या भाषा असंस्कृत असतात आणि सुसंस्कृत जातींच्या भाषा सुसंस्कृत असतात, या तत्त्वावर त्यांनीं 'भाषा' व 'विभाषा' असे भेद केले. जातिमूलक भिन्नता उत्पन्न होते ती जातीच्या सांस्कृतिक त्याच प्रमाणें वांशिक भिन्नतेमुळें उत्पन्न होते. कांहीं जाती समाजांतील पदवीच्या दर्शक असतात, तर कांहीं खरोखरच भिन्नवंशीय असतात. हे दोन्ही प्रकारचे भेद ओळखून विभाषांचें वर्गीकरण केलेलें नाहीं. संस्कृत ही एक तऱ्हेची विभाषाच आहे. ही सुसंस्कृत लोकांची भाषा आहे असें वैय्याकरणांनीं जाणलें. त्यांनीं ओळखलेली आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे कालपरत्वें देखील भाषा बदलते. ही गोष्ट त्यांनीं लक्षांत घेऊन 'अपभ्रंश' या शब्दाला शास्त्रीय परिभाषेंत स्थान दिलें. शौरसेनी भाषा हीच मागधी व पैशाची भाषांची प्रकृति आहे, असें जेव्हां वररुचि सांगत आहे, तेव्हां तो प्राकृत भाषेचे खरोखर दोनच प्रकार लक्षीत आहे. एक प्रकार शौरसेनी आणि दुसरा प्रकार महाराष्ट्री. एक प्रकार उत्तरेकडील व एक दक्षिणेकडील. यांपैकीं आजच्या भाषांपैकीं गुजरात-पासून मागधीपर्यंतच्या सर्व भाषा शौरसेनीशीं संबंध सांगत आहेत. महाराष्ट्राच्या भाषेला वैशिष्ट्य आहे, आणि ती उत्तरेकडील सर्व भाषांपासून भिन्न आहे, आणि उत्तरेकडील सर्व भाषा व्रज भाषेच्या विकृति आहेत. इतक्या गोष्टी आजच्या काळांत मांडल्या जात आहेत, त्याचप्रमाणें प्रकार वररुचीच्या काळीं म्हणजे चवथ्या शतकांत होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पिशेल आपल्या प्राकृत व्याकरणाच्या प्रारंभीं प्राकृत वैय्याकरणांच्या विभाषांविषयीं चर्चा करतो, त्यांत मार्कंडेय याचें प्राकृतचें वर्गीकरण भाषा, विभाषा, अपभ्रंश आणि पैशाच असें करतो व तदनंतर विभाषांमध्यें, शकारी, चांडाली, शाबरी, आभिरिका, व टक्की असें वर्गीकरण देतो, आणि औड्री आणि द्राविडी यांचा प्राकृतमध्यें अस्वीकार मांडतो. चौथ्या परिच्छेदांत विभाषांचा उपयोग नाटकादि ग्रंथांत केला तर त्यास अपभ्रंश म्हणूं नये, असें रामतर्के वागीशाचें म्हणणें मांडतो. विभाषेचें सविस्तर स्पष्टीकरण वैय्याकरण करीत नाहींत असें पिशेल सांगत आहे, व त्या विभाषांचें सविस्तर स्पष्टीकरण ग्रीअरसन एका लेखांत (Ind. Anti. 1918) करीत आहे. विभाषेचें स्पष्टीकरण ग्रीअरसन थोडक्यांत असें करतो कीं, कोणत्याहि ठराविक भाषेचे अपभ्रंश ते नाटकांतील विशिष्ट पात्रांसाठीं केलेले असतात. पैशाची विभाषा नाहीं, अपभ्रंश नाहीं, इतकें निराळें स्वरूप पैशाचीस देण्याचें मुख्य कारण रामतर्के-वागीशाच्या परंपरेंतील पूर्वगामींच्या काळांत पैशाची भाषेचें राजकीय आणि सामाजिक प्रामुख्य हेंच असावें.

रामतर्कवागीश यानें पैशाचिकेच्या वर्गीकरणाविषयीं जें लिहिलें आहे त्याच्याविषयीं एक टांचण ग्रीअरसननें भांडार-करस्मृतिग्रंथामध्यें प्रसिद्ध केलें आहे. त्यामध्यें ग्रीअरसननें प्रो. कोनोचा आधार घेतलेला आहे आणि कोनोनें लासेनच्या इंस्टिटयूशिओनेचा आधार घेतला आहे. त्याच्यानंतर प्राकृत कल्पतरूचें हस्तलिखित ग्रीअरसनला इंडिया ऑफिसच्या लायब्ररींत मिळालें, त्यावरून पुढें आशुतोष मुकर्जींच्या स्मृती-साठीं प्रकाशित झालेल्या ग्रंथाकरतां प्राकृत कल्पतरूंतील पैशाची विषयींचें प्रकरण ग्रीअरसन यांनीं संपादून दिलें. भांडारकर यांच्या स्मृतिग्रंथांतील आपलीं विधानें चुकीच्या आधारावर रचलीं गेलीं असल्यामुळें तीं त्याज्य आहेत असें ग्रीअरसन (इं. अँ. जून १९२०) मध्यें कळवितात; तथापि आपलें मूळचें म्हणणें म्हणजे कैकेयांच्या देशाच्या भाषेशीं संबद्ध अशीच मुख्य पैशाची आहे आणि रामतर्कवागीश, मार्कंडेय, लक्ष्मीधर, यांनीं स्वीकारलेली पैशाची मुख्य पैशा-चीशीं अत्यंत सदृश आहे अशी मांडणी ग्रीअरसननीं त्यानंतर केली आहे.

मागें प्राकृतसर्वस्वांतील श्लोक दिला आहे त्यांत कैकेय, शौरसेन आणि पांचाल हे तीन भेद पैशाचीचे दिले आहेत. ते पाहून असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, कैकेय म्हणजे इराण तेथील भाषा, किंवा कैकेय जातीची भाषा व शूरसेनाची भाषा या सदृश कशा होतील? त्याचें उत्तर एवढेंच कीं, ज्याप्रमाणें आज लोक उर्दूस मुसलमानी म्हणतात आणि उर्दू आणि पर्शियन या जणूं काय एकाच वर्गांतील भाषा आहेत असें अनेक सामान्य लोक समजतात, त्याप्रमाणेंच स्थिति प्राचीन काळीं होती. जेव्हां वररुचीनें पैशाची भाषेचें स्वरूप तपासलें तेव्हां ती मूळची शौरसेनीच आहे, असें त्याच्या शोधक दृष्टीस दिसून आलें, व पैशाचीची प्रकृति शौरसेनीच आहे असा अभिप्राय त्यानें देऊन ठेवला. त्यानें पैशाचीचीं अनेक रूपें पाहिलींच नव्हतीं. प्राकृतसर्वस्वकारांनीं हें पाहिलें कीं, ज्या पैशाची भाषेची शौरसेनी ही प्रकृति आहे ती भाषा कैकेयांच्या म्हणजे इराणी भाषेशीं बरीच संबद्ध आहे, तथापि कैकेयी शौरसेनीशीं सदृश नाहीं या दृष्ट साम्यावरून कैकेयी आणि शौरसेनी हे पैशाचीचेच भेद आहेत असें सांगितलें आहे.

### ८६ पैशाची आणि तिची शातवाहनांस जुगुप्सा.

८६. शातवाहनांच्या काळांत पैशाची भाषेचें एक महत्त्वाचें ठिकाण विंध्य पर्वत होतें यांत शंका नाहीं. काशांबीच्या उदय-

नाच्या पूर्वजांनींच गंगाथडींतून पारसीकांस घालवून दिलें असलें पाहिजे. पैशाची शूरसेनांत होती या भाषाशास्त्रात्मक पुराव्याचें महत्त्व थोर आहे आणि त्यामुळें कैकेयांनीं दरायसच्या पूर्वी स्वाऱ्या केल्या असतील किंवा उदयनानें पराभव केल्यानंतर पुन्हां पारसीक शूरसेनांत 'विजेते' या नात्यानें दाखल झाले असतील. उदयन किंवा नरवाहनदत्त यांच्या काळांत ते नव्हते, आणि वररुचीच्या काळांत म्हणजे नंदकाळांत पैशाची भाषा निर्माण करण्याइतके ते देशांत जुने व बद्धमूल झाले होते. त्यावरून दरायसच्या काळापूर्वीहि पारसीकांच्या स्वाऱ्या झाल्या असतील अशी शंका बळावते. वररुचीच्या काळांत पैशाची शूरसेनांची भाषा होती असें वररुचि सांगतो.

विंध्य पर्वतांत रहाणाऱ्यांची ती भाषा होती असें गुणाढ्यच सांगतो.

**ततोऽहं कृतमौनत्वात्, व्यवहारबहिष्कृतः ।**
**अनिच्छंतं तमामंत्र्य प्रणामेनैव भूपतिम् ॥**
**निर्गत्य नगरात् तस्मात्, शिष्यद्वयसमन्वितः ।**
**तपसे निश्चितो द्रष्टुम्, आगतो विंध्यवासिनीम् ॥**
**स्वप्नादेशेन देव्या च तयैव प्रेषितस्ततः ।**
**विंध्याटवीं प्रविष्टोऽहं, त्वां द्रष्टुं भीषणामिमाम् ॥**
**पुलिंदवाक्यादासाद्य सार्थं दैवात् कथंचन ॥**
**इह प्राप्तोऽहमद्राक्षं पिशाचान् सुबहूनहम् ॥**
**अन्योन्यालापमेतेषां दूरादाकर्ण्य शिक्षिता ।**
**मया पिशाचभाषेयं मौनमोक्षस्य कारणम् ॥**
**उपगम्य ततश्चैतां त्वां श्रुत्वोज्जयिनीगतम् ।**
**प्रतिपालितवानस्मि यावदभ्यागतो भवान् ।**

कथासरित्सागर—कथापीठलंबक—तरंग ७, श्लोक २३—२८.

यावरून या कथेच्या काळांत पिशाच लोकांचें स्थान म्हणजे इराणी मंडळीचें स्थान विंध्यपर्वत हें होतें आणि इराणी मंडळीचा प्रसार चोहोंकडे झाला होता हें स्पष्ट आहे.

पद्मपुराणामध्यें पिशाचांचें अस्तित्व नर्मदातीरीं होतें असें दाखविलें आहे; त्यांत कथा अशी आली आहे कीं अनेक गंधर्वकन्या (म्हणजे बहुत करून गांधारदेशीय कुमारी) कामवश होऊन एका मुनिकुमारास संत्रस्त करत्या झाल्या, आणि त्यामुळें त्यानें प्रथम त्यांचें मन परावृत्त करण्याची खटपट करून पुढें त्रासल्यामुळें, 'तुम्ही पिशाच योनीप्रत जाल' असा शाप दिला. त्या शापामुळें त्या पिशाच योनींत बराच काल होत्या. तथापि पुढें त्या नर्मदेंत स्नान केल्यामुळें शापमुक्त झाल्या. (पद्मपुराण, स्वर्गखंड, अध्याय २२ व २३).

इराणी लोकांचें व्यापक जेतृत्व स्पष्ट करण्यास दारीयसचीं लिखाणें अपुरीं आहेत; त्यावरून अशी एक कल्पना होते कीं, दारियसच्याखेरीज स्वतंत्र इराणी संघांच्या ताब्यांत बराच भारत प्रदेश असावा. त्यांची माहिती इराणच्या उल्लेखांवरून मिळावयाची नाहीं याचें कारण या इराणी लोकांच्या वसाहती अगर राज्यें इराणी साम्राज्याशीं संबद्ध नसावींत.

### ८६ अ. कैकेयांचीं भिन्न आगमनें व त्यांचे भिन्न परिणाम.

८६ अ. एवंच कैकेयांच्या निरनिराळ्या आगमनासंबंधानें पुढील विधान करतां येईल.

१ इराणी लोकांच्या स्वाऱ्या देशांत एका मागून एक होत होत्या, त्यांत इक्ष्वाकूंच्या घराण्यानें अत्यंत प्राचीन काळीं स्वारी केली असावी; त्यांच्या अगोदरचें आगमन आज सांगतां येत नाहीं. इतर लोकांपेक्षां इक्ष्वाकूंच्या घराण्यांचा इराणीपणा ताजा असावा.

२ ऋग्वेदीय लोकांच्या नांवामध्यें 'अश्व' शब्द ज्यांच्या अंतीं आहेत असे शब्द आहेत. त्यावरून त्यांचें देखील इराणी लोकांशीं सादृश्य दिसून येतें.

३ वररुचीच्या काळीं शूरसेनांत म्हणजे मथुरेंत ज्यांची भाषा इराणी वळणावर गेली होती असा एक मनुष्यवर्ग कित्येक पिढ्या स्थाईक झाला होता.

४ दारयवहूच्या काळांत त्याचें राज्य सिंधूच्या पूर्वेकडे फार आंतपर्यंत असल्याचें दिसत नाहीं, त्यामुळें शूरसेनाचें सामाजिक रूपांतर करूं पहाणारा परिणाम अन्य कारणामुळें आला असेल. म्हणजे ज्या इराणी लोकांनीं मथुरेचें सांस्कृतिक स्थित्यंतर कांहीं अंशीं घडविलें ते इराणी ऊर्फ कैकेय दारयवहूचे हस्तक नव्हते.

५ उदयनानें ज्या पारसीकांचा पराभव केला ते पारसीक दारयवहूच्या अगोदरचे असले पाहिजेत.

## प्रकरण ११ वें.

# अश्वपति कैकेय व सत्राजित्.

### ८७ परकीय राजांचें भारतीकरण

८७. इराणी लोकांचें भारतीयांशीं सादृश्य मूळचेंच असल्या-मुळें व इराणी लोकांच्या परिणामांचें व त्यांच्या राजांचें, आणि त्यांच्या लोकांचें भारतीयांत जवळजवळ स्वात्मीकरण झालें असल्यामुळें त्यांचें स्वतंत्र अस्तित्व भारतीय कथां-मध्यें शिरून शोधलें पाहिजे, आणि ज्या व्यक्ति भारतीय म्हणविल्या जातात त्या भारतीयच होत्या काय याची तपासणी केली पाहिजे. इराणी व्यक्तींचीं नावें भारतीय झालीं असलीं पाहिजेत, ही शक्यता धरून भारतीय म्हणून समजल्या जाणाऱ्या व्यक्तीच्या नांवांचें आणि चरित्राचें परीक्षण हवें. पारसीकांच्या देवता भारतीय देवदैत्यांत प्रविष्ट झाल्या होत्या काय, हें पाहिलें पाहिजे. जें एक झालें आहे त्याचेंच पृथक्करण झाल्याशिवाय इराणी घटकांचें अस्तित्व हातीं लागणार नाहीं.

इराणी लोकांनीं म्हणजे कैकेयांनीं हिंदुस्थानांत जो प्रांत मिळविला तो कोठपर्यंत होता याविषयीं नक्की पुरावा इराणी लेखांत मिळत नाहीं. ग्रीकलेख किंवा इराणी लेख यांत भौगो-लिक उल्लेख आजतरी सिंधु नदाशिवाय अन्य नाहींत. अशा परिस्थितींत भारतीय साहित्य आपणांस कितपत उपयोगी पडेल हें पाहिलें पाहिजे. भारतीय साहित्य आपल्यापाशीं अनेक प्रकारचें आहे. इराणी लोकांची संस्कृति अत्यंत सदृश होती, आणि त्यांच्यामध्यें असलेल्या अग्नीच्या, समुद्राच्या, आणि सूर्याच्या उपासना आपल्याकडील लोकांसहि मान्य होत्या, आणि त्यांच्यामध्यें चातुर्वर्ण्याची कल्पना असून ब्राह्मणसदृश एक जात होती. या सर्व गोष्टी त्यांचा भार-तीयांशीं सुंदर तऱ्हेनें मिलाफ होण्यास सोइस्कर होत्या. ब्राह्म-णांची व त्यांच्या उपाध्यायांची स्पर्धा लागण्याचाहि संभव नव्हता. कारण सूर्याचें देऊळ बांधून उपासना करण्या कर-विण्याचा धंदा मगांचा होता आणि देवळांतलें पुजारीपण ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांकडे किंवा हलक्या प्रतीच्या ब्राह्मण म्हणविणारांकडे सोंपविलें होतें. शंकराची पूजा ज्याप्रमाणें गुरवांनीं करावयाची त्याप्रमाणें सूर्याची मगांनीं करावयाची ही गोष्ट कोणत्याहि दृष्टीनें ब्राह्मणांना त्यांचें सांस्कृतिक भिन्नत्व भासविणारी नव्हती.

ज्या व्यक्ती इराणी असून भारतीय म्हणून गणल्या जातात, अशांमध्यें अश्वपति कैकेय आणि सत्राजित् यांचा उल्लेख केला पाहिजे. शोध केल्यास आणखीहि सांपडतील. अश्वपति कैकेय हा हिस्टास्पिस असावा अशी कल्पना अनेकांनीं मांडली आहे. त्याप्रमाणेंच सत्राजित् हा कोणी तरी इराणचाच राजा असावा.

### ८८ सत्राजित् राजासंबंधींच्या कथा.

८८. कोणीतरी सत्राजित् नांवाचा सूर्योपासक राजा होता, तो मोठा चक्रवर्ती होता, ही गोष्ट मग ब्राह्मणांच्या व त्यांच्या उपासनामार्गांच्या प्रशस्तीसाठीं भविष्य पुराणांत सांगितली आहे. हा 'सत्राजित्' दारियस किंवा क्झरसिझ यांपैकीं कोणीतरी असणें अशक्य नाहीं. याचें कारण हा कोणीतरी परकीय राजा होता असा संशय उत्पन्न करणारे पुरावे शिल्लक आहेत. 'सत्राजित्' हें नांवच संशयास्पद दिसतें. या शब्दाचा अर्थ निष्पन्न होत नाहीं. परकीय नांवाचें हें संस्कृतीकरण दिसतें. सत्राजित् असें संस्कृतीकरण करून तें संस्कृतीकरण अपूर्ण झालें म्हणून तें नांव पुन्हां सत्रजित् बनविण्याची खटपट हरिवंशांतील श्लोकांत झाली आहे.

'सत्राजित्' हा परका तर त्याला स्वकीय करतांना इकडील पूर्वज दिले पाहिजेत व भारतीय पूर्वज द्यावयाचे म्हणजे जितक्या प्राचीनकाळापर्यंत जातां येईल तितकें गेलें पाहिजे. हीच क्रिया पुराणकारांनीं केलेली दिसते. त्यांस यादव बनविण्यासाठीं क्रोष्टूपर्यंत जाऊन त्यांची वंशावळ बनविली आहे. सत्राजिताची कथा बऱ्याच उत्तरकाळीं पुराणांत शिरली असली पाहिजे. याला प्रमाण असें आहे कीं, सर्व ज्ञात कथांचें एकीकरण करूं पहाणारा ग्रंथ जो महाभारत त्यांत ती येत नाहीं. हरिवंश पुराणांतील पुढें अवतरिलेल्या श्लोकांत स्यमंतक मणि कोठून आला याच्या दोन कथा आहेत. एक कथा समुद्रापासून प्रसेनास तो मिळाला असें सांगते, तर दुसरी कथा सूर्यापासून सत्राजितास मिळाला असें दाखविते.

हरिवंशांत स्यमंतकमणि प्रसेनानें समुद्रापासून मिळविला असें ज्या श्लोकांत सांगितलें आहे, ते श्लोक पुढीलप्रमाणें आहेत.

**गांधारी चैव माद्री च क्रोष्टुभार्ये बभूवतुः।**
**गांधारी जनयामास अनमित्रं महाबलम्॥**
**माद्री युधाजितं पुत्रं ततो वै देवमीदुषम् ११**

**अनमित्रममित्राणां जेतारमपराजितम् ।**
**अनमित्रसुतो निघ्नो निघ्नतो द्वौ बभूवतुः १२**
**प्रसेनश्चाथ सत्राजित्, शत्रुसेनाजितावुभौ ।**
**प्रसेनो द्वारवत्यां तु निवसंत्या महामणिम् १३**
**दिव्यं स्यमंतकं नाम समुद्रादुपलब्धवान् ।**

आणि तसें सांगितल्यानंतर लागलीच पुढील ओळींत सूर्यापासून तो मणि सत्राजितानें मिळविला असें मांडलें आहे.

**तस्य सत्राजितः सूर्यः सखा प्राणसमोऽभवत् १४**
**स कदाचित् निशापाये रथेन रथिनां वरः ।**
**अब्धिकूलमुपस्प्रष्टुमुपस्थातुं ययौ रविम् १५**
**तस्योपतिष्ठतः सूर्यं विवस्वान् अग्रतः स्थितः ।**
**अस्पष्टमूर्तिर्भगवान्तेजोमंडलवान्प्रभुः १६**
**अथ राजा विवस्वंतं उवाच स्थितमग्रतः ।**
**यथैव व्योम्नि पश्यामि सदा त्वां ज्योतिषांपते १७**
**तेजोमंडलिनं देवं तथैव पुरतःस्थितम्**
**को विशेषोस्ति मे त्वा सख्येनोपागतस्य वै १८**
**एतत् श्रुत्वा तु भगवान् मणिरत्नं स्यमन्तकं**
**स्वकंठादवमुच्यैव एकान्ते न्यस्तवान् विभुः १९**
**ततो विग्रहवंतं तं ददर्श नृपतिस्तदा**
**प्रीतिमानथ तं दृष्ट्वा मुहूर्तं कृतवान् कथाम् २०**
**तमपि प्रस्थितं भूयो विवस्वन्तं स सत्रजित्**
**लोकानुद्भासयस्येतान्येन त्वं सततं प्रभो**
**तदेतन्मणिरत्नं मे भगवान् दातुमर्हसि २१**
**ततःस्यमंतकमणिं दत्तवान् तस्य भास्करः**

हरिवंश अध्याय ३८ वेंकटेश्वरआवृत्ति.

येणेंप्रमाणें स्यमंतक मण्याविषयीं दोन कथा उपलब्ध असून त्या प्रस्तुत आवृत्तींत एका मागून एक दिल्या आहेत. श्लोकांतील मुद्याच्या गोष्टी वर दिल्याच आहेत. श्लोकांतील सर्व पाल्हाळयुक्त वर्णनाचें भाषांतर देणें अवश्य वाटत नसल्यामुळें दिलें नाहीं.

भविष्यपुराणांत अनेक ठिकाणीं मगांचें वर्णन आहे, आणि कथा जवळ जवळ सारखीच आहे. मगांच्या अनुरोधानें सत्राजित् राजाचें वर्णन आलें आहे. आतां देत असलेलें वर्णन वेंकटेश्वर आवृत्तीवरून दिलें आहे. या आवृत्तींत अर्वाचीन कालविषयक मजकूर घुसडला आहे; तथापि प्राचीन मजकुरांत ढवळाढवळ केल्याचें दिसत नाहीं. मगवृत्तांत या आवृत्तीच्या अध्यायांचेच आंकडे देऊन वर्णन करीत आहें. सांबासमीप नारद येतो. सांबाच्या ठायीं कृष्णस्त्रिया अनुरक्त होतात आणि त्यामुळें मत्सरयुक्त झालेला कृष्ण सांबास शाप देतो, आणि त्या शापाच्या योगानें सांब कुष्ठरोगी होतो. सूर्याराधनेमुळें सांबकुष्ठनाश होतो. (अध्याय ७३) सांब आराधनेसाठीं चंद्रभागासरित्तटाकीं द्वादश दिव्यमूर्तींचें देवालय बांधतो (अ० ७). सांबास सूर्योपासनेचीं अनेक विधानें व व्रतें नारद सांगतो (अ. ७५–११६). सत्राजिताचें उपाख्यान. सूर्याराधनेनें त्याला कसें ऐश्वर्य प्राप्त झालें त्याचें वर्णन. या पूजनांत भोजकांच्या श्रेष्ठतेचें वर्णन (अ. ११६) आहेच. त्यावरून भोजक म्हणजे मगवंशीय लोक, त्यांच्याशीं संबद्ध असलेला सूर्योपासक चक्रवर्ती राजा इराणी सम्राट् असला पाहिजे अशी शंका स्वाभाविकपणें उत्पन्न होते.

**कृष्ण राजा महानासीद्ययातिकुलसंभवः ।**
**सत्राजिदिति विख्यातश्चक्रवर्ती महाबलः ॥**
**प्रभावैस्तेजसा कांत्या क्षांत्या बलसमन्वितः ।**
**धैर्यगांभीर्यसंपन्नो वदान्यो यशसान्वितः ॥**
**बुद्ध्या विक्रमदक्षश्च संपन्नो ब्राह्मणायतः ।**
**कृती, कविस्तथाशूरः षट् पदार्थैर्न निर्जितः ॥**
**सदा पंचसुरक्तश्च वसुमद्भिर्न निर्जितः ।**
**रुद्रता वसुभिर्जातैः सत्वश्रद्धासमन्वितः ॥**
**अंबुजस्यांडजस्येव आत्रेयस्य तथाऽच्युत ।**
**अंबुजायास्तथा कृष्ण वार्यपात्रं स वै विभो ॥**
**गांगेयेन बले तुल्यः पौलस्त्याचार्यश्रमो यथा ।**
**गांगेयस्य तथा कृष्ण धिषणस्य हरेर्यथा ॥**
**काम्यश्च द्विजभक्तस्तु तथा वाल्मीकिवत् सदा ।**
**व्यासस्य देवशार्दूल जामदग्न्यस्य वा विभोः ॥**
**येषामनेकैर्गुणैर्युक्तः स राजा क्ष्मातले विभो ।**
**शशास स महाबाहुः सप्तद्वीपां वसुंधराम् ॥**
**यस्मिन् गाथां प्रगायन्ति ये पुराणविदो जनाः ।**
**सत्राजिते महाबाहौ कृष्ण धात्रीं समाश्रिते ॥**
**यावत् सूर्य उदेति स्म यावच्च प्रतितिष्ठति ।**
**सात्राजितं तु तत्सर्वं क्षेत्रमित्यभिधीयते ॥**
**स सर्वरत्नसंयुक्तां सप्तद्वीपवतीं महीम् ।**
**शशास धर्मेण पुरा चक्रवर्ती महाबलः ॥**
**नान्यायकृन्न चाशक्तो वदान्यो बलवत्तरः ।**
**तस्याभूत पुरुषा राज्ञः सम्यग् धर्मानुशासिनः ॥**
**चत्वारः सचिवास्तस्य राज्ञः सत्राजितस्य नु ।**
**बभूवुरप्रतिहता सदा वाति बलस्य वै ॥**

**तस्य भक्तिरतीवासीन्निसर्गादेव भूपतेः ।**
**दिवाकरे जगद्धानौ रक्तचंदनमालिनि ॥**
**तस्योर्ध्वं महिमानं च विलोक्य पृथिवीपतेः ।**
**न केवलं जनस्यापि ह्यभवत्तस्य विस्मयः ॥**

या राजाची प्रिया भार्गवी होती म्हणून पुढें सांगितलें आहे.

**यदा न निश्चयं राजा स ययौ भार्गवीप्रियः ।**
**तदा पप्रच्छ धर्मज्ञान् स विप्रान्समुपागतान् ॥**

प्रस्तुत उताऱ्यांत ' सप्तद्वीपवती मही 'स शासन करणारा ' सत्राजित् ' ' चक्रवर्ती ' आला आहे. ' सत्राजित् ' नांवाचा कोणी चक्रवर्ती भारतीय इतिहासांत झाल्याचें पौराणिकांनीं वर्णिलें नाहीं आणि यामुळें सूर्योपासक इराणी सम्राटाची कथा भारतीय बनविल्याचा संशय स्वाभाविकपणें येतो. सूर्योपासक कोणती तरी एक व्यक्ति म्हणून सत्राजिताचें नांव हरिवंशानें प्रचलित केल्यानंतर तिलाच सार्वभौम राजा बनविणें हें स्वाभाविक आहे. ज्या काळांत सत्राजितास सार्वभौमत्व मिळालें त्या काळांत " सत्राजित् " या शब्दाला ' सत्रा वेळ पृथ्वी जिंकणारा ' (!) असा अर्थ प्रचलित झाला असावा. अशाच प्रकारचा अर्थ कृष्णविषयक लेखांत मराठी ग्रंथांत आढळतो आणि त्याला कारण ' सात्राजितं तु तत्सर्वं क्षेत्रमित्यभिधीयते ' या सारख्या वाक्याचा चुकीचा अर्थ कारण झाला असावा. अहुरमझ्द ही ईशकल्पना सूर्यमूलक होती, आणि अहुरमझ्दाच्या कृपेमुळें मला हें यश प्राप्त झालें आहे अशा तऱ्हेचें विधान दारयवहूनें आपल्या लेखांत वारंवार केलेंच आहे. दारियसचें वैभव हिंदुस्थानांत ज्ञात झाल्यावर त्याचा आणि सूर्योपासक सत्राजिताचा संबंध जोडण्यांत आला असावा. सत्राजित् हें नांव अगोदरच हरिवंशकारांनीं परिचित करून ठेवलें होतें व त्यास क्रोष्टुवंशीय देखील बनविलें होतें. त्यामुळें मगप्रशस्ति भविष्य पुराणांत समाविष्ट करणाऱ्या संपादकांनीं दारियस तोच सत्राजित् असें एकीकरण केल्याचें दिसतें. रामायणांत आलेला अश्वपति कैकेय हा इराणी असावा ही कल्पना देखील या मगांस चांगलें स्थान देऊं इच्छिणाऱ्या संपादकांस नसावी.

उद्दालक आरुणीच्या कथेला एक तऱ्हेचा इराणी आधार सांपडतो असें रा० जयनाथ पति यांनीं कामा मेमोरियल इन्स्टिट्यूटच्या त्रैमासिकांत ( मुंबई १९३० ) प्रसिद्ध केलेल्या एका लेखांत दाखविलें आहे.

अवेस्तामध्यें झरथुष्ट्रानें गोतमाचा वादांत पराभव केला असें सांगितलें आहे, आणि त्या गोतमाचें नांव 'अरुण खर्फस्त्र' असें होतें, असें सांगितलें आहे.

त्या अरुणी बरोबर जो हिंदुस्थानांतून दुसरा पंडित गेला व ज्याचा पराभव केला त्याचें नांव सेंकेरकस् असें अवेस्तांत दिलें आहे. हा सेंकेरकस् म्हणजे शार्कराक्ष ( परिच्छेद ८९ पहा. ) असावा असें प्रस्तुत लेखकाचें म्हणणें आहे.

उद्दालक आरुणि हा गांधार देशीय असावा आणि त्यामुळें त्याचा इराणच्या विचारवंतांशीं आणि हिंदुस्थानच्या विचारवंतांशीं संबंध येत असावा. तो गांधारांतील होता याला पुरावा छांदोग्य उपनिषदांतच आहे.

## ८९ इराणचें स्थान आपल्या बौद्धिक इतिहासांतहि आहे.

८९. उपनिषदांत जे अनेक वादविवाद आले आहेत ते त्या काळच्या वैज्ञानिक आणि बौद्धिक चळवळींचे द्योतक आहेत. ज्या उपनिषदांत अश्वपति कैकेय याचा उल्लेख आहे तें छांदोग्य उपनिषद प्राचीन समजलें जातें. उपनिषदांमध्यें

**ईश-केन-कठ-प्रश्न-मुंड-मांडुक्य-तित्तिरिः**
**ऐतरेयं च छांदोग्यं बृहदारण्यकं तथा**

या श्लोकांत आलेल्या दहा उपनिषदांवर शांकरभाष्य आहे आणि हीं उपनिषदें अधिक प्राचीन व परंपरामान्य अशीं समजलीं जातात. या उपनिषदांत आलेल्या बहुतेक गोष्टी कुरुयुद्धोत्तरकालीन आहेत, यांत शंका नाहीं. तथापि त्या किती उत्तर काळच्या आहेत याविषयीं मात्र विचार निश्चित नाहीं. यांतील एक कथा इराणच्या हखामणी सम्राटांशीं संबद्ध असून बुद्धकालीन आहे, असें मांडलें गेलें आहे. अशा कथांमध्यें छांदोग्य उपनिषदांतील पांचव्या अध्यायांत एक कथा आहे.

उपमन्यूचा पुत्र प्राचीनशाल, पुलुशाचा पुत्र सत्ययज्ञ, भाल्लवीचा पुत्र इंद्रद्युम्न, शर्कराक्षाचा पुत्र जन, अश्वतराश्वाचा पुत्र बुडिल हे उद्दालक आरुणीकडे ब्रह्म काय आहे याविषयीं त्याचें मत समजून घेण्यासाठीं गेले असतां त्यानें त्यास या बाबतींत आपल्यापेक्षां अधिक जाणता असा ' अश्वपति कैकेय ' याच्याकडे नेलें. कारण तो ' वैश्वानर ' म्हणजे विश्वमित्र आत्म्याला जाणणारा होता. कैकेयानें सर्वांचा चांगला सत्कार केला आणि त्यांना आपलें मत समजावून दिलें.

उपमन्युपुत्र प्राचीनशाल सुलोकाची उपासना करी, पुलुषपुत्र सत्ययज्ञ आदित्याची करी, भाल्लविपुत्र वायूची करी, आणि शर्कराक्ष पुत्र आकाशाची करी, अश्वतराश्व उदकाची करी. उद्दालक आरुणि हा पृथिवीची करी, तेव्हां तुम्ही सर्वजण आत्म्याच्या एकांगाचे उपासक आहांत अशा तऱ्हेचा उपदेश अश्वपतीनें केल्याचें तेथें सांगितलें आहे. सहाव्या

अध्यायांत याच उद्दालक आरुणीनें श्वेतकेतुनामक आपल्या मुलास उपदेश केला तो दिला आहे. या उपदेशांत अनेक दृष्टांत दिले आहेत आणि त्यांत एक दृष्टांत कथेच्या उगमाचें क्षेत्र दाखविणारा आहे. "चोरांनीं नाडून डोळे बांधून अरण्यांत सोडलेला गांधार देशाचा मनुष्य चौकशी करीत पुढें गांधार देशाला जसा परत जातो त्याप्रमाणें मनुष्यप्राणी पापपुण्यांनीं नाडला असून सदुपदेशानें आपल्या मूल गेहास गमन करतो" असें उदाहरण दिलें आहे. यावरून गांधार हा उद्दालक आरुणीचा देश असेल किंवा उपनिषदीय तत्त्वज्ञानाची चर्चा करणारा किंवा नित्यव्यवहाराचा देश असेल, हें स्पष्ट होत आहे. अश्वपति कैकेय हा दारयवहूचा बाप विष्टप अगर विश्तास्प तोच असावा असें जें कांहीं लेखकांस वाटतें तें अशक्य नाहीं; पण विश्तास्प हें नांव अगोदरच्या काळांत देखील असूं शकेल. केवळ अश्वपतीच्या उल्लेखावरून त्या व्यक्तींचा उल्लेख करणाऱ्या कथा दारयवहूच्या काळांतल्याच होय असें म्हणतां येणार नाहीं. इराणशीं संबंधाचें सातत्य वेदपूर्व काळापासून दारयवहूच्या काळापर्यंत होतें ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

इराणशीं संबंध पूर्णपणें लक्षांत येण्यासाठीं दोहोंच्यामध्यें असलेल्या गांधाराकडे व राजधानी तक्षशिला यांच्याकडे लक्ष केंद्रीभूत करणें महत्त्वाचें आहे.



चित्रांक १८. शेजारच्या चित्राचें रेखाचित्र.



चित्रांक १९. भाजें लेण्यांतील चित्र. शक किंवा इराणी शिपायाचें.

# प्राचीन गांधार आणि त्याचें संयोजक दृष्टीनें महत्त्व.

## ९० गांधार व तक्षशिला यांचें सांस्कृतिक महत्त्व.

९०. बुद्धाच्या जातककथांमध्यें तक्षशिला हें एक संस्कृत विद्येचें मोठें स्थान केलेंच आहे. तक्षशिला ही गांधार देशाची राजधानी होती. आणि गांधार हा देश इराणशीं अगदीं लागून असल्यामुळें इराण हा हिंदुस्थानचा अगदीं शेजारचा देश होता. गांधार हा इराणी राज्याचा भाग होता हें आपणांस ठाऊकच आहे.

तथापि सांस्कृतिक दृष्टीनें तो भाग हिंदुस्थानचाच धरीत यांत शंका नाहीं. अफगाणिस्थानांतील कंदाहारच्या आसपासचा मुलूख तोच गांधार. ह्याचा वेदांत त्याचप्रमाणें पुराणांत उल्लेख आहे आणि गंधर्व लोकांचा मुलूख तोच होता ही कल्पना अनेकांनीं व्यक्त केली आहे. तथापि गंधर्व आणि गंधारि हे दोन्ही शब्द ऋग्वेदांतून दिसून येतात. कदाचित् 'गंधर्व' हे गंधारि लोकांतील प्राचीन काळच्या पितृपूजेमुळें उत्पन्न झालेले देव असून त्यांचा स्वीकार गांधार देशांतून आर्यन् लोक हिंदुस्थानांत येतांना त्यांनीं केला असावा. 'गंधर्व' हे भारतीयांच्या कल्पनाशक्तीवर बरेच परिणामकारी झाले आहेत. गंधारि लोकांनाच पुढें गंधार हें नांव प्राप्त झालें आहे. गंधारि लोकांविषयीं द्वेषबुद्धि अथर्ववेदांत व्यक्त झाली आहे. गंधारि व मूजवंत या लोकांत आणि अंग आणि मगध या लोकांत ताप जावो अशी इच्छा व्यक्त केली आहे. गंधारि लोकांप्रमाणें अंग व मगध हे इराणी संस्कार पावले होते.

पौराणिक वाङ्मयांत गांधार आणि कैकेय या देशांशीं वैवाहिक संबंध असून त्या लोकांच्याविषयीं स्वकीयतेची भावना भारतीयांत होती असें दाखविणारे उल्लेख आहेत. धृतराष्ट्राची पत्नी गांधारी ही त्याच देशची राजकन्या होती, व कौटिल्याबद्दल प्रसिद्ध असलेला शकुनिमामा तेथीलच होता. गांधारीचा बाप सुवलराजा हा गंधर्वांचा वंशज होता असें दिलें आहे. या देशाच्या राजधान्या भिन्न काळीं भिन्न होत्या. तक्षशिला, पुष्कलावती, पुरुषपुर, आणि उद्भांडपुर हीं गांवें देखील राजधान्या होत्या. गांधार हें बुद्धोत्तर काळीं बौद्ध संप्रदायाचें मगधाच्या खालोखाल महत्त्वाचें स्थान बनलें, पण त्यास एक कारण बुद्धपूर्वकाळीं भारतीयांचा गांधाराशीं असलेला संबंध होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. बौद्ध जातककथांमध्यें तक्षशिलेचा संबंध जो बुद्धाच्या पूर्व चरित्राशीं मांडला आहे तो पूर्णपणें तक्षशिलेच्या प्राचीन प्रामुख्याचा दर्शक नसेल. कदाचित् तक्षशिलेच्या लोकांना बुद्धाविषयीं आपलेपणा वाटावा म्हणून बुद्धाच्या पूर्वचरिताचा तक्षशिलेशीं संबंध जोडला गेला असेल. तथापि ब्राह्मणी संस्कृतीच्या प्रामुख्याच्या कालांत देखील गांधाराशीं व त्यामार्फत कैकेयाशीं निकट संबंध स्थापन झाला होता यांत शंका नाहीं.

अश्वपति कैकेयाच्या काळांत म्हणजे उद्दालक आरुणीच्या काळांत 'तक्षशिला' हें मोठें विद्येचें स्थान होतें आणि त्याला इराणी राजांकडून उपद्रव पोंचत नसावा. बुद्धाच्या जातकांत तक्षशिलेच्या शाळांविषयीं आणि आचार्यवर्गाविषयीं ज्या गोष्टी आहेत त्यांतील कांहीं बुद्धोत्तरकालीन असल्यास तक्षशिलेचें महत्त्व इराणच्या विजयानंतर देखील अबाधित राहिलें, हें स्पष्ट होईल. जातकांत ज्या स्थानांचा 'विद्येचें आगर' म्हणून गौरव केला आहे त्यांत तक्षशिलेस प्रामुख्य दिसतें. तक्षशिला त्यावेळेस गंधार देशांत मोडत असे. 'वाराणशीहून विद्याभ्यासासाठीं विद्यार्थी तक्षशिलेस जात' असे उल्लेख जागोजाग आहेत. त्यांतील कांहीं उल्लेख येथें अवतरिले तर कोणकोणत्या विद्येसाठीं तक्षशिलेला जात आणि तेथील अध्यापनपद्धति व रहाणी कशाप्रकारची होती यावर कांहींतरी प्रकाश पडेल. जातकांत आलेल्या तक्षशिलेविषयीं कांहीं कथा पुढीलप्रमाणें आहेत.

(१)

"तो ( पंचावुध कुमार ) मोठा सोळा वर्षांच्या सुमाराचा झाला तेव्हां राजा त्यास उद्देशून म्हणाला 'तात, शिल्प शीक' 'कोणाजवळ शिकूं देणार' जा तात, गंधार राष्ट्रांत तक्कशिला, नगरांत प्रमुख आचार्याजवळ शीक, आणि त्याला हा आचार्यभाग दे' असें म्हणून सहस्र ( कार्षापण ) देऊन त्याला पाठविलें. तो तेथें जाऊन शिल्प शिकून आचार्यांनीं दिलेलीं पंचायुधें घेऊन आचार्यांस वंदून तक्षशिला नगरांतून निघून वाराणशीच्या वाटेनें निघाला" ( ५५ पंचबुध जातक )

(२)

"पूर्वी गंधारराष्ट्रांत तक्कशिला येथें बोधिसत्त्व दिशाप्रमुख आचार्य होऊन पांचशें तरुणांस शिल्प शिकवीत असे. मग एक दिवस त्याचे ते शिष्य लांकडें आणण्यास अरण्यांत

जाऊन लांकडें वेंचूं लागले ... त्या दिवशीं जनपदांतील एका कुटुंबानें उद्यां 'ब्राह्मणवाचनक' करूं असें म्हणून आचार्यास निमंत्रण दिलें. आचार्य मुलग्यांस म्हणाला, तातांनों, उद्यां एका गांवीं जावयाचें आहे. पण तुम्ही उपाशीं जाऊं शकणार नाहीं. सकाळीं पेज शिजवून तेथें जाऊन तुम्हाला मिळालेली सगळी भिक्षा घेऊन या." सकाळींच पेज शिजविण्याकरतां दासास उठवून ते म्हणाले "आमच्या करतां लौकर पेज शिजीव" वगैरे. ( ७१ वरण जातक )

( ३ )

"पूर्वी तक्कसिला येथें बोधिसत्व दिशाविख्यात आचार्य होऊन पांचशें मुलांनां मंत्र ( वेद ? ) शिकवीत असे. त्यांतील एका मुलाचें नांव "पापक" असें होतें. त्यास वाटूं लागलें कीं माझें नांव अमंगळ आहे. दुसरें नांव ठेवावें....त्यास आचार्य म्हणाला, 'जा तात, जनपदांत भिक्षेसाठीं हिंडून आवडीप्रमाणें एक नांव घेऊन ये. मग मी तुझें नांव बदलून दुसरें नांव ठेवीन. त्यापुढें नांवाची व्यक्तीच्या चरित्रापासून भिन्नता असते असा त्याला अनुभव आला असें दाखविलें आहे.

( ४ )

पूर्वी...बोधिसत्त्व श्रीमान् ब्राह्मणकुलांत जन्मून मोठा झाल्यावर तक्कसिलेस आचार्य होऊन पांचशें मुलांस शिल्प शिकवीत असे. त्या मुलांत संजीव नांवाचा एक मुलगा होता. बोधिसत्त्वानें त्यास मृतोत्थान मंत्र दिला. नुसता उत्थान मंत्र घेऊन त्याला उतारा न घेतां एके दिवशीं मुलांसह लांकडें आणण्यास अरण्यांत जाऊन तेथें एक मेलेला वाघ पाहून संजीवानें मंत्र म्हणून मेलेल्या वाघास खडे मारले. वाघ उठून वेगानें जाऊन संजीवाच्या गळ्यास डसून त्याचा प्राण घेऊन तेथेंच पडला. दोघेहि एकाच जागीं मरून पडले. ( १५० संजीव जातक )

( ५ )

'आजपासून चौथ्या दिवशीं हत्तींचा उत्सव होणार,' असें ऐकून बोधिसत्त्वाची माता 'हस्तिमंगलाचा सण सात पिढ्या आमच्याकडे चालत आला आहे तो आतां जाईल आणि आमचें धन कमी होईल,' असें ओरडत रडूं लागली. बोधिसत्त्वानें रडण्याचें कारण विचारलें आणि तें रडण्याचें कारण ऐकून तो म्हणाला 'बरें अम्मा, मी उत्सव करतों' तिनें म्हटलें, 'ना तुला तीन वेद येतात, ना हस्तिसूत्र. तूं कसा उत्सव करशील ?' असें आईपासून उत्तर ऐकून बोधिसत्त्वानें पृच्छा केली 'अम्मा, हस्तिमंगल कधीं करणार आहेत ?'

'बाळ, आजपासून चौथ्या दिवशीं.'

'अम्मा, तीन वेद पाठ केलेले हस्तिसूत्र जाणणारे आचार्य कोठें रहातात ?'

'बाळ, अशाप्रकारचा दिशाविख्यात आचार्य वीसशें योजनांवर गांधारराष्ट्रांत तक्कसिलेस रहातो.'

'अम्मा, आपला वंश ( परंपरागत हक्क ) न बुडावा म्हणून उद्यांच्या दिवसांत तक्कसिलेस जाऊन एका रात्रींत तीन वेद आणि हस्तिसूत्र शिकून परवां परत येऊन तेरवां हस्तिमंगल करीन, रडूं नको.' ( १६३ सुसीम जातक )

( ६ )

पूर्वी वाराणसींत ब्रह्मदत्त राज्य करीत असतां त्याचा पुत्र ब्रह्मदत्तकुमार नांवाचा झाला. आपले मुलगे मानदर्परहित, शीतोष्णक्षम आणि लोकचारित्र्यज्ञ व्हावेत या अपेक्षेनें, आणि पूर्वीचे राजे त्यांना शिल्प शिकण्यासाठीं आपल्या नगरांतील प्रमुख आचार्याजवळ न ठेवतां दूर परराष्ट्रांत पाठवीत असत, असें जाणून, त्या राजानेंहि सोळा वर्षांच्या सुमारास आलेल्या आपल्या पुत्रास बोलावून, त्यास एकेरी तळाच्या वहाणा, इरलें ( पण्णछत्त ) आणि सहस्र कहापण देऊन सांगितलें 'बाळ, तक्कशिलेंत जाऊन शिल्प शीक.' त्यानें 'होय' असें उत्तर दिलें, आणि आईबापांस वंदून निघून तो तक्कसिलेस क्रमानें प्राप्त झाला. तेथें आचार्याचें घर विचारता झाला. ज्यावेळीं मुलांचें शिकविणें संपवून आचार्य घराच्या दाराशीं क्रमण करीत होता त्यावेळीं, आचार्यगृहीं जाऊन वहाणा काढून वंदन करून तो उभा राहिला. हा थकला आहे असें पाहून आचार्यानें त्याचा पाहुणचार करविला. जेवण झाल्यावर थोडी विश्रांति घेऊन कुमार आचार्यास वंदून जवळ उभा राहिला. 'कोठून आलास बाळ?' असें विचारल्यावर 'वाराणशीहून' असें तो म्हणाला.

"कोणाचा मुलगा तूं ?"

"वाराणशी राजाचा ?"

"येथें कां आलास ?"

"शिल्प शिकण्यासाठीं"

"कायरे, त्वां आचार्यभाग आणला आहेस कीं धर्मान्तेवासिक होऊं इच्छितोस ?"

धर्मान्तेवासिक दिवसा आचार्याचें काम करून रात्रीं शिल्प शिकत. आचार्यास भाग देणारे वडील मुलाप्रमाणें घरांत राहून शिल्प शिकणेंच करीत.

वरील प्रश्नोत्तरीनंतर त्या आचार्यानें शुभनक्षत्र पाहून कुमारास शिकविण्यास आरंभ केला.

आणखी एका कथेंत असें आहे कीं, राजपुत्रानें एका म्हातारीचे मूठभर पांढरे तीळ खाल्ले. हें तीनदां झालें. म्हातारीला गुरूनें मूल्य देऊं केलें. म्हातारी म्हणाली—मूल्य नको पण पुन्हां कुमार असें करणार नाहीं असें याला शिकवा. तेव्हां गुरूनें तीनदां कुमारास वेतोटीनें मार दिला. मुलानें सूड उगविण्याचा निश्चय केला. आणि राजा झाल्यावर त्या गुरूला वाराणशीला बोलावलें व त्याचा वध करावयाचा ठरविलें; पण पुढें अमात्याच्या सांगण्यावरून गुरूचा वध न करतां सत्कारच केला.

या कथा तक्षशिलेचें सांस्कृतिक दृष्टीनें बुद्धपूर्व कालींच महत्त्व स्थापन झालें होतें याच्या दर्शक आहेत.

### ९० अ. गांधार आणि जैन.

९० अ. गांधार व तक्षशिला यांच्या विषयींच्या कथा बौद्धांप्रमाणें जैन वाङ्मयांतून देखील सांपडतील. जैन वाङ्मयांत त्यांचें अस्तित्व असावें असें बृहत्कथेंतील एका कथेवरून ( मदनमंचुका लंबक तरंग १ ला ) दिसून येतें.

### कलिंगदत्त व वैश्यपुत्र यांची कथा.

त्याच वेळीं तक्षशिला नामक नगरांत कलिंगदत्त म्हणून एक जैनधर्मी राजा होता. तो आपला राजधर्म सोडून प्रजेला सतत आपण स्वीकारलेला धर्म शिकवीत असे. त्याच नगरांत वितस्तदत्त म्हणून एक मोठा श्रीमान् वैश्य होता. त्याला जैन-अतिथी फार प्रिय असत. त्या कारणानें त्याचा पुत्र रत्नदत्त आपल्या जनकाला पापी समजून त्याची नेहमीं निंदा करीत असे. एकदां त्याच्या पित्यानें त्याला निंदेचें कारण विचारलें असतां, रत्नदत्त मोठ्या रागानें म्हणाला, " बाबा, वैदिक धर्माचरण सोडून व केवळ जैन भिक्षुकांच्या सेवेमध्यें तत्पर राहून तुम्ही मोठा अधर्मसंचय करीत आहां; कारण या जैनांत स्नान-शौचादि कांहीं नाहीं. या धर्मांत सर्व अधम जातीचे लोक असतात. यापेक्षां ब्राह्मणांना दानें द्या; आणि त्यांचा सत्कार करा. "

त्यावर त्याचा पिता म्हणतो—"वत्सा, धर्माचे अनेक प्रकार आहेत. बाबारे, लोकोत्तर धर्म निराळा व सार्वलौकिक धर्म निराळा. रागादिराहित्य, सत्य, भूतदया इत्यादिकांसच ब्राह्मण्य म्हणतात. जातींच्या व्यर्थ कलहास ब्राह्मण्य कोणीही म्हणत नाहींत. सर्व धर्मांत अहिंसा हाच मुख्य धर्म आहे, असें सर्व बुद्धिमान् समजतात, व मीही त्याचेंच अनुष्ठान करीत आहें. असें असतांना तूं मला अधार्मिक कसें समजतोस ?"

परंतु पित्याच्या या उपदेशानेंही पुत्राचें समाधान झालें नाहीं. उलट त्यानें त्याची निंदाच केली. तेव्हां तें त्याचें अकृत्य सहन न झाल्यामुळें वितस्तदत्तानें राजाकडे फिर्याद केली. त्याबरोबर राजानें त्याला आणवून व अतिशय रागावल्यासारखें दाखवून वधदंड सांगितला. वधदंड ऐकून बापानें मुलासंबंधीं रदबदली केली, तीमुळें राजानें दोन महिने शिक्षा लांबणीवर टाकली, व दोन महिन्यांनीं तो धार्मिक झाला तर क्षमा करीन असें सांगितलें. त्या दोन महिन्यांत मुलगा अगदीं कृश झाला, तेव्हां राजानें मृत्यूच्या भयाचा परिणाम कसा असतो व तो लोकांस धार्मिक कसें बनवितो यासंबंधानें आणखी एक दिव्य त्याजकडून करवून त्याला समजाविलें व पुढें क्षमा केली. या प्रकारची गोष्ट बृहत्कथेच्या क्षेमेंद्र व सोमदेव यांच्या दोन्ही रूपांतरांत आली आहे.

प्रस्तुत कथेचा अनेक दृष्टींनीं विचार करणें अवश्य आहे. हिंदुस्थानांतील सर्व तऱ्हेच्या विचारसंप्रदायांचा गांधारांत प्रवेश होता याची ही कथा द्योतक आहे. प्रस्तुत जैन धर्माची कथा बृहत्कथेंत नवीन समाविष्ट केलेला भाग आहे कीं महावीर-पूर्व जैन धर्माच्या अस्तित्वाची द्योतक आहे याविषयीं निश्चयात्मक मत देतां येत नाहीं. सध्यां एवढें धरूं कीं प्रस्तुत उल्लेख उदयनाच्या प्राचीनत्वाबद्दल म्हणजे बुद्धपूर्व अनेक शतकें तो असावा या विधानाविरुद्ध व त्यास सांगितलेल्या कथांच्या उदयनपूर्वते विरुद्ध पुरावा होऊं शकत नाहीं.

गांधार विद्येबद्दल प्रसिद्ध असल्यामुळें इराणचे देखील विद्यार्थी तेथें जात असणें शक्य आहे; तथापि प्राचीन इराणी वाङ्मयच नष्ट झालें असल्यामुळें त्या तऱ्हेचे उल्लेख आपणांस सध्यां कदाचित् देतां येणार नाहींत.

इराणी आणि भारतीय यांच्या संस्कृतींत मूळचेंच सादृश्य असल्यामुळें व गांधार हें संस्कृत पांडित्याचें केंद्र असल्यामुळें हें सादृश्य पुष्कळच वृद्धिंगत झालें असेल; पण गांधाराची बुद्ध पूर्वकालीन कामगिरी हा आज कल्पनेचाच विषय आहे.

### ९१ कैकेय व भारतीय यांचें सांस्कृतिक ऐक्य.

९१. पारशी लोकांतील एक चाल इतर सर्व लोकांपेक्षां भिन्न आहे आणि ती म्हटली म्हणजे ते आपलीं प्रेतें पुरीत नाहींत किंवा जाळीत नाहींत, तर गिधाडांकडून खाववितात, ही होय, आणि या एका चालीमुळें पारशी लोकांचें भिन्नत्व अजून राहिलें आहे. प्राचीन काळीं देखील या चालीमुळें पारसीकांचा समाज कां भिन्न राहिला नाहीं याविषयीं प्रश्न उत्पन्न होतो. मग ब्राह्मण बनले त्यांनीं आपल्या मृतांच्या और्ध्वदेहिक संस्काराचा त्याग कसा केला ? याविषयीं उत्तर असें देतां येईल कीं, ही चाल पारशी समाजांत सर्वत्र नव्हती. पारशी सम्राटांचीं कबरस्तानें अजून शिल्लक आहेत. प्राचीन पारसीकांत प्रेतें पुरण्याची किंवा त्यांना अग्निसंस्कार करण्याची चाल असावी. पारशांमध्यें प्रेतें जाळीत असावेत याचें एक



चित्रांक २०—घारापुरी लेण्यांतील प्रचंड खोदकाम. श्रीशंकराचें तांडवनृत्य आणि त्याच्या विवाहप्रसंगीं आलेले देव. घारापुरी येथील कलेवर इराणी कलेचा परिणाम झाला अशी शंका उत्पन्न झाली आहे.

धार्मिक स्मारक उरलें आहे. त्यांच्यामध्यें नवीन अग्यारी स्थापन करावयाची म्हणजे क्रव्यादग्नि लागतो. क्रव्यादग्नि ऊर्फ प्रेताग्नि मिळावयाचा तर प्रेतें जाळण्याची चाल असल्या-शिवाय कोठून मिळणार ? उत्तर कालीन हिंदुस्थानचे लेखक 'हा अग्नि झरथुश्त्रीय नसलेल्या लोकांच्या चितेंतून घ्यावा' असें भाष्य करीत आहेत. ‡ कदाचित् प्राचीन परंपरेला धरूनहि असेल. तसें असल्यास इराणांत उत्तरक्रिया हिंदूप्रमाणें करणारा वर्ग होता, असें स्पष्ट होतें.

ज्याप्रमाणें इराणी लोकांत प्रेतदहनहि होतें त्याप्रमाणें प्राचीन भारतीयांत प्रेताचें विसर्जन देखील होतें त्याला पुरावा जातककथेंत येऊन गेला आहे. म्हणजे उत्तरक्रियेचे अनेक प्रकार इराणी लोकांत त्याचप्रमाणें हिंदूंत होते. आजचीच पारशी लोकांतील प्रेतविसर्जनपद्धति प्राचीन इराणांत प्रधान होती असेंहि खात्रीनें म्हणतां येत नाहीं. प्रेतविसर्जनपद्धतीच्या अस्तित्वामुळें पारसीकांत प्राचीनकाळीं आपणांहून फारशी भिन्नता भासत नसली पाहिजे आणि कांहीं इराणी लोकांत जाळण्यापुरण्याच्याहि पद्धति होत्याच. ग्रांथिक देव-धर्मापेक्षां भिन्नप्रकारचा देवधर्म आपल्यांत आहे त्याप्रमाणें इराणी लोकांतहि होता. आपल्याकडे मुरळ्या आहेत त्या प्रमाणें इराणांतहि देवास वाहिलेल्या अविवाहित स्त्रिया होत्या. त्यांना 'कैनिन्' असें म्हणत.* मुरळ्यांप्रमाणें देवास वाहि-लेल्या कैनिन् स्त्रियांनाहि मुलें होत असावींत आणि त्यामुळेंच 'कानिन' शब्द उत्पन्न होऊन तो पुढें भारतीय धर्मशास्त्रीय वाङ्मयांत शिरला असावा. एवंच प्राचीन भारतीय आणि इराणी यांच्यामध्यें समाजसादृश्य मुबलक होतें, यांत शंका नाहीं. आपल्याकडील प्राचीन नाट्याचार्यांत कांहीं पारसीक असावेत अशीहि कल्पना होते. अशी शंका भरतानें उल्लेखिलेल्या नाट्याचार्य कृशाश्व यावरून येते. 'हिस्टास्पिस' हा ग्रीक नामशब्द इराणी मूलशब्द 'विश्तास्प' याचें भाषांतर आहे. त्याचप्रमाणें 'अश्वपति' हा संस्कृत शब्द देखील 'विश्तास्प' याच शब्दाचें भाषांतर असलें पाहिजे असें रा. जयनाथ पति यांनीं (कामा इन्स्टिट्यूट त्रैमासिक) सुचविलें आहे, तें बरोबर असावें. 'अस्प' हा अश्वार्थी शब्द अनेक पारशी व इराणी नांवाच्या अंतिम भागांत येतो. तोंड झांकलेल्या वीरास घोड्यावरून ओळखीत त्यामुळें अश्वार्थी शब्दांनीं युक्त नांवें तयार होणें स्वाभाविक आहे. अश्वयुक्तता हें क्षत्रियत्वाचें लक्षण समजलें जाई. त्याचें स्मारक जो 'शेव्हालिये' शब्द त्याचा फ्रान्समध्यें पदवीसारखा अजून उपयोग होतो, यावरून दिसून येईल. भारतामध्यें देखील 'बृहदश्व' अशा प्रकारचें नांव सांपडतें व तसें नांव सांपडलें म्हणजे शंकास्थान उत्पन्न होतें. भर-ताच्या नाट्यशास्त्रांत 'कृशाश्व' म्हणून एक जुना नाट्याचार्य उल्लेखिलेला आहे. तेथें तो 'कृशाश्व' हा शब्द 'केरशास्प' या पारशी नांवाचें संस्कृतीकरण तर नाहींना, अशी शंका उत्पन्न करिते. कृशाश्व या शब्दाचा उपयोग अग्नीच्या अर्थानें उत्तरकालीन संस्कृत कवींनीं केला आहे (उ. "कृशाश्व-तनया ह्येते कृशाश्वात्कौशिकं गताः" भवभूति–उत्तररामचरित) पण अग्नीचे घोडे कृश होते, याला वेदांत आधार नाहीं. असो. अश्वपति कैकेय याच्याविषयीं आणखी चर्चा रामा-यणपरीक्षणाच्या प्रसंगीं येणारच आहे.

‡ Qisseh-i-Zar tushtan-I-Hindustan, in the Journal of the K. R. A. Cama Oriental Institute No. 9, P. 50 (1931).

* मोदी-इंडियन अँटीक्वरी जुलै १९२३.



**चित्रांक २१—शिवनेरीच्या किल्ल्याच्या दरवाज्याजवळ दिसून येणारी ऐतिहा-सिक स्पष्टीकरण मागणारी आकृति.**

प्रकरण १३ वें.

# आदिपर्वाशीं संगति

## ९१. कुरुयुद्ध आणि बुद्ध यांच्यामधला काळ.

९१. प्रस्तुत ग्रंथाच्या आदिपर्वांत कल्पनेस शक्य अशा प्राचीन काळापासून तों खिस्तपूर्व सातव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत महाराष्ट्राचा आणि त्याच्या अनुषंगानें इतर प्रदेशांचा इतिहास देण्याचा प्रयत्न झाला असल्यामुळें, वेद, पुराणें व महाभारत यांविषयीं अनेक प्रश्न त्याच भागांत आले आहेत; तथापि पुराणांतर्गत कांहीं साहित्याचा प्रस्तुत भागांत देखील उपयोग करून घ्यावयाचा असल्यामुळें आदिपर्वांत सविस्तरपणें सिद्ध केलेल्या ऐतिहासिक वृत्तांचें फलित येथें देणें अवश्य आहे. कुरुयुद्धाच्या काळापासून पुढें जो विकास झाला तो सूत्ररूपानें तरी बुद्धजन्मकालीन राजकीय, दैवतविषयक, वाङ्मयविषयक आणि लोकाचारविषयक स्थितीशीं जोडला पाहिजे. बुद्धपूर्वकालाविषयीं भ्रामक कल्पना पूर्वीच प्रसृत असल्यामुळें आम्हांस दिसत असलेल्या ऐतिहासिक सत्याकडे सारखें बोट आम्हीं दाखवीत राहिलों नाहीं तर आम्ही वाचकांस आपल्याबरोबर नेऊं शकणार नाहीं, व वाचक भलत्याच मार्गानें जाण्याचा संभव आहे.

प्रथमतः महाराष्ट्राच्या कुरुयुद्धकालीन स्थितीचा आढावा घेऊं आणि नंतर ती स्थिति सांगणाऱ्या सूतवाङ्मयाचे संग्रह जे महाभारत व पुराणें त्यांकडे वळूं.

कुरुयुद्धकाळीं, त्याच्या पूर्वी आणि त्यानंतर महाराष्ट्राची स्थिति कशा प्रकारची होती याविषयीं सविस्तर विवेचन आदिपर्वांत सांपडलेंच. येथें विकासपटाचे धागे दाखविले असतां भारतीयुद्धापर्यंत कथासूत्र समजण्यास अवश्य सहाय्य होईल. भारतीयुद्धापर्यंत दृष्टि फेंकण्यास वाचकांस समर्थ केलें पाहिजे. भारतीयुद्धाच्या काळीं, निदान त्याशीं अत्यंत निकट असलेल्या काळांत महाराष्ट्राला निश्चित इतिहास होता ही गोष्ट पुष्कळांस ठाऊक नसावी, असें दिसतें. त्या काळांत महाराष्ट्रांत जंगल असावें, अशीच कल्पना बऱ्याच लोकांना असावी, असें वाटतें; पण त्यावेळेस महाराष्ट्र जंगल नसून वसलेला प्रदेश होता, आणि येथें अनेक राष्ट्रें होतीं हें महाभारत सांगत असलेलें पण दुर्लक्ष झालेलें सत्य दाखविणें आवश्यक आहे.

विदर्भाची प्राचीन संस्कृति कबूल करणारा वर्गदेखील महाराष्ट्राच्या संस्कृतीस अर्वाचीनत्व देऊं पहातो. खरोखर पहातां पश्चिम भाग देखील विदर्भाइतका सुसंस्कृत होता. विदर्भांत भीमक राजा होता आणि त्याचा मुलगा रुक्म हा कृष्णाशीं युद्धांत पराभूत झाल्यानंतर कुंडनपुरास न जातां त्यानें भोजकटनगरी स्थापन केली होती असें पुराणें सांगत आहेत. विदर्भास क्रथकैशिक असेंहि अपरनाम होतें; तथापि भारतीयुद्धाच्या काळांत क्रथदेश आणि कैशिक देश हे कदाचित् भिन्न असतील आणि फक्त कैशिक देश तेवढाच आजच्या वऱ्हाडांत मोडत असावा. क्रथ त्यावेळेस निराळा असावा. त्या देशाचा राजा क्राथ दैवावृध हा सुप्रसिद्ध होता, व भारतांत त्याचा उल्लेख आहे. ऐतरेय ब्राह्मणांत बभ्रु दैवावृध याचा उल्लेख आहे तो याच्याच मुलाचा असावा. जर क्रथ विदर्भांत नसेल आणि भोजकट (इलिचपूर व पूर्णानदी याच्या आसपास कोठें तरी) विदर्भांत होता, त्याअर्थी आजचें वऱ्हाड कैशिकच असून 'क्रथ' हा नागपूर विभाग असावा. दक्षिण महाराष्ट्रांत 'कुंतल' नांवानें प्रसिद्ध असलेलें राष्ट्र त्यावेळीं देखील त्याच किंवा 'कौंतलक' या नांवांनीं प्रसिद्ध होतें. त्या राष्ट्रावर केरल देशचा 'चंद्रहास' नांवाचा परागंदा झालेला एक सहाबोट्या राजपुत्र राजा कसा झाला, आणि तो त्या देशाचा प्रधान धृष्टबुद्धि याचा विरोध असतां कसा झाला, याविषयीं जैमिनीच्या अश्वमेधावरील ग्रंथांत दिलेली कथा आजहि लोकप्रिय आहे; पण चंद्रहास हा दक्षिण महाराष्ट्राचा राजा होता, हें मात्र लोकांस फारसें ठाऊक नाहीं. या चंद्रहासानें भारतीयुद्धांत जरी भाग घेतला नाहीं, तरी पांडवांच्या अश्वमेधाचा घोडा याच्या राज्यांत गेला होता. तथापि हा राजा कृष्णभक्त असल्यामुळें समरप्रसंग उत्पन्न झाला नाहीं.

वऱ्हाडच्या सरहद्दीवर म्हणजे अजंठ्याच्या आसपासचें 'अस्सक' किंवा 'अश्मक' या नांवानें परिचित असलेलें राष्ट्र भारती युद्धाच्या काळांतदेखील होतें. (भीष्मपर्व अध्याय ९.) आणि त्या राष्ट्रानें किंवा त्याच्या राजानें भारतीयुद्धांत भाग घेतला होता, व अभिमन्यूनें या राजाचा वध केला. (द्रोणपर्व अ. ९८.) हें अश्मक राष्ट्र याच नांवानें वाकाटकांच्या कालापर्यंत देखील विश्रुत होतें. एवंच उत्तरकाळीं महाराष्ट्रांतील अंतर्गत राज्यें म्हणून जीं विश्रुत आहेत तीं सर्व भारतीयुद्धाच्या काळीं होतीं, असें महाभारत आपणास सांगूं

पहात आहे. नलराजाचा निषध देश हा देखील महाराष्ट्राचाच भाग होता अशी अनेकांची कल्पना आहे. *

भारतीयुद्धाच्या काळांत महाराष्ट्रांत क्रथ, विदर्भ ऊर्फ कैशिक, कुंतल आणि अश्मक अशीं चार राज्यें होतीं हें मागें सांगितलेंच आहे. नंदकाळीं शातवाहनाचें अस्तित्व होतें असें धरलें तर शातवाहनकाल ख्रिस्तपूर्व ३५० पर्यंत जाईल, आणि दीपकर्णींचा काल त्याच्याहि अगोदर जाईल. तरीदेखील दक्षिणच्या प्राचीन इतिहासाच्या ज्ञानांत बरेंच मोठें खिंडार भरून काढावयाचें आहे. आणि तें भरून काढण्यास कथासरित्सागरांतील उल्लेख कितपत मदत करीत आहेत हें पाहूं.

आपणांस खिंडार भरून काढावयाचें तें सुमारें एक हजार वर्षांचें आहे. मागें आलेल्या सर्व दाक्षिणात्य राजकथा बुद्धपूर्वकालींच प्रथम सांगितल्या गेल्या आहेत. त्या कथा कोणत्या भागाचा इतिहास देत आहेत याविषयीं विचार करतां आपणांस त्या बुद्धपूर्वकालीन धरण्यास हरकत नाहीं असें वाटतें. एक हजार वर्षांत एका राज्याच्या निदान चाळीस ते साठ शास्त्या पुरुषांचीं नांवें उपलब्ध हवींत. व चार राज्यें धरलीं तर दीड दोनशें राजनामें उपलब्ध हवींत. तथापि तीं उपलब्ध नाहींत, एवढेंच नव्हे तर वर उल्लेखलेल्या महाभारतकालीन देशांच्या नांवांपैकीं अनेकांचा पत्ता नाहीं. प्रतिष्ठानच्या राजांच्या अनेक कथा येथें आल्या आहेत व दक्षिणापथाच्या राजांच्याहि कथा आल्या आहेत. दक्षिणापथ म्हणजे प्रतिष्ठान असें नेहमीं म्हणतां येणार नाहीं. जर विदर्भेतर महाराष्ट्र व कर्नाटकाचा कांहीं भाग एखाद्या राजाच्या सत्तेखालीं आला, तरच त्याला दक्षिणापथाचा राजा असें नांव घेतां येईल. एरव्हीं घेतां येणार नाहीं. बृहत्कथेसारख्या ग्रंथांत उल्लेख त्याप्रमाणेंच अनुल्लेख देखील इतिहासदर्शक आहेत. विस्मयकारक अनुल्लेख विदर्भ आणि अश्मक यांच्या संबंधाचा होय. यांच्या कथा बृहत्कथेंत कां नाहींत यास समर्पक उत्तर हवें आहे. अश्मकांचा उल्लेख बौद्ध व बुद्धोत्तर संस्कृत वाङ्मयांत येत आहे, त्याअर्थीं विदर्भ आणि अश्मक यांचा स्वतंत्र राज्यें या दृष्टीनें या मधल्या काळांत लोप झाला असावा, आणि प्रतिष्ठान किंवा त्यांतील राजधानी सुप्रतिष्ठ आणि नागपूर याच त्या वेळच्या महाराष्ट्राच्या राजधान्या असाव्यात असें वाटतें.

महाभारत हा मोठी चळवळ दाखविणारा ग्रंथ आहे आणि त्यापासून महाराष्ट्राचें चित्र मिळतें तें स्तब्ध स्थिति दाखवीत नाहीं तर त्यावेळच्या चालू क्रिया दाखविणारें आहे, आणि त्यामुळें त्यावेळचें महाराष्ट्राचें केवळ स्तब्ध चित्र आपल्या हातीं लागलें नसून चलचित्र लागलें आहे.

महाभारताच्या काळीं महाराष्ट्र देशांत निरनिराळ्या राजांची आपल्या राज्यसीमा वाढविण्याची खटपट होती काय ? अगर शेजारच्या राष्ट्रांची महाराष्ट्राचें भक्षण करण्याची खटपट होती ? या प्रश्नावर प्रकाश पाडणारे उल्लेख शिल्लक आहेत. त्यावरून असें दिसतें कीं मगध आणि महाराष्ट्र यांची स्पर्धा उत्तरकाळीं दिसली ती भारतकालीं देखील होती. मगधानें विदर्भांवर आक्रमण केलें होतें व विदर्भराज भीष्मक यास जरासंधाचे भक्त म्हणजे मांडलिक बनावें लागलें होतें.

**चतुर्थभाङ्महाराजो भोज इंद्रसखो बली**
**विद्याबलाद् यो व्यजयत् सपांड्यक्रथकैशिकान्**
**भ्राता यस्याकृतिः शूरो जामदग्न्यसमोऽभवत्**
**स भक्तो मागधं राजा भीष्मकः परवीरहा.**

सभापर्व, अ० १४. २१–२२

येथें मगधराजानें क्रथकैशिकांना जिंकलें म्हणून सांगितलें आहे. वऱ्हाडच्या स्वतंत्र अस्तित्वाची येणेंप्रमाणें समाप्ति होऊन पुढें तें कांहीं दिवस मगधराज्याचा भाग, तर कांहीं दिवस अश्मकांच्या राज्याचा भाग आणि पुढें त्याचा शातकर्णींच्या राज्यांत समावेश, अशी वऱ्हाडची परिस्थिति असावी असें दिसतें. कांहीं दिवस वृष्णि आणि अंधक यांचीं देखील स्वतंत्र राज्यें असावींत, आणि त्यामुळें विदर्भासच अंधकराष्ट्र समजत असावेत. अंध हेंच प्राचीन रूप असून त्याचींच अंधक व आंध्र हीं रूपें झालीं काय अशी शंका येते. पाइनगंगा आणि वर्धा यांच्या खोऱ्यांत आंध म्हणून एक जात आहे तीच या राष्ट्राची आजची प्रतिनिधि असावी.

अश्मकांचें अस्तित्व मात्र कुरुयुद्धाच्या कालापासून एकसारखें आहे. त्यांचें स्वतंत्र राज्य या नात्यानें अस्तित्व तात्पुरतें उदयनकालीं नष्ट झालें होतें काय असा प्रश्न उत्पन्न होतो. कारण त्यांचा उल्लेख कथासरित्सागरांत आढळत नाहीं. अश्मकांचे पंचवीस राजे नंदपूर्वकालींच झाले अशी साक्ष मत्स्यपुराण पुढील ओळींत देत आहे.

**कलिंगाश्चैव द्वात्रिंशत् अश्मकाः पंचविंशतिः**

नवनंदांपूर्वी अश्मकराजे २५ होऊन गेले, व दर राजास २५ वर्षें याप्रमाणें नंदागमकालापूर्वी सहाशें पंचवीस वर्षें वजा केलीं पाहिजेत, म्हणजे अश्मक राज्याच्या प्रारंभाचा काळ येतो. नंदांनीं जेव्हां मगधराज्य ताब्यांत घेतलें व पुढें इतर राज्यें ताब्यांत घेतलीं आणि सर्व क्षत्रिय वंश नाहींसे केले, तेव्हां अश्मक वंशदेखील नाहींसा झाला.

* उदाहरणार्थ जयस्वाल यांची JBO मार्च १९३३, पृष्ठ १२८ पहा.

या अश्मक वंशाच्या ताब्यांत कांहीं दिवस तरी विदर्भाचें राज्य होतें. अश्मकराष्ट्रावर आज वाङ्मय फार थोडें सांपडलें आहे, तथापि पुढें मागें अधिक वाङ्मय सांपडण्याचा संभव आहे.

अश्मक वंशावर एक संस्कृतमध्यें काव्य होतें आणि तें भामहाच्या कालांत वैदर्भी रीतीचें दर्शक म्हणून सुप्रसिद्ध झालें होतें. हें काव्य जर उपलब्ध होईल तर महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर आणखी प्रकाश पडेल.*

भगवानलाल इंद्रजी अश्मक हाच खानदेश समजत.† एका काळीं अश्मक हा खानदेश असेलहि, पण कोणत्या जातीच्या नांवामुळें हें देशनाम उत्पन्न झालें हें समजल्याशिवाय देशनामाचें खरें स्पष्टीकरण झालेंसें म्हणतां येणार नाहीं. डॉ. अय्यंगार अश्मक हे यादव होते असें समजतात.‡

महाराष्ट्राच्या वरील दिलेल्या माहितीवर विश्वास आपण कां आणि कोणत्या मर्यादेंत ठेवावा, हें समजण्यासाठीं महाभारतरचना ही ज्या वाङ्मयविकासाचा भाग होती, त्या वाङ्मयविकासाच्या इतिहासाकडे लक्ष देणें जरूर होतें. तो असें दाखवील कीं महाभारतांतील मुख्य भाग, म्हणजे जवळ जवळ पूर्ण ग्रंथ भारती युद्धानंतर थोडक्याच पिढ्यांनीं तयार झाला होता.

वेदविद्यासंकलन, भारतरचना आणि पुराणकथासंग्रहण, या सर्व क्रिया एकाच वाङ्मयविषयक चळवळीचा भाग होत. एवढेंच नव्हे, तर 'कृष्णद्वैपायन' या एका व्यक्तीच्या नेतृत्वाखालीं हा प्रयत्न प्रेरित झाला असल्यामुळें त्यांचा विकास एकमेकांशीं प्रथम संबद्ध होता व त्याप्रमाणें तो पुढें बराच काळ राहिला होता, यांत शंका नाहीं. पुराणसंग्रहणाची क्रिया कृष्णद्वैपायनकालीं सुरू झाली ती अधिसीमकृष्णाच्या काळापर्यंत चालू राहिली, असें पुढें दाखविलें आहे. भारतीयुद्धाच्या काळीं ज्या गोष्टी घडल्या असें दाखविलें आहे, त्या भारतीयुद्धाच्या प्रसंगीं असतीलच असें नाहीं; तथापि ज्या काळांत सर्व ठिकाणच्या कथांचा महाभारतांत अंतर्भाव करण्याची क्रिया झाली, त्यावेळेस महाभारतांत संग्रहित केलेल्या कथा प्रचलित होत्या, आणि त्यांत चंद्रहासाची कथा प्रचलित होती व क्राथ, देवावृध आणि अश्मकराष्ट्र यांचीं नांवें विश्रुत होतीं, यांत शंका नाहीं. पौराणिक कथांचें संग्रहण, संपादन आणि भारताचें संपादन–संवर्धन या क्रिया एकाच बौद्धिक युगांतल्या आहेत, या दोन्ही क्रिया एकाच वर्गामार्फत चालल्या असाव्यात. नवकथासंग्रहणस्वरूपी संस्कार पुराणावर ज्या ज्या काळीं झाले त्या त्या काळीं सदृश संस्कार महाभारतावरहि झाले असले पाहिजेत. किंबहुना वेदव्यासांच्या काळांत ज्या संकल्पास सुरवात झाली ते संकल्प अधिसीमकृष्णाच्या काळांत संपूर्ण झाले असले पाहिजेत, असें धरल्यास वावगें होणार नाहीं.

अधिसीमकृष्ण हा सध्या राज्य करीत आहे, असें पुराणें म्हणत आहेत तर त्याच वेळेस बहुतेक जुना कथाभाग एकत्र करण्याची क्रिया पुरी झाली असेल.

अधिसीमकृष्णानंतरचे झालेले फेरफार निराळ्याच स्वरूपाचे दिसतात. ते मुख्यतः राष्ट्रीय बनलेल्या ग्रंथांत आपल्या इष्ट देवतेस अगर इष्ट संप्रदायास स्थान देण्यासाठींच दिसतात.

मोठमोठ्या राजकुलांच्या याद्यांचा पुराणांत समावेश भविष्यरूपानें केला आहे आणि नवीन इतिहास कोणता आणि जुना कोणता यांची जाणीव नवीन संपादकांनीं दाखविलेली आहे, त्याअर्थी चंद्रहासाची कथा अधिसीमकृष्णाच्या काळीं 'जुनी कथा' या नात्यानें अस्तित्वांत होती, यांत शंका नाहीं.

## ९२. कुरुयुद्धकाळीं झालेली बौद्धिक चळवळ व तिच्या अवगमनाचें ऐतिहासिकांस महत्व.

९२. ऐतिहासिक साहित्य एकत्रित करण्याची परंपरा वेदव्यासाच्या कालापासून अधिसीमकृष्णाच्या कालापर्यंत अव्याहत चालू असावी. ती ऐतिहासिक कथा एकत्र करणारांची वृत्ति एका मोठ्या वाङ्मयविषयक आणि सामाजिक खटाटोपाचा भाग होती, यासाठीं त्या खटाटोपाचें स्वरूप समजून घेणें आपणांस अवश्य आहे.

इतिहासाचें लेखन करणारास आपल्या पूर्वींच्या इतिहासकारांच्या परिश्रमाकडे त्याचें लेखनशास्त्र जाणण्याचें दृष्टीनें पहावेंच लागतें. पूर्वींच्या लेखकाचें लेखन कोणत्या साधनांच्या मर्यादांनीं नियमित झालें आहे, कोणत्या चुकीच्या कल्पना त्यानें गृहीत धरल्या आहेत, कोणत्या पूर्वग्रहांवर त्यानें निर्णय काढले आहेत, हा विचार उत्तरकालीन अभ्यासकास अवश्य आहे. तसेंच जुना ग्रंथकार जी माहिती देत आहे ती प्रत्यक्षानुभवाचें सत्य आहे कीं अनुमान आहे, अनुमान असल्यास त्या अनुमानास कारण झालेलें अनुभूत सत्य काय, इत्यादि प्रश्न विचारून पूर्वींच्या इतिहासाचा अभ्यास उत्तरकालीन लेखकास अवश्य आहे. या सावधगिऱ्या सर्वच प्राचीन लेखांसंबंधानें आपणांस बाळगल्या पाहिजेत; पण पौराणिक साहित्याचा म्हणजे पुराणांचा त्याचप्रमाणें भारतादि ग्रंथांचा इतिहासासाठीं

---

* 'ननु चाश्मकवंशादि वैदर्भमिति कथ्यते। कामं तथास्तु प्रायेण संज्ञेच्छातो विधीयते' भामह.

† इं. अँ., व्हा. १०, पृ. ९८–९९.

‡ दुसरी ओरि. कान्फ. अहवाल.

उपयोग करूं इच्छिणारांना प्राचीनांची काव्यलेखनविद्या आणि इतिहाससंरक्षणविद्या या दोन्ही अवगत करून घेतल्या पाहिजेत. त्या विद्यांचें ज्ञान आज तयार नाहीं; तेंहि संशोधन करूनच मिळविलें पाहिजे. पुराणावरून इतिहास काढण्याची क्रिया करीत असतां पौराणिकांची इतिहाससंरक्षणविद्या समजून घ्यावयाची, आणि त्या विद्येंतील कांहीं भाग समजल्यानंतर तें ज्ञान ग्रंथांतील माहितीच्या अर्थशोधनाकडे पुन्हां लावावयाचें, याप्रकारचे परिश्रम अवश्य होतात. पौराणिकांना कोणत्या तऱ्हेचें साहित्य हातीं लागलें असलें पाहिजे आणि तें साहित्य हातीं लागल्यानंतर तें त्यांनीं इतिहासलेखनासाठीं उपयोगितांना कांहीं चुका केल्या होत्या काय, हाहि विचार उपयोगिणाऱ्यानें केला पाहिजे.

याशिवाय आणखी एक गोष्ट प्राचीन संस्कृत ग्रंथांच्या अभ्यासकांस पाहिजे आणि ती म्हटली म्हणजे वाङ्मयक्षेत्रांत कार्यकर्त्यांच्या संकल्पांचें ज्ञान होय. व्यास वाल्मीकि कोणत्या हेतूंनीं प्रेरित झाले होते, त्याची चौकशी आजच्या संशोधकास अवश्य आहे. जी परंपरा द्वैपायनांच्या काळापासून सुरू झाली, ती कोणता वाङ्मयसंकल्प पार पाडण्यासाठीं तयार झाली, याचा विचार हवा. थोर संग्रह करण्याचा संकल्प श्री द्वैपायनांनीं केला होता, त्यांत त्यांचे काय हेतु होते हें जाणलें पाहिजे; तसें न केल्यास पौराणिक वाङ्मयाचा सुबुद्ध उपयोग आपणांस करून घेतां येणार नाहीं.

## ९३. कृष्णद्वैपायनांचा संकल्प.

९३. पुराणांचा इतिहासासाठीं उपयोग करून घेतांना श्रुति, स्मृति, इतिहास व पुराणें यांच्या वाङ्मयविकासाचीं सामाजिक कारणें लक्षांत घेणें अवश्य आहे. द्वैपायन व्यासाच्या संकल्पास प्रेरक देखील सामाजिकच कारण होतें.

भिन्न भिन्न पैतृक वाङ्मयाच्या अभिमानानें व पितृमूलक उपासनांनीं बद्ध अशा सर्व प्रकारच्या लोकांचें एकीकरण होऊन सामान्य धर्म तयार होण्याची क्रिया घडविण्याला सुरवात अत्यंत प्राचीनकाळीं झालेली दिसत आहे.

वैदिक समाज, स्मृतींचा उपयोग करणारे समाज आणि पुराणें ज्यांचें वाङ्मय होतें ते समाज मूळचे भिन्न असतां एक कसे झाले, आणि त्यांपैकीं प्रत्येक समाजांत व त्याच्या वाङ्मयांत एकत्रीकरण कसें झालें, हा सर्व इतिहास सविस्तर या ग्रंथांत अन्यत्र आहेच. येथें एवढेंच पुरे आहे कीं, सामाजिक विकास आणि वाङ्मयविकास या गोष्टी बरोबरच झाल्या आणि अन्योन्याश्रयी होत्या. समाजवृद्धि आणि वाङ्मयविकास यांचा अन्योन्याश्रय श्रौतवाङ्मय, स्मार्तवाङ्मय, पौराणिक वाङ्मय आणि इतिहासवाङ्मय या सर्वांच्या इतिहासांत दाखवितां येईल. या सर्व वाङ्मयांच्या विकासांत द्वैपायन मुनींचा हात असावा. वेद, महाभारत व पुराणें यांत त्यांचा हात प्राधान्यानें होता, ही गोष्ट परंपरा सांगतच आहे; पण स्मार्तवाङ्मयाच्या विकासांत देखील त्यांचे आद्य प्रयत्न झाले असणें शक्य आहे. व्यासांची महाभारतीय, श्रौत व पौराणिक वाङ्मयासंबंधानें म्हणजे धार्मिक क्रियांसंबंधानें आणि वाङ्मयासंबंधानें कामगिरी लक्षांत घेतली म्हणजे महाभारतांत व पुराणांत संग्रहित केलेल्या साहित्याचें यथार्थ स्वरूप लक्षांत येईल, एरव्हीं येणार नाहीं.

हिंदुस्थानच्या वाङ्मयांतच काय तर जगाच्या वाङ्मयांत अत्यंत थोर अशी व्यक्ति म्हटली म्हणजे **कृष्ण द्वैपायन व्यास** हीच होय. यापेक्षां थोर व्यक्ति सांपडणें शक्य नाहीं; एवढेंच नव्हे, तर यांशीं तुल्य अशी व्यक्ति देखील सांपडावयाची नाहीं. होमर आणि वाल्मीकि या व्यक्ति कदाचित् तुल्य होऊं शकतील, पण त्यांमध्यें आणि व्यासामध्यें महदंतर आहे. वाल्मीकीनें एक सुंदर काव्य करून एका राजघराण्यांतील एका पुरुषास देवतुल्य केलें; हीच कामगिरी वाल्मीकीच्या नांवावर घालतां येण्याजोगी आहे. ती कामगिरी लहान नाहीं. सर्व भारतास अत्यंत आकर्षक आणि त्यावर अत्यंत परिणाम करील असें एक वीरचरित्र वाल्मीकीनें निर्माण केलें, आणि त्या दृष्टीनें होमरपेक्षां वाल्मीकीची योग्यता मोठी आहे. होमर मृतकल्प आहे, पण वाल्मीकि जिवंत आहे; तथापि या वाल्मीकीचें कार्यदेखील कृष्णद्वैपायनाच्या कार्यापेक्षां लहान आहे. कृष्णद्वैपायन व्यासाच्या खात्यावर वाङ्मयविषयक किंवा सामाजिक कामगिरी फारच मोठी पडते. वाङ्मयामार्फत जगाचें एकीकरण घडवावें या तऱ्हेची कल्पना मनांत आणून तिचा उठाव करणारा पुरुष जगांत याशिवाय दुसरा झालाच नाहीं.

## ९४. कृष्णद्वैपायनांचें हेतुगुरुत्व.

९४. प्रत्येक गोष्ट सहेतुक उत्पन्न होते, त्याप्रमाणेंच वाङ्मय देखील सहेतुकच उत्पन्न होतें. वाङ्मयाच्या उत्पादनास कारण होणाऱ्या हेतूंमध्यें व्यासाचे हेतु अत्यंत श्रेष्ठ होते. सामान्य कथावाङ्मय किंवा काव्यवाङ्मय लोकरंजनार्थ उत्पन्न होतें. तात्कालिक लोकांचें रंजन करून आपला उदरनिर्वाह करावा किंवा विशिष्ट राजाच्या आश्रयानें जें करतां येईल तें करावें, या प्रकारची प्रवृत्ति सामान्यांत स्वाभाविक आहे. त्या प्रवृत्तीनें जें वाङ्मय निर्माण होतें तें कधींच उच्च दर्जाचें होत नाहीं. विशिष्ट संप्रदायाचा प्रसार करण्याच्या हेतूनें जें वाङ्मय उत्पन्न होतें तें देखील हेतुदृष्टीनें दुय्यम

प्रकारचेंच वाङ्मय होय. येथें दातावर्ग त्या संप्रदायाच्या अभिमान्यांपैकीं असतो आणि त्यामुळें त्याप्रकारचें वाङ्मय शक्य होतें; तथापि विशिष्टराजाश्रयनिरपेक्ष आणि विशिष्ट-संप्रदायनिरपेक्ष, आणि सर्वच संस्कृतींकडे ममतेनें पाहून, सर्व जगाच्या हिताचा हेतु मनांत धरून, जगांतील सर्व संस्कृतींचें ऐक्य साधण्यासाठीं प्रयत्न करण्यास अधिक व्यापक बुद्धीचा मनुष्य आवश्यक आहे. अशा प्रकारचा हेतु धारण करणाऱ्या मनुष्यास आपल्या कार्यसिद्धीसाठीं सर्वच वाङ्मयांचें संग्रहण, त्यांत परस्परसंगतीची साधना इत्यादि क्रिया आवश्यक होतात. ह्या क्रिया करण्याचें ज्यानें अंगावर घेतलें असा पुरुष जगाच्या सांस्कृतिक इतिहासांत आजपर्यंत एकच झाला आहे, आणि तो कृष्णद्वैपायनच होय ही गोष्ट लोकांस पटेपर्यंत पुनरुक्तीनें सांगण्याजोगी आहे. बुद्ध, ख्रिस्त, महंमद इत्यादि संप्रदायस्थापक व्यक्ति होऊन गेल्या आहेत, त्या एकमेकांशीं तुल्य असतील; पण कृष्णद्वैपायन ही अतुल्य व्यक्ति होय. चार वेद हे भिन्न संप्रदाय होते. ऋग्वेद हा पंजाबांतील सोमयाजींचा संप्रदाय होता; यजुर्वेद हा दक्षिणेकडील पशुयाग करणारांचा संप्रदाय होता; सामवेद हा अत्यंत प्राचीन सत्रसंस्था चालविणारांचा संप्रदाय होता आणि अथर्ववेद हा मगधांतील प्राचीन मगांच्या परंपरेचा विकास होय, असें शोधाअंतीं दिसून येईल. या विषयींची आमची मांडणी आदिपर्वांत सांपडेल. याशिवाय मगांविषयीं विशेष विधान पुढें केलें आहे. या भिन्न लोकांचे यजनसंप्रदाय एक करून सर्वसामान्य धर्म निर्माण करणें ही क्रिया वेदव्यासांनीं केली आणि त्या क्रियेचें फल आजची वेदचतुष्टयीची रचना हें होय. या रचनेमुळें प्रत्येक वेद भिन्नधर्म न रहातां एकाच मोठ्या समवायधर्माचें अंग बनला. हें कार्य करण्याकरितां व्यासांनीं जी मोठी संस्था स्थापन केली तीमुळेंच त्यांना 'कुलपति' ही पदवी प्राप्त झाली. सर्व ठिकाणच्या लोकांचें संग्रहण त्यांच्या विद्येचें संग्रहण केल्यानें होतें, आणि संप्रदायभिन्नतेमुळें होणारा विरोध देखील या संग्राहक कृतीनें काढून टाकतां येतो, हें समाजशास्त्रीय तत्त्व व्यासांनीं जाणलें आणि आपल्या थोर कार्याची उभारणी केली. एकीकृत विद्येचा प्रसार पुन्हां निराळ्या तऱ्हेनें वेदव्यासांनीं केला. वेदव्यासांना असेंहि दिसून आलें कीं, अग्नीमार्फत यजन करण्याचा धर्म जरी सुव्यवस्थित धंदा करणाऱ्या याजकांचे हातीं आहे, तरी सामान्य लोकांत त्या धर्माचा प्रचार नाहीं. सामान्य लोकांचा धर्म निराळाच आहे. सामान्य जनतेस मान्य अशीं निरनिराळीं स्थानिक देवतें आहेत, तीर्थस्थानें आहेत, पवित्र झालेले प्रदेश आहेत; वीरकथा आणि राक्षसमर्दनाच्या कथा जागोजाग आहेत; शिव, विष्णु, देवी या तीन देवतांच्या उपासना चोहोंकडे आहेत; व या सर्व गोष्टींस सहायक होईल असें प्राचीन वाङ्मय सूतवर्गानें बरेंचसें संरक्षून ठेवलें आहे. अशा परिस्थितींत केवळ हवींस अग्नींत अर्पण करणाऱ्या लोकांच्या धर्मकर्माच्या एकीकरणानें जनतेचें ऐक्य घडविण्याचा कार्यभाग होणार नाहीं, तर सामान्य लोकांचे उपासनासंप्रदाय देखील एकत्रित केले पाहिजेत, आणि त्यांचें वाङ्मयहि एकत्रित झालें पाहिजे. या दृष्टीमुळें वेदव्यासांनीं चोहोंकडच्या साहित्याचें एकीकरण करण्यास सुरवात केली. त्यांनीं ज्या कार्यास सुरवात केली तें कार्य अनेक अनुयायांमार्फत पुढें वृद्धिंगत झालें; आणि त्यामुळें 'सर्व पुराणांचे आद्यकर्ते' अशी त्यांची प्रसिद्धि झाली. इतिहासपुराणें हीं वैदिक वाङ्मयाइतकींच जुनीं आहेत यास खुद्द वेदांतील उल्लेखांचा आधार आहे

## ९५. व्यासकार्याच्या अनुषंगानें झालेलें भाषाविषयक कार्य.

९५. व्यासांच्या कार्याचें महत्त्व भाषेच्या दृष्टीनें देखील आहे. सर्वोपयोगी गीर्वाण भाषेमध्यें अस्तित्वांत असलेल्या कर्मकांडाचें व ज्ञानाचें अवतरण करण्याचा प्रयत्न करणें, एका भाषेंत विविध संप्रदायांचें वाङ्मय आणणें, ही गोष्ट घडवून आणण्यासाठीं दूरदर्शी व्यासांनीं अत्यंत मोठा प्रयत्न केला व पुढें हा प्रयत्न विविध लोकांच्या ऐक्याचा साधक झाला. 'ज्ञान' हें जर एकच असणार, आणि आपण आचरित असलेला धर्म जर ज्ञानमूलक म्हणजे सत्यमूलक आहे, असा सर्व धार्मिक संप्रदायांचा बाणा आहे तर संप्रदायाभिमानामुळें उत्पन्न होणारे कलह संप्रदायांच्याच एकीकरणामुळें काढून टाकणें शक्य आहे, ही कल्पना धरून सर्व वाङ्मयाचें आणि सर्व कर्माचें व संप्रदायांचें एकीकरण करण्याचें श्रेय श्रीवेदव्यासांनीं घेतलें. त्यांनीं जो संप्रदाय स्थापन केला तो ज्ञानसंग्रहणाचा त्याचप्रमाणें कर्मसंग्रहणाचा होय. ह्यासाठीं त्यांनीं जो प्रयत्न केला तो वाङ्मयाच्या आणि शिक्षणाच्या इतिहासांत स्थित्यंतर घडविणारा झाला.

हीं संग्रहणें जेव्हां झालीं, तेव्हां परस्परांतील विरोधभावना देखील मावळत गेली, आणि ती मावळत गेल्याबरोबर पूर्वीचें संग्रहणाचें काम अनावश्यक होऊन त्या व्यासांनीं स्थापन केलेल्या संघास राजाश्रय किंवा लोकाश्रय कमी कमी होत गेला असला पाहिजे. अधिसीमकृष्णाच्या काळांत वाङ्मयसंग्रहण पुरें झालें होतें, आणि वेदांच्या देखील अनेक भिन्न शाखा पडल्या होत्या. त्या काळापासून पौराणिकधर्म आणि वैदिक धर्म यांचे आचार्य मिळून कायम शिक्षणसंस्था अस्तित्वांत नसावी.

निरनिराळ्या तीर्थ क्षेत्रांमध्यें पौराणिकांची चलती होतीच; तेथें कांहीं वेदाभ्यासी लोकांचा गुजारा चालत असावा एवढेंच.

वैदिक धर्म आणि पौराणिक धर्म हे भिन्नस्थानमूलक आणि भिन्न लोकांचे धर्म असल्यामुळें जरी एकमेकांनीं एकमेकांस शाब्दिक आत्मीयत्व दाखविलें तरी भिन्नस्थलमूलकतेचीं दर्शकें आणि त्यामुळें होणारी असंगति ग्रंथांत जशीच्या तशीच राहिली असें दिसतें. निरनिराळ्या ठिकाणचीं क्षेत्रें आपापलें महत्त्व सांगत असतां धर्मशास्त्राचे ग्रंथ अनेक देशांस अस्पृश्य ठरवितच होते. बौधायन सूत्रांमध्यें अंग, वंग, कलिंग हे देश जर अपवित्र ठरविले आहेत तर पौराणिकांनीं पांडवांच्या दिग्विजयाचा वृत्तांत आणि अर्जुनाच्या तीर्थाटनाचा वृत्तांत महाभारतांत व पुराणांत घालून अखिल भारतीय स्थलांचा पुरस्कार केला आहे. वैदिकांचे महत्त्वाचे देश म्हटले म्हणजे पंजाब, गांधार व मद्र, पण पौराणिकांनीं जर शिंतोडे कोणावर उडविले असतील तर ते त्यांच्यावरच उडविले आहेत. शल्यकर्णसंवादांतील आरट्ट आणि वाहिक यांच्याविषयीं अंगराजानें केलेली टीका मासलेवाईक आहे, ती त्याच प्रदेशांसंबंधीं आहे.

पौराणिकांनीं पंजाबांत कोणतेंहि स्थान यात्रेस योग्य असें केलें नाहीं. पौराणिकांची वायव्य हद्द म्हणजे हरिद्वारच दिसते. काश्मीरांत मात्र कांहीं स्थलांचें पवित्रीकरण पौराणिकांनीं केलें आहे. आज पुन्हां पंजाबांत वैदिकधर्माचा प्रचार स्वामी दयानंद करूं शकले, याचें कारण तेथें त्यांस विरोध करण्यास पौराणिकांचा वर्गच नव्हता हें होय. पौराणिक धर्म आणि वैदिक धर्म यांचें क्षेत्रभिन्नत्व प्राचीन काळीं होतें तें आजहि राहिलें आहे.

## ९६. अधिसीमकृष्णाच्या कालापासून शतानीकाच्या कालापर्यंत.

९६. अधिसीमकृष्णाच्या कालापर्यंत जुनें सर्व साहित्य आग्रहानें गोळा करून महाभारतांत व पुराणांत घालण्याची चळवळ पुरी झाली व त्यानंतर नवीन वाङ्मयाचें संग्रहण स्वाभाविकपणें म्हणजे वाङ्मयात्मक चळवळीचें ध्येय जें जनतेच्या परंपरेचें एकीकरण तें साध्य झाल्याकारणानें मंदावलें. पुराणें लखोटबंद झाल्यासारखीं कांहीं काळ राहिलीं, तथापि वाङ्मय ज्या कारणांनीं उत्पन्न होतें तेव्हां तीं कारणें नष्ट कशीं होणार ? तीं कारणें कार्य करीतच होतीं, व कांहीं वाङ्मय देखील उत्पन्न होत होतें. पण तें पुराणांत घालण्याची क्रिया झाली नसावी.

पुराणांचा हेतु सूतविद्यासंवर्धन हा नव्हता, तर सूतविद्येचें साहाय्य घेऊन धार्मिक क्रियांचें एकीकरण हा होता. अनेक स्थलांचें पवित्रीकरण करण्यास वीरकथा अत्यंत उपयोगी होत हें वेदव्यासांनीं जाणलें. सूतांचें साहित्य तें व्यवस्थितपणें ग्रथन करणाऱ्या संस्कृत पंडितांच्या हातीं गेलेंच होतें तें साहित्य पुढें पौराणिक धर्माच्या विकासासाठीं लागल्यामुळें पुराणें पुढें सूतविद्येचा संग्रह न करतां तीर्थोपाध्यायांच्या पाशांतच अडकलीं.

पौराणिकांच्या अनेक तीर्थपावित्र्यसाधक खटपटींमध्यें उत्तरकालीन पांडववंशीय राजांचीं नांवें येतात. उदाहरणार्थः– गोकर्णमहात्म्यांत गोकर्णाचें महत्त्व स्थापन करण्यासाठीं ज्या कथा दिल्या आहेत, त्या कथांचा श्रोता शतानीक हा दिलेला आहे.* शतानीकाचा उल्लेख महत्त्वाचा आहे. त्याच्या कालांत अनेक स्थलांचें पवित्रीकरण करण्याची खटपट सुरू असून पौराणिक वाङ्मयवृद्धीस राजकथानिवेदनाऐवजीं केवळ तीर्थोपाध्यायांच्या खटपटीच कारणीभूत झाल्या होत्या असें दिसतें. पद्मपुराण अशाच मजकुरानें भरलें आहे.

भारती युद्धाच्या काळीं आणि त्यानंतर नजीकच्या काळांत जें सूतवाङ्मय होतें तें एकत्रित होऊन इतिहास–पुराणें झालीं ही गोष्ट जरी लोकांस पटली तरी त्या एकीकृत झालेल्या संस्कृत वाङ्मयाचें सातत्य चालविण्याचा हक्क किंवा अधिकार तीर्थोपाध्यायांच्या हातीं कसा आला याचें स्पष्टीकरण वाचकांस हवें. सूतवाङ्मय जर कुरुयुद्धकालीं होतें तर कुरुयुद्धकालापासून ख्रिस्तकालापर्यंत हा सूतांचा वर्ग कोठें गेला ? आणि त्यांनीं तयार केलेलें वाङ्मय कोठें गेलें ? तो वर्गच अस्तित्वांत नव्हता असें म्हणतां येत नाहीं. कां कीं त्या वर्गाचें सातत्य अजूनपर्यंत देखील आहे; प्रश्नाला उत्तर असें आहे कीं कुरुयुद्धकालीं जसा संग्राहकवर्ग सूतांस भेटला तसा उत्तरकालीं भेटला नाहीं. व्यासांनीं सर्व प्रकारच्या वाङ्मयाचें संग्रहण केलें. त्यांतील कांहीं वाङ्मयें राजाश्रयी होतीं, तर कांहीं लोकाश्रयी होतीं. राजकुलांच्या आश्रयानें वाढलेलें सूतवाङ्मय, तें एकत्रित करावें, लोकांमध्यें प्रचलित असलेल्या उपासनापद्धतींचें वाङ्मय त्यास जोडावें, आणि त्याबरोबरच तीर्थोपाध्यायांच्या कथा वीरपुरुषांच्या कथांशीं जोडाव्या हा एक व्यासकालीन खटाटोप झाल्यानंतर पुन्हां तसा खटाटोप झाला नाहीं. सर्व प्रकारच्या उपासनांच्या एकीकरणाची आणि सर्व प्रकारच्या वाङ्मयाच्या संरक्षणाची

---

* गोकर्णमहात्म्यसार मकरंद छापखाना, दादर, मुंबई (१९३२) पहा.

पौराणिक धर्माच्या उत्कर्षाच्या दीर्घकालांतील स्मारकें.



चित्रांक २२—पांडव लेणीं पुणें भांबुर्डा येथील. अशा तऱ्हेचा मंडप दुसरे कोठेंहि नसल्यामुळें काळ काढतां येत नाहीं.



चित्रांक २३—घारापुरी येथील त्रैमूर्तीशीर्ष



चित्रांक २४—घारापुरी येथील पौराणिक चित्र असलेला देखावा

बुद्धि ज्याप्रमाणें वेदव्यासांत होती त्याप्रमाणें उत्तरकालीन लोकांत नव्हती. व्यास नांवाची व्यक्ति एकच झाली नसून अनेक व्यक्ति झाल्या असें विष्णुपुराण सांगत आहे; तथापि त्यांतील एक कोणीतरी मुख्य कल्पक असून इतर केवळ परंपरा चालविणारे असले पाहिजेत. वीरकथांचें संस्कृतीकरण झाल्यानंतर त्यांच्या कथांस गौरव आलें, आणि जुन्या वीरकथांचा अभ्यासकवर्ग नवकालीन कवींपेक्षां समाजांत अधिक प्रतिष्ठित होत असल्यामुळें ब्राह्मणवर्गाचें सूतवर्गापेक्षां अधिक महत्त्व स्थापन झालें. पौराणिक वाङ्मय ज्या वर्गाच्या ताब्यांत आलें तो वर्ग सूतवर्गापेक्षां तीर्थोपाध्यायांच्याच वर्गाशीं संस्कृत भाषेच्या अभ्यासानें संबद्ध राहिला. संस्कृत ही भाषा प्रेरणायुक्त काव्याची नव्हती. प्रेरणायुक्त काव्य प्राकृतांत झाल्यानंतर त्याचें संग्रहण करून ठेवणें यासाठींच संस्कृत भाषा वापरली गेली, आणि व्यासोत्तर कालच्या कांहीं पिढ्यांनंतर सूतवर्गाची आणि संग्राहक वर्गाची फारकत झाली, आणि तीमुळें पुढचें सूतवाङ्मय संग्रहित व संरक्षित झालें नाहीं आणि पूर्वकालीन संग्रहित झालेल्या वाङ्मयाचें सातत्य चालवितांना तीर्थोपाध्यायांचा वर्ग पौराणिक वाङ्मयास तीर्थप्रशंसापरच पुरवण्या जोडता झाला. आणि तेव्हांपासून अत्यंत अर्वाचीन कालापर्यंत सूतवाङ्मय उपेक्षित स्थितींतच राहिलें.

शतानीकानंतर कथासरित्सागराचे म्हणजे बृहत्कथेचे वर्ण्य पुरुष उदयन व नरवाहन यांचा काळ येतो. बृहत्कथा उदयनास शतानीकाचा नातू ठरवीत आहे, तर पुराणें त्यास शतानीकाचा वारस करीत आहेत. आपणांस असें दिसून येतें कीं, उदयनाच्या कालांत रामायणकथा सविस्तर तयार झाली होती. त्या कथेंत जरी अनेक फरक दिसत आहेत तथापि बृहत्कथाकारांस रामायण जवळजवळ आपणांस दिसतें त्यासारखें सारखेंच दिसत होतें, यांत शंका नाहीं.

### ९७. उदयनकाल आणि वीरकथांचें स्वरूपांतर आणि आश्रयांतर.

९७. शतानीकाच्या कालानंतर लोकांमध्यें वैचारिक स्थित्यंतर कांहीं तरी कारणानें झालें असावें, असें दिसतें. शतानीकाच्या कालांत पौराणिकांची विद्या विशिष्ट क्षेत्रांचें महत्त्व वाढवून भिक्षुकी साधण्यांत गुंतली असेल, तर पुराणांचें मनोरंजक ग्रंथ या दृष्टीनें महत्त्व कमी होण्यास तीच क्रिया कारण झाली असेल. अधिसीमकृष्णाच्या काळांत पुराणें लखोटबंद झालीं, तर त्याच्यानंतर त्यांत नवीन घुसड करावयास दोनच मार्ग होते. एक जुनीच अधिसीमाच्या अगोदरची कथा म्हणून घुसडणें किंवा भविष्य म्हणून सांगणें. भविष्य म्हणून गुंतागुंतीची कथा सांगितल्यास तें विश्वासार्ह होत नाहीं. त्यामुळें नवीन भाग शिरकण्यास पंचाईतच होती. राजदरबारीं कथा सांगणारा वर्ग थोडाबहुत असावा तथापि त्यांसहि राजपुरुषांचा देवांशीं संबंध जोडणें सोपें राहिलें नसावें. वीरांचा देवांशीं संबंध नाहींसा होऊन देवयोनीशीं झाला. लोकांना देवदानवांच्या युद्धाचा कंटाळा येऊन निराळ्या देवयोनी लोकांपुढें आल्या असतील आणि त्या निराळ्या देवयोनींमुळें जो नवीन कथाप्रपंच निर्माण झाला त्यांचा सत्कार राजदरबारीं होऊं लागला असावा, असें उदयनास विद्याधराच्या कथांचा श्रोता केला आहे, यावरून दिसतें.

एवंच, जनमेजयाचा पणतु जो अधिसीमकृष्ण त्याच्या कालापर्यंत भोंवतालचा सर्व इतिहास पुराणामध्यें घालण्याची क्रिया होत होती. त्यानंतर पुढें शतानीकाच्या कालापर्यंत म्हणजे अकरा पिढ्या म्हणजे सुमारें ३१४ शें वर्षांचा वाङ्मयेतिहास नक्की सांगतां येत नाहीं. तो सांगतां येणार नाहीं, असें नाहीं पण तो सांगण्यास लागणारा परिश्रम झाला नाहीं.

सर्व पुराणांतील आख्यानांचें अवलोकन करून आणि अनेक तीर्थांचें महत्त्व साधण्यासाठीं तयार केलेला मजकूर केव्हां झाला असेल, त्याचा कालनिर्णय शक्य झाल्यास या मधल्या कालांतील तीर्थोपाध्यायांच्या चळवळीचा इतिहास देतां येण्याजोगा आहे. तथापि हें म्हणतां येईल कीं, पुराणांचें ललितवाङ्मय या दृष्टीनें महत्त्व अधिसीमकृष्णानंतरच्या काळानंतरच गेलें असावें, अगर नाहींसें होण्यास सुरवात झाली असावी. ललितकला निराळेंच आश्रयस्थान पाहूं लागल्या आणि पुराणांत पांडित्य आणि भिक्षुकी हेतूमुळें झालेल्या कथा या दोहोंचें मिश्रण होऊं लागलें.

नवीन प्रकारच्या ललितकथांचा उदय उदयनकालांत झाला असल्यास तो कोणत्या कारणामुळें झाला, कोणतीं धार्मिक आणि राजकीय त्याला कारणें झालीं असावींत हे प्रश्न विचार करण्याजोगे आहेत. तथापि तें विषयांतर न करतां पुराणांच्या इतिहासार्थ उपयोगाचा जो विचार आपणांस कर्तव्य आहे त्याकडे वळलें पाहिजे.

## प्रकरण १४ वें.

# कुरुयुद्धोत्तर पौराणिकांची वाङ्मयक्षेत्रांतील चळवळ.

### ९८. पुराणांच्या उपयोगाविषयीं बदललेली वृत्ति.

९८. पुराणांच्या अनुपयुक्ततेविषयीं एका काळीं जो समज होता, तो दूर करून पुराणांचा इतिहासाला योग्य उपयोग करण्याचा मार्ग दाखविण्याचें श्रेय प्रसिद्ध इंग्रज विद्वान् पार्गिटेर यांस आहे, आणि त्यांच्या परिश्रमानंतर आपल्या प्राचीन काळासंबंधीं ऐतिहासिक गोष्टींविषयीं विधानास पुराणांचा आधार कितपत सांपडतो, हें देखील पहाण्याची आवश्यकता संशोधकांस वाटूं लागली आहे. पार्गिटेरच्या अभ्यासपद्धतीचा अधिक विस्तार करणें हें या पुढील अभ्यासकांचें काम आहे.

### ९९. दाक्षिणात्य राजांविषयीं पौराणिक वाङ्मयाची शक्यता; व्यक्तीचा पुराणांत उल्लेख नसल्यानें तीविषयीं उपलब्ध माहिती टाकाऊ होत नाहीं.

९९. पार्गिटेरच्या अभ्यासांत मुख्य गौणत्व हें आहे, कीं, पुराणरचनेची एकंदर क्रिया कशी होत गेली तिचें पूर्ण स्वरूप त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. पंचलक्षणी पुराणांच्या आय कल्पना त्यांनीं आपल्या अन्य* पुस्तकांत चांगल्या तऱ्हेनें मांडल्या आहेत; तथापि जुन्या पुराणांचें बृंहण होतांना झालेल्या क्रिया त्यांच्या लक्षांत चांगल्या तऱ्हेनें आल्या नाहींत. पुराणबृंहणक्रियेचीं अंगें जाणणें आपणांस अवश्य आहे. पौराणिकांनीं आपलें वाङ्मय वाढविलें त्यावेळेस कोणत्या प्रकारचें वाङ्मय त्यांच्या हाताशीं होतें हें अभ्यासकांनीं जाणलें पाहिजे.

दक्षिणेच्या इतिहासांतील प्रतिष्ठान येथील दोन राजांच्या कथा मागें सांगितल्याच आहेत. त्या राजांचा निश्चित कालनिर्णय करणें ही गोष्ट मात्र आज शक्य नाहीं, व जें कांहीं त्यांविषयीं सांगितलें आहे तें अत्यंत धोपट तऱ्हेचें कालविषयक अनुमान दिलें आहे, हेंहि त्याच प्रसंगीं स्पष्ट केलें आहे. दोन्ही राजे बुद्धपूर्वकालीन असावे, एवढेंच त्यांत दाखविलें आहे, आणि त्या दोहोंमध्यें देखील पूर्वोत्तरतेविषयीं जो निर्णय दिला आहे तो देखील उपलब्ध पुराव्यावरून जेवढीं अनुमानें निघतात तेवढीं काढून दिलेला आहे. प्राचीन राजावलीची जी माहिती आपणांस आहे तींत विक्रमादित्य नाहीं, त्रिविक्रमसेन नाहीं आणि पैठणचा नरसिंहहि नाहीं. प्रतिष्ठानच्या राजाची माहिती देण्याची क्रिया पुराणकारांनीं केलीच नाहीं म्हणून पैठणच्या राजांचीं नांवें नसलीं तर कांहीं कोडें उत्पन्न होत नाहीं; तथापि आज मगधराजांची यादी पुराणांत उपलब्ध असतां तींत विक्रमादित्याचें नांव नसल्यानें मात्र सर्वच कथेस काल्पनिकतेचें रूप येण्याचा संभव आहे. तर त्याला उत्तर एवढेंच आहे कीं, मगधांची यादी देखील पूर्ण नाहीं अशी आपली खात्री आहे. पुराणांत सांगितलेल्या घराण्यांच्या कलियुगांतील याद्यांमध्यें मगधांचीच यादी अत्यंत अपूर्ण आणि कशी तरी जुळविलेली आहे. एकदां बार्हद्रथ घराण्यानें एक हजार वर्षें राज्य केलें ( पूर्णं वर्षसहस्रं वै तेषां राज्यं भविष्यति ), असें सांगून नांवें मात्र २५ देखील दिलीं नाहींत. सामान्यतः एक हजार वर्षांत चाळीसच्या वर राजनामें उपलब्ध हवींत. पंधरा वीस तरी राजनामें नष्ट झालीं असावींत असें दिसतें. मगधांची राजावलि संपूर्ण नसतां विक्रमादित्याचा मगधांच्या यादींत अनुल्लेख हा पुरावा विक्रमादित्याच्या अनैतिहासिकतेचा पुरावा होऊं शकत नाहीं.

पुराणांमध्यें शातवाहन आणि विक्रमादित्य यांच्या कथा घालण्याचा प्रयत्न झाला नाहीं, असें नाहीं; भविष्यपुराणाच्या उपलब्ध आवृत्तींत त्यांच्याविषयीं उल्लेख आहेतच; पण त्यांची उपयुक्तता मुळींच नाहीं. त्याविषयीं थोडेंसें विवेचन पुढें करावें लागेलच.

भारतीयुद्धाच्या काळीं एकंदर राजकीय स्थिति काय असावी हा विषय येथें चर्चेस अनवश्य आहे. भारती युद्धाच्या वेळीं महाराष्ट्राची राजकीय स्थिति कशी होती ही माहिती गेल्या प्रकरणांत दिलीच आहे.

पौराणिक माहितीवरून भारती युद्धानंतरच्या काळच्या राजघराण्यांची माहिती तरी कितपत मिळते आणि मिळणें शक्य आहे ती जुळवून मांडण्याच्या बाबतींत काय परिश्रम झाला आहे याचाच आढावा येथें घेऊं.

### १००. पुराणांतरीं वर्णिलेलीं कलियुगांतील राजघराणीं:—

१००. कलियुगांतील घराण्यांसंबंधीं हकीकत मत्स्य, वायु, ब्रह्मांड, विष्णु, भागवत, गरुड व भविष्य या पुराणांमध्यें

* Ancient historical tradition.

सांपडते. यांपैकीं मत्स्य व भागवत यांखेरीज बाकी सर्व पुराणांमध्यें कौरवपांडवांमधील महायुद्धाच्या वेळेपर्यंत असलेल्या सर्व घराण्यांची हकीकत दिली आहे; व युद्धानंतर उत्तर हिंदुस्थानामध्यें जीं राजघराणीं झालीं तींहि दिलीं आहेत. मत्स्यपुराणामध्यें उत्तरकालीन पौरव घराणें पूर्वीच्या पौरव घराण्याला जोडून दाखविलें आहे, व कलियुगांतील इतर सर्व घराणीं निराळीं सांगितलीं आहेत. भागवतामध्यें पूर्व व उत्तर कालचे ऐक्ष्वाकु एकत्र दाखविले असून उत्तरकालीन पौरव व बार्हद्रथ पूर्वीच्या पौरवांबरोबरच दाखविले आहेत; आणि पुढील सर्व घराणीं निराळीं दाखविलीं आहेत. पौरव, ऐक्ष्वाकु, बार्हद्रथ, प्रद्योत, शैशुनाग उर्फ नंद, मौर्य, शुंग, काण्व, आंध्र इत्यादि घराण्यांच्या याद्या दिल्या असून स्थानिक घराण्यांचे उल्लेख केले आहेत.

निरनिराळीं पुराणें आणि पुराणांच्या निरनिराळ्या आवृत्त्या व हस्तलिखितें यांच्या साहाय्यानें जितकी काळजीपूर्वक जुळवाजुळव करतां येईल तितकी करून म्हणजे त्रेसष्ट हस्तलिखितांच्या आधारांवर पार्गिटेर यांनीं जी जुळणी केली आहे* तिचें फल पुढें देण्यांत येईलच; तथापि आपल्या संशोधनीय अनुभवाचा आढावा जो पार्गिटेरनीं दिला आहे त्याचा गोषवारा देणें अवश्य आहे. पार्गिटेरचे सर्व सिद्धांत ग्राह्य धरिले नाहींत. जेथें ते ग्राह्य नाहींत तेथें त्यांच्या विरुद्धहि लिहिलेंच आहे. पुराणांचें कोणकोणत्या भिन्न कालीं पुन्हा संपादन झालें याविषयीं पार्गिटेरनीं आपल्या साहित्याचें जें वर्णन दिलें आहे त्यावरून जे निर्णय निघतात ते पुढें दिले आहेत.

### १०१. पुराणांचीं स्वरूपें, त्यांतील सादृश्यें व भिन्न पाठ.

१०१. मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांच्यामध्यें विलक्षण सारखेपणा दिसून येतो; यावरून ते सर्व एकाच ग्रंथावरून घेतले असावेत, असें दिसतें.

विष्णु आणि भागवत हीं सुद्धां बरींचशीं सारखीं आहेत. त्या दोहोंमध्यें मुख्य फरक एवढाच आहे कीं, 'भागवत' हें कविताबद्ध आहे आणि 'विष्णु' हें पुष्कळसें गद्यांत आहे. हीं दोन्हीं पुराणें मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांसारखीं विस्तृतशः लिहिलेलीं नाहींत; त्यामुळें फक्त नावें व कधीं कधीं नातें दाखविणारे शब्द यांपलीकडे त्या दोहोंमध्यें अधिक सारखेपणा नाहीं; तथापि तीं दोन्ही व वरील तिन्ही अशा पांचहि पुराणांमध्यें सुद्धां बराचसा सारखेपणा दिसून येतो. त्यामुळें ह्यांचा व त्यांचा मूळ आधार जवळ जवळ एकच होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

गरुडामध्यें फक्त पौरव, ऐक्ष्वाकु व बार्हद्रथ हींच घराणीं सांगितलीं आहेत, व त्यामध्यें यापलीकडे कांहींच नाहीं.

गरुडपुराणाची प्रस्तुत आवृत्ति त्यामुळें अत्यंत महत्त्वाचीं आहे. ती पौराणिक मजकुराची वाढ कशी होत गेली याच्या एका टप्याची दर्शक आहे.

भविष्यपुराणाची पूर्वीच्या घराण्याची माहिती असलेली अशी फक्त वेंकटेश्वरप्रतच आहे; परंतु तींतील माहिती अशुद्ध व निरुपयोगी आहे. पार्गिटेर यांस उपलब्ध झालेल्या दुसऱ्या प्रतीमध्यें पूर्वीच्या बऱ्याचशा गोष्टी गाळलेल्या आहेत; व कांहीं अगदीं अलीकडच्या सांगितल्या आहेत.

### १०२. कलियुगांतील घराण्यांच्या माहितीसाठीं भविष्यपुराण कितपत मूळ आधारग्रंथ आहे ?

१०२. भविष्यपुराण ह्याच आपला आधारग्रंथ आहे, असें जरी मत्स्य व वायु या पुराणांमध्यें सांगितलें आहे, तथापि तें विधान अत्यंत मर्यादित क्षेत्रापुरतेंच त्यांनीं केलें आहे, ही गोष्ट पार्गिटेरच्या लक्षांत आली नाहीं. मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांमध्यें 'भविष्य' हा शब्द ५३ वेळां आला आहे, व त्या शब्दाचा 'पुढील किंवा पुढें होणारा' असा अर्थ न घेतां 'भविष्य पुराण' असाच अर्थ घेतला पाहिजे.

भविष्य हा इतर पुराणांचा आधारग्रंथ आहे असें पार्गिटरचें मत त्यांनीं मांडलेल्या पुराव्यावरून सिद्ध होत नाहीं. भविष्यपुराणाच्या प्रती ज्या सध्या मिळतात किंवा ऐकिवांत आहेत, त्या अशुद्ध व निरुपयोगी आहेत. भविष्यपुराणाच्या आणखी जर प्रती उपलब्ध होतील तर हें पुराण कसेंकसें वाढत गेलें हें दिसून येईल.

### १०३. भविष्यपुराणाखेरीज साहित्य.

१०३. भविष्यपुराणांतून फारच थोडा मजकूर घेतला आहे, ही गोष्ट वायु आणि मत्स्य पुराणांत स्पष्ट सांगितली असतां पार्गिटेर यांना संभ्रम कां उत्पन्न व्हावा, हें कळत नाहीं. याविषयीं मुद्याचे श्लोक मत्स्य आणि वायु या पुराणांत आहेत ते येथें देतों. (मत्स्यपुराण, आनंदाश्रम आवृत्ति अ. ५० श्लो.७२–७६; वायुपुराण आनंदा० अ. ९९ श्लोक २६४–२६९.)

**सूत उवाच—**

**यथा मे कीर्तितं पूर्वं व्यासेनाक्लिष्टकर्मणा ।**
**भाव्यं कलियुगं चैव तथा मन्वंतराणि च ॥**
**अनागतानि सर्वाणि ब्रुवतो मे निबोधत ।**
**अत उर्ध्वं प्रवक्ष्यामि भविष्या ये नृपास्तथा ॥**

* The Purān text of the Dynasties of the Kali age.

**इक्ष्वाकोरन्वये चैव पौरवे चान्वये तथा ।**
**येषु संस्थाप्यते क्षेत्रं ऐडेक्ष्वाकुकुलं शुभम् ॥**
**तान्सर्वान्कीर्तयिष्यामि भविष्ये कथितान्नृपान् ।**

एवंच भविष्यपुराणांतून घेतलेला मजकूर ऐक्ष्वाकु, पौरव, कदाचित् बार्हद्रथ इत्यादि घराण्यांच्या भारतीयुद्धोत्तर कांहीं राजांपुरताच घेतला एवढेंच श्लोकांत विधान आहे.

येणेंप्रमाणें भविष्यपुराणांतून काय भाग घेतला हें स्पष्ट सांगितल्यानंतर याच्या पुढील श्लोकांत आपला आधार सांगितला नाहीं, तथापि तो भविष्यपुराण नाहीं, हें स्पष्ट सांगितलें आहे.

**तेभ्योऽपरेऽपि ये चान्ये उत्पत्स्यंते नृपाः पुनः ।**
**क्षात्राः पारशवाः शूद्रास्तथाऽन्ये ये बहिश्चराः ॥**
**आंध्राः शकाः पुलिंदाश्च चूलिका यवनास्तथा ।**
**कैवर्ताभीरशबरा ये चान्ये म्लेच्छसंभवाः ॥**
**पौरवा वीतिहोत्रा वै वैदिशाः पंच * कोशलाः ।**
**मेकलाः कोशलाः पौण्ड्रा गोनर्द्धाः स्वसूफकाश्चह ॥**
**मुनिधर्माः शका नीपा याश्चान्या म्लेच्छजातयः ।**
**वर्षाग्रतः प्रवक्ष्यामि नामतश्चैव तान् नृपान् ॥**

"त्यांशिवाय निराळे जे राजे उत्पन्न होणार जे क्षत्रिय, मिश्र रक्ताचे, शूद्र किंवा परकीय असतील, याविषयीं सांगतों; म्हणजे आंध्र, शक, पुलिंद, चूलिक, यवन, कैवर्त, आभीर, शबर, तसेच इतर म्लेच्छांपासून उत्पन्न झालेले, त्याप्रमाणेंच पौरव, वीतिहोत्र, वैदिश, पांचाल कोशल,* मेकल, कोशल, पौंड्र, गोनर्द्ध, स्वस्फूक, मुनिधर्मीय शक, नीप, व इतर म्लेच्छजातीय होत. त्या राज्यांविषयीं राज्यवर्षात्मक आणि नामयुक्त प्रवचन करतों."

शैशुनागांनंतरच्या राजांची मत्स्य आणि वायु या पुराणांनीं दिलेली माहिति प्रत्यक्ष प्राकृत किंवा इतर साहित्यापासून न घेतां भविष्यपुराणांतूनच घेतली हें सिद्ध होण्यास कठीण जाईलसें वाटतें.

जुने पुराणसंपादक आपलीं साहित्यस्थानें लपवीत नाहींत, त्याचप्रमाणें कोणी कोठपर्यंत माहिति दिली हें इतिहासकाराच्या प्रामाणिकतेनें ते सांगत आहेत.

मत्स्य आणि वायु या पुराणांतून उद्धृत केलेल्या वरील प्रास्ताविक श्लोकांत कोणता भाग केव्हां कोठून घेतला हें स्पष्ट केलेंच आहे. या ग्रंथांचें म्हणणें पुढील प्रमाणें आहेः—

(१) व्यासांनीं पुढें (भाव्यम्) कलियुग येणार हें आणि मन्वंतरांची माहिती हीं सांगितलींच होतीं.

(२) भावी कालाविषयीं व्यासोक्त माहिति खेरीज जें कांहीं सूत सांगत आहे, त्यापैकीं भविष्यांत सांगितलेले राजे सूत सांगता झाला आहे.

(३) आणि त्यापेक्षां निराळे (राजे) उत्पन्न होणार तेंहि सांगत आहे. पण तें कोठून सांगत आहे याविषयीं माहिती दिली नाहीं. एवंच आपला आधार केवळ भविष्यपुराण नाहीं ही गोष्ट मत्स्य आणि वायु कबूल करीत आहेत. मात्र आपण भविष्यांतून कोणतें घेतलें आहे, अन्य ठिकाणाहून कोणतें घेतलें, हें मत्स्य आणि वायु हीं पुराणें स्पष्ट करीत नाहींत. यासाठीं कोणी नवीन माहिती दिली आहे हें आपण प्रत्येक ग्रंथ तपासूनच पाहिलें पाहिजे.

### १०४. कथन करणाऱ्यांच्या व श्रोत्यांच्या नांवांचें महत्त्व.

१०४. या पुराणांत ही जी घराण्यांची माहिती दिली आहे, ती भविष्यकथन रूपानें सांगितली आहे; परंतु ह्या वंशावळीस सुरवात करण्याची तऱ्हा व वंशावलीचा आरंभपुरुष (म्हणजे कोणत्या राजापासून कोणता वंश मोजावयाचा हा प्रश्न) या संबंधीं मात्र या पुराणांत बराच फरक दिसून येतो. उदाहरणार्थ, विष्णुपुराणांत पराशर मैत्रेयाला सांगत आहे तेथील वंशावळ अभिमन्यूच्या मुलापासून सुरू केली आहे. बाकीच्या पुराणांत नैमिषारण्यांत सूतानें हीं वृत्तें ऋषींना कथन केलीं आहेत, असें म्हटलें आहे. मत्स्य व वायु हीं अधिसो(सी)मकृष्णापासून सुरवात करतात. भागवतांत परीक्षितापासून सुरवात आहे व गरुडांत जनमेजयापासून आहे. त्यामुळें शब्दांचीं 'भविष्यरूपें' सर्वच ठिकाणीं उपयोजिलेलीं नाहींत व 'अभवत्' 'स्मृतः' असे शब्द कांहीं कांहीं ठिकाणीं आढळतात; स्वतंत्र साहित्य पुराणांत समाविष्ट होतांना मूळची भाषा राहून गेली हें भूतकालात्मक शब्दांवरून स्पष्ट आहे.

"विष्णू पुराणांत पराशर मैत्रेयाला सांगत आहे अशा तऱ्हेचें जें विधान आहे तें बाष्कळ आहे कारण पराशर हा व्यासाचाच जनक होता," अशा अर्थाचें विधान संशोधकांनीं केलें आहे, तथापि त्यांत संपादकीय बेसावधपणा दिसून आला तरी त्यामुळें वाङ्मयेतिहास उपकृत झाला आहे. द्वैपायन व्यासांचा प्रयत्न होण्यापूर्वीं कांहीं साहित्य पराशरांनीं जमविलें नसेल कशावरून? कांहीं संग्रहण व्यासांनीं आपल्या बापाचा शिष्य व विद्यासंरक्षक

* पंच कोशल हा शब्द पांचाल कोशल यांचा संक्षेप असावा असें पार्गिटेर यांचें मत आहे.

मैत्रेय याच्या साहित्यांतून केलें असावें आणि त्या सातत्याची स्मृति पौराणिकांनीं रक्षून ठेवली असावी.

मैत्रेयाशिवाय उल्लेखिलेले परीक्षित्, जनमेजय व अधिसीमकृष्ण हे तीन श्रोते ग्रंथसंपादनास प्रवर्तक झालेले होते व त्याच्या काळीं त्यांनीं जें श्रवण करविलें त्यामुळें पुराणरचनात्मक किंवा वर्धनात्मक कृतीस प्रेरणा मिळाली असावी.

या कथनाच्या पद्धतींतील भिन्नतांवरून आम्ही निर्णय असा काढतों कीं माहितीचें संग्रहण चार पिढ्या चाललें होतें; भारती युद्धापर्यंतच कथाभाग ग्रंथनिविष्ट करण्याचा आद्य संग्राहकाचा विचार होता. काम अनेक पिढ्या चालू राहिल्यामुळें त्या वेळेस जो नवीन राजाविषयीं भाग हातीं आला तो भविष्यरूपानें सांगण्याची सुरवात कांहीं पुराणांत परीक्षितापासून झाली, तथापि कांहीं पौराणिकांस भविष्यात्मक भाषेचा उपयोग पुढील कालापासूनच म्हणजे अधिसीमकृष्णाच्या कालापासून करणें योग्य वाटलें. माहिती जुळवितांना प्रथम कुरुयुद्धापर्यंतच जुळवावी असा संकल्प कृष्णद्वैपायनांचा असावा व तें काम करण्याकरितां संग्रह करण्यासाठीं जे अनेक सहाय्यक कृष्णद्वैपायनानें हाताशीं घेतले असावे, त्यांची परंपरा अधिसीमकृष्णाच्या कालापर्यंत चालू राहिल्यामुळें जेव्हां त्या राजाच्या कारकीर्दींत सत्रप्रसंगीं कथनाच्या निमित्तानें पौराणिक साहित्याची पुनर्घटना करण्याचा प्रसंग आला असेल, तेव्हां स्वाभाविकपणें अधिसीमकृष्णाच्या कालापर्यंत भूतकालीनच रूपें वापरलीं गेलीं; तथापि आद्य आचार्यांनीं परीक्षितापर्यंतच कथासूत्र आणण्याचा संकल्प केला असल्यामुळें परीक्षितानंतरचा सर्व व्यवहार भविष्यकालीन दाखविण्याची वृत्ति धरून व्याससंप्रदायांतील एका पक्षानें किंवा संघानें आपली श्लोकरचना केली; म्हणजे संग्रहणें दोनदां झालीं. एकदां परीक्षिताच्या काळांत व दुसऱ्यांदा अधिसीम कृष्णाच्या काळांत. मत्स्यपुराणामध्यें व वायुपुराणामध्यें पौरव राजघराण्याची कथा पांडवांपासून जनमेजयापर्यंत सांगितलेली आहे; आणि नंतर वैशंपायनाचें आणि जनमेजयाचें झालेलें भांडण दिलें आहे आणि वाजसनेय शाखेच्या उत्पत्तीची कथा दिलेली आहे; नंतर राजवंशावलि पुन्हा सुरू करण्यांत येऊन ती अधिसीमकृष्णापर्यंत आणलेली आहे आणि त्यानंतर अधिसीमकृष्णानें द्वादश वार्षिक सत्र केलें. नंतर त्या सत्राचा वृत्तांत आणिला आहे आणि तेथें सर्व पुराणांचें श्रवण करविण्यांत आलें असें दाखविलें आहे. तेथें सूतास ऋषी प्रश्न विचारतात आणि वृत्तांत आपणांस ऐकवावा अशी विनंति करितात. अशा प्रसंगाचा फायदा घेऊन भविष्यरूपानें भविष्यकालीन राजे सांगण्याची युक्ति पूर्वींच सुरू झाली असल्यामुळें बुद्धोत्तरकालीन संपादकांनीं वापरली आहे, तेव्हां वर दिलेल्या श्लोकांनीं कलियुगावरील भविष्य सूत सांगता झाला आहे.

### १०४ अ. अधिसीमकृष्णाचें ऐतिहासिकत्व आणि त्याच्या काळाचें महत्त्व.

१०४ अ. अधिसीमकृष्णाचा काल काल्पनिक नाहीं. तो वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचा आहे. वाङ्मयाच्या एकसारख्या धडाडीनें वाढत चाललेल्या क्रमाचा तो एक विश्रांतिकाल होता यांत शंका नाहीं. कारण अधिसीमकृष्ण ज्याप्रमाणें पौरवांच्या घराण्यांतील स्वकालीन राजा म्हणून पौराणिकांनीं दिलेला आहे, त्याप्रमाणेंच त्यांनीं इतर देशांतीलही स्वकालीन राजे दिलेले आहेत. ते म्हटले म्हणजे ऐक्ष्वाकु घराण्यांतील दिवाकर राजा आणि मगध देशांतील सेनाजित् राजा हे होत; व या सर्व गोष्टींवरून अधिसीमाच्या काळीं म्हणजे भारतीय युद्धानंतर पांच पिढ्यांनींच म्हणजे शेंसवाशें वर्षांत पौराणिक वाङ्मयाची व महाभारताची घडी जवळजवळ पक्की बसली असावी, असें समजण्यास हरकत नाहीं.

याच काळांत वेदांचें संग्रहण झालेलें होतें. एवढेंच नव्हतें तर वैदिकांच्या संप्रदायांत लगेच तंटे उपस्थित होऊन शाखाभेद होण्यास सुरवात झाली. ते त्याकालीं उत्पन्न झालेले शाखाभेद आजपर्यंत टिकले आहेत, आणि आजच्या आयुष्यक्रमावर परिणाम करीत आहेत. या गोष्टीकडे लक्ष देतां अधिसीमकृष्णाच्या काळाचें महत्त्व सामाजिक दृष्टीनें देखील आहे.

### १०४ आ. पौराणिक वर्गाचें स्थानांतर.

१०४ आ. वाङ्मयाच्या दृष्टीनें कुरुयुद्धाच्या काळीं देखील पौरव वंशास महत्त्व होतें तथापि पुढें पौरवांचें स्थान कुरूंचा देश न रहातां वत्स देश झाला. हें स्थित्यंतर वाङ्मयाच्या इतिहासावर देखील परिणामकारी झालें असावें असें दिसतें. पौरव राजांस निराळ्या प्रकारच्या वाङ्मयाची अभिरुचि लागली असावी आणि पौराणिकांचें उद्धाटण तेथून होऊन ते पुढें मगधास गेले असावेत व त्यामुळें पौराणिकांच्या दृष्टीनें महत्त्वाचा प्रदेश मगध झाला, आणि उत्तरकालीन राजावली त्यांनीं मगधाच्या किंवा मगधापर्यंत येऊन पोंचणाऱ्या राजांच्या दिल्या आहेत.

उत्तरकालीन पौराणिकांनीं मगधालाच महत्त्व दिलेलें दिसतें; मगधाचें बार्हद्रथ घराणें बरेंच विस्तरशः म्हणजे राजे व त्यांच्या कारकीर्दींचीं वर्षें सांगून दिलें आहे. तरी

देखील मगधराजांची यादी अत्यंत अपूर्ण आहे हें मागें दाखविलेंच आहे.

डॉ. फ्लीटनें कृष्णाच्या मृत्युदिवसापासून कलियुग सुरू झालें, असें दाखविलें आहे; परंतु वरील पुराणांत कलियुगांतील राजे म्हणजे महायुद्धानंतरच्या कालांतील राजे असा अर्थ धरला आहे.

### १०५. सूतवृत्तें प्राकृतांत असावींत काय ?

१०५. पार्गिटेरचें म्हणणें आहे कीं, मत्स्य, वायु व ब्रह्मांड यांमधील संस्कृतमध्यें दिलेली हकीगत पूर्वी प्राकृत श्लोकांमध्यें असली पाहिजे. पार्गिटेरांची ही कल्पना कांहीं प्रमाणांत खरी आहे. कांहींतरी भाग प्राकृत काव्यांतूनच घेतला याविषयीं पुष्कळ प्रमाणें आहेत. उदाहरणार्थ, संस्कृत पाठामध्यें बऱ्याच ठिकाणीं वृत्तभंग झालेला आहे. कांहीं प्राकृत शब्द जसेचे तसे ठेवून दिलेले आढळतात, व त्याचप्रमाणें अनियमित संधींचीहि उदाहरणें दृष्टोत्पत्तीस येतात. विष्णु व भागवत यांमध्यें सुद्धां जेथें पूर्वींचे श्लोक आहेत तेथें हाच प्रकार आढळतो. जुने श्लोक व प्राकृत शब्दांचे नमुने यांवरून पाहतां असें दिसतें कीं, पूर्वींची प्राकृत संस्कृत भाषेपासून फारशी निराळी नव्हती. मूळ ग्रंथांत 'होत्ति' शब्द असतां त्याचें 'भवति' रूप झालें असावें अशी शंका भवतियुक्त नऊ अक्षरांचे अनुष्टुप् श्लोकपाद पाहिले असतां उत्पन्न होते. मूळ प्राकृताचें संस्कृतीकरण केल्याचे इतर अनेक पुरावे सांपडतील. पार्गिटेर म्हणतात त्याप्रमाणेंच कांहीं साहित्य पुराणकारांनीं त्याचप्रमाणें रामायण व महाभारत यांच्या कर्त्यांनीं व संपादकांनीं प्राकृतमधून घेतलें असलें पाहिजे, तथापि सर्व ग्रंथच मूळ किंवा त्याचें बहुतेक साहित्य प्राकृतमधून घेतलें असलें पाहिजे असें आम्ही स्वीकारीत नाहीं.

या विषयावर लिहितांना पार्गिटेर साहेबांचें एक मत व्यक्त केलें होतें. तें हिंदुस्थानामध्यें लेखनकला अजमासें ख्रि. पू. ७०० च्या सुमारास अस्तित्वांत आली असावी असें होतें. हें मत सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांच्या शोधापूर्वीचें आहे. अर्थात् आज हें मत कोणीच ग्राह्य करणार नाहीं.

मोहेंजादारो, हराप्पा वगैरे ठिकाणच्या उपलब्ध वस्तू ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षांमागें लेखनकला होती हें निःसंशय सिद्ध करतात. एवढेंच नव्हे, तर त्यावेळची लिपि आज डॉ. प्राणनाथ सारख्यांच्या परिश्रमामुळें जवळ जवळ उकलल्या सारखी झाली आहे.* ख्रिस्तपूर्व ७०० च्या सुमारास लेखनकला वापरली जात होती त्याच वेळीं तिचा सरकारी कागदपत्रांत व तवारिखी लिहिण्यास उपयोग होऊं लागला असावा या पार्गिटेरच्या म्हणण्यास आक्षेप उत्पन्न होत नाहीं. सरकारी नोकरांनीं लिहून ठेविलेली मूळ हकीगत संस्कृतापेक्षां प्राकृतमध्येंच असणें अधिक संभवनीय दिसतें. याच इतिहाससामुग्रींतून भाट, चारण, कवी वगैरे लोकांनीं आपलीं काव्यें केलीं असावींत.

मगध देश हा त्या वेळचा सांस्कृतिक दृष्टीनें मुख्य देश असल्यामुळें सर्व इतिहास त्याला अनुलक्षूनच आहे. यावरून असें म्हणण्यासहर कत नाहीं कीं, पूर्वींचे श्लोक मागधीमध्येंच रचले गेले असावेत. आणि उत्तरकालीं जरी महाराष्ट्री अधिक प्राधान्य पावली तरी मागधीचें महत्त्व मोठें असावें.

ज्याअर्थी तो इतिहास पूर्वप्रसिद्ध साहित्यांतून घेतला अशी खुद्द ग्रंथाची कबूली आहे व ज्याअर्थी भागवतांतील निदान एकतरी श्लोक आज पालींत उपलब्ध आहे, त्याअर्थी हे श्लोक प्रथम किंवा नंतर तरी पालींत लिहिले असावेत, अशी पार्गिटेरची समजूत आहे.

### १०५ अ. पुराणसंपादनाच्या क्रियेंत झालेल्या गोष्टी.

१०५ अ. पुराणांच्या संपादनाची क्रिया वारंवार झाली आहे, व अजूनहि चालू असेल, आणि त्याप्रकारच्या क्रियांमुळें निरनिराळ्या प्रकारचें साहित्य निरनिराळ्या काळीं समाविष्ट होत होतें. आजच्या भविष्यपुराणाची आवृत्ति तिच्या अज्ञातवासी संपादकांनीं व्हिक्टोरिया राणीपर्यंत आणून सजविली आहे. हा वृत्तांत आणतांना संपादकांनीं अत्यंत विविध प्रकारच्या साहित्याचा उपयोग केला असावा, असें दिसतें. संपादक जुन्या प्रकारचा पंडित असावा. त्यानें आपली माहिती सुशिक्षित वर्गास परिचित असलेल्या ग्रंथांच्या आधारावर दिलेली नसून ती कर्णोपकर्णी आलेल्या माहितीवर रचिली आहे. उघडपणें चौकशी करून प्रमाणशुद्ध माहिती मिळविण्याचा प्रयत्न न करितां, 'आमच्या पुराणांत सर्व कांहीं आहे' अशा तऱ्हेची भावना प्रसृत करण्याच्या उद्देशास सहानुभूति असलेल्या लोकांकडूनच संपादकानें आपली माहिती जुळविली असली पाहिजे. तथापि प्रत्येक माहितीचा मूलाधार पाहावयाचा आणि मग लिहावयाचें असा परिश्रम पुराणसंपादकांनीं केला असता तर त्यांना अत्यंत अनेकविध साहित्याच्या आधारावर माहिती द्यावी लागली असती. महंमद, येशु ख्रिस्त, नोहा, मोगलवंश इत्यादि व्यक्तींचें वृत्त त्यांत आलें आहे. ही माहिती अर्थात् अतिशय उत्तरकालीन आहे. तथापि 'मग' ब्राह्मणांविषयीं

* Indian Historical Quarterly 1931–32.

दिलेली माहिती अनेक शतकांची जुनी आहे, यांत शंका नाहीं. ती केव्हां समाविष्ट झाली हें निश्चित करतां येत नाहीं. ती माहिती मगांनीं उत्पन्न केलेल्या एकाद्या संस्कृत ग्रंथावरून घेतली असेल. कदाचित् देशी भाषेंतील माहिती देखील समाविष्ट झाली असेल. अनेकदां माहात्म्यग्रंथ देशी भाषेंत तयार होतात आणि त्यांत विशिष्ट स्थानाचें अगर जातीचें महत्त्व सांगण्याचा हेतु असतो. तसल्या प्रकारचे ग्रंथ पुढें एकाद्या पुराण-संपादकाच्या हातीं लागले म्हणजे तो त्यांतील विषय आपल्या ग्रंथांत समाविष्ट करतो व ते समाविष्ट करतांना पुष्कळदां मुळाचें धोपट संस्कृतीकरण करून तो तरजुमा समाविष्ट करतो.

पुराणांत संग्रहित झालेली माहिती ऐतिहासिक असेल असें नाहीं. तर कृत्रिम तऱ्हेचा इतिहास तयार करावयाचा आणि तो अमक्या पुराणांतला आहे म्हणून सांगावयाचें, अशा प्रकारच्या क्रियेनें जी माहिती तयार होते ती कालांतरानें पुराणांत समाविष्ट होते. पौराणिकांच्या संपूर्ण क्रिया स्पष्ट करावयाच्या म्हणजे प्राचीनांचें इतिहासलेखनशास्त्र साकल्यानें स्पष्ट करावें लागेल. येथें तें सविस्तर सांगण्याची आवश्यकता नाहीं. कलियुगांतील बुद्धपूर्वकालीन आणि बुद्धोत्तरकालीन घराण्यांच्या यादीविषयींच आपणांस कर्तव्य आहे.

असें शक्य आहे कीं, जेव्हां एखादा संपादक जुन्या पुराणाची स्वसंस्कारित आवृत्ति काढूं लागतो तेव्हां तो विविध प्रकारचें साहित्य त्यांत समाविष्ट करतो. धर्मशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि ग्रंथांमधील श्लोक तो आपल्या आवृत्तींत समाविष्ट करतो, त्याप्रमाणेंच प्राकृत भाषांतील साहित्य आपल्या ग्रंथांत संस्कृतमध्यें रूपांतर करून अंतर्भूत करून घेत असला पाहिजे. भागवत पुराणांतील एक श्लोक पालींत सांपडला असें पार्गिटेरसाहेब दाखवितात. एखादा श्लोक पालींत सांपडला तर तो श्लोक पालींत होता हें सिद्ध होईल; आधारास घेतलेलें सर्व साहित्य पालींत किंवा प्राकृतमध्यें होतें हें कसें सिद्ध होणार ? संस्कृत आणि प्राकृत साहित्याचा एकमेकांशीं काय संबंध होता हें पुढें सविस्तर चर्चिलें जाणारच आहे.

## १०६. पुराणांतील कांहीं इतिहासरचना तिसऱ्या व चौथ्या शतकांतील असावीः—

१०६. अधिसीमकृष्णानंतर झालेल्या क्रियांचें विवेचन पार्गिटेर यांनीं वगळलें आहे व ते एकदम ख्रिस्तोत्तर काळाकडे येतात. तिसऱ्या व चौथ्या शतकांत जें झालें त्याकडेच ते लक्ष देतात व पुराणरचना तिसऱ्या व चौथ्या काळांत झाली असावी असें सांगतात.

या प्रकारचें मत होण्यास दोन प्रकारचे पुरावे पार्गिटेरनीं दिले आहेत. (१) ग्रंथाचा विषय व (२) पाठांतील विशेष वंशावळीचा इतिहास दोन ठिकाणीं संपलेला दिसतो.

कथनसमाप्तीची पहिली सीमा म्हटली म्हणजे आंध्र व इतर स्थानिक राज्यें यांच्या पाडावानंतरचा काल होय. म्हणजे हा इतिहास ३ ऱ्या शतकाच्या मध्यापर्यंत आलेला आहे. मत्स्य पुराणामध्यें इतकाच इतिहास आहे.

वायु, ब्रह्मांड, विष्णु आणि भागवत यांमध्यें गुप्तांच्या उदयकालापर्यंतचा इतिहास सांगितला आहे, व गुप्तांच्या अमलाखालीं म्हणून जे देश सांगितले आहेत ते सर्व देश किंवा तो मुलूख पहिल्या चंद्रगुप्ताच्या मरणकालीं म्हणजे इ. स. ३३५ मध्यें त्यांच्या ताब्यांत होता, असें दाखविलें आहे. या इतिहासामध्यें समुद्रगुप्ताच्या स्वारीची किंवा त्या नंतरची कांहींच हकीगत नाहीं. समुद्रगुप्त हा चंद्रगुप्ताचा मुलगा व वारस होता व त्यानें आपल्या मोहिमेला आरंभ राज्यारोहण झाल्याबरोबरच केला होता. जर हा इतिहास यानंतर लिहिलेला असता तर समुद्रगुप्ताच्या स्वाऱ्यांची हकीगत त्यांत आली असती. अर्थात् गुप्तराज्याचा आरंभ व समुद्रगुप्ताच्या स्वाऱ्या यांमधील कालापर्यंतचा म्हणजे सरासरी इ. स. ३३५ पर्यंतचा इतिहास यांत आला असावा.

यावरून पार्गिटेर सांगत आहेत कीं, हा कविताबद्ध इतिहास ३ ऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास एकत्रित केला गेला असावा व नंतर ३३५ पूर्वी त्याला गुप्तराज्यापर्यंतची हकीगत जोडली गेली असावी.

ही वाढलेली हकीगतच वायु व ब्रह्मांड पुराणांत सविस्तर आणि विष्णु व भागवत पुराणांत सारांशरूपानें दिलेली आहे. आतां ज्याअर्थी मत्स्य, वायु व ब्रह्मांड या सर्व पुराणांनीं आपली माहिती भविष्यपुराणांतूनच घेतली आहे, त्याअर्थी भविष्यपुराणांमधील इतिहास ख्रि. श. च्या मध्याच्या सुमारास लिहिलेला असावा, व पुढील भविष्यात्मक इतिहास नंतर ३३५ पूर्वी घातला गेला असावा, अशीं मतें पार्गिटेरनीं व्यक्त केलीं आहेत. पार्गिटेरच्या विधानापेक्षां ग्रंथवृद्धीच्या अधिक पायऱ्या पुढें दाखविल्या आहेत.

पौराणिकांची हकीगत अलाहाबाद स्तंभावरील गुप्तलेख कोरण्यापूर्वीची असें जयस्वालांनीं दाखविलें आहे. पौराणिकांचें युग संपून अंकित लेखांच्या महत्त्वाचें युग सुरु झालें याचा दर्शक अलाहाबाद स्तंभ आहे असें म्हणतां येईल.

## १०७. पुराणबृंहणाचे विविध काल.

१०७. आपणांस उपलब्ध असलेल्या साहित्यावरून पुराणबृंहणाचा इतिहास तयार करतां येईल. प्रस्तुत लेखकास पुराणबृंहणाचे काल पुढीलप्रमाणें वाटतात.

१ पहिला काल कुरुयुद्धानंतरचा होय. या कालांत द्वैपायन व्यासांनीं बरेंचसें साहित्य जमवून ठेवलें असावें, एवढेंच केवळ नव्हे तर ग्रंथसमाप्ति देखील झाली होती व याच कारणामुळें कांहीं ग्रंथांत भविष्यकालीन राजे म्हणून परीक्षित् वगैरेंचीं नांवें येतात.

२. दुसरा काल पौरव राजा अधिसीमकृष्ण याच्या वेळचा होय. कुरुयुद्धानंतरच्या सूतवाङ्मयाचें एकीकरण याच्या वेळीं त्याच्या सत्रप्रसंगामुळें झालें असावें. (परिच्छेद १११ पहा)

३. अधिसीमाच्या कालानंतर आणि पौरवांच्या अंतापूर्वी पौरव राजा शतानीक याच्या कारकीर्दीत आणखी एक एकत्रीकरण झालें असावें, असें पार्गिटेरच्चेंच साहित्य पाहून म्हणतां येईल (परिच्छेद १११ पहा.)

४. चवथें पुराणसंस्करण शैशुनागांच्या अंतकालीं म्हणजे ख्रि. पू. चवथ्या शतकांत झालें असावें. (परिच्छेद १११ पहा)

५. आंध्रांच्या अंतकाळीं त्याच्या पुढील संकलन झालें आहे. (परिच्छेद ११२ पहा.)

६. पांचवा म्हणजे शेवटचा महत्त्वाचा टप्पा म्हटला म्हणजे गुप्तकालीन होय; कारण गुप्तांच्या पूर्ण विजयांची माहिती यांत नाहीं

## १०८. भिन्नभिन्न हस्तलिखितें, त्यांतील अन्योन्याश्रय व त्यांवरून भविष्यपुराणाच्या लेखनिविष्टतेबद्दल पार्गिटेरचें अनुमान.

१०८. आपल्या कांहीं प्रतींसंबंधानें पार्गिटेर पुढील विधान करीत आहेत.

एका ('डी वायु–जोन्स प्रत या) हस्तलिखितामध्यें सर्व इतिहास आहे. पण त्या लिखितांतील पाठ मत्स्याचा पाठ आणि वायूच्या इतर प्रतींतील पाठ यांच्या मधील आहे. याचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें करतां येईल. मत्स्यानें भविष्यामधून तिसऱ्या शतकापर्यंत असलेला अपुरा इतिहास घेतला; व वायूनें गुप्तराज्याच्या हकीकतीपर्यंतचा इतिहास ताबडतोब घेतला.

'ई–वायु' या प्रतीचा हाच पाठ होय. यानंतर पुनः एकदां लगेच भविष्याची तपासणी होऊन सुधारणा झाली असावी. हा सुधारलेला इतिहास वायूनें जो घेतला तोच इतर वायुप्रतींचा पाठ असावा. भविष्यपुराण प्रथम तपासणीच्या वेळीं लिहिलेलें होतें, हें वायूच्या सर्व हस्तलिखितांमध्यें आलेल्या 'पठित' या शब्दावरून सिद्ध होतें.

हें जर स्पष्टीकरण बरोबर असेल तर मत्स्यपाठ हा वायु आणि ब्रह्मांड यांच्यापेक्षां जुना असला पाहिजे, आणि ई–वायु ही वायूची अगदीं प्रथम प्रत होय. या सर्व पाठांच्या भाषाशैलीवरूनहि हेंच सिद्ध होतें.

मत्स्य, वायु आणि ब्रह्मांड या सर्वांमध्यें कलियुगांतील दुःस्थिति, राजपरंपरा व ज्योतिष यांविषयीं गोष्टींचा इतिहास आहे; परंतु यासंबंधीं वायु व ब्रह्मांड यांच्या पाठामध्यें मत्स्यपाठापेक्षां ३२ ओळी जास्त आहेत व ई–वायु या प्रतीमध्यें सुद्धां हा अधिक इतिहास आहे. अर्थात् प्रथम तो तपासण्याच्या वेळेलाच जोडला पाहिजे.

राजपरंपरा व ज्योतिष यांसंबंधीं मात्र बहुतेकांचा एक मेळ दिसतो. ( २७०० वर्षांचें सप्तर्षिचक्र तेव्हां ज्ञात होतेंसें दिसतें. )

पार्गिटेरच्या वरील म्हणण्यांत माझ्या दृष्टीनें दोष एवढाच आहे कीं, पार्गिटेर यांनीं त्यांस उपलब्ध असलेल्या प्रतींचा अंतिमसंस्करणकाल तेवढाच विचारांत घेतला आहे. खरोखर पहातां नवीन नवीन माहिती पुराणांत घालण्याची क्रिया एकसारखी चालूच होती. तीविषयीं सविस्तर विवेचन कांहीं पूर्वी व कांहीं पुढें ( परिच्छेद १११ ) दिलेंच आहे.

## १०९. पाठांची भिन्नता व अशुद्धता यांवरून लिपीवर प्रकाश.

१०९. निरनिराळे पाठ व नांवांतील अशुद्धता यांवरूनहि बरीच माहिती मिळण्याजोगी आहे. हे जे निरनिराळे पाठ झाले आहेत ते बहुतेक वाचण्याच्या व लिहिण्याच्या चुकांमुळेंच झाले असावेत. चुकांच्या सारखेपणावरून मूळ ग्रंथ कोणत्या लिपींत लिहिलेला असावा, हें काढतां येतें, व त्या लिपीच्या कालावरून त्या ग्रंथाचा काल कोणता असावा म्हणजे कोणता ग्रंथ जुना आहे व कोणता नंतरचा आहे याचा निर्णय करतां येतो.

असल्या चुका मत्स्य, वायु व विष्णु यांच्यामध्यें आढळतात. पार्गिटेर साहेबांच्या मतें या चुका खरोष्ठी लिपींतील अक्षरसादृश्यामुळें वाचनाच्या चुका होऊन उद्भवलेल्या आहेत व त्यांवरून त्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें अनुमानें काढलीं आहेत. "हा इतिहास प्रथम खरोष्ठीमध्यें लिहिलेला असला पाहिजे. सर्व पुराणांचा मूळ आधार 'भविष्यपुराण' हा असल्यामुळें तेंच प्रथम खरोष्ठीमध्यें लिहिलें गेलें असावें आणि ज्याअर्थी इ. स. ३३० च्या पुढें खरोष्ठी लिपी हिंदुस्थानांत प्रचलित

राहिली नव्हती त्याअर्थी तें पुराण त्याच्या पूर्वीच लिहिलेलें असलें पाहिजे.

पुराणें आरंभीं खरोष्ठी लिपींतच होतीं, हें पार्गिटेरसाहेबांचें अनुमान अनेक पुराणांच्या बाबतींत बरोबर असलें तरी सर्व पुराणांच्या बाबतींत स्वीकारण्यास पुष्कळच अडचणी आहेत हें लिपीसंबंधीं माहिती देतांना दाखविलें आहे.

**११०. प्राकृत इतिहासाचें संस्कृतमध्यें रूपांतरः—**

११०. राजघराण्यांचा इतिहास देणें हा पुराणांचा विषय असल्यामुळें भविष्य पुराणांत त्याचें नांव सार्थ करण्याकरितां त्याच्यामागून जीं घराणीं झालीं त्यांचा निर्देश करणें भाग होतें. यामुळें पूर्वी जो प्राकृतामध्यें लिहिलेला श्लोकबद्ध इतिहास होता त्याचें संस्कृतमध्यें रूपांतर करून तो त्यांत अंतर्भूत करण्यांत आला.

पूर्वीचे लेख प्राकृत श्लोकांमध्यें असल्यामुळें रूपांतर करतांना प्राकृत शब्दांच्या ऐवजीं संस्कृत शब्द ठेवणें व भूतकाळाच्या जागीं भविष्यकाळ करणें एवढाच फेरफार करण्याची आवश्यकता होती. या क्रियेंत हें रूपांतर अशुद्ध झालें व कोठें कोठें व्याकरणाचा दोष व वृत्तभंगहि झाला. याच चुका पुढें मत्स्यादि ज्या पुराणांनीं भविष्यावरून मजकूर घेतला त्यांतहि शिरल्या.

**१११. कालप्रगति व पुराणस्वरूप.–१. शतानीककालीन संस्कार. २. नंदकालीन संस्कार.**

१११. बार्हद्रथ आणि ऐक्ष्वाकू हीं घराणीं गरुडपुराण देतें; पण प्रद्योत, शैशुनाग, नंद वगैरे घराणीं देत नाहीं. त्यावरून असें दिसतें कीं, पौरव राजा शतानीक याच्या कालांतच गरुडपुराणाचें एक हस्तलिखित तयार झालें,* आणि त्या वेळेस प्रद्योत आणि शैशुनाग हीं घराणीं अस्तित्वांत नव्हतीं; त्यामुळें त्या घराण्यांच्या याद्या त्या पुराणांत समाविष्ट झाल्या नाहींत. या ग्रांथिक स्थितीवरून असें दिसतें कीं, शतानीकाच्या कालीं आपल्या कालापर्यंत इतिहास आणून सोडणारा एक नवीन संपादक निघून त्यानें एक पुरवणी जोडली.

यानंतर लगेच पुरवणी जोडण्याचा काल केव्हां आला, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं; तथापि आणखी एक पुरवणी नंदाच्या आद्यकालीं जोडली असावी.

बार्हद्रथ, ऐक्ष्वाकु, पौरव इत्यादि प्राचीन घराण्यांपेक्षां उत्तरकालीन शैशुनाग आणि नंद घराण्यांतील राजे विष्णु व भागवत पुराणांत आले आहेत; पण यांच्याशीं समकालीन असलेले इतर राजे ( एककालं महीक्षितः ), ज्यांचीं नांवें मत्स्य पुराणानें शैशुनाग आणि नंद यांच्या दोहोंच्या मध्येंच घातलीं आहेत, ते राजे विष्णु आणि भागवत यांच्यामध्यें उल्लेखित नाहींत.

**एतैःसार्धं भविष्यंति तावत्कालं नृपाः परे ।**
**तुल्यकालं भविष्यंति सर्वे ह्येते महीक्षितः ॥**
**ऐक्ष्वाकवश्चतुर्विंशत् पंचालाः सप्तविंशतिः ।**
**काशेयास्तु चतुर्विंशदष्टाविंशतिर्हैहयाः ॥**
**कलिंगाश्चैव द्वात्रिंशदश्मकाः पंचविंशतिः ।**
**कुरवश्चापि षट्त्रिंशदष्टाविंशति मैथिलाः ॥**
**शूरसेनास्त्रयोविंशद्वीतिहोत्राश्च विंशतिः ।**
**एते सर्वे भविष्यंति एककालं महीक्षितः ॥ †**

प्रस्तुत श्लोकांचा सारांश ५७ व्या परिच्छेदांत (पृ. ३९) दिलाच आहे.

शैशुनागांनंतर नंद राजे आले आणि नंदांनीं सार्वभौमत्व मिळविलें, व जुनीं क्षत्रिय घराणीं नष्ट केलीं. हीं क्षत्रिय घराणीं सुरु केव्हां झालीं हें आपणांस ठाऊक नाहीं. तीं नष्ट केव्हां झालीं हें मात्र ठाऊक आहे. आणि यानंतर निरनिराळ्या पुराणांत निरनिराळ्या पुरवण्या निरनिराळ्या संपादकांनीं जोडल्या आहेत; आणि त्यावरून शैशुनागांचा अंतकाल, तो पुराणसंपादनाचा महत्त्वाचा काल होता, असें म्हणतां येईल.

विष्णु आणि भागवत यांच्यामध्यें वरील दोन घराण्यांतील पुरुषांचीं नांवें आलीं आहेत; तथापि तीं भिन्न स्वरूपांत आहेत. भागवतानें श्लोकरचना केली आहे तर विष्णु पुराणांत हा भाग गद्यांत आला आहे. यावरून या दोन पुराणांनीं स्वतंत्र साहित्यांतून आपली माहिती घेतली असावी, असा तर्क पार्गिटेरनीं काढला आहे; या दोन पुराणांनीं आपल्या पुरवण्या ग्रंथांत केव्हां समाविष्ट केल्या, हें सांगतां येत नाहीं. त्या पुराणांना अनेक संपादक उत्पन्न होऊन त्यांनीं एकसारख्या पुरवण्या वाढविल्या असतील किंवा बऱ्याच उत्तरकाळीं म्हणजे चवथ्या शतकांत एखाद्या संपादकानें जितक्या उपलब्ध होतील तितक्या याद्या घातल्या असतील.

हे सर्व प्रश्न विष्णु आणि भागवत यांच्या उत्तरकालीन संपादनासंबंधाचे आहेत; तथापि नवीन मजकूर कोठपासून घातला तें पाहिलें असतां त्याच्या अगोदरच्या संपादकांचा काल उघड होतो, आणि तो म्हटला म्हणजे नंदांच्या विजयाचा काल होय.

* abGr. The Purāna Text of Pargiter, p. 4.

† The Purāna text of Pargiter, p. 24.

## ११२. आंध्रविनाशानंतरचें संस्करण.

११२. पुराणांतील माहिती वाढविण्याचा यानंतरचा महत्त्वाचा काल म्हटला म्हणजे आंध्रांच्या लोपानंतरचा होय. नंदाच्या विजयापासून आंध्रांच्या विनाशापर्यंत अनेक संस्करणें झालीं असावींत; तथापि त्याचे पुरावे हस्तलिखितांच्या स्थितीवरून देतां येत नाहींत. आंध्रांनंतर जीं त्यांच्या सरदार वगैरेंचीं घराणीं झालीं तेथपर्यंत येऊन मत्स्यपुराण थांबलें आहे. विदिशा वगैरे ठिकाणचीं घराणीं मत्स्यपुराणांत नाहींत. त्यामुळें त्याच्या पुढच्या काळच्या इतिहासासाठीं मत्स्यपुराण हें साहित्य नाहीं. मत्स्यपुराणाच्या पोथीची शेवटची आवृत्ति तयार झाल्यानंतर जीं अनेक घराणीं विराजलीं त्यांचा इतिहास वायु, ब्रह्मांड याच पुराणांत आलेला आहे. यानंतर बराच काल पुराणवर्धनाची क्रिया थांबली असें दिसतें. तथापि पुराणसंवर्धनाची क्रिया अजीबात संपली असें मात्र नाहीं. कांहीं कथाभाग ( वेंकटेश्वराच्या भविष्यपुराणाच्या प्रतींत जो भाग नाहीं तो भाग) भविष्यपुराणांतून घेतला अथवा भविष्य जाणणाऱ्या मंडळींनीं सांगितलेला ( भविष्यज्ञैरुदाहृतः ) असें 'वायु' सांगत आहे. तर मत्स्यपुराण 'विप्रैर्गीतः पुरातनैः' म्हणजे प्राचीनकाळीं विप्रांनीं गाइलेला असें स्पष्टपणें कबूल करीत आहे. त्यांत भविष्यवादाचें सोंग केलेलें नाहीं.

भविष्यपुराणांतून कोणता भाग घेतला आणि दुसऱ्या ठेव्यांतून कोणता घेतला याविषयीं स्पष्ट माहिती आज आपणांस मिळविणें कठीण आहे; कारण भविष्यपुराणाच्या ज्या प्रतींतून मत्स्यादि पुराणांनीं माहिती घेतली अशी पार्गिटेरनीं कल्पना केली आहे ती आवृत्ति उपलब्ध नाहीं. वेंकटेश्वर छापखान्यांत छापलेली भविष्यपुराणाची प्रत बाष्कळ मंडळींनीं हाताळून अगदीं बदलून टाकलेली आहे, आणि तींतून मत्स्यादि पुराणांनीं जो भाग घेतला तो भाग मुळींच सांपडत नाहीं. पार्गिटेर यांना भविष्यपुराणाचीं जीं हस्तलिखितें पहावयास मिळालीं त्यांत कलियुगांतील घराण्यांच्या वंशावली मुळींच नाहींत.

इतकें जरी आहे तरी पुराणांत एकेक घराण्याची वंशावलि वाढत गेली, हें दाखविणें कठीण नाहीं. व्यासांनीं बनविलेल्या पुराणग्रंथांत मन्वंतरें सांगितलीं होतीं, पुढें कलियुग येणार हें सांगितलें होतें; पण कलियुगांतील राजघराणीं सांगितलीं होतीं असें मत्स्य, वायु हीं पुराणें म्हणत नाहींत व त्यावरून खरोखर नंदोत्तर घराणीं त्यांत होतीं किंवा नव्हतीं याविषयीं शंका येते.

## ११३. पौराणिक साहित्याच्या विश्वसनीयतेसंबंधीं विधानाचा समारोप.

११३. कलियुगांतील राजघराणीं म्हणून जीं घराणीं अनेक पुराणग्रंथांतून आलीं आहेत त्या घराण्यांतील पुरुषांच्या यादी भिन्नकाळीं तयार झाल्या आणि त्या भिन्न पुराणांत समाविष्ट झाल्या; आणि एका पुराणाच्या नवीन आवृत्तीनें अगर संपादकानें दुसऱ्या पुराणांतून यादी घेऊन त्या आपल्या ग्रंथांत समाविष्ट कराव्यात अशी क्रिया झालेली दिसते.

विशिष्ट पुराणाच्या संपादकांनीं ग्रंथ त्यांच्या काळापर्यंत आणण्यासाठीं पुराणाबाहेरचेंहि साहित्य वापरलें होतें यांत शंका नाहीं. ज्यावेळेस एखादी नवीन यादी एखाद्या पुराणांत समाविष्ट होत असेल तेव्हां राजावलि लोकांच्या स्मृतींत ताजी असल्यामुळें ती माहिती बहुतेक बरोबर असण्याचा संभव आहे. निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या ग्रंथांतून किंवा माहितीच्या भांडारांतून माहिती कशी समाविष्ट झाली आहे, याविषयीं थोडेंसें विवेचन संशोधकांच्या कार्यक्रमाविषयीं विश्वास उत्पन्न करील. एकेक घराणें ग्रंथीं निविष्ट झालें, अनेक घराण्यांची काल्पनिक यादी तयार होऊन ग्रंथांत शिरली नाहीं, एवढें आपणांस इक्ष्वाकु, पौरव, बार्हद्रथ, प्रद्योत, शैशुनाग, नंद, मौर्य, शुंग, काण्व, आंध्र इत्यादि घराण्यांसंबंधानें म्हणतां येईल. अगदीं कृत्रिम काल्पनिक याद्या पौराणिक म्हणविणाऱ्या ग्रंथांत नाहींत असें नाहीं. यदु, पुरु वगैरेंच्या ज्या अनेक अगोदरच्या वंशावली ग्रंथांत समाविष्ट आहेत त्या संशयास्पद आहेतच. शिवाय विशिष्ट जातीस क्षत्रिय बनविण्यासाठीं ज्या वंशावली तयार होऊन सह्याद्रिखंड वगैरे ग्रंथांत शिरल्या आहेत त्या बनावट आहेत. तथापि त्या प्रकारच्या याद्यांहून वर उल्लेखिलेल्या कुलांच्या याद्या अगदीं निराळ्या कोटींतील दिसतात.

---

# पुराणोक्त राजावलि आणि तिची उदयन आणि बुद्ध यांच्या कालांशीं संगति.

**११४. पुराणोक्त राजावली आणि अवांतर माहिती यांची संगति.**

११४. पौराणिकांच्या वाङ्मय क्षेत्रांतील चळवळीचा जो स्थूल वृत्तांत आतांपर्यंत दिला आहे त्यावरून त्यांची चळवळ दीर्घकालीन होती हें दिसून आलेंच असेल. या तऱ्हेचा, धार्मिक दृष्टीनें म्हणजे लोकांच्या उपासनांच्या एकीकरणाच्या दृष्टीनें, आणि राजांच्या इतिहाससंरक्षणाच्या दृष्टीनें जो वर्ग महत्त्वाचा होता त्याचें सातत्य एकदम नाहींसें झाल्यासारखें कां झालें याचीं कारणें देखील मागें सूचित केलींच आहेत. अभिरुचींत बदल होऊन हा जरी राजाश्रयहीन झाला तरी एकाएकीं नष्ट झाला नाहीं. त्यांनीं केलेलें काम सर्व जनास उपयोगी होतें. पुराणांतील मजकूर वाढविणारांचा वर्ग आपलें सातत्य वाकाटकांच्या वराण्याच्या संस्थापनेपर्यंत चालवून इतिहाससंरक्षणाचें कार्य करीत राहिला होता असें दिसून येईल; तथापि सूतवर्गापासून हा वर्ग दूरीकृत झाला होता असेंहि दिसेल.

पौराणिक वर्गानें जें साहित्य निर्माण केलें त्यांत वारंवार वाढ होत गेली आणि राजनामांचें लेखकाकडून भ्रष्टीकरण होत गेलें, त्यामुळें इतिहासज्ञान बरेंच संदेहात्मक झालें आहे. संदेहांतून बाहेर पडावें यासाठीं ग्रंथपाठशोधन वगैरे इतिहासशास्त्राचीं उपांगें कार्यकारी झालीं आहेत; त्या तऱ्हेनें जें फलित मि. पार्गिटेर यांनीं आपल्यापुढें ठेविलें आहे त्याचें आतां अवलोकन करूं.

उत्तरकालीन राजकीय स्थितीचा आढावा घेण्याच्या पूर्वी परंपरागत आलेल्या राजमालिकांवर एकदां तरी नजर टाकणें अवश्य आहे; या राजमालिका पुराणांतून घेऊन पुढें मांडल्या जात आहेत आणि त्या पुढें मांडण्यासाठीं लागणारें समर्थन मागच्या प्रकरणांत आलें आहे.

पुराणोक्त राजावलीची योग्यता पार्गिटर यांनीं चांगल्या तऱ्हेनें पुढें मांडल्यानंतर ती आज अनेक संशोधकांस पटली आहे. आणि त्या राजावलीचा उपयोग करून इतर साहित्याशीं संगति जोडण्याचा प्रयत्न करण्याकडे आजच्या संशोधकांचें लक्ष लागूं लागलें आहे. आतां राजावलीकडेसच वळूं.

**११५. राजनामकथनाचे श्लोक व भाषांतर.**

११५. जेथें वायु आणि मत्स्य यांत भेद आहे तेथें मत्स्य पुराणांतील पाठ दिला आहे, आणि वायूनें सांगितलेले महत्त्वाचे पाठभेद शेवटीं टीपांत दिले आहेत.

पौरव घराणें.

**अभिमन्योः परीक्षित् तु पुत्रः परपुरंजयः**
**जनमेजयः परीक्षितः पुत्रः परमधार्मिकः**
**जनमेजयाच्छतानीकस्तस्माज्जज्ञे स वीर्यवान् ***
**पुत्रोऽश्वमेधदत्तोऽभूच्छतानीकस्य वीर्यवान्**
**पुत्रोऽश्वमेधदत्ताद्वै †जातः परपुरंजयः**
**अधिसीमकृष्णो धर्मात्मा सांप्रतं यो महायशाः**

**अधिसीमकृष्णपुत्रो निचक्षुर्भविता नृपः**
**गंगयाऽपहृते तस्मिन् नगरे नागसाह्वये**
**त्यक्त्वा निचक्षुर्नगरं कौशांब्यां स निवत्स्यति**
**भविष्याष्टौ सुतास्तस्य महाबलपराक्रमाः**
**भूरिर् ज्येष्ठस्सुतस्तस्य तस्य चित्ररथः स्मृतः ‡**
**शुचिद्रथश् चित्ररथाद् वृष्णिमाँश्च शुचिद्रथात्**
**वृष्णिमतः सुषेणश्च भविष्यति शुचिर्नृपः**
**तस्मात्सुषेणाद् भविता सुनीथो नाम पार्थिवः**
**रुचः सुनीथाद्भविता नृचक्षुर्भविता ततः**
**नृचक्षुपस्तु दायादो भविता वै सुखीबलः**
**सुखीबलसुतश्चापि भावी राजा परिप्लवः**
**परिप्लवसुतश्चापि भविता सुनयो नृपः**
**मेधावी तस्य दायादो भविष्यति नराधिपः**
**मेधाविनः सुतश्चापि भविष्यति नृपंजयः**
**दुर्वो भाव्यः सुतस्तस्य तिग्मात्मा तस्य चात्मजः**
**तिग्माद्बृहद्रथो भाव्यो वसुदानो बृहद्रथात्**

---

* या तीन ओळीं ऐवजीं खालील तीन ओळी वायुपुराणांत आहेत.

**उत्तरायांतु वैराट्यां परीक्षिदभिमन्युजः**
**परीक्षितस्तु दायादो राजाऽसीज्जनमेजयः**
**तस्य पुत्रः शतानीको बलवान् सत्यविक्रमः ।**

† सहस्रानीक या नांवाचा राजा जनमेजयपुत्र शतानीक याचा मुलगा होता, अशा अर्थाचा श्लोकार्ध ( सहस्रानीकः तत्पुत्रो ततश्चैवाश्वमेधजः ) भागवतांत आला आहे. तथापि त्याला आधार देणारा उल्लेख अन्यत्र कोठें नाहीं.

‡ **भविष्यदुष्णस्तत्पुत्र उष्णाच्चित्ररथः स्मृतः**(वायु)

**वसुदानाच्छतानीको भविष्योदयनस्ततः**
**भविष्यते चोदयनात् वीरो राजा वहीनरः**
**वहीनरात्मजश्चैव दण्डपाणिर्भविष्यति**
**दण्डपाणेर्निरामित्रो निरामित्रात् तु क्षेमकः**
**पंचविंशा नृपा ह्येते भविष्याः पुरुवंशजाः**
**अत्रानुवंशः श्लोकोऽयं गीतो विप्रैः पुरातनैः**
**ब्रह्मक्षत्रस्य यो योनिर्वंशो देवर्षिसत्कृतः**
**क्षेमकं प्राप्य राजानं संस्थां प्राप्स्यति वै कलौ**
**इत्येष पौरवो वंशो यथावदनुकीर्तितः**
**धीमतः पण्डुपुत्रस्य अर्जुनस्य महात्मनः**

विराटाची कन्या उत्तरा हिच्यापासून अभिमन्यूला श्रेष्ठ व वीर्यशाली असा परीक्षित् नांवाचा पुत्र झाला. या परीक्षिताचा पुत्र महान् धार्मिक जनमेजय, त्याचा पुत्र वीर्यशाली शतानीक, त्याचा पुत्र वीर अश्वमेधदत्त, या अश्वमेधदत्ताचा पुत्र महान् योद्धा व धर्मात्मा अधिसीमकृष्ण हा सांप्रतकालीं अति यशस्वितेनें राज्य करीत आहे.

अधिसीमकृष्णाचा पुत्र निचक्षु राजा होईल. गंगेच्या पुरांत त्याचें नाग ( हस्तिनापुर ) नांवाचें नगर वाहून गेलें म्हणजे तें सोडून तो कौशाम्बी नगरांत वास करील. त्याला महापराक्रमी असे आठ बलवान् पुत्र होतील. त्याचा ज्येष्ठ पुत्र भूरि [ किंवा वायुपुराणाप्रमाणें " उष्ण " ] नांवाचा होईल. त्या भूरीनंतर चित्ररथ नांवाचा (राजा) होईल, असें स्मरतें. चित्ररथानंतर शुचिद्रथ, शुचिद्रथानंतर वृष्णिमान्, वृष्णिमानानंतर सुषेण हा शुद्ध राजा होईल. त्या सुषेणानंतर सुनीथ नांवाचा राजा, सुनीथानंतर रुच, त्याच्यानंतर नृचक्षु, नृचक्षुचा वारस ( दायादः ) सुखीबल, सुखीबलानंतर त्याचा पुत्र परिप्लव, परिप्लवानंतर त्याचा पुत्र सुनय राजा होईल. त्या सुनयाचा वारस ( दायादः ) मेधावी राजा होईल. मेधावीचा पुत्र नृपंजय, त्याचा पुत्र दुर्व हा खात्रीनें ( भाव्यः ) राजा होईल. त्या दुर्वाचा पुत्र तिग्मात्मन्, तिग्मानंतर बृहद्रथ, बृहद्रथानंतर वसुदान, वसुदानानंतर शतानीक व त्याच्यानंतर उदयन राजा होईल.

या उदयनाचा पुत्र वीर वहीनर राजा होईल. वहीनरानंतर दण्डपाणि, दण्डपाणीनंतर निरामित्र, निरामित्रानंतर क्षेमक, हे राजे होतील.

याप्रमाणें पुरुवंशांत हे पंचवीस राजे व्हावयाचे आहेत. ह्या वंशावलीविषयीं पुरातन ब्राह्मणांनीं हें काव्य गायिलें. "देव व ऋषि यांजकडून सत्कारला गेलेला हा वंश, ज्याच्यापासून ब्राह्मण व क्षत्रिय उत्पन्न झाले, तो क्षेमकापर्यंत आला म्हणजे कलियुगांत संस्था पावेल."

याप्रमाणें हा पंडुपुत्र बुद्धिमान् व महात्मा अर्जुन याच्यापासून उत्पन्न झालेला पौरववंश जसाच्या तसा अचूक सांगितला गेला आहे.

इ क्ष्वा कु वं श.

**अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि इक्ष्वाकूणां महात्मनाम्**
**बृहद्बलस्य दायादो वीरो राजा बृहत्क्षयः**
**उरुक्षयः सुतस्तस्य वत्सव्यूह उरुक्षयात्**
**वत्सव्यूहात् प्रतिव्योमस्तस्य पुत्रो दिवाकरः**
**तस्यैव मध्यदेशे तु अयोध्या नगरी शुभा***

**दिवाकरस्य भविता सहदेवो महायशाः**
**सहदेवस्य दायादो बृहदश्वो महामनाः**
**तस्य भानुरथो भाव्यः प्रतीताश्वश्च तत्सुतः**
**प्रतीताश्वसुतश्चापि सुप्रतीको भविष्यति**
**मरुदेवः सुतस्तस्य सुनक्षत्रश्च तत्सुतः**
**किन्नराश्वः सुनक्षत्राद् भविष्यति परंतपः**
**किन्नराद् अंतरिक्षस्तु भविष्यति महामनाः**
**सुषेणश्चांतरिक्षाच्च सुमित्रश्चाप्यमृतजित् †**
**पुत्रस्तस्य बृहद्भ्राजो धर्मी तस्य सुतः स्मृतः**
**पुत्रः कृतंजयो नाम धर्मिणः स भविष्यति**
**कृतंजयसुतो विद्वान् भविष्यति रणंजयः**
**भविता संजयश्चापि वीरो राजा रणंजयात्**
**संजयस्य सुतः शाक्यः शाक्याच्छुद्धोदनोऽभवत्**
**शुद्धोदनस्य भविता सिद्धार्थो राहुलः सुतः**
**प्रसेनजित्ततो भाव्यः क्षुद्रको भविता ततः**
**क्षुद्रकात्कुलको भाव्यः कुलकात्सुरथः स्मृतः**
**सुमित्रस्सुरथस्यापि अंत्यश्च भविता नृपः**
**एत ऐक्ष्वाकवः प्रोक्ता भविष्या ये कलौ यु**
**बृहद्बलान्वये जाता भविष्याः कुलवर्धनाः**
**शूराश्च कृतविद्याश्च सत्यसंधा जितेंद्रियाः**
**निःशेषाः कथिताश्चैव नृपा ये वै पुरातनाः**
**अत्रानुवंशश्लोकोऽयं विप्रैर्गीतः पुरातनैः**
**इक्ष्वाकूणामयं वंशः सुमित्रांतो भविष्यति**
**सुमित्रं प्राप्य राजानं संस्थां प्राप्स्यति वै कलौ**
**इत्येवं मानवो वंशः प्रागेव समुदाहृतः ‡**

यानंतर महात्मे असे जे इक्ष्वाकु त्यांची वंशावलि सांगेन. बृहद्बलाचा वारस ( दायादः ) वीर राजा बृहत्क्षय होता.

*यश्च सांप्रतमध्यास्ते अयोध्यां नगरीं नृपः (वायु)
†भवितां चांतरिक्षास्तु किन्नरस्य सुतो महान्
अंतरिक्षात्सुपर्णस्तु सुपर्णाच्चाप्यमृतजित् (वायु)
‡इत्येव मानवं क्षत्रं, ऐलंच समुदाहृतम् ( वायु )

त्याचा मुलगा उरुक्षय, त्याच्यानंतर त्याचा पुत्र वत्सव्यूह, व वत्सव्यूहानंतर त्याचा पुत्र प्रतिव्योम राजा झाला. त्या प्रतिव्योमानंतर त्याचा पुत्र दिवाकर राजा सांप्रतकालीं मध्यदेशांत अयोध्या नामक शुभ नगरींत राज्य करीत आहे.

दिवाकरानंतर सहदेव विख्यात राजा होईल. सहदेवाचा वारस महात्मा बृहदश्व होईल. त्याचा वारस भानुरथ होईल; त्याचा पुत्र प्रतीताश्व व प्रतीताश्वाचा पुत्र सुप्रतीक हे राजे होतील. त्याचा मुलगा मरुदेव, त्याचा मुलगा सुनक्षत्र व सुनक्षत्रानंतर विजयी किन्नराश्व राजा होईल. अंतरिक्ष हा किन्नराश्वाचा थोर पुत्र होईल. अंतरिक्षानंतर सुषेण, सुषेणानंतर अमित्रजित् ऊर्फ सुमित्र, त्या सुमित्राचा पुत्र बृहद्भ्राज व त्याचा पुत्र धर्मी हा स्मरला जातो. धर्मीचा पुत्र कृतंजय नांवाचा होईल. कृतंजयाचा पुत्र विद्वान् असा रणंजय होईल. राजा रणंजय यापासून वीर संजय हा राजा होईल. संजयाचा पुत्र शाक्य व शाक्याचा शुद्धोद्धन हे राजे झाले. शुद्धोद्धनाचा पुत्र सिद्धार्थ राहुल होईल. त्याच्यानंतर प्रसेनजित् राजा होईल; त्याच्यानंतर क्षुद्रक, क्षुद्रकानंतर कुलक व कुलकानंतर सुरथ हा स्मरला जातो. सुरथाचा पुत्र सुमित्र हा शेवटचा राजा होईल.

याप्रमाणें कलियुगांत होणारे ऐक्ष्वाकु राजे वर्णिले आहेत. बृहद्बलाच्या वंशांत झालेले असे ते शूर, विद्वान्, सत्यभाषणी व जितेंद्रिय असे होतील, व कुलाचें वर्द्धन करतील. हे सर्व राजे जे प्राचीनकाळीं होऊन गेले ते वर्णिले गेले आहेत. प्राचीन ब्राह्मणांनीं या वंशावलीविषयीं असें म्हटलें आहे: इक्ष्वाकूच्या वंशाचा सुमित्राबरोबरच शेवट होईल. सुमित्रापर्यंत आल्यानंतर तो कलियुगांत खात्रीनें नष्ट होईल. मनु ( किंवा ऐल ) यांच्यापासून उत्पन्न झालेला हा क्षत्रिय वंश अशाप्रकारें वर्णिला गेला आहे.

बा र्ह द्र थ घ रा णें.

**अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि मागधा ये बृहद्रथाः ।**
**जरासंधस्य ये वंशे सहदेवान्वये नृपाः ॥**
**अतीता वर्तमानाश्च भविष्याश्च तथा पुनः ।**
**प्राधान्यतः प्रवक्ष्यामि गदतो मे निबोधत ॥**
**संग्रामे भारते वृत्ते सहदेवे निपातिते ।**
**सोमाधिस्तस्य दायादो राजाऽभूत् स गिरिव्रजे ॥**
**पंचाशतं तथाऽष्टौ च समा राज्यमकारयत् ।**
**श्रुतश्रवाश्चतुःषष्टिं समास्तस्यान्वयेऽभवत् ॥**
**अयुतायुस्तु षड्विंशद्राज्यं वर्षाण्यकारयत् ।**
**चत्वारिंशत् समास्तस्य निरमित्रो दिवंगतः ॥ ***

**पंचाशतं समाःषट् च सुक्षत्रः प्राप्तवान्महीम् ।**
**त्रयोविंशद्बृहत्कर्मा राज्यं वर्षाण्यकारयत् ॥**
**सेनाजित् संप्रयातश्च भुक्त्वा पंचाशतं महीम् । †**
**श्रुतंजयस्तु वर्षाणि चत्वारिंशद् भविष्यति ॥**
**महाबलो महाबाहुः महाबुद्धिपराक्रमः ।**
**अष्टाविंशति वर्षाणि महीं प्राप्स्यति वै विभुः ॥**
**अष्टपंचाशतं चाब्दान् राज्ये स्थास्यति वै शुचिः ।**
**अष्टाविंशत् समा राजा क्षेमो भोक्ष्यति वै महीम् ॥ ‡**
**सुव्रतस्तु चतुःषष्टिं राज्यं प्राप्स्यति वीर्यवान् ।**
**पंचत्रिंशति वर्षाणि सुनेत्रो भोक्ष्यते महीम् ॥**
**भोक्ष्यते निर्वृतिश्चेमां अष्टपंचाशतं समाः ।**
**अष्टविंशत् समा राज्यं त्रिनेत्रो भोक्ष्यते ततः ॥**
**चत्वारिंशत् तथाऽष्टौ च दृढसेनो भविष्यति ।**
**त्रयस्त्रिंशत्तु वर्षाणि महीनेत्रो प्रकाश्यते ॥×**
**द्वात्रिंशत्तु समा राजा सुचलस्तु भविष्यति ।**
**चत्वारिंशत् समा राजा सुनेत्रो भोक्ष्यते ततः ॥××**
**सत्यजित्पृथिवीं राजा त्र्यशीतिं भोक्ष्यते समाः ।**
**प्राप्येमां विश्वजिच्चापि पंचविंशद् भविष्यति ॥**
**रिपुंजयस्तु वर्षाणि पंचाशत् प्राप्स्यते महीम् ।**
**षोडशैते नृपा ज्ञेया भवितारो बृहद्रथाः ॥**
**त्रयोविंशाधिकं तेषां राज्यं च शतसप्तकम् ।**
**द्वात्रिंशच्च नृपा ह्येते भवितारो बृहद्रथाः ॥**
**पूर्णं वर्षसहस्रं वै तेषां राज्यं भविष्यति ।**

यानंतर मगधाच्या बार्हद्रथ घराण्याचें वर्णन करितों. जरासंधाच्या वंशांत व सहदेवाच्या वंशांत होऊन गेलेल्या, होणार असलेल्या व सांप्रत कालीं विद्यमान असलेल्या राजांपैकीं प्रमुख असलेल्या राजांविषयीं मी सांगतों, तें ऐकून घ्या.

भारती युद्धांत जेव्हां सहदेव मारला गेला तेव्हां त्याच्यानंतर त्याचा वारस सोमाधि गिरिव्रज येथें राजा झाला. त्यानें ५८ वर्षें राज्य केलें. त्याच्या वंशांत श्रुतश्राव यानें ६४ वर्षें राज्य केलें. अयुतायूनें २६ वर्षें राज्य केलें. त्याचा वारस निरमित्र यानें ४० वर्षें पृथ्वीचा उपभोग घेऊन नंतर स्वर्गलोकीं गेला. सुक्षत्रानें ५६ वर्षें राज्य केलें, बृहत्कर्मा यानें २३ वर्षें राज्य केलें; आणि आतां सेनाजित् हा तितकींच म्हणजे २३ वर्षें पृथ्वीचा उपभोग घेत आहे.

* समाः शतं निरामित्रो महीं भुक्त्वा दिवं गतः ( वायु )

† सेनाजित्सांप्रतं चापि एता वै भोक्ष्यते समाः ( वायु )
पञ्चवर्षाणि पूर्णानि धर्मनेत्रो भविष्यति ( वायु )

× त्रयस्त्रिंशतुवर्षाणि सुमतिः प्राप्स्यते ततः ( वायु )

×× अष्टाविंशत्समाराज्यं सुश्रमस्य भविष्यति ( वायु )

महाशक्तिमान, महाबाहु, महाबुद्धिमान व पराक्रमी असा श्रुतंजय ४० वर्षें राज्य करील. विभु हा पृथ्वीवर २८ वर्षें राज्य करील. शुचि हा ५८ वर्षें राज्य करील. राजा क्षेम २८ वर्षें पृथ्वीचा उपभोग घेईल. शूर सुव्रत ६४ वर्षें राज्य करील. सुनेत्र ३५ वर्षें पृथ्वीचा उपभोग घेईल, व निर्वृति या पृथ्वीवर ५८ वर्षें राज्य करील. त्यानंतर त्रिनेत्र २८ वर्षे राज्योपभोग घेईल; दृढसेन ४८ वर्षें राज्य करील. महीनेत्र ३३ वर्षें प्रकाशेल. सुचल ३२ वर्षें राजा होईल. नंतर राजा सुनेत्र ४० वर्षें राज्योपभोग घेईल; राजा सत्यजित् ८३ वर्षें पृथ्वीचा उपभोग घेईल, आणि विश्वजित् या पृथ्वीला २५ वर्षें उपभोगील. रिपुंजय पृथ्वीचें ५० वर्षें राज्य करील.

हे १६ राजे भावी बार्हद्रथ म्हणून ओळखण्यांत यावे आणि त्यांचें राज्य ७२३ वर्षें होईल. आणि हे ३२ राजे भावी बार्हद्रथ आहेत. त्यांचें राज्य पूर्ण १००० वर्षेंपर्यंत होईल.

या रिपुंजयाचा शेवट कसा काय झाला याविषयीं पुराणें मूक आहेत. त्याच्यानंतर पुराणांत प्रद्योतांविषयीं श्लोक येत आहेत.

प्र द्यो त घ रा णें.

**बृहद्रथेष्वतीतेषु वीतिहोत्रेष्ववन्तिषु ।**
**पुलिकः स्वामिनं हत्वा स्वपुत्रमभिषेक्ष्यति ॥**
**मिषतां क्षत्रियाणां च बालकः पुलिकोद्भवः । ***
**स वै प्रणतसामन्तो भविष्यो नयवर्जितः ॥**
**त्रयोविंशत्समा राजा भविता स नरोत्तमः ।**
**चतुर्विंशत् समा राजा पालको भविता ततः ॥**
**विशाखयूपो भविता नृपः पंचाशतीम् समाः ।**
**एकविंशत् समा राजा सूर्यकस्तु भविष्यति ॥†**
**भविष्यति समा विंशत् तत्सुतो नंदिवर्धनः ।**
**द्विपंचाशत्ततो भुक्त्वा प्रणष्टाः पंच ते नृपाः ॥‡**

बार्हद्रथ, वीतिहोत्र व अवन्ती हे राजे नष्ट झाल्यावर§ पुलिक आपल्या स्वामीला ठार करील व क्षत्रियांच्या देखत आपला मुलगा प्रद्योत याला राज्याभिषेक करील. खरोखर ती ( प्रद्योत ) आसपासच्या राजांना आपले सामंत बनवील व न्यायविरहित राज्य करील. तो नरोत्तम २३ वर्षें राज्य करील व नंतर पालक हा २४ वर्षें, विशाखयूप ५० वर्षें व सूर्यक २१ वर्षें याप्रमाणें राज्य करील.

हे पांच राजे ५२ वर्षें पृथ्वीचा उपभोग घेऊन ( नंतर नष्ट होतील. )

हे पांच प्रद्योतवंशीय राजे १३८ वर्षें राहतील.

शै शु ना ग घ रा णें.

**हत्वा तेषां यशः कृत्स्नं शिशुनागो भविष्यति ।**
**वाराणस्यां सुतं स्थाप्य श्रयिष्यति गिरिव्रजम् ॥***
**शिशुनागश्च वर्षाणि चत्वारिंशत् भविष्यति ।**
**काकवर्णः सुतस्तस्य स त्रिंशत्प्राप्स्यते महीम् ॥**
**षट्त्रिंशत् चैव वर्षाणि क्षेमधर्मा भविष्यति ।**
**चत्वारिंशत् समा राज्यं क्षत्रौजाः प्राप्स्यते ततः ॥**
**अष्टाविंशति वर्षाणि विंबिसारो भविष्यति †**
**अजातशत्रुर्भविता पंचविंशत्समा नृपः ।**
**पंचविंशत्समा राजा दर्शकस्तु भविष्यति ॥**
**उदयो भविता तस्मात् त्रयस्त्रिंशत्समा नृपः ।**
**स वै पुरवरं राजा पृथिव्यां कुसुमाह्वयम् ॥**
**गंगाया दक्षिणे कूले चतुर्थेऽब्दे करिष्यति ।**
**चत्वारिंशत्समा भाव्यो राजा वै नंदिवर्धनः ॥**
**चत्वारिंशत् त्रयश्चैव महानंदी भविष्यति ।**
**इत्येते भवितारो वै शैशुनागा नृपा दश ॥**
**शतानि त्रीणि वर्षाणि षष्टिवर्षाधिकानि तु ।**
**शिशुनागा भविष्यंति राजानः क्षत्रबंधवः ॥**

त्यांचें सर्व यश शिशुनाग नष्ट करील व राजा होईल. वाराणशी येथें आपल्या पुत्राची स्थापना करून स्वतः गिरिव्रजाचा आश्रय करील. शिशुनाग ४० वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा काकवर्ण ३६ वर्षेंपर्यंत पृथ्वीचा उपभोग घेईल. क्षेमधर्म ४० वर्षें राज्य करील. क्षत्रौजस् ४० वर्षें राज्य करील. विंबिसार २८ वर्षेंपर्यंत राजा होईल. अजातशत्रु २५ वर्षें व दर्शक २५ वर्षें राज्य करतील. त्याच्यानंतर उदयिन् हा ३३ वर्षें राज्य करील.

आपल्या कारकीर्दीच्या ४ थ्या वर्षी पृथ्वीवर गंगेच्या दक्षिणतीरीं असलेल्या कुमुमपुर नगराला तो ( उदयिन् ) आपली राजधानी करील. राजा नंदिवर्धन ४० वर्षें राजा होईल, व महानंदि ४३ वर्षें राज्य करील.

हे दहा शैशुनाग राजे होतील. हे ३६० वर्षें राज्य करतील. हे क्षत्रियांचे नातलग होत.

---

* सुनिकः स्वामिनं हत्वा पुत्रं समभिषेक्ष्यति
मिषतां क्षत्रियाणां हि प्रद्योतः सुनिको बलात् (वायु)

† एकविंशत्समाराज्यं अजकस्य भविष्यति ( वायु )

‡ अष्टात्रिंशच्छतं भाव्याः प्रद्योतः पंच ते सुताः

§ प्रस्तुत अर्थ वादग्रस्त आहे. पार्गिटेरनीं लावलेला अर्थ वर दिला आहे.

* वाराणस्यां सुतस्तस्य स यास्यति गिरिव्रजम् ( वायु )

† ततस्तु विंशतिं राजा क्षेमधर्मा भविष्यति ( वायु )

नंदघराणें.

**महानंदिः सुतश्चापि शूद्रायां कलिकांशजः ।**
**उत्पत्स्यते महापद्मः सर्वक्षत्रांतको नृपः ॥**
**ततःप्रभृति राजानो भविष्या शूद्रयोनयः ।**
**एकराट् स महापद्म एकछत्रो भविष्यति ॥**
**अष्टाशीति तु वर्षाणि पृथिव्यांश्च भविष्यति ।**
**सर्वक्षत्रं अथोद्धृत्य भाविनार्थेन चोदितः ॥**
**सुकल्पादि सुता ह्यष्टौ समाद्वादश ते नृपाः ।**
**महापद्मस्य पर्याये भविष्यन्ति नृपाः क्रमात् ॥**
**उद्धरिष्यति तान् सर्वान् कौटिल्यो वै द्विरष्टभिः ।**
**भुक्त्वा महीं वर्षशतं ततो मौर्यान्गमिष्यति ॥**

महानन्दीला एका शूद्र स्त्रीपासून महापद्म नांवाचा कलिकांशज पुत्र होईल. हा राजा सर्व क्षत्रियांचा निःपात करील. त्याच्यानंतरचे राजे शूद्र जातीचे होतील. तो राजा ( पृथ्वीवर ) एकच राजा होईल व सर्व राजांना आपल्या सत्तेखालीं आणील. पृथ्वीवर तो ८८ वर्षें असेल. अनुकूल दैवाचा पाठिंबा मिळून सर्व क्षत्रियांचा तो निःपात करील. त्याला सुकल्प आदिकरून ८ पुत्र असतील व महापद्मानंतर एकामागून एक १२ वर्षेंपर्यंत राज्य करतील. नंतर एक कौटिल्य नांवाचा ब्राह्मण त्यांचें उन्मूलन करील, व त्यांनीं अशा प्रकारें १०० वर्षें राज्य केल्यावर तें मौर्यांकडे जाईल.

नंदघराण्याविषयींचा पाठ मत्स्य आणि वायु यांच्या सदृश आहे. भागवत आणि विष्णु यांत भिन्नता आहे. त्यांकडे सध्यांच लक्ष देण्यांत अर्थ नाहीं.

### ११६. बृहत्कथेंतील राजावलि आणि पौराणिक राजावलि.

११६. पौराणिक साहित्य आणि इतर साहित्य यांची संगति जुळविण्याची क्रिया वारंवार अवश्य होते; आणि जेथें जेथें या दोहोंमध्यें कांहींतरी फरक दृष्टीस पडतो तेव्हां दोन्ही ग्रंथांतील विधानांचें लक्षपूर्वक अवलोकन करावें लागतें. कथासरित्सागरांत म्हणजे बृहत्कथेंत सहस्रानीक याचा वृत्तांत आलेला आहे, आणि तो उदयनाचा बाप आणि शतानीकाचा मुलगा होता असें दाखविलें आहे. पौरवांच्या घराण्याविषयीं जो मत्स्यपुराण व वायुपुराणांतील उतारा वर दिला आहे त्यांत '**वसुदानाच्छतानीको भविष्योदयनस्तथा**' अशी ओळ आलेली आहे; म्हणजे तीं पुराणें शतानीक व उदयन यांच्यामध्यें सहस्रानीक होऊन गेला असें दाखवीत नाहींत. मत्स्यपुराण व वायुपुराण यांच्या सर्व प्रतींतील पाठभेद पाहिले व सदृश वृत्तांत असलेलीं दुसरीं पुराणें पाहिलीं तरी उदयनाचा बाप सहस्रानीक सांपडत नाहीं; तथापि तेवढ्यावरून सहस्रानीक होऊन गेलाच नव्हता असें म्हणतां येत नाहीं.

शतानीक नांवाचे दोन राजे होऊन गेले; त्यांपैकीं एक म्हटला म्हणजे जनमेजयाचा पुत्र. जनमेजयाचा पुत्र शतानीक याचाच नातू उदयन होता, असा घोटाळा बृहत्कथाकारांचा झाला आहे. उदयन हा जनमेजयाशीं इतका नजीक असणें शक्य नाहीं. कारण अधिसीमकृष्णाच्या काळांत पुराणांचें संग्रहण पुरें झालें आणि त्याच्या पुढल्या पिढींत पौरवांचें स्थानांतर म्हणजे हस्तिनापुराहून कौशांबीस प्रयाण झालें. पौरववंशांतील दुसरा शतानीक जो वसुदानाचा मुलगा म्हणून वर उल्लेखिलेला आहे त्याचा पौत्र असणें शक्य आहे. कारण उदयनाचा काल बराच नंतरचा आहे. तथापि वररुचीच्या काळापूर्वी जेव्हां पैशाची संपादकांकडून कथांचें संग्रहण झालें, त्या वेळेस उदयन हा फार प्राचीन असावा अशा समजुतीची प्रस्तुत घोटाळा ही साक्ष आहे.

कथासरित्सागर उदयनाचा बाप सहस्रानीक म्हणून सांगत आहे आणि पुराणें शतानीकानंतर उदयन हाच राज्यकर्ता झाला असें सांगत आहेत; त्यावरून सहस्रानीक ही व्यक्ति पुराणकर्त्यांस अगदींच अपरिचित होती असें म्हणतां येत नाहीं. 'सहस्रानीक' या नांवाचा एक राजा होऊन गेला व तो शतानीकाचा मुलगा होता एवढी माहिती भागवतपुराणाच्या संपादकांस होती, आणि त्यानें ती आपल्या पुराणांत समाविष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. सहस्रानीक हा कोणत्या शतानीकाचा मुलगा याविषयीं मात्र त्यांच्या मनांत संभ्रम झालेला दिसतो. भागवतसंपादकांनीं सहस्रानीकास पहिल्या शतानीकाचा मुलगा बनविलें आहे. '**सहस्रानीकस्तत्पुत्रस्ततश्चैवाश्वमेधजः**'. एवंच, पुराणांतील माहितीपेक्षां कथासरित्सागरांतील माहिती भिन्न आहे. यावरून पुराणकारांनीं माहिती कांहींतरी आधारावरच घेतली होती, तथापि त्यांच्या माहितींत सदोषताहि होती हें उघड होतें.

कथासरित्सागरांतील उदयनकथेशीं न मिळणारा पुराणांतील उल्लेख म्हटला म्हणजे वहीनराचा होय. उदयनाच्या मुलाचें नांव वहीनर होतें असें पुराणकार "**भविष्यते चोदयनाद्वीरो राजा वहीनरः ।**" या वाक्यानें सांगतात; आणि मुलाचें नांव नरवाहन होतें असें आपणांस कथासरित्सागर सांगतो. या शब्दभेदावरून तें नांव खरोखर भिन्न होतें असें म्हणतां येत नाहीं. 'वह-इ-नर' हें नरवाहन याचेंच इराणी रूप आहे, असें दिसतें. पारसीक राजापाशीं लढाई करून त्यास जिंकणारा उदयन याच्याच घरांत फारशी संस्काराचें नांव आलें ही गोष्ट

विचित्र दैवयोगाची समजली पाहिजे; परंतु अशक्य मात्र नाहीं. मुसलमानांशीं लढाई करणाऱ्या मराठ्यांच्या घरांतल्या बायकांना किंवा मुलींना व मुलांनादेखील मुसलमानी नांवें मिळालीं आहेत (उदा० दौलत, गहिना) असाहि प्रकार आपणांस महाराष्ट्राच्या उत्तरकालीन इतिहासांत दिसून आलाच आहे.

### ११७. पौरव आणि ऐक्ष्वाकु हीं घराणीं नष्ट कशीं झालीं.

११७. या प्रश्नासंबंधानें संशोधकांनीं प्रश्न उपस्थित केलेला नाहीं, पण मी उपस्थित करीत आहें.

**अत्रानुवंश श्लोकोऽयं गीतो विप्रैः पुरातनैः**
**ब्रह्मक्षत्रस्य यो योनिर्वंशो देवर्षिसत्कृतः**
**क्षेमकं प्राप्य राजानं संस्थां प्राप्स्यति वै कलौ**

या तीन ओळी पौराणिक कवीनें उद्वेगानें लिहिल्या आहेत, तथापि त्यास जें कांहीं बोलावयाचें तें गूढ भाषेंत सांगितल्यासारखें वाटतें.

या वंशाचें झालें तरी काय ? राज्याविषयीं हें बोलणें नाहीं. राज्याविषयींचें जर बोलणें असतें तर तें राज्य घेणारा कोण इत्यादि गोष्टींचा उल्लेख असता. "कलौ" याचा अर्थ येथें कलियुग असा नाहीं; कारण अभिमन्यूनंतरचे सर्वच राजे कलियुगांतील आहेत. संस्था पावेल याचा अर्थ वंश खुंटेल असाहि होत नाहीं. "संस्था" या शब्दांत स्थिरतासूचक अर्थ आहे. त्याअर्थी "संस्थां प्राप्स्यति वै कलौ" या वाक्याचा अर्थ म्हटला म्हणजे हा वंश कायमचा कलिरूप होईल असाच केला पाहिजे. हा कलिरूप कसा होणार, हा प्रश्न आहे. त्या काळांत मुसलमानी संप्रदाय नव्हता; तशा संप्रदायांत राजा प्रविष्ट झाला असा अर्थ लावतां आला असता. राजघराण्याचें मुसलमान होण्यासारखें कांहीं तरी रूपांतर झालें असलें पाहिजे. आणि तें रूपांतर पाहून कवीनें त्या वंशाचें "कलींत संस्थापन" वर्णिलें आहे. असें रूपांतर झालें नसतें तर "ज्या वंशाचा उद्भव ब्राह्मण आणि क्षत्रिय यांपासून आहे आणि ज्या वंशाचा सत्कार देवर्षींनीं देखील केला" अशा अर्थाचे वंशपावित्र्यसूचक शब्द वापरण्याची कवीस आवश्यकता भासली नसती. जें अत्यंत शुद्ध तेंच अशुद्ध झालेलें दिसलें म्हणजे जो उद्वेग होईल तो उद्वेग व्यक्त करण्याची ही भाषा आहे. इक्ष्वाकूंच्या वंशसमाप्तीच्या वर्णनांत उद्वेगवाक्यें पुन्हां उच्चरित झालीं नाहींत, तर केवळ "संस्था प्राप्स्यति वै कलौ" एवढेंच वाक्य पुनरुच्चारित झालें आहे.

### ११८. पौराणिक विधानांतील संशयस्थानें.

११८. या पुराणांतील याद्यांसंबंधानें हें सांगतां येईल कीं, वर जें प्रद्योतांचें घराणें उल्लेखिलेलें आहे तें शैशुनागांच्या अगोदर झालें काय ? शैशुनागांच्या आदिपुरुषानें कोणत्या स्वामीला मारलें ? प्रद्योतांच्या आदिपुरुषानें कोणत्या स्वामीस मारलें याविषयीं वरील पुराणवाक्यें निश्चित नसल्यामुळें संशोधकांच्या मनांत संभ्रम उत्पन्न होऊन त्यामुळें त्यांना उदयनाच्या काळासंबंधानें संभ्रम उत्पन्न झाला आहे.

### ११९. पुराणांतील व्यंगामुळें बौद्ध आणि जैन कथांनीं केलेला घोटाळा.

११९. येथें आलेल्या संशयित प्रकारच्या उल्लेखामुळें आणि बौद्ध वाङ्मयांत बुद्धाचा संबंध कसा तरी प्रद्योताशीं जोडला असल्यामुळें ऐतिहासिक चर्चेचें एक मोठें वादळच उत्पन्न झालें आहे, त्याकडे लक्ष दिल्याशिवाय, इतिहासकथनाच्या सोपानपरंपरेंतील ढिल्या पायरीवर आपण आहोंत असें वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. यासाठीं उदयन व प्रद्योत यांच्या कालाविषयीं आणि त्यांच्या बुद्धकालीनत्वाविषयीं आपणांस अत्यंत सविस्तर विचार केला पाहिजे.

आमचें मत उदयनकाळ बुद्धापूर्वी एक दोन शतकें असावा. हें मत ग्राह्य होवो अगर न होवो, बृहत्कथेंतील आतांपर्यंत आलेल्या महाराष्ट्राच्या राजांचें प्राचीनत्व तेवढ्यावर अवलंबून नाहीं. उदयनकाल बुद्धाच्या जवळ जवळ जरी आला तरी महाराष्ट्राचे जे अनेक राजे बृहत्कथेंत उल्लेखिले आहेत त्यांचें बुद्धपूर्व अनेक शतकें प्राचीनत्व नष्ट होत नाहीं. उदयनकालीन कथांच्या अधिक चिकित्सेंत पडण्यापूर्वी बृहत्कथेचें महाराष्ट्रविषयक विधान पुरें करून घेऊं. उदयनपूर्व महाराष्ट्रासंबंधानें अजून बरेंच सांगावयाचें आहे.

### १२०. उदयनप्रद्योतांच्या कालनिर्णयावर चर्चा.

१२०. ज्याप्रमाणें भारतीय लेखांतील "चंद्रगुप्त" आणि ग्रीक लेखांतील "सॅंड्रकोटस" हें शब्दसादृश्य किंबहुना शब्दैक्य इतिहाससंवर्धक झालें आणि त्याच्या नंतरचें अशोक लेखांतील "अंतियोक" आणि अँटिओकस हें शब्दसादृश्य नामैक्य सुचवून चंद्रगुप्ताचा ऐतिहासिक संबंध जुळविणें अधिक निश्चित करण्यास उपयोगी झालें, त्याप्रमाणेंच पुराणांतील उदयन आणि बृहत्कथेंतील उदयन यांच्या ऐक्याचें आहे. चंद्रगुप्ताप्रमाणेंच हें नांव केवळ एकाच संस्कृतींतील भिन्न ग्रंथांतलें नसून भिन्न संस्कृतींतील ग्रंथांत आहे. हे दोन्ही पुरुष एकच होत ही खात्री प्रथम करून घ्यावी लागली व नंतर या दोन्ही उदयनाच्या ऐक्याच्या पायावर अनेक ऐतिहासिक संबंध जुळविण्याच्या खटपटीस प्रेरणा झाली आहे.

राजावलींसंबंधानें पौराणिक साहित्याचें व त्यांतील मजकुराची इतर साहित्याशीं संगति जुळविण्याचें महत्त्व लक्षांत आलेंच असेल. पौराण साहित्याच्या व्यापकतेविषयीं कल्पना येण्यासाठीं किती आवृत्त्या व हस्तलिखितें वापरलीं गेलीं आहेत हें दिलें पाहिजे.

## १२० अ. पुराणांच्या आवृत्त्या आणि लिखितें.

१२०. अ. पार्गिटेरनीं ज्या आवृत्त्या आणि हस्तलिखितें वापरलीं आहेत त्यांचें साकल्यानें अवलोकन ऐतिहासिक वादविवादाच्या अवगमनास उपयुक्त होईल. त्यांच्या हस्तलिखितांचा उल्लेख नियतकालिकांतील अनेक चर्चात्मक निबंधांतून येतो व येथेंहि हस्तलिखितांचा उल्लेख महत्त्वाचें साहित्य म्हणून येत आहे. तेव्हां पार्गिटेरचें पुस्तक वाचकास सहज उपलब्ध नसल्यामुळें पार्गिटेर यांना मिळालेल्या हस्तलिखितांचें वर्णन निराळ्या रचनेंत येथें दिलें जात आहे. पार्गिटेर यांनीं वापरलेलीं पुराणें हीं मत्स्य, वायु, ब्रह्मांड, भागवत, विष्णु, गरुड, भविष्य हीं होत. या सर्वांत मत्स्य आणि वायु हीं पुराणें अधिक महत्त्वाचीं आहेत. मुद्रित आवृत्त्या आणि हस्तलिखितांचा उपयोग पार्गिटेरनीं केला आहे.

**मत्स्य**–प्रसिद्ध आवृत्ति १ आनंदाश्रमाची ( पुणें १९०७. ) हिलाच *A*Mt हें नांव दिलें आहे. आनंदाश्रम आवृत्ति ६ प्रतींवरून बनविलेली आहे. वेंकटेश्वरप्रत (*V*Mt), गोंधळेकर प्रत ( *G*Mt ) व चार हस्तलिखितें. त्यांचें $a^1$ $a^2$ $a^3$ $a^4$ असें अंकन पार्गिटेरनीं केलें आहे. या सहा आधारांवर रचलेल्या आनंदाश्रम प्रतीशिवाय आणखी एक आवृत्ति म्हटली म्हणजे जीवानंद विद्यासागर यांची. हिचें अंकन *C*Mt असें आहे.

वर उल्लेखिलेलीं हस्तलिखितें $a^1$, $a^2$, $a^3$, $a^4$. याशिवाय बोडेलियन लायब्ररींत दोन हस्तलिखितें आहेत. त्यांस *b*Mt, *c*Mt असें अंकन केलें आहे. इंडिया ऑफीस मधील सहा हस्तलिखितांना *d*Mt, *c*Mt, *f*Mt, *g*Mt, *h*Mt, *j*Mt. अशीं नांवें दिलीं आहेत. डेक्कन कालेज, सध्यां भांडारकर इन्स्टिटयूट पुणें, येथील *k*, *l*, *m* या पूर्वाक्षरांनीं अंकित केलीं आहेत. व ब्रिटिश म्युझिअम मधील *n* व *p* या पूर्वाक्षरांनीं अंकित केलीं आहेत.

मत्स्य पुराणांचें वैशिष्ट्य—*A*Mt याच्या ५० व्या अध्यायांत ७२–७६ हे श्लोक आले आहेत. ते 'यथा मे कीर्तितं पूर्वं' पासून 'नामतश्चैव तान् नृपान्'पर्यंत आलेले आहेत. ते विष्णु, भागवत व गरुड यांत नाहींत. ब्रह्मांड पुराणाच्या हस्तलिखितांत वंशविषयक हकीकत नाहीं. वेंकटेश्वर आवृत्ति ( Bd ) यांत हा उपोद्घात नाहीं. मत्स्यपुराण किलकिलानृपांच्या आगमनापर्यंतच माहिती आणीत आहे. विदिशा येथील राजे, विंध्यकांतील कुलें याविषयीं माहिती देत नाहीं. ती वायु आणि ब्रह्मांड यांनीं पुरविली आहे.

मत्स्याचे पाठभेद ग्रंथविकासाचे दर्शक नाहींत. सर्वच हस्तलिखितें एकाच काळापर्यंत कथा आणीत आहेत.

**वायु**—प्रसिद्ध महत्त्वाची आवृत्ति ( १ ) आनंदाश्रमाची ( *A*Vā, पुणें १९०५ ); ( २ ) बिब्लिओथिका इंडिकाची (*C*Vā) आनंदाश्रम आवृत्ति *C*Vā शिवाय चार हस्तलिखितें वापरलीं आहेत, त्यांचें अंकन $a^1$, $a^2$, $a^3$, $a^4$ असें आहे. वायूचीं बोडेलियन् हस्तलिखितें *b*Vā आणि *c*Vā अशीं अंकिलीं आहेत. इंडिआ ऑफिस हस्तलिखितें *d*, *e*, *f*, *g*, *h*, *j*, अशीं Vā पूर्वीं अक्षरें घालून अंकिलीं आहेत.

भांडारकर इन्स्टि. लिखितांचें अंकन *k*, *l*, असें आहे आणि लिखित *m* हें रायल एशिआटिक सोसायटींत आहे.

वैशिष्ट्य—वायुपुराण मत्स्य पुराणांतील सर्व घराणीं देत आहे, पण विदिशा घराणें वगैरे जो मजकूर मत्स्य पुराणांत नाहीं तो यांत आहे. म्हणजे आनंदाश्रमाची वायुपुराणाची आवृत्ति सर्व घराण्यांसंबंधानें संपूर्ण माहिती देत आहे असें सिद्ध होतें. वायुपुराणाच्या अनेक लिखितांत जे फरक आढळून येतात ते वायुपुराणाच्या वृद्धिकालांचे दर्शक नाहींत.

**भागवत**–मुख्य महत्त्वाची आवृत्ति गणपत कृष्णाजींच्या *G*Bh या नांवानें उल्लेखलेली, मुंबई १८८९. *B*Bh ही बनार्फची अपूर्ण आवृत्ति; भागवताचीं जीं सहा हस्तलिखितें बोडेलियन मध्यें आहेत तीं *a*, *b*, *c*, *d*, *e*, *f*, ( म्हणजे *f*Bh. अशीं ) अंकिलीं आहेत. इंडिआ ऑफीस मध्यें जीं लिखितें आहेत, तीं *g*, *h*, *j*, *k*, *l*, *m*, *n*, *p*, *q*, *r*, *s*, *t*, अशीं आहेत.

**भविष्य**–याची प्रसिद्ध आवृत्ति वेंकटेश्वराची आहे. ती या बाबतींत निरुपयोगी म्हणून ठरली आहे. त्याशिवाय चार हस्तलिखितें पार्गिटेरनीं तपासलीं, पण त्यांत राजांची यादीच नाहीं. तीं हस्तलिखितें इंडिआ ऑफीस, बोडेलियन लायब्ररी रॉयल एशिआटिक सो. व नेपाळ स्टेट लायब्ररीचीं आहेत.

**ब्रह्मांड**–प्रसिद्ध आवृत्ति वेंकटेश्वरी (Bd) इंडिआ आफीस मध्यें तीन आणि बोडेलियन मध्यें तीन हस्तलिखितें आहेत. पण तीं वंशविषयक माहिती कांहीं देत नाहींत.

**गरुड**–प्रसिद्ध आवृत्ति जीवानंद विद्यासागर यांची (*C*Gr) कलकत्ता १८९०. हस्तलिखितें–इंडिआ ऑफीस *a*Gr, *b*Gr, *c*Gr. याशिवाय बोडेलियन मध्यें एक लिखित आहे पण तें वंशविषयक माहिती देत नाहीं.

**विष्णु**–प्रसिद्ध आवृत्ति जीवानंद विद्यासागर यांची (*C*Vṣ) कलकत्ता १८८२. आवृत्तींत टीका आहे पण पाठभेद नाहींत. बोडेलियन लिखितें–अंकन *a*, *b*, *c*, *d*, इंडिआ ऑफीस लिखितें–अंकन *e*, *f*, *g*, *h*, *j*, *k*, रॉ. ए. सो. लिखित–अंकन *l*.

## प्रकरण १६ वें.

# प्रतिष्ठानचे आणखी तीन राजे विक्रमसिंह, प्रसेनजित् आणि पृथ्वीरूप.

### १२१. प्रतिष्ठानच्या उल्लेखांची विविधता.

१२१. कथासरित्सागरामध्यें आलेल्या व आपणांस उपयोगी असलेल्या कथांपैकीं पैठणच्या राज्याच्या ज्या दोन कथा मागें दिल्या आहेत त्यांशिवाय पैठणच्या व महाराष्ट्राच्या इतर भागांच्या कथांकडे आतां वळूं. या अतुल भांडारांत उपलब्ध होणाऱ्या कथांमध्यें दाक्षिणात्य राजांच्या कथा आहेत त्याप्रमाणें ब्राह्मणांच्या कथा देखील आहेत. जुगाऱ्यांचे तसेच पैलवानांचे* उल्लेख आहेत. त्या सर्वांचा उपयोग करून कुरुयुद्धकालापासून बुद्धकालापर्यंत सातआठशें वर्षें पसरलेला जो काल अज्ञात म्हणून समजला जातो त्याचें एकीकृत स्मृतिचित्र तयार केलें पाहिजे.

मागें दिलेल्या दोन कथांपेक्षां जराशी निराळ्या स्वरूपाची पण कांहीं गोष्टी सामान्य असलेली अशी एक विक्रमसिंह नांवाच्या राजाची कथा आहे मागील कथेंत प्रतिष्ठानच्या एका वेश्येनें प्रतिष्ठानच्या राजाचा काल्पनिक पराभव करण्यास, आणि त्यावर जय भिळवूं पहाणाऱ्या मगधाधिप विक्रमादित्याची प्रतिज्ञा पूर्ण करण्यास साहाय्य केलें, त्याप्रमाणें या कथेंत उज्जयिनीच्याहि एका गणिकेनें प्रतिष्ठानच्या विक्रमसिंह नामक राजास आपलें राज्य मिळविण्यास आणि उज्जयिनी जिंकण्यास साहाय केलें आहे. येथें गणिकेच्या प्रेममूलक नाहीं तरी स्वार्थमूलक उपकाराची नोंद आहे. या कथेंत आणखीहि मौजेच्या गोष्टी आहेत. तर आपण या कथेचें सविस्तर अवलोकन करूं

या प्रतिष्ठानभूपतीच्या गोष्टींत ऐतिहासिक दृष्टीनें विचार करण्याजोगीं अनेक वैशिष्टयें आहेत एवढेंच नव्हे तर मागें दिलेल्या नरसिंह आणि विक्रमादित्य यांच्या कथेंतील कांहीं अंगांच्या ऐतिहासिक अर्थांचा विचार करावयास ही विक्रमसिंहाची कथा थोडीबहुत मदत करणारी आहे.

या कथेंतील गणिका म्हटली म्हणजे कुमुदिका होय. ही कथा क्षेमेंद्रानें त्याचप्रमाणें सोमदेवानें दिली आहे. त्यामुळें त्यांच्या काळच्या बृहत्कथेंत ती कथा तशीच होती याविषयीं संशय उरत नाहीं. या महत्त्वाच्या कथेचीं दोन्ही अवतरणें वाचकांपुढें ठेवणें अवश्य आहे म्हणून तीं येथें देत आहें.

---

* चतुरीकालंबक तरंग २ रा.

### १२२. कुमुदिकेची क्षेमेंद्रानें दिलेली माहिती.

१२२. सोईसाठीं क्षेमेंद्राचें अल्प विधान संस्कृतमध्यें जसेंच्या तसें देऊन मराठींत कथासरित्सागरांतील विस्तृत कथेचें कै. विष्णुशास्त्री बापट यांनीं दिलेलें सार अवश्य ते फेरफार करून जसेंच्या तसेंच मांडतों. कै. विष्णुशास्त्री बापट यांनीं मूळ कथेचा फारसा संक्षेप केला नसून ती जवळ जवळ जशीच्या तशीच भाषांतरित केली आहे. ही कथा शक्तियशोलंबकांत दोन्ही ग्रंथांनीं दिली आहे. आणि हा लंबक बृहत्कथेच्या दोन रूपांतरांत भिन्न स्थानीं आला असल्यामुळें कथेचेंहि स्थान समग्र ग्रंथांत भिन्न ठिकाणीं आलें आहे.

या कथेचें महत्त्व ज्या एका कारणामुळें आहे तें हें कीं नरसिंह आणि त्रिविक्रमसेन हे जरी मोठे प्रतापी राजे होऊन गेले तरी मोठ्या साम्राज्याचे अधिपति या नात्यानें त्यांचा उल्लेख बृहत्कथा करीत नाहीं, तर अन्यदेशविजेता या नात्यानें उल्लेख हा कथासंग्रह फक्त या विक्रमसिंह राजाचा करीत आहे. त्याचा उज्जयिनीविजय बृहत्कथामंजरी—

**ततः स विपुलानीको विजित्योज्जयिनीपतिम्**
**मोक्षयित्वा द्विजसुतं पुनः स्वपुरमाययौ**

अशाप्रकारें वर्णन करीत आहे, तर कथासरित्सागर—

**क्रमाद् विक्रमसिंहोऽसौ बुभुजे सकलां महीम्**

या शब्दांत त्या विक्रमसिंहास साम्राज्यवैभव प्राप्त झालें याचें वर्णन करीत आहे. विक्रमसिंहाविषयीं बृहत्कथामंजरीचें विधान त्याचप्रमाणें सरित्सागराचें निरूपण यांतील सादृश्य आणि भेद तपासणें संशोधकांस अवश्य असल्यामुळें, आणि इतर वाचकांस केवळ कथाच अवश्य असल्यामुळें सविस्तर कथा देणाऱ्याचा उतारा मराठींत दिला आहे आणि तौलनिक अभ्यास करूं इच्छिणारापुढें लहान ग्रंथांतील संस्कृत मूळ जसेंच्या तसेंच ठेवलें आहे. मराठी लेखांतून अवगाहन करतांना मूळ संस्कृत शब्द पहाणें हें जेथें महत्त्वाचें वाटलें तेथें कथासरित्सागरांतील मूळ शब्द देखील दिले आहेत.

बृहत्कथामंजरींतील श्लोक पुढीलप्रमाणें आहेत. त्यांत राजाचें नांव विक्रमसिंह न येतां विक्रमसेन असें आलें आहे.

**अत्रैव गोमुखः प्राह प्रस्तावसदृशीं कथाम् ।**
**राजा विक्रमसिंहाख्यः प्रतिष्ठानपुरेऽभवत् ॥**

बभूव शशिलेखाख्या प्रिया तस्य सुलोचना ।
अनन्तगुणनामा च सचिवो धीमतां वरः ॥
स कदाचिन्महीपालो बलिभिः पञ्चभिर्नृपैः ।
निरुद्धनगरो मानी स्वयं युद्धाय निर्ययौ ॥
स तैः समरभङ्गाद्यैर्विजितो युधि शत्रुभिः ।
सहानन्तगुणेनैव छन्नो देशान्तरं ययौ ॥
आसाद्य सुन्दरीं चैव रागिणीं धनगौरवात् ।
शनैरुज्जयिनीं प्राप्य गणिकाया निवेशनम् ॥
रम्यं कुमुदिकाख्यायाः सोऽविशन्मन्त्रिणा सह ॥
तं राजलक्षणोपेतं सिंहस्कन्धं महाभुजम् ।
सिषेवे सा महीपालं प्रेमबन्धैः सविभ्रमैः ॥
स राजा द्रविणं तस्या गृहादादाय भूरिदः ।
याचकेभ्यो ददौ नित्यं निजवद्विपुलाशयः ॥
अत्यन्तरागिणीं मत्वा नृपतिस्तां सविस्मयः ।
मन्त्रिणं प्राह पश्येमां मदेकशरणामिति ॥
अमात्यः प्राह मा राजन्वेश्यासु प्रत्ययं कृथाः ।
दृक्संविभागमप्येता नैव कुर्वन्त्यकारणम् ॥
इति श्रुत्वा नृपश्चक्रे परीक्षायै मृगीदृशः ।
मिथ्यैवातुरमात्मानं कृतकृत्यक्तजीवितम् ॥
सोऽथ कूटमृतस्तेन मन्त्रिणा कृतसंविदा ।
नीतः श्मशानं हा राजन्निति तारप्रलापिना ॥
ततः सा गणिका दुःखात्कल्पिते प्रवरेऽनले ।
कण्ठे गृहीत्वा तं कान्तं त्यक्तुमात्मानमुद्ययौ ॥
अत्रोत्तस्थौ नरपतिः संजातप्रमदाकुलः ।
तां गाढरागिणीं ज्ञात्वा तं निनिन्द च मन्त्रिणम् ॥
संजाताधिकविश्रम्भं सेवमानं घटस्तनी ।
कान्ता क्ष्मापालतिलकं बभाषे मन्त्रिपुंगवः ॥
दृष्टानुमरणात्तस्यास्त्वदेकशरणा मतिः ।
तथापि देव जानेऽहं कूटमेतद्विचेष्टितम् ॥
इति मन्त्रिवरो राजा श्रद्दधे नैव सस्मितः ।
संजातप्रत्ययो रागः कस्य वाचा निवर्तते ॥
अत्रान्तरे स भूपालः शुश्राव महिषीं निजाम् ।
तस्मिन्रणे मानभङ्गशोकात्संत्यक्तजीविताम् ॥
ततो दुःखाकुलं दृष्ट्वा क्षिप्रं श्रुत्वा च तत्कथाम् ।
प्रगल्भललना स्वैरं नृपं कुमुदिकाऽवदत् ॥
राज्ञो न शोभते शोकस्तव दोर्दर्पशालिनः ।
पराक्रमो हि वीराणां मानभङ्गे प्रतिक्रिया ॥
सन्त्येव मे सहस्राणि मत्तवारणवाजिनाम् ।
हेमन्नश्चैतैः कृतोद्योगो जहि शत्रून्धनुर्धर ॥
इति तद्वचसा राजा हविषेव हुताशनः ।
स्फूर्जत्प्रतापः प्रययौ परांस्तु तुरगद्विपैः ॥
बलिना सुहृदा सार्धं राज्ञा धवलकीर्तिना ।
गत्वा जघान ताञ्शत्रून्सानुगानुग्रविक्रमः ॥
श्रीमान्विक्रमसेनोऽथ राज्यं प्राप्य निजं पुनः ।
वराङ्गनानां विदधे प्रधानान्तःपुरे स्त्रियं ॥
ततः सा प्राह भूपालं कृतज्ञ शृणु देव मे ।
संकल्पकल्पविटपी सर्वदैव प्रवर्तसे ॥
शत्रवो विजिताः सर्वे प्राप्ता श्रीर्यशसा सह ।
त्वया धैर्यसहायेन प्रणयिप्रियकारिणा ॥
अद्य चेत्करुणा चित्ते तवास्मिन्प्रेमलेशके ।
तन्मे वितर भूपाल सतताभीप्सितं वरम् ॥
उज्जयिन्यां नरेन्द्रेण बद्धो मे हृदयप्रियः ।
द्विजन्मा श्रीधरो नाम स बलान्मुच्यतां त्वया ॥
तदर्थमेव राजेन्द्र सेवितोऽसि मया चिरम् ।
इति श्रुत्वा महीपालस्तथेत्याह सविस्मयः ॥
ततः स विपुलानीको विजित्योज्जयिनीपतिम् ।
मोक्षयित्वा द्विजसुतं पुनः स्वपुरमाययौ ॥
प्रहृष्टां संगतां तेन चिरायूना द्विजन्मना ।
दत्वा बहुगुणं हेमं क्ष्मापतिर्विससर्ज ताम् ॥
अथानन्तगुणे मन्त्री विहस्य नृपमब्रवीत् ।
एतदर्थं पुरा देव सा भवन्तमसेवयत् ॥
दृशान्यत्र गिरान्यत्र चेतसान्यत्र कृत्रिमम् ।
प्रेम संदर्शयन्त्येव कुशला वेशयोषितः ॥
इति मन्त्रिवचः श्रुत्वा भूपालो विस्मयाकुलः ।
एवमेतदिति प्राह तन्मतिं प्रशशंस च ॥
गोमुखेनेति कथितं श्रुत्वा वत्सेश्वरात्मजः ।
कुटिलं गणयामास गणिकावृत्तमद्भुतम् ॥

## १२३. सोमदेवानें दिलेलें वृत्त.—

१२३. आतां या अल्प निरूपणानंतर विस्तृत निरूपणाकडे लक्ष देऊं. त्या कथासरित्सागरांतील संस्कृत निरूपणाची विष्णुशास्त्रीकृत मराठी छाया पुढीलप्रमाणें आहे:—

प्रतिष्ठानामध्यें विक्रमसिंह या नांवाचा राजा होता. विधात्यानें त्याला नांवाप्रमाणें खरोखरच सिंहासारखा पराक्रमी केलें होतें. त्याची शशिलेखा या नांवाची सुंदर भार्या होती. एकदां आपल्या नगरामध्यें असलेल्या त्याला त्याच्या पांचसहा एकमत झालेल्या गोत्रजांनीं ( भाऊबंदांनीं ) त्याच्या घरीं येऊन वेढलें. महाभट, वीरबाहु, सुभट, सुबाहु, राजा प्रतापादित्य हे त्यांतील मुख्य होते. हे सर्व महाबलाढ्य होते; म्हणून विक्रमसिंहाचा मंत्री त्यांच्याशीं संधि करण्याचा

विचार करूं लागला; पण त्याचें निराकरण करून विक्रमसिंह त्यांच्याशीं युद्ध करण्याकरितां बाहेर पडला. दोन्ही सैन्यांचें युद्ध सुरू होण्याचा प्रसंग आला असतां तो राजा शौर्यानें व गर्वानें गजावर आरूढ होऊन स्वतः सैन्यांत शिरला व हातांत धनुष्य घेऊन शत्रुसैन्याचें विदारण करूं लागला. त्याला पाहून महाभटादि पांचहि वीर एकदम त्याच्या सैन्यावर तुटून पडले. त्यांचें अपरिमित सैन्य एकाच वेळीं वेगानें धांवून येत आहे असें पाहून, विक्रमसिंहाचें सैन्य भिऊन पळूं लागलें. तेव्हां अनंतगुण नांवाचा मंत्री त्या राजाला म्हणाला, "आमचें सैन्य तर पराभूत होऊन सैरावैरां पळत सुटलें आहे. आतां आपल्याला जय येणें शक्य नाहीं. आमच्या योग्य संमतीचा अंगीकार न करितां हें भयंकर युद्ध आपण आरंभिलें, व त्याचा हा असा परिणाम झाला आहे. यास्तव अजून तरी कल्याणाकरितां माझें म्हणणें ऐका; या हत्तीवरून उतरून घोड्यावर बसा; आपण दोघे कोठें निघून जाऊं; जीव वांचल्यास पुनः शत्रूंना जिंकतां येईल."

मंत्र्याचें हें भाषण मान्य करून विक्रमसिंह हत्तीवरून उतरला व हळूच घोड्यावर बसून अनन्तगुण मंत्र्यासह सैन्यांतून निघाला. नगराच्या बाहेर आल्यावर वेष बदलून ते दोघेही उज्जयिनीकडे चालले. त्या उत्तम नगरीस पोंचल्यावर राजा विक्रमसिंह मंत्र्यासह, कुमुदिका नांवाच्या प्रसिद्ध व अतिशय श्रीमती विलासिनीच्या येथें गेला. अकस्मात् आलेल्या त्याला पाहून ती मनांत म्हणाली, 'हा कोणी महापुरुष माझ्या येथें आला आहे. तेज व लक्षणें यांवरून हा महाराजा असावा, असें वाटतें. यास्तव याचा स्वीकार केल्यास माझें अभिलाषित सिद्ध होईल.' असा विचार करून कुमुदिकेनें त्याचें स्वागत करून मोठें आतिथ्य केलें; त्याचा स्वीकार करून थोडीशी विश्रांति घेऊन ते स्वस्थचित्त झाले. नंतर राजाला ती वेश्या म्हणाली, "मी आज धन्य झालें आहें. माझें प्राक्तन पुण्य फलास आलें, देवानें स्वतः येऊन माझें गृह पवित्र केल्यामुळें मी आज आनंदाच्या शिखरावर आरूढ झालें आहें. या अनुग्रहानें विकत घेतलेली ही मी आपली दासी आहें. शंभर हत्ती, वीस सहस्र घोडे, रत्नांनीं भरलेलें हें घर इत्यादि माझें सर्वस्व मी तुमच्या स्वाधीन केलें आहे." असें बोलून कुमुदिकेनें मंत्र्यासह राजाची स्नानादि उपचारांनीं परिचर्या केली. राजाही सर्वस्व अर्पण केलेल्या कुमुदिकेच्या येथें खिन्न मनानें राहिला. तिच्या धनाचा त्यानें यथेच्छ उपभोग घेण्यास व याचकांस दानें देण्यास आरंभ केला, पण ती वेश्या त्याला कांहीं बोलली नाहीं; उलट संतुष्टच झाली.

तेव्हां 'ही वेश्या असून मजवर किती हो अनुरक्त आहे!' असें म्हणून संतुष्ट होणाऱ्या राजाला अनंतगुण मंत्री एकांतांत म्हणाला, 'देव, वेश्यांचे ठायीं सद्भावाचा गंधहि असत नाहीं; पण ही कुमुदिका आपणावर इतका स्नेह कां करते, कांहीं कळत नाहीं.' तें ऐकून राजा बोलला, "छे, छे; असें म्हणूं नको; मजकरितां ती प्राणहि सोडील. माझ्या या बोलण्यावर तुझा विश्वास बसत नसेल, तर तुला मी प्रत्यय आणून देतों,' असें सांगून राजानें शारीरिक व्यथेनें पीडल्याचा बाहणा केला. शेवटीं एकाएकीं मेल्याचें सोंग करून त्यानें आपलें शरीर ताठविलें.

कांहीं वेळानें वेश्येच्या सेवकांनीं त्याला शिबिकेंत घालून स्मशानांत नेलें. अनंतगुण मंत्रीहि मोठें दुःख झाल्याचें दाखवीत त्यांच्या मागोमाग गेला. कुमुदिकेला मात्र राजाच्या या मिथ्या मरणामुळें अतोनात दुःख झालें. ती 'हाय, 'हाय' करीत तिचे आप्त 'नको नको' म्हणून निवारण करीत असतांनाहि स्मशानांत येऊन राजाकरितां तयार केलेल्या चितेवर आरूढ झाली, व कांहीं केल्या राजाजवळून हालेना. तेव्हां आतां तिचे सेवक चिता पेटवणार व ही तर कांहीं येथून हालत नाहीं, असें पाहून राजा विक्रमसिंह हळू हळू श्वास सोडूं लागला व कांहीं वेळानें त्यानें जांभई दिली; तें पाहातांच सर्वजण आनंदित झाले. 'वाहवा, फार चांगलें झालें, हा महात्मा जिवंत झाला,' असें म्हणून, सर्वजण कुमुदिकेच्या भाग्याची प्रशंसा करूं लागले. त्याला चितेवरून उतरून वेश्येसह मोठ्या आनंदानें घरीं नेलें. कुमुदिनीनें मोठा उत्सव केला व दोनचार दिवसांतच राजा खानपानादिकांच्या यथेच्छ सेवनानें पूर्वस्थितीवर आला. नंतर एकांतांत तो आपल्या मंत्र्याला म्हणाला,–'कां ? पाहिलेंस हिचें मजवर किती प्रेम आहे तें?' त्यावर मंत्री बोलला, –'प्रभो, माझा अजून हिच्यावर विश्वास बसत नाहीं. त्याचें कारणहि आहे; तथापि आपण याविषयीं निश्चय करूं! अगोदर आपण कोण हें तिला सांगून तिचें सैन्य, मित्रांचें सैन्य व आपलें सैन्य जमवून शत्रूंना रणांगणांत मारूं या!' अनंतगुण मंत्री इतकें जों बोलत आहे तों पूर्वी पाठविलेला गुप्त हेर आला व असें वर्तमान सांगूं लागला, "प्रभो, शत्रूंनीं सर्व देश व्यापून सोडला आहे. देवी शशिलेखा लोकांच्या तोंडून 'राजा मेला' असें खोटेंच ऐकून अग्नींत प्रविष्ट झाली."

हेराचें हें भाषण ऐकून राजा शोकरूपी वज्राचा प्रहार झाल्यामुळें 'हा देवि, हा सति' असें मोठ्यानें म्हणून रडूं लागला. तेव्हां कुमुदिका घाबरून त्याच्यापाशीं आली व क्रमानें तिला सर्व खरी हकीकत कळली. तेव्हां ती

वेश्या विक्रमसिंह राजास म्हणाली, "मला आपण पूर्वीच आज्ञा कां केली नाहीं? अथवा अजून काय झालें आहे? माझें सर्व धन, सैन्य घेऊन शत्रूचा निग्रह करा." कुमुदिकेनें असें बोलून प्रोत्साहन दिलें असतां, तिचें धन खर्च करून राजानें सैन्य वाढविलें, व तो आपल्या बलवान् मित्राकडे गेला. नंतर त्याचें सैन्य व आपलें सैन्य एकत्र करून विक्रमसिंहानें त्या पांची मुख्य शत्रूंस रणांत मारलें. त्यामुळें त्यांचीं राज्येंहि त्याला मिळालीं. नंतर संतुष्ट झालेला तो राजा कुमुदिकेस म्हणाला,–'प्रिये, मी तुजवर प्रसन्न झालों आहें, तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग.' तें ऐकून कुमुदिका म्हणाली,–"प्रभो, आपण खरोखरच जर मजवर प्रसन्न झालां असाल, तर फार दिवसांपासून माझ्या हृदयांत सलत असलेलें हें एक शल्य उपटून काढा. उज्जयिनींत श्रीधर या नांवाचा एक ब्राह्मणपुत्र माझा प्रिय होता. त्याला राजानें अगदीं अल्प अपराधाकरितां कैद करून ठेविलें आहे. त्याला प्रतिबंधांतून सोडवा. उत्तम राजलक्षणांवरून आपलें पुढें मोठें कल्याण होणार आहे, व या कामास आपण योग्यच आहां, असें जाणून मी आपली इतके दिवस अनन्यचित्तानें सेवा केली. माझ्या अभीष्ट सिद्धीविषयीं निराश झाल्यामुळेंच मी आपल्या चितेवर आरोहण केलें. त्या ब्राह्मणपुत्रावांचून मला माझें जीवित विफल वाटतें."

विलासिनीचें हें भाषण ऐकून विक्रमसिंह राजा तिला उलट म्हणाला,–"सुंदरि, तूं धीर धर. मी तुझें अभीष्ट पूर्ण करीन." नंतर आनंदित झालेली वेश्या त्याच्या जवळून उठून दूर गेली. तेव्हां राजा मंत्र्याचें मागचें भाषण आठवून मनांत म्हणाला,–'वेश्यांचे ठायीं सद्भाव नसतो म्हणून सांगितलें तें खरें आहे; पण या बिचारीची कामना मला पूर्ण केली पाहिजे.' असा विचार करून तो सैन्यासह उज्जयिनीस गेला, व श्रीधराला सोडवून आणि पुष्कळ धन देऊन, कुमुदिकेला प्रियसमागमानें सुखी केल्यावर, आपल्या राजधानीस परत आला. नंतर मंत्र्याच्या म्हणण्याचें उल्लंघन न करितां विक्रमसिंहानें क्रमानें सर्व पृथ्वीचा उपभोग घेतला.

## १२४. विक्रमसिंहाच्या कथेचा ऐतिहासिक अर्थ; प्रतिष्ठान साम्राज्याची राजधानी.

१२४. या कथेंत महत्त्वाच्या आलेल्या गोष्टी पुढीलप्रमाणें आहेत. पांच राजांनीं प्रतिष्ठानच्या विक्रमसिंहास पराभूत केलें. तो पुढें पळून उज्जयिनीस एका गणिकेकडे जाऊन राहिला. त्या गणिकेचा प्रियकर उज्जयिनीचा एक ब्राह्मणपुत्र होता आणि त्याला राजानें धरून कारागृहांत टाकलें होतें. त्या ब्राह्मणपुत्राला सोडविण्यासाठीं विक्रमसिंह उज्जयिनी घेता झाला, आणि हा विक्रमसिंह पुढें मोठा सम्राट् झाला.

राजकीय इतिहास शोधणाराच्या दृष्टीनें हा कथाभाग महत्त्वाचा आहे आणि महाराष्ट्रानें मोठ्या साम्राज्याची स्थापना अत्यंत प्राचीनकाळीं म्हणजे बुद्धपूर्वकाळींच केल्याची आठवण संरक्षून ठेवणारी ही कथा आहे. (क्रमाद्विक्रमसिंहोऽसौ बुभुजे सकलां महीम्)

## १२५. विक्रमसिंहाची ऐतिहासिकता.

१२५. प्रस्तुत कथेंत आलेला विक्रमसिंह ऐतिहासिक पुरुष न मानण्याचें कारण कोणतेंच नाहीं. त्याच्या कथेंत असंभाव्य असें कांहींच नाहीं. त्याच्या दायादांचीं नांवें केवळ मनोरंजक कथा संरक्षून ठेवणाऱ्या कथाप्रियानें केलें नसतें. ऐतिहासिकांनीं जमविलेल्या साहित्यांतून कथाप्रियानें कांहीं कथा निवडल्या आहेत, असें या कथेचें स्वरूप दाखवितें. राजे लोकांची राज्यकारभाराची कुशलता वगैरे गोष्टी लोकप्रिय फारशा होत नाहींत. त्यांच्या प्रेमकथाच लोकांस आकर्षक होतात आणि वाङ्मयांत टिकतात, त्याचप्रमाणें ही कथा टिकली आहे. बाजीरावाच्या शौर्यकथांपेक्षां त्याची मस्तानीकथा सामान्य महाराष्ट्रीयांस अधिक परिचित आहे. ही कथा तींतील नकली प्रेमाचें आत्यंतिक स्वरूप म्हणून म्हणजे गणिकेच्या अंतःकरणाची दर्शक म्हणून टिकली आहे.

या कथेंत राजा हत्ती व घोडे यांहीं करून युक्त होता असें दाखविलें आहे म्हणजे त्यावरून ही नरसिंहाच्या उत्तरकालीन राजाची कथा आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. या राजाचेंहि अस्तित्व अर्थात् दीपकर्णीच्या पूर्वीचें म्हणजे आद्यशातवाहनाच्या पूर्वीचें असलें पाहिजे. आद्यशातवाहनाचा काळ जरी ख्रिस्तपूर्व ३०० धरला, म्हणजे तो चंद्रगुप्ताशीं समकालीन धरला तरी त्याच्या पूर्वीचा काल अनंत आहे आणि त्या अनंत कालांतील कोणत्या तरी कालविभागांत नरसिंह, त्रिविक्रमसेन, विक्रमसिंह व दीपकर्णी हे राजे होऊन गेले असें जें ग्रंथ सांगत आहे तें खरें मानण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं.

## १२६. दक्षिणेंतील राजांस दायादांचें भय.

१२६. या विक्रमसिंहाच्या कथेकडे जरासें सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें पाहिजे. सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां तत्कालीन स्थितीचीं कांहीं वैशिष्ट्यें या कथेंत उतरलीं आहेत. या राजाचे शत्रू दुसरे राजेच होत असें मंजरी—

**स कदाचित् महीपालो बलिभिः पंचभिर्नृपैः**
**निरुद्धनगरो मानी स्वयं युद्धाय निर्ययौ**

या शब्दांनीं सांगत आहे, तर तें युद्ध करणारे त्याच्याच बंधुवर्गापैकीं होते असें सरित्सागर सांगत आहे.—

**तमेकदा स्वनगरे स्थितं संभूय गोत्रजाः**
**पंचषा गृहमागत्य राजानं पर्यवेष्टयन्**

दोन्ही विधानें खरीं असलीं पाहिजेत. एकाच गोत्राचे अनेक राजे ज्याअर्थी येथें होते त्याअर्थी या कालांत राज्याचा वांटा अनेक मुलांना मिळावयाची चाल असावी. राज्य हें एकासच मिळालें पाहिजे या प्रकारचा धर्मनियम त्या कालांत संस्थापित झाला नसावा असें दिसतें. दक्षिणदेशीय राजांस गोत्रीयांशींच लढावें लागलें हें सांगणारें विधान आपणांस सिंहबल या दक्षिणापथाच्या राजाच्या कथेंत आलें आहे, त्या कथेचेंहि अवतरण पुढें केलें आहे.

## १२७. वेश्यांची श्रीमंती, त्यांचें सैन्य आणि हत्तीघोडे.

१२७. या विक्रमसिंहाच्या कथेंत त्याप्रमाणेंच नरसिंहाच्या कथेंत वेश्यांची श्रीमंती दाखविली आहे. ती देखील इतकी, कीं, त्या राज्यें जिंकण्यास देखील साहाय्य करूं शकतात. त्यांच्यापाशीं हत्तीघोडे इत्यादि सैन्य असतें. त्यांना हा इतका पैसा कोठून मिळे, वगैरे गोष्टींचें स्पष्टीकरण या कथेंत नाहीं. श्रीमंत गणिका ब्राह्मणपुत्रावर अनुरक्त झाली आणि त्या ब्राह्मणपुत्राचा द्वेष जो राजा करता झाला, त्यानें राज्य गमावलें अशी स्थिति एका काळांत अत्यंत स्वाभाविक होती काय, असा प्रश्न या प्रकारच्या कथेनें उद्भवतो. उलटपक्षीं एकच कथा पुढें वाङ्मयांत अनेक प्रकारचीं रूपांतरें पावली असावी असीहि कल्पना मनांत येते. कारण या कथेंत चारुदत्तकथेचें पूर्वरूप असल्याचा भास होतो. ज्यांचें ऐश्वर्य राजांसहि लाजवील अशा श्रीमंत वेश्यांचें गूढ उकलणें देखील महत्त्वाचें आहे. त्याविषयीं विवेचन पुढें योग्य प्रसंगीं येईलच.

## १२८. प्रसेनजित् राजा व त्याच्या कन्येचा विवर्गपरिग्रह.

१२८. विदर्भदेशीय राजकन्यांच्या कथा पुराणांत प्रचुर आहेत, किंबहुना दमयंती, रुक्मिणी, इंदुमती, लोपामुद्रा वगैरे विदर्भाच्या राजकन्या प्राचीन सूतकाव्यांच विषय झाल्या आहेत; तर उत्तरकालीन अद्भुत रसाचें वाङ्मय महाराष्ट्रांतील राजकन्यांस विसरलें कसें असा प्रश्न उत्पन्न होईल. या कुरुयुद्धोत्तर कथकांविषयीं असें सांगतां येईल कीं ते अद्भुतकथांचे लेखक महाराष्ट्रांतील राजकन्यांना खास विसरले नाहींत.

प्रतिष्ठानच्या प्राचीन राजांचीं नांवें संपलीं असें नाहीं. नीचजातीय पुरुषाशीं प्रतिष्ठानराजकन्येच्या विवाहासंबंधाचें समर्थन करणारी एक कथा उपलब्ध आहे. त्या कथेचें महत्त्व दुसऱ्या एका दृष्टीनें आहे. राजे लोकांना जर कांहीं लोकरीतीच्या विरुद्ध करावयाचें असलें तर ते ती गोष्ट मंत्री व पौरजन यांच्या संमतीनें करूं शकत होते हें दाखविण्यास ती राजकन्येची विवाहकथा चांगलीच उपयोगी पडेल.

या राजकन्या व चांडालपुत्र यांची उपकथा म्हणून बृहत्कथेंत आली आहे ती येणेंप्रमाणेः—

पूर्वीं सुप्रतिष्ठितपुरामध्यें प्रसेनजित् राजाची कुरंगी नांवाची एक अतिरूपवती कन्या होती.* ती एकदां उद्यानांत जावयास निघाली असतां बंधनस्थानापासून सुटलेल्या हत्तीनें धांवत येऊन वाहनासह तिला आपल्या दांतावर उचलून घेतलें. तेव्हां तिचा परिवार मोठ्यानें आक्रोश करीत पळूं लागला असतां त्या गजाच्या अंगावर कोणी एक चांडाळपुत्र हातांत खड्ग घेऊन धांवला. त्यानें एकाच खड्गप्रहारानें हत्तीची सोंड तोडून त्याला मारून पाडिलें व त्या सुंदरीला सोडविलें. त्या महावीराचें हें शौर्य पाहून सर्व पौरजन स्तुति करूं लागले असतां राजकन्येचा परिवार तिच्यापाशीं परत आला व तिला घेऊन राजमंदिरांत परत गेला. पण त्या वीराच्या वीर्य व सौंदर्य-संपत्तीनें जिच्या चित्तास हरण केलें आहे, अशी ती कुरंगी, 'एक तर तो हत्तीपासून मला सोडविणारा माझा पति होऊं दे, अथवा मला मृत्यु येऊं दे,' असें चिंतन करीत विरहातुर होऊन राहिली. तिकडे तो चांडालकुमारहि तिच्या रूपानें आकृष्टचित्त होऊन हळूहळू स्वगृहीं गेला व तिचें ध्यान करून अतिशय संतप्त झाला. 'चांडालाच्या कुलांत ज्याचा जन्म झाला आहे, असा मी कोठें, व ती राजकन्या कोठें? काक व राजहंसी यांचा कोठें व कसा समागम होणार? कोणी ऐकल्यास हंसेलच असें हें मनोगत कोणाशीं बोलण्यासारखेंही नाहीं. यास्तव असल्या संकटसमयीं मला मरणाचाच आश्रय केला पाहिजे.'

असा निश्चय करून तो रात्रीं स्मशानांत गेला. तेथें स्नान करून व चिता पेटवून त्यानें अग्नीची अशी प्रार्थना केली—

---

*** प्राक्प्रसेनजितो राज्ञः सुप्रतिष्ठितसंज्ञके ।**
**पुरे कुरंगी नाम्नाऽभूदतिरूपवती सुता ॥**

( कथासरि. सुरतमंजरीलंबक तरंग २ )

बृहत्कथामंजरी कन्येचें नांव कुरंगिका असें आणि राजाचें नांव सेनाजित् असें देत आहे.

**नगरे सुप्रतिष्ठाख्ये राज्ञः सेनाजितः पुरा ।**
**पुत्री कुरंगिका नाम विहर्तुं वनमाययौ ॥**

'हे देवा, हे पावका, हे विश्वात्मन्, मी आतां आपल्या देहाचीच आहुति तुझ्यामध्यें टाकीत आहें, तरी या पुण्यानें दुसऱ्या जन्मीं तरी ती राजकन्या माझी भार्या होऊं दे.' इतकें बोलून दीप्त अग्नींत पडावयास उद्युक्त झालेल्या त्याच्या समोर साक्षात् पावक प्रगट झाला, व प्रसन्न होऊन त्यास म्हणाला,—'वत्सा, असें साहस करूं नको. ती तुझी भार्या होईल. तूं खरोखरी चांडाल नव्हेस, तर कोण आहेस तें सांगतों ऐक—

या नगरांत कपिलशर्मा या नांवाचा एक उत्तम द्विज होता. त्याच्या अग्निगृहामध्यें मी प्रत्यक्ष साकार होऊन रहात असें. एकदां तेथें जवळ आलेल्या त्याच्या कन्येच्या रूपावर लुब्ध होऊन मी वराच्या योगानें तिचीं दूषणें घालविलीं व तिला आपली भार्या केलें. तिच्या ठायीं माझ्या वीर्यापासून तूं तत्काल उत्पन्न झालास. पण त्या साध्वीनें लज्जेनें तत्क्षणीं तुला मोठ्या मार्गावर नेऊन ठेविलें. त्यामुळें तूं चांडालाच्या हातीं लागलास. त्यानें तुला बकरीच्या दुधावर वाढविलें. अशी तुझ्या उत्पत्तीची खरी वार्ता आहे. तूं आपल्याला हीन समजूं नकोस. तूं ब्राह्मणीच्याठायीं माझ्या वीर्यापासून झालेला आहेस; त्यामुळें माझ्या तेजापासून उत्पन्न झालेल्या तुला अपवित्रत्व स्पर्शही करीत नाहीं. ती कुरंगी राजकन्याच तुझी भार्या होईल.'

इतकें सांगून अग्नि अंतर्धान पावला. मातंगाच्या त्या कृत्रिम पुत्रालाही मोठा आनंद झाला. त्याला राजकन्येच्या प्राप्तीची आशा वाटूं लागली व तिच्या संबंधीं अनेक मनोरथ करीतच तो स्वगृहीं परत गेला. त्यानंतर अग्नीनें स्वप्नांत प्रेरणा केली असतां प्रसेनजित् राजानें त्या वीराविषयीं चांगला शोध केला. तेव्हां चांडाल, ब्राह्मण व ब्राह्मणकन्या यांचें सांगणें आणि स्वतः त्या पुत्राचे अलौकिक गुण यांवरून त्याच्या असामान्य पुरुषत्वाची साक्ष पटली. तो चांडाल नसून अग्नीच्या वीर्यापासून ब्राह्मणकन्येच्या ठायीं झालेला दिव्य पुरुष आहे, याविषयीं कोणालाही संशय राहिला नाहीं. नंतर मंत्री व पौरजन यांच्या संमतीनें प्रसेनजित् राजानें आपली कुरंगी कन्या त्या पावकपुत्राला दिली.

प्रस्तुत राजकन्येची कथा किती उदयनपूर्व आहे याविषयीं गमक आपल्यापाशीं नाहीं आणि मागें आलेल्या राजांशीं प्रसेनजित् या राजाचें पौर्वापर्य देणें आज मुळींच शक्य नाहीं.

या कथेचा दोन तीन दृष्टींनीं उपयोग आहे. या काळांत ब्राह्मणांच्या मुली प्रजोत्पत्तिक्षम होईपर्यंत अविवाहित असत असें दिसतें. त्याचप्रमाणें जेव्हां एखाद्या रूढीविरुद्ध विवाह करण्यास राजा आपल्या मुलीला संमति देई, तेव्हां तो ती मंत्री व पौरजन यांची अगोदर संमति घेऊन देई. जातिकुलविषयक निर्बंध राजघराण्यास पाळावे लागत आणि राजघराण्यानें अयोग्य संबंध करून राष्ट्राची अब्रू खराब करूं नये अशी प्रजेचीहि अपेक्षा असे, व ती पुरी करणें हें चांगले प्राचीन राजे आपलें कर्तव्य समजत असत.

प्रस्तुत कथा अवंतीच्या राजपुत्रानें चांडालकन्या म्हणून समजल्या जाणाऱ्या स्त्रीशीं लग्न लावण्याच्या क्रियेच्या समर्थनार्थ आली आहे. उदयन कालांत या कथेचा आधार घेऊन ज्याअर्थी धर्मशास्त्रीय प्रश्न सोडविणें उदयनांचा मेहुणा असलेल्या उज्जयिनीपतीस श्रेयस्कर वाटलें, आणि ज्याअर्थी तसें करणें वत्सराजास देखील मान्य झालें, त्याअर्थी त्या काळच्या लोकांना प्रतिष्ठानच्या राजाचें उदाहरण हें कोणातरी जंगली दाक्षिणात्याचें उदाहरण म्हणून तिरस्करणीय वाटत नव्हतें, तर ज्या राजकुलाचें उदाहरण पाहून अनुकरण करण्यांत मुळींच लाज नाहीं अशी प्रतिष्ठानच्या राजकुळाची प्रतिष्ठा उदयनकालीं होती हें सिद्ध होतें.

कुंडिनपुरच्या एका राजकन्येचें वृत्त पुढें येणार आहे.

### १२८ अ. उदयनपूर्व काळीं प्रतिष्ठानांत जैनांचें आगमन.

१२८ अ. अलंकारवती लंबकांत ( तरंग १ ) दक्षिणेंतील या प्रतिष्ठानपुराच्या पृथ्वीरूपनामक राजाची कथा आली आहे. दोघां संन्याशांच्या तोंडून मुक्तिपुर द्वीपांतील रूपलता राजकन्येच्या सौंदर्याचें वर्णन ऐकून या राजानें आपला चित्रकार तेथें पाठविला. तेव्हां तो त्या संन्याशांसह कांहीं दिवसांनीं पत्रपुर या समुद्रतीरावरील नगरास पोंचला. तेथून ते पांच दिवस जलप्रवास करून मुक्तिपुरास पोंचले. तेथील राजा रूपधर होता. चित्रकारानें पृथ्वीरूपाचें चित्र त्या राजकन्येला व राजाला दाखविलें. पृथ्वीरूपाच्या सौंदर्याकडे पाहून राजकन्या मोहित झाली व राजानें चित्रकाराला हा विवाह जुळविण्यास सांगितलें. चित्रकारानें काढलेलें रूपलतेचें चित्र पाहून पृथ्वीरूप एकदम मोहित झाला व विवाहाकरितां तो सहपरिवार निघाला. वाटेंत त्याला विंध्यारण्यांत भिल्लांनीं घेरलें, त्यांचा राजानें पराभव केला. नंतर कित्येक दिवसांनीं तो पत्रपुरास पोंचला, व तेथून आठ दिवसांच्या जलप्रवासानंतर तो मुक्तिपुरास पोंचला. रूपधरानें आपल्या जामाताला लाजाहोमाच्या वेळीं पुष्कळ रत्नें व मोत्यें दिलीं. नंतर कांहीं दिवसांनीं पृथ्वीरूप परत आपल्या नगरास आला.

ही मनोरम कथा अत्यंत संक्षेपानें दिली आहे. सविस्तर दिल्यास गंभीर इतिहास सांगण्याच्या ऐवजीं केवळ प्रेमकथाच सांगत बसण्याचा आक्षेप कांहीं संभावित वाचकांकडून येण्याचा संभव आहे म्हणून मूळांतील सुंदर वर्णनें वगळलीं आहेत. येथें सांगावयाची गोष्ट एवढीच कीं 'पत्रपुर' आणि 'मुक्तपुर' या समुद्रकांठच्या नगराकडे लक्ष वेधलें जावें. दुसरी एक लक्षांत आणण्याजोगी गोष्ट म्हटली म्हणजे श्रमणांचा उल्लेख होय. तेवढ्यावरून हा उल्लेख बौद्धाविषयींचा आहे अशा निर्णयावर एकदम उडी मारूं नये. श्रमण बौद्ध जैन त्याप्रमाणेंच इतर संप्रदायांत देखील होते. महावीर हा बुद्धाशीं समकालीन होता पण जरा त्यापेक्षां वृद्ध होता एवढेंच; असें असतां उदयन-पूर्व काळांत जैन साधू होते काय हा प्रश्न विचारांत घेतला पाहिजे. हे दोन भिक्षु समुद्रमार्गानें संचार करीत होते असें विधान येथें आहे तें विचारणीय आहे. या विधानापासून अनेक अर्थ किंवा अनुमानें निष्पन्न होतील. सोपें अनुमान म्हटलें म्हणजे उदयनकालीं जैन धर्माचें अस्तित्त्व शक्य नाहीं असें म्हणून ती गोष्ट क्षेपक ठरविणें होय. पण दुसऱ्या अनेक शक्यता लक्षांत घेतल्याशिवाय ती गोष्ट क्षेपक ठरविणें योग्य होणार नाहीं. एकतर हे साधु जैन किंवा बौद्ध होते याविषयीं खात्री नाहीं. बापटशास्त्र्यांनीं भाषांतरांत मात्र त्यांस जैन बनविलें आहे. शिवाय जैनधर्माचें अस्तित्व महावीराच्या पूर्वीच्या काळीं देखील होतें आणि हा शेवटचा तीर्थंकर होता असें सर्व जैन ग्रंथ एकमतानें सांगत आहेत. शिवाय भागवतासारखे ब्राह्मणी ग्रंथ ऋषभाचा देखील उल्लेख आदरपूर्वक करीत आहेत. अशा परिस्थितींत ती कथा दुसऱ्या बळकट पुराव्याच्या अभावीं उदयनोत्तर अगर क्षेपक ठरवितां येणार नाहीं. व ही कथा खरी धरली तर उदयनपूर्वकालांतच महाराष्ट्रांत, विशेषेंकरून प्रतिष्ठान राज्यांत, जैन साधु राजे लोकांपर्यंत पोंचत होते, व त्यांचे कार्यकर्ते देखील होत होते असें दिसतें. प्रतिष्ठानराज्याच्या शातवाहनकालीन कथा जैनांनींच अधिक लिहून ठेवलेल्या आहेत ही गोष्ट देखील आपण लक्षांत घेतली पाहिजे. जैनांचा संप्रदाय महावीरपूर्व काळांत असून तो महावीरोत्तर काळांत अधिक प्रसिद्ध झाला असणें शक्य आहे व जैनधर्माचा प्रचार बुद्धपूर्वकाळीं महाराष्ट्रांत देखील झाला असणें शक्य आहे. प्रस्तुत कथा जैनांनीं मुद्दाम दडपली असें दिसत नाहीं. ती तशी असती तर त्यांनीं आपलें मत सिद्ध करण्यासाठीं थोडा बहुत अट्टाहास करून ती खास बिघडविली असती. प्रस्तुत कथेंतील कथापरिपोषास अनवश्यक म्हणून ते दोन साधु कोणत्या संप्रदायांतील होते ही गोष्ट दोन्ही रूपांतरकार सांगावयाचें वगळीत आहेत, क्षेमेंद्राचे श्लोक येणेंप्रमाणें आहेत.

**पृथिवीरूप इत्यासीत् प्रतिष्ठानपुरे नृपः**
**अनंगतां स्मरो भेजे मेने यत्कांतिनिर्जितः**
**स नानादेशसंचारचतुरैः सद्यभिक्षुभिः**
**शुश्राव वर्णितां कांतां मुक्ताद्वीपपतेः सुताम्**

सोमदेवानेंहि भिक्षूच्या पंथाचा उल्लेख मूळांत असल्यास रूपांतरांत कायम ठेवला नाहीं. सोमदेव लिहितो—

**अस्ति नाम्ना प्रतिष्ठानं नगरं दक्षिणापथे**
**पृथ्वीरूपाभिधानोभूद्राजा तत्रातिरूपवान्**
**तं परिज्ञानिनो जातु श्रमणौ द्वावुपेयतुः**

प्रतिष्ठानचे राजे म्हणून जे अनेक उल्लेख आले आहेत त्यांचा व दक्षिणापथाचे राजे यांचा विचार एकत्वानें पुढें येईलच.

### १२९. प्रतिष्ठानांतील ब्राह्मणांचे उल्लेख.

१२९. दक्षिणापथाच्या राजाकडे वळण्यापूर्वी प्रतिष्ठानच्या एका भोळ्या तपस्वी ब्राह्मणपुत्राची कथा म्हणून जी संरक्षित राहिली आहे तिचें अवलोकन करणें अवश्य आहे. त्या कथेचें "वाळूच्या सेतूचा वृत्तांत" या नांवाखालीं वर्णन आढळतें.

प्रतिष्ठानांत तपोदत्त म्हणून एक ब्राह्मण होता. बालपणीं त्याचा पिता त्याला पुष्कळ शिकवीत असे; पण तो कांहीं विद्याभ्यास करीना. पुढें तो मोठा झाला, व लोक त्या अविद्याचा तिरस्कार आणि निंदा करूं लागले. तेव्हां विद्यासिद्धीकरितां गंगेच्या कांठीं जाऊन तो मूर्ख तप करूं लागला; पण व्यर्थ उग्र तप करीत असलेल्या त्या तपोदत्ताचें निवारण करण्याच्या उद्देशानें, इंद्र ब्राह्मणरूपानें त्याच्यापाशीं आला व त्याच्या समक्ष गंगेच्या तीरावरील वाळू आपल्या मुठींनीं घेऊन गंगेच्या प्रवाहांत वारंवार टाकूं लागला. बराच वेळ चाललेला तो त्याचा प्रयत्न पाहून विस्मित होऊन तपोदत्तानें मौन सोडलें, व 'हें तूं काय आरंभिलें आहेस बाबा?' असें तो त्या ब्राह्मणरूपी इंद्रास विचारूं लागला. तो तपस्वी मोठ्या कौतुकानें व आग्रहानें विचारीत आहे असें पाहून इंद्र म्हणाला,—"लोकांच्या सुखाकरितां मी गंगेवर पूल बांधीत आहें."

तेव्हां तपोदत्त हंसून म्हणाला—"अहारे मूर्खा, प्रवाहाबरोबर वहात जाणाऱ्या वाळूचा सेतु कधीं तरी होईल काय?" तें त्याचें युक्त वचन ऐकून ब्राह्मणरूपी इंद्र म्हणाला,—"हें जर तूं जाणत आहेस, तर गुरूचा उपदेश व स्वतःचें पठन यांवांचून नुसतीं व्रतें, उपवास इत्यादि प्रकारच्या तपानें तूं विद्या प्राप्त करून घेण्यास कसा उद्युक्त झाला आहेस? बाबारे, अध्ययना-

वांचून विद्या संपादन करण्याची इच्छा करणें, म्हणजे एकही अक्षर न काढतां मोठमोठे ग्रंथ रचण्याची, आकाशांत चित्र काढण्याची, अथवा सशाचें शिंग मिळविण्याची इच्छा करण्यासारखें आहे; कारण विद्या जर अशी सुलभ असती, तर कोणीं कधीं अध्ययन केलें नसतें." ब्राह्मणरूपी इंद्रानें असा सदुपदेश केला, तो तपोदत्तालाही विचाराअंतीं खरा वाटला व तप सोडून तो आपल्या घरीं गेला."

प्रस्तुत कथेचें महत्व एवढेंच कीं, हा कथाविषय ज्या कालांतील आहे तो काल, प्रतिष्ठान आणि गंगातीर या दोन ठिकाणीं विद्येच्या दृष्टीनें एकसमाजता होती, त्या कालाची आठवण देणारा आहे, आणि ज्याअर्थी ही कथा अतिशय प्राचीन म्हणून येथें दाखविली आहे त्याअर्थी तितक्या प्राचीन काळीं प्रतिष्ठानचे विद्यार्थी गंगातीरीं अभ्यासास जात असत हें स्पष्ट आहे. गंगातीरच्या एका राजाचा कुंडिनपुरच्या राजकन्येशीं विवाह व तदनंतरचा आयुष्यक्रम यासंबंधाची एक कथा पुढें येणारच आहे.

प्रतिष्ठानच्या प्राचीन राजांच्या आणि ब्राह्मणाच्या बृहत्कथेंत आलेल्या कथा येणेंप्रमाणें येथें अवतरिल्या आहेत. त्या कथांशिवाय दुसऱ्या अनेक प्रतिष्ठानीय कथा बृहत्कथेंत समाविष्ट झाल्या आहेत; पण त्या भिन्नकालीन आहेत असें त्या ग्रंथाचेंच सांगणें आहे. उदयनकालीन किंवा तत्पूर्वकालीन कथा आणि गुणाढ्यकालीन प्रतिष्ठानकथा यांत कालाचें कित्येक शतकांचें अंतर आहे आणि त्यामुळें गुणाढ्यकालीन उल्लेखाचा विचार येथें करतां येत नाहीं. गुणाढ्यकालीन प्रतिष्ठानच्या कथा योग्य स्थलीं येतीलच. वाचकांनीं हें लक्षांत ठेवावें कीं या दिलेल्या पांच सहा राजांच्या कथा अत्यंत प्राचीन असून कुरुयुद्धकालापासून गौतमबुद्धापर्यंत जो विस्तृत काल होऊन गेला, त्या कालांतील थोर पुरुषांच्या आख्यायिका आहेत. नरसिंहाच्या कथेला ख्रिस्तपूर्व सहाशें किंवा सातशें ही जी मर्यादा मागें दिली आहे ( परिच्छेद ६८ पहा ) ती अंतिम मर्यादा समजावी. उदयन हा बुद्धाशीं समकालीन आहे हें माझें नसलेलें पण इतरांचें असलेलें मत स्वीकारलें आणि आतांपर्यंत उल्लेखिलेल्या दाक्षिणात्य राजांतील सर्वांत जुना राजा नरसिंह होय हें माझें मत नाकारलें तरच नरसिंह ख्रिस्तपूर्व ६००।७०० या काळांत झाला असें म्हणतां येईल. तथापि माझें उदयनकाळाविषयींचें आणि नरसिंह आणि इतर दाक्षिणात्य राजे यांच्या पूर्वोत्तरतेविषयींचें मत स्वीकारल्यास नरसिंह हा ख्रिस्ती शकाच्या पूर्वी १००० वर्षें या सुमाराला किंवा त्याहूनही प्राचीनतर काळीं झाला असावा, याच निर्णयाला आल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

## १३०. उदयनपूर्व प्राचीन आठवणींची व्यापकता.

१३०. प्रतिष्ठानीय राजांच्या व ब्राह्मणांच्या कथा सांगितल्या म्हणजे महाराष्ट्राचा इतिहास आटोपला असें नाहीं; पूर्वमहाराष्ट्र आणि अपरांत यांनां स्वतंत्र इतिहास होताच. त्यांच्या संबंधीं बृहत्कथेंत जे उल्लेख आले आहेत त्यांच्याकडे वळणें आतां अवश्य आहे. कोंकण आणि विदर्भ यांच्या उदयनपूर्वकालीन कांहीं तरी आठवणी बृहत्कथेंत संरक्षित झाल्या आहेत. त्या शिवाय दक्षिणापथ म्हणून ज्या प्रदेशांचा उल्लेख होत आहे त्यांच्याहि कथा आहेतच. त्या सर्वांचा एकत्र विचार केला असतां उदयनकालीन महाराष्ट्राचें बरेंच व्यवस्थित समाजचित्र हातीं येत आहे असें दिसून येईल.

आजच्या पैठण येथें शातवाहनाच्या वेळची एक विहीर दाखवितात; पण ही मुळींच प्राचीन वाटत नाहीं. शातवाहनपूर्व अवशेष तेथें सांपडतील या अपेक्षेनें तेथें कोणी शोध केला नाहीं. आज पैठण येथें गोदावरीच्या कांठांशींच मातीचे मोठमोठे ढीग आहेत आणि अनेक शतकांची किंबहुना सहस्रकांची माती तेथें सांचलेली आहे. या ढिगांपैकीं कांहीं ढिगांची उंची तीस पासून चाळीस फूट आहे. या मातीच्या ढिगाचें उत्खनन जेव्हां होईल तेव्हां बरीच ऐतिहासिक संपत्ति हातीं लागण्याचा संभव आहे. प्रस्तुत लेखकानें हें उत्खनन लवकर सुरू करण्यासंबंधानें तेथील अधिकाऱ्यांस लिहिलें, व त्यांनीं लवकरच तें हाताशीं घेण्याचें कबूल केलें आहे; पण हें अभिवचन केव्हां अमलांत येईल तें येवो.

प्रकरण १७ वें.

# दक्षिणापथ आणि पूर्व महाराष्ट्र

## १३१. प्रतिष्ठान आणि दक्षिणापथ यांतील राजे.

१३१. प्रतिष्ठानचे राजे आणि दक्षिणापथाचे राजे म्हणून दोन भिन्न उल्लेख बृहत्कथेंत उदयनपूर्व राजांविषयीं आले आहेत. तर हीं दोन राज्यें भिन्न होतीं काय हा आपणापुढें प्रश्न आहे. हा प्रश्न सोडविण्यास पौराणिक साहित्याचा आज तरी पूर्ण अभाव आहे. भावी काळांत ही माहिती सांपडणार नाहींच असें नाहीं. दक्षिणेकडील प्रतिष्ठानच्या प्राचीन राजांची वंशावलि पुराणांत अजून सांपडली नाहीं, तथापि ती सांपडणार नाहीं अशीहि कल्पना करण्याचें कारण नाहीं. जेव्हां विशिष्ट राजकुल मगधापर्यंत जाऊन त्याचें जेतृत्व राज्य करी तेव्हां त्या राजकुळाच्या अस्तित्वाकडे पुराणकार लक्ष देत असत. दाक्षिणात्य राजांनीं शातवाहनापूर्वी मगध जिंकला नाहीं म्हणून त्यांचा पुराणांत उल्लेख नाहीं. तथापि हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, पुराणकार आपली माहिती दुसऱ्या कोठून तरी घेत असत आणि ती ज्या साहित्यापासून घेत असत तें साहित्य अजीबात नष्ट झालेंच असलें पाहिजे असें नाहीं. स्थानिक माहात्म्यें, स्थानिक इतिहास किंवा दंतकथा संरक्षून ठेवीत. कित्येकदां स्थानिक साहित्याच्या संस्कृत रूपांतरापूर्वी तें प्राकृत भाषेंत असे आणि कालांतरानेंच त्यांतील आशय संस्कृतमध्यें समाविष्ट होई. संस्कृतमध्यें साहित्य प्रविष्ट झालें म्हणजे प्राकृत साहित्य नष्ट होई असें नाहीं. एवंच प्राचीन ऐतिहासिक कथांचें सातत्य प्राकृत ग्रंथांत असणें अशक्य नाहीं. ग्रंथोत्पत्तीच्या अनेक पायऱ्या असल्यामुळें कोणत्या तरी एका मधल्या पायरीवर ऐतिहासिक महत्त्वाचा मजकूर राहून गेलेला असतो.

या शक्यतेकडे लक्ष देण्याचें कारण, या दृष्टीनें अजून परिश्रम झाला नाहीं हें होय. गेल्या पिढींतील संशोधक समजल्या जाणाऱ्या पाश्चात्यांना आणि त्यांच्या अनुयायी देशी पंडितांना पुराणांचें यथार्थस्वरूप न समजल्यामुळें पौराणिक ग्रंथांविषयीं शोध, व संकलन इत्यादि क्रिया त्यांच्याकडून झाल्या नाहींत. तर या पिढींत त्या क्रियांस उत्तम तऱ्हेनें चालना मिळून हें कार्य पुढें सरकणार आहे असा प्रस्तुत लेखकास विश्वास वाटत आहे. असो.

दक्षिणेकडील राष्ट्रांसंबंधानें सविस्तर विवेचनांत शिरण्यापूर्वी दक्षिणापथांतील राजाविषयीं ज्या कथा आल्या आहेत त्यांच्याकडे लक्ष देऊं.

## १३२. दक्षिणापथाचा राजा सिंहबल याची कथा.

१३२. कथासरित्सागरांत दक्षिणापथ येथील राजा सिंहबल याच्याविषयीं देखील आख्यायिका शक्तियशोलंबकांतच आली आहे. क्षेमेंद्र आपल्या संक्षिप्त शब्दांत ती पुढीलप्रमाणें देत आहेत.

**राजा सिंहबलाभिख्यो वीरोऽभूद्दक्षिणापथे ।**
**भार्या कल्याणवत्याख्या तस्य प्रियतमाऽभवत् ॥**
**स कदाचिज्जितो भूपैः समरे संप्रहारिभिः ।**
**गूढं सभार्यः प्रययौ श्वशुरावसथोन्मुखः ॥**
**स व्रजन्मालवपुरं वने त्रस्तां निजप्रियाम् ।**
**दृष्ट्वा जघान खड्गेन दस्युशार्दूलकुञ्जरान् ॥**
**श्वशुरस्य गृहे प्राप्य तत्र विन्यस्य तां प्रियाम् ।**
**गजानीकाभिधानस्य सुहृदः प्रययौ गृहान् ॥**
**तेन संपूजितो राजा जेतुं सिंहबलो रिपून् ।**
**जगामादाय तद्दत्तां गजवाजिवरूथिनीम् ॥**
**पितुर्गृहेऽपि तद्भार्या दृष्ट्वा वातायनान्नरम् ।**
**आनिनाय रहो दूत्या मन्मथेनाकुलीकृता ॥**
**तमागतं निष्प्रतिभं भीमं नीचं निराश्रयम् ।**
**निरुत्तरं विलोक्यैव लज्जिता शुचमाययौ ॥**
**अहो नु योषितः पापा यदयं तादृशं पतिम् ।**
**धीरं विस्मृत्य नीचेऽस्मिन्नभिलाषमुपागता ॥**
**इति संचिन्त्य सा युक्त्या तं निरस्य नराधमम् ।**
**निनिन्द मुहुरात्मानं जहास नरकांतरम् ॥**
**अत्रान्तरे पराजित्वा राजा सिंहबलो युधि ।**
**राज्यमासाद्य दयितां निनाय स निजां पुरीम् ॥**

याच कथेच्या कथासरित्सागरी संस्कृत अनुवादाचा बापट शास्त्रीकृत मराठी अनुवाद पुढीलप्रमाणें आहे.

पूर्वी दक्षिण देशांत सिंहबल नांवाचा राजा होता. त्याची कल्याणवती या नांवाची भार्या होती. ती मालवसामन्त राजाची कन्या. राजाला सर्व अंतःपुर–स्त्रियांहून अधिक आवडत असे. तिच्यासहवर्तमान तो राज्य करीत असतांना,

एकदां त्याच्या बलाढ्य गोत्रजांनीं एकमत करून त्याला देशांतून घालवून दिलें ( **निष्कालितोऽभूद् बलिभिर्देशात्संभूय गोत्रजैः** ) तेव्हां देवीला बरोबर घेऊन राजा सिंहबल, आयुधें व थोडासा परिवार यांसह सासऱ्याच्या मालव देशाकडे जावयास निघाला. मार्गानें जात असतांना एका अरण्यांत एक मोठा सिंह त्याच्या अंगावर धांवून आला; पण त्या शूरानें खड्गप्रहार करून त्याचे सहज दोन तुकडे केले. पुढें गेल्यावर एक वन्य हत्ती गर्जना करीत त्या सर्वांच्या समोर आला; पण मंडलाकार भ्रमण करणाऱ्या राजानें आपल्या तीक्ष्ण तरवारीनें त्याच्या सोंडेचा शेंडा उडवून त्याला ओरडत भूमीवर लोळविलें. कांहीं वेळानें त्यांच्यावर चोरांची सेना चालून आली; पण एकट्याच शूरानें तिचा पराभव केला. याप्रमाणें पुष्कळ मार्ग चालून गेल्यावर तो धैर्यसागर मालवदेशास पोंचला. नंतर ज्याचा पराक्रम प्रत्यक्ष अनुभवास आला आहे असा तो आपल्या देवीला म्हणाला,—'तूं हें माझें मार्गांतील शौर्य पित्याच्या घरीं कोणाला सांगूं नको; कारण क्षत्रियानें असले पराक्रम करणें यांत श्लाघा कसली ? उलट ती कोणी करूं लागल्यास त्याला लज्जाच आली पाहिजे.' असो. इतकें सांगून तो तिच्यासहवर्तमान श्वशुरगृहीं गेला.

आपला जामात एकाएकीं आला आहे असें पाहून सासरा घाबरून अशा दीन अवस्थेंत येण्याचें कारण विचारूं लागला. तेव्हां सिंहबलानें आपलें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून मालवराजानें त्याचें सांत्वन केलें, व धीर देऊन योग्य सन्मान केला. कांहीं दिवस त्याला आपल्या येथें ठेवून घेतलें. नंतर त्या श्वशुरानें त्याला आपले घोडे व हत्ती दिले, आणि दुसरें सैन्य जमवून शत्रूंना जिंकावयास सांगितलें. तेव्हां तो पराक्रमी राजा गजानीक नांवाच्या एका अति बलाढ्य राजापाशीं गेला. जातांना तो शत्रूंना जिंकावयास उद्युक्त झाला असल्यानें त्यानें आपल्या कल्याणवती भार्येला तिच्या बापाच्या येथेंच ठेविलें.

तो जाऊन कांहीं दिवस झाले असतां, एकदां त्याच्या देवीनें खिडकींतून एका पुरुषास पाहिलें, व तत्काल त्यानें तिचें मन हरण केलें. स्मरवश झालेली ती लगेच आपल्या मनांत विचार करूं लागली कीं, 'माझ्या पतीहून दुसरा कोणताही पुरुष अधिक सुरूप व शूर असणें शक्य नाहीं, हें मी जाणतें. पण या पुरुषाकडे माझें मन धांव घेत आहे ! काय करूं ? याच्या समागमावांचून माझ्यानें रहावत नाहीं. यास्तव काय होईल तें होवो. मी त्याचें सेवन करणार!' असा मनांत विचार करून तिनें एका विश्वासु व गुप्त गोष्ट बाहेर न फोडणाऱ्या सखीला तो आपला अभिप्राय सांगितला. तिच्या द्वारा राणीनें त्या पुरुषाला आणवून व खिडकींतून दोरी सोडून तिच्या वरून त्याला आपल्या अंतःपुरांत घेतलें; पण आंत आल्यावर तो धैर्यानें तिच्या पर्यंकावर बसूं शकला नाहीं; तर खालींच निराळ्या आसनावर बसला. तें पाहून हा कोणी नीच आहे असें जाणून ती जों मनांत खिन्न होत आहे, तों वरून फिरत फिरत एक सर्प खालीं उतरला. त्याला पाहतांच एकाएकीं तो भयानें व्याकुळ होऊन उठला. धनुष्य घेऊन त्यानें त्याला बाणानें मारलें, व तो मरून पडला आहे असें पाहून त्या भितऱ्यानें त्याला बाणानेंच उचलून खिडकींतून बाहेर फेंकून दिलें आणि नंतर भयशून्य झालेला तो आनंदानें नाचूं लागला. हा त्याचा भितरा स्वभाव पाहून, कल्याणवती मनांत अतिशय खिन्न झाली; व म्हणाली, 'धिक् धिक् ! या अधम व अधीर मनुष्याला घेऊन मला काय करावयाचें आहे ?'

राणीच्या चर्येवरून ती या पुरुषाविषयीं विरस झाली आहे असें ताडून, तिचा अभिप्राय ओळखणाऱ्या चाणाक्ष सखीनें बाहेर गेल्यासारखें करून, व त्वरेनें आंत येऊन राणीस म्हटलें, 'देवी, तुझा पिता आला आहे, यास्तव आतां या तरुणाला आल्या मार्गानेंच सत्वर आपल्या घरीं जाऊं दे. सखीच्या तोंडांतून निघालेले हे शब्द ऐकून, तो भितरा थरथरां कांपतच उठला व खिडकींतील दोरीवरून खालीं उतरूं लागला, पण भयानें व्याकुळ झालेल्या त्याच्या हातांतील दोरी अर्धा मार्ग उतरून झाल्यावर सुटली व तो खालीं पडला. आयुष्य संपलेलें नसल्यामुळें प्राण गेला नाहीं इतकेंच !

तो गेल्यावर कल्याणवती आपल्या सखीला म्हणाली, 'गडे तूं त्या नीचाला बाहेर घालविलेंस, हें बरें केलेंस. तूं माझा अभिप्राय ओळखलास. सखे, माझें मन या गोष्टीविषयीं अत्यंत खिन्न व दुःखित झालें आहे. माझा पति व्याघ्रसिंहादिकांस मारून ती गोष्ट कोणाला कळावी, असें इच्छितहि नाहीं; पण हा अधीर, सापाला मारतांच वेड्यासारखा नाचूं लागतो ! तेव्हां त्या तसल्या शूराला सोडून माझें मन या पामरावर कसें आसक्त झालें, कांहीं कळत नाहीं. जिची मति अस्थिर आहे अशा मला धिक्कार असो. अथवा कापूर सोडून विष्ठेकडे धावणाऱ्या माशांसारख्या सर्व स्त्रियांनाच धिक्कार असो !' असें म्हणून जिला अतिशय पश्चात्ताप झाला आहे, अशी ती राणी ती रात्र मोठ्या दुःखांत घालवून, दुसऱ्या दिवसापासून आपल्या शूर भर्त्याची वाट पहात पित्याच्या घरीं राहिली.

इकडे गजानीक राजानें त्याला आणखी पुष्कळ सैन्य दिलें. त्या सर्व सैन्यासह अकस्मात् जाऊन सिंहबलानें सर्व पापी गोत्रजांस मारलें. त्यामुळें त्याला त्यांच्याही राज्यासह

स्वराज्य परत मिळालें. नंतर त्यानें आपल्या प्रियेला पित्याच्या येथून परत आणलें, श्वशुराला पुष्कळ धन दिलें, व निष्कंटक पृथ्वीचा उपभोग घेतला.*

## १३३. सिंहबलाच्या कथेचें वैशिष्ट्य व सिंहबलाच्या कथेचा ऐतिहासिक अर्थ.

१३३. सिंहबलाची कथा केवळ मनोरंजनार्थ तयार झालेली लौकिक कथा नसून ऐतिहासिक राजाविषयीं आहे असें मत होण्यास कथा या दृष्टीनें पोषक नसलेले उल्लेख होत. ते म्हटले म्हणजे, कल्याणवती 'सामन्त' राजाची मुलगी होती म्हणून सांगणें आणि त्याच्यापाशीं पुरेसें साहित्य नव्हतें म्हणून गजानीक नांवाच्या एका बलाढ्य राजाची मदत मिळविली हें सांगणें, हे होत.

दक्षिणापथाच्या सिंहबलाच्या कथेंतील आणखी एक वैशिष्ट्य हें आहे कीं, त्यास त्याच्या गोत्रजांनीं राज्यावरून घालवून दिलें या बाबतींत त्याची कथा प्रतिष्ठानच्या विक्रमसिंहाच्या कथेशीं सदृश आहे. दक्षिणापथाच्या राजांना आपल्या दायादांचें आणि गोत्रजांचें भय फारच होतें असें दिसतें. प्रतिष्ठानच्या राजांना सुद्धां असें दायादांचें भय होतें. या भयापासून महाराजे अलिप्त नव्हते त्याप्रमाणें मांडलिक देखील नव्हते. ही गोष्ट दाखविणारी दक्षिणापथांतील एक मांडलिक राजाची कथा उपलब्ध आहे. (शशांकवती लंबक चोविसाव्या वेताळाची कथा) त्या कथेचें जें पर्यवसान आहे तें जरासें चमत्कारिक आहे. राजा रस्त्यांत मारला गेला. त्याची राणी व मुलगी पलायन करीत असतां दुसऱ्या एका राजास व राजपुत्रास सांपडली, त्यांनीं त्यांच्याशीं लग्नें केलीं, पण राजानें मुलीशीं केलें व राजपुत्रानें आईशीं केलें, या दोन्ही संबंधांपासून दोघांना जीं अपत्यें झालीं त्यांचें एकमेकांशीं नातें काय, अशा तेथें त्या कथेमुळें उत्पन्न होणाऱ्या प्रश्नानें त्रिविक्रमसेनास वेताळानें कुंठित केलें असें दाखविलें आहे. या कथेच्या निवेदनांत सागर आणि मंजरी या दोन्ही रूपांतरांत थोडेसे फेरफार आहेत. राजाचें नांव सरित्सागरांत 'धर्म'† असें दिलें आहे तर बृहत्कथामंजरीनें 'धीमान्'‡ असें दिलें आहे. धीमान् याचा पराभव करणारे त्याचेच गोत्रज होते असें बृहत्कथामंजरीनें दिलें नाहीं. या सर्व विशेष गोष्टी कथासरित्सागरांत आहेत आणि त्यामुळें या विधानाच्या सत्यतेविषयीं संशय उत्पन्न होत नसून उलट त्यामुळें कथासरित्सागराचें महत्व लक्षांत येतें. कथासरित्सागरानें प्राचीन कथा जशीच्या तशीच देण्याचा प्रयत्न केला आहे. आणि त्यामुळें आपल्या पुढें असलेल्या आवृत्तीचें प्रामाणिक रूपांतर सोमदेवानें केलें असलें पाहिजे असें म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं.

## १३४. दक्षिणापथ व प्रतिष्ठान यांतील राजांसंबंधीं बृहत्कथेंतील विधानांचा समारोप.

१३४. येणेंप्रमाणें प्रतिष्ठान आणि दक्षिणापथ या दोन ठिकाणचे मिळून अनेक राजे आपल्या दृष्टिपथांत येतात. त्यांकडे एकंदर साकल्यानें अवलोकन करून त्यांतील पौर्वापर्याच्या विचाराचें देखील पुनरवलोकन करूं. उदयनकालाशीं सामीप्य अगर दूरता दाखविणाऱ्या सर्व उल्लेखांविषयीं असें म्हणतां येईल कीं, हे सर्व राजे उदयनाच्या पूर्वींचे आहेत, तथापि त्याच्या अगोदरच्या सहस्रावधि वर्षांच्या काळखंडांत नक्की काळ आणि पौर्वापर्य सांगण्यास खात्रीचीं गमकें नाहींत.

(१) नरसिंह भूपाल हा प्रतिष्ठानचा अत्यंत जुना राजा असावा असें त्याच्या अश्वहीन सेनेवरून वाटतें. याचा प्रतिस्पर्धी मगधराज विक्रमादित्य हा होता.

(२) त्रिविक्रमसेन हा राजा उदयनपूर्वकालीनच असला पाहिजे; पण त्याच्या पूर्वी विक्रमादित्य उज्जयिनीस होऊन गेला आणि तोच विषमशील म्हणजे महेंद्राचा मुलगा आणि वेताळ वगैरेवर जय मिळविणारा आणि त्यांना हुकमांत ठेवणारा असावा. त्रिविक्रमसेनाची कथा मृगांकदत्ताच्या एका सेवकास सांगितली गेली आहे. मृगांकदत्ताची कथा विरही नरवाहनदत्तास जुनी कथा म्हणून पिशंगजट मुनीनें सांगितली आहे. म्हणजे नरवाहनदत्ताच्या कालापेक्षां म्हणजे उदयनाच्या कालापेक्षां फार प्राचीनकालीं त्रिविक्रमसेन झाला असाच अभिप्राय कथापरंपरारक्षकांचा दिसतो.

(३) विक्रमसेन याचा उल्लेख प्रतिष्ठानचा राजा म्हणून आला आहे. याचें राज्य दायादांनीं घेतलें, पण पुढें त्यानें उज्जयिनीच्या एका गणिकेच्या साहाय्यानें परत घेतलें, व उज्जयिनी देखील जिंकली. तेथील कोणत्या राजाचा पराभव केला हें दिलें नाहीं. कथासरित्सागर या विक्रमसेनाचें नांव विक्रमसिंह असें देतो आणि त्यास पृथ्वीचें राज्य देतो.

(४) प्रतिष्ठानच्या प्रसेनजित राजाची कथा आलीच आहे.

---

* [लंबक दहावा (शक्तियशोलंबक) तरंग ३ श्लोक १०८–१३९ बापटशास्त्री यांचें भाषांतर]

†आसीत् मांडलिकः कोपि नृपतिर्दक्षिणापथे
धर्माभिधानो धौरेयः साधूनां बहुगोत्रजः
(कथासरित्सागर १२: ३१–५.)

‡दाक्षिणात्यो नरपतिर्धीमान्नाम महाबलः
शत्रुभिर्विजितः पत्न्या पुत्र्या च सहितो ययौ
(बृहत्कथामंजरी वेताळपंचविंशतिका श्लोक ११८४.)

(५) प्रतिष्ठानच्या पृथ्वीरूपाची कथा. या कथेंत प्रतिष्ठान दक्षिणापथांत आहे असा उल्लेख आला आहे.

येणेंप्रमाणें प्रतिष्ठानच्या राजांच्या पांच कथा आहेत व शिवाय दक्षिणापथाच्या राजांच्या दोन आहेत. प्रतिष्ठान हीच बराच काळ दक्षिणापथाची राजधानी असल्यास एकाच राज्याच्या सात कथा उपलब्ध होतात.

(६) दक्षिणापथाचा राजा सिंहबल याचा देखील दायादांनींच पराभव करून त्याला हांकलून लावलें. हा उज्जयिनीस आला आणि तेथें त्याचा सासरा होता त्याच्या साहाय्यानें यानें राज्य परत घेतलें.

(७) दक्षिणापथाचाच राजा धर्म. हा मांडलिक राजा होता. याचें राज्य दायादांनीं घेतलें तो मेला आणि याच्या स्त्रीनें अन्य राजाशीं लग्न लावलें. ज्याअर्थी या राजाची कथा त्रिविक्रमसेनास सांगितली आहे त्याअर्थी हा त्रिविक्रमसेनाच्या पूर्वीच्या कालीं होऊन गेला असें ग्रंथ दर्शवितो.

उदयनपूर्वकालीन सात महत्त्वाच्या राजांच्या कथा बृहत्कथेनें संरक्षित केल्या आहेत. त्यांत असें दिसून येतें कीं, दक्षिणेंतील राजांना उज्जयिनी जिंकण्याचा प्रसंग किंबहुना सार्वभौमत्व केव्हांतरी मिळालें होतें. दक्षिणेंत ज्याअर्थी दायाद राजास काढून टाकूं शकत होते, त्याअर्थी राजपुत्रांत राज्याची वांटणी होत असावी असें दिसतें.

## १३५. बृहत्कथा आणि पूर्वमहाराष्ट्र.

१३५. प्राचीनकाळीं विदर्भ हें मोठें राज्य होतें, तथापि कथासरित्सागरांत विदर्भाची स्थिति स्पष्ट करणारे उल्लेख फारसे नाहींत. विदर्भ हें स्वतंत्र राज्य होतें कीं दक्षिणापथाचा एकादा भाग म्हणून समजलें जात होतें हें सांगतां येत नाहीं. विदर्भांत एक राज्य होतें व तेथील राजधानी कुंडिनपुर हीच होती हें दाखविणारी एक कथा पुढें आलीच आहे. 'भोजकट' येथील राजांचा उल्लेख येत नाहीं. अश्मकांचा देखील उल्लेख येत नाहीं. बुद्धपूर्वकालीन आणि रुक्मिणीच्या नंतरच्या कालांतील विदर्भाचा इतिहास पुढील दोन कथांत दिलेल्या उल्लेखाशिवाय जवळ जवळ शून्य आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. बुद्धकाळीं विदर्भांत अश्मकांचें राज्य होतें असें दिसतें. कदाचित् या काळांत प्रतिष्ठानच्याच राज्यांत विदर्भाचा समावेश होत असून संयुक्त राज्य अश्मकांचें असावें अशी कल्पना होते. कुंडिनपुर ही विदर्भाची प्राचीन राजधानी. तिचे उल्लेख कथासरित्सागरांतील म्हणजे बृहत्कथेंतील दोन कथांत आले आहेत. ते येणेंप्रमाणें आहेत.

## १३६. कुंडिनपुर हें विद्यास्थान होतें याची स्मारक कथा.

१३६. कुंडिन म्हणून एक पुर आहे.* त्यांत एक उपाध्याय रहात असे. त्याचे सात ब्राह्मणपुत्र शिष्य होते. एकदां दुष्काळाचे क्लेश असह्य झाल्यामुळें त्यानें आपल्या श्वशुरापासून एक गाय मागवून आणण्याकरितां शिष्यांस पाठविलें. तेव्हां ते अन्नाभावीं व्याकुल झालेले शिष्य दूरच्या गांवीं रहाणाऱ्या उपाध्यायाच्या सासऱ्याकडे मोठ्या कष्टानें गेले, व त्यांनीं त्याला आपल्या गुरूचा निरोप अक्षरशः सांगितला. तेव्हां जांवयाच्या प्रार्थनेस मान देऊन त्यानें त्यांस गाय दिली. पण त्यांतील एकालाही त्या कृपणानें मूटभरही अन्न दिलें नाहीं. शिष्य इलाज नाहींसा झाल्यामुळें गायीला घेऊन तेथून परत निघाले; पण क्षुधा व तृषा यांच्या योगानें अति व्याकुल होऊन ते अर्धमार्गांत खालीं बसले. त्यांच्यानें एक पाऊलही पुढें टाकवेना. उपाध्यायाचें घर तेथून फार लांब होतें. त्यामुळें आतां आमचे प्राण रक्षण होणें अत्यंत अशक्य आहे, असें पाहून त्या सर्वांनीं मिळून त्या धेनूस प्रोक्षणपूर्वक यथाशास्त्र मारून तिच्या मांसानें आपलें दुष्पूर उदर भरलें. आणि राहिलेलें मांस घेऊन ते गुरूकडे आले. प्रणाम करून त्यांनीं सर्व वृत्तांत जेव्हां त्याला सांगितला, तेव्हां त्याच्या सत्य भाषणानें प्रसन्न झालेल्या गुरूनें त्यांचा अपराध सहन करून क्षमा केली. पुढें दुष्काळामुळें अन्नाभावीं ते सातही जण मरण पावून त्या सत्याच्या प्रभावानें जातिस्मर झाले.

## १३७. विदर्भ आणि गंगातीर येथील राजघराणीं व त्यांचा वैवाहिक संबंध.

१३७. कुंडिनपुर ही राजधानी होती. त्या काळचे उल्लेख देखील कनकवर्ष आणि मदनसुंदरी यांची कथा अलंकारवती लंबकांत (तरंग ५) आली आहे ती कथा अनेक कारणांसाठीं, विशेषतः महाराष्ट्रांतील चालीरीतींच्या इतिहासासाठीं लक्षांत ठेवण्याजोगी आहे. त्या कथेचा आशय पुढीलप्रमाणें आहे.

पूर्वी गंगातीरीं कनकपुर नामक नगरांत कनकवर्ष नांवाचा बलवान् असा राजा होता. तो राजा वासुकि नागराजाचा पुत्र प्रियदर्शन याच्या यशोधरा नामक राजकन्येच्या ठायीं झालेला पुत्र होता. विदर्भ देशांतील कुंडिनपुर येथील रोलदेव नांवाच्या चित्रकाराकडून तेथील राजा देवशक्ति याच्या अनन्तवती राणीपासून झालेल्या मदनसुंदरी या राजकन्येच्या

---

* कथास्थान–बृहत्कथामंजरी लंबक ७, गुच्छ १. श्लोक ५५–६१. कथासरित्सागरांत ६. १. १०९–१२०.

सौंदर्याची प्रशंसा ऐकून त्यानें तिच्याकरितां मागणी घातली.

**विदर्भेष्वस्ति नगरं श्रीमत्कुण्डिनसंज्ञकम् ।**
**देवशक्तिरिति ख्यातस्तत्रापि च महीपतिः ॥ ५६ ॥**
**तस्यानन्तवतीत्यस्ति राज्ञी प्राणाधिकप्रिया ।**
**तस्यां तस्य सुतोत्पन्ना नाम्ना मदनसुंदरी ॥ ५७ ॥**

( क. स. सा. अलंका. त. ५ )

असें तिचें वर्णन कथासरित्सागरांत दिलेलें आहे. देवशक्तीनें अनुमति दिल्यावर त्या दोघांचा विवाह झाला; व कांहीं दिवसांनीं कनकवर्ष कुंडिनपुराहून कनकपुरास परत आला.

एकदां वसंतऋतूंत राजा नदींत आपल्या स्त्रियांबरोबर विहार करीत असतां एका स्त्रीचें उत्तरीय वस्त्र खालीं सरकलें. राजानें लोलुप होऊन तिच्या उघड्या अंगावर जलसिंचन केलें. तेव्हां मदनसुंदरी तिच्याविषयींच्या मत्सरानें मोठ्या फणकाऱ्यानें वर आली व दुसरें वस्त्र परिधान करून आपल्या मंदिरांत गेली व त्या उद्वेगानें खिन्नपणें अश्रु ढाळूं लागली. राजाच्या हें लक्षांत येतांच तो तिच्या मंदिरांत गेला. तेथें ती अश्रु ढाळीत असतां—

**जइ विरहो ण सहिज्जइ माणो ( सुहा वि ) परिवज्जणीओ ते । विरहो हिअअ सहिज्जइ माणो (पव्व) परिवद्दणीओ ते ॥ इअ जाणिऊण णिउणं चिट्ठसु ओलिम्बिऊण इक्कदरम् । उहअतडदिण्णपाओ मज्झणिवडिओ धुवं विणिस्सिहसि ॥***

( क. स. सा. अलंका. त. ५, १२५।२६ )

असें पद म्हणत होती. तेव्हां राजानें आपल्या अपराधाची कबुली देऊन तिला संतुष्ट केलें.

त्या रात्रीं त्याला एक भयंकर स्वप्न पडलें. प्रातःकाळीं राजदर्शनाकरितां आलेल्या एका संन्याशाला तें सांगतांच त्यानें त्या स्वप्नाचा अर्थ असा सांगितला कीं त्याला आपल्या स्त्रीपुत्राचा पुढें वियोग होईल व मोठ्या दुःखांतून तो पार पडला म्हणजे त्याचा त्यांशीं पुनः समागम होईल.

राजाला पुत्र नव्हता; त्यामुळें तो खिन्न झाला. एका रात्रीं त्याच्या आतेनें म्हणजे वासुकीची कन्या रत्नप्रभा इनें त्याला दर्शन दिलें. व त्याच्याकडून खिन्नतेचें कारण कळतांच तिनें त्याला कार्तिकेयाची आराधना करण्यास सांगितलें. तेव्हां दुसरे दिवशीं राजानें कारभार मंत्र्यावर सोंपवून कार्तिकेयाची आराधना करण्यास सुरवात केली. त्यांत त्याच्यावर अनेक प्रकारचीं तीव्र संकटें आलीं; पण रत्नप्रभेनें त्याच्या शरीरांत प्रवेश केल्यामुळें त्यानें तीं सहन केलीं. तेव्हां कार्तिकेयानें त्याला वरदान देऊन विशेष अनुग्रहाकरितां आपल्या गाभाऱ्यांत बोलाविलें. पण रत्नप्रभा भीतीनें त्याच्या शरीरांतून निघून गेल्यामुळें तो निस्तेज झाला. तेव्हां कार्तिकेयाच्या ध्यानांत त्याचें कपट येऊन त्यानें स्त्रीपुत्रांचा वियोग होईल म्हणून शाप दिला. पण गणपतीची आराधना करून त्यानें उःशाप मिळविला कीं, तो शाप एक वर्षपर्यंतच आपला प्रभाव दाखवील.

पुढें राजाला मदनसुंदरीपासून पुत्र झाला. त्याच्या षष्ठीपूजनादिवशीं अकल्पितपणें एका राक्षसीनें सूतिकागृहांत प्रवेश करून बालकाला स्तनपानापासून हिसकावून नेलें, व ती वेगानें तेथून गेली; शोकव्याप्त होऊन मदनसुंदरीहि तिच्यामागून गेली. राजा दुःखानें वेडा होऊन गेला. व नगरांतून बाहेर पडून भटकूं लागला. फिरतां फिरतां तो विंध्यारण्यांत प्राप्त झाला. तेथें तो विश्रांति घेत आहे तोंच एक सिंह त्याच्यावर चालून आला. इतक्यांत आकाशांतून एक विद्याधर येऊन त्यानें त्या सिंहास मारिलें. या विद्याधरावर पूर्वी राजानें उपकार केले होते. त्याच्या सांगण्यावरून तो आपल्या स्त्रीपुत्रांची भेट होण्याकरितां विंध्यवासिनीच्या दर्शनास निघाला. वाटेंत विंध्याद्रींतील भिल्लांनीं त्याला पकडून देवीला बळी देण्याकरितां बांधून नेलें. पण कार्तिकेयाच्या प्रसादानें, त्यानें देवीला नमन करतांच त्याचे पाश तुटले. शबराधिप मुक्ताफलानें हें पहातांच राजाला सोडून दिलें. इतक्यांत त्याचें शापाचें वर्ष पूर्ण झालें.

इतक्यांत रत्नप्रभा देवी मदनसुंदरी व पुत्र यांना घेऊन तेथें आली. तेव्हां सर्वच आनंदी आनंद झाला. शबरराजाच्या पल्लीला जाऊन देवशक्तीस तेथें आणवून, कार्तिकेयाच्या सांगण्याप्रमाणें त्यानें आपल्या पुत्राचें नांव हिरण्यवर्ष ठेविलें, व नंतर तो भार्या व पुत्र यांसह कुंडिनपुरास श्वशुराकडे गेला. व तेथें कांहीं दिवस आनंदांत घालवून परत कनकपुरास आला.

## १३८. कनकवर्षाच्या कथेंतील ऐतिहासिक दृष्टीनें महत्त्वाचा भाग.

१३८. प्रस्तुत कथानक अनेक गोष्टींमुळें उपयुक्त आहे. षष्ठीपूजनाचा उल्लेख यांत आहे. षष्ठीपूजनाची आवश्यकता कां तर राक्षसांनीं मुलें नेऊं नयेत म्हणून, अशा तऱ्हेची सम-

* 'मत्प्रिय हृदया, तुला प्रियविरह सहन होत नसेल तर मान सोडला पाहिजे; विरह सहन करण्याचें सामर्थ्य असेल तर मान हवा तितका वाढीव; चांगला विचार करून यांतील एकाचा आश्रय कर; नपेक्षां दोहों डगरींवर पाय देऊन राहिलेल्या पुरुषाप्रमाणें तूं खचित मध्यें पडून नष्ट होशील.'

जूत अजून महाराष्ट्रांत आहे तिला अनुरूप अशी ही कथा आहे. या कथेंत असें दाखविलें आहे कीं राजघराण्यांतील स्त्रिया जेव्हां गाणें म्हणत तेव्हां तें प्राकृतांतच होतें. प्राकृत गाण्यांचा जो मासला राजस्त्री मदनसुंदरीच्या तोंडीं आला आहे तो महाराष्ट्रीभाषेचा आहे.

### १३९. नागपुर राजधानी.

१३९. विषमशीललंबकामध्यें ठिंठाकराल नांवाच्या एका द्यूतकाराची उपकथा आलेली आहे. हा द्यूतकार द्यूतामुळें प्रथम दरिद्री आणि नंतर साहसी बनला व त्याच्या साहसगुणामुळेंच त्याचा पुढें उदय झाला. कलावती नामक एका देवकन्येशीं त्याचें लग्न झालें आणि तिच्याबरोबर तो इंद्रलोकांतील नृत्य पाहून आला. आणि त्यामुळें ती सुरवधु कलावती इंद्राच्या शापाला पात्र झाली. इंद्रानें—

**तद्गच्छ नरसिंहेन राज्ञा नागपुरे पुरे ।**
**देवागारे कृते स्तंभे भव त्वं सालभञ्जिका ॥**

( तरंग २ श्लोक १४५. )

असा शाप दिला. तेव्हां ती कलावती अश्रुयुक्त झाली. कलावतीनें ठिंठाकरालाला आपलीं सर्व आभरणें दिलीं आणि नागपुरांत जाऊन देवगृहांत स्तंभाग्रपुत्रिका होऊन राहिली. पुढें ठिंठाकराल नागपुरास गेला आणि तेथें साधु बनून राहिला. जेव्हां तें देऊळ पडेल तेव्हां कलावतीची शापांतून सुटका होणार होती हें जाणून पूज्य व्यक्ति बनला. आणि राजास कांहीं तरी थापबाजी करून त्याजकडून तें देऊळ पाडविलें. त्याचें वर्णन कथासरित्सागर पुढील श्लोकांत करीत आहेः—

**ततोऽतिपरितोषात्स स्वयं हस्तेऽवलम्ब्य तम् ।**
**कपटज्ञानिनं राजा देवागारं प्रविष्टवान् ॥**
**तत्र स्तम्भे समाधूय परिव्राट् सालभञ्जिकाम् ।**
**अनुप्रविष्टां प्रियया कलावत्या ददर्श ताम् ॥**
**कलावती च तत्सालभञ्जिकारूपधारिणी ।**
**दुःखिता तं पतिं दृष्ट्वा प्रारेभे तत्र रोदितुम् ॥**
**तद्दृष्ट्वा सानुगो राजा सविस्मयविषादवान् ।**
**ज्ञान्याभासमपृच्छत्तं किमिदं भगवन्निति ॥**
**ततो विषण्णविभ्रान्त इव धूर्तो जगाद सः ।**
**एहि स्वभवनं तत्र वच्म्यवक्तव्यमप्यदः ॥**
**इत्युक्त्वा स नृपं नीत्वा राजधानीमुवाच तम् ।**
**अस्थाने कुमुहूर्ते च देवागारमिदं त्वया ॥**
**यत्कृतं तत्तृतीयेऽह्नि भविष्यत्यहितं तव ।**
**अतस्त्वद्दर्शनात्सैषा प्रारोदीत्स्तम्भपुत्रिका ॥**
**तच्छरीरेण चेत्कृत्यं तव निर्लोठ्य तन्नृप ।**
**अद्यैवैतद्द्रुतं देवकुलं भूमिसमं कुरु ॥**

वरील श्लोकांचा सारांश पुढीलप्रमाणें आहे. हा कपटज्ञानी ठिंठाकराल व राजा नरसिंह हे दोघे त्या देवागारांत गेले. तेथें ठिंठाकरालाला पाहून बाहुलीचें रूप धारण करणारी कलावती रडावयास लागली. अर्थात् तें पाहून राजाला विस्मय वाटला आणि ती कां रडत असावी असें राजानें त्या धूर्त ठिंठाकरालास विचारलें तेव्हां त्यानें राजाला सांगितलें कीं भलत्याच स्थानावर आणि भलत्याच मुहुर्तावर तूं देऊळ बांधलें आहेस आणि त्यामुळें तुझें तिसऱ्या दिवशीं अहित होईल हें जाणून ती स्तंभपुत्रिका रोदन करूं लागली आहे. तर आतां याला एकच उपाय आहे आणि तो म्हटला म्हणजे हें देऊळ ताबडतोब जमीनदोस्त कर.

अर्थात् राजानें देऊळ जमीनदोस्त केल्यावर ठिंठाकराल आणि कलावती यांचा पुन्हा समागम झाला आहे.

या ठिंठाकरालाचें नांव बृहत्कथामंजरींत टेंटाकराल असें आलें आहे. या फरकाशिवाय कोणताही महत्त्वाचा फरक दोन्ही ठिकाणच्या वृत्तांत नाहीं. या कथेंत ज्या नागपुर शहराचा उल्लेख आला आहे तें आजचेंच मध्यप्रांतांतील राजधानीचें शहर आहे कीं काय या विषयीं निश्चय करण्यास साधन असें त्या कथेंत कांहीं एक नाहीं. तथापि हेंही म्हटलें पाहिजे कीं, विदर्भांतील नागपुर हेंच प्राचीनकाळीं अधिक ज्ञात होतें असें वाटतें. नंदिवर्धन म्हणून जी एका विषयाची राजधानी पुढें राष्ट्रकूटांच्या काळांत प्रसिद्ध झाली तिला नागपुर नंदिवर्धन असें म्हणत आणि त्यावरून नागपुर हें देखील अतिप्राचीनकाळीं राजधानीचें शहर असणें अशक्य नाहीं. नागपुरच्या आसमंतांतील भाग चांगला संस्कृतियुक्त होता असें दाखविणारे अनेक अवशेष नागपुरच्या शेजारीं जो माहूरझिरी म्हणून गांव आहे त्या गांवांत सांपडले आहेत.

जे अवशेष माहुरझरि येथें सांपडले ते यवतमाळच्या शारदाश्रम* वार्षिक १ लें, यांत वर्णन केले आहेत. ते वर्णन करून लेखक डॉ. हंटर यांनीं ते वाकाटककालीन आहेत असें दाखविलें आहे. तथापि वाकाटक ही अंतिम मर्यादा असावी असें वाटतें. कारण "अप्पमाद" या अक्षराची मुद्रा जरी पेटिकाशीर्षक आहे तरी इतर लेख अगोदरच्या लिपींत असावेत असा त्यांचा तर्क आहे. तेथें जे अनेक मणि सांपडले त्या मण्यांसारखे मणि त्यांस अरबस्थानांत सांपडले आणि ते ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांतील ठेवणीचे होते. मण्यांचा व्यापार तापीतटप्रदेशांत होता, आणि तेथून ते पश्चिमेकडील प्रदेशांत जात

* प्र. रा. रा. यशवंत खुशाल देशपांडे, एम्. ए., एल्.एल्. बी., से. शारदाश्रम.

याबद्दल पुरावा ख्रिस्ती दुसऱ्या शतकांतील पेरिप्लसचा देतात. हे दोन्ही पुरावे शातवाहनकालीन आहेत. तेथील सांपडलेल्या साहित्याच्या साहाय्यानें शातवाहनपूर्वकालांत देखील प्रवेश करतां येतो असें डॉ. हंटर सूचित करीत आहेत.

ख्रिस्तपूर्व २००० वर्षांइतकी नागपूरची संस्कृति जुनी होती पण तें सविस्तर दाखविणें या पर्वाचा विषय नाहीं. आदिपर्वांत यावर विवेचन सांपडेल.

ठिंठाकरालाच्या कलावतीचें स्थान प्रस्तुत नागपूर हेंच असावें असें वाटण्यास अनेक कारणें आहेत. त्यांपैकीं एक म्हटलें म्हणजे तेथील भूपतीचें नांव नरसिंह होतें हें होय. हें नांव देखील दाक्षिणात्य दिसतें.

अर्वाचीन इतिहासांनात गपुराम व चांद्यास गोंड राज्यें होतीं, आणि नंतर तीं भोंसल्यांनीं काबीज केलीं. गोंडांची असंस्कृत स्थिति पाहून त्यांचा प्राचीन काळच्या सुसंस्कृत लोकांशीं संबंध कसा जुळवावा हा प्रश्न उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. पूर्वीचा सुसंस्कृत प्रदेश नंतर वन्य संस्कृतीच्या लोकांच्या वर्चस्वाखालीं आला अशी क्रिया जगाच्या इतिहासांत वारंवार झाली आहे. ज्या भूमीवर जंगली गोंड हिंडत आहे त्याच भूमींत सुसंस्कृत लोकांच्या देवालयांचे किंवा राजवाड्यांचे अवशेष पूर्वमहाराष्ट्र आणि मध्यप्रांत येथें सर्वत्र सांपडत आहेत. जलप्रलयासारखीं कारणें होऊन सुसंस्कृत वसती चिखलांत गडप होऊन नंतर त्या प्रदेशावर रान माजलें अशा तऱ्हेचा विचार वर्ध्याजवळच्या भांदकपासून सिरोंच्या पर्यंतचा प्रदेश पाहिल्यानंतर आल्याशिवाय रहात नाहीं !

### १४०. विदर्भ आणि नागपूर यांचा बुद्धपूर्वकालीन इतिहास.

१४०. पूर्वमहाराष्ट्राचे उदयनपूर्वकालीन उल्लेख येणेंप्रमाणें अत्यंत अल्प आहेत. खरोखर पहातां मगधांतील व उत्तरेकडील कथासंरक्षक यांचा संबंध प्रतिष्ठानपेक्षां पूर्वमहाराष्ट्राशींच अधिक असावयाचा अशा प्रकारच्या परिस्थितींत पूर्वमहाराष्ट्रासंबंधानें ही मूकता त्या प्रदेशाच्या राजकीय दृष्ट्या अप्रमुखतेची दर्शक आहे. वऱ्हाडावर मगधाचें वर्चस्व कुरुयुद्ध कालीं होतें आणि त्या नंतर प्रतिष्ठानच्या राजांचा उदय झाला असला पाहिजे. प्रतिष्ठान मात्र आज मगधाशीं तर उद्यां अवंतीशीं लढाई करीत आहे, कधीं सार्वभौमत्वावर हक्क सांगत आहे, पण जेथें राज्यसातत्याचा कायदा संस्थापित झाला नाहीं व जेथें राजाला त्रास देणें इत्यादि शक्य आहे अशा स्थितींत तें होतें असें दिसतें. तथापि या तऱ्हेच्या स्थितींत प्रतिष्ठान किंवा दक्षिणापथ मात्र होतें असें म्हणतां येणार नाहीं. कुरुकुळाच्या हस्तिनापुराहून उच्चाटनानंतर हस्तिनापुरांत देखील तीच स्थिति होती. हें दाखविणारी एक कथा संरक्षित झाली आहे. ती कथा उदयनपूर्वकालीन परिस्थितीचा आढावा घेतांना सविस्तर दिलीच आहे.



**चित्रांक २५—शिवनेर किल्ल्यावरील शिवाजीच्या जन्मस्थानाचे अवशेष. हा वाडा जुना किती असावा याची कल्पना होत नाहीं. बऱ्याच जुन्या पायावर शिवाजीच्या पूर्वीच्या काळांत नवीन इमारत बांधली असावी असा संशय येतो**

प्रकरण १८ वें.

# महाराष्ट्रावरील आक्रमणें.

## १४१. महाराष्ट्रांतील आक्रमणाचीं माहितीचीं साधनें.

१४१. महाराष्ट्राच्या राजे लोकांचीं नांवें बृहत्कथेच्या सागरांत सांपडली तीं व त्यांच्या कथा आतांपर्यंत येऊन गेल्या. उदयनपूर्वकाळाची कोंकणासंबंधाची उपलब्ध असलेली माहिती पुढील एका प्रकरणांत उत्तरकालीन स्थितीशीं संगति देतांना मांडली गेलीच आहे. तथापि बृहत्कथेचें निरीक्षण केलें असतां आपणांस त्या ग्रंथापासून जी आणखी माहिती मिळत आहे ती म्हटली म्हणजे महाराष्ट्रावर आक्रमण कोणी केलें त्या संबंधाची होय.

१. न र सिं हा नें प र त वि ले लें आ क्र म ण.

महाराष्ट्रावर आक्रमणें अनेकांनीं केलेलीं दिसतात. नरसिंहानें परतविलेला विक्रमादित्य याचा वृत्तांत मागें आलाच आहे.

२. आ वं त्यां चें आ क्र म ण.

त्याशिवाय विषमशील या नांवाचा उज्जयिनीचा राजा देखील दक्षिणापथावर आक्रमण करिता झाला. मागें त्रिविक्रमसेनाची कथा आली आहे तींत असें सांगितलें आहे कीं हा त्रिविक्रमसेन पूर्वीच्या विक्रमादित्याचा अवतार होता. आणि त्या विक्रमादित्यानें जें ऐतिहासिक कार्य केलें त्याचप्रकारचें कार्य त्रिविक्रमसेनानें देखील केलें. येथें उल्लेखिलेल्या विक्रमादित्याचें नांव विषमशील होतें आणि विक्रमादित्य हें त्याचें अपरनाम होतें. या विक्रमादित्यानें जे अनेक देश जिंकले त्यांत त्यानें दाक्षिणापथ जिंकला असेंहि वर्णन आहे. अर्थात् त्या विजयाचा काल त्रिविक्रमसेनापूर्वीचा पण अनिश्चित असाच आहे. या विक्रमादित्याचा शककर्ता विक्रमादित्याशीं घोटाळा करण्याचें कारण नाहीं. तथापि प्रस्तुत राजा शककर्ता होय आणि कालिदास हा याच विक्रमादित्याच्या पदरीं होता असें मत प्रो. शेंबवणेकर यांनीं व्यक्त केलें आहे * पण तें मत स्वीकारतां येत नाहीं. प्रस्तुत विक्रमादित्य हा शककर्ताच होता असें सिद्ध करण्याचा प्रो. शेंबवणेकर यांनीं प्रयत्न केला नाहीं. कालिदासाच्या आश्रयदात्याच्या बापाचें नांव महेंद्र होतें असें, कालिदास वारंवार विक्रम आणि महेंद्र हे शब्द उच्चारतो एवढ्यावरून, दाखवूं पहात आहेत व बृहत्कथेंतील विषमशीलास कालिदासाइतक्या अर्वाचीन कालापर्यंत ओढूं पहात आहेत. पण विषमशीलास इतकें अर्वाचीन बनविण्यास पुरावा नाहीं. आणि शेंबवणेकरांच्या विधानावरून इतक्या अर्वाचीन कालापर्यंत विशमशीलास ओढतां येत नाहीं. विक्रमादित्याची कथा अत्यंत प्राचीन काळची असून जेव्हां विक्रमशक सुरू झाला असेल तेव्हां त्या मालव नृपतीच्याठायीं ज्या अनेक कथा चिकटल्या त्यांपैकीं कांहीं विषमशील नृपतीच्या देखील कथा चिकटविल्या गेल्या असतील. विषमशील नृपतीस उदयनोत्तर करण्यास अधिक सबळ पुरावा हवा आहे.

* The Date of Kalidasa. Journal of the University of Bombay, May 1933.

## १४२. दक्षिणापथविजेता विक्रमादित्य.

या विषमशीलाच्या विजयाविषयीं बृहत्कथा काय माहिती देत आहे ती पाहूं.

विक्रमादित्यानें दक्षिणापथावर राज्य केलें असें त्या विषयींचे लेख ज्या अर्थीं सांगत आहेत त्याअर्थीं त्याची कथा बरीच सविस्तर सांगणें अवश्य आहे. जन्मापासून राज्यप्राप्तीपर्यंतचे श्लोक बृहत्कथामंजरी पुढील प्रमाणें देत आहे.

श्लोक ५—१२।२

विषमशील लंबकाचा नायक विक्रमादित्य याच्या कथेंत त्यानें दक्षिण देश काबीज केला असा जो उल्लेख आला आहे, त्यांत विक्रमादित्यानें दक्षिण देश जिंकावयास विक्रमशक्तीला पाठविलें होतें असें सांगितलें आहे. त्या विजयाविषयींचा वृत्तांत दूत विक्रमादित्यास सांगत आहे.

**सापरांतश्चदेवेन निर्जितो दक्षिणापथः ।**
**मध्यदेशः ससौराष्ट्रः सवंगांगा च पूर्वदिक् ।**
**सकश्मरीच कौबेरी काष्ठाच्च करदीकृता । †**
**तानितान्यपि दुर्गाणि द्वीपानि विजितानिच ।**
**म्लेच्छसंघाश्चनिहताः शेषाश्चस्थापिता वशे**
**ते ते विक्रमशक्तिश्च प्रविष्टा कटके नृपाः**
**स च विक्रमशक्तिस्तै राजभिः सममागताः**

† कर देणारी.

"देवानें अपरांतासह दक्षिणापथ जिंकला, सौराष्ट्रासह मध्यदेश जिंकला आणि वंगासह पूर्वदिशा जिंकली, काश्मीरासह कौबेरी दिशा जिंकली, आणि "काष्ठा" पुरीस कर द्यावयास लावलें. म्लेच्छसंघ मारले. उरलेले अंकित केले. ते विक्रम शक्तीच्या सैन्यांत शिरले. त्या राजासह विक्रमशक्ति आला आहे"

ज्या राजे लोकांना पराभूत करून पुढें आपल्या सैन्यांत घेतलीं त्यांचीं नांवें पुढें दिलीं आहेत पण त्यांत दक्षिणापथ आणि अपरांत येथील राजांचीं नांवें घातलेलीं नाहींत.

त्या राजांची आणि विक्रमादित्याची ओळख विक्रमशक्ति पुढीलप्रमाणें करून देत आहे.

**गौडः शक्तिकुमारोऽयं कर्णाटोऽयं जयध्वजः**
**लाटो विजयवर्माऽयं काश्मीरोऽयं सुनंदनः**
**गोपालः सिंधुराजोऽयं भिल्लो विंध्यबलोप्ययम्**
**निर्मूकः पारसीकोऽयं नृपः प्रणमति प्रभो**

म्लेच्छांना जिंकलें. ते पुढें अनुकूल झाले म्हणून सांगितलें आहे. पण पुढें ओळख करून देतांना हा निर्मूक पारसीक आहे असें सांगितलें त्यावरून पारसीकांना भारतीय लोक म्लेच्छ म्हणत असावेत, आणि ओळख करून देतांना राष्ट्र नामानें म्हणजे हे पारसीक आहेत असें उल्लेखीत असावेत हें स्पष्ट आहे.

### १४३. विषमशीलाचा सेनानी विक्रमशक्ति हा कोण होता.

१४३. विषमशील विक्रमादित्याचा मुख्य सेनानी कोण होता ही गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. बृहत्कथेचें क्षेमेंद्रकृत रूपांतर पाहिलें म्हणजे हा सेनानी महाराष्ट्रीय होता हें स्पष्ट होईल. तथापि विक्रमादित्य महाराष्ट्राचा विजेता असून त्याला महाराष्ट्रीय राजेच सहायक कसे झाले हें समजण्यासाठीं विषमशीलाचें अवतारकार्य सांगणारे श्लोक आपण अवलोकिले पाहिजेत.

**पुरारिनिहितैर्देवद्दैत्यैर्दितिजदस्युभिः**
**अवतीर्णैर्महाम्लेच्छैः स्वस्था देवास्तृणीकृताः**
**प्रमाणमत्र भगवानिति देवगिरा हरः ।**
**भूभारशांत्यै प्रथमं माल्यवंतं समादिशत्**
**सोऽथ त्रिनयनादिष्टः पार्वतीवचसा क्षितौ**
**उज्जयिन्या नरपतेः श्रीमतः प्राप पुत्रताम्**
**राज्ञो महेंद्रादित्यस्य स्वप्ने शर्वेण सूचितः**
**सोऽभवद्विक्रमादित्यस्तनयो यशसां निधिः**
**नाम्ना विषमशीलोऽसौ द्वितीयेनापि विश्रुतः**
**सर्वशास्त्रास्त्रविद्यानां लेभे भाजनतां विभुः**
**तस्मै महीपतिर्दत्त्वा श्रियं भूपतिविश्रुतां**
**ययौ वाराणसीं धीमान् कृतकृत्यः श्रिया सह**××

वरील वर्णनांत मुख्य गोष्टी आल्या आहेत त्या याच कीं उज्जयिनीस महेंद्र राजा होता त्याच्या पोटीं शिवपार्वतींच्या आदेशानें त्यांचा माल्यवान् नामक गण आला आणि त्याच्या अवताराचा हेतु म्लेच्छापासून पृथ्वी सोडविणें हाच होता. त्याला 'म्लेच्छोच्छादनदीक्षित' असें नांव दिलें आहे. कथेचें चांगलें निरीक्षण केलें तर असें दिसून येईल कीं हा खरोखर महाराष्ट्रविजेता नसून महाराष्ट्रीयांस आपला देश शकांपासून स्वतंत्र करण्यांत सहायक होता.

आ वं त्य पू र्व श कां चें आ क्र म ण

विषमशील विक्रमादित्याचें जें वर्णन दिलें आहे त्यावरून त्याचा महाराष्ट्रांतील कोणत्याहि हिंदू राजाशीं संग्राम झालेला दिसत नाहीं. दक्षिणापथावर याच्यापूर्वी म्लेच्छानीं म्हणजे शकांनीं आपलें राज्य स्थापन केलें असावें आणि तें राज्य यानें उच्छेदिलें असावें. सिंहलद्वीपाची राजकन्या जेव्हां विक्रमादित्यास मिळण्यास जात होती तेव्हां तिला मध्येंच पकडण्याचा बेत म्लेच्छ अगर शक यांनीं चालविला होता. त्यावरून म्लेच्छांनीं म्हणजे शकांनीं याच्या पूर्वीच्या काळांत देश ताब्यांत घेतला असून त्यांपासून विक्रमादित्यानें सोडविला असा इतिहास दिसतो.

दक्षिणापथ जिंकल्यावर अंकित केलेल्या राजाची आणि विक्रमादित्याची ओळख करून देतांना दक्षिणापथच्या राजाचें नांव देत नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. दक्षिणापथाला त्यावेळेस कोणी अधिकारी राजा नसून केवळ म्लेच्छ व शक यांनीं कावीज केलेला मुलुख अशी त्याची राजकीय पदवी होती असें स्पष्ट दिसत आहे.

विषमशीलाशीं विदर्भराजाचा सेव्यसेवकसंबंध कसा उत्पन्न झाला. त्यासंबंधाची माहिती बृहत्कथामंजरींत आली आहे, ती कथासरित्सागरांत नाहीं.

बृहत्कथामंजरींत यासंबंधाचे जे श्लोक आहेत ते मधलें विषयांतर सोडून येथें देतों त्यावरून असें दिसून येईल कीं विक्रमादित्याचा सेनानी विदर्भाचा राजा होता.

विषमशीलाचें हित पहाणारी एक यक्षी येऊन विषमशीलाच्या सेनानीस सांगत आहे कीं

**"सिंहलेंद्रेण तनयां वितीर्णा शौर्यशालिनीम्**
**ज्ञात्वा विषमशीलाय सर्वे म्लेच्छशकाभिधाः**
**हर्तुमभ्युद्यताः पापा विधेयं तत्र यत्क्षमम्"** *

×× बृहत्कथामंजरी दहावा (विषमशील) लंबक श्लो. ९–१४.

* बृ. मं. १०. १३५;

सिंहलेंद्रानें आपली शौर्यशाली तनया विशमशीलाकडे पाठविली आहे हें आणून सर्व म्लेंच्छ आणि शक पुढारी तिला चोरावयास उद्युक्त झाले आहेत तर जें शक्य असेल तें कर.

**ततस्तामहमामंत्र्य प्राप्तो वैदर्भभूपतिम्**
**त्वच्छासनव्रतं वीरं सर्वं चास्मै न्यवेदयत् ***

तेव्हां तिला मी बोलावलें आणि विदर्भ भूपतीप्रत ( म्हणजे सेनापतिप्रत ) प्राप्त झाले आणि तुझ्या आज्ञापालनाचें सर्व वृत्त त्यास बोधिलें.

**अत्रांतरे संहतास्ते पापा म्लेच्छशकाधिपाः**
**ज्ञात्वा तदर्थमायांतीं सिंहलाधिपतेः सुताम्**
**पथि तस्थुः सुसंरब्धाः सेनाच्छादितदिक्तटाः**
**ततो विदर्भराजेन तेषां विक्रमशक्तिना**
**बभूव सुचिरं युद्धं विस्मयाद्वीक्षितं सुरैः**
**ततः सा यक्षतनया सहगुह्यकसेनया**
**सेनां विदर्भाधिपतेरविशद्विजयश्रिये†**

इतक्यांत ते जमलेले म्लेंच्छशकाधिप विक्रमासाठीं सिंहल राजपुत्री येत आहे असें जाणून रस्त्यांतच उभे राहिले. त्यांच्या सेनांनीं दिक्तट आच्छादून टाकला. तेव्हां विक्रमशक्ति विदर्भराज याचें त्यांच्याशीं बराच वेळ युद्ध झालें आणि तें सुरांनीं पाहिलें. त्यानंतर ती यक्षतनया गुह्यकांच्या सेनेसह विदर्भाधिपतीच्या सेनेंत विजयश्रीसाठीं प्रवेश करती झाली. असो.

दक्षिणापथावर विक्रमादित्यानें जें आक्रमण केलें तें दाक्षिणात्यांचें स्वातंत्र्य हरण करण्यासाठीं नसून त्यांना शकांपासून सोडविण्यासाठींच असावें.

### १४४. महाराष्ट्र जिंकणारा दुसरा विजेता.

१४४. महाराष्ट्रावर आक्रमण करणारा दुसरा एक राजा म्हटला म्हणजे शूद्रक नांवाचा कलिंगराज होय. या कलिंगराजानें महाराष्ट्रावर आक्रमण केलें होतें असें निश्चित विधान नाहीं. पण कर्नाटक आणि लाट या प्रदेशाचें स्वामित्त्व राजानें आपल्या वीरवर नांवाच्या सेवकांस दिलें ‡ अशी कथा बृहत्कथेंत अंतर्भूत झालेल्या वेताळपंचविशींत आहे. आणि त्या सेवकाच्या सर्व कुटुंबानें राजासाठीं प्राणदान केलें. त्यामुळें त्या सेवकांस शोभावतीच्या राजानें हा मुलुख दिला. प्रस्तुत कथेंत शोभावती ही कलिंगाची राजधानी होती, असें दिलें नाहीं तथापि अनेक इतर कथांतून शोभावती ही कलिंगराजनगरी होती हें स्पष्ट होत आहे. ज्याअर्थीं कर्नाटक आणि लाट या दोन देशांचें राज्य शोभावतीचा राजा आपल्या एका शूर आणि स्वामिनिष्ठ सेवकांस देत आहे त्याअर्थीं त्यानें महाराष्ट्राचें आक्रमण केलें असावें. आणि महाराष्ट्र हा कर्नाटक आणि लाट मिळून जें राज्य झालें त्यांत अंतर्भूत होत असावा असें स्पष्ट होतें. केवळ कथासरित्सागरांतील विधानच जमेस धरलें तर कदाचित दुसराहि एक निर्णय निघूं शकेल तो म्हटला म्हणजे ज्याप्रमाणें अशोकानें कर्नाटकावर स्वारी केली आणि सौराष्ट्रांत विजयस्तंभ उभारला आणि अपरांतांत देखील झेंडा रोंविला त्याचप्रकारच्या क्रियेची पुनरुक्ति या कलिंग राजानें केली असावी, म्हणजे आपल्या विजययात्रेंत त्यानें महाराष्ट्र वगळला असावा, तथापि कलिंग राज्य महाराष्ट्राच्या आग्नेयीस असल्यामुळें जेव्हां कलिंग हे तेलुगुदेश काबीज करीत तेव्हां ते महाराष्ट्राकडे देखील वळत अशा तऱ्हेचा पुरावा आपणांस पुढें खारवेलाच्या लेखाचा आहेच. तथापि त्यानें आपल्या भृत्यास महाराष्ट्र दिल्याचा उल्लेख प्रत्यक्ष कथासरित्सागरांत नाहीं. प्रत्यक्ष उल्लेखाच्या अभावावरून आपल्या विजययात्रेंत, महाराष्ट्रांत प्रवेश न करतां त्याला वळसा घालण्याचा सुविचार ज्याप्रमाणें उदयनानें केला, त्याप्रमाणेंच या राजानें देखील केला असेल असा निर्णय निघूं शकेल. पण केवळ तेवढ्यावरून महाराष्ट्राचा पराभव झाला नव्हता असें मात्र म्हणतां येणार नाहीं. बढाईस मारक होणारें पुढील विधान बृहत्कथामंजरींत आहे.

**ददौ वीरवरायाशु लाटराज्यं स सागरम्**
**नर्मदाकूलसहितं सगौडं दक्षिणापथम्**
**तं च शक्तिवरं दत्वा राजानम् दक्षिणापथे .**
**मेने तदुपकारस्य शतांशस्य प्रतिक्रियाम्**

याचा अर्थ गौड, दक्षिणापथ, समुद्रकाठ आणि लाट इतक्या मोठ्या प्रदेशांचें अधिपत्य दिलें. "दक्षिणापथाच्या राजाला त्या शक्तिवराला देऊन" असे शब्द आहेत त्याचा निश्चयात्मक अर्थ समजत नाहीं. कदाचित् दक्षिणापथाचा राजा मांडलिक असून त्याला शक्तिवर साहाय्यास दिला असाहि अर्थ निघूं शकेल.

### १४५. महापद्मनंदीनें महाराष्ट्र (अश्मक विषय) जिंकला होता काय ?

१४५. विषमशील आणि शूद्रक यांचे काल निश्चित नाहींत तथापि त्याच्यानंतरचा विजेता म्हटला म्हणजे महापद्मनंदी होय. यानेंच अश्मकाचें राज्य थोडा काल तरी जिंकलें असावें. येथें अश्मकाची थोडीशी तरी माहिती दिली पाहिजे

* बृ. मं. १०. १४९;

† बृ. मं. १०. १५०-१५२.

‡ **लाटदेशे ततो राज्यं सकर्णाटयुते नृपः**
कथासरित्सागर १२. ११ १०९.

जरासंधाच्याकालीं मगधराजानें विदर्भावर गाजविलेली सत्ता सोडून दिली तरी तदुत्तरकालांत महाराष्ट्रांत स्वस्थता होती असें म्हणतां येत नाहीं. मगधराज विक्रमादित्य, उज्जयिनीचा विषमशील विक्रमादित्य आणि शोभावतीचा शूद्रक * या तिघांनीं महाराष्ट्रावर वक्रदृष्टि केली होती. उदयन मात्र वळसा घालून गेला. वरील राजत्रयीच्या चढावापेक्षां नंदांचा अश्मकविजय हा संशोधकास अधिक पटण्यासारखा आहे. कारण या विजयाचें विधान बृहत्कथेवर विश्वास टाका अशी मागणी करीत नाहीं. नंदांनंतर मौर्यांनीं जिंकण्याचा प्रयत्न केला पण त्यांनीं देखील वळसाच घातला. त्याच्यानंतर खारवेलानें जिंकण्याचा प्रयत्न केला. क्षत्रपांनीं महाराष्ट्राचा कांहींतरी भाग घेतलाच होता. गुप्तांनीं पूर्वमहाराष्ट्रावर थोडावेळ तरी सत्ता गाजविली असावी. आणि पुढें चालुक्याच्या कालांत हर्षवर्धनानें आक्रमण करण्याचा प्रयत्न केला. याप्रमाणें अनेक राजे महाराष्ट्राचें आक्रमण करण्यास व्यर्थ प्रयत्न करिते झाल्याचें दिसत आहे. व्यर्थ म्हणण्याचें कारण कीं महाराष्ट्र आपल्यावर झालेलें आक्रमण फारच थोडा वेळ टिकूं देई असा एकंदर महाराष्ट्राचा चालुक्यपूर्व इतिहास आहे.

अत्यंत संशयी संशोधकांस जें आक्रमण पटेल असें जें नंदांचें अश्मकांवर आक्रमण त्याकडे आतां लक्ष देऊं.

अ श्म क नां वा चें म हा भा र त का ळा पा सू न सा त त्य.

महाभारतांत अश्मकी राजकन्येचा उल्लेख केला आहे. आणि तिला यादवी म्हटलें आहे. आणि अश्मक राजा अभिमन्यूनें मारला, असें सांगितलें आहे. अश्मकीसंबंधाच्या उल्लेखावरून अश्मक ही यादवांचीच एक शाखा असावी, असा ऐतिहासिक अर्थ डॉ. कृष्णस्वामी आय्यंगार यांनीं काढला आहे.

अश्मकांचें राज्य पंचवीस पिढ्या चालू होतें. असें पुराणें ('अश्मकाः पंचविंशतिः' या शब्दांत) सांगत आहेत; व त्यांचें राज्य महापद्मनंदीनें नष्ट केलें असेंच सुचवीत आहेत.

### १४६. अश्मकांवर नंद घराण्याची औट घटकेची सत्ता.

१४६. नंदांची प्रतिष्ठान येथें सत्ता होती एवढेंच नव्हे तर ते तेथें स्वतःच येऊन रहात होते अशा अर्थाचा पुरावा बृहत्कथामंजरी देत आहे तो मागें दिलाच आहे. अश्मकांचें राज्य जर इतर राज्यांबरोबर नष्ट झालें असलें तर महापद्मनंदी† हा 'प्रतिष्ठान' येथें राज्य करीत असणें अशक्य नाहीं आणि वररुचि नोकरी शोधण्यासाठीं प्रतिष्ठानपुरांत जाणें देखील अशक्य नाहीं.

अश्मकवंशासंबंधाचें काव्य आपणांस सांपडलें नाहीं. तथापि सांपडलें तर त्या काव्यांत पौराणिक कालापासून महापद्मानें उत्पाटन केलेल्या शेवटच्या अश्मकापर्यंत कथासूत्र असावें अशी स्वाभाविक कल्पना होते. मागें उल्लेख केलेले प्रतिष्ठानचे राजे म्हणजे नरसिंह, त्रिविक्रमसेन वगैरे राजे याच अश्मक वंशापैकीं असले पाहिजेत. अश्मकांचें पूर्ण उच्चाटन झालें नसावें. कालांतरानें नंदांचें राज्य दुर्बल होऊन अश्मकांनीं डोकें पुन्हा वर काढलें असावें.

### १४७. अश्मक आणि पाश्चात्य ग्रंथकार.

१४७. अश्मकांचा उल्लेख पाश्चात्य ग्रंथकार करीत आहेत. प्लीनी आपल्या ज्ञानकोशांत जी अश्मकांसंबंधानें माहिती देत आहे ती सेनेकाच्या आधारावर देत असावा आणि सेनेकानें देखील ती माहिती मेघास्थिनीसच्या लुप्त ग्रंथावरून घेतली असावी असा एका लेखकाचा तर्क आहे. ‡

त्या माहितीप्रमाणें अश्मकांचें (Asmagi) राज्य मेघास्थिनीसाच्या कालापर्यंत चालू होतें असा अर्थ निघेल. अश्मकांची फौज वर्णन करतांना ती तीनशें हत्ती व आठशें घोडे व तीस हजार पायदळ एवढीच दिली आहे. याच काळांत मागधांचें सैन्य आठ हजार हत्ती, तीस हजार घोडे, व सहा लक्ष पायदळ असें दिलें आहे. प्लीनीनें सेनेकाच्या आधारावर आणि सेनेकानें दुसऱ्या कोणात्यातरी ग्रंथकाराच्या आधारावर माहिती दिली असेंच असलें तर त्या उल्लेखावरून प्लीनीच्या काळांत अश्मकांचें राज्य होतें असें सांगतां येत नाहीं आणि मेघास्थिनीसच्या काळांत होतें असेंहि म्हणतां येणार नाहीं. कारण प्लीनीनें मेघास्थिनीसच्याच आधारावर तें विधान केलें असेंहि निश्चित नाहीं. व तो प्लीनीनें केलेला उल्लेख अश्मकांचें राज्य आद्य मौर्यकाळीं होतें याबद्दल खात्रीलायक पुरावा होत नाहीं. तथापि अश्मकांबरोबर पाटलिपुत्राच्या राज्याचें वर्णन आहे, त्यांत त्यांचें प्रचंडसैन्य वर्णिलें आहे त्यावरून अश्मकांचें स्वतंत्र राज्य मौर्यांच्या काळीं होतें अशा तऱ्हेचाच अर्थ काढावा लागेल. म्हणजे अश्मक यांचें जरी नंदानें उच्चाटण केलें असलें तरी मागधसम्राटाची सत्ता फार दिवस टिकली नाहीं असेंच म्हणावें लागेल. मौर्योत्तर वराहमिहिराच्या काळांत अश्मक म्हणून देशनाम प्रचलित होतें, तरी तेवढ्यावरून अश्मकांचें राज्य स्वतंत्र होतें असाहि इतिहास काढतां येणार नाहीं.

### १४८. आक्रमणांचा इतिहास आणि मानववंशशास्त्र.

१४८. ज्या वेळेस प्राचीनकाळीं आक्रमणें होत असतील

* बृहत्कथामंजरी ९. ३३१-३३२.

† (बृ. मं १. ११४)

‡ Bombay Gazetteer, Vol. I, Part I, p. 533.

त्यावेळेस चढाई करणारे राजे चढाई केलेल्या देशांत आपल्या देशींचे लोक आणीत असतील ही गोष्ट अगदीं साहजिक आहे. नवीन आलेले लोक आपलें मूळ स्थानिक किंवा पूर्वागत नांव कायम ठेवीत असतील किंवा नवीन स्थळीं नवीनच नांवानें ओळखले जात असतील. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या आरण्य, ग्राम्य व नागर जातींचा आढावा घेऊन विशिष्ट आक्रमणाशीं विशिष्ट जातीचा संबंध जाणणें ही क्रिया झाल्याशिवाय इतिहास समजला असें वाटावयाचें नाहीं. कुणबी म्हणून आज म्हणविणारा वर्ग आहे ती मूळची एक जात असणें शक्य नाहीं. *कुणबी म्हणजे कुटुंबी*. प्रत्येक नवीन येणारे लोक शेतीवाडी करून स्थानिक झाले म्हणजे आपणांस कुणबी म्हणजे 'जंटलमेन' म्हणवून घेणारच; तथापि आपलीं दुसरीं वैशिष्ट्यें देखील ते राखून ठेवणार. ज्या जाती आपणांस कुणबी म्हणवितात अशा जाती भंडाऱ्यापासून मुंबई पर्यंत तीसपेक्षां अधिक आहेत. सर्वच जाती एथ्नोग्राफिक वाङ्मयांत कुणबी म्हणून उल्लेखिल्या गेल्या नाहींत. कुणब्याशिवाय कोळी, महार, भोई, या निरनिराळ्या जाती आहेत. यांची वस्ती केव्हां झाली त्यांचा कोणत्या आक्रमणांमुळें महाराष्ट्राशीं संबंध आला, तथापि यावर सध्यांच मत देतां येत नाहीं. मानववंशशास्त्रीय दृष्टीनें सर्व जातींतील पूर्वकालीन स्मारकें शोधूं लागलों तर आक्रमणेतिहास अधिक सविस्तर द्यावयाचा प्रयत्न निष्फळ होईल, असें वाटत नाहीं. तो प्रयत्न होणारच आहे.

### १४९. महाराष्ट्रांत अंतर्गत स्थानिक कलह.

१४९. महाराष्ट्रावरील बाहेरच्यांचीं आक्रमणें देण्यानें राष्ट्र संक्षोभाचा इतिहास पुरा व्हावयाचा नाहीं. ज्या काळांत महाराष्ट्र ही एक संयुक्त राजकीय घटना होती असे काळ फारच क्वचित् आणि मधून मधूनच येतात. महाराष्ट्रांत विदर्भ आणि प्रतिष्ठान हीं दोन राज्यें शेजारशेजारीं असतांना तीं सुखानें गुण्यागोविंदानें नांदत असतील अशी कल्पना करवत नाहीं. दक्षिणापथच्या आणि प्रतिष्ठानच्या राजांना दायादांचें भय होतें त्याप्रमाणें शेजाऱ्यांचें देखील असलें पाहिजे आणि प्रतिष्ठान आणि विदर्भ हीं शेजारीं असलेलीं मित्रराज्यें असण्याऐवजीं एकमेकांस गिळंकृत करण्यासाठीं टपलेले शेजारीच असणें अधिक स्वाभाविक आहे; पण त्याप्रकारच्या स्थितीचीं दर्शक विधानें हातीं लागत नाहींत. राजकुलांची परंपरा देत असतां अनेकदां असें दिसून येतें कीं, राजपुत्रांना देशनामें दिलीं आहेत आणि त्यांच्या नांवावरून देशनामें उत्पन्न झालीं असें दाखविलें आहे. क्रथ, कैशिक, विदर्भ, चेदि या देशांचें स्पष्टीकरण अशाच तऱ्हेनें केलें आहे. देश सम्राटाच्या राज्याचे भाग होऊन नंतर मुलांना वांटले जावयाचे या प्रकारची परिस्थिति कवींच्यासमोर त्यांस दिसत होती, म्हणूनच देशनामांचें स्पष्टीकरण त्या नांवाचे राजपुत्र होऊन गेले, या तऱ्हेनें करण्याची प्रवृत्ति झाली असावी. एका मोठ्या पराक्रमी राजानें विजयी व्हावें, दुसऱ्या राजांचा पराभव करावा आणि खंडणी घ्यावी किंवा त्याचें राज्य घेऊन तेथें आपला एखादा मुलगा विषयपति म्हणून स्थापन करावा. पुढें तो राजाच्या निधनानंतर प्रथम सामंत रहावा आणि नंतर मुख्य राजाचा त्यानें प्रतिस्पर्धी व्हावें, किंवा अनेक राजपुत्र सामंत एक होऊन त्यांनीं मुख्य राजास स्थानभ्रष्ट करावें, येणेंप्रमाणें अंतर्गत यादवी चालली असतां त्यांनीं परकीय राजांची मदत मागावी अशा तऱ्हेचा एकंदर स्थित्यंतरक्रम राजाविषयींच्या कथांत वर्णिला आहे.

### १५०. मौर्यांचें आक्रमण.

१५०. नंदकालानंतर मौर्यकाल येतो. मौर्यकालांत महाराष्ट्रावर कितपत आक्रमण झालें होतें हा प्रश्न आहे. कोंकणावर म्हणजे अपरांतांत मौर्यांचें आगमन झालें होतें याची साक्ष सोपारें येथें सांपडलेला अशोकशासनाचा भाग देतच आहे. या प्रश्नाकडे सध्यांच वळतां येत नाहीं. उदयनापासून मौर्यांपर्यंत यावयाचें म्हणजे मध्यें पांचशें वर्षांचें अंतर आहे, आणि या मधल्या दीर्घ काळांतला पुष्कळच इतिहास देतां येण्याजोगा आहे.

### १५० अ. पत्ता लागणाऱ्या आक्रमणांची अल्पता.

१५० अ. महाराष्ट्रावर झालेल्या आक्रमणांचें हें विधान पूर्ण किंवा अपूर्ण याचा विचारहि करण्याचें कारण नाहीं इतकें तें अल्पांश आहे. कुरुयुद्धापासून मौर्यांच्या काळापर्यंत शेंकडों स्वाऱ्या महाराष्ट्रावर झाल्या असतील त्यांपैकीं कांहींचा पत्ता लागत आहे एवढेंच. जेव्हां राज्य दायादांत वाटलें जाई आणि दायादा-दायादांत युद्ध होई तेव्हां बाहेरची मदत कोणी तरी पक्ष घेणारच. तशी मदत घेतली गेली म्हणजे महाराष्ट्रावर बाहेरच्यांचें आक्रमण होण्याचा प्रसंग आलाच. मागें प्रतिष्ठानच्या सिंहबल राजाची कथा आली आहे. त्या कथेंत सिंहबलानें आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं बाहेरची मदत घेतल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. परकीय राजाची मदत घेतल्यानंतर तो परकीय राजा ज्या पक्षाला मदत करावयाला येतो त्या पक्षाला गुंडाळून ठेवून तें राज्य आपणच घेतो असे मासले इतिहासांत झाले आहेत, तसे महाराष्ट्रांत देखील झाले असले पाहिजेत.

आतांपर्यंत दिलेलीं आक्रमणें मुख्यतः उत्तरेकडील राजांचीं दिलीं आहेत, तथापि दाक्षिणात्यांचीहि महाराष्ट्रावर आक्रमणें झालीं असलीं पाहिजेत. रामायणाच्या उत्तरकांडांत रावणास दिग्विजयी पुरुष दाखविले आणि त्याच्या स्वाहाकारांत महाराष्ट्राचादेखील समावेश होता असें दिसतें. त्याविषयीं येथें विशेष लिहिण्यांत अर्थ नाहीं. कारण तो आदिपर्वाचा विषय आहे. शिवाय उदयनपूर्वकालीन रामायणावर एक लेख येणारच आहे.

---

## प्रकरण १९ वें.

# बृहत्कथेची योग्यता.

### १५१. कुरुयुद्ध आणि बुद्ध यांच्या मधल्या कालास साहित्य बृहत्कथा आहे.

१५१. महाभारत आणि पुराणें यांच्या नंतरचा कथासंग्रहाचा मोठा ग्रंथ म्हटला म्हणजे बृहत्कथा होय. या ग्रंथाच्या सहाय्यानें बुद्धकाल आणि कुरुयुद्धकाल यांच्या मधील दीर्घ कालखंडांत दिसून येणारी अज्ञानाची खळगी कितपत भरून काढतां येईल आणि ती भरून काढणें इतिहासशास्त्रज्ञाच्या दृष्टीनें कितपत निर्दोष आहे याविषयीं थोडेंसें तरी प्रास्ताविक विवेचन अवश्य आहे.

प्रत्येक ग्रंथ स्थित्यंतरें पावत असतो त्याप्रमाणें हाहि स्थित्यंतरें पावला आहे. तथापि अनेक वर्षें विचार केल्यावर आतां मत असें झालें आहे कीं, हा कथासंग्रह मुख्यतः बुद्धपूर्वकालीन आहे. तो त्या कालाच्या बऱ्याच अगोदरच्या उदयन आणि नरवाहन या पुरुषांच्या संबंधींचा आहे एवढेंच नव्हे तर या दोन पुरुषांस सांगितलेल्या व कथांत आलेल्या व्यक्ती देखील पुष्कळच अगोदरच्या म्हणजे दोन तीनशें वर्षें अधिक जुन्या असणें शक्य आहे.

अधिसीमकृष्णापासून दुसऱ्या शतानीकाच्या कालापर्यंत ज्या वीरकथा लोकांत प्रचलित असतील त्या वीरकथांच्या संरक्षकांचें आणि पौराणिकांचें जुळलें नसेल. जुन्या वीरकथा घेऊन विशिष्ट दिवस आणि स्थान यांच्याशीं संबंध जोडून त्यांचा पौराणिक धर्म तयार करण्याचा प्रयत्न यशस्वी झाल्यानंतर पौराणिक धर्माच्या अभिमानी मंडळीस नवीन वीरकथा अनवश्य झाल्या असाव्यात. अशा प्रसंगीं सूतवर्गाचें प्रथम केकेयांनीं स्वागत केल्यामुळें तो सूतवर्गाजवळ असलेल्या अद्भुत कथांचा संग्रह प्रथम पैशाचींत उतरला असेल आणि पुढें त्याच्या परकीयपणाचें कारण लोक विसरून गेल्यामुळें भारतीयांस तो संग्रह पैशाचींत कां याची कारणमीमांसा अवश्य झाली असेल. मुसलमान ज्याप्रमाणें हिंदूंच्या जुन्या अद्भुत गोष्टी गोळा करते झाले आणि इंग्रज देखील परिश्रमपूर्वक जुन्या कथांचे संरक्षक झाले, त्याचप्रमाणें हाहि प्रकार असावा. पूर्वी कौशांबीच्या राजकुलानें आश्रय दिलेले बंदीजन यांनीं संरशित केलेलें वीरकाव्य आधारास घेऊन कथालेखन प्रथम पैशाचींत झालें असावें व पुढें संस्कृतमध्यें प्रविष्ट झालें असावें. संस्कृतविरुद्ध देशी भाषेचे पुरस्कर्ते बंगालमध्यें प्रथम मुसलमान झाले त्याप्रमाणें या कालांत 'कैकेय' झाले; मुसलमानांचें राज्य असतां त्यांसाठीं फारसीमध्यें ग्रंथ हिंदूच लिहून देत, किंवा कंपनीच्या दिवसांत इंग्रजांसाठीं ऐतिहासिक टांचणें हिंदूंनींच करून दिलीं त्याप्रमाणें क्रिया होऊन पैशाचींत ग्रंथ भारतीयांकडूनच तयार झाला असेल. इराणी लोक अधिकारहीन होऊन भारतीयांत समाविष्ट झाल्यानंतर व त्यांचें सामाजिक स्थान अश्रेयस्कर झाल्यानंतर परकीय भाषेंतील स्वदेशविषयक साहित्याविषयीं म्हणजे भारतीयानें पैशाचींत ग्रंथ कां लिहावा याचें कोडें पडून त्याचें स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली असावी व कथापीठलंबक तयार झाला असावा असें दिसतें.

बऱ्याचशा दाक्षिणात्य लोकांस उर्दूही परकी वाटते तिचें एक मुख्य कारण लिपि होय. कदाचित् पैशाचीच्या लेखनास उलटी लिहिली जाणारी खरोष्ठी लिपीच लागली असावी.

### १५२. बृहत्कथेच्या कालाविषयीं वेबरचें मत त्याज्य आहे.

१५२. वेबरनें आपल्या हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचरमध्यें गुणाढ्याचा काल ख्रिस्तोतर सहावें शतक असा दिला आहे. त्या विधानास आज कोणत्याहि तऱ्हेचें महत्त्व देतां येत नाहीं. दशकुमारचरित्रकार दंडी हा देखील सहाव्या शतकांत होऊन गेला ही गोष्ट वेबरलाही मान्य आहे. दंडीनें काव्यादर्शामध्यें "भूतभाषामयीं प्राहुरद्भुतार्थां बृहत्कथां" असें वाक्य लिहिलें आहे. "प्राहुः" असा प्रयोग अत्यंत प्राचीनकालची आठवण लिहितांना करतात. तसा प्रयोग ज्याअर्थी दंडीनें केला आहे त्या अर्थी त्याच्यापासून बृहत्कथेची अतिदूरता सिद्ध होते. व यामुळें वेबरचें म्हणणें अग्राह्य होतें असें कथासरित्सागराचे एक संपादक ( निर्णयसागर आवृत्ति ) आपल्या प्रस्तावनेंत दाखवितात. बृहत्कथेचा उपयोग कालिदास, भवभूति, विशाखदत्त इत्यादि सर्व नाटककारांनीं केला आहे व त्या सर्वांच्या अगोदर या ग्रंथाचें स्थान आहे हें स्पष्ट आहे.

बृहत्कथेवर विश्वास टाकण्यापूर्वी तिचें रूपांतर कथासरित्सागर हें आपल्या रचनेच्या काळांतील बृहत्कथेच्या आवृत्तीचें खरें दर्शक आहे कीं नाहीं, कीं कथासरित्सागरांतच रचनेनंतर पुष्कळ फेरफार झाले हें आपणांस पाहिलें पाहिजे; त्याविषयीं निर्णय करण्यासाठीं कथासरित्सागराची समकालीन अन्य रूपांतराशीं तुलना उपयुक्त होते.

## १५३. बृहत्कथेच्या संस्कृत रूपांतराचा तौलनिक अभ्यास.

१५३. कथासरित्सागर याचा कर्ता सोमदेव यानें आपला ग्रंथ क्षेमेंद्राची बृहत्कथामंजरी अमुक राजास नापसंत झाल्यानंतर तयार केला, अशी परंपरागत माहिती आहे; म्हणून कथासरित्सागर आणि क्षेमेंद्राची बृहत्कथामंजरी या दोहोंची तुलना बृहत्कथेचें क्षेमेंद्रसोमदेवकालीन स्वरूप स्पष्ट करण्यास उपयुक्त होते. या तुलनेवरून एकाच काळच्या हस्तलिखितांतील भेद लक्षांत येतील. या दोहोंशिवाय तिसरें रूपांतर बुधस्वामीकृत बृहत्कथाश्लोकसंग्रह हें होय. बृहत्कथामंजरीचें एकंदर स्वरूप कथासरित्सागराशीं फारच जुळतें आहे. त्यांतील लंबकाची संख्या सारखीच आहे. दोहोंतहि अठरा लंबक आहेत. तथापि लंबकाच्या पौर्वापर्यामध्यें थोडा भेद आहे. त्या भेदाचें कोष्टक पुढीलप्रमाणें आहे;

| कथासरित्सागर | बृहत्कथामंजरी |
|---|---|
| १ कथापीठ | कथापीठ |
| २ कथामुख | कथामुख |
| ३ लावाणक | लावानक |
| ४ नरवाहनदत्तजन्म | नरवाहनदत्तजन्म |
| ५ चतुर्दारिका लंबक | चतुर्दारिका |
| ६ मदनमंचुका | सूर्यप्रभ |
| ७ रत्नप्रभा | मदनमंचुका |
| ८ सूर्यप्रभ | वेला |
| ९ अलंकारवती | शशांकवती |
| १० शक्तियश | विषमशील |
| ११ वेलालंबक | मदिरावती |
| १२ शशांकवती | पद्मावती |
| १३ मदिरावती | पंचलंबक |
| १४ पंचलंबक | रत्नप्रभा |
| १५ महाभिषेक लंबक | अलंकारवती |
| १६ सुरतमंजरीलंबक | शक्तियशलंबक |
| १७ पद्मावतीलंबक | महाभिषेक |
| १८ विषमशीललंबक | सुरतमंजरी |

या लंबकांच्या भिन्न अनुक्रमाशिवाय बृहत्कथामंजरीच्या कांहीं आवृत्तींत आणखी मजकूर घुसडण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. बृहत्कथामंजरीच्या दुसऱ्या आवृत्तींत ( निर्णयसागर, मुंबई १९३१ ) कथामंजरीचें एक परिशिष्ट म्हणून दिलें आहे तें तंजावरच्या एका हस्तलिखितावरून तयार केलें आहे. त्यामध्यें बाणकृत कादंबरीची सर्व कथा आलेली आहे. तथापि तेवढ्यावरून जसजशा नवीन नवीन कथा लोकांच्या नजरेस येत तसतशा त्या कथा बृहत्कथेंत किंवा तिच्या रूपांतर म्हणविणाऱ्या ग्रंथांत समाविष्ट करण्याची लोकप्रवृत्ति म्हणजे पंडितवर्गप्रवृत्ति होती असें खात्रीनें म्हणतां येणार नाहीं. बृहत्कथामंजरीच्या व कथासरित्सागराच्या या भिन्न पौर्वापर्यामध्यें एकत्रित केलेल्या कथांचें ऐक्य आहे ही गोष्ट मात्र लक्षांत आल्याशिवाय रहात नाहीं. यावरून असें दिसतें कीं सोमदेवाच्या कालीं जीं हस्तलिखितें प्रचलित होतीं त्यांमध्यें अनुक्रम भिन्न होता पण कथा त्याच होत्या.

कथासरित्सागरांत अनेक उपकथा बृहत्कथामंजरीपेक्षां अधिक आहेत; तथापि तो मजकूर कथासरित्सागरांत नवीनच पडलेला आहे असें म्हणतां येणार नाहीं; तथापि दोन्ही ग्रंथांचें अवलोकन व तुलना फलदायी होणार नाहींत असें नाहीं. संग्रहांत कथा प्रविष्ट होतांना कदाचित् भिन्नरूप असतील व पैशाचीचें संस्कृतीकरण करतांना देखील दोन नांवें उत्पन्न होतील. कथासरित्सागरामध्यें प्रतिष्ठान हें पुराचें नांव नाहीं, तर मुख्यतः प्रदेशाचें नांव आहे, आणि पुराचें नांव 'सुप्रतिष्ठित' असें आहे.* तथापि मंजरीमध्यें भिन्न शब्दयोजना दिसते.

**प्रतिष्ठानपुरे जातो माल्यवान्दक्षिणापथे ।**
**गुणाढ्य इति यो लोके विश्रुतो गुणगौरवात् ॥**

असा श्लोक आहे. त्यांत गुणाढयाच्या कालीं नगरनाम 'प्रतिष्ठान' असेंच दिलें आहे. वररुचीविषयीं देखील अधिक माहिती देणारा उल्लेख त्यांत आहे.

**कात्यायनः श्रुतधरः तथा वररुचिश्च सः ।**
**गुणिनामग्रणी लोके नामभिस्त्रिभिरुच्यते ॥**

यामध्यें वररुचीचीं तीन नांवें दिलीं आहेत. तसेंच जेव्हां तिन्ही भाषा सोडून दिल्या असें विधान गुणाढयाविषयीं केलें आहे तेव्हां त्या तीन भाषा कोणत्या याविषयीं बृहत्कथामंजरी पुढील स्पष्टीकरण देत आहे. त्यांतील शब्द सरित्सागरांतील शब्दांपेक्षां निराळे आहेत.

**ज्ञात्वा देवीप्रसादेन त्यक्तभाषात्रयोप्यहम् ।**
**पैशाचिमनपभ्रंशसंस्कृतप्राकृतां श्रितः ॥**

याच्याऐवजीं कथासरित्सागरांत—

**'संस्कृतं प्राकृतं तद्वद्देशभाषा च सर्वदा ।**
**भाषात्रयमिदं त्यक्तं यं मनुष्येषु संभवेत् ॥'**

असें आहे. यावरून अपभ्रंश नांवानें ठाऊक असलेली भाषा शातवाहनकालीन आहे असा क्षेमेंद्राचा अभिप्राय स्पष्ट होत

* प्रतिष्ठानेऽस्ति नगरं सुप्रतिष्ठितसंज्ञकम् ( १. ६. ८ )

आहे. यांत महाराष्ट्राच्या भाषेविषयीं एक नवीन प्रश्न उपस्थित होत आहे तो हा कीं, प्राकृत भाषा ज्यावेळेस प्रतिष्ठित झाली होती त्यावेळेस देशभाषा आणखी एक निराळीच होती काय ? या प्रश्नावर पुढें चर्चा करावी लागणारच आहे.

सोमदेव आणि क्षेमेंद्र यांच्या बृहत्कथेच्या आवृत्तींत भिन्नता होती, पण बहुतेक सादृश्य होतें असें तुलनांतीं दिसून येईल.

### १५४. प्रतिष्ठान-विषयक दोन्ही ग्रंथांतील उल्लेखांची तुलना.

१५४. मागें महाराष्ट्रांतील प्रतिष्ठानचे जे राजे उल्लेखिले त्यांच्या विषयीं दोन्ही ग्रंथ चाळून पाहतां असें दिसतें कीं, वेताळपंचविशींतील नायकाचें नांव त्रिविक्रमसेन असें ज्याप्रमाणें सरित्सागरामध्यें दिलें आहे त्याप्रमाणें कथामंजरींतहि दिलें आहे व दोन्ही ठिकाणीं त्यास प्रतिष्ठानचाच राजा केलें आहे. या प्रतिष्ठानभूपतीशिवाय दुसरा एक नरसिंह नांवाचा पैठणराजा मागें उल्लेखिलाच आहे. रत्नप्रभालंबकामध्यें सरित्सागरांत जी नरसिंह आणि विक्रमादित्य यांच्या युद्धाची कथा मागें दिली आहे ती कथा बृहत्कथामंजरींतील लंबकांत गाळली आहे, अर्थात् त्यामुळें केवळ पायदळाच्या साह्यानें नरसिंहानें विक्रमादित्यावर जय मिळविला वगैरे जें युद्धवैशिष्टय कथासरित्सागरांत वर्णित झालें आहे तें सर्व बृहत्कथामंजरींत गाळलें गेलें आहे; तथापि इतर सर्व कथा दिली आहे, म्हणजे मदनमाला या वेश्येच्या साहाय्यानें विक्रमादित्यानें आपली प्रतिज्ञा शाब्दिक दृष्ट्या कशी पुरी केली हें सांगितलें आहे. ही गाळागाळ क्षेमेंद्राच्या पुढील बृहत्कथेच्या प्रतींत त्या युद्धवैशिष्ट्याचा मजकूर नव्हता याची दर्शक नाहीं. कारण क्षेमेंद्राचा सर्वच वृत्तांत अत्यन्त संक्षिप्त आहे. क्षेमेंद्राच्या संक्षेपामुळें महाराष्ट्रविषयक आणखी एका उल्लेखास आपण मुकलों असतों; तो उल्लेख म्हटला म्हणजे चिंचिणी नगरीचा होय. पाटलिपुत्र नगराचा संस्थापक चिंचिणी येथील ब्राह्मणाचा मुलगा होता ही गोष्ट आपणास कथासरित्सागरामुळेंच कळत आहे. कथासरित्सागर आणि बृहत्कथा यांतील कथांच्या ऐक्यावरून आणि कथांतर्गत नांवाच्या ऐक्यावरून मूळ ग्रंथाच्या दोन्ही रूपांतरकारांपाशीं असलेल्या प्रतींच्या सारूप्याविषयीं आपणांस खात्री पटते व त्याबरोबरच दुसरीहि एक महत्त्वाची गोष्ट सिद्ध होते ती म्हटली म्हणजे पैशाचीचें संस्कृतीकरण फारसें घोटाळ्याचें नव्हतें ही होय. प्राकृताचें संस्कृतीकरण कसें करावें याविषयीं मतभेद असावयाचाच; आणि त्यामुळें कांहीं ठिकाणीं पैशाचींतील नांवांचें संस्कृतमध्यें रूपांतर करतांना मतभेदमूलक भिन्न नांवें येण्याचा संभव आहे; तथापि भिन्न नांवें अत्यंत थोड्याच ठिकाणीं आलीं असतील. शें-दीडशें नांवें मी तपासून पाहिलीं तथापि त्यांच्यांत नामसंस्कृतीकरणासंबंधानें फारसा मतभेद दिसत नाहीं; यावरून कथासरित्सागराच्या रूपांतरयथार्थत्वाची खात्री होते; आणि कथासरित्सागर हें अधिक व्यापक असल्यामुळें तेंच आपणांस जास्त उपयुक्त होईल, आणि त्याच्या आधारावरून जर आपण लेखरचना केली तर आपण बळकट आधारावर उभे आहोंत असा विश्वास उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. यासाठीं आमचें लिखाण मुख्यतः कथासरित्सागराच्या आधारावर रचलेलें दिसेल आणि मधून मधून बृहत्कथामंजरीचें विधान देखील देण्यांत येईल.

### १५५. नंदांनीं प्रतिष्ठान जिंकलें होतें काय ?

१५५. बृहत्कथामंजरीमध्यें जे कथासरित्सागरापासून भेद आढळतात, त्यांपैकीं राजकीय स्थितीविषयीं संशय उत्पन्न करणारा एक अत्यंत महत्त्वाचा भेद पुढील श्लोकांत व्यक्त होत आहे.—

**प्रतिष्ठानपुरं हृष्टा यस्मिन्नेव दिने गताः ।**
**तस्मिन्नेव दिने दैवात् स भूपालो व्यपद्यत ॥**

प्रस्तुत श्लोकाचा अर्थ समजत नाहीं. 'ज्या दिवशीं प्रतिष्ठानपुरामध्यें आम्ही आनंदयुक्त गेलों त्या दिवशीं भूपाल मृत्यु पावला' असा त्याचा भावार्थ दिसतो. येथें जो प्रतिष्ठानपुराविषयीं उल्लेख आलेला आहे तो योगनंदमत्स्यहासकथेच्या अनुरोधानें आला आहे. प्रस्तुत प्रतिष्ठानविषयक उल्लेख जर हस्तलिखिताच्या दोषामुळें उपस्थित झाला असेल तर फारसा प्रश्न उपस्थित होत नाहीं. दुसऱ्या एका हस्तलिखितांत 'प्रतिष्ठानपुरं' याच्या ऐवजीं 'प्रविष्टा नगरे' असा पाठभेद आहे. तो पाठभेद बरोबर नसून संपादकांनीं स्वीकारलेल्या पाठभेदाप्रमाणें 'प्रतिष्ठानपुरं' हाच पाठ जर गृहीत धरला तर असा अर्थ होईल कीं, 'आम्ही तिघेजण ज्या दिवशीं प्रतिष्ठानपुरास गेलों त्या दिवशींच तो भूपाल मृत्यु पावला.' व याचा अर्थ 'प्रतिष्ठानपुर हें नंदानें जिंकलें होतें व जणूं काय ती त्याची दुसरी राजधानीच होती' असा होईल. बृहत्कथामंजरींत या विधानाशीं असंगति उत्पन्न करणारें विधान आढळत नाहीं. योगनंदमत्स्यहासकथेचा हा जो भाग बृहत्कथामंजरींत आला आहे त्या भागामध्यें पाटलिपुत्राचा उल्लेख नाहीं. या शिवाय दक्षिणच्या अश्मक राष्ट्रास महापद्मनंदीनें जिंकलें असावें अशा अर्थाचें पुराणांचें विधान आहेच; नंदकालावर लिहिण्याचा प्रसंग येईल तेव्हां हा मुद्दा पुन्हां विवेचनार्थ निघेलच.

### १५६. बृहत्कथेचें स्थूलस्वरूप.

१५६. बृहत्कथा ही मुख्यतः उदयन आणि त्याचा पुत्र नरवाहन यांच्या चरित्राची कथा सांगणारी दिसते. ही कथा सातवी तेवढी शिल्लक राहिली आणि अगोदरची नष्ट झाली हें लिहिणें खरें नसेलच असें नाहीं. असल्यास पांडवकुलाची कथा सांगण्यासाठीं जी लांबलचक कथा लिहिली तिच्यांतील उत्तर भाग तेवढा शिल्लक राहिला हें स्पष्ट होतें.

बृहत्कथा हा समुच्चय जातककथा या समुच्चयापेक्षां कोणत्याहि तऱ्हेनें अर्वाचीन दिसत नाहीं. उलट प्राचीनतरता या ग्रंथांत अनेक तऱ्हांनीं दृष्टीस पडल्या आहेत. या ग्रंथांत बौद्धांचा विस्तार झालेला दिसत नाहीं. आणि जें कांहीं अपूर्व, अद्भुत आणि धार्मिक यांत मिसळलेलें आहे तें देखील ब्राह्मणी किंवा पौराणिक आहे, बौद्ध नाहीं, या गोष्टी देखील कालनिर्णयार्थ विचार करतांना विसरून चालावयाचें नाहीं.

कथापीठलंबक हा नंतर जोडलेला आहे आणि त्यासाठीं ग्रंथमुखापासून पुढचा भाग व प्रास्ताविक पहिला लंबक या दोहोंचे काल निरनिराळे आहेत असें धरून कालांविषयीं अंदाज केला पाहिजे.

### १५६ अ. पहिल्या लंबकाचा रचनाकाल ख्रिस्तीशकापूर्वीचा असावा.

१५६ अ. प्रस्तुत प्रसंगीं पहिल्या लंबकाकडेच विशेष लक्ष देऊं. कारण मूल कथेची घटना आणि तींत झालेलीं स्थित्यंतरें यांचीं गमकें त्यांत आहेत.

कथासरित्सागरांतील **पहिला लंबक** जो कथापीठलंबक तो नंतर जोडलेला आहे, आणि व दुसऱ्या लंबकापासून जुनी कथा सुरू होत होती. याला दुसऱ्या लंबकांतच प्रमाण आहे. दुसऱ्या लंबकाचें नांव कथामुखलंबक असें आहे; म्हणजे तोच लंबक खरोखर प्रास्ताविक आहे, आणि त्या लंबकांत कथेच्या उत्पत्तीची कथा थोडक्यांत दिली आहे. त्यांत आरंभीं ईशनमन, ग्रंथप्रसार, परंपरा वगैरे ग्रंथप्रारंभचिन्हें देखील संरक्षित राहिलीं आहेत. हीं प्रारंभचिन्हें संस्कृत रूपांतरांत देखील उतरलीं आहेत.

**गौरीनवपरिष्वंगे विभोः स्वेदांबु पातु वः।**
**नेत्राग्निभीत्या कामेन वारुणास्त्रमिवाहितम्॥**

येणेंप्रमाणें ईशनमन करून नंतर कथाप्रसाराचा इतिहास दिला आहे.

**कैलासे धूर्जटेर्वक्त्रात् पुष्पदंतं गणोत्तमम्**
**तस्मात् वररुचीभूतात् काणभूतिं च भूतले**
**काणभूतेर्गुणाढ्यं च गुणाढ्यात् सातवाहनम्।**
**यत् प्राप्तं शृणुतेदं तद् विद्याधरकथाद्भुतम्।**

यानंतर साध्या आख्यानरूपानें एकदम कथा सुरू होते—

**अस्ति वत्स इति ख्यातो देशो दर्पोपशांतये**
**स्वर्गस्य निर्मितो धात्रा प्रतिमल्ल इति क्षितौ**
**कौशांबी नाम तत्रास्ति मध्यभागे महापुरी**
**लक्ष्मीविलासवसतिर्भूतलस्येव कर्णिका**

हीं ग्रंथप्रारंभचिन्हें बृहत्कथामंजरींत देखील आहेत, त्यांवरून असें दिसतें कीं बृहत्कथेच्या सोमदेवकालीन आवृत्तींत कथामुखलंबकापासून कथा सुरू झाली, याचीं चिन्हें संरक्षित राहिलीं होतीं.

पहिल्या लंबकाची रचना उघडउघड बरीच उत्तरकालीन आहे. उदयनाची कथा अगोदर अनेक शतकें तयार होऊन संग्राहक वररुचीमार्फत गुणाढ्य आणि आद्य शातवाहन यांच्या हातीं आली, ही गोष्ट चंद्रगुप्तकाळीं झाली, तथापि गुणाढ्यवर्णनपर अद्भुत संपूर्ण कथा मात्र उत्तर काळीं झाली. आणि गुणाढ्यचरित्राच्या लेखकानें कथापीठलंबकाचें अंतिम संपादन केलें. हा गुणाढ्यकथालेखक देखील ख्रिस्तपूर्व असावा.

कथामुखलंबकांत जो कथोपलब्धीचा वृत्तांत आहे त्यांत गुणाढ्य हा शिवगण शापामुळें पृथ्वीवर अवतरला वगैरे वृत्तांत नाहीं. काणभूति हा पिशाच होता असेंहि दिलें नाहीं. म्हणजे साध्या प्रकारानें वररुचि, काणभूति व गुणाढ्य यांमार्फत केवळ साध्या रीतीनें ही कथा शातवाहनांकडे आली या शक्यतेविरुद्ध कथामुखलंबक पुरावा देत नाहीं. वररुचि हा वैय्याकरण भाषापरीक्षणासाठीं संग्राहक बनला असेल, आणि त्यानें पैशाचींतील साहित्य संग्रहून व भाषा अभ्यासून नंतर ती भाषा खरोखर शौरसेनी आहे असा शोध लावला असावा, आणि व्यासाप्रमाणें याच्या परंपरेंत मूळ पैशाची ग्रंथ राहून त्याचा अभ्यास चालू असावा. आद्य शातवाहनाच्या कालांत म्हणजे दीपकर्णीपासून शातवाहनाकडे राज्य ज्या काळांत गेलें त्याच काळांत गुणाढ्य होऊन गेला असावा. तथापि थोडक्याच कालानें म्हणजे शंभर वर्षें उलटलीं असतील नसतील इतक्या काळांत गुणाढ्य आणि काणभूति या दंतकथांनीं गौरव केलेल्या व्यक्ती झाल्या, आणि यामुळें जो वृत्तांत तयार झाला तो कथापीठलंबकांत दिला गेला आहे.

### १५७. कथापीठलंबकाचा काल.

१५७. वररुची व गुणाढ्य यांचीं चरित्रें मूळ ग्रंथास अर्थात् नंतर जोडलेलीं आहेत. या उत्तरकालीन पुरवणीचा काल

कोणता आहे याविषयीं अधिक स्पष्ट निर्णय करण्यास गमक नाहीं. तथापि कलापव्याकरणाच्या उत्पत्तीची जी कथा त्यांत अंतर्भूत केलेली आहे त्या कथेची साक्ष गुणाढ्याच्या अतिप्राचीनतेबद्दल देतां येईल. या पीठलंबकांत पिशाचांचें अस्तित्व विंध्याद्रि पर्वतांत होतें वगैरे गोष्टी आहेत, वररुचि, नंद, शातवाहन इत्यादि व्यक्तींचे उल्लेख आहेत. तथापि हे सर्व उल्लेख प्रस्तुत कथापीठलंबक शातवाहनांच्या अत्यंत प्राचीन राजाच्या म्हणजे नंदकालीन राजांच्या कालापासून फार दूरच्या कालाचे दर्शक आहेत असें म्हणण्यास आधार नाहीं. ज्या काळांतील विद्वान वर्ग कवित्वाकडे वळे, ऐतिहासिक सत्यशोधनाकडे वळत नसे, अशा काळांत सामान्य व्यक्तीवर व कथांवर अद्भुतरसाचें लेपन फार लवकर होत असे, व यासाठीं कथापीठलंबक देखील ख्रिस्तपूर्वकालीन आहे असें वाटतें. कथेस ख्रिस्तोत्तर काल ज्यामुळें येईल असा संशयास्पद स्वरूपाचा एकच उल्लेख आहे आणि तो म्हटला म्हणजे * " दीनार " शब्दाचा होय. दीनार हें नाणें हिंदुस्थानांत ख्रिस्तोत्तर चवथ्या शतकांत होतें अशी अनेक लोकांची समजूत आहे आणि त्यामुळें प्रस्तुत कथाहि ख्रिस्तोत्तर ४०० वर्षांनीं आली आहे असा शोधकांचा समज होणें अस्वाभाविक नाहीं. तथापि दीनार ४ थ्या शतकाच्या अगोदर हिंदुस्थानांत नव्हतेच याला स्पष्ट पुरावा नाहीं. याशिवाय जेव्हां भाषेचें रूपांतर होतें तेव्हां अधिक अर्वाचीन शब्द दिले जातात. संस्कृत ग्रंथांत 'कार्षापण' हा शब्द जेथें येईल तेथें मराठींत 'रुपये' असा प्रतिशब्द वापरण्याचा प्रघात आहे.† त्याअर्थी संस्कृत रूपांतरांत दीनार शब्द आला, येवढ्यावरून मूळ बृहत्कथेस ख्रिस्तोत्तरकालीनत्व मुळींच देतां येणार नाहीं.

कथासरित्सागरांत दिलेल्या शातवाहनकथेस दुसऱ्या एका बाजूनें साधक पुरावा मिळत आहे तो कातंत्र ऊर्फ कलापव्याकरणाचा कर्ता शर्ववर्मा याच्या प्राचीनतेचा होय. उपलब्ध पुरावा शर्ववर्मा हा शातवाहनांचा मंत्री होता हें जरी सिद्ध करूं शकला नाहीं तरी तो शातवाहनांच्या काळांतीलच असावा एवढें सिद्ध करील. 'कातंत्र' व्याकरणावर दोन टीका आहेत. एकीचें नांव 'रूपमाला' आहे आणि ती भावसेन नांवाच्या जैन पंडितानें लिहिली आहे, दुसरी टीका दुर्गसिंहाची होय. या दोन्ही टीका 'कातंत्र' या ग्रंथाचें कर्तृत्व शर्ववर्म्यासच देतात, म्हणजे बृहत्कथेंतील विधानास पुष्टि देतात. त्या टीकांपैकीं रूपमाला ही टीका आपल्या काळांत विसर्ग कसा लिहिला जात होता या संबंधीचें विधान ग्रंथकाल दर्शक आहे, विसर्ग नागाच्या डोळ्यांसारखा आहे असें प्रस्तुत टीका सांगत आहे. विसर्गाचीं टिंबें एकावर एक न लिहितां शेजारीं शेजारीं लिहिण्याचा काल ख्रिस्ती तिसऱ्या शतकापूर्वी जात आहे‡ आणि त्यावरून कातंत्र व्याकरण त्याच्या पूर्वीचें म्हणजे जुन्या शातवाहनांच्या कालांतलेंच असलें पाहिजे असें उघड होत आहे. कलाप व्याकरणाच्या कर्त्याचें नांव शिववर्मा असें जरी सरित्सागरांत आहे तरी मंजरींत शर्ववर्मा असेंच आहे.

कलापव्याकरणाच्या टीकांमध्यें ज्या अक्षरांच्या आकृती वर्णिल्या आहेत, त्यांचादेखील पुरावा शर्ववर्मा फार प्राचीनकाळीं होऊन गेला या कल्पनेस विघातक नाहीं. गुणाढ्यकथा ख्रिस्तीशकाच्या पूर्वी झाली किंवा नंतर झाली यापैकीं कोणतीही गोष्ट अंतर्गत पुराव्यावरून सिद्ध होत नाहीं. तथापि पहिल्या लंबकांत ज्याअर्थी शातवाहनांस शककर्तृत्व आलें नाहीं त्याअर्थी ही कथा शालिवाहन शकाच्यापूर्वी किंबहुना ख्रिस्तीशकाच्या पूर्वी तयार झाली असावी.

### १५८. बृहत्कथा कशी वाढत गेली.

१५८. जर एखादी कथा धर्मसंप्रदायाच्या किंवा राजकीय पक्षाच्या तावडींत सांपडली तर ती बरीच रूपांतर पावते. स्वकीय पक्षसमर्थनार्थ तिच्यांत फेरफार केले जातात. तथापि तसा कांहीं प्रसंग नसल्यास तींत फारसे फेरफार न होतां मूळांतील भाग जसाचा तसाच कायम रहातो. फक्त पाठभेद मात्र उत्पन्न होतील. एखादी नवीन सांपडलेली कथा ऐतिहासिक विचार न करतां जुन्या संग्रहांत दडपून देण्याची क्रियाहि होते. त्यांत कथाप्रियता हाच हेतु प्रेरक होतो. कथेस अधिक सार्वजनिक आणि सार्वलौकिक स्वरूप येण्यासाठीं कालस्थलदर्शक मजकूर गाळला जातो. बृहत्कथा जर बौद्ध किंवा जैन यांच्या हातीं सांपडली असेल तर तदनुरूप फेरफार झाले असतील; व तसें झाल्याचा संशयहि येतो. बृहत्कथा शातवाहनांकडे येण्यापूर्वी प्रथम वररुचीकडून प्रसृत झाली व त्यापूर्वी राजांच्या पदरीं जे कथक असत त्यांपासून थोड्या थोड्या कथा घेऊन वररुचीच्या पूर्वी कैकेयांच्या कोणीतरी आश्रितानें पैशाचींत त्यांची जुळणी, आणि गुंतवणी केली

---

* दत्तास्तव पुनः पाप दीनारा बहवो मया
दूरे तिष्ठतु तद्वृद्धिस्त्वया तेऽपि न रक्षिताः
(आदितस्तरंग ६-३७)

† उलटपक्षीं कवितेंत जुने शब्द वापरण्याचा देखील प्रघात दिसतो. कै. गणपतिराव हरिहर ऊर्फ बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं आपल्या भट्टवंशकाव्यांत 'कार्षापण' हा शब्द उत्तरकालीन नाण्यासाठीं वापरला आहे.

‡ Annual Report Mysore Arch. Survey 1927.

असावी. कैकेयराजांच्या दरबारांत कांहीं कथांना बौद्ध व जैन संस्करण मिळून नंतर त्या वररुचीच्या हातीं लागल्या असाव्यात. वररुचीनंतर काणभूति आणि गुणाढ्य यांनीं देखील नवीन कथांचा अंतर्भाव करून मूलकथेचें बृंहण केलें असणें शक्य आहे; तथापि या तीन जबाबदार व्यक्तींपेक्षां इतर बेजबाबदार व्यक्तींनीं केलेलें बृंहण देखील असावें.

बृहत्कथेच्या मजकुरांतील प्राचीन भाग आणि अर्वाचीन भाग यांचें पृथक्करण करणें झाल्यास असें पाहिलें पाहिजे कीं उदयनचरित्र व नरवाहनचरित्र हीं दोन चरित्रें सांगण्याचा जर या ग्रंथाचा बाणा आहे, तर या मुख्य बाण्याशीं विसंगत असा मजकूर सर्व ग्रंथांत कोठें आला आहे किंवा काय ? ज्या अनेक कथा यांत अंतर्भूत केल्या आहेत त्यांपैकीं कांहीं उदयन, नरवाहन व त्यांचे समकालीन लोक यांना सांगितलेल्या कथा या रूपांत आपल्यापुढें आहेत, व कांहीं त्यांना सांगितलेल्या कथेंतल्या लोकांना त्यांच्या समकालीन लोकांनीं सांगितलेल्या म्हणून दिल्या गेल्या आहेत. म्हणजे सर्व ग्रंथांतील कथा नरवाहनपूर्व आहेत, आणि ज्याअर्थी नरवाहन हा बुद्धाच्या पूर्वी दोन अडीच शतकें अगोदर होऊन गेला असेल, त्याअर्थी सर्व ग्रंथ बुद्धाच्या पूर्वीच्या अनेक शतकांच्या कथा सांगणारा आहे, असा या ग्रंथाचा बाणा आहे.

### १५९. दुसऱ्यापासून पुढच्या लंबकांतील कथा.

१५९. **दुसरा लंबक** कथामुखलंबक होय. यांत वत्सराजानें वासवदत्ता कशी मिळविली आणि उज्जयनीच्या चंडमहासेनाचा आणि वत्सराज उदयन याचा कसा संबंध जुळून आला हें दिलें आहे. बृहत्कथेंतील कथा आणि बौद्ध ग्रंथांतील कथा यांच्या वृत्तांतांत बरेंच अंतर आहे. दोहोंतील भेद उदयनाच्या काळासंबंधानें चर्चा करतांना विवेचिले आहेत.

**तिसरा लंबक** म्हणजे लावाणक लंबक. यांत दुसऱ्या एका राजकन्येबरोबर वत्सराजाचें लग्न लावून देण्याची खटपट करून यौगंधरायणानें मगधराजकन्या वत्सराजास मिळवून दिली असें दाखविलें आहे. या लंबकांत मौनी संन्याशाची वगैरे ज्या उपकथा आल्या आहेत त्या बुद्धपूर्वकालीन किंबहुना कुरुयुद्धपूर्वकालीन समजण्यास कोणत्याहि प्रकारें अडचण येत नाहीं. कांहीं पौराणिक कथा यांत आल्या आहेत त्या कांहीं फरक होऊन आल्या आहेत. अशा कथांत कुंती व दुर्वास यांची कथा व सुंदोपसुंदाची कथा या आहेत.

**चवथा लंबक** नरवाहनदत्ताच्या जननासंबंधाचा होय. यांत वासवदत्तेच्याकडे आश्रयार्थ एक ब्राह्मणी येणें वगैरे गोष्टी आल्या आहेत. यांतच वत्सराजाच्या मद्यादि व्यसनांचें वर्णन आहे. यांत जीमूतवाहन आणि शंखचूड यांची जी एक कथा आली आहे तीवरच पुढें ‘ नागानंद ’ नांवाचें नाटक श्रीहर्षानें लिहिलेलें आहे. या कथेचा मूलतः बौद्ध व जैन धर्मांशीं कांहींएक संबंध नाहीं; तथापि उत्तरकालीन अनेक लेखकांनीं ही कथा आपापल्या संप्रदायाची बनविलेली आहे.

**पांचवा लंबक** चतुर्दारिकालंबक होय. यांत शक्तिवेग नांवाच्या एका साहसी पुरुषानें विद्याधरत्व प्राप्त करून घेऊन चार विद्याधर स्त्रिया कशा मिळविल्या याचें वर्णन आहे. ही कथा अद्‌भुतमय आहे, आणि ही वत्सराजाच्या सभेंत शक्तिवेग आला होता एवढेंच निमित्त करून कथिली गेली आहे. ही कथा पूर्वी एखादी स्वतंत्र अद्भुत कथा असून या कथेला केवळ सोप्या युक्तीनें जोडली आहे असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. ही कथा ज्या काळांत भारतीयांचें भारताच्या बाहेरील द्वीपाशीं दळणवळण बरेंच असावें त्या काळाची द्योतक आहे.

**सहावा लंबक** सोमदेवीय प्रतीप्रमाणें मदनमंचुकेविषयींचा होय. मदनमंचुका ही कलिंगसेना नामक एका अत्यंत सुंदर स्त्रीची मदनवेग नांवाच्या विद्याधराश्रीशापासून झालेली मुलगी होती. कलिंगसेनेच्याच मनांत वत्सराजाशींच लग्न करावयाचें होतें, पण त्यानें तसें लग्न केलें तर हा विलासांतच राहील, राज्यकारभार पहाणार नाहीं असें मंत्र्यांस वाटून त्यांनीं लग्न चांगल्या मुहूर्तासाठीं म्हणून लांबणीवर टाकविलें. मधल्या काळांत मदनवेगानें कपटानें वत्सराजाचें रूप धरून तिच्याशीं गांधर्वविवाह केला, व या रीतीनें वत्सराजाला त्या सौंदर्यवतीच्या मोहांतून वचावलें. या कलिंगसेनेची कन्या मदनमंचुका ही रतीप्रमाणें सुंदर होती; तिचा आणि नरवाहनदत्ताचा पुढें विवाह झाला.

**सातवा ( सोमदेवीय ) लंबक** रत्नप्रभालंबक होय. रत्नप्रभा ही एक विद्याधरकन्या होती. ती वत्सपुत्रराजास पाहून मोहित झाली आणि तिनें आपल्या इच्छेनें नरवाहनदत्तास स्वीकारलें. या लंबकांत प्रतिष्ठानच्या नरसिंह राजाची कथा आली आहे व त्याचप्रमाणें नागार्जुनाचीहि कथा आली आहे. नागार्जुन हा शातवाहन काळांतील बौद्धसंप्रदायांतील मोठा पुरुष आणि माध्यमिक संप्रदायांचा संस्थापक म्हणून प्रसिद्ध, व तोच नागार्जुन रसायनशास्त्रज्ञ देखील समजला जात आहे; तर ही उत्तरकालीन कथा आंत कोणीतरी दडपून दिली कीं नागार्जुन दोन असून एकाचें चरित्र दुसऱ्यास चिकटलें या प्रश्नाचा विचार पुढें स्वतंत्रपणें केलाच आहे. सध्यां एवढेंच सांगतां येईल कीं, बृहत्कथेंत नागार्जुनाची कथा आली व त्याचा बौद्ध म्हणून जरी उल्लेख असला तरी देखील या कथेचें अस्तित्व अखिल संग्रहास उत्तरकालीन करूं शकणार नाहीं.

**आठवा (सोमदेवीय) लंबक** म्हटला म्हणजे सूर्यप्रभ लंबक होय. या लंबकांत नरवाहनदत्ताच्या सभेंत एक विद्याधर येऊन सूर्यप्रभ या एका प्राचीन राजाची कथा सांगता झाला असें आहे. ही कथा देखील पूर्वी स्वतंत्र असून पुढें ती नरवाहनदत्तास सांगितली गेली, या युक्तीनें बृहत्कथेंत समाविष्ट झाली आहे. सूर्यप्रभ हा मद्र देशाचा पराक्रमी राजा असून त्यानें अनेक विजय मिळविले आणि अनेक देशांच्या राजकन्या करून घेतल्या असें त्यांत दाखविलें आहे. या सूर्यप्रभाच्या जनानखान्यांत कोंकण आणि महाराष्ट्र येथील स्त्रिया देखील होत्या असा उल्लेख आला आहे; तो उल्लेख प्रसंगासहित अन्य प्रकरणांत आला आहे.

**नववा लंबक** अलंकारवतीलंबक होय. या लंबकांत अनेक प्राचीन कथा आल्या आहेत. त्यांत सीता व राम यांच्या विरहाचें वृत्त, नलदमयंती यांची उपकथा वगैरे भाग आहेत. या लंबकाचा मुख्य विषय अलंकारवती आणि नरवाहनदत्त यांचा विवाह होय. अलंकारवती ही एका विद्याधरेशाची मुलगी होती; आणि ती नरवाहनदत्ताची बायको होणार अशी आकाशवाणी झालेली होती. त्यांचें लग्नाचें ठरलें, पण मध्यें कांहीं विघ्न आलें आणि पुढें अडचण उत्पन्न झाली, पण शेवटीं अडचणींतून मुक्त होऊन लग्न झालें.

**दहावा लंबक** शक्तियशलंबक होय. यांत मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे हा लंबक नीतिकथांनीं भरलेला आहे. खुंटी उपटणाऱ्या वानराची कथा, कोल्हा, सिंह वगैरेंच्या कथा, बकाविषयीं कथा, ज्योतिषाविषयीं कथा, वगैरेनीं हा लंबक भरला आहे. याच्यांतील कुमुदिकाकथा स्वतंत्रपणें दिलीच आहे. हा शक्तियशलंबक देखील एक स्वतंत्र पुस्तक आहे व तें नरवाहनदत्तास सांगितलेल्या कथा या रूपानें यांत आलें आहे. नरवाहनदत्ताच्या आयुष्याशीं याचा निकट संबंध नाहीं. शक्तियशलंबकांत शक्तियशेचा नरवाहनदत्ताशीं विवाह शेवटीं सांगितलेलाच आहे. पण या लंबकांत शक्तियशेचा वृत्तांत थोडा आहे.

**अकरावा लंबक** 'वेलालंबक' होय. हा अत्यंत लहान आहे. या लंबकाचा विषय चंद्रसार नांवाच्या एका वैश्याची कथा आहे.

**बारावा लंबक** शशांकवतीलंबक होय.

शशांकवती लंबकामध्यें ज्या कथा आल्या आहेत त्यांच्याकडे लक्ष देतां म्हणावें लागतें कीं त्यांत ज्या पशुकथा आहेत त्यांच्या कालाविषयीं कोणतीहि चर्चा फलदायक होणार नाहीं. पशुकथा खिस्तपूर्व हजार वर्षांपूर्वींची जरी धरली तरी प्रत्यवाय नाहीं आणि खिस्तोत्तर धरली तरीही आक्षेप घेण्याला महत्त्वाचें कारण सांपडणार नाहीं. विशेष सूक्ष्म अवलोकन, देशांचीं नांवें व राजांचीं नांवें या संबंधानेंच अवश्य आहे; कारण हे उल्लेख ऐतिहासिक असण्याचा अधिक संभव आहे. शशांकवती लंबकांत मगध देशांतील भद्रबाहु नामक राजा आला आहे. त्याप्रमाणेंच तक्षशिला नगरींतील भद्राक्ष राजा उल्लेखिला आहे; या भद्रबाहूचें नांव मगध राजांमध्यें शोधणें कठीण होत आहे. शुंग घराण्यामध्यें एक भद्रक असें नांव भागवतपुराणामध्यें येतें; तथापि त्या भद्रकाचा भद्रबाहूशीं संबंध लावतां येत नाहीं, याचें कारण एक तर हें नांव सर्व पुराणें देत नाहींत. अनेक पाठ पाहून पार्गिटेरनें 'अंध्रक' हाच नामपाठ पसंत केला आहे; शिवाय हा राजा नरवाहनदत्ताच्यानंतर बराच उत्तरकालीन होऊन गेला. त्याचें नांवदेखील सर्व प्रतींत नाहीं. वरील कारणांमुळें या राजाचें नांव बृहत्कथेप्रमाणें उदयनपूर्व काळांत आलें म्हणून भद्रबाहूची कथा अनैतिहासिक किंवा उदयनापेक्षां उत्तरकालीन ठरवितां येत नाहीं.

शशांकवती लंबकांतील मुख्य महत्त्वाची कथा म्हटली म्हणजे मृगांकदत्ताची होय. या कथेंतच अनेक उपकथा आल्या आहेत आणि यासाठीं त्या उपकथा आपला काल मृगांकदत्तापेक्षांहि प्राचीनतर आहेत असें सांगत आहेत. त्या कथांपैकीं कोणतीहि कथा निश्चयपूर्वक नरवाहनदत्ताच्या पूर्वींच्या काळांत किंवा उत्तरकाळांत घालतां येणार नाहीं. मगधाची राजावलीच अपूर्ण असल्यामुळें कथेंत आलेलें नांव राजावलींत नाहीं म्हणून त्या कथेंत आलेल्या नांवाचा अस्वीकार करणें योग्य होणार नाहीं. अहिच्छत्राचें राज्य म्हणून शशांकवती लंबकांत उल्लेखिलें आहे तें राज्य केव्हां स्वतंत्रपणें अस्तित्व राखून होतें याविषयीं आज कांहींच माहिती नाहीं. तथापि प्राचीन कालच्या अनेक राज्यांमध्यें अहिच्छत्राचें स्वतंत्र राज्य किंवा सामंतराज्य या नात्यानें अस्तित्त्व असणें अशक्य नाहीं. अनेक जाती आपले इतिहास देतांना आपलें मूलस्थान म्हणून अहिच्छत्राचा उल्लेख करतात.

या दीर्घ कथामय शशांकवती लंबकामध्यें वराहबोधिसत्वाचें वृत्त म्हणून जी कथा आली आहे ती कथा मात्र संशयकारी आणि या लंबकाला बुद्धोत्तर कालांत ढकलणारी आहे असें वाटेल. तथापि सूक्ष्मपणें पाहिलें असतां, एक जुनाट पशुकथा काय ती तेथें अवतरली गेली आणि तिचा संबंध बोधिसत्वाशीं मागाहून जोडला गेला असें शक्य आहे. एवंच तेवढ्यावरूनच कथेला उत्तरकालीन ठरविण्याचें कारण नाहीं. उलट अशी कथा प्राचीनकालीन समजण्यांत हरकत

मुळींच नाहीं. शशांकवती लंबकांत एक ब्राह्मण व ब्राह्मणी यांची उपकथा आली आहे. ती कथा ब्राह्मणद्वेष करणारा वर्ग त्या काळीं होता, आणि त्या वर्गांतील मंडळी ब्राह्मणांस उपद्रव झाल्यास किंवा त्यांना न्यायासनाकडून विरुद्ध निकाल मिळाल्यास कशी आनंद मानीत होती याची दर्शक आहे.

नैतिक उपदेशाच्या ज्या अनेक कथा कित्येक लंबकांप्रमाणें या लंबकांतहि आहेत त्यांच्याविषयीं, जें पशुकथेविषयीं म्हणून म्हटलें तेंच म्हणतां येईल. त्यांचा काल भारती युद्धाच्या पूर्वीचा म्हटला तरी आक्षेपार्ह होणार नाहीं व ख्रिस्तानंतरचा म्हटला तरीहि आक्षेपाला जागा राहणार नाहीं. शशांकवती लंबकांत सिंहलद्वीपच्या सिंहविक्रम म्हणून नांव घेऊन हिंडणाऱ्या चोराची कथा आली आहे; त्यावरून सिंहलद्वीप हें सामाजिक दृष्ट्या उदयनपूर्वकालीन भारतीयांच्या परिचयक्षेत्रांत मोडत होतें यांत शंका नाहीं; व सिंहलद्वीपामध्यें ज्याअर्थी आर्यन भाषा अशोकपूर्वकालीन आहे त्याअर्थी सिंहलद्वीपाच्या असलेल्या उल्लेखावरून त्या कथा उदयनोत्तरकालीन धरण्याचें कारण नाहीं. तथापि याच कथांत बोधिसत्वाचा उल्लेख अनेकदां आला आहे. त्रिगर्तानगरी म्हणून एक महत्त्वाची नगरी येथें कथाविषय झाली आहे. शशांकवती लंबकामध्यें भूनंद राजाचा वृत्तांत आला आहे, आणि हा काश्मीरचा राजा म्हणून त्याचा उल्लेख आला आहे; म्हणजे या काळांत काश्मीर एक स्वतंत्र राज्य होतें असें दिसतें. येथें काश्मीरमध्यें विनायकाचें अर्चन दाखविलें आहे; तथापि यांपैकीं कोणतीहि गोष्ट उत्तरकालीन क्षेपक भाग म्हणण्यास कारण कांहीं नाहीं. शशांकवती लंबकांत पुढें वेताळपंचविशी आली आहे आणि तिच्याविषयीं स्थूल विवेचन या पुस्तकांत अन्यत्र केलेंच आहे.

थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे या बृहत्कथेंतील शशांकवती लंबकास मुख्यतः नरवाहनदत्तपूर्वकालीन म्हटलें तर विशेष आक्षेपार्ह असें नाहीं. अनेक पशुकथांत जो बुद्धविषयक अवशेष दृष्टीस पडतो तो उत्तरकालीन संपादकानें घातला असणें संभवनीय आहे. बोधिसत्वाचे अनेक उल्लेख समाविष्ट करणें संपादकांस गैर वाटण्याचें कारण नव्हतें; कारण त्या सर्व कथा आपल्या पूर्वजन्मींच्या म्हणजे बुद्धपूर्वकालीन आहेत असें बुद्धाचेंच सांगणें असल्यामुळें बुद्धास पूर्वजन्मीचें ज्ञान असावें असा विश्वास बाळगणाऱ्या बृहत्कथेच्या उत्तरकालीन संपादकांस आपल्या कथांना बुद्धाच्या पूर्वावताराचें नांव जोडणें गैर वाटण्याचें मुळींच कारण नव्हतें; व कालविपर्यासाचा दोष ते आपल्या स्वतःच्या दृष्टीनें करीत नव्हते.

शशांकवती लंबकानंतरचा म्हणजे **तेरावा लंबक** मदिरावतीलंबक होय. यांत विरहातुर नरवाहनदत्ताचें मलयगिरीवर भ्रमण दाखविलें आहे आणि तेथें त्याचा कांहीं ब्राह्मणपुत्रांशीं संबंध आणिला आहे. आणि अनुषंगानें त्यांत ज्या ब्राह्मणकथा आलेल्या आहेत त्या ब्राह्मणांच्या सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत.

**चौदावा** लंबक म्हणजे पंचलंबक होय. यामध्यें अंगिरा मुनीची कथा आली आहे, आणि पुष्करावती नगरी, विद्याधरांचें आषाढपुर इत्यादि नगरें आलीं आहेत. या पुष्करावती नगरीमध्यें जो विद्याधर राज्य करीत होता त्याला पिंगल गांधार हें नांव सांपडतें. या सर्व उल्लेखांच्या साहाय्यानें विद्याधरांचें स्थान कोणतें असावें यासंबंधानें आपणास निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. यांत दूरावलेल्या मदनमंचुकेचा शोध नरवाहनदत्त करीतच आहे; तथापि विरहातुर झालेल्या नरवाहनदत्तास मध्येंच आणखी चारपांच विवाह करण्यास कांहीं हरकत वाटली नाहीं असें दाखविलें आहे. यांत रामायणवृत्ताचा देखील कांहींसा भाग आलेला आहे. या लंबकांत नरवाहनदत्त व मदनमंचुका यांचा पुनः समागम झालेला आहे.

**पंधरावा लंबक** महाभिषेकलंबक होय. ऋषभ पर्वतावर नरवाहनदत्तास अभिषेक झालेला आहे.

**सोळाव्या सुरतमंजरी लंबकांत** सुरतमंजरीचें वृत्त आलें आहे. सुरतमंजरी ही उज्जयिनींतील पालक नांवाच्या राजाच्या अवंतीवर्धन नांवाच्या मुलाची बायको. हा पालक नरवाहनदत्ताचा मामा होता, आणि त्यामुळें नरवाहनदत्ताची सुरतमंजरी संबंधिनी होती. ती चांडालकन्या असतांना देखील अवंतीवर्धनानें तिच्याशीं लग्न केलें; तथापि तें लग्न अयोग्य नव्हतें; कारण सुरतमंजरीचा बाप खरोखर विद्याधर असून त्याला चांडालत्व प्राप्त झालें होतें. सुरतमंजरी लंबकांत त्या विवाहाचें समर्थन करण्याच्या निमित्तानें, अयोग्य संबंधाच्या दुसऱ्या अनेक कथा आहेत, आणि प्रत्येकींत तसल्या विवाहाचें समर्थन आहे.

**सतरावा लंबक** पद्मावतीलंबक होय. यांत देखील इकडे एखाद्या स्त्रीशीं वियोग होऊन विरहदुःख भोगणारा नरवाहनदत्त हा अधिकाधिक विवाह करतो असें दाखविलें आहे. या लंबकांतील त्याच्याशीं लग्न करणारी एक स्त्री पद्मावती आहे.

**अठरावा लंबक** हा विषमशील लंबक होय. हा लंबक विक्रमादित्याचें चरित्र वर्णन करणारा आहे. विक्रमादित्य हें केवळ बिरुद असून खरें नांव विषमशील होतें. हाच उज्जयिनीचा प्रसिद्ध विक्रमादित्य. याचा शककर्त्या विक्रमादित्याशीं संबंध जोडण्याचें कारण नाहीं. हा वररुचीच्या पूर्वीचा पुरुष असावा असें म्हणण्यास अडचण उत्पन्न होत नाहीं. याची कथा स्वतंत्रपणें पुढें विवेचिली आहे.

### १६०. बृहत्कथा बुद्धपूर्वकालाचें महत्त्वाचें साहित्य होय.

१६०. बुद्धपूर्वकालीन कोणत्या कथा या सरित्सागरांत आहेत हें आपणास ठरविणें, अगदीं खात्रीनें सांगणें, शक्य नाहीं, तरी बऱ्याच कथांसंबंधानें पूर्वोत्तरताविषयक अंदाज करणें कठिण नाहीं. या सरित्सागरांतील अनेक कथा पौराणिक आहेत आणि अनेक सामान्य लोककथेंतील आहेत.

ज्या कथा बौद्धवाङ्मयांत उल्लेखिल्या आहेत अशा अनेक कथा यांत आल्या आहेत; त्या खरोखर थोड्या आहेत आणि त्या कथांच्या स्वरूपावरून त्या कथांच्या समावेशाचा काल कांहीं अंशीं काढतां येण्याजोगा आहे, पण तो बिनचूक काढतां येणार नाहीं. बुद्धाच्या संबंधानें आलेली कथा ती बुद्धोत्तर होय हें धोपट तत्त्व लावतां येत नाहीं. कारण कीं, जुन्या कथा घेऊन बौद्धांनीं आपल्या संप्रदायवर्धनाकडे लावल्यामुळें त्या कथा बुद्धपूर्वकालीन होत्या ही शक्यता कायम रहाते, व त्याहि कथेचें बुद्धपूर्व काळाविषयीं इतिहाससूचक महत्त्व कायम रहातें.

एवंच, कुरुयुद्ध आणि बुद्ध यांच्या मधल्या काळाच्या इतिहासप्राप्तीसाठीं ग्रंथांचें एकंदर पृथक्करण येथें देणें अवश्य आहे. बुद्धकालीन, बुद्धोत्तरकालीन आणि त्याचप्रमाणें बुद्धपूर्वकालीन कथा त्यांत अंतर्भूत झाल्या आहेत, आणि बुद्धाच्या धर्माचे किंवा खुद्द गौतमबुद्धाचे व त्याच्या अनुयायांचे उल्लेख त्यांत आले आहेत त्यांचाहि विचार एकंदर विवेचनांत करावा लागेलच.

### १६० अ. बृहत्कथाघटना व तिच्या पायऱ्या व बृहत्कथेंतील महाराष्ट्रीय व्यक्तींचा काळ.

१६० अ. बृहत्कथासंघटनेचा इतिहास येणेंप्रमाणें असावा.

१. नरवाहनदत्ताच्या काळांत शतानीकाच्या काळापासून आलेलें कथकांचें सातत्य चालू होतें. शतानीकाच्या काळांत पौराणिक वर्ग क्षेत्रोपाध्यायांचा हस्तक बनला असावा आणि कथकांचा वर्ग त्यांच्यापासून जरासा च्युत झाला असावा.

२. वहीनर हें नरवाहन याचें इराणी रूपांतर पुराणांत ग्राह्य झालें यावरून त्या नांवाचा बराच प्रचार असावा असें दिसतें. म्हणजे याच काळांत व नंतर हिंदू राजमंदिरांस इराणीसंस्कार बराच झाला होता हें स्पष्ट आहे. नरवाहनदत्ताच्या काळांतच बृहत्कथा संपत आहे त्याअर्थी याच काळांत कथासंकलन कोणी तरी केलें असावें आणि तें संकलन प्रथम इराणी सत्तेखालीं पैशाची रूप पावलें असावें.

३. विद्याधरांचा वर्ग वेदांस माहीत नाहीं आणि जैनकथा वगळतां भारतीयांस अपरिचित आहे. उदयन आणि नरवाहन यांचीं लग्नें बऱ्याचशा गांधार व पारसीक किंवा कैकेय राजकन्यांशीं झालीं असलीं पाहिजेत आणि त्यांनांच गौरवात्मक भाषेनें भारतीयांनीं गंधर्वकन्या आणि विद्याधरकन्या ठरविलें असेल आणि विद्याधरेशत्व मिळणें हीं आयुष्यांतील इतिकर्तव्यता लोकांस वाटली असेल.

४. विद्याधरेश अनेक दाखविले आहेत आणि विद्याधरचक्रवर्तीदेखील वर्णिलें आहे. त्यावरून असें वाटतें कीं वत्सदेशाच्या पश्चिमेस शूरसेनापासून सिंधूपर्यंत अनेक लहान लहान गंधर्वराज्यें आणि विद्याधरराज्यें म्हणजे गांधार व कैकेय या जातींचीं राज्यें असावींत, आणि विद्याधरांशीं लग्न करणाऱ्या राजांच्या गोष्टी इत्यादि कथांना प्रामुख्य मिळालें असावें. प्रस्तुत लेखकानें युरोपीयन स्त्रीशीं लग्न करणाऱ्या एका हिंदू राजाच्या गौरवार्थ लिहिलेलें स्तुतिमय संस्कृत काव्य लिहिलेलें पाहिलें आहे. त्यांत युरोपीयन स्त्रीस अप्सरा बनविलें आहे; त्याप्रमाणेंच परकीय गौरवर्ण स्त्रियांस कवींनीं विद्याधरी बनविलें असावें.

या सर्व इराणी संस्कारास बुद्धपूर्व दोन अडीचशें वर्षांपूर्वी प्रारंभ झाला असावा. वररुचीचा काल म्हटला म्हणजे चंद्रगुप्त मौर्याचा होय. तर नरवाहनापासून वररुचीच्या कामगिरीच्या कालापर्यंत चारपांचशें वर्षांचें अंतर पडतें. या कालांत पैशाचीमध्यें वाङ्मय वाढलें व मूळकथांस बौद्ध आणि जैन संस्कार झाले. नरवाहनासच इराणी संस्कार झाला असल्यामुळें आपल्या इराणी नातेवाईकासाठीं इराणी भाषेंत गोष्टी तयार करविणें वगैरे गोष्टी त्याच्याच आश्रयानें झाल्या असणेंहि स्वाभाविक आहे. या मधल्या कालांत पौराणिक वर्गाचें वत्सदेश व कोसलदेश येथून उच्चाटन होऊन तो मगधदेशीं संस्थापित झाला. बृहद्रथवंशाचा अंत कसा झाला हें पौराणिकांनीं दिलें आहे. त्याचें राज्य प्रद्योतांनीं घेतलें हें सांगितलें आहे. तथापि पौरववंश आणि इक्ष्वाकु वंशासंबंधानें विधान जरासें संशयास्पद आहे. त्यांत त्यांनीं

**अत्रानुवंशश्लोकोऽयं गीतो विप्रैः पुरातनैः**
**ब्रह्मक्षत्रस्य यो योनिर्वंशो देवर्षिसत्कृतः**
**क्षेमकं प्राप्य राजानं संस्थां प्राप्स्यति वै कलौ**

या तऱ्हेचें वर्णन केलें आहे. त्यांतील ‘ संस्थां प्राप्स्यति वै कलौ ’ या शब्दांचा अर्थ करण्यासंबंधानें प्रश्न आहे. त्या शब्दाचें Will reach its end in Kali age असें मि. पार्गिटेर यांनीं भाषांतर केलें आहे, तें भाषांतर बरोबर नाहीं व अर्थबोधक होत नाहीं.

इक्ष्वाकुवंशासंबंधानें देखील विधान वरील प्रकारचेंच आहे.

### "सुमित्रं प्राप्य राजानं संस्थां प्राप्स्यति वै कलौ"

या ओळीचा अर्थ मी असा करतों कीं त्या ओळींत उल्लेखिलेल्या राजवंशास परदेशीय स्वरूप प्राप्त झालें. तें राज्य जिंकलें गेलें नाहीं तर इराणी संस्कृतीमध्यें पूर्ण गढून गेल्यामुळें तें कलिरूप झालें असें दाखविण्याचा त्या पुराण-काराचा आशय असावा. तथापि नंदांनीं राज्य घेतलें ही देखील एक शक्यता आहेच. पण ती शक्यता स्वीकारतांना उदयनोत्तर ब-याच राजांचीं नांवें नष्ट झालीं, असें गृहित धरावें लागेल. नंदांनीं राज्य घेतलें म्हणजेच कलिरूपता राज्याला आली असाहि अर्थ कवीच्या नांत असेल; कारण महापद्म नंदीस "कलिकांश" आणि "सर्वक्षत्रांतक" अशीं विशेषणें कवींनीं लावलीं आहेत ( महानंदि सुजश्चापि शूद्रायां कलिकांशजः। उत्पत्स्यते महापद्मः सर्वक्षत्रांतको नृपः ). पौरववंश आणि इक्ष्वाकूंचा वंश बुडविण्याचें श्रेय जरी महापद्मनंदीला देणें योग्य ठरलें तरी उदयनपूर्वज शतानीक आणि अंतिम बहिद्रथ राजा यांचें कालैक्य नष्ट होत नाहीं आणि उदयनाच्या काळासंबंधाचें आमचें अनुमान मुळींच चुकत नाहीं.

बृहत्कथेचें जें स्वरूप येथें वर्णन केलें आहे त्यावरून ही कथा मुख्यत्वेंकरून बुद्धपूर्वकालीन आहे असें दिसून येईल आणि तींत असलेल्या महाराष्ट्राच्या उल्लेखांतील व्यक्ति ऐतिहासिक असल्यास त्या बुद्धपूर्व काळांतच नव्हे तर उदयनपूर्व काळांत म्हणजे ख्रिस्तपूर्व आठव्या शतकाच्या पूर्वी केव्हांतरी असल्या पाहिजेत याच कल्पनेप्रत यावें लागेल. येणेंप्रमाणें ग्रंथोक्त राजांचा स्थूलपणानें कालनिर्णय झाल्यानंतर अधिकाधिक व्यक्ती व माहिती शोधण्यासाठीं ग्रंथांत अधिक अवगाहन करूं.

---



चित्रांक २६—घारापुरींतील गुहा ( नं. ४ )

# उदयनाचा दिग्विजय, महाराष्ट्राची वगळणूक आणि पारसीकांचा पराभव.

## १६१. उदयनाच्या ऐतिहासिक कामगिरीचें निरीक्षण.

१६१. गेल्या प्रकरणांमध्यें उदयनाविषयीं कांहीं मजकुर आलेला आहे. पुराणें, कथासरित्सागर, बौद्ध आणि जैन कथा या सर्वांमध्यें उदयनाचा उल्लेख असल्यामुळें त्या सर्व कथांचें एकीकरण करणें व त्यांची संगति लावणें, आणि दिग्विजयी उदयनाचा महाराष्ट्राशीं काय संबंध आला त्याचें अवगमन करणें इत्यादि इतिहासजिज्ञासेच्या दृष्टीनें आपलीं प्रधान कर्तव्यें होत.

उदयन राजाचें बृहत्कथेनें दिलेलें वृत्त प्रथम दिलें पाहिजे. कथासरित्सागरामध्यें असें दाखविलें आहे कीं, हा राजा पांडववंशीय होता. हा जरी शूर होता तरी तो विलासप्रिय होता; आणि तो तसा असल्यामुळें त्याच्याकडून महत्कार्यास स्वाभाविकपणें प्रेरणा झाली नाहीं. उदयनापेक्षां त्याचा मंत्री यौगंधरायण हाच महत्त्वाकांक्षी होता, आणि यौगंधरायणाच्या पुढें, आपण आपल्या महत्त्वाकांक्षा तृप्त करून घेण्यासाठीं राजाला कर्तृत्ववान कसें बनवावें, त्याला विलासापासून कसें सोडवावें इत्यादि प्रश्न होते. विलासप्रिय उदयनास देखण्या राजकन्या हव्या होत्या, आणि त्या आवडीमुळें तो केवळ विलासांत निमग्न राहाण्याचा संभव होता. राज्यास हितावह असेच संबंध राजाकडून यौगंधरायणास घडवावयाचे होते, तेव्हां अनेक युक्त्या करून यौगंधरायणानें त्यास दिग्विजयोन्मुख केलें; आणि प्रत्यक्ष दिग्विजयास निघण्यापूर्वी उदयनाचीं लग्नें राजकारणाच्या दृष्टीनें हितावह होतील अशींच घडवून आणलीं. राजकारणाच्या दृष्टीनें हितावह अशीं लग्नें घडवून आणणें हें मंत्र्याचें काम आहे आणि त्याच्या करितां बराच पातळयंत्रीपणा करावा लागतो, अशा प्रकारच्या कथा प्राचीन ग्रंथांत पुष्कळच आहेत, व यौगंधरायण ही व्यक्ति त्यामुळें वाङ्मयांत बरीच गाजली आहे.

उदयनविषयक विविधग्रंथांतील अनेक कथांची संगति लावणें हें कार्य करण्यापूर्वी त्याची ऐतिहासिक कामगिरी प्राचीन इतिहासकारांनीं व तदनंतर कवींनीं कशी रेखाटली आहे हें पाहूं. "इतिहासकारांनीं व तदनंतर कवींनीं" असे जे शब्द वर दिले आहेत ते सहेतुक आहेत. प्राचीनकालीं ऐतिहासिक माहिती देणारीं लिखाणें राजाच्या दप्तरीं असत तथापि तें व्यावहारिक वाङ्मय होतें; ललित किंवा शिष्ट वाङ्मय नव्हतें. कवी राजपुरुषांपासून लागेल ती ऐतिहासिक माहिती घेत आणि त्यांत आपल्या मनाची भर घालून काव्यें सजवीत. ही गोष्ट ऐतिहासिक पुरुषाविषयीं कवींनीं केलेल्या काव्यगायनावर विचार करतांना लक्षांत ठेविली पाहिजे. असो. इतिहासकारांनीं जी माहिती लिहून ठेवली असेल तिचाच समावेश कवींनीं काव्य गातांना केला असावा असेंच त्याच्या दिग्विजयाच्या वृत्तांताकडे लक्ष देतां वाटावयास लागतें.

## १६२. दिग्विजयास प्रारंभ.

१६२. उदयन हा पांडववंशीय होता हें मागें आलेंच आहे; तसेंच हा पांडववंश कुरुक्षेत्र सोडून कौशांबी येथें येऊन राहिला याचाहि उल्लेख पुराणाप्रमाणें सरित्सागरांतदेखील आहे. हस्तिनापूर सोडावयास जें कारण झालें तेंच कारण बृहत्कथेनें दिलें नाहीं.

उदयनाच्या दिग्विजयाचें वर्णन जें सरित्सागरांत आहे तें शब्दशः भाषांतर करून देणेंच योग्य होईल. म्हणून तें तसें देत आहें (लावाणकलंबक तरंग ५ वा, श्लोक ५६–११८).

"येणेंप्रमाणें मुख्य मंत्री बोलल्यानंतर 'तसें असो' म्हणून राजा विजययात्रेस उद्युक्त झाला, आणि आपल्या प्रजेला प्रयाणाचा आरंभ आदेशिता झाला. त्यानें विदेह देशींचें राज्य गोपालकाला दिलें आणि सत्काराचा हेतु धरून श्वशुर्याप्रत(?) गेला. पद्मावतीचा भाऊ सिंहवर्मा हा सैन्यासह मदतीला आला होता, त्याला कांहींतरी महत्त्वाचें सन्मानपूर्वक दिलें. तें म्हटलें म्हणजे चेदिविषयाचें आधिपत्य होय. भिल्लराज पुलिंदक याला मित्र म्हणून पाचारण केलें. पावसाळ्यांत ढग ज्याप्रमाणें दिशा व्यापून टाकतात, त्याप्रमाणें सैन्यांच्या योगानें त्यानें त्या व्यापून टाकल्या. येणेंप्रमाणें त्या महाप्रभूच्या राष्ट्रांत मोठा यात्रासंरभ झाला, आणि शत्रूंचीं हृदयें आकुल व चित्र झालीं. ब्रह्मदत्त राजाचें विचेष्टित समजावें म्हणून वाराणसी राज्यांत यौगंधरायणानें अगोदर हेरांना पाठविलें होतेंच" (५६–६१).

"हा ब्रह्मदत्त* नांवाचा राजा वाराणसींत आहे."

* वाराणसींतील ब्रह्मदत्त राजाची कथा दोनदां कथासरित्सागरांत आली आहे; तो ब्रह्मदत्त उदयनकालीन होय अशी खात्री देतां येत नाहीं तथापि तसें अशक्य देखील नाहीं.

तो नित्य वैरी आहे तर त्याला अगोदर जिंकलें पाहिजे असें यौगंधरायण राजास सांगत असे ( ५४ ). नंतर शुभ दिवशीं जयसूचक असे शकुन पाहून आनंद झालेला वत्सेश्वर पूर्वेकडे ब्रह्मदत्तावर ( चाल करून ) गेला ( ६२ ), आणि ज्यावर छत्रस्थापना केली आहे, अशा जयकुंजरावर आरूढ झाला. ज्या गिरीवर एक झाड आहे अशा डोंगराप्रमाणें तो हत्ती शोभला. आणि राजा डोंगरावर माजलेल्या सिंहाप्रमाणें शोभला. या उपक्रमांत सिद्धीनेंच दूती पाठविली आहे कीं काय अशी शरद्* त्यास थोड्या पाण्याचा व सुंदर मार्ग दाखविती झाली ( ६४ ).

त्याच्या घोष करणाऱ्या सैन्याच्या योगानें निर्मेघ असलेलें भूतल वर्षाकालाचा संभ्रम उत्पन्न करतें झालें ( ६५ ). सैन्याच्या घोषामुळें जो प्रतिध्वनि उत्पन्न होई त्याच्या योगानें आकुल झालेल्या दिशा एकमेकींना त्याच्या आगमनाचें संकटच ओरडून सांगत आहेत काय असें वाटलें ( ६६ ). सुवर्णाचे अलंकार घातलेले आणि त्यामुळें सूर्यासारखे चमकणारे त्याचे घोडे नीराजन विधीनें संतुष्ट झालेल्या अग्नीचें अनुकरण करीत असल्यासारखे चालूं लागले ( ६७ ).

### १६३. दिग्विजय आणि लष्करी हेर.

१६३. त्या काळांत लष्करी हेराचें काम कसें होतें याविषयींची कथा सांगणाराची कल्पना देखील कांहीं श्लोकांत चांगल्या तऱ्हेनें मांडली गेली आहे. "इतक्यांत यौगंधरायणानें पाठविलेले हेर कापालिक व्रत ( वेष ) धरून वाराणसीस येऊन पोंचले ( ७४ ). त्यांतील एक कुहक नांवाचा होता. तो आपण मोठे ज्ञानी आहोंत असें भासविण्यासाठीं गुरु झाला, आणि बाकीचे त्याचे चेले होऊन त्याच्या सांगण्याप्रमाणें चालूं लागले. शिष्याकडून भिक्षा मागून निर्वाह करणाऱ्या गुरूची प्रसिद्धि करण्याचा त्यांनीं क्रम चालविला. हा आमचा आचार्य मोठा ज्ञानी आहे, तो तिन्ही काळच्या गोष्टी सांगतो इत्यादि गोष्टी सांगून त्यांनीं लोकांना त्याच्या नादीं लावलें. अग्निदाहादि भविष्यें गुरु करी आणि शिष्य तें घडवून आणीत. यामुळें त्याची मोठी ख्याति झाली. तेथील नृपवल्लभास त्यानें कांहींतरी क्षुद्र सिद्धीनें रंजित केलें, आणि कोणातरी राजपुत्राचा शिष्य म्हणून स्वीकार केला ( ७४–७८ ). त्याच्या मुखानें राजा ब्रह्मदत्त त्यास विचारता झाला आणि भावी वत्सेशाबरोबर जो निग्रह करावयाचा त्याच्या संबंधाचा रहस्यज्ञ बनला. ब्रह्मदत्ताचा मंत्री योगकरंडक म्हणून होता त्यानें येणाऱ्या वत्सराजाच्या मार्गांत कांहीं कपटें करून ठेविलीं. विषादि द्रव्यांच्या योजनेनें प्रत्येक रस्ता दूषित करून ठेवला. झाडें, कुसुमवल्ली, पाणी व तृण हीं दूषित केलीं. सैन्यामध्यें शरीरविक्रय करणाऱ्या विषकन्या पाठविल्या. आणि रात्रीं कपटानें हत्या करणारे पुरुष देखील पाठविले. ज्ञानी बनलेल्या त्या हेरानें तें सर्व यौगंधरायणास ताबडतोब आपल्यास हस्तकाच्या मुखें कळविलें. यौगंधरायणानें रस्त्याच्या प्रत्येक टप्प्यावर सर्व समजून घेऊन दूषित तृणतोयनें इत्यादि गोष्टी प्रतियोगी क्रियांनीं शुद्ध केल्या. अपूर्व स्त्रीचा 'समायोग' सैन्यामध्यें निषिद्ध केला. आणि जे घातकी पुरुष पाठविले होते त्यांना रुमण्वानाच्या साहाय्यानें शोधून त्यांचा वध केला ( ७९–८४ ).

आपल्या शेजारचा मुख्य शत्रु त्यानें लढाई न करतां जिंकला अशी साक्ष पुढील वर्णन देत आहे. "वत्सराजानें आपल्या कपट उपायांचा प्रतिकार केला आहे असें जाणून व त्याच्या सैन्यानें दशदिशा भरून टाकल्या आहेत असें ऐकून ब्रह्मदत्तास तो शत्रु दुर्जेय आहे असें वाटलें. तेव्हां आपल्या मंत्र्याशीं चांगला मंत्र करून व पुढें दूत पाठवून मागून तो स्वतः हात जोडून वत्सेश्वराजवळ गेला. तेव्हां योग्य उपायन घेऊन नम्र होऊन समीप आलेल्या ब्रह्मदत्ताचा वत्सराजानें प्रेमानें सत्कार केला, कारण "शूरा हि प्रणतिप्रियाः" ( ८५–८८ ).

शेजारी जिंकल्यानंतर दिग्विजयासाठीं जाणाऱ्या राजास समुद्रापर्यंत जाणें आलेंच. तें गमन आणि वंगकलिंग यांचा विजय आणि पूर्वसागरापर्यंत प्रयाण कवीनें पुढील भाषेंत सांगितलें आहे. "याप्रमाणें त्यास ( वाराणसी राजास ) जिंकून तो शूर राजा वायूप्रमाणें मृदु राजांस नमवीत, व कठिनांचें उन्मूलन करीत, वंग देशास जिंकल्यामुळें भयभीत झालेल्या व तरंगांच्या योगानें आपला कंप दाखविणाऱ्या पूर्वसागरास येऊन पोंचला. त्याच्या तटावर त्यानें जणुं काय पाताळांतून अभय मागण्यासाठीं नागराजच आला कीं काय असा भास उत्पन्न करणारा विजयस्तंभ उभारला. त्यानंतर कलिंग देशांतील राजांनीं नम्र होऊन व पुढें जाऊन त्याला कर दिला; तेणें करून त्या यशस्वी राजाचें यशच महेंद्र पर्वतावर आरूढ झालें ( ८९—९२ ).

### १६४. उदयनाची दक्षिणेकडे चाल.

१६४. पूर्वेकडे "आसमुद्र क्षितीश" होणारा राजा कलिंग जिंकल्यानंतर पुढें दक्षिणेकडे गेला. ती दक्षिणविजयाची हकीकत ९३ ते ९७ पर्यंतच्या श्लोकांत आलेली आहे.

---

* शरदृतुसाठीं येथें स्त्रीलिंग वापरलें आहे.

**महेंद्राभिभवाद् भीतैर्विंध्यकूटैरिवागतैः**
**गजैर्जित्वाऽटवीं राज्ञां स ययौ दक्षिणां दिशम् ९३**
**तत्र चक्रे स निःसारपांडुरानपगर्जितान्**
**पर्वताश्रयिणः शत्रून् शरत्काल इवांबुदान् ९४**
**उल्लंघ्यमाना कावेरी तेन संमर्दकारिणा**
**चोलकेश्वरकीर्तिश्च कालुष्यं ययतुः समम् ९५**
**न परं मुरलानां स सेहे मूर्धसु नोन्नतिम्**
**करैराहन्यमानेषु यावत्कांताकुचेष्वपि ९६**
**यत्तस्य सप्तधा भिन्नं पपुर्गोदावरीपयः**
**मातंगास्तन्मदव्याजात् सप्तधैवामुचन्निव ९७**
**अथोत्तीर्य स वत्सेशो रेवामुज्जयिनीमगात्**
**प्रविवेश च तां चंडमहासेनपुरस्कृतः ९८**

९३. महेंद्राच्या म्हणजे इंद्राच्या ( किंवा महेंद्र पर्वताच्या राजाच्या ) पराभवाच्या भीतीनें विंध्य पर्वताचें शिखरच जणूं काय धांवत सुटलें आहे अशा हत्तींच्या साहाय्यानें अटवी जिंकून तो राजा दक्षिणदिशेला गेला.

९४. शरत्काल ज्याप्रमाणें मेघांना पांडुर आणि अपगर्जित करतो त्याप्रमाणें तेथें त्यानें पर्वताच्या आश्रयाला राहिलेल्या शत्रूंना फिके आणि बाष्कळ बढाईखोर केलें.

९५. कावेरी त्यानें ओलांडली ती बरीच गर्दी गोंगाट करीत ओलांडली. त्या गर्दीमुळें कावेरीचें पाणी कालुष्य पावलें, त्याप्रमाणेंच चोल राजाची कीर्ति देखील कालुष्य पावली.

९६. त्यानें मुरल लोकांवर कर बसविला. पण त्या कर-पीडन प्रसंगीं त्यांनीं डोकें जर वर काढलें तर तें बिलकुल सहन केलें नाहीं. कांताकुचांनीं डोकें वर काढणें हें कुच-पीडन करणारे कर म्हणजे हात बिलकुल सहन करीत नाहींत त्याप्रमाणेंच हें झालें.

[ मुरल लोक कोण होते हें निश्चित करतां येत नाहीं. मुरला ही एक नदी भवभूतीनें उत्तररामचरितांत तमसा नदीशीं संवाद करतांना दाखविली आहे. ती दाखवितांना एक उत्तरेकडील नदी दक्षिणेकडील नदीशीं बोलत आहे असें दाखविण्याचा त्याचा हेतु असावा. मुरला नदीच्या कांठीं हे लोक असतील व त्यामुळें हें राष्ट्रनाम नदीमूलक असावें असें दिसतें. अंकित लेखांत मुरलांचा उल्लेख येतच आहे. ]

९७. गोदावरीचें सात ठिकाणीं भिन्न झालेलें पाणी त्याचे मातंग म्हणजे माजलेले हत्ती प्याले, तेव्हां ते मदाच्या रूपानेंच जणू काय सात ठिकाणीं टाकते झाले. ( गोदावरीच्या सातहि मुखांचा प्रदेश या राजानें घेतला असा भावार्थ. )

९८. त्यानंतर तो वत्सराज रेवा उतरून उज्जयिनीस गेला आणि चंडमहासेनाचा पुरस्कार घेऊन उज्जयिनींत प्रवेश करिता झाला.

### १६५. उदयनाच्या आक्रमणाचा मार्ग.

१६५. या वर्णनांत आक्रमणाचा मार्ग कवि अगदीं स्पष्ट-पणें सांगत आहे. तो मार्ग जितका स्पष्ट आहे तितकाच तो अर्थगर्भ आहे. कावेरी ओलांडल्यानंतर, आणि चोडांचा पराभव केल्यानंतर वर म्हैसूरच्या मार्गानेंच उत्तरेकडे जावयाचें. तसें केलें असतें तर कर्नाटकांतून महाराष्ट्राकडे जातां आलें असतें; पण तसें न करतां तो पुन्हा समुद्रकांठानेंच परत गोदावरीच्या मुखापर्यंत गेला आणि तेथून तो रेवा उतरून उज्जयिनीस गेला. गोदावरीच्या मुखाकडून उज्जयिनीकडे जावयाचें म्हणजे महाराष्ट्र वगळून गेलें पाहिजे. केवळ महाराष्ट्रच नव्हे तर त्यानें मलय, महाराष्ट्र आणि कर्नाटक हे तिन्ही भाग वगळले असें दिसतें. याचें एक कारण असें असलें पाहिजे कीं येथें बलवान् साम्राज्य किंवा राष्ट्रें असलीं पाहिजेत, किंवा ते अगदीं न वसलेले असले पाहिजेत. पौराणिक काळांपासून जर दक्षिणेंत स्वतंत्र राज्यें होतीं तर उदयनकालीं देखील असावींत हें स्पष्ट आहे. नरसिंहाच्या काळीं जर असंख्य पदाति पुरवूं शकेल इतकें प्रतिष्ठानचें राष्ट्र बलवान् होतें तर त्यावरून उदयनास महाराष्ट्र वगळणेंच अधिक सोइस्कर वाटलें असलें पाहिजे यांत शंका नाहीं. उदयनाचें शौर्य आणि साहस यौगंधरायणाच्या विचारपूर्वकतेनें नियंत्रित असल्यामुळें महाराष्ट्रविजयाची उदयनानें हांव धरली नसावी. सुरतमंजरीच्या कथेवरून असें दिसतें कीं प्रतिष्ठानच्या राजकुलाचें उदाहरण उदयनाच्या आप्तांनीं लग्नाच्या-बाबतींत अधिक स्वातंत्र्य घेण्यासाठीं पुढें केलें आहे. त्यावरून पैठणच्या राज्याची बलाढ्यताच व्यक्त होत आहे.

### १६६. श्वशुरगृह सोडल्यानंतर उदयनाची कामगिरी.

१६६. उदयन उज्जयिनीस सासऱ्याकडे तळ देऊन राहिला. पुढें श्लोक ९९ ते १०२ पर्यंत उदयनाचा श्वशुरगृहनिवास वर्णिला आहे, व त्याच्या पुढें महाराष्ट्राकडे उज्जयिनीहून निघून गेल्यानंतर वळला असेल अशी शंका वाचकास येऊं नये म्हणून त्यानें पुढें काय केलें हेंहि दिलें पाहिजे. त्यानें उज्जयिनी सोडल्यानंतर आणखी महत्त्वाची गोष्ट केली आहे.

**विश्रम्य च निशाः काश्चित् प्रीतो वत्सेश्वरस्ततः**
**अन्वितः श्वाशुरैः सैन्यैः प्रययौ पश्चिमां दिशम्१०३**

**तस्य खड्गलता नूनं प्रतापानलधूमिका**
**यच्चक्रे लाटनारीणाम् उदश्रुकलुषा दृशः १०४**
**असौ मंथितुमंभोधिं मा मामुन्मूलयिष्यति**
**इतीव तद्गजाधूतवनोऽवेपत मंदरः १०५**
**सत्यं स कोऽपि तेजस्वी भास्वदादिविलक्षणः**
**प्रतीच्यामुदयं प्राप प्रकृष्टमपि यज्जयी १०६**
**ततः कुबेरतिलकाम् अलकासंगशंसिनीम्**
**कैलासहाससुभगां आशामभिससार सः १०७**
**सिंधुराजं वशीकृत्य हरिसैन्यैरनुद्रुतः**
**क्षपयामास च म्लेच्छान् राघवो राक्षसानिव१०८**
**तुरुष्कतुरगव्राताः क्षुब्धस्याब्धेरिवोर्मयः**
**तद्गजेंद्रघटा वेलावनेषु दलशो ययुः १०९**
**गृहीतारिकरः श्रीमान् पापस्य पुरुषोत्तमः**
**राहोरिव स चिच्छेद पारसीकपतेः शिरः ११०**

१०३. कांहीं रात्र विसावा घेऊन तुष्ट झालेला वत्सेश्वर नंतर सासऱ्याच्या सैन्यानें युक्त होऊन पश्चिम दिशेप्रत गेला.

१०४. खरोखर त्याची खड्गलता ही प्रतापाग्नीची धूमशिखाच होय; कारण तिनें लाट (गुजराती) स्त्रियांच्या नेत्रांस लाल आणि अश्रुयुक्त केलें.

१०५. त्याच्या गजांनीं वनास हालविलें असतां हा राजा खचित मला उपटून पुन्हा समुद्रमंथन करणार असें समजून, मंदर पर्वत थरथर कांपूं लागला. [ मंदर पर्वताचें त्यानें आक्रमण केलें. गुजराथेच्या पश्चिमेस मंदर पर्वत असल्याचा त्या कवीचा समज असावा. ]

१०६. कोणीतरी प्रभावान् आणि आदिविलक्षण पुरुष पश्चिमकडे उदय पावला आहे आणि तो प्रकृष्टांस (?) जिंकणारा आहे असें लोकांस वाटतें.

१०७. नंतर तो ज्या दिशेकडे गेला ती दिशा (उत्तर कीं वायव्य) कुबेरतिलका, अलकासंगशंसिनी, आणि कैलासहाससुभगा अशी होती. [ येथें दिशेलाच तीन विशेषणें लावण्याचा कवीचा हेतु लक्षांत येत नाहीं. ]

१०८. पुढें सिंधुराजाला वश करून घेतल्यानंतर वानरांचें (हरि) सैन्य घेऊन राक्षसांचा राघवानें नाश केला त्याचप्रमाणें घोड्यांचें (हरि) *सैन्य असलेला अशा त्यानें म्लेच्छांचा पराभव केला.

१०९. क्षुब्ध सागराच्या मोठ्या लाटांप्रमाणें तुर्की घोड्यांचे समूहानें चेतवून दिलेलीं त्याच्या गजेंद्रांचीं गंडस्थलें त्या वेलावनांतील सैन्याच्या प्रत्येक दळांत दिसूं लागलीं.

[ म्हणजे त्याच्या हत्तींनीं मोठा पराक्रम केला ]

११०. पापी राहूचें पुरुषोत्तमानें जसें शिर छेदिलें त्याप्रमाणें शत्रूंकडून करभार घेतला आणि त्यामुळें संपत्तियुक्त झालेल्या त्या (उदयनानें) पारसीकपतीचें शिर तोडलें.

कवीचें वर्णन कवित्वयुक्त असलें तरी देखील महत्त्वाचें ऐतिहासिक सत्य कवीच्या अलंकारांखालीं पूर्णपणें गाडून टाकलें गेलें नाहीं. या युद्धामध्यें उदयनानें जरी इतके विजय मिळविले तरी त्यापाशीं घोडे नव्हते ते त्याला सिंधुराजापासून घ्यावे लागले आणि तरी देखील त्याच्या हत्तींना तुरुष्कांच्या घोड्यांपासून त्रासच झाला आणि शेवटीं राजाला मारून त्यानें लढाईचा शेवट केला अशा प्रकारचें युद्ध यांत वर्णिलें आहे.

## १६७. कविवर्णन का ऐतिहासिक सत्य.

१६७. उदयनाचें दिग्विजयाचें जें वर्णन आहे त्यांत बरेंच ऐतिहासिक सत्य आहे हें त्यांतील अनेक विशेषांवरून लक्षांत येतें. एक तर त्यानें अखिल हिंदुस्थान पादाक्रांत केला असें वर्णन केलें नाहीं. यावरून त्याचे विजय कवीच्या कल्पनाशक्तीनें निर्माण केलेले नसून इतिहासकाराच्या सत्यकथनाच्या दृष्टीनें वर्णिले आहेत. म्हणजे ही दिग्विजयाची कथा वररुचीच्या पूर्वीच्या काळीं इतिहासकाराकडून तयार होऊन कवीकडे आली आहे. उदयनानें गंगथडी घेतली. पूर्व जिंकली. कलिंग जिंकले. चोलमंडल म्हणजे बराचसा कारोमांडेल किनारा जिंकला आणि गोदावरीच्या काठानें उत्तरेस गेला. तेथून तो एकदम रेवा उतरून वर सासऱ्याकडे गेला. आणि तेथून त्यानें गुजराथ घेतली. सिंधुनद ओलांडून पारसीक राजाला ठार केलें. येणेंप्रमाणें वर्णन करतांना महाराष्ट्र आणि मलय देश म्हणजे पश्चिमहिंदुस्तान जिंकल्याचें कवि सांगत नाहीं. म्हणजे कांहीं नियमित भाग जिंकल्याचें वर्णन करीत आहे. उदयन गोदावरी ओलांडून गेला म्हणून जरी हें दिग्विजयवर्णन सांगत आहे तरी ती महाराष्ट्रांतील गोदावरी मुळींच नसून सात फांटे असलेली म्हणजे मुखाजवळील आंध्रांची गोदावरी आहे, म्हणजे त्यानें जें प्रयाण केलें तें गोदावरी ओलांडून छत्तीसगडाकडून उज्जयिनीकडे प्रयाण केलेंसें दिसतें. गोदावरीच्या मुखापासून म्हणजे कोकोनाडा व राजमहेंद्रीपासून उज्जयिनीकडील मार्ग कोणते आहेत याविषयीं थोडेंसें विचार करतां दिसेल कीं या चक्रवर्तीनें

---

* हरिसैन्य याचा अर्थ पुलिंदाचें सैन्य असा कै. वि. ना. बापट यांनीं केला आहे [ कथासरित्सागर, भाग १, पृष्ठ १७४. ] तो आम्ही स्वीकारीत नाहीं.

महाराष्ट्रदेशाला स्पर्श देखील केला नाहीं, व याचें कारण यावेळेस महाराष्ट्र हा प्रबल राजांच्या ताब्यांत होता हेंच असलें पाहिजे हें सांगितलेंच आहे.

### १६८. महाराष्ट्राविषयीं अर्थगर्भ मूकत्व.

१६८. उदयनाच्या दिग्विजयाच्या वर्णनांत महाराष्ट्राविषयीं प्रत्यक्ष माहिती दिली नाहीं असें वाटण्याचा संभव आहे. पण वर्णनाचा अभाव देखील इतिहासदायक आहे.

उदयनाच्या दिग्विजयावरून महाराष्ट्र म्हणजे विदर्भापासून कोंकणापर्यंतचा मुलुख त्याच्या विजयकथेंत आला नाहीं हें स्पष्ट आहे. उल्लेखाच्या अभावाचें स्पष्टीकरण वर दिलेंच आहे. उदयनाच्या काळांतील किंवा त्याच्या अगोदरच्या काळांतील महाराष्ट्रविषयक जे उल्लेख शिल्लक राहिले आहेत त्यांची चर्चा उदयनकालानुषंगानेंच केली पाहिजे.

### १६९. उदयनाच्या दिग्विजयाची ऐतिहासिकता.

१६९. अद्भुत कथांत ज्या पुरुषांचा उल्लेख असतो ते पुरुष ऐतिहासिक असतात काय आणि असल्यास त्यांच्या संबंधानें सांगितलेल्या गोष्टी कितपत ऐतिहासिक असतात याविषयींचा विचार कथासरित्सागरासारख्या ग्रंथाचा उपयोग इतिहासार्थ करतांना किंवा करण्याचें नाकारतांना झाला पाहिजे. बृहत्कथा ज्या शातवाहनांच्या कुलाशीं संबंद्ध आहे तें कुल ऐतिहासिक आहे यांत शंका नाहीं आणि प्राकृत वाङ्मयास उत्तेजन देण्याचें धोरण शातवाहनांचें होतें यांतहि शंका नाहीं. ज्या कथा आद्यकालीन शातवाहनांच्या बऱ्याच नंतरच्या काळांत निश्चितपणें घालतां येतील अशा कथा या संग्रहांत आढळत नाहींत. प्रत्येक महत्त्वाचा ग्रंथ आज आपल्या काळापर्यंत येतांना स्थित्यंतरें पावला आहे त्याप्रमाणें काश्मीरला ज्याचें शोधन आणि संस्कृतीकरण झालें तो ग्रंथ दहा शतकें कोणताहि फेरबदल झाल्याशिवाय राहिला असेल हेंहि शक्य नाहीं. आणि तो काश्मीरमध्यें पुष्कळ फेरबदल पावला अशा तऱ्हेचा पक्ष डॉ. टामस यांनीं ( टॉने याच्या भाषांतराच्या अमेरिकन आवृत्तीची प्रस्तावना पहा ) घेतला आहे; तथापि त्यांनीं फरक कोणते झाले आहेत याविषयीं निश्चित विधान केलें नाहीं. आणि या ग्रंथांत तीन रूपांतरें आपणांस दिसत असून त्यांत तादृश फरक दिसत नाहींत त्याअर्थी त्यांतल्या कथांत शातवाहनीय कालांतील स्वरूप बहुतांशीं शिल्लक राहिलें असावें असें वाटतें.

### १७०. बृहत्कथेंतील कथांच्या उदयनपूर्वतेविषयीं निश्चय

१७०. बृहत्कथेंतील सर्वच कथा नरवाहनदत्त व उदयन यांच्या अगोदरच्या आहेत असें केव्हांही म्हणतां येणार नाहीं, तर उदयनपूर्व, उदयनकालीन आणि उदयनोत्तर या तिन्ही कालांच्या कथा बृहत्कथेंत शिरल्या आहेत. त्यांपैकीं महाराष्ट्राविषयींच्या कथा निराळ्या केल्या पाहिजेत आणि कोणत्या उत्तरकालीन कथा या कथासरित्सागरांत कालविपर्यास करून शिरल्या आहेत आणि कोणत्या कथा कालविपर्यास न करतां शिरल्या आहेत याचा हिशोब तर आपणांस अत्यंत अवश्य आहे. हा हिशोब घेतांना कथासरित्सागराच्या एकंदर ऐतिहासिक उपयोगाविषयीं थोडेंसें तरी विवेचन करावें लागणारच, तर एकंदर कथासरित्सागर व त्यांतील कथांचें ऐतिहासिकाच्या दृष्टीनें स्थूल परीक्षण हाच विवेचनाचा विषय करणें आपणांस अवश्य आहे. संपूर्ण परीक्षण प्रथमच देणें उपयोगी नाहीं. संशोधनांत नेहमीं असें होतें कीं अनेक पूर्वसंस्कार वाचकांच्या मनावर असल्यामुळें जेव्हां अनेक गोष्टी नव्यानेंच सांगावयाच्या असतील तेव्हां प्रत्येक पूर्वसंस्कारास क्रमाक्रमानेंच दूर करावें लागतें. यासाठीं कथासरित्सागराचें अत्यंत स्थूल निरीक्षण मध्येंच घुसडणें आपणांस अवश्य होत आहे. त्या निरीक्षणानंतर उदयनविषयक स्वतंत्र चर्चा करावी लागेल. त्यानंतर उदयनाच्या कालनिश्चयाप्रमाणें मागें उल्लेखिलेल्या प्रतिष्ठान येथील नरसिंह आणि त्रिविक्रमसेन या भूपतींचा काल पुढें मागें न्यावा लागेल. उदयनाच्या कालनिश्चयांतच त्याचें दारयवहू व इराणी पौराणिक राजे यांच्याशीं पौर्वापर्य चर्चावें लागेलच. तें करतांना दारयवहूच्या अगोदर इराणी लोकांनीं भारतभूभाग घेतला होता काय हें ठरवावें लागेल.

## प्रकरण २१ वें.

# उदयनकालीन लोकस्थिति, औदयन राजव्यवहार आणि तद्विषयक विचार.

### १७१. बृहत्कथेंतील कथांचे भिन्न काल.

१७१. बृहत्कथेंत तीन कालांच्या कथा एकत्रित झाल्या आहेत. पहिला काल म्हणजे उदयन व नरवाहन यांना जुन्या म्हणून सांगितलेल्या कथांच्या उत्पत्तीचा काल; दुसरा म्हटला म्हणजे औदयन कथांच्या उत्पत्तीचा काल. आणि तिसरा म्हटला म्हणजे गुणाढ्य आणि वररुचि यांचा काल. हे तिन्ही काल एकमेकांपासून अनेक शतकांनीं दूर आहेत. उदयनाचा काल हा बुद्धपूर्व दोन अडीचशें वर्षें आहे हें माझें अनुमान बरोबर असल्यास बृहत्कथासंग्राहक वररुचीचा काल व उदयनकाल याच्या मध्यें निदान चारपांचशें वर्षांचें अंतर आहे.

बृहत्कथेंत आलेल्या कथा सामान्यतः बुद्धपूर्व ३००।४०० वर्षांपूर्वीच्या काळाच्या दर्शक आहेत. त्यापैकीं बहुतेक कथा उदयनपूर्वकालीन आहेत हें बृहत्कथेंतच व्यक्त केलेलें मत अस्वीकारार्ह वाटत नाहीं. जुन्या कथांचें आश्रयस्थान पुराणें होणें हें इतःपर शक्य नव्हतें. अद्भुतरसाच्या पोषणासाठीं देवदानवांकडे न जातां अन्य मार्गांकडे लोक जाऊं लागले होते ही गोष्ट स्पष्टच आहे. कथासरित्सागरांत व्यक्त होणारा भारतीयांचा आयुष्यक्रम बुद्धकथांनीं व्यक्त होणाऱ्या आयुष्यक्रमापेक्षां सुमारें दोन तीनशें वर्षांनीं जुना ठरेल. बौद्धकाल आणि अधिसीमकाल यांच्या मधल्या काळाची स्थिति समजण्यास या उदयनास सांगितलेल्या बृहत्कथासंग्राहित जुन्या कथा उपयोगी पडतील यांत शंका नाहीं. बृहत्कथेंत वर्णित झालेल्या प्रदेशाचें क्षेत्र बौद्ध कथांच्या क्षेत्रापेक्षां अधिक व्यापक आहे आणि त्यावरून प्राचीन हिंदूंनीं बौद्ध संप्रदायाच्या उगमापूर्वीच आपली संस्कृति अतिभारतीय केली होती, आणि बौद्ध संप्रदायाचीं पावलें अरण्यांत नवीन वाट पाडणारीं नसून पूर्वीच्याच पावलांनीं पाडलेल्या वाटेवरून गेलीं असें दिसून येईल. या तीन कालांपैकीं उदयनकाल हाच आपण वर्णनाचा विषय करूं, आणि त्याच्याच स्पष्टीकरणासाठीं प्रसंगानुसार पूर्वोत्तर कालांकडे दृष्टि फिरवूं.

### १७२. सामाजिक भावनांच्या ज्ञानाचें इतिहासशास्त्रीय महत्व.

१७२. लोकांमध्यें कोणकोणत्या भावनांनीं कार्यास प्रेरणा होत होती यासंबंधीं विचाराचें ज्ञान असल्याशिवाय त्या काळाचा आयुष्यक्रम चांगल्या तऱ्हेनें समजणार नाहीं. सामान्य जन द्रव्याच्या आणि शारीरिक सुखांच्या आशेनें प्रेरित होत असतो. आपलें कांहीं तरी कार्य आहे तें पुरें करावें इत्यादि विचारानें समाजांतील अधिक ध्येयवादी वर्ग प्रेरित होत असतो. या दुसऱ्या प्रकारच्या वर्गाचे विचार आणि कार्यें जनतेच्या एकंदर गतीची दिशा ठरवीत असतात. त्यामुळें त्या ध्येयवादी वर्गांच्या ध्येयांचें ज्ञान कालज्ञान करून घेऊं इच्छिणारास अवश्य आहे. ब्राह्मणादि वर्ग आपली विद्या वाढविणें व छात्रांस विद्या सुलभ करण्यासाठीं साहित्य निर्माण करणें वगैरे क्रिया करीत आपल्या कर्तव्यांत रत होतो. हा वर्ग विद्येस गति देतो त्याप्रमाणेंच धार्मिक संप्रदायदेखील देतात. संप्रदाय स्थापन झाल्यानंतर संप्रदाय संवर्धनांचें कार्य भिक्षु किंवा आचार्य करितात. त्याचें सातत्य चालू रहातें. विद्येचा आणि संप्रदायांचा इतिहास येणेंप्रमाणें सामाजिक गतीचा इतिहास होतो. वैश्यजन मालाची नेआण करणें, दूरदेशीं जाऊन संपत्ति मिळवून आणणें अशा प्रकारच्या क्रिया करतात. पैसे मिळविण्यासाठीं वैश्यजन काय करीत होता आणि आपले पैसे कसे खर्च करीत होता हें पाहिलें म्हणजे देखील सामाजिक गतीची आणखी एक दिशा समजते. अशा कालीं राजे लोकांचें ध्येय व कर्तव्य काय होतें हें जाणलें पाहिजे. जनतेच्या हितासाठीं आपल्या ठायीं केंद्रीभूत झालेली शक्ति कशी वापरावी यासंबंधानें समाजांत ज्या कल्पना असतात त्याच राजधर्म या नांवानें व्यक्त होतात. हिंदु राजांच्या कल्पना बऱ्याच उच्च प्रकारच्या होत्या असें दिसतें. त्या एकाएकीं उत्पन्न न होतां क्रमानेंच वृद्धिंगत झाल्या असल्या पाहिजेत आणि त्यामुळें त्याचा देखील इतिहास देणें अवश्य होतें. कालांतील राजकीय ध्येयांच्या अवगमनासाठीं कोणत्या भावनांनीं राजे व त्यांचे मुत्सद्दी प्रेरित होत होते व कोणत्या विचारांनीं कृती होत असावी हें आपणांस पाहिलें पाहिजे. कथाविषय जो उदयन त्याच्या बाबतींत असें दिसत आहे कीं मुत्सद्दीय मुख्य कार्यकर्ते आहेत व राजा त्यांचें उपकरण आहे.

### १७३. धार्मिक संप्रदाय आणि राजसत्ता.

१७३. जेव्हां धार्मिक संप्रदाय उत्पन्न झाले आणि त्यांचा राजसत्तेशीं निकट संबंध आला किंबहुना राजसत्ताच आपण

धार्मिक संप्रदायाच्या कार्याचें एक उपांग आहोंत असें मानूं लागली. असे प्रसंग पाश्चात्य जगाच्या इतिहासांत उत्पन्न झाले आहेत. संप्रदायप्रसाराचाच हेतू मनांत ठेवून दोन्ही रोमन पादशाहांनीं यूरोपास ख्रिस्ती बनविलें आणि त्याच्या नंतरच्या कालीं जगाचें ख्रिस्तीकरण करण्याचें कार्य प्रथम स्पेन व पोर्तुगाल यांनीं व नंतर इतर सर्वत्र ख्रिस्ती राज्यें यांनीं चालू ठेविलें. महंमदाच्या संप्रदायामुळें उत्पन्न झालेल्या खलीफतींनीं आपलें कर्तव्य तेंच आहे असें आपल्या मनापुढें ठेविलें होतें. संप्रदायशक्तीचा विकास हिंदुस्तानांत कां झाला नाहीं हें समजण्यास प्राचीन राजकारण समजून घेतलें पाहिजे. प्राचीन हिंदू राजांच्या मनांत त्यांस कांहीं प्रेरणा करणारी व धैर्य उत्पन्न करणारी व मोठमोठ्या कार्यास शक्ती देणारी भावना होती काय ? असा प्रश्न उत्पन्न होतो. त्या प्रश्नाचें उत्तर अस्तित्वपक्षीं देणें कठीण नाहीं. हिंदुस्तानामध्यें राज्यें अनेक होतीं व सर्व राज्यांना लागू पडेल असा राजधर्म निर्माण झाला होता. राजे लोकांनीं एकमेकांशीं कसें वागावें व राजदूतांस निर्भयता किती असावी यासंबंधीं स्पष्ट नियम आहेत, व राजसत्तेचें अंतिमध्येय सुद्धां स्थापन झालें होतें व तें ध्येय म्हटलें म्हणजे सर्व पृथ्वीवर एकसत्ता असावी हें होय. विशिष्ट धर्माकरितां म्हणजे देवाकरितां अगर संप्रदायाकरितां राजसत्तेचा उपयोग व्हावा हा खुळेपणा आहे. हें तत्त्व जगास अजून पूर्णपणें समजलें नाहीं, पण तें तत्त्व प्राचीन भारतीयांस उत्तम तऱ्हेनें समजत होतें. सम्राटानें जर सर्व लोकांचें सम्राट म्हणून घ्यावयाचें आहे तर विशिष्ट देवतेस अगर संप्रदायास दुखवून कसें चालेल. राजानें प्रजेचें जर अनुरंजन करावयाचें आहे तर प्रजेच्या धर्माची विटंबना तरी कशी करावयाची ? अर्थात् जो सम्राट असेल त्यानें सर्व दैवतांचा व सर्व आचार्यांचा सत्कार केला पाहिजे. याप्रमाणें जें मत त्या कालांत स्थापन झालें होतें तें दोन संप्रदायांच्या मोहपाशांनीं बद्ध झालेल्या यूरोपीयन व महंमदी राष्ट्रांस अजून शिकावयाचेंच आहे. या बाबतींत हिंदुस्थानानें जी आघाडी मारेली तिची प्राचीनता ब्राह्मणकालापर्यंत जाऊन पोंचते, हें "आविक्षितस्यकामप्रेर्विश्वेदेवाःसभासदः" या वाक्याचा उच्चार करून मार्गें दाखविलें आहेच.

ज्याप्रमाणें सर्व देवतांस स्वीकारावयाचें तें जगज्जेतृत्वाचा अंतिम परिणाम म्हणून वर्णिला आहे, मरुत्त राजा जगज्जेता म्हणून दाखविला गेला आहे, आणि जगच्छासनाचें ध्येय त्याच काळांत स्थापन झालें आहे; सर्व जग एका छत्राखालीं आणावें व सर्व प्रकारच्या देवाधर्मांचा सत्कार करावा आणि प्रत्येक मनुष्यास आपआपल्या वर्गाचें कर्तव्यकर्म करावयास उत्तेजन द्यावें, असें केल्यानेंच प्रत्येक व्यक्ती अत्यंत कार्यक्षम होईल, अशा तऱ्हेचें जें सामाजिक ध्येय वैदिक कालाच्या उत्तर भागांत तयार झालें तेंच ध्येय बुद्ध कालांत सुद्धां अस्तित्वांत होतें. आणि उदयन कालांत तें ध्येय चालतें बोलतें होतें असें दिसत आहे.

त्यावेळेस राष्ट्रीयत्वाचें ध्येय अस्तित्वांत होतें काय ? हा प्रश्न उत्पन्न होतो. तर याविषयीं असेंच स्पष्टीकरण केलें पाहिजे कीं तक्षशिलेपासून मणिपुरापर्यंत व दक्षिणेकडे पैठणापर्यंत लोकसमाज अत्यंत सदृश होता, व राज्येंही त्या मानानें लहान होतीं, त्यामुळें राष्ट्रीयत्वाची भावना म्हणजे सदृश लोक एका सत्तेखालीं असावेत ही भावना असणें असा जर अर्थ असेल तर राजसत्तेचा आणि लोकसादृश्याचा कांहींएक संबंध नव्हता आणि लोकसादृश्य अगोदरच असल्यामुळें राजसत्ता ही अल्पक्षेत्रीय भावना होती व आसमुद्रक्षितीशता हाच त्या राजांच्या भावनेचा स्वाभाविक विकास होता, व या इच्छेनें सर्व मोठेमोठे राजे प्रेरित झाले होते असें दिसतें.

### १७४. मुत्सद्दीवर्ग आणि त्यांचें नीतिशास्त्र.

१७४. मरुत्तासारखे चक्रवर्ती राजे यांनीं आपल्या राज्याच्या विस्ताराकरितां काय केलें आणि आपलें राज्य कसें काय टिकविण्याचा प्रयत्न केला इत्यादि गोष्टींविषयीं आपणास माहिती नाहीं, तथापि उदयनकालीन महत्त्वाकांक्षी 'वत्साचें मंत्रिमंडळ' आपल्या मनांत काय भावना ठेवीत होतें याचा पुरावा आपल्यापाशीं शिल्लक आहे. वत्सांचें राज्य मोठें होऊन वत्सराजा पुढें चक्रवर्ती कसा बनला याचा इतिहास बृहत्कथा सांगूं पहात आहे, आणि त्या इतिहासांत कार्यकर्तृत्वाचें थोर श्रेय यौगन्धरायणास देत आहे. राजमंत्र्यांनीं आपल्या स्वामीचें हित एकसारखें वाढवून त्याला चक्रवर्ती बनविणें यांतच मंत्रिकौशल्याची कृतार्थता दाखविली आहे. राजे लोक स्वयंस्फूर्तीनें गोष्टी करतील, तथापि ते जेव्हां स्वयंस्फूर्तीनें त्या करणार नाहींत तेव्हां ती जबाबदारी मंत्र्यांनीं पत्करली पाहिजे. अशा तऱ्हेचे विचार यौगन्धरायणाच्या तोंडीं घातले आहेत. यौगन्धरायण आपल्या सहकारी मंत्र्यापाशीं म्हणतो* "मित्रा, हा राजा पांडवाच्या वंशांत उत्पन्न झाला असून

*पांडवान्वयजातोऽयम् वत्सेशोऽस्य च मेदिनी
कुलक्रमागताकृत्स्ना, पुरं च गजसाव्हयम्
त सर्वं मजिगीषेण त्यक्तमेनेन भूभृता,
इहैव चास्य संजातं राजमेकत्र मंडले
स्त्रीमद्यमृगयासक्तो निश्चितोह्येषतिष्ठति

ही सर्व पृथ्वी यास कुलक्रमप्राप्त आहे. याची मूळ राजधानी हस्तिनापुर पण याला विजयाची मुळींच इच्छा नसल्यामुळें त्या सर्वांचा त्याग केला आहे. त्यामुळें येथेंच काय तें याचें राज्य राहिलें आहे. आमच्यावर राज्यकारभार टाकून हा केवळ व्यसनासक्त होऊन राहिला आहे. यास्तव याची सर्व पृथ्वी पुनः याच्या अधिकारांत असावी असा यत्न आपणांस केला पाहिजे. आळस करितां कामा नये. हें महत् कार्य केल्यासच आम्हीं योग्य प्रभुभक्ति केली असें होईल" असें बोलून यौगन्धरायणानें कांहींएक संकल्प रुम्णवानापुढें मांडीत आहे. रुम्णवान त्या संकल्पाच्या स्वीकाराविषयीं साशंक वृत्ति दाखवीत असतां यौगन्धरायण त्यास पुढें म्हणतो "मित्रा, उद्योगावांचून इष्टसिद्धी होणार नाहीं. उद्योगच न केल्यास राजा व्यसनासक्त असल्यामुळें आपले सर्व मनोरथ विफल होतील. आम्हीं आपल्या चातुर्यानें राजाची उन्नति न केली तर 'हे महाबुद्धिवान मंत्री आहेत, अशी जी ख्याती झाली आहे ती व्यर्थ ठरेल. राजा जेव्हां स्वतः चतुर, सामर्थ्यवान् व जितेंद्रिय असतो, तेव्हां त्याचे मंत्री केवळ त्याच्या बुद्धीचीं उपकरणें होऊन राहतात; त्यामुळें राजकार्य सिद्ध किंवा असिद्ध झालें तरी सर्वांची स्तुती किंवा निंदा होत नाहीं; पण राजा निष्काळजी, व्यसनासक्त व अजितेंद्रिय झाल्यामुळें सर्व राज्यकारभार मंत्र्यावरच जेव्हां येऊन पडतो तेव्हां त्यांची बुद्धीच कार्यसिद्धीचें कारण होऊन राहाते; त्यामुळें अशाप्रसंगीं ते जर निरुत्साह व निष्प्रयत्न झाले तर राज्यलक्ष्मीचा नाश झाल्यावांचून कसा राहील?" ही यौगंधरायणाची वृत्ति जगाच्या इतिहासाला आदर्शभूत अजून आहे असें म्हटलें तरी चालेल.

---

**अस्मासु राज्यचिंताच सर्वानेन समर्पिता**
**तदस्माभिः स्वबुद्धैव तथा कार्यं यथैव तत्**
**समग्रपृथिवी राज्यं प्राप्नोत्येव क्रमागतम्**
**एवं कृते हि भक्तिश्च मंत्रिता च कृता भवेत्**
**नान्यथोद्योगसिद्धिस्या दनुद्योगे च निश्चितम्**
**राजनिर्व्यसीनन्येदत् नश्मेदपियथास्थितम्**
**लब्धापिमंत्रिताख्याति, अस्माकंचान्यथाभवेत्**
**स्वामिसंभावनायाश्च भवेमव्यभिचारिणः**
**स्वायत्तसिद्धे राज्ञो हि प्रज्ञोपकरणं मता**
**सचिवः को भवेत्तेषां कृते वाप्यथवा कृते**
**सचिवायत्तसिद्धेस्तु तत्प्रज्ञावार्थसाधनम्**
**त एव चेन्निसत्साहाः श्रियोदत्तोजलांजलिः**

लावाणक लंबक प्रथम तरंग, श्लोक ६-१०

यौगन्धरायणाचें नांव भारतीय वाङ्मयांत मोठें झालें आहे आणि आदर्शमंत्री अशादृष्टीनें त्याची संभावना होते. उदयन, वासवदत्ता, यौगन्धरायण इत्यादि मंडळी प्राकृत नाटकांतून अनेकदां आली असती. पण संस्कृत नाटकांतून यांची लोकप्रियता भासाच्या काळापासून रत्नावलीकार श्रीहर्षाच्या कालापर्यंत आहे. श्रीहर्ष स्वतः "लोके हारिच वत्सराजचरितं" असें त्या चरित्राविषयीं सांगत आहे. यौगन्धरायण याचें तत्त्वज्ञान व त्याची कृति त्या वेळच्या मंत्रिवर्गांमध्यें आदर्शभूत समजली जात होती यांत शंका नाहीं. जी राजनीति चाणक्याच्या नांवानें उत्तरकालीं प्रसिद्ध झाली तिची यौगंधरायणीय नीति ही आरंभरूप होती असेंच कोणासहि वाटेल.

### १७५. मंत्रिपदाचें स्थैर्य आणि त्याचा राजनीतीवर परिणाम.

१७५. यौगन्धरायणानें ज्या खोल मसलती मोठ्या धैर्यानें केल्या तितक्या खोल मसलती करण्याचें साहस देखील फारच थोडक्यांना शक्य होतें. त्याला तरी शक्य झालें त्याचें कारण रुम्णवानाला मंत्रिपद वंशपरंपरेनें मिळालें होतें आणि त्यामुळें आपल्याच राजाचें वैभव वाढवून आपण मोठें झालें पाहिजे हाच त्याला स्वाभाविक उपक्रम उत्पन्न झाला होता आणि त्याचप्रमाणें त्याचा राजाशीं लहानपणापासून निकट संबंध असल्यामुळें त्याची राजभक्ती संशयातीत आणि त्यामुळें त्याचें पद अत्यंत स्थिर होतें हें होय. राजपुत्र आणि मंत्रिपुत्र बरोबरच वाढले खेळले होते, आणि त्यामुळें एकमेकांवर एकमेकांचा विश्वास होता. संयुक्तकर्तृत्वाची भावना या परिस्थितींत विकसित होणें कठीण नाहीं. आणि इतिहासांत नांव करण्याची क्रिया आपणांस बरोबरच केली पाहिजे अशी भावना एखाद्याला उत्पन्न झाली तर ती कांहीं अंशीं इतरांत देखील उत्पन्न झाली असावी. जेव्हां प्रधानास आपलें आसन स्थिर राहील अशी खातरी असेल तेव्हांच त्याला राजहितासाठीं मोठमोठ्या योजना अंगावर घेणें शक्य होतें, एरव्हीं होत नाहीं. यौगन्धरायणास राजाच्या मनाविरुद्ध उघडपणें न जातां प्रच्छन्नपणें राजाच्या इच्छेविरुद्ध कारवाई करतांना दाखविलें आहे आणि या सर्व गोष्टी तो राज्याच्या हिताकरितां करीत आहे असें दाखविलें आहे. राजाचें राजपद राजा व्यसनाधीन असला तरी कायम ठेवून राज्याचा उत्कर्ष साधतां येतो आणि मंत्र्याच्या ठायीं महत्त्वाकांक्षा असली तर ती त्यास पुरी करून घेतां येते असें एकंदर उदयनकथेचें धोरण आहे. राज्यविषयक नीति स्वतंत्रपणें हिंदुस्थानांत प्रस्थापित झाली आहे ती अशी कीं,

राजा कसाही असो, त्याला कायम ठेवावें व महत्वाकांक्षी माणसानें राजाचें मुख्य मंत्रिपद मिळविण्याचा प्रयत्न करावा व त्याला अनेक प्रकारानें खूष राखून आपलें पद टिकवावें व ज्या ज्या राजकीय महत्वाकांक्षा असतील त्या मंत्रिपद उपयुक्त करून साध्य कराव्यात. यौगन्धरायणानें येणेंप्रमाणेंच केलें आहे. आपला राजा शूर पण व्यसनी आहे. आपल्या राजाला पश्चिमेकडे व दक्षिणेकडे बलाढ्य शत्रू उत्पन्न होण्याचा संभव आहे तर आपल्यापेक्षां बलाढ्य राजे आहेत त्यांच्याशीं म्हणजे अवंती व मगध येथील राजे यांचें विवाहांनीं सख्य करून घेऊन दिग्विजयाचा संकल्प अंगिकारावा. या तऱ्हेच्या संकल्पाचें एकंदर चित्र 'उदयन' कथेंत सविस्तर मांडलें आहे.

**१७६. राजकीय अंतिम ध्येय आणि त्यांनीं प्रेरित झाल्यामुळें दुसऱ्या गोष्टींची उपेक्षा.**

१७६. देशांमध्यें ज्या राजकीय भावना होत्या त्यांमध्यें मुख्य भावना अखिल पृथ्वीच्या जयाची होती, आणि तीच भावना साध्य करण्याची क्रिया बलाढ्य राजाचे मंत्री किंवा सामान्य राजाचे महत्वाकांक्षी मंत्री बाळगीत होते यांस जसे यौगन्धरायणासारख्या कथांचे पुरावे आहेत तसेच ताम्रपटांतील विषयांचे आहेत.

दिग्विजय हें योग्य ध्येय आहे असें राजापुढें मांडलें गेलें तर त्यापासून युद्धास प्रवृत्ति जरी होत असली तरी त्यानें राजकारणांत प्रामाणिकपणा वाढतो. खोटीं निमित्तें उत्पन्न करणें कमी अवश्य होतें.

**१७७. सामंतपद्धतीचें संरक्षण आणि त्यास कारण होणारी चातुर्वर्ण्यविषयक कल्पना.**

१७७. दिग्विजयाची भावना सर्वच राज्यांत जिवंत ठेविली गेली होती; तथापि राजमंडळें जिंकून राजांना सामंत बनवावें एवढीच प्रवृत्ति दिसे. राज्यें जिंकून तेथें आपला सुभेदार नेमावा आणि राजकुलें नष्ट करावींत अशा तऱ्हेचे विचार अगर प्रवृत्ति दिसत नाहीं; याचें कारण कांहीं अंशीं चातुर्वण्याचीच भावना असावी. राजकुलास नमविणें हें योग्य होतें; त्यांस सम्राटानें आपल्या सेवेस लावणें यांतसुद्धां कांहीं गैर नव्हतें, व राजघराण्यांतील मुली आपल्या जनानखान्यांत आणून ठेवणें ही गोष्ट देखील मान्य होती; तथापि चातुर्वर्ण्यविषयक भावना असल्यामुळें अभिषिक्त राजकुलें नष्ट करण्यास एक तऱ्हेची दिक्कत वाटत असावी असें दिसतें. चातुर्वर्ण्यविषयक भावनांचा इतका पगडा पडलेला दिसतो कीं मोठमोठ्या अक्षत्रिय सम्राटांस क्षत्रियपद मिळविणें व इतर क्षत्रिय समजल्या जाणाऱ्या राज्यांच्या मुली मिळविणें सोपें नव्हतें. यामुळें यावेळचे दिग्विजय आणि इराणशीं संबंध आल्यानंतर झालेले विजय यांचें स्वरूप भिन्न होतें. इराणची क्षत्रपी पद्धत म्हणजे पूर्वीचें राजकुल काढून टाकून तेथें आपला गव्हर्नर नेमण्याची पद्धत सुरू झाल्यानंतर ती प्रथम नंदांनीं आणि नंतर मौर्यांनें स्वीकारली. तथापि त्या पद्धतीचा प्रारंभ देखील बुद्धपूर्वकालांत दिसत नाहीं; पूर्वींच्या राजकूटांतील दुसरा कोणीहि पुरुष तेथें अभिषिक्त करावा व त्यांस आपल्या राजधानींत आणून ठेवावें अशा तऱ्हेचीच पद्धती दृष्टीस पडते. जित राजांचें आज्ञाधारकत्व कायम ठेविण्यासाठीं अनेक पद्धति अवलंबिल्या जात होत्या. कधीं कधीं राजधानींत सामंत म्हणून राहणाऱ्या पण स्वतःचें राज्य असलेल्या राजांस साम्राज्यांत नोकरी देण्यांत येई. अशा तऱ्हेनें मोठें साम्राज्य निर्माण करण्याचे प्रयत्न जुनीं राज्यें कायम राखण्याच्या तत्त्वाशीं म्हणजे चातुर्वर्ण्य तत्त्वाशीं सुसंगत करण्याचा प्रयत्न चालू होता. मानव धर्मशास्त्राचा उपदेश जुनीं राजकुलें राखून जितराज्याच्या भाऊबंदापैकीं कोणास तरी राज्य द्यावें असाच आहे. त्यावेळच्या वैभवशाली नगरींत यामुळें दुसऱ्या ठिकाणचे राजे व राजपुत्र येऊन राहात असत, आणि त्या नगरीस शोभा आणीत असत. अन्य ठिकाणचे राजे व राजपुत्र यांनीं मुख्य राजधानी भरली होती याची आठवण अनेक कवी देत आहेत आणि नष्ट राज्य झालेल्या राजधानींचें वर्णन करणारे कवी देखीलः—

**"सा रम्या नगरी महान् स नृपतिः सामन्तचक्रं च तत् । पार्श्वे तस्य च सा विदग्धपरिषद् ताश्चंद्रबिंबाननाः । उन्मत्तः स च राजपुत्रनिवहस् ते बंदिनस् ताः कथाः । सर्वं यस्य वशाद् अगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः"** ॥

या प्रकारचे श्लोक लिहून प्राचीन कालची सामान्य राजधानी कशी होती याविषयींची आपली आठवण संरक्षून ठेवीत आहेत. साम्राज्याधिकार वाढवितांना कांहीं राष्ट्रें मित्रत्वांत ठेवून इतर राष्ट्रांवर झडप घालावयाची आणि मित्रराष्ट्रांतील राजपुत्र आपल्या विस्तारलेल्या राष्ट्रांत नोकरी देऊन कबजांत आणावयाचे या तऱ्हेचे प्रकार देखील यौगन्धरायणानें केले किंवा करविले आहेत. आपल्या राज्याच्या बरोबरीचा दर्जा असलेल्या आपल्या अवंतीच्या राजाचा गोपालक या राजपुत्रास प्रथम विश्वासांतील मंत्र्याप्रमाणें वागवून पुढें त्यास जित राज्यावर अधिकार कायम ठेविण्यासाठीं सेनापति म्हणून नेमिलें आहे.

### १७८. राजे लोकांतील भावनांच्या ज्ञानाचें महत्त्व.

१७८. या प्राचीन कालच्या लोकस्थितीचें अवगमन करण्यासाठीं लोकांच्या ज्या भावनांचें ज्ञान करून घेतलें पाहिजे त्यांत अर्थात् राजे लोकांच्या भावनांना मोठें महत्त्व आहे. राजे लोकांना आपल्या सार्वजनिक कर्तव्यासाठीं वैयक्तिक आवडनिवड आणि रागद्वेष हीं बाजूला कितपत ठेवावीं लागत असत याचें स्पष्टीकरण पाहिजे. तसेंच दोन राजांमधील व्यवहार ठरले जात असतां त्यांचे कौटुंबिक व्यवहार आणि राजव्यवहार यांमध्यें द्वैत केव्हां व कसें उत्पन्न होई आणि उत्पन्न झालें म्हणजे तो प्रश्न राजे लोकांच्या काल्पनिक मानापमानासंबंधाच्या विचारानें सोडविला जाई किंवा प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें सोडविला जाई याविषयीं प्राचीन कालाच्या कथा अत्यंत उपयोगी होत. त्या प्रकारच्या कथा त्या विशिष्ट कालांतील व परिस्थितींतील लोकांची मानसिक स्थिति दाखवितात. त्या कथा वैयक्तिक व्यक्तीच्या बाबतींत खऱ्या असोत अगर नसोत, त्या कथा त्या इतिहासदर्शक व कांहीं अंशीं इतिहासनिर्णायक होत्या, त्या त्या वेळच्या राजपुत्रांच्या शिक्षणाचा भाग होत्या आणि त्यांच्या मनःप्रवृत्तीच्या निर्णायक होत असत हें खास. या प्रकारच्या कथांमधील कालस्थलविषयक उल्लेख किंवा कुलविषयक उल्लेख दुय्यम असून तत्त्व तेवढें नीतिशास्त्रवेत्त्यांस महत्त्वाचें असे. तथापि ऐतिहासिकांस ते कालस्थलविषयक उल्लेखच महत्त्वाचे होत यांत शंका नाहीं. यासाठीं त्या कालच्या कथांचें अवलोकन अवश्य आहे. विशेषतः कांहीं प्रकार नष्ट झाल्यामुळेंच ते प्रकार चालू असतां लोकांच्या भावनांचे खेळ कसे काय होत होते याविषयीं आपणांस जिज्ञासा असल्यास ते समजण्यास नष्ट झालेल्या व्यवहारपद्धतींचें वाङ्मय उपयुक्त होतें.

### १७८. अ. राजे लोकांचीं लग्नें व त्यांचे कौटुंबिक व्यवहार.

१७८ अ. प्राचीन राजकुलांचीं लग्नें जुळवितांना ज्या तऱ्हेच्या भावना राजस्त्रियांत वागत असतील त्या आजच्या समाजास तरी बऱ्याच अंशीं अपरिचित आहेत. प्राचीन काळच्या राजकुळांत असलेल्या भावनांचा विचार केल्याशिवाय वासवदत्ता आपल्या नवऱ्याला दुसरी नोवरी मिळावी म्हणून होणाऱ्या कटामध्यें सामील कशी झाली हें समजणार नाहीं, त्याचप्रमाणें राक्षसविवाह पसंत करणाऱ्या स्त्रिया आपल्यामुळें बापामध्यें आणि नवऱ्यामध्यें होणाऱ्या युद्धाची जबाबदारी कशी घेत असत हें समजणार नाहीं. त्या कालांतील वस्तुस्थिति समजण्यासाठीं जुन्या कथांच्या वाचकांनीं बरीच सावधगिरी बाळगली पाहिजे. जेव्हां कथा अद्भुतरसांत बुडवून काढल्याचा संशय येईल तेव्हां अद्भुत रस धुवून टाकून कथांचें खरें स्वरूप लक्षांत घेतलें पाहिजे. उपदेशपर नीतिकथांसंबंधानें तर विशेष जपलें पाहिजे. ही जपणूक इतिहासज्ञानासाठीं त्याचप्रमाणें वाङ्मयाच्या मर्मज्ञतेसाठीं अवश्य आहे. पातिव्रत्याचे गोडवे गावयाचा आणि उपदेशपरच वाङ्मय लिहिण्याचा प्रसंग येणाऱ्या त्या कवींना प्रत्यक्ष वस्तुस्थिति समोर काय दिसत होती हें समजल्याशिवाय त्या कवींच्या लेखनाचें महत्त्व किंवा मर्म देखील समजणार नाहीं; यासाठीं जेव्हां उपदेशपर कथा किंवा आख्यानें दृष्टीस पडतील तेव्हां विशिष्ट तऱ्हेचा परिणाम तयार करण्यासाठीं कथा तयार केल्या आहेत किंवा अस्तित्त्वांत असलेली एखादी कथाच संपादकीय मखलाशी करून उपदेशासाठीं वापरली जात आहे हें पाहून आणि ती मखलाशी धुवून त्यांचा समाजविषयक ऐतिहासिक सत्य अजमावण्याकडे उपयोग केला पाहिजे.

### १७८. आ. राजाच्या हेतूचें निगूहन.

१७८ आ. उदयनासंबंधाच्या कथांमध्यें कवीची अगर संपादकीय मखलाशी बरीच दृष्टीस पडते, आणि यासाठीं वरवरचा अर्थ घेण्यांत मतलब नाहीं. मानापमानासंबंधाचीं तशींच प्रेमासंबंधाचीं विधानें दृष्टीस पडलीं म्हणजे सांगितलें काय आहे आणि खरें काय आहे असे दोन प्रश्न विचारणें अवश्य होतें.

उदयनाच्या काळीं कांहीं बाबतींत मानापमानाच्या कल्पना बऱ्याच नाजूक होत्या व आपल्या पिढीस त्या अपमानाच्या कल्पनांशीं सहानुभूति करतां येत नाहीं. वासवदत्तेशीं आपला विवाह व्हावा असें वत्सराजास वाटत होतें आणि वत्सराजाशीं आपल्या कन्येचा विवाह व्हावा असें अवंतीच्या चंडमहासेनासहि वाटत होतें, तेव्हां आपल्या मुलीला गायन शिकविण्याचें आपण करावें अशा तऱ्हेचा निरोप गायनपटु उदयनास अपमानकारक वाटला, आणि तुम्हीच आपल्या कन्येस गायन शिकण्यासाठीं आमच्याकडे पाठवावें असें उदयनाकडून उत्तर गेलें. तें वर्णन करतांना उदयनास राग आला आहे असें कवीनें वर्णन केलें आहे; तथापि राग नसून "अविश्वास" वाटत होता आणि तेवढ्यामुळेंच त्यानें म्हणणें नाकारिलें असें दाखविलें असतें तर अधिक स्वाभाविक दिसलें असतें. वासवदत्तेच्या बापानें वासवदत्तेला संगीत शिकण्यासाठीं पाठविलें नाहींच तर कृत्रिम महागज रानांत पाठविला, त्या गजाची शिकार करण्यास उदयनांस प्रेरणा करविली आणि तो शिकारीसाठीं आला असतां त्याला धरून बंदिवान केलें.

आणि पुढें त्याला वासवदत्तेचा शिक्षक केलें. पुढें व्हावयाचें तें झालेंच. वासवदत्ता आणि उदयन प्रेमबद्ध झालीं आणि उदयनाच्या राजधानीहून आलेल्या यौगंधरायणादि सहायकांच्या सहाय्यानें तें प्रेमी जोडपें पळून गेलें. ती मंडळी पळून गेल्यावर उदयनाला चंडमहासेनानें निरोप पाठविला कीं "तुम्ही वासवदत्तेला हरण करून नेली हें चांगलें केलेंत, तेथें आपण असतांनाच तुम्हास वासवदत्ता द्यावयाची होती, पण तुम्ही त्यावेळेस बंदीवान होतां, आणि त्यामुळें तुम्हांस ती सूचना अपमानकारक वाटली असती !" या निरोपावरून तत्कालीन राजेलोकांच्या मानापमानाच्या कल्पना किती नाजूक व सूक्ष्म होत्या असा विचार उत्पन्न होईल; तथापि त्याच्या कल्पना नाजूक होत्या असें वाटण्याऐवजीं दुसरीच एक शक्यता मनांत येते. राजे लोकांचे सल्लागार मंत्री अविश्वासाचें विधान न करतां तें विधान मानापमानविषयक बनविण्याची खटपट करीत असें दिसतें, आणि ज्याअर्थी अनेक प्रसंगीं ही मानापमानाची भाषा शिल्लक राहिली आहे त्याअर्थी ती कथा कोणत्या तरी काळीं व स्थलीं घडलेल्या खऱ्या वृत्तांताची दर्शक असावी आणि कवींनीं ती दरबारी भाषा कदाचित् न समजतां देखील जशीच्या तशीच संरक्षित केली असावी असें दिसतें.

उदयन आणि वासवदत्ता यांच्या कथेचें जें अन्य स्वरूप बौद्ध ग्रंथांत दिलें आहे तें पुढील प्रकरणांत आलेंच आहे. उदयनाच्या वासवदत्तेवरील प्रेमाचे कथासरित्सागरांतील उल्लेख वस्तुस्थितिदर्शक नसून काव्य वाटण्याचीं कारणें पुढें (१८० अ.) दिलींच आहेत. प्रेमी राजा कवींना हवा असेल पण मुत्सद्यांना प्रेम आणि विरक्ति यांचा संस्थानाच्या वृद्धीच्या दृष्टीनें आविर्भाव करणाराच राजा हवा होता; बृहत्कथेंत उदयन हा प्रेमी न दाखवितां तसाच दाखविला आहे.

### १७९. उदयनाचें मूळ गृह.

१७९. उदयनाच्या कुलाचें मूळगृह जें कुरुक्षेत्र त्याविषयीं बृहत्कथेंत चांगलीशी माहिती नाहीं. आणि स्थानांतरास काय कारणें झालीं यावर नीट प्रकाश पडत नाहीं. स्थानांतर हें पराभवाचें दर्शक नसून त्यास दुसरें कांहीं तरी कारण असावें असें दाखविण्याचा प्रयत्न झाला आहे. पुराणांत नदीला मोठा पूर येऊन हस्तिनापूर वाहून गेल्यामुळें त्यानें ती जागा सोडली असें दाखविलें आहे. (परिच्छेद ११५ पहा)

कुरूंच्या देशास अगर त्यांची राजधानी हस्तिनापूर अगर इंद्रप्रस्थ यांस बुद्धाच्या कालांत देखील महत्व नव्हतें. कुरुदेशांतील कम्मासधम्म या ठिकाणीं बरींच महत्वाचीं सूक्तें सांगितलीं गेलीं; त्यापैकींच महासतिपट्ठान आणि महानिदान हीं आहेत. त्याअर्थी इंद्रप्रस्थास अगर कुरुदेशास जर कांहीं महत्व असतें तर तें या सूत्रांत चांगल्या तऱ्हेनें व्यक्त झालें असतें. अशा तऱ्हेचीं मतें बौद्ध अभ्यासकांकडून व्यक्त झालीं आहेत (बुद्धपूर्वजग पृ.१७७) कुरुक्षेत्राचें महत्व केव्हां गेलें असावें याविषयीं विधान बुद्धग्रंथांवरून मांडण्यांत आलेलें नाहीं. तथापि बृहत्कथेवरून असें दिसतें कीं बुद्धकाळापूर्वी अनेक शतकें तें महत्व गेलें असावें. यौगंधरायण वत्सराजास सांगत आहे कीं आपल्या पूर्वजांनीं या पूर्वदिशेपासूनच पृथ्वीविजयास आरंभ केला होता. त्यांनीं भागीरथीच्या तीरीं हस्तिनापुरांत वास्तव्य केलें. पण शतानीक महाराजांनीं कौशांबी रमणीय नगरी आहे असें पाहून आणि साम्राज्य पौरुषाच्या अधीन आहे, देशाशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं असें जाणून येथेंच आपलें राजगृह केलें" उदयनाच्या आजाच्या काळांत हें स्थानांतर झालें नसून अनेक पिढ्या पूर्वी झालें होतें. तथापि शतानीक दोन झाले ही गोष्ट वररुचीच्या किंवा त्याच्या अगोदरच्या संपादकास न समजल्यामुळें त्यांनीं स्थानांतराचें श्रेय उदयनाच्या आजास दिलें असावें. बुद्धकाळीं कुरूंचें राज्य नव्हतें असें नाहीं. राज्य असेल व सामंतवर्गहि असेल. रट्ठपाल या नांवाच्या एका कौरवसंस्थानिकाचा उल्लेख बुद्धकालीन बौद्धकथांत आलाच आहे. राजधानी म्हणून पौरवांनीं ती जागा सोडल्यानंतर तेथें एक निराळें राजकुल प्रस्थापित झालें होतें, आणि त्या राजकुलामध्यें मुख्य राजाचीं दायादांशीं भांडणें कशीं चालत होतीं याची दर्शक एक गोष्ट बृहत्कथेंत आलीच आहे.

### १८० राजवाडा आणि राजकारण.

१८०. राजगृह आणि राजकारण याचा निकट संबंध असतो. अनेक राजकीय चळवळींचें किंवा कारस्थानांचें आदिकारण राजगृहांतील स्थितीच असते. राजवाड्यांत राजाचें मन आपल्याकडे ओढून घेण्यासाठीं जी चुरस असते तीच पुष्कळदां बाहेरील राजकारणाची नियामक होते. चालू राज्यांत अधिकारग्रहणासाठीं कारस्थानें होतात तशींच भविष्यकालीं राज्याधिकारावर कोणीं यावें यासाठीं होतात. राजानें आपल्या थोरल्या पुत्रास राज्य न देतां अन्य पुत्रास द्यावें म्हणून खटपटी होतात. राज्य एकट्यास न देतां अनेक पुत्रांत वांटून द्यावें, यासाठीं अंतःपुरापासून प्रयत्न होतात. असले जे प्रयत्न होतात त्यांत शेजारचीं राज्यें देखील भाग घेऊं लागतात. राजाचा थोरला मुलगा आणि धाकटा मुलगा एकाच आईचे पुत्र असतील तर विशेष कारस्थानें होण्याचें कारण नसतें. तथापि नसतेंच असें नाहीं. प्रत्यक्ष बाप व आई आपल्या वैयक्तिक आवडीनिवडीप्रमाणें

भावी व्यवस्था ठेवण्यासाठीं आपल्या अपत्यांविरुद्ध कारस्थानें करण्याचा प्रकार देखील अज्ञात नाहीं. दोघे मुलगे दोन आयांचे असले म्हणजे कारस्थानें ठेवलेलींच. रामायणाच्या कथेमध्यें भरतास राज्य द्यावयाची खटपट दशरथाकडून झाली तिचीं स्पष्टीकरणें निरनिराळीं करण्यांत आलीं आहेत, व तीं मूळ कथेस अनेक पुस्त्या जोडून मांडण्यांत आलीं आहेत. कैकयी रामाची सावत्र आई म्हणून रामाला टाकून आपल्या मुलाला राज्य द्यावें हा तिचा आग्रह अधिकाधिक स्वाभाविक करण्याचा प्रयत्न झाला आहे. सामान्य भावनांच्या ऐवजीं उदात्त भावनादर्शक वळण कथेस देण्यांत आलें आहे. कथासरित्सागरांत भरतानें राज्याचा अस्वीकार केला असें दिलेलेंच नाहीं, आणि दशरथ हा ताबडतोब पुत्रशोकानें मेला असेंहि दाखविलें नाहीं. पण आदर्शबंधुत्व दाखविण्यासाठीं निराळा कथाभाग वाल्मीकीच्या उपलब्ध ग्रंथांत दाखविला आहे. दशरथास देखील आदर्शपिता बनवून पुत्रशोकानें गतप्राण करण्यांत वाल्मीकीनें कविकौशल्यच केलें आहे अशीहि शंका उत्पन्न होते. दशरथजातकांत दशरथाचा मृत्यु रामप्रयाणाबरोबर दाखविला नाहीं. वाल्मीकिरामायणांत दशरथानें रामनिष्क्रामण करविलें तें कमी अयोग्य दाखविण्यासाठीं त्यानें तें पूर्वीच्या अभिवचनाच्या पूर्तीसाठीं केलें असें दाखविलें आहे आणि राजस्त्रीला देखील कमी गुन्हेगार ठरविण्यासाठीं कैकयीच्या हक्काचें संरक्षण करण्याच्या अभिमानानें राजकुलाचें वाटोळें करण्याचें पाप तिच्या एका माहेरून म्हणजे इराणांतून आलेल्या दासीच्या माथीं मारलें आहे. तिला मंथरा नांव देण्यांत कवीनें इराणी लोकांच्या मंथ्रवाङ्मयाची चेष्टा ध्वनित केली आहे असें एक टीकाकार सांगतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे प्राचीन कालच्या सार्वजनिक आयुष्यक्रमाचें स्वरूप समजण्यासाठीं राजकुलाच्या वागणुकीकडे आणि अंतःपुरांतील चळवळीकडे देखील लक्ष दिलें पाहिजे. प्राचीन कालच्या मंत्र्यास अर्थात् राजवाड्यांत काय गडबडी चालतात यावर सूक्ष्म नजर ठेवावी लागत होती व तशी उदयनाचे मंत्री ठेवीत असत असें बृहत्कथेंत दाखविलें आहे.

## १८० अ. राजे लोकांचें प्रेम व राजकारण. वासवदत्तेवरील प्रेमाची मीमांसा.

१८० अ. वत्सराजाचें वासवदत्तेवर प्रेम फार होतें तें इतकें कीं त्याला तिचा वियोग बिलकुल सहन होणार नाहीं असें रुमण्वानासारख्या मंत्र्यास वाटे. पण त्याविषयीं यौगंधरायणानें निराळें 'सत्य' जाणलें होतें. वासवदत्ताही उदयनाची विवाहित बायको म्हणून पहिलीच होती, तरी स्त्रियांशीं शरीरसंबंधास तो नवखा नव्हता.

**स वारनारीवक्त्रैर्दुप्रतिमालंकृतां सुराम् ***
**मंत्रिणां च मुखच्छायां वत्सराजः समं पपौ.**

कथामुखलंबक तृतीय तरंग श्लोक ५.

म्हणजे तो मद्यपान करतांना तें मद्य वारवधूंनीं उष्टावलेलें प्राशन करीत असे. येथें वारवधू शब्द आहे. मूळ पैशाचींत त्याच अर्थाचा शब्द असल्यास राजा ज्या स्त्रियांचा स्वीकार करी त्या आपल्यासाठीं निराळ्या राखलेल्या अवरुद्ध स्त्रिया देखील नव्हत्या तर अनेक पुरुषांशीं समागम करणाऱ्या वेश्यांनींच उष्टावलेलें मद्य तो पीत होता असें दिसतें !! बाहेरच्या वेश्यांशिवाय घरांतल्या दासी वगैरे होत्याच, आणि लग्नापूर्वीं आपल्या वाड्यांतील दासींशीं जे संबंध केले होते ते वासवदत्तेशीं लग्न झाल्यानंतर देखील टिकून होते. वासवदत्तेवर आत्यंतिक प्रेमवर्णन करणाऱ्या बृहत्कथेच्या कवींनीं विवाहोत्तर उदयनाचे अन्यस्त्रीसंबंध लपवून ठेवण्याची देखील खबरदारी घेतली नाहीं.

वत्सराज इंद्रियांच्या चापल्यामुळें 'विरचिता' नामक अंतःपुरचारिणीशीं अद्यापि स्नेहसंबंध करीत असल्याकारणानें एकदां मद्याच्या धुंदींत वासवदत्तेलाच तिच्या नांवानें हांक मारूं लागला. तेव्हां ती मानी देवी अतिशय रागावली पण तेव्हां राजानें तिच्या पाया पडून तिला प्रसन्न केलें ( २. ६. ६५-६६ ). एवंच वासवदत्तेवरील आत्यंतिक प्रेम अंतःपुरचारिणीशीं गडबड करण्याच्या कृतीशीं विसंगत धरलें जात नव्हतें. याशिवाय वासवदत्तेच्या ताब्यांत एक सुंदर राजपुत्री तिचा भाऊ गोपालक यानें दिली होती; पण ती राजाच्या दृष्टीस पडली आणि राजानें तिच्याबरोबर देखील गांधर्वविधी केला. त्या दोघांना वासवदत्तेनें पाहिलें आणि तिनें आपला राग विदूषक वसंतकावर काढला. ही कथा सांगितल्यानंतर लगेच कथानिवेदक "राजा वासवदत्तेशीं अगदीं लंपट होऊन राहिला आणि निराळें लग्न लावण्याविषयीं त्याला विचारहि रुचला नसता" वगैरे वाक्यें बोलावयास तयारच !

यौगंधरायणानें राजाचें लग्न पद्मावतीशीं लावून द्यावयाचें ठरविलें. त्याला राजाचें वासवदत्तेवरील प्रेम अत्युत्कट आहे ही अडचण भासविली ती सर्व इतर ज्ञात वृत्तांतामुळें मायावी दिसते. वत्सराज पिंडखर्जूर खाऊन चिंचेचाहि अभिलाष धरणारा मनुष्य होता. वासवदत्तेला दुःख होईल म्हणून नवीन सवत आणण्याला तो अनुद्युक्त असणें संभवनीय दिसत नाहीं. खऱ्या गोष्टींत कांहींतरी फिरवाफिरव करून राजा दोषमुक्त

* वरील श्लोकाचें भाषांतर किळस वाटल्यामुळें सोंवळ्या बापटशास्त्र्यांनीं आपल्या भाषांतरांत दिलें नसावें असें वाटतें.

करण्याचा प्रयत्न दिसत आहे. ती फिरवाफिरव उत्तरकालीन कवींची नसून ज्या काळीं गोष्ट घडली त्या कालच्या दरबारी मंडळीची आहे. राजावरील दोष टाळण्यासाठीं हें भाषाजाल निर्माण झालें आहे. वत्सराजा वासवदत्ता जळून गेली या कटांत सामील असावा आणि लबाडी करण्याचें श्रेय किंवा दोष हा मंत्रिमंडळावर टाकावयाचा त्याचा इरादाच असावा असें दिसतें. राजाच्या दोषांचें धनी व्हावयाचें हें केव्हांहि मंत्रिमंडळाचें महत्त्वाचें कर्तव्य असावयाचेंच. त्यांतल्या त्यांत बहुपत्नीकतेचें महत्त्व राजाप्रमाणें मंत्रिजनांस पटत होतें. दुखावलेल्या राणीची व राजाची गांठ वारंवार पडावयाचीच; तर नवीन लग्न लावण्याचा दोष कोणातरी मंत्र्यानेंच स्वीकारला पाहिजे ही त्या प्रकारच्या काळांतील एक अवश्य गोष्ट होती.

### १८० आ. बहुपत्नीकता आणि साम्राज्यशासन.

१८० आ. बहुपत्नीकता आणि साम्राज्यशासन यांचा निकट संबंध आहे. ज्याअर्थी चोहोंकडे अधिकारी पाठविणें अवश्य होतें आणि सामंतपद्धति काढून टाकणें अवश्य होतें, त्याअर्थी प्रत्येक ठिकाणीं आप्त पाठविणेंच योग्य होत होतें. राजाला मुलगे व आप्त वगैरे पुष्कळ पाहिजेत. परक्या कुलांतील सुभेदारावर तितका विश्वास रहावयाचा नाहीं आणि त्याचें जनतेंत वजनहि नसावयाचेंच. या दृष्टीनें राजकुलांतील व्यक्तीस अधिकारी नेमणें महत्वाचें होई. राजकुलांतील व्यक्तीस नेमावयाचें म्हणजे राजकुलविस्ताराची आवश्यकता आलीच. व ज्याअर्थी निरनिराळ्या देशांत आपले प्रतिनिधिस्थापन करावयाचे ते पूर्वीच्या राजकुलाशीं संबद्ध असलेलेच चांगले. तसें करावयाचें म्हटलें म्हणजे निरनिराळ्या देशच्या राजकन्यांशीं लग्न करणें अवश्य झालेंच. संस्थानास इष्ट अशीं राजकुलाशीं लग्नें जुळवून देणें हें मंत्र्याचें एक महत्त्वाचें काम होतें.

राजाचीं अनेक लग्नें होऊं देण्यास या प्रकाराचे राज्यविस्तारचे विचार कितपत प्रेरक होत याविषयीं माहिती बृहत्कथेंत नाहीं. सम्राटाला देखील राजकुलांतील मुली मिळविणें सोपें नव्हतें. चंद्रगुप्त मौर्याच्या बायका कोणत्या घराण्यांतील होत्या याविषयीं चांगली माहिती मिळत नाहीं. एक बायको वैश्यकन्या होती व एक ग्रीक होती एवढीच माहिती आपणांस उपलब्ध आहे. तथापि बिंदुसार, अशोक यांच्या बायकांविषयीं म्हणजे त्यांच्या कुलांविषयीं आपणांस फारच थोडी माहिती आहे.

एक लग्नाची बायको असतां दुसरी करावयाची इच्छा पार पाडण्यासाठीं निरनिराळे ढंग राजांसहि करावे लागत. राजा दिग्विजयी झाला तर जितशत्रूची मुलगी मिळेल; पण दिग्विजयाच्या पूर्वी असें कसें होईल ? बलवानानें जी गोष्ट करावयाची ती वत्सराजाच्या दौर्बल्याच्या काळांत लबाडीनें घडवून आणणें अवश्य झालें. आणि राजाला दोषमुक्त ठेवण्यासाठीं खऱ्या वृत्ताचें, मंत्र्यास कौशल्याचें श्रेय अगर लबाडीचा दोष देणारें, एक अनृतयुक्त रूपांतर निर्माण झालें.

उदयनाच्या आणि त्याच्या मंत्र्याच्या मनांत अनेक महत्त्वाकांक्षा असतील; त्यासाठींच मंत्र्यांनीं उदयनाला अनेक राजकन्यांशीं लग्नें लावणारा बनविलें, आणि राजाच्या विशिष्ट राणीवर निरतिशय प्रेमाच्या कथा स्त्रीगौरवासाठीं किंवा ज्या स्त्रीस दुखवावयाचें संकल्पिलें असेल तिच्या समजुतीसाठीं उत्पन्न केल्या असें वाटतें. महत्त्वाकांक्षी राजे लोक प्रेमरसांत वाटेल तितकें अवगाहन करून पुन्हां कोरडेच रहात असत असेंच राजचरित्र दाखविण्याचा कवीच्या मनांतील खरा उद्देश नसेल ना अशीहि शंका बृहत्कथा किंवा मालविकाग्निमित्रासारखीं नाटकें वाचतांना येऊं लागते. एरव्हीं उदयनचरित्रांत दिसून येणाऱ्या स्त्रीप्रेमविषयक गोष्टींतील असंबद्धता कवींनीं टिकूं दिली नसती. तथापि असेंहि वाटूं लागलें कीं मंत्र्यांनीं जी राजकारणी भाषा निर्माण केली, तीच भोळ्या कवींनीं फारशी चिकित्सा न करतां संरक्षिली.

उदयनाची साम्राज्यशासनाची पद्धति वगैरेसंबंधानें माहिती बृहत्कथेंत चांगलीशी मिळत नाहीं. त्यानें पद्मावती आणि वासवदत्ता या दोघींच्या भावांना देशाधिपत्य दिलें एवढेंच दाखविलें आहे.

उदयनाच्या राजव्यवहाराचें वर्णन तत्कालीन महाराष्ट्रांतील राजव्यवहाराचें दर्शक आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं. वैवाहिक दृष्टीनें तसेंच अर्थशास्त्रीय, धर्मशास्त्रीय आणि कामशास्त्रीय व्यवहारांत उत्तरेकडील देश आणि महाराष्ट्रांतील एकाच शास्त्राचे म्हणजे संस्कृतीचे वांटेकरी होते असें अनेक ग्रंथांनीं दाखविलें आहे.

## प्रकरण २२ वें.

# उदयनकाल आणि बुद्धकाल.

### १८१. उदयनाचा काल, व त्यासंबंधीं गूढ.

१८१. बृहत्कथेंतील महाराष्ट्रविषयक कथा प्राचीन आहेत हें खरें, पण त्या कथांचें पुनरुद्धरण केल्यानंतर त्यांचा नक्की काल कोणता किंवा निदान कोणत्या कालखंडांत तो कथासमूह पडेल हें निश्चित करणें हें इतिहासाच्या अवगमनासंबंधीं आपलें पुढील कर्तव्य होतें तें करण्यासाठींच उदयन कालविषयक चर्चा करावी लागत आहे.

उदयनाचा काल कोणता याविषयीं चर्चा बरीच झाली आहे, त्या चर्चेंत आपणांस आतां थोडें तरी शिरलें पाहिजे. उदयनाभोंवतीं कथांचें जाळें जसें तयार होऊन राहिलें आहे तसेंच गौतमबुद्धासंबंधीं आहे. अशा उत्पन्न झालेल्या कथाजालांत दोघांचीं नांवें गुंतविलीं गेलीं आहेत. त्यामुळें गौतमबुद्धाच्या कालांत उदयन झाला होता काय याचा विचार अवश्य झाला आहे.

केवळ पुराणांतील राजावलींवरून बुद्धकालीन स्थिति काय होती हें समजणार नाहीं. तथापि यादींत आलेल्या राजांचे काल दुसऱ्या कांहीं कारणांवरून लक्षांत आल्यास पुराणांतील यादी अधिक उपयुक्त होते. पुराणांच्या यादींत उल्लेखिलेल्या ज्या राजांविषयीं अन्य प्रकारची माहिती उपलब्ध आहे असे राजे म्हटले म्हणजे उदयन, प्रद्योत, बिंबिसार व अजातशत्रु हे होत. उज्जयिनीच्या चंडमहासेनाचा उल्लेख बृहत्कथेनें वासवदत्तेचा बाप म्हणून केला आहे; तथापि त्याच्या घराण्यांतील पुरुषांची यादी पुराणें देत नाहींत. तथापि त्यालाच प्रद्योत बनविण्याची खटपट अनेकांनीं केली आहे. बृहत्कथा प्रद्योताचें नांव देत नाहीं असें नाहीं. बृहत्कथेंत एक प्रद्योत आला आहे; पण तो मगधचा राजा म्हणूनच आला आहे. तथापि बुधस्वामीच्या बृहत्कथाश्लोकसंग्रहांत अवंतिपति म्हणून प्रद्योताचेंच नांव आलें आहे. बुधस्वामीच्या ग्रंथामध्यें बृहत्कथेचें खरें स्वरूप पूर्णपणें लुप्त झालें असल्यामुळें ग्रंथांतील विधानांनीं संशोधनप्रक्रियेस अडथळा करून घेणें अयोग्य होईल. येथें बुधस्वामीस दुर्लक्षून क्षेमेंद्रसोमदेवीय बृहत्कथेवरच अनुमानपरंपरा रचली आहे.

### १८२. प्रद्योतविषयक विवेचनांत प्रवेश. पुराणांतील वैकल्पिक नांवें.

१८२. उदयन आणि मगधराज प्रद्योत यांचा बृहत्कथेंत दाखविलेला जांवई व सासरा हा संबंध त्यांचें कालैक्य दाखवितो. प्रद्योत हा एका नवीन घराण्याचा संस्थापक आहे असें पुराणांत आलें आहे, त्यावरून उदयनाच्या किंवा त्याच्या बापाच्या कालांतच मगधामध्यें राज्यक्रांति झाली होती, आणि स्वामीचा घात करून नोकरानें राज्य घ्यावयाचें ही क्रिया यशस्वी होऊन राज्य प्रद्योताला मिळालें होतें, अशा निर्णयास यावें लागतें. या कल्पनेला साधकबाधक प्रमाणें पुढील आहेत: बाधक प्रमाण म्हटलें म्हणजे नांवाविषयीं खात्री नाहीं हें होय; कारण प्रद्योत हें नांव कांहीं प्रतींतून येतें. 'प्रद्योत' या पाठाशिवाय 'पुलक' आणि 'पालक' हीं पाठांतरें आढळतात. मागें दिलेल्या श्लोकांत प्रद्योताचें नांव न येतां 'बालक' म्हणून आलें आहे. मत्स्यपुराण 'बालक' असें नांव देतें, तेथें वायुपुराणांत 'प्रद्योत' असें आलें आहे. वायुपुराणांतील विधान पुढीलप्रमाणें आहे:

**सुनीकः स्वामिनं हत्वा पुत्रं समभिषेक्ष्यति**
**मिषतां क्षत्रियानां हि प्रद्योतः सुनिको बलात्**

मत्स्यपुराणांत प्रद्योत हें नांव व्यक्तीचें किंवा घराण्याचें म्हणून गाळलें आहे. मत्स्यपुराणांत घराण्याला नांवच दिलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. वायुपुराणांत या घराण्याच्या उल्लेखाचा अंतिम पाद **प्रद्योता पंच ते नृपाः** असा आहे. त्या ऐवजीं मत्स्यांत 'प्रनष्टा पंच ते नृपाः' असा पाठ आहे. वायुपुराणाची माहिती अधिक निश्चित प्रकारची दिसते.

### १८३. शतानीककाळीं बार्हद्रथ घराण्याची समाप्ति.

१८३. उदयन आणि प्रद्योत यांची समकालीनता पौराणिक आधारानें सिद्ध होते, ती अशी. विशिष्ट हस्तलिखितांतील निरनिराळ्या घराण्यांतील अंतिम राजे समकालिनता दाखवितात असें धरण्यास हरकत नाहीं. अशा तऱ्हेनें उदयन आणि प्रद्योत यांच्या कालापूर्वीची स्थिति दाखविणारीं गरुडपुराणाचीं दोन* हस्तलिखितें उपलब्ध आहेत. यांत शतानीकापर्यंत पौरवांची आणि संपूर्ण बार्हद्रथांचीच माहिती आली आहे. त्यावरून असें सिद्ध होतें कीं ज्या काळांत बार्हद्रथ घराणें नष्ट झालें त्या काळांत पौरव घराणें चालू होतें, आणि उदयनाचा काल आला नव्हता. उदयनपूर्वकालींच बार्हद्रथ घराणें आटोपलें होतें तर उदयनाच्या वेळेस प्रद्योत वृद्ध

* *a b*. Gr अंकनाचीं 'इंडिया' ऑफीसमधील लिखितें.

असून त्याचा सासरा शोभेल अशाच वयाचा असावा आणि तो मगधराज असावा ही शक्यता सिद्ध होते.

ज्याअर्थी उदयनाच्या काळीं प्रद्योत होता, त्याअर्थी उदयनाचा आजा (किंवा पुराणांच्या मतें बाप) शतानीक हा जेव्हां राज्य करीत होता तेव्हां बार्हद्रथ ह्यांचें घराणेंच राज्य करीत होतें आणि प्रद्योतवंश अस्तित्वांत नव्हता, आणि त्यामुळें शतानीकापर्यंतच वृत्तांत देणाऱ्या पुराणांच्या प्रतींत प्रद्योतांचा अनुल्लेख स्वाभाविक आहे.

प्रद्योत हा मगधराजा असून बिंबिसारापूर्वी दोन अडीचशें वर्षें होता याला पुरावा पुढील प्रमाणें आहे.

(१) पुराणांतील विधानांत तीच गोष्ट सरळपणें सांगितली आहे.

(२) शतानीक आणि अंतिम बार्हद्रथ यांचें कालैक्य हस्तलिखितांच्या पुराव्यावरून सिद्ध होतें.

(३) बृहत्कथेंत तोच मजकूर आहे, आणि बृहत्कथा प्रद्योतास मगधराजाच समजत आहे.

### १८४. प्रद्योत आवंत्य कीं मागध ? भिन्न पुराव्यांचें महत्वमापन.

१८४. बृहत्कथा आणि उत्तरकालीन बौद्ध कथा यांमध्यें बृहत्कथेचा पुरावा अधिक विश्वसनीय समजण्याचीं मुख्य कारणें तीन आहेत.

एक कारण म्हटलें म्हणजे बृहत्कथेंतील मजकूर बराचसा पौराणिक मजकुराशीं जुळतो. दुसरें कारण असें कीं बृहत्कथेंतील मजकूर संग्रहित करतांना सांप्रदायिक भावनेचा अभाव होता. संप्रदायगौरवाच्या भावनेनें प्रेरित झालेले लेखक, संप्रदायानें गौरविलेल्या व्यक्तींचे इतर प्रसिद्ध व्यक्तींशीं संबंध जुळवितात, आणि त्याच हेतूनें मूळ कथा विकृत करतात. शिवाय एखाद्या इष्ट व्यक्तीचीच कथा सजविणारांना त्या कथेची इतर कथांशीं संगति कितपत जुळते या प्रकारचा विचार करण्याचें कारण नसतें; तथापि ज्यांना अनेक कथा एकत्र करावयाच्या आहेत, त्यांना कथांच्या संगतीकडे पाहिलेंच पाहिजे. या गोष्टीमुळें बृहत्कथेच्या परंपरागत संग्राहकास कथेच्या सत्यतेची म्हणजे जी अद्भुत कथा ज्या व्यक्तीच्या नांवावर चालत आली असेल त्याच व्यक्तीच्या नांवावर चालू ठेवण्याची फिकीर जास्त असते. या अनेक कारणांमुळें बृहत्कथेंतील म्हणजे कथासरित्सागरांतील कथेस अधिक विश्वसनीय समजावें लागतें. या सर्व गोष्टींमुळें उदयनाच्या कालीं प्रद्योत हा मगधाचाच राजा होता असें मी समजतों आणि उदयन आणि प्रद्योत यांचा काल बिंबिसारापूर्वी म्हणजे बुद्धकाळापूर्वी दोन अडीचशें वर्षें अगोदरचा धरतों.

उदयन-प्रद्योतापेक्षां शतानीक-बार्हद्रथांचें कालैक्य अधिक निश्चित आहे व ती निश्चितता उदयनास बुद्धाच्या पूर्वी दोन-अडीच शतकें घालण्यास पोषक आहे.

धार्मिक व्यक्ति वगळतां, जीवर वाङ्मय अत्यंत विपुल आहे अशी व्यक्ति म्हटली म्हणजे चक्रवर्ती उदयन हीच होय. उदयन आणि त्याबरोबर त्याचा एक सासरा प्रद्योत आणि उदयनाची बायको वासवदत्ता यांवर झालेलें काव्य-वाङ्मय आणि कथावाङ्मय एकत्र करतां पौराणिक नसलेल्या दुसऱ्या कोणत्याहि व्यक्तीवर इतकें विपुल लिखाण सांपडणार नाहीं. ही कथा केवळ कथाप्रिय जनानीं संग्रहित केली तर त्याच्या कथेचे धागेदोरे बौद्ध आणि जैन यांनीं आपल्या सांप्रदायिक पुरुषांशीं जोडले. त्यामुळें वाङ्मयवैपुल्य उत्पन्न झालें आहे. तें इतिहासावर अद्भुताचें दाट आवरण घालतें झालें आहे. संशोधकाचें कार्य या दाट आवरणांस दूर करून त्यांतील इतिहासाचें निष्कर्षण करण्याचें असल्यामुळें इतिहासज्ञानासाठीं अगोदर तयार होणारें टीकावाङ्मय देखील विपुल झालें आहे. तसलें टीकात्मक वाङ्मय उत्पन्न करणाऱ्या व्यक्ति म्हटल्या म्हणजे रा. वेंकटेश्वर अय्यर, रा. जयस्वाल, डा. गुणे, प्रो. देवदत्त भांडारकर, एच. डी. भिडे, मुजुमदार शास्त्री, व ज्योतिर्मय सेन या प्रामुख्यानें होत. *

* उदयनकाल ठरविण्याविषयीं प्रयत्न **डॉ. देवदत्त भांडारकरांनीं** केला आहे तो कारमायकेल व्याख्यानें कलकत्ता युनिव्हर्सिटी १९१८ यांत सांपडेल. त्याशिवाय **मि. देव** (H. K. Dev) यांनीं "Udayana Vatsaraja" यावर एक निबंध प्रसिद्ध केला आहे. तसाच **काशीप्रसाद जयस्वाल** यांनीं या विषयावर JBO. Sept. 1915 पासून अनेक निबंध लिहिले आहेत. त्यानंतर **डॉ. पांडुरंग गुणे** यांनीं ABI, 1920 मध्यें "Pradyota, Udayana and S'renika a Jain legend" या नांवाचा एक निबंध लिहिला. त्यानंतर **रा. एच्. डी. भिडे** यांनीं Pradyota Dynasty of the Puranas या नांवाचा एक निबंध JBO. 1921 मध्यें प्रसिद्ध केला. त्या निबंधांत प्रद्योताचा अवंतिराज्याशीं संबंध त्यांनीं नाकारला. नंतर त्यांना उत्तर म्हणून त्याच त्रैमासिकांत **मि. मुजुमदार** (S. N. Mujumdar Shastri) यांनीं आपला लेख प्रसिद्ध करून रा. भिडे यांचें विधान खोडण्याचा प्रयत्न केला. तो प्रयत्न अपूर्ण झाला असें समजून **बाबू ज्योतिर्मयसेन** यांनीं IHQ. डिसेंबर १९३० च्या अंकांत The Riddle of the Pradyota Dynasty या लेखांत आपल्या मतें साधार खंडन केलें. आमच्या मतें ज्योतिर्मय सेन हे प्रद्योतांच्या अवंतिराजाच्या वर उत्पन्न केलेल्या संशयाचें यशस्वीपणानें खंडन करूं शकले नाहींत. तथापि उदयन व प्रद्योत यांस बुद्धकालांत घालण्याची अयोग्यता त्यांनीं दाखवून दिली आहे.

### १८५. प्रद्योताचें आवंत्यत्व नाकारणारा पक्ष अल्प तथापि अखंडित आहे.

१८५. प्रद्योतांना जवळ जवळ सर्वच लेखक उज्जयिनीचें घराणें करीत आहेत. प्रत्येक लेखक आपापलें कारण निराळें देत आहे. प्रद्योताचा उज्जयिनीशीं संबंध नाकारणारे लेखक फक्त रा. भिडे हे आहेत. जयस्वाल हे सांगतात कीं शैशुनाग घराण्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं टीप म्हणून या प्रद्योतांची माहिती दिली आहे. ते पुराणांतील प्रद्योत तोच उज्जयिनीचा प्रद्योत आहे हें गृहीतच धरतात, आणि बुद्ध, अजातशत्रु, बिंबिसार यांशीं समकालीन धरतात.

### १८५ अ. प्रद्योतांचें मागधांवर अधिराजत्व.

१८५ अ. कोणी प्रद्योत घराणें उज्जयिनीचें असतां पुराणांत उल्लेखिलें याचें कारण उज्जयिनीचेंच घराणें वरचढ होतें आणि मगधराज्य त्याचें सामंत झालें असल्यामुळें उज्जयिनीच्या राजकुलाचा वृत्तांत देणें भाग आहे अशी कल्पना करतात.* या तऱ्हेची कल्पना प्रसृत होण्याचें कारण याकोबीचा लेख † असावा. त्या लेखांत 'मज्झिम निकाय' मधील एका विधानाचा आधार देऊन असें दाखविलें आहे कीं प्रद्योताच्या हल्ल्यापासून संरक्षण करण्यासाठींच अजातशत्रूनें आपल्या राजधानीला कोट बांधला.

येणेंप्रमाणें प्रद्योत मगधांत नसतां देखील पौराणिकांनीं त्यांचा उल्लेख कां केला याचें स्पष्टीकरण प्रद्योताचें मागधत्व नाकारणारांनीं केला आहे.

प्रद्योत आणि उदयन यांचा बौद्ध व जैन संप्रदायांनीं उल्लेख कां केला याचा विचार चांगल्या तऱ्हेनें झाल्याशिवाय उदयनविषयक संभ्रमाचें निराकरण होणार नाहीं. त्या चर्चेत आपणांस सध्यां शिरतां येत नाहीं, तथापि त्यांच्या सांप्रदायिक भावनांमुळें त्यांनीं इतिहासांत फार घोटाळे उत्पन्न करणारें लिखाण तयार करून ठेवलें आहे इतकेंच सांगितलें असतां पुरे.

ज्योतिर्मय सेन यांचा लेख अत्यंत शोधपूर्वक लिहिला आहे. त्यांत देखील त्यांनीं प्रद्योतास मगधराज न करतां अवंतिराजच केलें आहे. तरी देखील उदयन व प्रद्योत हे बुद्धाच्या काळचे करण्यास त्यांस दिक्कत वाटत आहे.‡

उदयन आणि प्रद्योत यांस बुद्धकालीन करणारी एक कथा म्हटली म्हणजे प्रद्योतांचें मगधराजास वाटत असलेलें भय होय. तिच्यासंबंधानें सेन बाबूंनीं फारसा विचार केलेला नाहीं. अवंतीच्या बलाचा विस्तार होऊन अजातशत्रूस देखील भय वाटत होतें कीं नव्हतें यासंबंधाचें विधान ज्योतिर्मयसेन यांनीं मूळ ग्रंथांत आहे किंवा नाहीं हें तपासलें देखील नाहीं. केवळ प्रो. याकोबीचा§ हा आधार देऊन ते मोकळे झाले आहेत. बिंबिसार हा पज्जोत नांवाच्या एका चक्रवर्ती राजाचा सामंत असला पाहिजे अशा तऱ्हेचें मत प्रो. याकोबी यांनीं व्यक्त केलें आहे. तें मत मात्र बाबूज्योतिर्मय सेन अर्थात स्वीकारीत नाहींत. तें न स्वीकारण्यास सेनबाबू महावग्गांतील एका उल्लेखाचा आधार†† देतात. ते म्हणतात "देव" अशा तऱ्हेनें प्रद्योत बिंबिसारास संबोधीत आहे, पण आमच्या मतें तो पुरावा महत्वाचा नाहीं. देव याचा अर्थ "युअर म्याजेस्टी" असा सेनबाबू धरीत आहेत, तर त्याचा अर्थ तसाच होतो हें त्यांनीं दाखवावयास पाहिजे पण तसें दाखविलें नाहीं. पराभूत केलेल्या राजाचाहि उल्लेख 'रुद्रदेव' अशा तऱ्हेनें गुप्तांनीं केला आहेच.

आमच्या मतें प्रद्योताचें मगधराजत्व खोडून काढलें गेलें नाहीं. त्याचें आवंत्यत्व सिद्ध होत नाहीं. प्रद्योताचें बुद्धपूर्वकालीनत्व असिद्ध झालें नाहीं आणि त्यामुळें प्रद्योत व उदयन यांच्याविषयीं पुराणांनीं जें सांगितलें आहे तेंच ग्राह्य धरणें प्राप्त आहे.

### १८६. उदयन बुद्धापूर्वी २५० वर्षें होता.

१८६. आतां आपणांस उदयनाचा काळ काढतां येतो काय हें पाहिलें पाहिजे, आणि तो बुद्धाशीं समकालीन होता काय या कित्येकांनीं उत्पन्न केलेल्या कल्पनेचा पूर्ण विचार केला पाहिजे. हा विचार करतांना उपलब्ध साहित्याकडे पाहून नंतर चर्चावाङ्मयाकडे वळतां येईल.

प्रद्योत हा मगधराजा नसून अवंतिराजा होता, अशा तऱ्हेचा पक्ष बहुतेक संशोधकांनीं घेतला आहे. त्या पक्षाच्या विरुद्ध फक्त रा. भिडे आहेत. माझें मत प्रद्योत हा मगधराजाच असावा असें आहे हें सांगितलेंच आहे; तर त्या मताप्रमाणें इतिहाससूत्र कसें तयार होतें हें पाहून नंतर भिन्न मतवाद्यांच्या मताचा विचार करूं.

उदयनाशीं समकालीन असलेला प्रद्योत मगधराज याच्यापासून बिंबिसारापर्यंतचा काळ काढला तर उदयनाच्या काळा-

* उदाहरणार्थ Cambridge History of India p. 311.

† ZDMG. Vol. 34, p. 188.

‡ "Again the contemporaneity of Caṇḍa Pajota with Buddha becomes questionable. Buddhist legends therefore, both earlier and later, Northern and Southern have different traditions to offer, and while there is considerable unanimity in regard to Bimbisāra and Prasenjit the greatest diversity prevails regarding Udayana and Pradyota."(IHQ. Vol. ii, p-688).

§ ZDMG. Vol. 34 p, 118.

†† [ महावग्ग ८. २३ व पुढें; (सेबुई) पृ. १८६ टीप १ ].

संबंधानें पुराणांचें म्हणणें हातीं आलें असें होईल. पुराणें प्रद्योत वंशास शंभर पासून दीडशें वर्षें देतात.* आणि त्यांच्या समाप्तीनंतर आलेल्या शैशुनागांपैकीं बुद्धकालीन राजा बिंबिसार याचा काल सवाशें वर्षांनीं झाला असें पुराणें सांगत आहेत (प्र. १५ पहा.) तर येणेंप्रमाणें उदयनकाल बिंबिसारापूर्वी सुमारें २५० वर्षें अगोदर येतो.

पुढें येणाऱ्या प्रमाणांचा विचार करतां असें दिसून येईल कीं उदयनाच्या वर दिलेल्या कालनिर्णयास वगळून दुसरा काल ठरविण्यास खात्रीलायक पुराणोल्लेख उपलब्ध नाहीं.

उदयनकाल आणि बुद्धकाल हे एक मानण्याकडे जयस्वालादि कांहीं संशोधकांची प्रवृत्ति आहे. त्याअर्थी बुद्धकालांतील कथांकडे थोडेंसें अवलोकन अवश्य होतें. तें अवलोकन उदयनाच्या बुद्धकालीनत्वासंबंधानें संभ्रम कसा उत्पन्न झाला हें अंशेंकरून स्पष्ट करील.

पुराणांतील माहितीला एक पुरवणी जर उदयनासंबंधींच्या वाङ्मयाची होऊन एक कालैक्य हातीं येतें तर बिंबिसार आणि अजातशत्रु यांच्या कारकीर्दी आणखी एक पुरवणी मिळून दुसरें कालैक्य हातीं येतें. बिंबिसार व अजातशत्रु या दोहोंचा बौद्धवाङ्मयांत उल्लेख आला असून त्यांत ते पितापुत्र दाखविले आहेत. त्याप्रमाणेंच त्यांचा अनुक्रम पुराणांत आहे. आणि हे दोघे राजे बुद्धकालीन होते यासंबंधानें खात्री असल्यामुळें पौराणिक याद्यांतील राजांच्या कुलाविषयीं अनुमानें करण्यास मदत झाली आहे.

बुद्धाचा संबंध प्रत्यक्ष कोणत्या राजांशीं आला आणि त्या राजांचा कोणत्या राजांशीं आला हें राजे लोकांची समकालीनता पहाण्याचें एक गमक होय. बौद्ध वाङ्मयावरून आपणांस शैशुनागांच्या दोन राजांखेरीज इतरांशीं संबंध समजत आहेत, आणि त्यामुळें कालैक्यें निश्चित होत आहेत.

बुद्धाच्या काळीं मगधांत प्रद्योत घराणें नाहींसें होऊन शैशुनाग घराणें आलें होतें आणि या घराण्यांतील पुरुष बिंबिसार आणि त्याचा मुलगा अजातशत्रु हे राज्य करीत होते. जो पितृवध करणारा राजा बुद्धाला भेटावयास आला असतां बुद्ध खुशालून गेला आणि राजाची उलट तारीफ करूं लागला, तोच हा दैववान् अजातशत्रु होय.

मारला गेलेला राजा बुद्धास अपरिचित असल्यामुळें त्याच्या खुनाविषयीं बुद्धास उदासीनता होती असें म्हणतां येणार नाहीं. कारण अजातशत्रूच्या अगोदरच बुद्धाचा बिंबिसाराशीं संबंध आला होता. गौतमानें गृहत्याग केल्यावर थोडक्याच दिवसांनीं त्याची व बिंबिसार राजाची भेट झाली होती. गौतम हा बुद्ध झाल्यानंतर गौतम आणि देवदत्त यांमध्यें द्वेषभाव उत्पन्न झाला, आणि पुढें देवदत्त मरण पावला, तेव्हां जीवक या वैद्याच्या सल्ल्यानें राजा अजातशत्रु गौतमास भेटावयास गेला असें ग्रंथ सांगतात असें चांदोरकरांनीं दाखविलें आहे. देवदत्ताचा खून झाला असावा आणि तो खून घडविण्यांत बुद्धाचें अंग असावें असा संशय चांदोरकरांनीं व्यक्त केला आहे. या देवदत्ताच्या मृत्यूनंतर त्यास भेटावयास जाण्यास सांगण्यांत जीवकाच्या मनांत कांहीं हेतु असेल अशी कल्पना रा. चांदोरकर यांच्या मनांत आलीशी दिसते. पण ती त्यांनीं व्यक्त केलेली नाहीं. गौतम बुद्ध हा स्वतः खुनाच्या दोषाचा वांटेकरी असल्यामुळें तो अजातशत्रूस फारसें विरुद्ध बोलूं शकणार नाहीं अशीच जीवकाची अपेक्षा असावी अशी कल्पना चांदोरकरांच्या मनांत असावी असें दिसतें. हा जीवक एका वेश्या बनलेल्या शालिवती नामक राजकन्येचा मुलगा होता आणि या राजकन्येस वेश्यापण बिंबिसारानेंच मुद्दाम मोठ्या समारंभानें दिलें होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे बिंबिसार व अजातशत्रू यांचा बुद्धाच्या आयुष्याशीं जसा निकट संबंध आला आहे तसा उदयन किंवा प्रद्योत यांच्याशीं आलेला नाहीं; तर बुद्धाचें बिंबिसार व अजातशत्रु याशीं समकालीनत्व एवढेंच सत्य धरून इतरांविषयींचें विधान या कालैक्यांशीं कितपत सुसंगत होतें हें पाहून ठरविलें पाहिजे.

बिंबिसार हा शैशुनाग राजा बुद्धकालीं मगधाधिपति होता, तर प्रद्योत हा मगधराजा दुसऱ्या कोणत्या तरी काळांत होऊन गेला असला पाहिजे किंवा तो मगधराज नसून अन्य देशाचा राजा असला पाहिजे. प्रद्योत ही व्यक्ति काल्पनिक वाटत नाहीं. कारण तिचा पुराणें आणि बृहत्कथा या दोहोंतहि उल्लेख आहे, आणि उदयन आणि प्रद्योत यांची समकालीनता संशयित करणारा पुरावा अजून आला नाहीं.

बिंबिसार व अजातशत्रु हे मागधराजे बुद्धकालीं होते यासंबंधानें खात्री असल्यामुळें आणि उदयन, प्रद्योत आणि बुद्ध हे समकालीन होते असें गृहित धरल्यामुळें प्रद्योतास आवंत्यांचा राजा बनविण्याचा प्रयत्न झाला आहे.

कथासरित्सागर आणि पुराणें यांतील विधानांची जुळणी करण्यास मुळींच अडचण नाहीं. जुळणी केली असतां उदयन हा बुद्धकालीन न होतां बुद्धाच्या दोनअडीचशें वर्षें अगोदर असावा असें निःसंशय वाटूं लागतें. प्रद्योत हा अन्यस्थलींचा राजा असला तर तो आणि बिबिसार एकाच काळीं असूं शकतील. नाहींतर एकाच स्थलावरील दोन शतकें अंतर

* पार्गिटेर-पुराणटेक्स्ट, पृ. १८.

असलेल्या राजांना समकालीन बनविण्याचा खटाटोप हास्यास्पद होय. प्रद्योत आणि बिंबिसार यांच्या दूरतेसंबंधानें उल्लेख अगदीं सरळ असतां लोकांस त्यासंबंधानें भ्रम तरी उत्पन्न कां व्हावा हा विचार मनांत येतो.

## १८७. राजधानीच्या उल्लेखाची उदयनकाल-निर्णयास मदत होत नाहीं.

मगध देश अनेक स्थित्यंतरें पावला; त्याच्या राजधान्या अनेक झाल्या; तर विशिष्ट राजधानीशीं समकालीनता शोधून उदयन काल काढावा ही मसलत कामास येत नाहीं.

प्रथमतः हें सांगितलें पाहिजे कीं, पाटलिपुत्र ही राजधानी स्थापन झाली ती बुद्धजन्मोत्तर झाली आहे, व पाटलिपुत्र-संस्थापनविषयक जी कथा बृहत्कथेंत आली आहे ती उदयन बुद्धकालीन होता कीं बुद्धपूर्वकालीन होता हें सांगण्यास मदत करीत नाहीं. ती कथा उदयनपूर्वकालची अत्यंत प्राचीन असूं शकेल.

कथासरित्सागरांत सांगितलें आहे कीं पाटलिपुत्र या राजधानीचा संस्थापक पुत्रक नांवाचा होता आणि तो चिंचिणीच्या ब्राह्मणकन्येला कनखल येथील दाक्षिणात्य द्विजपुत्रापासून झालेला होता. या दंतकथेंत कांहीं अर्थ आहे किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं; तथापि या प्रश्नाकडे अधिक सूक्ष्मतेनें पहाण्याची खचित आवश्यकता आहे. पाटलिपुत्र हें शहर राजधानी केव्हां झालें आणि स्थापन केव्हां झालें हे दोन्ही प्रश्न उत्पन्न होतात. यासाठीं मगधाच्या राजधान्यांचा एकंदर विचार केला पाहिजे.

मगधाच्या राजधान्या म्हणून आतांपर्यंत खालील स्थलांचा उल्लेख आला आहे.

१ अत्यंत प्राचीन कालीं मगधाची राजधानी कोणती होती याविषयीं उल्लेख उपलब्ध नाहीं. भारती युद्धांत जरासंधपुत्र सहदेव पतन पावल्यानंतर त्यांच्या दायादानें गिरिव्रज हीच राजधानी केली असें 'सोमाधिस्तस्यदायादो राजाभूत्स गिरिव्रजे' या विधानावरून स्पष्ट होईल.

२ बुद्धपूर्व ७५।१०० वर्षें या सुमारास शिशुनाग यानें आपली स्वतःची राजधानी गिरिव्रज हीच केली असें दाखविणारें वाक्य पुराणांत आहे (वाराणस्यां सुतं स्थाप्य श्रयिष्यति गिरिव्रजम्).

वरील विधानावरून गिरिव्रजाच्या महत्त्वाचा मधल्या काळांत लोप झाला असावा अशी कल्पना होते. उदयनकथेंत मगध राजाच्या राजधानीचा उल्लेख नाहीं त्यामुळें मधल्या कालची स्थिति बरोबर समजत नाहीं.

३ मगधदेशाच्या राज्याचा विस्तार वाढल्यानंतर बिंबिसार यानें आपली राजधानी राजगृह येथें बांधली असें बौद्धग्रंथांतील उल्लेखावरून दिसून येतें.

४ बिंबिसाराचा मुलगा अजातशत्रु यानें आपल्या आजाचें राज्य घेण्यासाठीं पाटलिग्राम येथें तटबंदी केली. यानें त्यावेळेस आपली राजधानी पाटलिपुत्र केली असें नाहीं. ( वेंकटेश्वर अय्यर यांचा लेख, इंडियन अँन्टिक्वरी पु. ४४,४५)

५ अजातशत्रु याच्या नंतरचा राजा उदय हा होय. यानें कुसुमपुर हें शहर बांधलें.

६ चंद्रगुप्ताच्या वेळेस राजधानी पाटलिपुत्र हीच होती. मगधदेशाची राजधानी पाटलिपुत्र हिचें नांव एका काळीं पाटलिग्राम हें होतें तें पाटलिपुत्र कसें झालें हा प्रश्न आहे. कदाचित् पाटलिपुत्र हें खरें नांव असतां त्याच्याऐवजीं पाटलिग्राम असें अपरनाम वापरण्याचा प्रघातहि असेल. पाटलिग्राम नाहींसें होऊन पाटलिपुत्र हें नांव झाल्यानंतर त्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं अर्थवादात्मक कथा तयार करण्याच्या प्राचीन भारतीय पद्धतीनें पाटलि व पुत्रक यांची कथा तयार झाली असणें शक्य आहे. पाटलि हें जुन्याच नांवाचें अंग असेल; तथापि ग्राम हें उत्तरपद जाऊन पुत्रक हें कां यावें असा प्रश्न उत्पन्न होतो, आणि त्यामुळें पुत्रक नांवाच्या कोणत्या तरी व्यक्तीचा शहराच्या इतिहासाशीं संबंध आला असावा अशी कल्पना होते. हा पुत्रक कोण यासंबंधानें आज दुसरी माहिती नाहीं. त्यामुळें तद्विषयक दंतकथा विचारार्ह होते, पुत्रक हा कनखल येथील दाक्षिणात्य द्विजाच्या मुलाचा चिंचिणी येथील ब्राह्मणाच्या मुलीपासून झालेला मुलगा होता, या तऱ्हेचें वर्णन तयार झालें त्यावरून निदान त्याप्रकारचें करणें स्वाभाविक होण्यास प्रेरक अशी सामाजिक स्थिति असली पाहिजे. चिंचिणीसंबंधाच्या त्या उल्लेखावरून काय निर्णय काढावयाचा याचा विचार पुढील एका प्रकरणांत केला आहे.

पाटलिपुत्र हें शहर स्थापन केव्हां झालें आणि मगधाची राजधानी हें नातें त्या शहरास केव्हां मिळालें हें दोन भिन्न प्रश्न आहेत. आज सामान्य शहर तर उद्यां सामंताची राजधानी तर परवां मुख्य सम्राटाची राजधानी अशीं पाटलिपुत्राचीं स्थित्यंतरें दृष्टीस पडतात. पाटलिपुत्राचें अस्तित्व एवढेंच नव्हे तर प्रामुख्य देखील उदयनपूर्वकालांत बृहत्कथेनें दाखविलें आहे. त्याचा परामर्श उदयनकालीन व तत्पूर्व भूगोलज्ञानाचें प्रकरण पुढें येणार आहे त्यांत घेतला जाईलच

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मगधेतिहासांतर्गत जीं राजधानीचीं स्थित्यंतरें झालीं त्यांतील कोणत्याहि स्थित्यंतराशीं उदयन आणि प्रद्योत यांचा संबंध जुळवून इतिहास सांगतां येत नाहीं. सोमाधीनें गिरिव्रजांत आपली राजधानी ठेवली तेव्हांच्या काळापासून गिरिव्रजाचा वृत्तांत आपणांस शिशुनागापर्यंत ऐकूं येत नाहीं आणि गिरिव्रजाचा उल्लेख बृहत्कथा करीत नाहीं.

## १८८. उदयन व प्रद्योत यांचा बौद्ध ग्रंथांनीं सांगितलेला संबंध.

१८८. बौद्ध ग्रंथांनीं दिलेली माहिती बृहत्कथेंतील माहितीपासून भिन्न आहे म्हणून तिच्याकडे लक्ष दिलें पाहिजे.

कौशाम्बी व अवन्ती येथील राजघराणीं सोयरिकीनें एकमेकांशीं निगडित झालीं होतीं. अवंतीची राजकन्या वासुलदत्ता ( वासवदत्ता ) व कौशाम्बी राजा उदयन यांची विवाहकथा धम्मपदाच्या २१–२३ या श्लोकांवरील टीकेंत दिलेली आहे. ती हकीकत अशी: प्रद्योतानें ( अवंतीच्या राजानें ) मजपेक्षां वैभवानें श्रेष्ठ कोण असा प्रश्न एकदां आपल्या दरबाऱ्यांस केला असतां त्याला स्पष्ट सांगण्यांत आलें कीं, कौशाम्बी नगरीचा राजा उदयन हा तुजपेक्षां श्रेष्ठ आहे. तेव्हां प्रद्योतानें उदयनावर स्वारी करण्याचें ठरविलें. तें पाहून दरबारी लोकांनीं पुढें दिल्याप्रमाणें सल्ला दिली. 'उघडाउघडीं हल्ला करण्यांत अर्थ नाहीं. कारण उदयनाचें सामर्थ्य फार मोठें आहे. तेव्हां दगाफटका करून उदयनास कैद करावें हें चांगलें. उदयनास सुंदर सुंदर हत्तींची शिकार करणें आवडतें, तेव्हां असा एकादा प्रसंग साधलेला बरा.' त्यावरून त्या राजानें एक लांकडाचा हत्ती तयार करवून त्याला उत्तम रंग वगैरे देऊन त्याच्या भोंवतीं साठ पाहारेकरी ठेविले, व जवळपास अशा तऱ्हेचा सुंदर हत्ती सांपडण्यासारखा आहे अशी बातमी उदयनाच्या कानावर जाण्याची तजवीज केली. उदयन या आमिषानें फसला, व प्रद्योताच्या लोकांनीं त्यास कैद केलें. परंतु उदयनाला गजवशीकरणाची विद्या अवगत असल्यामुळें प्रद्योतानें त्याला जीवदान व स्वातंत्र्य देऊं करून ती विद्या मला शिकव असें म्हटलें. उदयनानें उत्तर केलें कीं 'तूं गुरु म्हणून मला नमस्कार करशील तर तुला ती विद्या शिकवितों.' प्रद्योत म्हणाला, 'तुला, आणि नमस्कार ! हें तर कालत्रयींहि होणार नाहीं.' हें ऐकून उदयनानें विद्या सांगण्याचें नाकबूल केलें. पहिल्यानें प्रद्योताचा विचार उदयनास ठार करावें असा होता; पण उपर्युक्त विद्या त्यास एकट्यासच माहीत असल्यानें त्यानें जरासें नमतें घेतलें. त्यानें उदयनास विचारिलें, 'माझ्याखेरीज दुसऱ्या कोणी तुला नमस्कार केला तर त्याला तूं ही विद्या शिकविशील काय ?' उदयनानें होय म्हणून उत्तर दिलें. तेव्हां राजकन्येला पडद्याआड बसवावें, व पडद्याच्या बाहेरून उदयनानें ही विद्या तिला शिकवावी असें ठरलें. 'तुला एका कुब्जेला विद्या शिकवावी लागेल' असें उदयनास सांगण्यांत आलें होतें, व 'तुला एक खुजा मनुष्य विद्या शिकवील' असें राजकन्येला सांगण्यांत आलें होतें. परंतु एक दिवस खरा प्रकार उघडकीस आला. आणि उदयन व ती राजकन्या हीं दोघें प्रद्योत शिकारीस गेला असतां हत्तीवर बसून पळून गेले. उदयन आपल्या राज्यांत गेल्यावर त्यानें वासुलदत्तेला राज्ञीपदावर बसविलें. अशी ही गोष्ट आहे.

वासवदत्तेची गोष्ट पुढें भास कवीच्या एका नाटकाचा विषय झाली आहे. पण भारतानें बौद्धपक्षीय लोक आणि ऐतिहासिक या दोघांना न दुखवितां कथा सजविणें योग्य वाटून वासवदत्तेच्या बापाचेंच नांव अगदीं निराळें केलें आहे. पण यावरून बौद्धपक्षीय लोकांच्या वाङ्मयक्षेत्रांतील आग्रहीपणाची कल्पना येईल.

बृहत्कथेची क्षेमेंद्रसोमदेवीय आवृत्ति जरी प्रद्योत मगधाचा राजा होता म्हणून सांगत आहे तरी प्रद्योत अवंतीचा पति होता असें बुद्धस्वामीचें रूपांतर सांगत आहे. आणि त्यामुळें चंडमहासेनास प्रद्योत हें अपरनाम होतें काय हाहि प्रश्न उत्पन्न होण्यास अवकाश आहे. वासवदत्ता ही अवंतीच्या राजाची मुलगी होती आणि ती उदयनाची प्रिय शिष्या होऊन राज्ञी झाली हें कोणीच नाकारीत नाहीं. बौद्धकथा प्रद्योताचा मगधाशीं संबंध नाकारीत आहेत. त्यांच्या विधानांत ऐतिहासिक सत्य किती आहे हें निश्चयानें जरी सांगतां न आलें तरी प्रद्योत व उदयन हे समकालीन राजे होते व त्यांच्यांत सोयरिकहि झाली एवढें यावरून स्पष्ट होतें.

वरील कथेंत आणि कथासरित्सागरांतील याच कथेच्या आवृत्तींत फरक आहेत. ते येणेंप्रमाणें—

१. उदयनाचे प्रद्योत आणि चंडमहासेन असे दोन सासरे होते. त्यांपैकीं चंडमहासेन अवंतीचा राजा होता आणि प्रद्योत मगधाचा राजा होता.

२. चंडमहासेनाच्या मुलीचें नांव वासवदत्ता असें होतें.

३. चंडमहासेनानें लग्नाची गोष्ट अगोदरच मांडली होती असें बृहत्कथेंत आहे.

४. गजवशीकरण विद्येचा उल्लेख बृहत्कथेंत नाहीं. पडद्याआड मुलीस गजवशीकरणाची विद्या शिकविणें शक्य नाहीं.

गजवशीकरणाची विद्या पडद्याआड शिकविणें म्हणजे पाण्यांत न शिरतां पोहोणें शिकविण्यासारखें होय. असली बाष्कळ कथा सत्य असणें शक्य नाहीं. त्याप्रमाणेंच सत्य म्हणून प्रचलित होणेंहि शक्य नाहीं. उलट बृहत्कथा सांगत आहे त्याप्रमाणें उदयनानें संगीतादि विषय शिकविणें हेंच अधिक स्वाभाविक दिसतें.

प्रद्योत हा मगधराजा होता व त्याच्या मुलीशीं देखील उदयनाचें लग्न झालें, असें बृहत्कथा सांगतच आहे. परंपरागत आलेल्या कथांमध्येंच फरक असल्यामुळें ते फरक संशोधकांमध्यें भिन्न मतें उत्पन्न होण्यास कारण झाले आहेत.

बौद्ध कथा ही कथासंरक्षकाच्या परंपरेंतून आली नसून एका भोळसट भिक्षूनें आपल्या मठांत जशी ऐकली तशीच घातली व ती घालतांना कथा कथन करावयाचा नसून धार्मिक श्लोकावर भाष्य करण्याचा प्रसंग होता म्हणून या कथेंतील कुलसंबंधहि विश्वासार्ह नाहींत.

वर सांगितलेल्या व इतर बौद्ध कथांवरून प्रद्योत आणि उदयन यांचें कालैक्य त्याचप्रमाणें बुद्ध, अजातशत्रु आणि प्रसेनजित् यांचें कालैक्य हीं सिद्ध होतात. तथापि उदयन व अजातशत्रु यांचें कालैक्य म्हणजे उदयनाचें बुद्धकालीनत्व हीं सिद्ध होत नाहींत.

बौद्ध कथांतून पिंडोल नांवाच्या एका बौद्धमतानुयायी मनुष्यापाशीं अनेक वादविवाद होऊन उदयनानें बौद्ध संप्रदायाचा अंगीकार केला असें दिलें आहे; तथापि हा उदयन कौशाम्बीच्या सुप्रसिद्ध उदयनापासून निराळा आहे. कारण याच्या बापाचें नांव आणि मुलाचें नांव हीं कौशाम्बीच्या उदयनाच्या बापाच्या व मुलाच्या नावांशीं जुळत नाहींत. या बौद्ध उदयनाच्या बापाचें नांव परंतप होतें आणि मुलाचें नांव बोधि होतें. कौशाम्बीच्या उदयनाच्या बापाचें व मुलाचें नांव हीं शतानीक, वहीनर अशीं होतीं हें मागें सांगितलेंच आहे.

### १८९. बौद्धांच्या आग्रहाचा पुराणांवर झालेला परिणाम.

१८९. उदयनानंतर बुद्ध झाला. बुद्धकालीं उदयन ही प्रसिद्ध व्यक्ति होती आणि त्या व्यक्तीचा आणि बुद्धाचा कसातरी बादरायण संबंध जोडणें बौद्धांस अवश्य होतें. सांप्रदायाच्या अभिमानानें बौद्धांनीं व जैनांनीं वाङ्मय बिघडविलें आहे. जो सुप्रसिद्ध असेल तो आमच्या थोर पुरुषाचा शिष्य किंवा त्याजकडून पराभूत झालेली व्यक्ति होती असें दाखविण्याचा त्यांचा नित्याचा उपक्रम आहे. पुराणांतील राजावली बिनचूकच आहे असें आम्ही गृहीत धरीत नाहीं. तर पुराणकारांनीं देखील बुद्धोत्तर यादी बेसावधपणें समाविष्ट केली आहे. उदयनाच्या बाबतींत पौराणिकांच्या विधानांतील सदोषता नजरेस येत नाहीं. पुराणांच्या याद्यांमध्यें अनेक सदोषता आहेत, त्यांपैकींच इक्ष्वाकूंच्या संबंधानें सदोषता आहे. इक्ष्वाकूंची यादी पौराणिकांच्या हातीं लागली तेव्हां तीवर बौद्ध संस्कार बरेच झाले होते. बुद्ध आपणास इक्ष्वाकूंच्या कुळांतला म्हणवीत होता. बुद्ध आपला पूर्वज जो ओक्काक म्हणून सांगत असे तोच पौराणिक इक्ष्वाकु आहे अशा तऱ्हेचा आग्रह त्यांनीं धरिला आहे व दाशरथि राम हा आपला पूर्वज आहे अशीं गौतमबुद्धाचीं विधानें तर सुप्रसिद्धच आहेत. अशा प्रकारच्या परिस्थितींत जेव्हां बौद्धाचें राजदरबारांतून वजन वाढलें तेव्हां त्याजकडून राजवंशाच्या याद्या बिघडविल्या गेल्या असें स्पष्ट दिसत आहे. बौद्ध ग्रंथांमध्यें प्रसेनजित् हा कोसलाधिप होता हें सुप्रसिद्धच आहे. तर त्याचें याद्यांतून उच्चाटण करणें शक्य नव्हतें. तथापि या कोसलाधिप राजघराण्याचें महत्व बौद्धांना भासत होतें हें खचित. त्यांनीं बुद्धाच्या गौरवासाठीं आणि कोसल घराण्याचा हलकेपणा स्थापन करण्यासाठीं दोन प्रयत्न केलेले दिसतात. एका प्रयत्नांत त्यांनीं प्रसेनजिताच्या पूर्वजांमध्यें गौतमाला घातलें. हें बौद्धांचें विधान पौराणिकांनीं स्वीकारलें आणि त्यामुळें पुराणवाङ्मयांत पुढील ओळी उपस्थित झाल्या—

**“संजयस्य सुतः शाक्यः शाक्याच्छुद्धोदनोऽभवत्। शुद्धोदनस्य भविता सिद्धार्थो राहुलसुतः॥ प्रसेनजित्* ततो भाव्यः क्षुद्रको भविता तथा।”**

[ संजयाचा मुलगा शाक्य, शाक्याचा शुद्धोदन, त्याचा मुलगा सिद्धार्थ आणि त्याचा मुलगा राहूल, त्याच्या नंतर प्रसेनजित् आणि तदनंतर क्षुद्रक. ]

### १८९ अ. शाक्य आणि इक्ष्वाकू.

१८९ अ. येणेंप्रमाणें रामवंशी अवतार बुद्धाला देण्याची खटपट कित्येक बुद्धभक्तांनीं केली तर रामाचें कुल शाक्यांपेक्षां नीच होतें असें दाखविण्याची खटपट दुसऱ्या शाक्यांनीं केली आणि तें सिद्ध करण्यासाठीं पुढील कथा उत्पन्न केली.

---

* प्रसेनजित् याच्या ऐवजीं प्रश्नेजि, प्रसन्नाजि अशा तऱ्हेचीं रूपें आढळतात. यावरून मराठ्यांच्या नांवांत येणारा प्रत्यय ‘जी’ ( शिवाजी, संभाजी इत्यादि ) हा बराच जुना असावा, व तो ‘जित्’ या प्रत्ययाशीं संबद्ध असावा असें दिसतें.

को श ला धि पां चें शा क्यां शीं यु द्ध—

शाक्य कुलांपैकीं एका कुलाच्या अधिपतीच्या कन्येला, प्रसेजित् राजानें, बुद्धकुलाशीं सोयरिक करण्याच्या इच्छेनें मागणी घातली होती असें बौद्धग्रंथ सांगतात. शाक्य लोकांनीं या सोयरिकीमुळें आपल्यास हलकेपणा येतो असें ठरविलें; परंतु पुढें त्यांनीं वासभखत्तिया नांवाची एका सरदाराच्या दासीची कन्या त्याला दिली. तिजपासून त्याला मागें सांगितलेला विदूदभ नांवाचा पुत्र झाला. या विदूदभानें पुढें राज्यावर बसल्यावर, आपल्या बापाशीं कपट केल्याबद्दल शाक्य लोकांचा सूड उगविला. या लढाईची सविस्तर हकीकत कोठेंही उपलब्ध झालेली नाहीं; परंतु ही लढाई हा खराखुरा झालेला इतिहास आहे यांत शंका नाहीं असें बौद्धांच्या विधानांवर भाबडेपणानें विश्वास टाकणारा आंग्लबौद्ध ऱ्हीस डेव्हिड्स समजतो. ही लढाई बुद्धाच्या मरणापूर्वी एकदोन वर्षेंच झाली होती असें अनुमान काढलें गेलें आहे.*

या लढाईचें कारण म्हणून जें सांगण्यांत आलें आहे त्यासंबंधानें थोडासा संशय वाटतो. कारण ज्या तऱ्हेची सोयरीक व्हावयाचें ठरलें होतें, तशा सोयरिकी यापूर्वी झालेल्या होत्या अशा प्रकारची ग्वाही त्या भाकडकथेवर विश्वास टाकणारे खुद्द ऱ्हीस डेव्हिड्स देतात. मगध देशाच्या बिंबिसार राजाला अशाच एका कुळांतील मुलगी दिलेली होती, असें दाखवितात.

आमच्या मतें शाक्यसंहारक लढाई झाली असली तर तिचा उपयोग हलक्या समजल्या जाणाऱ्या शाक्यांच्या कुलाची प्रतिष्ठा वाढविण्यासाठीं बौद्धांनीं प्रयत्न कसा केला त्याचें दर्शक हें कथेचें विधान आहे.

प्रसेनजित् गौतमबुद्धाशीं समकालीन होता हें दाखविणाऱ्या कथा आहेत, त्याचप्रमाणें तो गौतमबुद्ध कालीन मगधराज, अजातशत्रु याच्याशीं समकालीन होता हें दाखविणाऱ्या देखील कथा आहेत.

अजातशत्रूचा कोशलराजाशीं संबंध येतो. कोशलचा राजा प्रसेनजित् याचा गौतमाशीं संबंध आला आहे. कोशलाधिप व प्रसेनजित् याच्याविषयीं जी एक मौजेची कथा आहे ती कथा प्रसेनजित् याचा गौतमाशीं संबंध कशा प्रकारचा होता हें स्पष्ट करीत आहे. पब्बतूपथ्यहर, खष्टिवण्णन, कोसिय, सेय्य, एकराज, मणिकुंडल, घट व मित्तामित्त या जातकांवरून असें दिसतें कीं, कोशलाधिप प्रसेनजित् हा आपल्या सीमेवर कांहीं बंड झालें होतें तें मोडण्याकरितां गेला असतां मागें त्याची स्त्री–गौतमानें त्यास मिळवून दिलेली मल्लिका–हिनें आपल्या एका प्रधानाबरोबर व्यभिचार केला. राजा परत आल्यावर त्यास तें वृत्त कळलें. मोहव्याप्तीमुळें त्यास मल्लिका सोडवेना, परंतु प्रधानास मात्र त्यानें बंदींत टाकिलें. कदाचित् मल्लिकेनें त्यामुळें आकांत केला असावा. पुढें राजानें त्या प्रधानाचें काय करावें म्हणून गौतमास सल्ला विचारला असतां गौतमानें जो सल्ला दिला तो विचार करण्यासारखा आहे. त्यानें राजास असा प्रश्न केला कीं, या प्रधानाच्या बुद्धिमत्तेमुळें तुम्हास त्याची आवश्यकता आहे कीं नाहीं? राजानें या प्रश्नास 'होय' म्हणून उत्तर दिल्यावर गौतमानें त्यास सोडून देऊन पुन्हां पूर्ववत् त्याच्या अधिकारावर त्यास स्थापावा असें सांगितलें.† या प्रसेनजितासंबंधानें असें दिसतें कीं, त्याचें घराणें इतर राजघराण्यांशीं सोयरिकीच्या संबंधानें बद्ध झालें होतें. परंतु याच संबंधामुळें त्यांना भांडणांचे प्रसंग अनेक वेळां येत. प्रसेनजित् म्हणून जो कोसलचा राजा वर सांगितला आहे त्याची बहीण कोसलदेवी बिंबसाराला दिली होती. कोसलदेवीचा सावत्र मुलगा अजातशत्रु यानें आपल्या बापाला म्हणजे बिंबिसाराला ठार मारिलें. (शेवटीं शेवटीं व्ही. स्मिथला ही पितृवधाची बौद्ध कथा बनावट असावी अशी शंका येऊं लागली होती!) तेव्हां प्रसेनजित् यानें काशी नगरी आपल्या ताब्यांत घेतली; कारण या नगरीचा सर्व वसूल कोसलदेवीच्या खाजगी खर्चाकडे लावून दिलेला होता. यामुळें साहजिकच अजातशत्रु व प्रसेनजित् यांच्यामध्यें लढाई जुंपली. प्रथमतः अजातशत्रूला जय मिळेलसें वाटत होतें, परंतु शेवटीं तो कैद केला गेला. अजातशत्रूनें त्या नगरीवरील आपला हक्क सोडल्याकारणानें संतुष्ट होऊन प्रसेनजित् यानें आपली मुलगी त्यास दिली, इतकेंच नव्हे तर ज्या नगरीबद्दल तो इतका भांडला तीच काशी नगरी त्याला आंदण म्हणून दिली. पुढें तीन वर्षांनीं प्रसेनजिताचा मुलगा विदूदभ यानें बापाविरुद्ध बंड केलें. प्रसेनजित् यावेळीं शाक्य देशामध्यें उलुंब या गांवीं होता. तेथून पळून जाऊन त्यानें अजातशत्रूची मदत घेण्याचा प्रयत्न केला. परंतु तेथपर्यंत पोंचण्याच्या आधींच तो आजारी पडून मृत्यु पावला.

* एका कालीं क्रांतिकारक म्हणून प्रसिद्ध असलेल्या रत्नागिरीच्या विनायकराव सावरकरांनीं याचा विषयावर 'सन्यस्तखड्ग' या नांवाचें नाटक लिहिलें आहे.

† वरील प्रकारची माहिती देऊन नंतर इतिहास व ऐतिहासिक या नियतकालिकांत कै. चांदोरकरांनीं बुद्धाच्या नीतिकल्पनांवर जी टीका केली आहे ती आम्हांस संमत नाहीं. उलट या प्रकारचा सल्ला देण्यांत गौतमानें त्यास योग्य वाटत होतें, तेंच निर्भयपणानें सांगितलें असें वाटतें.

वरील प्रकारच्या काशी, कोसल आणि मगध यांनीं गुंतविणाऱ्या कथा आहेत तथापि या सर्व कथा उदयनाला बुद्धाजवळ आणूं शकत नाहींत व प्रद्योताला देखील आणूं शकत नाहींत, आणि त्यामुळें बुद्धकाल आणि उदयनकाल हे एक नसून उदयनकाल दीड दोन वर्षें तरी अगोदर होता असें धरून इतिहासाची मांडणी केली पाहिजे.

**१९०. औदयन विवेचनाचा महाराष्ट्राच्या इतिहासाशीं संबंध—**

आपल्यापुढें प्रश्न महाराष्ट्राच्या इतिहासाचा आहे आणि उदयन राजानें दिग्विजय करतांना महाराष्ट्र आपल्या दिग्विजयांतून वगळला त्यामुळें उदयन राजाचा काल काढण्याचें महत्व आहे. अशोकापूर्वींचा ग्रंथविख्यात चक्रवर्ती राजा उदयनच होय. आणि उदयनानें पारसीकांचा पराभव केला तो कोणत्या पारसीकांचा केला, ते पारसीक दारीयसच्या पूर्वीं होते कीं नंतरचे होते इत्यादि प्रश्न आपल्या पुढें आहेत. आमच्यामतें या प्रश्नाविषयीं संदेहच नाहीं. उदयनकालीं दारियस ऊर्फ दारयवहू याचें अस्तित्त्वच शक्य नाहीं. आणि पारसीकांचा देशाला उपद्रव कुरुयुद्धाच्या पूर्वीं व उत्तरकालीं एकसारखा चालूच होता.

प्रद्योत नंतर बिंबिसारपर्यंत मागध राजे किती होऊन गेले हें आपणांस पाहिलें पाहिजे. उदयनानंतर वहीनर, दंडपाणि, निरामित्र, क्षेमक हे चार पौरव घराण्यांतील राजे झाले; आणि तो वंश त्यानंतर खुंटला. पुराणांच्या सांगण्याप्रमाणें प्रद्योताच्या नंतर पालक, विशाखयूप, अजक, नंदिवर्धन, शिशुनाग, काकवर्ण, क्षेमधर्म व क्षत्रौजस् हे राजे बिंबिसारापूर्वीं होऊन गेले. म्हणजे बिंबिसारापूर्वीं एकशें छत्तीस (१३६) वर्षें शैशुनागांनीं राज्योपभोग घेतला. आणि प्रद्योतांनीं (१३८) वर्षें राज्योपभोग घेतला; म्हणजे प्रद्योत व बिंबिसार यांच्यामध्यें फरक २७४ वर्षें होतो. जर बिंबिसार हा बुद्धाच्या तारुण्यकालीं राज्य करीत होता तर पुराणांच्याच म्हणण्याप्रमाणें प्रद्योताशीं संबंध आलेला उदयन हा बुद्धापूर्वीं २५० ते २७६ वर्षें म्हणजे ख्रिस्तपूर्व ८०० च्या सुमारास आणावा लागतो. बऱ्याच संशोधकांची प्रवृत्ति उदयनास बुद्धकालांतच आणण्याची आहे. प्रद्योतांच्या इतक्या दूर प्राचीनतेविषयीं शंका घेणाऱ्यांमध्यें सर्वांत जुने व्यंकटेश्वर अय्यर हे आहेत. (इंडि. अँटि. वर्ष. ग्रंथ ४४–४५) त्यांचें म्हणणें असें आहे कीं बौद्ध व जैन दंतकथांवरून प्रद्योत हा बिंबिसाराचा समकालीन आहे. त्याअर्थीं प्रद्योत हे मगधराजे धरतां येणार नाहींत, व ह्या राजावलीची वाट निराळी लावली पाहिजे हें त्यांचें म्हणणें अनेक लेखकांनीं घोळून घोळून मांडलें असलें तरी तें योग्य वाटत नाहीं. पौराणिकांनीं सांगितलेला इतिहास जैन व बौद्ध यांच्या दंतकथांवरून चुकीचा ठरविणें ही कल्पनाच गैर आहे. आपल्यापुढें मांडलेल्या कल्पना म्हटल्या म्हणजे मागध राज्यें दोन होतीं आणि शैशुनाग आणि प्रद्योत हे एकामागून एक राजे नसून समकालीन दोन राजे होते त्या सर्व बुद्ध आणि प्रद्योत यांस समकालीन करण्यासाठीं आहेत. पुराणें सांगतात तसें खरें धरण्यास काय अडचणी येतात याविषयीं पूर्ण कल्पना झाल्याशिवाय, पुराणें देतात ती माहिती खोटी तरी कशी मानावयाची? उदयनास बुद्धपूर्व २५० वर्षें धरण्यास आमच्या मतें कोणचीहि अडचण नाहीं. आणि तसें धरल्यानें उपलब्ध स्मारकांच्या किंवा वाङ्मयीन उल्लेखांच्या संगतीची कोणतीहि अडचण उत्पन्न होत नाहीं.



**चित्रांक २७—बेडसें येथील कांहीं लेणीं**

## प्रकरण २३ वें

# प्राचीन अपरांत

### १९१. अपरांतविषयक ज्ञानाची परंपरा.

उदयनकालीन अपरांताची माहिती उदयनाच्या दिग्विजयाच्या वर्णनांत नाहीं; तथापि या प्रदेशाविषयीं आपणांस फार प्राचीन कालापासून ज्ञान आहे. महाभारतांत अपरांताचा (भीष्मपर्व अ. ९) आणि सहदेवदिग्विजयाच्या प्रसंगानें शूर्पारक क्षेत्राचा उल्लेख आहे. तो उल्लेख अधिसीमकृष्णाच्या पूर्वीच्या कालांत असलेल्या दंतकथांचा व्यंजक असावा असें वाटतें. तसें वाटण्याचीं कारणें मागें दिलींच आहेत. कालबोधक उल्लेख पहावयाचे झाल्यास संग्रहस्वरूपी आणि वारंवार संपादित होत असलेल्या ग्रंथाकडे न जातां एकविषयविशिष्ट ग्रंथाकडे किंवा लेखाकडे अवलोकन अधिक उपयुक्त होईल. तसे लेख मिळणें कठिण आहे; कारण प्रत्येक ग्रंथ वारंवार संपादिला गेला आहे व नवीन उपलब्ध कथा त्यांत घातल्या गेल्या आहेत. अपरांतांतील म्हणजे कोंकणांतील अनेक स्थानांचे उल्लेख आपणापाशीं आहेत. त्यांचा कालनिश्चय खात्रीपूर्वक करतां येत नाहीं, पण वृत्तकालाविषयींचें ग्रंथकाराचें विधान आपणांस इतर पुराव्याच्या अभावीं मार्गदर्शक होईल या दृष्टीनें आम्ही पुढील पाटलिपुत्र संस्थापना उदयनपूर्व धरीत आहोंत. कारण उदयनास सांगितलेल्या कथांत पाटलिपुत्राचे उल्लेख आलेले आहेत.

कोंकणविषयक कथांचे उल्लेख आपणांस पुढीलप्रमाणें मिळतात.

(१) महाभारतांतील व इतर पौराणिक उल्लेख.

(२) बृहत्कथेंतील उदयनाच्या पूर्वीच्या काळाचें चित्र दाखविणारे उल्लेख.

(३) उदयनकालीन उल्लेख. हे बहुतेक नाहींतच.

(४) उदयनापासून कथापीठलंबकरचनाकालापर्यंत म्हणजे ख्रिस्तजन्मकालापर्यंतचे उल्लेख.

यांपैकीं पौराणिक उल्लेख येथें देण्याचें कारण नाहीं. ते विशेषेंकरून अपरांत व गोकर्ण या संबंधाचे आहेत. कारण गोकर्णाचा जो उल्लेख भारतांत आला आहे तो पुन्हां बृहत्कथेंत आलाच आहे, व अपरांतासंबंधानें पुष्कळच उल्लेख आहेत. रत्नागिरी जिल्ह्यांतील जी कोकणपट्टी आहे तीसंबंधानें उल्लेख नाहींत. बृहत्कथेंतील उल्लेखांकडे आतां आपण वळूं. तिच्यांतील एक कथा संयमधर्माचें वेदपूर्वकाळीं महाराष्ट्रांत अस्तित्व होतें, त्याचें उत्तरकालीं सातत्य दाखविणारी आहे. दुसरी कथा अतिप्रेमाचे दुष्परिणाम होतात असें सिद्ध करण्यासाठीं आली आहे. अर्थात् अनेक स्त्रिया करूं इच्छिणाऱ्या वत्सराजास स्त्रियांवर मन फार गुरफटवूं देऊं नये असें सांगणारीच कथा आहे. ती कथा (६-७) येथें अवतरितों.

### १९२ कोंकणांतील प्रेमावेशाच्या व इतर अद्भुत कथा.

श्रुतसेनाची कथा (पहिलें आश्चर्य)

मागें दक्षिणदेशांतील गोकर्णपुरांत श्रुतसेन म्हणून एक मोठा विद्वान् व कुलभूषण राजा होता. सर्व ऐश्वर्यानें संपन्न असलेल्या त्याला अनुरूप भार्या नव्हती, एवढेंच काय तें एक न्यून होतें. एकदां तो राजा त्याविषयीं चिंता करीत असतां, अग्निशर्मानामक ब्राह्मण त्याला म्हणाला,-"राजन्, मी दोन आश्चर्यें पाहिलीं, तीं तुला सांगतों. मी एकदां तीर्थयात्रा करीत, ऋषीच्या शापानें मगरी झालेल्या पांच अप्सरांचा अर्जुनानें ज्यांतून उद्धार केला, त्या पंचतीर्थास गेलों. पांच दिवस उपवास करून स्नान केलें असतां नारायणाचें अनुचरत्व देणाऱ्या त्या श्रेष्ठ तीर्थांत स्नान करून मीं जों पुढें जात आहें, तों नांगरलेल्या एका शेताच्या मध्यभागीं शेतकरी गात आहे, असें मला आढळलें. इतक्यांत मार्गानें जाणाऱ्या एका संन्याशानें त्या शेतकऱ्याला पुढची वाट विचारली; पण तो आपल्या गाण्यांत इतका गुंग झाला होता कीं त्याचें संन्याशाकडे लक्षच गेलें नाहीं. त्यामुळें संन्याशाला राग आला व तो शेतकऱ्याला कमीजास्त बोलूं लागला. तेव्हां आपलें गाणें बंद करून शेतकरी म्हणाला, वाहावारे वाहवा! मूर्खालाही समजलेलें धर्माचें सार तुला संन्याशाला समजूं नये काय?

त्यावर संन्यासी कौतुकानें म्हणाला-तुला काय समजलें तें सांग पाहूं? तेव्हां शेतकरी म्हणाला,-"या थंड सावलींत बैस, म्हणजे मी सांगतों. या प्रदेशांत ब्रह्मदत्त, सोमदत्त, व विश्वदत्त असे तीन ब्राह्मण भ्राते आहेत. त्यांतील पहिल्या दोघांचीं लग्नें झालीं आहेत; पण शेवटचा धाकटा भाऊ अविवाहित आहे. आपल्या दोघां वडील भावांची एखाद्या नोकराप्रमाणें सेवा करणारा तो कधींही क्रोध न करतां येथें मजबरोबर रहात असे. मी त्यांचा शेतकरी आहें; पण त्याचे भाऊ त्या कोणालाही पीडा न देणाऱ्या सरळ स्वभावाच्या, सन्मार्गवर्ती साधूला हा मतिमंद व मृदु आहे, असें समजत असत.

एकदां त्याच्या भावजयींनीं त्याला एकांतांत बोलाविलें, पण त्या कनिष्ट विश्वदत्तानें मातेप्रमाणें त्यांचें निराकरण केलें. तेव्हां रागावलेल्या त्या दोघीजणींनीं आपापल्या पतीपाशीं जाऊन 'हा तुमचा कनिष्ठ भ्राता आमच्याकडे पापदृष्टीनें पहातो' असें खोटेंच सांगितलें. त्यामुळें ते दोघेही त्याच्यावर आंतल्या आंत फार रागावले. दुष्ट स्त्रियांच्या खोट्या चहाड्यांनीं मोहित झालेल्या त्यांनीं खऱ्याखोट्याचा विचार केला नाहीं. त्यांनीं आपला क्रोध व्यक्त न करतां–शेतांतील वारूळ सारखें कर जा–असें त्याला सांगितलें. तेव्हां तो कुदळ घेऊन शेतांत आला व वारुळ खणूं लागला. 'तें तूं खणूं नकोस; तेथें मोठा थोरला नाग आहे,' असें मी त्याला सांगितलें; पण हा मरावा अशी इच्छा करणाऱ्या श्रेष्ठ भ्रात्यांच्या आज्ञेचें उल्लंघन करावयाचें नाहीं, अशा निश्चियानें 'काय व्हावयाचें असेल तें होईल' असें म्हणून त्यानें तें खणलें. तों त्याला त्यांत सोन्यानें भरलेली एक घागर सांपडली. काळसर्प कोठें दिसलाही नाहीं. धर्म सज्जनांचें सदा सांनिध्य करीत असतो. त्यानें ती घागर मी 'नको नको' म्हणत असतांनाही वडिलांच्या भक्तीनें भावांनाच नेऊन दिली. पण त्या भावांनीं थोडेंसें धन देऊन मारेकऱ्यांकडून त्याचे हात पाय तोडविले; पण तो त्यांच्यावर रागावला नाहीं. नंतर त्या क्रोधरहित सत्यधर्मामुळें त्याला पुनः हातपाय आले. तें पाहून त्या दिवसापासून मी सर्व क्रोध सोडून दिला आहे; पण तूं तापसी असूनही अद्यापि क्रोध सोडला नाहींस. क्रोध सोडल्यानें स्वर्ग हातीं कसा लागतो तें तूं आतांच पहा." असें म्हणून व शरीर सोडून तो शेतकरी आमच्या समक्ष स्वर्गलोकास गेला.

राजन्, हें एक आश्चर्य मला दिसलें व दुसरें कोणतें तें सांगतों.—( दु स रें आ श्च र्य )

तीर्थयात्रा करीत पुढें जात असतांना, मी समुद्रतीरावरील वसंतसेनराजाच्या राष्ट्रास पोंचलों. तेथें राजसत्रांत भोजन करावयास मी चाललों असतां, तेथील द्विज मला म्हणाले,– "अरे ब्राह्मणा, तूं या मार्गानें जाऊं नकोस. येथें राजकन्या बसली आहे. विद्युद्द्योता असें तिचें नांव असून एखाद्या मुनीनें जरी तिला पाहिलें, तरी तो कामशरपीडित व उन्मत्त होईल, इतकी ती सुंदर आहे"–तें ऐकून मी म्हटलें,– "त्यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. कारण मी जणुं काय दुसरा मदनच अशा श्रुतसेनराजाला नेहमीं पहात असतों. तो कोठें फिरावयास निघाला म्हणजे त्याचे रक्षक सतीव्रतभंग होईल, या भीतीनें कुलस्त्रियांना त्याच्या मार्गांतून दूर करीत असतात.

पण या माझ्या भाषणावरून मी तुमचा आश्रित आहें, असें जाणून तेथील पुरोहित व सत्राचा अधिपति यांनीं मला भोजनाकरितां राजापाशीं नेलें. तेथें कामाची जणुंकाय साक्षात् जगन्मोहमंत्रविद्याच अशी ती राजकन्या मीं पाहिली, व बऱ्याच अवकाशानें तिच्या दर्शनामुळें उद्भवलेल्या क्षोभाचें नियमन करून मी मनांत असा विचार केला, आमच्या प्रभूची जर ही भार्या झाली तर तो राज्यालाही विसरेल. पण हा वृत्तांत मला स्वामीच्या कानांवर घातला पाहिजे. नाहींतर उन्मादिनी* व देवसेन यांच्यासारखा प्रकार व्हावयाचा.

यास्तव स्वामीला न सांगितल्यामुळें असा कांहीं प्रमाद घडल्यास, मोठा द्रोह केल्यासारखें होईल.–असा विचार करून मी हें दुसरें आश्चर्यही येथें येऊन सांगितलें आहे.

ब्राह्मणाच्या तोंडचें हें वर्तमान ऐकून श्रुतसेन राजा विद्युद्द्योतेविषयीं अतिशय उत्सुक झाला, व त्याच ब्राह्मणाला तेथें पुनः पाठवून व त्या सुंदरीला आणवून त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें. नंतर सूर्याच्या प्रभेप्रमाणें ती राजपत्नी राजाच्या शरीराला सोडून क्षणभरही कधीं दूर झाली नाहीं. कांहीं दिवसांनीं मातृदत्ता नांवाची एक महाश्रीमान् वैश्याची रूपगर्वित कन्या त्या राजाला स्वतः वरण्याकरितां आली. अधर्माच्या भीतीनें राजानेंही तिचा स्वीकार केला; पण तें कळतांच विद्युद्द्योतेचें हृदय विदीर्ण झालें व ती मेली. तिची ती शोचनीय अवस्था पाहून व तिला मांडीवर घेऊन रडणाऱ्या राजाचेही प्राण गेले. वैश्यकन्या–मातृदत्ता सती गेली, व हा दुःखकर वृत्तांत ऐकून सर्व राष्ट्र दुःखी झालें. नंतर श्रुतसेनाच्या शत्रूंनीं त्याचें राष्ट्र वांटून घेतलें."

एवंच पश्चिम किनाऱ्याचा अन्य देशांशीं संबंध फार प्राचीन काळापासून होता आणि त्यामुळें त्याच्या इतिहासाचे धागे फार प्राचीन काळापासून नजरेस येतात. भृगूंच्या कर्तृत्वाच्या काळांत त्यांचा कोंकणांतील इतिहास कुरुयुद्धपूर्वकाळांत मोडतो तथापि बुद्धकालीन व बुद्धाच्या अत्यंत निकटवर्ति असलेल्या बुद्धपूर्वकालीन इतिहासाचे जे अंश आज आपल्यासमोर आहेत, ते एकत्र करून त्यांवर येथें विचार करणें अवश्य आहे. कोंकणपट्टींतील अनेक स्थानांविषयीं उल्लेख वाङ्मयांत उपलब्ध आहेत. गोकर्ण, हें अत्यंत प्राचीन स्थान होतें, अपरान्त हेंही प्राचीन स्थान म्हणून उल्लेखिलें आहेच. दोहोंचा संबंध भारतांत येत आहे, आणि तो उल्लेख बृहत्कथेंत देखील आहेच. कोंकण हा शब्द देखील अत्यंत प्राचीन काळीं प्रचलित असावा.

---

* लंबक ३. तरंग १५. यांत ही सविस्तर कथा आहे.

### १९३. महाराष्ट्राचा व कोंकणचा मद्राशीं वैवाहिक संबंध.

१९३. अपरांताच्या कथा, गोकर्णाच्या कथा, दक्षिणदेशीय कथा म्हणून ज्याप्रमाणें प्रसिद्ध आहेत, त्याप्रमाणेंच कोकणाधिपतीच्या कथा देखील प्रसिद्ध आहेत.

चंद्रप्रभ राजा याचा मुलगा सूर्यप्रभ हा मोठा शूर राजा झाला. त्याप्रमाणेंच तो अनेक स्त्रिया करणारा झाला. त्याच्या स्त्रियांमध्यें अनेक प्रकारच्या अनेक जातीच्या स्त्रिया होत्या. त्यांच्यामध्यें कोंकण आणि महाराष्ट्र यांतीलहि स्त्रिया होत्या, आणि त्या स्त्रिया एकत्र जमून आपल्या पतीच्या शृंगारिक लीलांविषयीं चर्चा करतांना दाखविल्या आहेत. तो देखावा आज अनेक बायका करणाऱ्या राजे लोकांच्या अंतःपुरांतील आयुष्यक्रमाविषयीं ज्यांना थोडी बहूत माहिती असेल त्यांना अपरिचित वाटणार नाहीं.

सूर्यप्रभाच्या स्त्रियांच्या गोष्टी.

त्या वेळीं बोलतां बोलतां एक राजपुत्री म्हणाली,—'आज आर्यपुत्र एकटेच कसे राहिले आहेत कोण जाणे.' त्यावर दुसरी म्हणाली,—'संग्रामांत स्वजनांचा क्षय झाल्यामुळें, दुःखित झालेल्या त्यांना आज विषयभोग कसे सुचणार?' तिसरी हंसून म्हणाली,—'आतां जर एकादी नवी उत्तम कन्या मिळाली तर ते सर्व दुःख विसरतील.' तें तिचें थट्टेचें भाषण न आवडल्यामुळें चवथी सूर्यप्रभ-पत्नी म्हणाली,—'आमचे प्राणनाथ जरी स्त्रीलंपट असले, तरी असल्या संकटप्रसंगीं त्यांना स्त्रीसुख प्रिय वाटणार नाहीं. तें ऐकून आणखी एकजण विस्मयानें म्हणाली,—'पण खरेंचबाई, आमचे आर्यपुत्र इतके शूर, वीर, मानी व विद्यावान् असतांना ते स्त्रियांवर इतके लुब्ध कसे होतात? आम्हीं इतक्या जणी आहों, तरीसुद्धां त्यांना आणखी मिळतील तितक्या बायका हव्याच आहेत. तृप्ति म्हणून कशी ती नाहींच.' तें ऐकून त्यांतील एक शहाणी मनोवती नांवाची भार्या म्हणाली,—'सख्यांनों, राजे अनेक स्त्रिया कां करीत असतात तें मीं सांगतें, ऐका. निरनिराळ्या देशांतील स्त्रियांमध्यें निरनिराळे गुण असतात. त्यांचें रूप, वय, चेष्टा, विज्ञान इत्यादिकांमध्येंही फरक असतो. याचा प्रत्यय पहावयाचा असल्यास आपल्या पैकींच कर्नाटक, कोंकण, महाराष्ट्र, गुजरात, कच्छ, सिंधु, पंचांबु (पंजाब), मध्यदेश, इत्यादि निरनिराळ्या देशांच्या स्त्रियांकडे पहा. म्हणजे मी काय म्हणतें तें कळेल. अनेक देशांच्या स्त्रिया आपापल्या देशादि आचारांच्या योगानें राजांचें मनोरंजन करितात. कित्येक आपल्या सुंदर मुखांनीं त्यांचें मन हरण करितात. कित्येकींच्या शरिराचे बांधे त्यांच्या आसक्तीस कारण होतात. कांहीं राजकन्या आपल्या रम्य वेशानेंच त्यांना स्ववश करितात. कांहींजणींच्या पुष्ट अवयवाकडे पाहून ते लोलुप होतात. एकादी राजकन्या कलाकौशल्य व चातुर्य यांच्या योगानेंच पतीस आवडते. एकादीचा गौरवर्ण जसा विजयी राजाला प्रिय वाटतो, तसाच एकादीचा काळावर्णही त्याला रम्य भासतो. सारांश, निरनिराळ्या देशाच्या इतर प्राण्यांप्रमाणें स्त्रियांमध्येंही वैचित्र्य असतें. त्या सर्वगुणवैचित्र्याचा अनुभव घेण्याच्या इच्छेनें भाग्यवान् नरेश्वर अनेक देशच्या राजकन्यांशीं विवाह करितात. द्रव्याचें अनुकूल्य असल्यावर स्त्रीसारखा उपभोग्य पदार्थ विवाहावांचूनही प्राप्त होणें शक्य आहे; पण उत्तम पुरुष परस्त्रियांना नागिणीप्रमाणें भीत असतात. यास्तव सर्वसामर्थ्यसंपन्न पतीविषयीं अशा भलभलत्या कल्पना करीत बसूं नये. उलट त्यांच्या मुखानेंच स्वतः सुखी होऊन रहावें.' मनोवतीच्या या उपदेशास मदनसेनाप्रभृति इतर सुज्ञ सपत्नींनींही आपलें अनुमोदन दिलें. त्यामुळें इतर अल्लड मुलींची समजूत पडून त्यांनीं स्वपतीविषयीं कुत्सित कल्पना न करण्याचा निश्चय केला. त्यानंतर गोष्टींच्या भरांत आल्यामुळें त्यांनीं लज्जा सोडून आपापल्या विलासांचे प्रकार एकमेकींस सांगितले. कारण मनांतल्या गुप्त गोष्टीही दुसऱ्याला सांगितल्यावांचून स्त्रियांना रहावत नाहीं. (सूर्यप्रभलंबक तरंग ५.)

वरील कथेमध्यें कोंकणाचा जो उल्लेख आला आहे त्या कोंकणाधिपतीची कन्या सूर्यप्रभानें कशी मिळविली वगैरे गोष्टीविषयीं बृहत्कथेंत माहिती दिली आहे. सूर्यप्रभानें कोंकणाधिपतीची मुलगी चंद्रकावती अगोदरच मिळविली होती आणि मागाहून कोंकणाधिपतीची पद्धतवार मान्यता मिळवून दोघांचें लग्न झालें असें दाखविलें आहे. तें लग्नाचें वर्णन देखील मासलेवाईक आहे. कोंकणांतील दारिद्र्याचा बोभाटा त्यावेळेस देखील झाला होता असें दिसतें. सूर्यप्रभ विमान मार्गानें कोंकणांत शिरला. तेथें चंद्रिकावती व सूर्यप्रभ यांचा महोत्साहपूर्वक विवाह झाला. कोंकणासारख्या दरिद्री देशाच्या राजानेंहि कन्यास्नेहामुळें जांवयास इतकीं रत्नें दिलीं कीं, त्यांच्या ढिगाकडे पाहून वीरभटादि लज्जित झाले. इत्यादि मजकूर तेथें दिला आहे. या वृत्ताचा उल्लेख बृहत्कथा मंजरीनें दिला आहे.

**सुभटाख्यस्य तनयां कौङ्कणाधिपतेस्तथा।**
**आससाद सुधासादिसौन्दर्यां चन्द्रिकावतीम्॥**

कथासरित्सागरांत मात्र दिलेले श्लोक महत्वाचे आहेत. त्यांत कोंकण आणि अपरांत हे दोन्ही शब्द आलेले आहेत. त्यांतील कांहीं श्लोकांचें येथें अवतरण करणें अयोग्य होणार नाहीं. सूर्यप्रभाचा बाप चंद्रप्रभ यास आलेलें कोंकणाधिपाचें पत्र पहिल्या दोन श्लोकांत आहे. या पुढच्या श्लोकांत लग्नाचें वर्णन आहे.

'श्रीमानुन्नतवंशमौक्तिकमणिश्चन्द्रप्रभोभूपती
राजा श्रीसुभटेन सादरमिदं श्रीकोङ्कणाद्बोध्यते।
नीता मे तनयापहृत्य रजनौ सत्वेन केनापि या
सा प्राप्ता तव सूनुनेत्यवगतं यत्तेन तुष्टा वयम्॥
तद्युक्तेन सुतेन तेन सह तत्सूर्यप्रभेणोद्यमो
युष्माभिः क्रियतामनर्गलमिहात्यस्मद्गृहाभ्यागमे।
यावत्तां परलोकतः पुनरिव प्रत्यागतामात्मजां
पश्यामश्च विवाहकार्यमधुना कुर्मश्च तस्या वयम्॥'

इत्यत्र वाचिते लेखे सिद्धार्थेन तथेति सः।
राजा चन्द्रप्रभो दूतं सच्चकार जहर्ष च॥
आनाययच्च सुभटस्यान्तिकं चन्द्रिकावतीम्।
तत्सुतामपरान्तं तं प्रहस्तं प्रेष्य सत्वरम्॥
प्रातश्च जग्मुः सर्वे ते कृत्वा सूर्यप्रभं पुरः
अपरान्तं विमानेन जनमेजय संयुताः॥
तत्र तान्सुभटो राजा दुहितृप्राप्तिनन्दितः।
भृशमानर्चे चक्रे च सुतापरिणयोत्सवम्॥
ददौ च चन्द्रिकावत्यै सोऽस्यै रत्नादिकं तथा।
यथा वीरभटाद्यास्ते स्वदत्तेन ललज्जिरे॥

येणें प्रमाणें उदयनपूर्व कालींच अपरांत चांगला वसलेला असून एकंदर राजमंडळांत तेथील राजांचा वैवाहिक दृष्टीनें संबंध होता, असें कथालेखक समजत असत हें स्पष्ट होतें.

कथापीठलंबकांतील कथा सांगणें म्हणजे नंदकालाकडे वळणें आहे. किंबहुना गुणाढ्योत्तर कालाकडे वळणें आहे. ज्या दिवसांत गुणाढ्य हाच अद्भूत कथेचा विषय झाला त्याच दिवसांत पाटलिपुत्राच्या उत्पत्तिविषयक झालेली कथा प्राचीन इतिहासदर्शक कोठून होणार, असें म्हणून टाकतां येणार नाहीं. कोणत्याहि पूर्वकालांतील कथा उत्तरकालीन कथेंत जडविली जाऊं शकते. शिवाय ती कथा मनोरंजक आहेच तर ती वाचल्यानें वाचकास शीण होण्याची भीति नाहीं. कथा सविस्तर वाचली म्हणजे त्या कथेंत प्राचीन कालचे अवशेष काय आहेत याविषयीं विचार करतां येईल.

### १९४. चिंचिणी बंदर आणि इतर अपरांत.

१९४. शातवाहनपूर्वकालीन म्हणून ज्या आठवणी बृहत्कथेंतील पीठलंबकांत संरक्षून ठेवल्या गेल्या आहेत त्या विविध म्हणजे वाङ्मयविषयक व राज्यविषयक आहेत. त्यांच्या उद्धरणाकडे आणि स्वीकाराकडे आतां लक्ष दिलें पाहिजे; चिंचिणी या बंदराची आठवण पाटलिपुत्र नगराच्या उत्पत्तीच्या स्पष्टीकरणाच्या निमित्तानें आलेली आहे. हें बंदर पश्चिम समुद्रावरचें म्हणून ग्रंथांत सांगितलें आहे, त्याअर्थी आजच्या चिंचिणी बंदराविषयींच तो उल्लेख आहे, यांत शंका नाहीं. त्या कथेंत चिंचिणीचें अस्तित्व पाटलिपुत्राच्या संस्थापनेच्या पूर्वीचें आहे, अशी गोष्ट सांगणाऱ्यानें स्वकालीन समजूत व्यक्त केली आहे. पाटलिपुत्राचा संस्थापक चिंचिणीचा होता, असें सांगितलें आहे. त्याची कथा पुढील प्रमाणें आहे. कथारक्षणाचें श्रेय वररुचीस दिलें आहे, आणि वररुचीस देखील जुनी आठवण म्हणून त्याचा गुरू सांगत आहे, त्यावरून कथेचें सत्यत्व सिद्ध झालें नाहीं तरी प्राचीनत्व सिद्ध होईल.

पा ट ली पु त्र—न ग रा च्या उ त्प त्ती ची क था.

विंध्याद्रीच्या वनामध्यें वररुचि कथा सांगत असतां व काणभूति एकाग्र मनानें ऐकत असतां, तो पुनः म्हणाला, " अशा रीतीनें आमचें अध्ययन निर्विघ्नपणें चाललें असतां एकदां आपल्या आह्निक क्रिया आटोपून स्वस्थचित्तानें बसलेल्या वर्षाचार्यांस आम्ही हात जोडून म्हटलें, " गुरुवर्य, हें नगर सरस्वती व लक्ष्मी यांचें क्षेत्र कसें झालें, तें आम्हांस सांगा. " त्यावर तो म्हणाला, " ऐका. गंगातीरीं हरिद्वारजवळ कनखल म्हणून एक पावन क्षेत्र आहे. तेथें एक दाक्षिणात्य द्विज भार्येसह तप करीत राहिला होता. त्यास तेथेंच तीन पुत्र झाले. पुढें लवकरच तो भार्येसह मरण पावला. तेव्हां ते पुत्र विद्यार्जनाच्या इच्छेनें राजगृह–नामक स्थानास गेले. तेथें ते विद्या शिकले. पण कोणी नाथ नसल्यामुळें ते फार दुःखित होत असत. स्वामिकुमाराच्या दर्शनाकरितां ते दक्षिणापथास गेले. तेथें समुद्राच्या कांठीं चिंचिनी–नामक नगरी आहे; त्यांत जाऊन भोजिकसंज्ञक द्विजाच्या घरीं ते राहिले. त्या पुत्ररहित ब्राह्मणानें या योग्य वरांस आपल्या तीन कन्या व धन देऊन तप करण्याकरितां गंगातीरीं गमन केलें. ते श्वशुरगृहीं रहात असतां एकदां वृष्टीच्या अभावामुळें त्या प्रांतांत मोठा दुःष्काळ पडला. तेव्हां आपल्या साध्वी भार्यांसही सोडून ते तेथून निघून गेले. 'निर्दयांच्या हृदयास संबंधी जनांचा विचार स्पर्शही करीत नाहीं' म्हणून जें म्हणतात तें कांहीं खोटें नव्हे. ते निघून गेल्यावर त्या तिघींतील मध्यम भगिनी गरोदर आहे, असें कळलें. त्यामुळें त्यांनीं आपल्या पित्याच्या यज्ञदत्त–नामक मित्राचा आश्रय धरिला व आपल्या भर्त्यांचें चिंतन करीत त्या तेथें राहूं लागल्या. योग्य समयीं त्यांतील मध्यमेस पुत्र झाला. त्याच्यावर त्या तिघींचेंही सारखेंच प्रेम जडलें.

एकदा महेश्वर आकाशमार्गानें जात असतांना त्याच्या अंकावर बसलेली स्कंदजननी त्या बालकास पाहून दयेनें म्हणाली, "हे देव, पहा. या बालकावर या तिघीजणी मोठें प्रेम करीत आहेत व हा आमचें दुःख नाहींसें करील, अशी आशा धरून राहिल्या आहेत. यास्तव यांचा मनोरथ पूर्ण होईल असें करा."

प्रियेचें हें दयापूर्ण भाषण ऐकून वरद देव तिला उलट म्हणाला, "यानें आपल्या भार्येसह पूर्वजन्मीं माझी आराधना केली होती. त्यामुळें भूलोकीं त्या सुकृताचें फल भोगण्याकरितां याचा हा जन्म झाला आहे. त्याची सहधर्मचारिणी महेंद्रवर्ण राजाची कन्या झाली आहे. ती योग्यसमयीं याची भार्या होईल." प्रियेस इतकें सांगून त्या देवानें त्या तिघी साध्वींस स्वप्नांत असें सांगितलें–हा तुमचा लहानगा पुत्र 'पुत्र' या नांवानेंच प्रख्यात होईल. हा निजून उठला म्हणजे याच्या मस्तकप्रदेशीं एक लक्ष सुवर्ण प्रत्यहीं सांपडेल व हा राजा होईल. त्या जागया झाल्या; निजून उठलेल्या बालकाच्या उशाशीं एक लक्ष सुवर्णमुद्रा त्यांस मिळाल्या त्यामुळें त्यांचा आनंद गगनांतहि मावेनासा झाला. आपलें व्रतानुष्ठान सफल झालें, असें त्यांस वाटलें. प्रतिदिनीं मिळणाऱ्या त्या सुवर्णाच्या योगानें शरीराप्रमाणेंच ज्याचा कोषही प्रत्यहीं वाढत आहे, असा तो पुत्रक पुढें राजा झाला.

राजा झाल्यावर त्यानें आपले वडील व चुलते यांस आकर्षण करण्यास युक्ति म्हणून दानास आरंभ केला. त्याची वार्ता ऐकून त्याचे पितरही तेथें आले. त्यांच्या पत्नींनीं व लोकांनीं त्यांस ओळखिलें व शेवटीं अतुल राजलक्ष्मी व साध्वी भार्या त्यांस प्राप्त झाल्या. पण काय आश्चर्य सांगावें! काणभूते, सदाचरणानें सर्व आपत्तींचा क्षय होतो हें प्रत्यक्ष अनुभवास आलें तरी अविवेकानें अंध झालेल्या दुरात्म्यांचा स्वभाव बदलत नाहीं. कांहीं दिवसांनीं त्या तिघांस राज्याची इच्छा झाली व त्यामुळें पुत्रास मारून टाकण्याचा संकेत करून ते त्यास विंध्यवासिनीच्या दर्शनाचें निमित्त सांगून घेऊन गेले. त्या देवीच्या गर्भागारांत (गाभाऱ्यांत) वधकां (मारेकऱ्यां) स त्यांनीं पूर्वीच बसवून ठेविलें होतें. मंदिराजवळ जाऊन पोंचल्यावर ते पुत्रकास म्हणाले, "तूं अगोदर एकटाच आंत जा व या ईश्वरीचें दर्शन घे." तेव्हां विश्वासानें तो आंत शिरला; व आपल्याला मारण्यास सज्ज झालेल्या मारेकऱ्यांस पाहून "तुम्ही मला कशाकरितां व कोणाच्या प्रेरणेनें मारीत आहां." असें गंभीर व निर्भय ध्वनीनें विचारूं लागला. त्याबरोबर ते दुष्ट मारेकरी देवीच्या प्रभावानें मोहित झाले व 'तुझ्या पित्यानीं आम्हांस द्रव्य देऊन या घोर कर्मास प्रवृत्त केलें,' असें त्यांनीं सांगितलें. तें ऐकून पुत्रक म्हणाला, "तुम्ही मला मारूं नका; मी आपल्या अंगावरील हे सर्व अलंकार तुम्हांस देतों व कोठें तरी दूर निघून जातों. हें वर्तमान मी कोणालाही सांगणार नाहीं." त्यावर बरें आहे, असें म्हणून व अलंकार घेऊन ते वधक परत आले व पुत्रक मेला, असें त्यांनीं खोटेंच सांगितलें.

नंतर ते राज्यार्थी द्विज राजधानीस परत आले. पण त्या लोभ्यांस मंत्र्यांनीं मारून टाकिलें. कृतघ्नाचें कल्याण कसें होणार? तिकडे तो सत्यप्रतिज्ञ राजाहि आपल्या बांधवांविषयीं विरक्त होऊन विंध्यारण्यांत शिरला. त्या भयंकर अरण्यांत इतस्ततः फिरत असतांना बाहुयुद्धास तयार झालेले दोन पुरुष त्यास दिसले. तेव्हां 'तुम्ही कोण?' असा त्यानें त्यांस प्रश्न केला. त्यावर ते म्हणतात—

"आम्ही दोघे मयासुराचे पुत्र आहों. हें पात्र, ही काठी व ह्या दोन पादुका इतकें आमच्या पित्याचें धन आहे. आमच्यांतील जो बलाढ्य असेल त्यास तें प्राप्त होईल. त्यासाठीं आम्ही युद्ध करीत आहों."

असुरांचें तें भाषण ऐकून पुत्रक हंसत म्हणाला, "अरे खुळ्यांनो, या क्षुद्र वस्तूंकरितां तुम्हीं एकमेकांस मारण्यास तयार झालां अहां याला काय म्हणावें?" त्यावर ते म्हणतात–सत्पुरुषा, या वस्तू दिसण्यांत जरी क्षुद्र असल्या तरी त्यांचा प्रभाव फार मोठा आहे. या पादुका घातल्या असतां आकाशांत पाहिजे तिकडे जातां येतें. या काठीनें जें जें लिहावें तें तें सत्य होतें व या पात्रांत ज्या ज्या आहाराची इच्छा करावी तो तो उत्पन्न होतो. तें ऐकून पुत्रक म्हणतो "असें जर आहे तर व्यर्थ युद्ध कशाला करतां. मी सांगतों तसें करा. तुम्ही दोघेही धांवा. जो पुढें धांवेल त्याचें हें धन." तें ऐकतांच ते दोघेही मूर्ख धांवूं लागले. इतक्यांत पुत्रकानें पादुका पायांत घालून आणि यष्टि व पात्र हातांत घेऊन आकाशांत गमन केलें.

एका क्षणांत पुष्कळ दूर गेल्यावर पुत्रकाला एक सुंदर नगरी दिसली. 'आकर्षिका' हें तिचें नांव होतें. त्या नगरींत तो उतरला. आणि वेश्यांचें लक्ष्य दुसऱ्यांस फसविण्याकडे असतें; ब्राह्मण माझ्या पित्यासारखे असतात व वाणी धनलोभी असतात, तेव्हां आपण आतां रहावें कोठें? असा विचार करूं लागला. विचार करितां करितां तो एका निर्जन व जीर्ण गृहाजवळ आला. त्यांत एक वृद्ध स्त्री त्यास दिसली. तिला थोडेंसें धन देतांच ती संतुष्ट होऊन 'या, बसा' इत्यादि बोलून त्याचा गौरव करूं लागली. तेव्हां तिच्या संमतीनें पुत्रक तेथें राहूं लागला. एकदां संतुष्ट झालेली ती वृद्धा त्यास

म्हणाली, "पुत्रा, तुला अनुरूप स्त्री कशी मिळेल, या चिंतेंत मी आहें. येथील राजाची पाटलि या नांवाची एक कन्या आहे. तें एक स्त्रीरत्नच आहे. पण राजानें अंतःपुरांत तिला सुरक्षितपणें ठेविलें आहे."

हें ऐकतांच त्याच्या मनांत कामसंचार झाला. त्या कांतेस मी आजच पाहीन, असा त्यानें निश्चय केला व रात्रीं पादुका घालून आकाशमार्गानें तो निघाला. पर्वत शिखरावरील त्या उंच व सुरक्षित अंतःपुराच्या खिडकींतून त्यानें आंत प्रवेश केला. त्यावेळीं ती पाटलि निजली होती. तिचें सर्व शरीर जणुं काय चंद्रकांतीनेंच युक्त होतें. या सर्व जगास जिंकून श्रांत झालेली मदनाची ती शक्तिच निद्रित आहे, असें त्यास वाटलें. आतां हिला मी उठवूं कसा ? असा जों तो विचार करीत आहे तों, प्रत्येक प्रहराच्या समाप्तीच्या वेळीं स्तुतिपाठ करणारा सेवक बाहेर पुढील हें पद्य गावूं लागला.—

**आलिङ्ग्य मधुरहुंकृतिमलसोन्मिषदीक्षणां रहः कान्ताम् ।**
**यद्बोधयन्ति सुप्तां जन्मनि यूनां तदेव फलम् ॥१॥**

याचा भावार्थ—एकान्तांत मधुर हुंकारपूर्वक आलिंगन देऊन जिचे नेत्र मोठ्या कष्टानें उघडत आहेत अशा निजलेल्या कान्तेस जागें करणें हेंच तरुणांचें जन्मसाफल्य होय !

हें पद्य ऐकतांच कंपयुक्त शरीरानें पुत्रकानें तिला आलिंगिलें व त्याबरोबर ती जागी झाली. रमणीय शरीरानें युक्त असलेल्या त्या राजास पाहून तिला मोठें कौतुक वाटलें व लज्जाही आली. पुढें एकमेकांची विचारपूस केल्यावर त्यांचा तेथेंच गांधर्व विवाह झाला. त्यामुळें त्या दांपत्याची परस्पर प्रीति वाढली. पण त्या प्रीतीबरोबर रात्र कांहीं वाढली नाहीं. त्यामुळें पहाट होतांच, उत्सुक असलेल्या आपल्या भार्येला विचारून मोठ्या कष्टानें पुत्रक तेथून केवल शरीरानें निघाला. त्याचें मन तिच्यापाशींच राहिलें. थोडक्याच अवकाशांत तो आपल्या जीर्ण गृहांत येऊन पोंचला. पुढें प्रतिरात्रीं तो तिच्या अंतःपुरांत जाऊन याच क्रमानें परत येई. कांहीं दिवसांनीं पाटलीच्या संभोगाचें चिन्ह रक्षकांच्या दृष्टीं पडलें. त्यांनीं तें वर्तमान राजास (तिच्या पित्यास) कळविलें. तेव्हां राजानेंही खरा प्रकार जाणण्याकरितां एका गुप्त स्त्रीची तिच्या अंतःपुरांत योजना केली. तिनें तेथील सर्व प्रकार प्रत्यक्ष पाहिला व पुत्रकास ओळखतां यावें म्हणून तो गाढ झोंप घेत पडला असतांना, त्याच्या वस्त्रांवर लाल रंग ओतला. प्रातःकालीं सर्व खरें वृत्त राजास कळलें. पुत्रकास धरून आणण्याकरितां त्यानें रक्षक पाठविले. जीर्ण गृहांतून धरून आणून त्यास राजापुढें उभें केलें. पण राजा रागावला आहे, असें पाहून तो पादुका घालून तेथून उडाला व पाटलीच्या अंतःपुरांत येऊन, तिला त्यानें हा सर्व प्रकार कळविला; आणि तिला आपल्या मांडीवर घेऊन पादुकांच्या साह्यानें तो आकाशमार्गानें निघाला.

पुष्कळ दूर निघून गेल्यावर आपली सुकुमार भार्या श्रांत झाली आहे, असें पाहून तो गंगेच्या तीरीं उतरला आणि त्या पात्राच्या प्रभावानें उत्पन्न झालेल्या इष्ट आहारानें त्यानें तिला आनंदित केलें. नंतर ज्याचा प्रभाव प्रत्यक्ष अनुभवास आला आहे, अशा त्या पुत्रकाची पाटलीनें प्रार्थना केल्यामुळें त्यानें तेथें ( गंगातीरीं ) त्या यष्टीनें चतुरंगबलयुक्त नगर लिहिलें. त्याबरोबर तें खरें नगर झालें व तो त्याचा राजा झाला. नंतर तो शूर, स्वप्रभावानें श्वशुरास नम्र करून समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करूं लागला.

येणेंप्रमाणें हें नगर नगरवासी जनांसह मायेनें रचलें आहे. पाटली व पुत्रक यांच्या नांवावरून त्यास पाटलिपुत्र असें नांव पडलें. त्या कारणानें लक्ष्मी सरस्वती या दोघींचेंही हें क्षेत्र आहे.*

प्रस्तुत कथेंत कथेच्या प्राचीनत्वाचे अवशेष बरेच राहिले आहेत. तींत आलेल्या मयासुराच्या पुत्रांचा उल्लेख पुराणवाङ्मयांत कोठें नाहीं. शिवाय पाटलि आणि पुत्रक यांच्या भेटीच्या प्रसंगीं आणलेल्या वैतालिकांचा श्लोक नाटकी आहे, व बृहत्कथेच्या अंतिम संकलनाच्या कालांत या विषयावर नाटकें होत असावींत याचा सूचक आहे. व उतरावयाचें कोठें याचा विचार करतांना वेश्येच्याकडे उतरावयाचें याचा विचार पुत्रक करीत होता. यावरून वेश्येकडे उतरणें ही राजरोस पद्धति होती आणि ब्राह्मणपुत्र वेश्यांकडे त्याप्रमाणेंच वेश्यांकडे देखील उतरत असें दिसतें.

### १९५ चिंचिणी बंदराचें धार्मिक प्रामुख्य व त्या प्रामुख्याचें सातत्य.

चिंचिणी हें गांव सरित्सागराच्या म्हणण्याप्रमाणें पाटलि पुत्र नांव मिळण्याच्या अगोदरचें म्हणजे अर्थात् ख्रिस्ती शकाच्या पूर्वी हजार वर्षें तरी अस्तित्वांत असलें पाहिजे चिंचिणीच्या ख्रिस्तपूर्वतेबद्दल या कथेशिवाय दुसराहि पुराव आहे. तो म्हटला म्हणजे क्षहराताच्या जामातांनीं केलेल्य दानोल्लेखाचा आहे. हा दानोल्लेख केव्हां तरी पुढें मागें अवतरण करावा लागणार आहे तर तो आतांच केलेला काय वाईट गुजराती व मराठी किनारा या दोन्ही ठिकाणच्या स्थितीचे दर्शक त्याच पुरुषाचे इतर लेख घेत आहें.

---

* कथासरित्सागर १ कथापीठलंबक–तरंग ३.

**नाशिक येथील लेख नं. १४ अ.** लेणें नं. १० च्या उजव्या हाताच्या भिंतीवर ( लुडर्स नं. ११३५ )

**१............तस क्षत्रपस नहपानस जामा**
**२............शाकस उषवदातस नेत्यकेसु**
**३............चेचिंणे दाहनूकानगर केकापुरे**
**४............? अनुगामिम्हि उजेनिय साखाय**
**५............तो ब्राह्मणा भुजते सतसाह—**
**६............वता ब्राह्मणानं गवां सतस—**
**७............भगवता देवान ब्राह्मणानं च दता**
**८............चेत्रसुधे पनरस क्षहरा—**
**९............गवां...तसहस्रदेन उष—**
**१०............नदीये बणासय द—**
**११............सुवण तिथ चे णयते तस्—**
**१२ ...**

**भाषांतर**

"( क्षहरा )त क्षत्रप राजा नहपान याचा जांवई जो शक उषवदात त्याच्या कायम देणग्यांवरच, चेचिंणि व दाहनूका शहर, केकापुर, अनुगामि, उजेनी, शाक या ठिकाणीं ( दररोज ) १ लक्ष ब्राह्मण जेवतात. ( व त्या देणग्यांतूनच तीन ) लक्ष गाई ब्राह्मणांना दिलेल्या आहेत. ( व १६ खेडीं ) देवां-ब्राह्मणांना दिलेलीं आहेत. चैत्राच्या शुक्लपक्षाच्या १५ व्या दिवशीं ( पौर्णिमेस ) उषव ( वदाता ) नें बार्णासा नदींत तीर्थ व पैसे दान केले."

चिंचिणी हें आज क्षेत्र नसलें तरी खिस्तपूर्व दहा शतकें या कालापासून नहपानाच्या कालापर्यंत पवित्र क्षेत्र ह्या पदवीला पात्र झालें होतें हें या उताऱ्यावरून स्पष्ट होतें. एक लाख ब्राह्मणांस दररोज भोजन देण्याइतकी कायम देणगी तरी काय होती हें सांगतां येत नाहीं. वरील लेखांतील कांहीं भाग झिजून गेला आहे. दिसत असलेल्या भागांत गाई तीन लाख होत्या असें दिलें नाहीं. या लेखांतील अपूर्ण विधान पूर्ण करण्यासाठीं उषवदाताच्या पुढील कार्ले-लेखाकडे लक्ष द्यावें लागतें. लाखों ब्राह्मणांना नित्य जेवण घालणारा आणि वेरुळच्या लेण्यांत रहाणाऱ्या भिक्षूंच्या संघासहि दान देणारा 'शक' आपणांस परकीय कसा वाटणार? त्याला अर्थात् 'धर्मात्मा' च म्हटलें पाहिजे! प्रत्येक ब्राह्मणास आठ बायका या राजजामातानें कोठून दिल्या, त्या ब्राह्मणच होत्या कीं ब्राह्मणेतर होत्या इत्यादि गैरसोईचे प्रश्न उत्पन्न करण्यास आजची नास्तिक मंडळी प्रवृत्त होणारच. आठ आठ बायका मिळविणारे हे भाग्यवान ब्राह्मण गोवर्धन होते कीं दुसरे कोणी होते याविषयीं आज खात्रीची माहिती नाहीं, आणि त्या काळांत जेवण कशा प्रकारचें होतें हेंहि स्पष्ट होत नाहीं. दुधातुपाची चंगळ असावी.

**वरील लेखाच्या खालचा लेख.** ( नंबर १४ ब. लु. नं. ११३६ )

**१................गवता ब्राह्मणा**
**२................? णि पंचाशं**
**३................मासाय तीर्थे**
**४................देय न जप**

**भाषांतर** देण्यांत अर्थ नाहीं.

**कार्ले लेख नं. १३** ( लुडर्स १०९९ )

**( १ ) सिधं रञो खहरातस खतपस नहपानस जामातरा दिनिकपुतेन उसभदातेनत्रि—**
**( २ ) गोसतसहसदेण नदिया बणासयं सुवण (ति)रथकरेण (देवा)ण ब्रह्मणानं च सोळस गा—**
**( ३ ) मदे(न) पभासे पूततिथे ब्रह्मणाणं अठभायाप( देण ) गावसापि त्रिसत सहसं**
**( ४ ) दापयिता वलूरकेसु लेणवासान पवजितान चातुदिससघस**
**( ५ ) यापणथ गामो करजिको दतो सवानं(व) सावासितानं**

संस्कृतीकरण

**( १ ) सिद्धम् । राज्ञः क्षहरातस्य क्षत्रपस्य नहपानस्य जामात्रा दिनीकपुत्रेण ऋषभदत्तेन त्रि—**
**( २ ) गोशतसहस्रदेन नद्यां वार्णशायां सुवर्णतीर्थकरेण देवेभ्यो ब्राह्मणेभ्यश्च षोडशग्रा—**
**( ३ ) मदेन प्रभासे पूततीर्थे ब्राह्मणेभ्योऽष्टौ भार्याप्रदेन गवां चापि त्रिशतसहस्रं**
**( ४ ) दापयित्रा वलूरकेषु लयनवासीनां प्रव्रजितानां चातुर्दिशसंघाय**
**( ५ ) यापनार्थे ग्रामः करजिको दत्तः सर्वेषां (व)र्षावासिनाम् ॥**

सिद्धम् । राजा क्षहरात क्षत्रप नहपान याच्या दिनीक पुत्र उसभदात नांवाच्या जामातानें, तीन लक्ष गाई दान देणारानें, वार्णाशा नदीच्या ठिकाणीं सुवर्णतीर्थ करणारानें, देवांना आणि ब्राह्मणांना सोळा ग्राम देणारानें, आणि ब्राह्मणांना आठ भार्या देणारानें, आणि तीनशें गाई देणारानें, बलूरकाच्या ठायीं लेण्यांत रहाणाऱ्या प्रव्रजितांना चातुर्दिश संघाला 'यापना'साठीं करजिक नांवाचा गांव दिला.

**१९६. गोवर्धनांचें अपरांतांत त्याप्रमाणें जनस्थानांत अस्तित्व.**

१९६. वर उल्लेखिलेले भाग्यशाली ब्राह्मण गोवर्धन असावेत अशी कल्पना करण्यास सहायक प्रत्यक्ष 'गोवर्धन' शब्द हवा असेल तर तो पुढील लेखांत सांपडेल. गोवर्धन जातीचा उल्लेख येथें नसून प्रदेशाचा आहे. आणि त्याबरोबर सोपाऱ्याच्या ब्राह्मणांचा देखील उल्लेख केला आहे. सोपाऱ्यास आज पानमळ्याचा धंदा करणारे जे सामवेदी ब्राह्मण आहेत. त्यांच्या पूर्वजांविषयीं हा उल्लेख असावासें वाटतें.

( **नाशिक लेख नं. १०** लेणें नं. १० च्या पाठीमागच्या भिंतीवर छताच्या खालीं. लूडर्स नं. ११३१ )

**१ सिद्धं राज्ञः क्षहरातस्य क्षत्रपस्य नहपानस्य जामात्रा दीनीकपुत्रेण उषवदातेन त्रिगोशतसहस्रदेन नद्या बार्णासायां सुवर्णदानतीर्थकरेण देवताभ्यः ब्राह्मणेभ्यश्च षोडशग्रामदेन अनुवर्षं ब्राह्मणशतसाहस्रीभोजापयित्रा**

**२ प्रभासे पुण्यतीर्थे ब्राह्मणेभ्यः अष्टभार्याप्रदेन भरुकछे दशपुरे गोवर्धने शोर्पारगे च चतुशालावसधप्रतिश्रयप्रदेन आरामतडाग उदपानकरेण इबा–पारादा–दमण–तापी–करबेना–दाहनुका–नावापुण्यतरकरेण एतासां च नदीनां उभतोतीरं सभा**

**३ प्रपाकरेण पिंडितकावडे गोवर्धने सुवर्णमुखे शोर्पारगे च रामतीर्थे चरकपर्षभ्यः ग्रामे नानंगोले द्वात्रीशतनाळीगेरमूलसहस्रप्रदेन गोवर्धने त्रिरश्मिषु पर्वतेषु धर्मात्मना इदं लेणं कारितं इमा च पोढियो भटारका अंञातिया च गतो स्मि वर्षारतुं मालयेहि रुधं उतमभाद्रं मोचयितुं**

**४ च मालय प्रनादेनेव अपयाता उतमभद्रकानं च क्षत्रियानं सर्वे परिग्रहा किता ततो स्मि गतो पोक्षरानि तत्र च मया अभिसेको कितो त्रीणि च गोसहस्राणि दतानि ग्रामो च दत चानेन क्षेत्रं ब्राह्मणस वाराहिपुत्रस अश्विभूतिस्य हथे कीणिता मुलेन काहापणसहस्रेहि चतुहि ४००० य सपितुसतक नगरसीमाय उतरापराय दीसाय एतो मम लेणे वस—**

**५ तानं चातुदीसस भिखुसघस मुखाहारो भविसति**

[ विजय असो ! नहपानाचा जांवई व दीनीकाचा मुलगा जो उषवदात त्यानें धर्माच्या स्फूर्तीमुळें हें लेणें व हे हौद गोवर्धनच्या टेकड्यांत खोदावयास लाविलें.

त्यानें ३ लक्ष गाई दिलेल्या ( दान केलेल्या ) आहेत. त्यानें पैसे दान केलेले आहेत व त्यानें वारणासा नदीवर तीर्थेंहि केलीं होतीं. त्यानें देवांना व ब्राह्मणांना १६ खेडीं दिलेलीं आहेत. तो वर्षभर १ लक्ष ब्राह्मणांना जेवावयास घालतो. त्यानें प्रभास तीर्थावर ब्राह्मणांना आठ बायका दिलेल्या आहेत. त्यानें भरुकछ, देशपुर, गोवर्धन व शोर्पारग या ठिकाणीं आश्रयासाठीं चौकोनी विश्रांतिगृहें ( बांधलेलीं ) दिलेलीं आहेत. त्यानें विहीरी, तलाव व बाग केलेले आहेत. त्यानें इबा, पारादा, दमणा, तापी, करबेणा व दाहनुका या नद्यांवर जाण्यायेण्यासाठीं फुकट बोटी ठेवलेल्या आहेत. फुकट पाणी वापरण्यासाठीं व जमविण्यासाठीं त्यानें वरील नद्यांच्या दोन्ही तीरावर जागा बांधिलेल्या आहेत. पींडितकावड, गोवर्धन, सुवर्णमुख व सोपरिगांतील रामतीर्थ या ठिकाणच्याच चरकांच्या संघाला त्यानें नानगोल खेड्यांत ३२ हजार नारळीच्या झाडांचीं खोडें दिलेलीं आहेत.

माल्यांनीं उत्तरभद्रांच्या राजाला पावसाळ्याभर वेढा दिलेला होता. व राजाच्या आज्ञेवरून त्याला सोडवण्याकरितां मी गेलों. ( आमच्या ) नुसत्या आरोळीनेंच ते मालय पळून गेले, व उत्तमभद्राच्या सैनिकांनीं त्यांना कैद केलें. नंतर मी पोक्षर तलावाकडे गेलों. तेथें मी स्नान केलें; व तीन गाई आणि एक खेडें दान केलें. मी एक शेतही पण दान केलेलं आहें. तें शेत मी, वाराहीचा मुलगा जो अश्विभूत नांवाचा ब्राह्मण त्यापासून ४००० काहापपणांला विकत घेतलेलं होतें. तें त्याच्या बापाच्या मालकीचें होतें. तें गांवाच्या नैऋत्येकडील टोंकाला आहे.

माझ्या लेण्यांत राहाणाऱ्या सर्व संन्याशांना भेदाभेद न ठेवतां त्यांतून ( त्याच्या उत्पन्नांतून ) अन्न मिळेल. ]

**नाशिक लेख नं. ११.** लूडर्स नं. ११३२ दहा नंबरच्या लेण्यांतील व्हरांड्यावर दाराच्या वरच्या भागाला.

**१ सीधं रांञो क्षहरातस क्षत्रपस नहपानस दीहि—**

**२ तु दीनीकपुत्रस उषवदातस कुडुंबिनिय दखमित्राय देयधंमं ओवरको**

[ विजय असो ! क्षहरात क्षत्रप नहपान राजाची मुलगी, दीनीकाचा मुलगा उषवदात याची बायको, जी दखमित्रा तिनें हें लेणें दान केलेलें आहे. ]

**नाशिक लेख नं. १२.** लूडर्स नं. ११३३; १०३२ लेखाच्या खालीं.

**१ सिधं वसे ४२ वेसाखमासे राणो क्षहरातस क्षत्रपस नहपानस जामातरा दीनीकपुत्रेन उषवदातेन संघस चातुदिसस इमं लेणं नियातितं दत चानेन अक्षयनिवि काहापणसहस्रा–**

**२ नि त्रिनि ३००० संघास चातुदिसस ये इमस्मि लेणें वसंतानं भविसति चिवरिक कुशणमूले च एते च काहापणा प्रयुता गोवधनवाथवासु श्रेणिसु कोलीकनिकाये २००० त्रिधि पडिकशत अपरकोलीकनिका.**

**३ ये. १००० वधि पायूनपडितशत एते च काहापणा अपडिदातवा वधिभोजा एतो चिवरिकसहस्रानि बे २००० ये पडिके सते एतो मम लेणे वसयुथान भिखुनं वीसाय एकीकस चिवरिक बारसक या सहस्र प्रयुतं यायूनपडिके शते अतो कुशन**

**४ मूल कापुराहारे च गामे चिखलपद्रे दतानि नालिगेरान मुलसहस्रानि अथ ८००० एत च सर्व स्रावित निगमसभाय निबध च फलकवारे चरित्रतोति भूयो नेन दतं वसे ४१ कातिकशुधे पनरस पुवाक वसे ४५**

**५ पनरस नियुतं भगवतं देवानं ब्राह्मणानं च कर्षापणसहस्राणि सतरि ७०००० पंचत्रिशक सुवर्ण क्रिता दिन सुवर्णसहस्रणं मूल्यं**

**६ फलकवारे चरित्रतोति.**

[क्षहरात क्षत्रप नहपान याचा जांवई व दीनीकाचा मुलगा जो उषवदात त्यानें हें लेणें ४२ सालांतील वेसाख (वैशाख) महिन्यांत संघाला देऊन टाकिलें. त्यानें आणखी एक ३००० काहापणांची कायम देणगी दिलेली आहे. तिचा उपयोग लेण्यांत राहाणाऱ्या संघाच्या सर्व सदस्यांच्या मग ते सदस्य कुठल्याही धर्माचे असोत वा त्यांचें कोणतेंही मूळ असो– त्याच्या कपड्याकरतां व हिंडण्याकरितां होईल. त्यानें हें सर्व काहापण गोवर्धनच्या श्रेणीमध्यें गुंतवलेले आहेत. त्यांपैकीं २००० त्यानें एका विणकऱ्यांच्या श्रेणीमध्यें घातलेले आहेत. त्यावर शेंकडा १ प्रतिक व्याज आहे. व (उरलेले) १००० त्यानें विणकऱ्यांच्या दुसऱ्या एका श्रेणीमध्यें अडकवले आहे व त्यांवर व्याजाचा दर शेंकडा $\frac{3}{4}$ पडिक आहे. ते सर्व काहापण परत करावयाचे नाहींत. त्यांच्या व्याजाचा मात्र उपभोग घ्यावयाचा आहे. त्यांतील २०००, ज्यावर व्याजाचा दर शेंकडा १ प्रतिक आहे ते कपड्यासाठीं आहेत. माझ्या लेण्यांत व जे वस्त्रयुक्त २० संन्यासी आहेत, त्यांपैकीं प्रत्येकास कपड्यासाठीं १२ काहापण त्यांतून (त्या २००० तून) (मिळतील) १००० (काहापण) ज्यांवर व्याजाचा दर $\frac{3}{4}$ प्रतिक आहे, त्यांतून कुशणासाठीं पैसे मिळतील. कापूर जिल्ह्यांतील चिखलपद्रखेड्यांत ४००० नारळीचीं झाडें (शब्दार्थ झाडांचीं मुळें) दिलेलीं आहेत. हें सर्व निगमसभेंत (टाऊनहॉल) नोंदणीकचेरींत पद्धतशीर रीतीनें जाहीर केलेलें आहे, व रजिष्टरहि (फलक वारे चरित्रित) चरित्रित केलेलें आहे.

४१ सालीं कार्तिक पौर्णिमेस शुक्लपक्षीं केलेलें हें दान ४५ सालीं पौर्णिमेस पूज्य देवांब्राह्मणांठायीं स्थाईक केलें. ७०००० कार्षापण, दर पसतीस (कार्षापण) एक सुवर्ण करितें. आणि असें दोन हजार सुवर्णाचें भांडवल फलकबार चरित्रित केलें आहे.

**नाशिक लेख १३.** लूडर्स नं. ११३४; दहा नंबरच्या गुहेंत उजव्या बाजूच्या कोठडीच्या दारावर.

**१ सिधं राणो क्षहरातस क्षत्रपस नहपान**
**२ स दीहितु दीनीक पुत्रस उषवदातस**
**३ कुडुंबिनिय दाखमित्राय देयधंमं ओवरको**

**भाषांतर—**

"जय असो हें लेणें क्षहरात क्षत्रप नहपान राजाची मुलगी व दीनीकाचा मुलगा उषवदात याची बायको जी दखमित्रा तिनें दान केलेलें आहे."

जुन्नर **नं. २५** लु. **नं.** ११७४

**(रञो) महाखतपस सामिनहपानस**
**(आ) मात्यस वछसगोतस अयमस**
**(दे) यधम च (पो?) ढि मटपो च पुत्रथय वसे ४६ कतो**

**राज्ञो महाक्षत्रपस्य स्वामिनहपाणस्या–**
**मात्यस्य वत्ससगोत्रस्या यत्रस्य**
**देयधर्मःप्रहिर्मण्डपश्च पुण्यार्थाय वषे ४६ कृतः॥**

**१९७. चिंचिणीच्या प्राचीन आणि अर्वाचिन परिस्थितीची तुलना. तेथील ब्राह्मणांविषयींचा निश्चय.**

१९७. प्राचीन इतिहासांत मानसिक अवगाहन सुलभ करण्याच्या दृष्टीनें आज आपल्यापुढें प्रश्न उत्पन्न होतो तो प्राचीन चिंचिणी गांवाचें आजच्या गांवाशीं सातत्य कसें शोधावें हा आहे. आज या गांवांत वर उल्लेखिलेल्या काळाची आठ-

वण देणारें कांहींतरी आहे काय असें विचारल्यास नाहींच असें उत्तर द्यावें लागतें, एवढेंच नाहीं तर आजच्या गांवाच्या स्वरूपापासून प्राचीन काळच्या स्थितीची कल्पना मोठ्या कष्टानेंच तयार करावी लागेल. प्राचीनकालीं चिंचिणी गांवांतील ब्राह्मणांना दानें मिळालीं पण आजच्या चिंचिणी गांवांत ज्यांच्या कुलाचें तेथें पूर्वापार सातत्य चालू आहे असे ब्राह्मणच नाहींत, चिंचिणी व तारापूर या गांवांत जी कोंकणस्थां-कऱ्हाड्यांची वस्ती आहे ती अगदीं अलीकडची म्हणजे पेशवाईच्या उत्कर्षकाळांतील आहे. 'पळसे' नांवानें ठाऊक असलेले माध्यंदिन ब्राह्मण ज्यांना सह्याद्रिखंड " पलाशविप्र " म्हणतें, ते नहपानाच्या मुलीची अगर जांवयाची दक्षणा ज्यांना मिळाली त्यांचे वंशज नाहींत, तर ते राजा बिंब याच्याबरोबर चौदाव्या शतकानंतर आले असें त्यांकडूनच सांगण्यांत येतें. या आपरांत माध्यंदिनांना ‡ उत्तर कोंकणांतील वृत्ति मिळण्यापूर्वी ती गोवर्धनांकडे होती असें त्यांच्यांत उपलब्ध असलेल्या परंपरेवरून दिसतें. त्या अर्थी येथें नहपानाच्या काळांत किंवा त्याच्याहि पूर्वीं असलेले ब्राह्मण गोवर्धन ब्राह्मणच असावेत असा मनोनिश्चय होतो. आज चिंचणींत जरी गोवर्धनांचीं घरें नाहींत तरी त्यांची वस्ती आसपासच्या खेड्यांतून आहे तथापि प्राचीनत्वाचा पुरावा म्हणून शहरांतील वस्तीपेक्षां खेड्यांतील वसाहतच उपयोगी पडते.

चिंचिणी तारापूर येथें सध्यां कोंकणस्थ ब्राह्मणच पुष्कळ आहेत. तथापि त्यांच्या वस्तीचें प्राचीनत्व पेशवाई पलीकडे नाहीं. पेशवाईंत बरवे घराणें येथें येऊन स्थानापन्न झालें. त्यांच्यापूर्वी तेथें कोकणस्थांचें उकिडवे हें एक सावकार घराणें २०० वर्षे नांदत होतें. तें चांच्यांनीं लुटल्यामुळें दरिद्री झालें. हें उकिडवे घराणें बरव्यांच्या अगोदर सुमारें २०० वर्षे तेथें होतें असें कळतें. म्हणजे कोंकणस्थ ब्राह्मणांचें अस्तित्व चिंचिणीस चारशें वर्षांपूर्वीं होतें, एवढेंदेखील दाखविणें कठीणच होईल. आजच्या गुजराती मंडळीची वस्ती तेथें साडेतीनशें पासून चारशें वर्षांचीं आहे, व हे लोक बहुतेक पोर्तुगीज आल्यानंतर आले. कोंकणस्थांपूर्वींचे ब्राह्मण म्हणजे सह्याद्रिखंडांत उल्लेखिलेले "पलाशविप्र" होत. त्यांचें अस्तित्व देखील शके १२०० पूर्वीं दाखविणें कठीणच जाईल. म्हणजे गोवर्धन किंवा गुजराती ब्राह्मण या दोनच शक्यतः उरतात. येथील स्थाईक ब्राह्मण गुजराथी नसतील असेंहि म्हणतां येत नाहीं. कथासरित्सागरांत उल्लेखिलेल्या लग्नावरून निश्चयात्मक सिद्धांत बांधतां येणार नाहीं. त्या ग्रंथांत सांगितलेले दाक्षिणात्यद्विजाचे मुलगे कनखल येथून चिंचिणीस आले व तेथें त्यांचीं लग्नें झालीं. यावरून चिंचिणीचें ब्राह्मणकुटुंब दक्षिणेंत होतें असें सिद्ध होणार नाहीं. दाक्षिणात्य ब्राह्मणांचा त्यावेळेस दाक्षिणात्य ब्राह्मणांचीच स्त्री करण्याचा आग्रह असेल असें धरतां येत नाहीं. शिवाय गुजराती ब्राह्मण देखील पंचद्राविडांत मोडतात. मारवाडांतील श्रीमाळी ब्राह्मण देखील आपण द्राविड ब्राह्मण म्हणून सांगतात. यासाठीं गुजराती ब्राह्मणांचे पाय चिंचणींत कितपत रुतले आहेत याची चौकशी करतां असें दिसतें कीं त्यांची वस्ती तर अत्यंत अर्वाचीन आहे.

चिंचणीचें रेलवे स्टेशन बोइसर आणि पालघर यांच्या मध्यें सरवली गांव आहे तेथें गोवर्धनांची वस्ती आहे. त्याचप्रमाणें तारापूरनजीक समुद्रकाठीं नांदगांव म्हणून एक गांव आहे तेथें त्यांची वस्ती आहे. या गोष्टी चिंचणी शहराच्या आसपासच्या लोकांचे ब्राह्मण हे गोवर्धनच असावेत असें वाटण्यास प्रेरणा करतात.

सोपाऱ्याच्या सामवेद्यांचे पूर्वज देखील चिंचिणी व डहाणू येथें असतील.

## १९८. अपरांतांतील कृषीवल वर्ग.

१९८. ब्राह्मणनिश्चय कठीण नाहीं आणि त्यावेळची सामान्य जनता कोणत्या प्रकारची असावी हा निश्चय देखील कठीण नाहीं. आजचें चिंचणी गांव बहुतेक गुजराती वाण्यांनीं भरलेलें आहे. तांदूळ आणि गवत यांचा व्यापार येथें चालतो. येथील शेतकरी वर्ग कोळी व वारली आहे आणि व्यापारी वर्ग गुजराती आहे. वारल्यांना वारलीकुणबी असेंहि म्हणतात. तथापि कुणबी याचा अर्थ कुटुंबी म्हणजे गृहस्थ म्हणजे जमीनदार असा असल्यामुळें कुणबी हा शब्द वंशसूचक मुळींच नाहीं तर सामाजिक प्रतिष्ठेचा दर्शक आहे. येथील लोकांचे उत्पादक मुख्य धंदे दोन. शेतकी करणें आणि मासे मारणें. मासे मारणाऱ्या लोकांच्या उत्तर कोंकणांतील जाती म्हटल्या म्हणजे माशी, मांगेले, वैती आणि कोळी या होत. ह्या जातिशब्दांपैकीं माशी हा शब्द खेरीज करून कोणताहि

‡ सह्याद्रिखंडांत वापरलेला शब्द 'पलाशविप्र' द्वेषबुद्धीनें वापरला आहे असें कित्येक आपरांत माध्यंदिन ब्राह्मण म्हणतात, तें खरें असणें शक्य आहे. तथापि दुसरीहि शक्यता आहे. ' पलाश ' हें नांव पूर्वी कांहींतरी अन्य कारणांमुळें पडलें असून त्या शब्दांतून वाईट अर्थ लोक काढूं लागले तेव्हांच ' पलाश ' या शब्दाला आक्षेप उत्पन्न झाला असावा. या ज्ञातीला ' उत्तर कोंकणांतील देशस्थ यजुर्वेदी ' म्हणण्याऐवजीं ' आपरांत माध्यंदिन ' असें जरा सुटसुटीत नांव वापरावें असें सुचवितों.

जातीचा शब्द मत्स्यव्यवहाराचा दर्शक नाहीं. यापैकीं मांगेले ही जातच चिंचिणी व डहाणू येथें प्रामुख्यानें आहे. माशी ही जात डहाणूच्या उत्तरेकडील भागांत आहे तर मांगेले ही जात विरारपासून सुरवाडेपर्यंत ५३ गांवांत समुद्रकांठानें वसली आहे. वैती ही जात सातपाटी पालघरच्या आसपास आहे. आणि विरारच्या दक्षिणेस कोळी जातीची वस्ती आहे. ज्या प्रदेशांत दर्याकिनारा मांगेल्यांच्या ताब्यांत आहे त्या प्रदेशांत देखील शेजारीं कोळी जात शेतकरी म्हणूनच आहे. त्यावरून असें वाटतें कीं या प्रदेशांतील मुख्य वस्ती कोळ्यांची असावी. मांगेले ही जात तेथें मागाहून येऊन तिनें दर्याकिनारा काबीज करून तेथील कोळी लोकांना आंत हटविलें आहे. डहाणूहून जव्हार राज्य जवळच आहे. तें कोळीराज्य आहे. आणि डहाणू जव्हारच्या रस्त्यावर पण तीन मैल बाजूला महालक्ष्मीचें जें देऊळ आहे तें मोठें यात्रेचें स्थान आहे; पण त्या देवळाचे पुजारी देखील कोळीच आहेत. कल्याण जवळील अंबरनाथचें देवालय शिलाहाराच्या कारकीर्दीत ब्राह्मणी संस्कृतीचें स्थान बनलें तरी तेथील पुजारी देखील कोळीच आहेत. एवंच डहाणु व चिंचिणी या ठिकाणची प्राचीनतर वस्ती कोळ्यांची आहे. मांगेल्यांची नाहीं असें दिसतें.

## १९९. कोळी राष्ट्राच्या सुसंस्कृत आयुष्यक्रमाचा नाश.

वर दिलेल्या नाशिक लेख १२ यांत 'कोलीक निकाय' उल्लेखिले आहेत आणि त्याचा अर्थ कोष्टी किंवा विणकरी असा केला आहे. पण तो आम्ही लावलेला अर्थ नव्हे. सेनार्ट आणि त्याचे पूर्वगामी संशोधक यांचा तो अर्थ आहे. या पूर्वगामी संशोधकाचें भाष्य नसतें तर मी त्याचा अर्थ कोळ्यांच्या जमातीपाशीं असाच केला असता. कोळ्यांमध्यें नागर संस्कृति होती. राजे लोकांना आपली रक्कम कायम ठेवीच्या स्वरूपांत ज्यापाशीं ठेवावी अशा भक्कम पतीच्या त्यांच्या जमाती (श्रेणी) होत्या, तथापि कोळी राज्य नाहींसें झाल्यानंतर त्या जमाती केवळ नागरज्ञाती या स्वरूपांतच राहून कृषीवल जनतेपासून आणि सरदार वर्गापासून तुटकल्या असतील. असें त्यांचें सामाजिक स्थित्यंतर झालें असावें असें दिसतें. हिंदुस्थानांतील कृषीवल समाज वन्य समाजाशीं सदृश वारंवार होतो, त्याप्रमाणेंच कोळी कृषीवलाची स्थिति झाली आहे असें दिसून येतें.

## २००. आपरांत माध्यंदिन; आणि त्यांची गोवर्धनांच्या प्राचीनतेविषयीं साक्ष.

२००. उत्तर कोकणांतील प्राचीन गंगातीरस्थ शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण (लेखक नारायण विठ्ठल वैद्य पुरंदरे पुणतांबेकर– मुंबई शके १८०६) या पुस्तकांत पळसे नांवानें कांहीं काळ ठाऊक असलेल्या आपरांत माध्यंदिन ब्राह्मणांचा उत्तर कोंकणांत बिंबाबरोबर प्रवेश कसा झाला व त्यांना तेथील जोशीपणाची वृत्ति व इतर धर्माधिकाराचे हक्क प्राप्त कसे झाले याचें स्पष्टीकरण करतांना "पुरुषोत्तमपंत कावळे पैठणकर ह्यांस जी वृत्ति बिंबानें विकत घेऊन दान दिली ती गोविंद मिटकरी गोवर्धन यांची होती. वृत्ति दान देतेसमयीं तेथें बरेच गोवर्धन अधिकारी हजर होते." असें स्पष्टीकरण केलें आहे. प्राचीन कालाविषयीं प्रस्तुत विधानास आधार म्हणून त्या पुस्तकांत बिंबाच्या प्राचीन सनदेचें मुसलमानी रूपांतर व त्याबरोबर मराठींत जोडलेलें विधान हीं दोन्ही छापलीं आहेत. पण त्यांत गोवर्धनांचा उल्लेख नाहीं. तथापि आपरांत माध्यंदिनांतील ती परंपरागत आलेली माहिती खरीच असावी असें वाटतें. त्या सनदेच्या मराठी आवृत्तीचें अवतरण पुढीलप्रमाणें आहे.

श्रीमंत महाराज राजश्री बिंबिशहा स्वामी यांणीं आज्ञा केली ऐशिजे. गोविंद मिटकरी, सरदेसाई व सरदेशपांडे, तालुका मालाड वगैरे पंचत्व पावला. तो निपुत्रिक होता. त्याची बायको चांगुणाबाई तें वतन खुशरजाबंदीनें विकूं लागली. मग आपण तिचें रजाबंदीनें वतन सरदेसाईपण, चोवीस हजार होन (रयाळ) देऊन विकत घेतलें. बितपशील.

पाा मालाडगांव ५७
पाा उरणभवर गाव ९
पाा काह्मणखांच गांव ६५
पाा असेरी गांव ८४
पाा माहीम गांव ८४
पाा सांजे व कामण ५७८
पाा मरोळ गांव या दोन्हीं तााचें नांव
साष्ट (साष्टी) ५७
पाा पंचनद गांव ५५
पाा साहेबान गांव ८४
कसबे वसई गांव १२
पाा माव गांव २७
पाा माहीम मंबई (मुंबई) गांव ७
पाा खैरण गांव ४५
पाा मनोरा गांव ८४
कसबे सोपारा गांव १६
पाा तारापूर गांव ३६४

सदर्हु तालुकिये वगैरे यांस हक्क लवाजिमा व रुसूम बितपशील:—

रुसूम पट्टी १
पाट १
टिळा १
पछोडी १
पंचोत्रा १
विडा १
अंतरपाट १
प्रायश्चित्त १
मांडव टका १

दर बिघेसाली कुडो, दर गांव दोन बिघे, दर परगणीयास एक गांव १ शिलोत्तर, इनाम व एक गांव विसापती १

सदर्हुप्रमाणें वतन समस्त जमीदार बतफशील जैल यांच्या अनुमतें शके (१२२०) बाराशें वीस, शाल्वरी संवत्सर, माघवद्य त्रयोदशी भृगुवासरीं विकत घेऊन एक वरीस (वर्ष) तीनमास भोगावा भोगून मग दान द्यावयाच्या उद्देशें अहीनवलवाडा पाटण तष्टदगा माहीम बिंबस्थान शिक्का मुकरंदान, चौकीस मुख्यप्रधान माधवराव श्रीनिवास, व सुरनवीस त्रिंबकनारायण, व चिटणवीस चंद्रभानपरभू, व पतंगराव न्यायाधिश, व श्रीपति दामोदरराउ मुजुमदार, व कर्णीक शंकर परभू, व तपेदार कर्णीक देवदास परभू देसले जमीनदार पा मालाड, देसले कृष्ण देसाई तपेमरोळ व देसले व माधव देसाई तपेमालाड मौ पोंइसर, व जोये माहतारे तपेमरोळ मौ शाहर, व रामजीत तपेमालाड मौ येकशाहर, व गोविंद माहातरे तपेमरोळ मौ कोंदवटें, व गोडसानी तपेमालाड मौ अंकूलवली व कड भोजरावत तपेमरोळ मौ वांदरें, व विठ्ठल महिमानराउ तपेमालाड मौ नरसापूर, व हैबतराउ व दामोदरराउ तपेमरोळ मौ माहीम, व महीदरणे तपेमालाड मौ निलीज, व वामठाकूर तपेमरोळ मौ मुंबई गिरिगांव, व येसघर तपेमालाड मौ अरठें, मायेपाहतरे तपेमरोळ मौ उरण, व गोमरावत तपेपंचनद, व रामपाटील व गोविंदराणे तपेखैरणे, व कृष्णाजी कान्होरे तपेआठगांव, शामजीमोहने (तपे) तपेकाह्मणखांच, हरजी चौधरी तपेसाहेबान, गोविंदजी गाडगिळे सिंदे कसबे वसई, व बाणराउत, व चांगराउत, व येसपाटील कसबे सोपारें, वामनाईक व हरनाईक व देवनाईक भाटकुळे, व गोविंदजोशी भुईगांवकर, व मालनाईक नेवाळे व गोमनाईक वाघाळे तपेमनोरा, व लखमकेणी तपेअसरी, कोलपाटील व रामसातवी तपेमाब, व गोविंदनाईक गोळक तपेमाहीम, व दामसावे, व गोविंद चौधरी, पीलराउत तपेतारापूर व विठोजी शंकर, व हरबाजीराम तपेकालानसांजे, व माधवराउत व नेवकेणी तपसांजे व माधपाटील, व कानुगो व माहतरे, पाटील व पटवारी समस्तांसहित मजिलीस करून यांच्या साक्षीनें शके १२२१, लवसंवत्सर, वैशाख वद्य (३०) अमावास्या सूर्यग्रहणीं राजश्री पुरुषोत्तमराउ कावळे पैठणकर, पिते श्रीधरपंत आजे रघुनाथपंत, वाजसनी, गोत्रभारद्वाज, कुलदेवता मातापूरनिवासिनी यमाई, हे राजगुरु; यांस दान दिधले, हें वतन सदर्हुप्रमाणें रुसूम वगैरे हक्क लवाजिमा नृपति स्वामीचे पुत्रींपौत्रीं जातीप्रजाती पाळावें आणि पुरुषोत्तमराउ राजगुरु यांचे पुत्रींपौत्रीं जातीप्रजाती भोगावें आणि स्वामी श्रीमंत माहाराज यांहीं स्वमुखें सर्व जमीदार व मोकदमास आज्ञा केली कीं, चहूंमासांच्या अवकाशामध्यें दरगांवीं चहूंदिशास चार शिळा, सहा उंच व दोन हात रुंद, रोवाव्यात. शिळेवर हें माझें दानपत्र लेहून, कोरल्या अक्षरीं व्यंजन एक न जातां तलाखचा शफत गर्धभावरीबायको ऐशी घालोन आमचे मोर्तबीं पूर्ण लेखन मस्तकीं शिक्का घालून तयार करावें. अश्विनमासपर्यंत ज्या गावीं सिद्ध न जाहालें त्या मोकदमास दंड शिरच्छेद. ऐसा इत्यर्थ दानपत्रीं केला. शके १२२१.

प्रकरण २४ वें

# बृहत्कथेंतील रामायण आणि त्यापासून निघणारा सामाजिक इतिहास

## २०१. रामकथेचीं भिन्न रूपें.

२०१. दक्षिणेच्या प्राचीन इतिहासाला साहित्य रामायण हें एक आहे. राम दक्षिणेस आला, त्याची बायको लंकाधिपति रावण यानें चोरून नेली, आणि त्यामुळें तो लंकेवर स्वारी करता झाला. स्वारी करतांना कपिराज सुग्रीव याची मदत त्यानें घेतली आणि शेवटीं लंकेवर स्वारी करून सीतेस सोडवून आणलें इत्यादि गोष्ट प्रत्येक वाचकास ठाऊक आहे, असें गृहित धरून चालावयास हरकत नाहीं.

रामाची जी कथा बौद्धांनीं दशरथ जातकांत दिली आहे, तींत मात्र रामाचें दक्षिणेस गमन नाहीं, आणि लंकाविजयहि नाहीं. उलट रामाशीं बुद्धाचा वांशिक संबंध सांगून रामास शाक्यासारख्या परकीय वंशाचा केलें आहे. राम ही ऐतिहासिक व्यक्ति झाली असल्यास आणि ती लंकाधिपति रावणाशीं युद्ध करणारी नसल्यास राम ही एक सामान्य व्यक्ति ठरते. ती तशी असल्यास एकंदर रामायण रचण्यांत हेतू तरी काय होता, आणि एका क्षूद्र व्यक्तीला अवतारी पुरुष बनविण्यांत वाल्मीकीनें शहाणपणा तरी काय केला, आणि क्षुद्र व्यक्तीवर एवढें अपूर्व महाकाव्य रचण्याची स्फूर्ति तरी कशी झाली ? व या सर्व कथेपासून इतिहास तरी काय काढावयाचा अशा तऱ्हेचे प्रश्न उपस्थित होतात.

## २०२. रामकथाविकासाच्या पृथक्करणाचें ऐतिहासिक महत्व.

२०२. एवंच धार्मिक आणि सामाजिक इतिहासाच्या संशोधनाच्या दृष्टीनें या प्रश्नाकडे लक्ष देणें अवश्य आहे. तसेंच तें दक्षिणेच्या इतिहासाच्या दृष्टीनेंहि महत्वाचें आहे. रामायणांत दक्षिणेकडील अत्यंत जुना इतिहास किंवा इतिहासाचा आरोप झालेला कथाविषय घातला गेला आहे यांत शंका नाहीं. तर महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाकडे लक्ष देणारास रामायणांतील दक्षिणेकडील उल्लेखांकडे लक्ष देणें अवश्य आहे.

दशरथजातक रामास अवतारी पुरुष होऊं देत नाहीं. आणि बुद्धपूर्व अनेक कथांची रेखाटणी करणारी बृहत्कथा तर रामायणाची बहुतेक कथा देत आहे. बृहत्कथेंतील रामकथा वाल्मीकि रामायणाशीं तंतोतंत मिळते असें मात्र नाहीं. त्या कथेंतहि कांहीं फेरफार होऊन आजचें वाल्मीकि रामायण तयार झालें आहे. बृहत्कथेंतील कथा रामायणविकासाच्या विशिष्ट टप्प्याची दर्शक आहे. त्या कथेकडे लक्ष देण्याचा प्रसंग हाच आहे. " ब्राह्मण आणि त्यांची विद्या " याविषयींचें विवेचन रामायणकथेच्या रूपांतराच्या विवेचनाशिवाय पुरें होणार नाहीं. म्हणून बृहत्कथेच्या रामायणनिरूपणाकडे आणि मूलकथा परिवर्तन हेतूकडे वळलें पाहिजे.

## २०३. बृहत्कथेंतील रामकथा.

२०३. कथासरित्सागरांत रामकथेचे जे तुकडे आले आहेत ते जुळवितां जवळ जवळ रामकथा संपूर्ण मिळते. तींतील आणि वाल्मीकीच्या कथेंतील फरक महत्वाचे आहेत. ते सर्व लक्षांत घेतले पाहिजेत. हे फरक बृहत्कथामंजरीनें आपल्या गोळाबेरीज गोषवाऱ्यांत अदृश्य केले आहेत. यासाठीं रामायणविषयक कथासरित्सागराचे श्लोक येथें देतों.

**राज्ञो दशरथस्यासीदयोध्याधिपतेः सुतः ।†**
**रामो भरतशत्रुघ्नलक्ष्मणानां पुराग्रजः ॥**
**विष्णोरवततारांशो रावणोच्छेदनाय यः ।**
**सीता तस्याभवद्भार्या प्राणेशा जनकात्मजा ॥**
**स पित्रा भरतन्यस्तराज्येन विधियोगतः ।**
**प्रेषितोऽभूद्वनं साकं सीतया लक्ष्मणेन च ॥**
**तत्र तस्याहरत्सीतां मायया रावणः प्रियाम् ।**
**निनाय च पुरीं लंकां पथि हत्वा जटायुषम् ॥**
**ततः स रामो विरही सुग्रीवं वालिनो वधात् ।**
**स्वीकृत्य मारुतिं प्रेष्य तत्प्रवृत्तिमबुध्यत ॥**
**गत्वा च सागरे सेतुं बद्ध्वा हत्वा च रावणम् ।**
**लंकां बिभीषणे न्यस्य सीतां प्रत्याजहार सः ॥**

दशरथानें राज्य भरताला " विधियोगानें " दिलें व सीता लक्ष्मणासह रामाला वनांत पाठविलें. सीतेस रावणानें हरण केलें. रस्त्यांत जटायूस मारून तिला लंकेंत नेलें. विरही रामानें सुग्रीवसख्य, वालिवध मारुतिमार्फत सीताशोध, सेतुनिर्मिति, रावणवध, बिभीषणाची राज्यावर स्थापना, हीं करून सीतेस परत आणलें व राज्य करूं लागला, इत्यादि हकीकत वरील श्लोकांत आहे.

---

† अलंकारवती लंबक, तरंग १ ला श्लोक ५९ च्या पुढें.

अथावृत्तस्य वनतः शासतो भारतार्पितम् ।
तस्य राज्यमयोध्यायां सीता गर्भमधत्त सा ॥
तावच्चात्र प्रजाचेष्टां ज्ञातुमल्पपरिच्छदः ।
स्वैरं परिभ्रमन्नेक सोऽपश्यत्पुरुषं प्रभुः ॥
हस्ते गृहीत्वा गृहिणीं निरस्यन्तं निजाद्गृहात् ।
परस्येयं गृहमगादिति दोषानुकीर्तनात् ॥
रक्षोगृहोषिता सीता रामदेवेन नोज्झिता ॥
अयमभ्यधिको यो मामुज्झति ज्ञातिवेश्मगाम् ॥
इति तद्गृहिणीं तां च ब्रुवतीं तं निजं पतिम् ।
रामो राजा स शुश्राव खिन्नश्चाभ्यन्तरं ययौ ॥
लोकापवादभीतश्च सीतां तत्याज तां वने ।
सहते विरहक्लेशं यशस्वी नायशः पुनः ॥

राम परत आला भरतानें अर्पिलेलें राज्य करूं लागला. सीतेसंबंधानें जनापवाद उत्पन्न झाला, म्हणून सीतेचा त्यानें याग केला हें वरील श्लोकांत सांगितलें आहे.

सा च गर्भालसा दैवाद्वाल्मीकेः प्रापदाश्रमम् ।
तेनर्षिणा समाश्वास्य तत्रैव ग्राहिता स्थितिम् ॥
नूनं सीता सदोषेयं त्यक्ता भर्त्रान्यथा कथम् ।
... ... ... ... ... ...
इति संमन्त्रयामासुस्तत्रान्ये मुनयस्तदा ॥
तद्बुद्ध्वा तान्स वाल्मीकिरब्रवीन्नात्र संशयः ।
शुद्धैषा प्रणिधानेन मया दृष्टा द्विजा इति ॥

सीतेच्या शुद्धस्थितीबद्दल अरण्यांतील मुनींनीं संशय घेतल्यानंतर वाल्मीकीनें तिच्या शुद्धीबद्दल साक्ष दिली पण ती उपयोगी पडली नाहीं. पण सीतेच्या निग्रही भाषणानें दिव्य करण्याची तिला संधि दिली.

तथाप्यप्रत्ययस्तेषां यदा सीता तदाभ्यधात् ।
भगवन्तो यथा वित्थ तथा शोधयतेह माम् ॥
अशुद्धायाः शिरश्छेदनिग्रहः क्रियतां मम ।
तच्छ्रुत्वा जातकरुणा जगदुर्मुनयोऽत्र ते ॥
अस्त्यत्र टीटिभसरोनाम तीर्थं महद्वने ।
टीटिभी हि पुरा कापि भर्त्रान्यासङ्गशङ्किना ॥
मिथ्यैव दूषिता साध्वी चक्रन्दाशरणा भुवम् ।
लोकपालांश्च तैस्तस्याः शुद्ध्यर्थं तद्विनिर्मितम् ॥
तत्रैषा राघववधूः परिशुद्धिं करोतु नः ।
इत्युक्तवद्भिस्तैः साकं जानकी तत्सरो ययौ ॥
यद्यार्यपुत्रादन्यत्र न स्वप्नेऽपि मनो मम ।
तदुत्तरेयं सरसः पारमम्ब वसुंधरे ॥
इत्युक्त्वैव प्रविष्टाच तस्मिन्सरसि सा सती ।
नीता च पारमुत्संगे कृत्वाविर्भूतया भुवा ॥

ततस्तां ते महासाध्वीं प्रणेमुर्मुनयोऽखिलाः ।
राघवं शप्तुमैच्छंश्च तत्परित्यागमन्युना ॥

सीतेनें दिव्य केलें तेव्हां त्यांचें शंकानिवारण होऊन ते रामासच शाप देण्यास तयार झाले.

युष्माभिरार्यपुत्रस्य न ध्यातव्यममङ्गलम् ।
शत्रुमर्हथ मामेव पापामञ्जलिरेष वः ॥
इति यद्वारयामास सीता तान्सा पतिव्रता ।
तेन ते मुनयस्तुष्टास्तस्याः पुत्राशिषं ददुः ॥
ततः सा तत्र तिष्ठंति समये सुषुवे सुतम् ।
तं च नाम्ना लवं चक्रे स वाल्मीकिमुनिः शिशुम् ॥

पण सीतेनें रामास शाप देऊं दिला नाहीं; तेव्हां त्यांनीं संतुष्ट होऊन पुत्राचा आशिर्वाद दिला. सीता पुत्र प्रसवली त्यास 'लव' नाम वाल्मीकीनें दिलें.

बालमादाय तं तस्यां गतायां स्नातुमेकदा ।
तेन शून्यं तदुटजं दृष्ट्वा सोऽचिंतयन्मुनिः ॥
स्थापयित्वार्भकं याति स्नातुं सा तत्क्व सोऽर्भकः
नीतः स श्वापदेनेह नूनमन्यं सृजामि तत् ॥
स्नात्वागतान्यथा सीता न प्राणान्धारयेदिह ।
इति ध्यात्वा कुशैः कृत्वा पवित्रं निर्ममेऽर्भकम् ॥
लवस्य सदृशं तं च स तथास्थापयन्मुनिः ।
आगता तं च सा दृष्ट्वा मुनिं सीता व्यजिज्ञपत् ॥
स्वकोऽयं मे स्थितो बालस्तदेषोऽन्य कुतो मुने ।
तच्छ्रुत्वा स यथावृत्तमुक्त्वा मुनिरुवाच ताम् ॥
भवितव्यं गृहाणैनं द्वितीयमनघे सुतम् ।
कुशसंज्ञं मयायं यत्स्वप्रभावात्कुशैः कृतः ॥
इत्युक्ता तेन मुनिना सीता लवकुशौ सुतौ ।
तेनैव कृतसंस्कारौ वर्धयामास तत्र तौ ॥

सीता स्नानास पुत्रासह गेली असतां वाल्मीकीना लव दिसला नाहीं. त्यास श्वापदांनीं नेलें असेल असें त्यांस वाटलें व सीता आतां प्राणत्याग करील म्हणून त्यांनीं कुश गवताचा मुलगा केला व सीतेस दिला. सीता याप्रमाणें दोन पुत्रांची आई झाली.

बालावेव च तौ दिव्यमस्त्रग्राममवापतुः ।
विद्याश्च सर्वा वाल्मीकिमुनेः क्षत्रकुमारकौ ॥
एकदा आश्रममृगं हत्वा तन्मांसमादतुः ।
अर्चालिङ्गं च वाल्मीकेश्चक्रतुः क्रीडनीयकम् ॥
तेन खिन्नो मुनिः सोऽथ सीतादेव्यनुनायितः ।
प्रायश्चित्तं तयोरेवमादिदेश कुमारयोः ॥
गत्वा कुबेरसरसः स्वर्णपद्मालयं लवः ।
तदुद्यानाच्च मन्दारपुष्पाण्यानयतु द्रुतम् ॥

**तैरेतौ भ्रातरावेतल्लिङ्गमर्चयतामुभौ ।**
**तेनैतयोरिदं पापमुपशान्ति गमिष्यति ॥**

दोघे कुमार क्षात्रविद्या शिकले. त्यांनीं आश्रममृग मारून खाल्ला व अर्चन योग्य लिंगाचें खेळणें केलें तेव्हां कुबेराकडून सुवर्ण पद्में आणून पूजा करणें हें प्रायश्चित्त मुनीनीं सांगितलें.

**एतच्छ्रुत्वैव कैलासं स बालोऽपि लवो ययौ ।**
**आचस्कन्द कुबेरस्य सरश्चोपवनं च तत् ॥**
**निहत्य यक्षानादाय पद्मानि कुसुमानि च ।**
**आगच्छन्पथि स श्रान्तो विशश्राम तरोस्तले ॥**
**अत्रान्तरे च रामस्य नरमेधे सुलक्षणम् ।**
**चिन्वन्पुरुषमागच्छत्तेन मार्गेण लक्ष्मणः ॥**
**स लवं समराहूनं मोहनास्त्रेण मोहितम् ।**
**क्षत्रधर्मेण बद्ध्वा तमयोध्यामनयत्पुरीम् ॥**

**तावच्च सीतामाश्वास्य लवागमनदुःस्थिताम् ।**
**वाल्मीकिः स्वाश्रमे तत्र ज्ञानी कुशमभाषत ॥**
**नीतोऽयोध्यामवष्टभ्य लक्ष्मणेन सुतो लव ।**
**गच्छ मोचय तं तस्मादेभिरस्त्रैर्विनिर्जितात् ॥**
**इत्युक्त्वा दत्तदिव्यास्त्रस्तेन गत्वा कुशस्ततः ।**
**रोध्यमानामयोध्यायां यज्ञभूमिं रुरोध सः ॥**
**जिगाय लक्ष्मणं चात्र तन्निमित्तं प्रधावितम् ।**
**युद्धे दिव्यैर्महास्त्रैस्तैस्ततो रामस्तमभ्यगात् ॥**
**सोऽपि प्रभावाद्वाल्मीकेर्जेतुं नास्त्रैः शशाक तम् ।**
**कुशं यत्तेन पप्रच्छ कोऽर्थस्ते को भवानिति ॥**
**कुशस्ततोऽब्रवीद्बद्ध्वा लक्ष्मणेनाग्रजो मम ।**
**आनीत इह तस्याहं मोचनार्थमिहागतः ॥**
**आवां लवकुशो रामतनयाविति जानकी ।**
**माता नौ वक्ति चेत्युक्त्वा तद्वृत्तान्तं शशंस सः॥**
**ततः सबाष्पो रामस्तं लवमानाय्य तावुभौ ।**
**कण्ठे जग्राह सैषोऽहं पापो राम इति ब्रुवन् ॥**
**अथ सीतां प्रशंसत्सु वीरौ पश्यत्सु तौ शिशू ।**
**पौरेषु मिलितेष्वत्र स तौ रामोऽग्रहीत्सुतौ ॥**
**आनाय्य सीतादेवीं च वाल्मीकेराश्रमात्ततः ।**
**तया सह सुखं तस्थौ पुत्रन्यस्तभरोऽथ सः ॥**

लवानें सुवर्णपद्में पराक्रम करून आणलीं. वाटेंत तो थकून निजला असतां नरमेधास प्रवृत्त झालेल्या रामासाठीं त्याला मोहित करून लक्ष्मणानें बांधून नेलें. कुश सोडविण्यास गेला. त्यास कोणी जिंकूं शकला नाहीं तेव्हां त्याची इच्छा पूर्ण करण्याचें रामानें ठरविलें. कुशानें आपण कोण तें सांगितलें. राम आणि सीता यांचें पुढें पुनर्मीलन झालें.

वरील रामकथेंत आणि वाल्मिकीच्या कथेंत फरक आहेतच. ते मुख्यतः पुढीलप्रमाणें आहेत.

## २०४. बृहत्कथेंतील रामकथेचीं वैशिष्ट्यें.

२०४. वरील विधानांतील वैशिष्ट्यें वाचकांच्या सहज लक्षांत येण्याजोगीं आहेत. तीं पुढील प्रमाणें आहेत—

१. दशरथानें रामाला पाठविलें तें भरताला राज्य विधिपूर्वक दिलें आणि नंतर पाठविलें. राम परत आल्यानंतर भरतानें त्यास अर्पण केलें.

२. लव हाच खरा रामाचा मुलगा. सीतेला रामानें त्यागिल्यानंतर तो झाला. लवाला घेऊन सीता स्नानाला गेली असतां लवाला श्वापदांनीं नेलें असावें आणि सीता आल्यानंतर तो दृष्टीस पडत नाहीं असें पाहून ती प्राणत्याग करील, म्हणून मुनींनीं लवाप्रमाणेंच स्वरूपाचा "कुश" गवताचा एक पुत्र तयार केला, व तो सीतेसाठीं तयार करून ठेवला; पण सीता सपुत्र परत आली तेव्हां एकाच्या ऐवजीं दोन पुत्र सीतेला मिळाले.

३. रामानें अश्वमेध केला नाहीं तर नरमेध संकल्पिला होता. हा नरमेध संकल्पिला असतां नरमेधार्थ लवाला रामसैनिकांनीं पकडून नेलें, तेव्हां कुशाला अस्त्रविद्या देऊन वाल्मीकिमुनीनीं लवाला सोडविण्यास पाठविलें. कुशानें लक्ष्मणाचा पराभव केला, पण रामाची व त्याची भेट झाल्यानंतर कुशानें आपण कोण वगैरे सर्व वृत्तांत निवेदन केला आणि पुनर्मीलन झालें.

बृहत्कथेच्या निदान अंतिम रचनेच्या म्हणजे वररुचीच्या काळांत रामकथा चांगलीच लोकप्रिय असावी, तशीच ती पूर्णपणें सर्वांना ठाऊक असावी; यामुळें ती बृहत्कथेंत अत्यंत संक्षेपानें आली आहे. आणि त्याशिवाय रामायणांतले दृष्टांत व उल्लेख वारंवार आले आहेत. जेव्हां यौगंधरायण वासवदत्तेच्या खोटया मृत्यूची बातमी उठविण्याचा संकल्प आपला सहमंत्री रुमण्वान याच्याशीं करतो, तेव्हां रुमण्वान् त्याला म्हणतो कीं, रामासारख्या अलौकिक पुरुषांची कथा सोडून द्या. तो दैवी पुरुष होता त्यामुळें दुःख सहन करण्याची त्याची शक्ति थोर होती. तथापि प्रिय जनांचा विरह झालेल्या अत्यंत कामुकांना असलें धैर्य धरणें शक्य नसतें आणि त्यामुळें अनिष्ट परिणाम होतील.

पंचलंबकांत तिसऱ्या तरंगांत रामाश्रमांत नरवाहनदत्त जातो आणि तेथें राम अमुक ठिकाणीं रहात होता वगैरे खुणा खाणा सांगत रामसीता वियोग वर्णिला आहे.

याशिवाय असेंहि दाखविलें आहे कीं जेव्हां वासवदत्ता मगधराजकन्या पद्मावती हिच्या घरीं येऊन राहिली, तेव्हां तिनें पद्मावतीच्या महालांत रामचरित्रात्मक चित्रें पाहिलीं. त्यावरून रामचंद्रकथा ही काव्याचा त्याचप्रमाणें चित्रांचाहि विषय झाली होती.

लंकाविषयक कथा देखील ख्रिस्तशकपूर्व अनेक शतकें प्रचलित असाव्यात.

बृहत्कथेच्या काळांत रामकथा त्याचप्रमाणें लंकादेखील लोककथेचा विषय झाली होती. लंकेंत सोन्याच्या विटा मिळतात असें ऐकून तेथें गेलेल्या एका न्हाव्याची गोष्ट जशी आजच्या लोककथांत आहे त्याप्रमाणेंच बिभिषणराजा हा देखील लंकेंत आहे व त्याकडे जाऊन लोकांनीं पैसे मिळवावेत व श्रीमंत व्हावें अशा गोष्टी प्रचलित होत्या असें दिसतें. लोहजंघ नांवाचा एक ब्राह्मण लंकेंत गेला, बिभीषणाचा स्नेही झाला, त्यानें अनेक रत्नें मिळविलीं व मथुरेच्या मदनदंष्ट्रा नांवाच्या एका कुटिल कुट्टिनीला आपण भगवान विष्णू आहों, असें भासवून चांगलेंच बनविलें अशी एक कथा आली आहे. यावरून दूर देशीं जाऊन अद्भुत संपत्ति मिळविणें म्हणजेच लंकेस जाणें असें लोक समजत होते असें दिसतें. बृहत्कथेंत दिसून येणारे फरक पहातां असें दिसून येतें कीं बृहत्कथेच्या काळांत उत्तरकांडांतर्गत कथा व्यवस्थित तयार झाली नव्हती. यासाठीं उत्तर कांडाकडे सविस्तर लक्ष दिलें पाहिजे.

### २०५. रामायणांतील उत्तरकांड.

२०५. रामायणाची कथा जरी सर्वपरिचित आहे तरी उत्तरकांडांत आलेला भाग सर्वपरिचित नाहीं. उलट वाल्मीकि रामायणांत जो भाग आला आहे त्यापासून अगदीं भिन्न अशा कथा लोकांत अधिक प्रचलित आहेत. सामान्यजनतेकडून त्याचप्रमाणें संशोधक वर्गाकडून रामायणाच्या उत्तरकांडाची बरीचशी उपेक्षा झाली आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. रामायणाचा शेवट युद्धकांडांतच झाला असें युद्धकांडाच्या अंतिम म्हणजे १२८ व्या सर्गावरून दिसून येतें. त्या सर्गांत रामाचा अभिषेक आहे, सुग्रीवादि मंडळीचा सत्कार आहे; हनुमंताला सीतेनें हारदान दिला त्याची कथा आहे आणि वानरांना निरोप दिला हें सांगितलें आहे. सुग्रीवाला किष्किंधेला आणि बिभीषणाला लंकेला परत पाठविलें आहे. भरताला यौवराज दिलें आहे, म्हणजे यावरून तें कांड लिहितेवेळेस कवीच्या मनांत रामानंतर भरतच आला अशी कल्पना होती. युद्धकांडांतच रामराज्याचें एकंदर वर्णन केलेलें आहे. आणि सरतेशेवटीं रामायण श्रवणाच्या फलाचेंही वर्णन केलें आहे. त्यावरून तेथेंच ग्रंथ संपला अशी कवीची भावना त्यांत स्पष्ट होत आहे. ते रामायण पठनाचे थोर फल सांगणारे शेवटचे श्लोक येथें घेतों.

**श्रुत्वा रामायणमिदं दीर्घमायुश्च विंदति ।**
**रामस्य विजयं चेमं सर्वमक्लिष्टकर्मणः ॥**
**शृणोति य इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ।**
**श्रद्दधानो जितक्रोधो दुर्गाण्यतितरत्यसौ ॥**
**समागम्य प्रवासान्ते रमन्ते सहबान्धवैः ।**
**शृण्वन्ति य इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ।**
**ते प्रार्थितान्वरान्सर्वान् प्राप्नुवन्तीह राघवात् ।**
**श्रवणेन सुराः सर्वे प्रीयन्ते संप्रशृण्वताम् ॥**
**विनायकाश्च शाम्यन्ति गृहे तिष्ठति यस्य वै ।**
**विजयेत महीं राजा प्रवासी स्वस्तिमान्भवेत् ॥**
**स्त्रियो रजस्वलाः श्रुत्वा पुत्रान्सूयुरनुत्तमान् ।**
**पूजयंश्च पठंश्चैनमितिहासं पुरातनम् ॥**
**सर्वपापैः प्रमुच्येत दीर्घमायुरवाप्नुयात् ।**
**प्रणम्य शिरसा नित्यं श्रोतव्यं क्षत्रियैर्द्विजात् ॥**
**ऐश्वर्यं पुत्रलाभश्च भविष्यति न संशयः ।**
**रामायणमिदं कृत्स्नं शृण्वतः पठतः सदा ॥**

( युद्धकांड, सर्ग १२८. श्लो. १०९-११६ )

उत्तरकांडामध्यें जे अनेक विषय आले आहेत त्यांवरून असें वाटतें कीं ज्याप्रमाणें अनेक भारतांचें महाभारत झालें, त्याप्रमाणेंच अनेक रामायणांचें हें आजचें वाल्मीकि रामायण बनलें. वाल्मीकिरामायणाची आजची आवृत्ति भवभूतीच्या समोर असावी; कारण पृथ्वीच्या पोटांत सीता गेली असा देखावा भवभूतीनें अगोदर दाखविला असून, 'भगवान् वाल्मीकि हाच तुझा काव्यार्थ काय ?' अशा तऱ्हेनें वाल्मीकीवर भवभूतीनें टीका केली आहे. या कांडामध्यें रावणाचा इतिहास अधिक साग्र येतो. त्यावरून असें दिसतें कीं ज्या कवीला रावणचरित्रावरच काव्य तयार करावयाचें होतें, त्या कवीचें काव्य उत्तरकांड म्हणून अंतर्भूत केलें गेलें. दक्षिणेकडील पौराणिक इतिहास यांत बराच येऊन गेला आहे. या पौराणिक इतिहासाच्या मागें जो खरा वास्तविक इतिहास आहे त्या इतिहासाचें पूर्णपणें उत्खनन करणें हा आमच्या ग्रंथाच्या आदिपर्वाचा विषय आहे; तथापि आपल्या प्रकृत असलेल्या काळामध्यें ज्याअर्थीं जुन्या कथांचें अंतर्भावन रामायणांत झालें, त्या अर्थी त्या जुन्या कथांचें विहंगमावलोकन करणें अयोग्य होणार नाहीं. तें विहंगमावलोकन येणेंप्रमाणें मांडतां येईल.

पहिल्या सर्गामध्यें अयोध्येस आलेल्या ऋषींनीं रावणकथा रामास सांगितली आहे असें सांगितलें आहे व या युक्तीनें रावणेतिहास रामकथेस जोडला आहे.

सर्ग २ पासून सर्ग ३४ पर्यंत रावणेतिहासाचेंच काव्य आहे.

सर्ग ३५ आणि यांत मारुतिकथा आली आहे. दक्षिणेचा इतिहास सांगावयाचा म्हणजे दक्षिणेकडे अत्यंत पराक्रमी झालेल्या लंकाधिपति रावणाचा वृत्तांत सांगणें ज्याप्रमाणें अवश्य आहे, त्याप्रमाणें दक्षिणेकडील देवता जी मरुत् त्या मरुतच्या पुत्राचा पुरस्कार करणेंदेखील अवश्य आहे. तो पुरस्कार वर सांगितल्याप्रमाणें ३५ व ३६ या सर्गांत केला आहे.

३८ व्या सर्गांत जनक व कैकेय यांचें स्वस्थानीं गमन वर्णिलें आहे. आणि सुग्रीव बिभीषण इत्यादि मंडळीस पुन्हा निरोप ३९ व्या सर्गांत दिलेला आहे.

३९ व्या सर्गांत ४० व्या सर्गाचा पूर्वभाग असून शिवाय रामाकडे इतर राजांकडून जे अहेर आले ते वर्णिले आहेत.

४१ व्या सर्गामध्यें पुष्पक विमानाला निरोप दिला आहे.

पुढें सर्ग ४२ पासून सर्ग ५४ पर्यंत सीतात्याग, त्याचा उपोद्घात व समारोप हीं वर्णिलीं आहेत.

पुढील ५५ पासून ५८ पर्यंत निमिराजाची कथा व ५९ त ययातीची कथा आली आहे.

त्यानंतर ६० ते ७१ पर्यंत मधुपुरी येथील लवण या राक्षसाच्या शत्रुघ्नाकडून झालेल्या संहाराकडे सर्ग लावले आहेत.

मधुपुरीहून अयोध्येस शत्रुघ्न बारा वर्षांनीं येत असतां मध्यें त्यानें वाल्मीकीच्या आश्रमांत निवास केला; तेथें त्यास कुशलवांनीं रामायण काव्य गाऊन दाखविलें असें सांगितलें आहे. पुढें सात दिवस शत्रुघ्न रामाचा पाहुणा होतो आणि मधुपुरीस परत जातो. (सर्ग ७२).

सर्ग ७३ ते ७६ हे शंबूकाख्यानाचे आहेत. अयोध्येंत ब्राह्मणपुत्र अल्पवयांत मरतो, तो मृत्यु रामाच्या राज्याच्या सीमेवर शूद्रतपस्वी देवत्व प्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत आहे त्यामुळें तो पुत्र मेला आहे, असें रामास कळतें. राम त्या शूद्र तपस्व्याला मारतो आणि त्यामुळें द्विजपुत्र जिवंत होतो, इत्यादि कथा वर्णिली आहे.

सर्ग ७७ यामध्यें राम आणि अगस्त्य यांची भेट होऊन दक्षिणेच्या इतिहासांतील ज्या कांहीं विशेष गोष्टी अगस्त्य रामास सांगत आहे त्यांत वैदर्भक राजाचा मुलगा श्वेन आणि इक्ष्वाकुपुत्र राजा दंड अथवा दंडक यांची कथा आली आहे, व या दोन कथा रामपूर्वकालीन महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दर्शक आहेत असा समज कवीचा होता हें त्यावरून दिसत आहे. सर्ग ७७ ते ८१ किंबहुना ८२ पर्यंत रामाचें पुन्हा दक्षिणेस गमन वर्णिलें असल्यामुळें त्या सर्गांचा गोषवारा थोडासा येथें दिल्यास अप्रयोजक होणार नाहीं.

## २०५ अ. दंडकारण्याच्या प्राचीन विदर्भ राजाची कथा.

२०५ अ. सत्याहत्तराव्या सर्गामध्यें अगस्त्यमुनि दंडकारण्यांत आपलें आगमन कसें झालें तें सांगतात. तेथें त्यांत ते असें सांगतात कीं, "त्यावेळेस अरण्यामध्यें एक योजनभर असलेलें सरोवर होतें व त्या सरोवरामध्यें सर्व प्रकारचे पक्षी येत असत. त्या सरोवराच्या कडेनें सकाळीं फिरावयास गेलों असतां एक सुपुष्ट शव माझ्या दृष्टीस पडलें. मी तेथेंच उभा राहून त्याविषयीं विचार करूं लागलों असतां कांहींतरी मला अद्भुत दिसलें; ती गोष्ट म्हटली म्हणजे एक विमान मला दृष्टीस पडलें व त्या विमानांत एक स्वर्ग्य व्यक्ति दृष्टीस पडली. विमानांतून मी पाहात असतांच ती व्यक्ति विमानांतून उतरली व तिनें त्या शवांतील मांसाचें भक्षण केलें. तो स्वर्गी परत जाऊं लागला तेव्हां मी त्यास विचारिलें कीं तुम्ही कोण आहांत? असा आहार कां करतां? असा आहार देवसंमत आहे काय?" तेव्हां त्या व्यक्तीनें आपलें चरित्र मला सांगितलें तें असें कीं, (सर्ग ७८) "पूर्वी वैदर्भ येथील सुदेव नांवाचा विख्यात राजा होता त्याचा मी श्वेत नांवाचा मुलगा होतों. माझ्या धाकट्या भावाचें नांव सुरथ होतें. मी एक हजार वर्षें राज्य करून प्रजेचें धर्मानें रक्षण केलें, व याच सरोवराच्या बाजूस तपश्चर्या करण्यास सुरुवात केली. त्यावेळेस हें सरोवर मृगपक्षीविरहित होतें. त्यावेळीं सुरथ भ्रात्याला अभिषेक करून मीं तीन हजार वर्षें तपश्चर्या केली, व तीमुळें ब्रह्मलोक पावलों. ती तपश्चर्या करीत असतां मी आपलें शरीरदंडन केलें नाहीं आणि त्यामुळें जेव्हां ब्रह्मलोकप्राप्ती करून घेतली, तेव्हां मला क्षुधाहीनता प्राप्त झाली नाहीं. स्वर्गांत क्षुधा व तहान ही नसते आणि त्यामुळें ती भागविण्याची सोयहि नसते; माझी क्षुधा व पिपासा तीव्र राहिल्यामुळें मी ब्रह्मलोकीं पितामहांना आपल्या क्षुधातृप्तीसंबंधानें विचारिलें. तेव्हां त्यांनीं असें सांगितलें कीं तूं आपलें शरीर पुष्ट केलें आहेस तर तेंच शरीर जाऊन भक्षण करीत जा. यामुळें मला पोट भरण्यासाठीं येथें यावें लागतें. या

वृत्तीपासून मी सोडवणूक याचिली असतां ब्रह्मदेवानें सांगितलें कीं "अगस्ति मुनि येऊन तुझी सोडवणूक करतील." असें म्हणून त्यानें हें उत्तम आभरण मला दिलें त्याचा मी स्वीकार करून त्याची मुक्तता केली आणि त्याच्या मानुषदेहाचा नाश करून टाकला. वरील उल्लेखावरून असें दिसतें कीं दंडकारण्य हें विदर्भच्या राजाच्या हद्दींत असावें म्हणजे विदर्भाच्या राजाची सत्ता पश्चिमेकडील महाराष्ट्रांत देखील असावी.

**२०५ आ. दंडकारण्याच्या अत्यंत प्राचीन इतिहासाचें विधान.**

२०५ आ. सर्ग ७९ यांत प्राचीनतर इतिहास आलेला आहे. महाराष्ट्राच्या इतिहासाविषयीं याहून प्राचीन विधान दुसरें कोणतेंहि नाहीं. वैदर्भक श्वेत याची कथा ऐकल्यानंतर रामानें पुन्हा प्रश्न केला कीं हें श्वेत वैदर्भक राजाचें सरोवर मृग पक्षीहीन कसें झालें? तेव्हां त्या वैदर्भकाच्याही पूर्वींचा इतिहास म्हणून अगस्त्यानें सांगितला तो असा कीं 'पूर्वी कृत युगामध्यें मनु हाच राजा होता. त्याचा मुलगा इक्ष्वाकु त्याला त्यानें राज्य दिलें. आणि त्याचा वंश स्थापन झाला; त्याच्या वंशांत पुढें दंड नांवाचा राजा उत्पन्न झाला. त्या दंडाचें राज्य

**विंध्यशैवलयोर्मध्ये राज्यं प्रादादरिंम**
**सदण्डस्तत्रराजाऽभूद्रम्ये पर्वतरोधसि ॥**

(सर्ग ७९)

दंडकाची कथा सांगणाऱ्या इतर ग्रंथांनीं या राजाला चांगुलपणाचें श्रेय दिलें नाहीं, तथापि रामायणांत अगस्त्याच्या मुखीं त्याचा चांगुलपणा वर्णिला आहे. आणि चांगल्या राजाच्या हातून वाईट कृत्य झालें असें दाखविलें आहे. दंडकानें 'मधुमंत' नांवाची सुंदर पुरी वसविली आणि उशनस नांवाचा चांगल्या व्रताचा पुरोहित स्वीकारला आणि देवराज ज्याप्रमाणें स्वर्गांत राज्य करी त्याप्रमाणें त्यानें राज्य केलें हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**पुरं चाप्रतिमं राम न्यवेशयदनुत्तमम्**
**पुरस्य चाकरोन्नाम मधुमन्तमिति प्रभो**
**पुरोहितं तूशनसं वरयामास सुव्रतम्**
**एवं स राजा तद्राज्यं, अकरोत्स पुरोहितः**
**प्रहृष्टमनुजाकीर्णं देवराजो यथा दिवि**

(सर्ग ७९.)

येणेंप्रमाणें दंडकारण्याचा प्रदेश वैदर्भ राजाच्या तावडींत रामपूर्व काळीं होता; पण त्याच्याहि पूर्वी इक्ष्वाकुवंशाच्याच ताब्यांत होता ही आठवण अगस्त्यानें संरक्षून ठेवली. तीच आपण ग्रंथांत समाविष्ट करीत आहों, असें उत्तरकांडाचा कवि दाखवीत आहे.

दंड राजानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. पण तो आपला गुरु जो उशनस् भार्गव त्याच्या आश्रमीं गेला तेथें अप्रतिम रूपाची भार्गव कन्या विहरतांना पाहिली. नंतर—

**स दृष्ट्वा तां सुदुर्मेधा अनंगशरपीडितः**
**अभिगम्य सुसंवितः कन्यां वचनमब्रवीत्**
**कुतस्त्वमसि सुश्रोणि कस्य वासिसुता शुभे**
**पीडितोहमनंगेन पृच्छामित्वां शुभानने**
**तस्य त्वेषं ब्रुवाणस्य मोहोन्मत्तस्य कामिनः**
**भार्गवी प्रत्युवाचेदं वचः सानुनयं त्विदं**
**भार्गवस्य सुतां विद्धि देवस्याक्लिष्टकर्मणः**
**अरजां नाम राजेंद्र ज्येष्ठामाश्रमवासिनीम्**
**मा मां स्पृश बलाद्राजन्, कन्यापितृवशाह्ययम्**
**गुरुः पिता मे राजेंद्र त्वं च शिष्यो महात्मनः**

मी तुझ्या गुरूची मुलगी आहें. बापाच्या आधीन आहें. मजवर बलात्कार करूं नको. तूं याचना केलीस तर माझा पिता मला तुला देईल. तर तूं माझ्या पित्याकडे जा.

**वरयस्व नरश्रेष्ठ पितरं मे महाद्युतिम्**
**अन्यथा तु फलं तुभ्यम् भवेद्घोराभिसंहितम्**
**क्रोधेन हि पिता मेऽसौ त्रैलोक्यमपि निर्दहेत्**
**दास्यते चानवद्यांग तव मा याचितः पिता ।**

येणेंप्रमाणें बोलणाऱ्या अरजेस प्रणामपूर्वक (शिरस्याधाय चांजलिम्) राजा प्रत्युत्तर करतो कीं "हे सुश्रोणि प्रसाद कर कालक्षेप करूं नको, हे वरानने, तुझ्यासाठीं माझे प्राण विदीर्ण होत आहेत. तुझी प्राप्ति झाली तर वध किंवा अत्यंत दारुण पाप देखील सहन करावयास मी तयार आहें. हे भित्र्या मुली, या विह्वल भक्ताचा स्वीकार कर.

× × ×

दंड राजा घोर अनर्थ करून ताबडतोब मधुपंत पुरीस निघून गेला आणि अरजा आश्रमाजवळच सुसंत्रस्त होत्साती रुदन करीत राहिली. (सर्ग ८०) एका मुहूर्तानें शिष्यासमवेत महर्षि आश्रमाप्रत आला. तेथें दीन स्थितींत अरजेस पाहिलें. तो अगोदरच भुकेला असल्यामुळें त्याचा रोष संवर्धित झाला. (तस्य रोषमभवत्क्षुधार्तस्य विशेषतः) आणि जणुकाय लोकांना, स्त्रियांना आणि शिष्यांना जाळणारे शब्द बोलता झाला.

**सप्तरात्रेण राजाऽसौ सपुत्रबलवाहनः**
**पापकर्मसमाचारो वधं प्राप्स्यति दुर्मतिः**
**समंताद्योजनशतं विषयंचास्य दुर्मते,**
**धक्ष्यते पांसुवर्षेण महता पाकशासनः**

शाप पावलेला भाग भोवतालीं १०० योजनें म्हणजे ३०० मैल होता आणि त्या भागाचा नाश झाला तो धूळ पडून नाश झाला म्हणजे मोठें वादळ होऊन धूळीचा जाडा थर पडून प्रदेश माखून गेला, अशा तऱ्हेचा उत्पात यांत यांत वर्णिला आहे. सुसंपन्न राष्ट्र या तऱ्हेनें नाहींसें होणें अशक्य नाहीं. भृगु कन्येच्या तोंडीं 'होरा' हा शब्द घातला आहे तिकडे लक्ष असावें.

दंडकाच्या राष्ट्राचें दंडकारण्य झाल्यानंतर ऋषींनीं पुन्हां वसती केल्यामुळें जनस्थान झालें.

दंडकारण्याची मर्यादा विंध्य आणि शैवल यांच्यामध्यें अशी येथें दिली आहे. तथापि 'शैवल' या पर्वताची ओळख पटली नाहीं.

## २०६. रामाचा अश्वमेध, कुशलवपरिचय आणि रामाचें निजधामास गमन.

२०६. सर्ग ८३ पासून पुढें अश्वमेधाचा वृत्तांत सुरू होतो. तो वृत्तांत चालू असतां मध्यें अनेक उपकथा उत्पन्न होतात. त्यामध्यें कुश आणि लव यांची गायक म्हणून ओळख करून देण्यांत येते, आणि पुढें ते सीतेचे मुलगे म्हणून सांगितलें आहे. पुढें सीतेलाहि बोलाविण्यांत येतें. तिच्याकडून वाल्मीकि शपथीकरण करवितो. पण रामाची व सीतेची पुन्हां भेट होत नाहीं; कारण भूतलांतून सिंहासन उत्पन्न होतें आणि सीतेचा रसातलांत प्रवेश होतो. सर्व राजेलोकांना निरोप देण्यांत येतो, आणि निरनिराळ्या राज्यांचे वांटे देखील राम करतो. भरताला तो गंधर्व देशांत पाठवितो, भरत गंधर्व देश जिंकतो. अंगदाला कारुपथ देश देण्यांत येतो. लक्ष्मण पुत्र चंद्रकेतु यास मल्लभूमि देण्यांत येते (सर्ग १०२). पुढें रामास तापसरूपानें प्रत्यक्ष काल भेटण्यास येतो. त्याचें वाक्य जो ऐकेल तो मृत्यूला पात्र व्हावा असें ठरतें. त्या दोघांचें संभाषण होतें. लक्ष्मण द्वारपाल म्हणून राहतो; तथापि या दोघांचा संवाद चालला असतां दुर्वासमुनि येतो. दुर्वासास आंत सोडलें नाहीं तर दुर्वास सर्वकुलविनाशक शाप देईल अशा भीतीनें दुर्वासाच्या आगमनाचें वृत्त रामास लक्ष्मण कळवितो, आणि नंतर तापससंवाद ऐकल्यामुळें आपण वधाच्या शिक्षेस पात्र आहों असें सांगतो. राम सभेपुढें हा प्रश्न ठेवतो. सभेंतील ऋषि हा वधास पात्र आहे असें सांगतात. तेव्हां राम लक्ष्मणाचें विसर्जन करितो. लक्ष्मण सदेह स्वर्गी जातो. रामास तापसानें जें कांहीं सांगितलें तें म्हणजे तुझे आजे तुझी वाट पहात आहेत हें असतें. आणि राम तें आनंदानें कबूल करितो. राम भरताला राज्य देऊं करितो, पण तो तें घेत नसल्यामुळें कोशलराज्य कुशास व उत्तरराज्य लवास देण्यांत येतें. राम आपलें वृत्त शत्रुघ्नास कळवितो व त्यास आपल्या अधिकाराखालीं असलेला प्रदेश दान देतो. पण आपलें राज्य टाकून रामामागून जाण्याचा आपला निश्चय शत्रुघ्न प्रगट करतो. राम स्वर्गाभिमुख झाला असतां त्याला भेटण्याकरितां सुग्रीवादि मंडळी येतात. अंगदाला अभिषेक होतो. बिभीषणास लंकेचें राज्य कायम मिळतें (सर्ग १०८). पुढें राघव आपल्या महाप्रस्थानास निघतो त्या निमित्त वसिष्ठ दानें देतो. अनेक लोक रामाच्या पाठोपाठ जातात. राम प्रजेसह शरयू नदीसमीप येतो आणि तेथें जलसमाधि घेतो (सर्ग ११०). पुढें रामायणकाव्य फलोपदेश (सर्ग १११).

रामाचा शेवट जरी काव्याच्या भाषेंत वर्णिला आहे तरी ती "आत्महत्त्या" होती या तऱ्हेचा शेवट कवींस आवडला नाहीं आणि त्यामुळें त्यासंबंधानें इतर कवींची मूकवृत्ति आढळून येते. उदार, थोर मनाच्या आणि पराक्रमी अशा पुरुषाचा शेवट दुःखदायक दाखविला जावा ही गोष्ट केव्हांहि दुःखदायकच आहे.

आतां रामायण वृद्धीच्या इतिहासाकडे लक्ष दिलें पाहिजे.

## २०७. रामायण आणि महाभारत यांच्या प्राचीनतेची तुलना.

२०७. रामायण आणि महाभारत यांतील अधिक जुना ग्रंथ कोणता याविषयीं एका काळीं वाद चालत असे, आणि एका ग्रंथास दुसऱ्यापेक्षां प्राचीनतरता दिली जात असे. या प्रकारच्या वादांत आज कोणी फारसें शिरत नाहीं याचें कारण दोन्ही ग्रंथांत नवीन नवीन भाग शिरत असल्यामुळें प्रत्येकांतील कांहीं भाग दुसऱ्या ग्रंथांतील कांहीं भागापेक्षां प्राचीनतर आहे ही गोष्ट सर्वांस पटलेली आहे. रामायणाची भाषा अधिक सफाईची आहे. कृत्रिम काव्याचे गुण महाभारतापेक्षां रामायणांत अधिक आढळतात, आणि महाभारतांत तर सबंध रामायणाचा गोषवारा आला आहे आणि तो गोषवारा रामकथा जवळ जवळ आजच्या काळाप्रमाणेंच त्या काळांतहि माहीत असावी असें दाखवितो. या प्रकारच्या परिस्थितींत आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. रामायण आणि महाभारत हे दोन्ही ग्रंथप्रासाद, त्यांत राहणारी मंडळी आपल्या गरजेप्रमाणें दर पिढीस संस्कारीत किंवा बदल करीत आली असल्यामुळें

जवळ जवळ प्रत्येक पिढीचे अवशेष त्यांत आहेत. रामायणापेक्षां भारताची भाषा व काव्याची धाटणी हीं अधिक प्राचीन राहिलीं आहेत याचें कारण हें कीं जितका वाडा मोठा तितका त्यास रंगरंगोटीचा खर्च अधिक, आणि त्यामुळें बरेच जुने मोठाले वाडे सफाई व्हावयाचे रहातात. त्या प्रमाणेंच भारताची स्थिति झाली आहे. प्रचंड वाड्यांतील जे रहिवासी असतात त्यांना वाड्याची जुनाट स्थिति दिसत नाहीं असें नाहीं. ज्याला ज्या खोलींत रहावयाचें तेवढी खोली मनुष्य दुरुस्त करून घेतो त्याप्रमाणें महाभारतांत झालें आहे. अनेक महाभारतांतील आख्यानें सफाईचा हात पुरा फिरलेल्या स्थितींत आहेत आणि काव्य या दृष्टीनें त्यांची धाटणी रामायणापेक्षां कोणत्याहि दृष्टीनें कमी नाहीं. तथापि एकंदर ग्रंथाच्या आर्ष स्वरूपाशीं संगति रहावी हा देखील एक हेतु संस्कारित्याच्या मनांत असतोच आणि त्यामुळें तो कदाचित् सफाईमध्यें प्राचीनताहि ठेवण्याचा प्रयत्न करतो. या प्रकारची संपादकीय वृत्ति लक्षांत घेतली असतां रामायण हें प्राचीनतर काव्य असणें शक्य असून अधिक अर्वाचीन कसें दिसतें हें लक्षांत येईल.

कुरुयुद्धाच्या पूर्वीच्या काळापासून रामाच्या कथेचा ब्राह्मणीदृष्टीनें विकास होत होता आणि वररुचीच्या काळीं त्या कथेस जवळजवळ आजचें स्वरूप आलें होतें हें आज स्पष्ट आहे.

### २०८. रामायण कथांशीं विरुद्ध अशी बौद्ध परंपरा.

२०८. बौद्धांमध्यें रामकथा निराळ्या रूपांत प्रचलित होती तर तीवरून काय काढावयाचें याकडे वळलें पाहिजे. रामविषयक भिन्न इतिहास बौद्धांत प्रचलित होता असें नाहीं तर रामायणांत ज्या उपकथा होत्या त्यांचेंहि निराळें रूप बौद्धग्रंथांत आढळतें. नुकत्याच उल्लेखिलेल्या दंडकारण्याच्या उत्पत्तिविषयींची बौद्धकथा काय होती तें पाहूं.

दंडकाचें राष्ट्र भृगूंच्या शापामुळें नष्ट झालें ही कथा रामायणांत आहे. ही कथा उत्तर कांडांत असल्यामुळें ही कथा रामकथेस नंतर जोडली गेली हें उघड आहे. ही कथा कवींनीं ऐकली तशीच घातली असें समजण्याचें कारण नाहीं. ही कथा कोणत्या तरी रूपांत उत्तरेकडील कवींना ठाउक झाली असावी आणि ती रामकथेशीं त्यांनीं जोडून घेतली असावी. ती कोणत्या स्वरूपांत अत्यंत प्राचीनकालीं होती हें जरी आपणांस निश्चयानें सांगतां येणार नाहीं तरी त्या कथेचें एक बौद्ध रूपांतर जातकांत उपलब्ध आहे.

त्या कथेंत असें सांगितलें आहे कीं बोधिसत्व आपल्या एका कोणत्या तरी जन्मांत गणशास्ता होता. तो आपल्या पांचशें अनुचर तापसांसह हिमालयांत तपश्चर्या करीत होता. आणि तो पुढें भरुराजा राज्य करीत असतां भरुरट्ठांत आला. तो भरु नगरच्या शेजारीं एका वडाच्या झाडाखालीं राहूं लागला. त्यानंतर कांहीं कालानें दुसरा एक गणशास्ता आपल्या ५०० ऋषिगणासह तेथें आला. बोधिसत्व उत्तरद्वाराशीं असलेल्या वडाखालीं राहिला तर दुसरा गणशास्ता भरु नगरच्या दक्षिणेस असलेल्या वडाच्या झाडाखालीं राहिला. कालांतरानें ते दोन्हीहि ऋषींचे गण हिमालयास परत गेले आणि पुढल्या प्रसंगीं प्रथम आलेले ऋषिगण पूर्वी ज्या वडाखालीं राहिले तो वड सुकला आहे असें पाहून दुसऱ्या वडाखालीं राहिले. दुसरा ऋषिगण नंतर आला आणि आपलें पूर्वस्थान मागूं लागला. अगोदर जागा अडकवून बसलेले ऋषिगण सोडीनात. तंटा राजाकडे आला आणि राजा लांच खाऊन न्याय आज एकाच्या तर्फेचा तर उद्यां दुसऱ्याच्या तर्फेचा देऊं लागला. पुढें ते दोघेहि ऋषिगण आपण ऋषि असून लांच देण्याला प्रवृत्त झालों या गोष्टीबद्दल पश्चात्ताप पावून हिमालयास गेले. तथापि भरु रट्ठांतील सर्व देवता एकत्र जमून राजानें अयोग्य काम केलें असें त्यांनीं ठरवून तीनशें योजन विस्ताराचें भरुरट्ठ त्यांनीं समुद्र खवळवून अराष्ट्र करून टाकलें (२१३ भरुजातक). भृगुकच्छाला 'भरुरट्ठ' हें नांव एकाकाळीं होतें आणि भृगु व रट्ठ या दोघांच्या संयोगानें तें राष्ट्र बनलें असावें या ऐतिहासिक शक्यतेची आठवण रक्षिणारी ही कथा आहे. ही कथा बुद्धपूर्वकालीन आहे यांत शंका नाहीं. जितक्या जुन्या कथा उपलब्ध होतील तितक्या आपल्या वाङ्मयांत समाविष्ट करावयाच्या एवढेंच नव्हे तर आपल्या संप्रदायेतिहासास किंवा उपास्य विषयास चिकटवावयाच्या ही पद्धति ब्राह्मणांत त्याप्रमाणेंच बौद्धांत होती. बुद्धोत्तरकालीं अशा अनेक जुन्या कथा चिकटविल्या गेल्या आहेत असें दिसतें.

दशरथ जातकांत जी कथा नसल्यामुळें रामस्वरूप अगदीं निराळें भासत आहे ती म्हटली म्हणजे रामरावणयुद्धाची होय. हें युद्ध बौद्धांस ठाऊक नाहीं. जैनांमध्यें रामरावणयुद्धाची कथा आहे, पण ती अगदीं निराळ्या स्वरूपाची आहे. रावणकथा बौद्धांस अगदींच अपरिचित होती असें मात्र नाहीं. बौद्धांनीं "लंकावतारसूत्र" नांवाचें एक पुस्तक तयार केलें आहे. त्यांत रावण आणला आहे आणि तो बौद्ध धर्माकडे वळला असें दाखविलें आहे.

दशरथ जातकांत रामरावणयुद्धाची कथा नाहीं, आणि रामायणांत तर तो मोठा प्रामुख्याचा भाग आहे. तर रामायण

कथा अनेक कथांचें एकीकरण होऊन संवर्धित झाली आहे काय हा एक प्रश्न सोडविण्याजोगा आहे. रामकथेशीं ज्या अनेक कथांचा मिलाफ झाला आहे अशा अनेक कथा रामायणांत आहेत, त्याचप्रमाणें केवळ आनुषंगिक कथा रामायणांत आहेत. महाभारतांतील वनपर्वांत ज्याप्रमाणें अनेक कथा युधिष्ठिराला सांगण्याच्या निमित्तानें कवीनें अगर संपादकानें आणल्या आहेत, त्याप्रमाणेंच रामायणांतहि आल्या आहेत.

**२०९. रामकथेच्या भिन्न पुरवण्यांचे भिन्न कालनिश्चय; आसुरी परिणाम आणि कैकेय परिणाम यांतील पौर्वापर्य.**

२०९. मुख्य कथेशीं मिलाफ झालेल्या कथा थोड्या थोडक्या नाहींत. रामायणांत रघुकुलाचा इतिहास आला असल्यामुळें पूर्वजांच्या कथांना सहजच क्षेत्र मिळालें आहे. त्याचप्रमाणें रामरावणयुद्धाच्या वर्णनाच्या निमित्तामुळें दक्षिणेकडील स्थलवर्णनें आणि ऐकींव इतिहास यांच्या मांडणीस क्षेत्र मिळालें आहे. रामायणांतील कथेचें पृथक्करण करतां दृष्टीस पडणारीं अंगें अनेक भिन्न क्षेत्रांतून आलीं आहेत काय याविषयीं विचार करणें अवश्य होतें. कथेंतील अनेक अंगें घेऊन त्यांचा पृथकत्वानें विचार केला असतां त्या अंगांस पाठीमागचा इतिहास बराच आहे असें दिसून येतें. रामायणाच्या अंतिम संपादनाच्या प्रसंगीं कवीनें जी माहिती समाविष्ट केली, तींतील कांहीं असुरदेशीय व बाबीलोनी तर कांहीं इराणी आहे.

( १ ) रामायणांतील कैकेयी व कैकय यासंबंधाचे उल्लेख.
( २ ) रामाचें रावणयुद्ध.
( ३ ) रामाचें सेतुबंधन.
( ४ ) रामाचें देवत्व.

वर उल्लेखिलेल्या रामायण वैशिष्ट्यापैकीं कैकेयीसंबंधाचे उल्लेख बृहत्कथेंत नाहींत. उरलेल्या तीन गोष्टी बृहत्कथेंत आल्या आहेत, पण दशरथजातकांत नाहींत. यावरून पुढील अनुमानें निघतात; रामदेवत्व, सेतुबंधन आणि रावणयुद्ध या कथाभागांची जोड रामायणास प्रथम झाली असून कैकेयोल्लेख नंतरची जोड आहे.

रामदेवत्व आणि सेतुबंधन या कल्पना सेमेटिक असल्यास रामायणावर कैकेय परिणाम होण्यापूर्वीच सेमेटिक म्हणजे मुख्यत्वेंकरून आसुर व बाबीलोनी परिणाम झाला असला पाहिजे. रामायणांत कैकेयीसंबंधानेंच उल्लेख रामायणाच्या अंतिम संपादनाच्या प्रसंगीं म्हणजे बृहत्कथेच्या उपान्त्य संपादनानंतर समाविष्ट केले असले पाहिजेत. तथापि त्या वेळेस दारियसचा बाप हिंदुस्थानांत लोकविश्रुत व्यक्ति असणें अशक्य नाहीं.

सेमेटिक लोकांचा रामप्रतिष्ठाविषयक परिणाम अगोदरचा असावा असें पुरावा पाहतां वाटतें.



**चित्रांक—२८ आसुर आणि खाल्डियन लोकांची मत्स्यावतार कल्पना.**

**२१०. आसुर आणि सेमेटिक परिणामांची प्राचीनता आणि व्यापकता.**

२१०. इराणच्या संस्कृतीपेक्षां सेमेटिक संस्कृति इतर देशांवर परिणामकारी अगोदर झाली. इराणचा देव ‘अहुरमझ्द’ हा असुरांच्या ‘असुर’ देवांचीच सुधारलेली आवृत्ति होता. असुरांमध्यें देवविषयक वाङ्मय अगोदर वाढलें होतें, त्या वाङ्मयांत अंतर्भूत झालेल्या विचाराचा भारतीय विचाराशीं आणि पश्चिम एशियांतील विचाराशीं संबंध अभ्यासणें अवश्य आहे. बुद्धपूर्व दोन तीनशें वर्षांत इराणच्या धार्मिक विचारापेक्षां असुरांचा धार्मिक विचारच अधिक महत्त्वाचा होता.

आसुरी संस्कृतीचे भारतावर जे अनेक परिणाम झाले असतील त्यांतच मत्स्यादि अवतारांचा समावेश भारतीय समजुतींत झाला ही एक बाब आहे. तथापि तो विषय रामायणाच्या चर्चेंत सध्यांच घेत नाहीं.

# प्रकरण २५ वें.

# रामायण व बाह्यसंस्कृतींचे परिणाम

## २११. रामाचा सेतू, आणि आदामाचा पूल जानकीहरणकथा वगैरे रामायणाचीं अंगें.

२११. ज्या काळांत रामायणाची रचना झाली त्या काळांत दक्षिणेकडील स्वरूप कवींस पुढीलप्रमाणें कळलें असावें. रावण नांवाचा एक मोठा योद्धा होऊन गेला, त्याची कोणाशीं तरी लढाई बुद्धोपदेशापूर्वी शेंकडों वर्षें अगोदर झाली. रामाचा सेतु हें हिंदुस्थान व सिंहलद्वीप यांच्या मधल्या प्रस्तरमालिकेस नांव होतेंच. त्यावरून कवीनें स्वाभाविकपणें निर्णय काढला कीं रावणाची लढाई त्या सेतूशीं संबद्ध असली पाहिजे; व ती रामाशींच झाली असली पाहिजे.

रावण व त्याच्या प्रजेपैकीं बराचसा भाग यज्ञकर्ता आणि आर्यन् भाषा बोलणाराच असेल. सिंहली भाषा आर्यन् आहे आणि सिंहलद्वीप, मिनिकॉय बेट आणि कोंकण यांत आर्यन् लोकांच्या वसाहती वेदपूर्वकालींच समुद्रमार्गानें झाल्या असल्या पाहिजेत. याला प्रमाण सिंहलीभाषेच्या संस्कृतपासून अत्यंत दूरतादर्शक स्वरूपाचें आहे. रावण हा यज्ञकर्ता आर्यन् भाषेचा असल्यामुळें तो ब्राह्मण होता असें घालणें रामायणकारांस भाग पडलें. येणेंप्रमाणें सर्व कथा जुळते. फक्त जानकीहरणाची कथा कोठून आली हें स्पष्ट होत नाहीं. ती कथा वेबर समजतात त्याप्रमाणें ग्रीकांकडून आली असणें अशक्य नाहीं.

जा न की ह र ण क था स मा वे शा चा का ल

ग्रीक लोकांशीं संपर्क केवळ शिकंदराच्याच वेळेस आला नव्हता. तर तो शिकंदरापूर्वी अनेक शतकें असावा. डारीयस हिस्टास्पिसच्या म्हणजे कैकेयांच्या काळांतच ग्रीक व भारतीय यांची सहकारिता होत होती. इराणी सम्राट ग्रीक व हिंदु या दोघांनाहि लष्करांत घेत होते. बुद्धास न जाणणारा पाणिनि यवनांचा आणि यवनानीचा उल्लेख करीत आहे. बुद्धपूर्व काळीं इराणी लोक हिंदुस्थानांत येत त्याप्रमाणेंच ग्रीकहि येत. ते नाटकें करीत, वेश्यामंदिरें स्थापन करीत. नाटकें करणाऱ्या मंडळींनीं एकाची बायको दुसऱ्यानें पळविली आणि तीमुळें मोठी लढाई झाली अशा तऱ्हेची कथा मांडणें अगदीं स्वाभाविक आहे. आणि दूरच्या राजानें तसें कृत्य केलें असें दाखविणें हेंहि स्वाभाविक आहे. स्त्रीहरणमूलक युद्ध झालें अशी कथा ग्रीकांत असली तरी ती आसुर लोकांमार्फत येणें देखील अस्वाभाविक नाहीं. जानकीहरणाची कथा अश्वपति कैकेयाच्या कथेच्या समावेशापूर्वी म्हणजे वररुचीच्या काळापूर्वी तयार झाली ही शक्यता कोणत्याहि पुराव्याशीं विसंगत नाहीं.

## २१२. वररुचीच्या प्राकृतपांडित्याचा परिणाम.

२१२. वररुचीच्या कालानंतर प्राकृत भाषांचा अभ्यास झाला असावा. कैकेयांनीं उत्तेजिलेल्या पैशाचींतील वाङ्मय ओरबाडलें जाऊन त्यांतील अंश ब्राह्मणी वाङ्मयांत समाविष्ट होण्याची क्रिया बृहत्कथेंत जशी दृष्टीस पडत आहे तशीच रामायणांत देखील दृग्गोचर होत आहे.

रामायणामध्यें जे इराणी संबंध दिसत आहेत, त्या मध्येंच कैकयीचें लग्न दशरथाशीं झालें तें असुरपद्धतीनें झालें असें दिलें आहे. आसुर पद्धतींत जावयानें सासऱ्याला बरेच पैसे देऊन त्याची मुलगी करावयाची असते आणि त्या पद्धतीनेंच दशरथानें लग्न केलें आणि त्याच्या एकंदर आयुष्यक्रमावर इराणी आवरण पडलें. दशरथाचे घोडे कंबोज, बाल्हीक आणि वनायु या ठिकाणचे होते (कंभोजविषये जातैर्बाल्हीकैश्च हयोत्तमैः वनायुजैर्नदीजैश्च पूर्णा हरिहयोत्तमैः) वगैरे उल्लेख कैकेयमहत्त्वकालांतीलच होत.

## २१२. अ. परकीय लोकांच्या उल्लेखांमुळें ग्रंथास बुद्धोत्तरकालीनत्व येतें काय ?

२१२ अ. जेव्हां रामायणामध्यें कामधेनुहरणाची कथा आली तेव्हां पह्लव, शक, यवन व म्लेच्छ यांनीं धेनुचें संरक्षण केलें असें दाखविलें आहे. व त्यांत परकीय लोकांच्या टोळ्या कविपरिचित होत्या असें दिसत आहे. रामायणकाळीं कवि लिहितांना वर्णन रुचिकर करण्यासाठीं जो मिरची मसाला घालतो, त्यांत बेफिकीरपणानें तो आपल्या वेळचाहि घालणार. तसल्या प्रकारची परंपरा महाराष्ट्रांत आजपर्यंत चालू आहे. एका कवीनें भारती युद्धांत भाग घेणाऱ्या सप्तयवनांचा उल्लेख करतांना, इंग्रज, फ्रेंच, डच इत्यादि राष्ट्रें आणलीं आहेत. हें जरी सत्य आहे तरी शकपल्हवांचें भारतांत अस्तित्व कुरुयुद्धापासून फार दूर नाहीं अशा कालांत नव्हतें असें म्हणतां येणार नाहीं. विराटाची बायको कैकेय देशच्या राजाची कन्या होती, आणि तिचा परदेशीय भाऊ मोठा उन्मत्त होता असें भारतकार दाखवीतच आहेत.

**२१३. रामायणांतील म्लेच्छोल्लेखांची बुद्धोत्तरता.**

२१३. सीताशुद्धीसाठीं सुग्रीवानें जे लोक चोहोंकडे पाठविले त्यांत कांहीं मंडळी उत्तरेकडे गेली. आणि त्यांच्या त्या प्रवासाच्या अनुभवानें जें परकीयांचें वर्णन रामायणांत मांडिलें आहे, तें पुढील प्रमाणें आहे. ( तुलनेसाठीं वाल्मीकिरामायण नि. सा. आवृत्ति; किष्किंधाकांड सर्ग ४३. )

**तत्र म्लेच्छान्पुलिन्दांश्च शूरसेनांस्तथैवच**
**प्रस्थलान्भरतांश्चैव कुरूंश्च सहमद्रकैः**
**काम्बोजान्यवनांश्चैव शकानां पत्तनानि च**
**बाल्हीकानृषिकांश्चैव पौरवानथटङ्कणान्**
**चीनानपरचीनांश्च निहारांश्च पुनः पुनः**
**अन्वीक्ष्य दरदांश्चैव हिमवन्तं तथैवच**

या नांवाच्या उल्लेखांवरून रामायणकालदर्शक काढण्याजोगें कांहीं नाहीं. रामायणाची फार उत्तरकालीनता दाखविण्यासाठीं हे श्लोक उपयोगी नाहींत.

रामायणांत प्राचीनतर पुरुषाचें चरित्र वर्णावयाचा बाणा कवीच्या मनांत असल्यामुळें उत्तरकालीन कवीनें मुद्दाम प्राचीनतर गोष्टी कथेंत घालणें स्वाभाविक आहे. तथापि प्राचीनकाळच्या गोष्टी बरोबर शोधून काढून मुख्य गोष्टींशीं समकालीन अशाच गोष्टी द्यावयाच्या या तऱ्हेचें कौशल्य थोडक्याच कवींना असतें. आज गुजराथी कवि महादजी शिंद्यांचें नाटक करून त्यांत ब्यारिस्टर सॉलिसिटर आणतो आणि कित्येक सिनेमावाले कृष्णाच्या चित्रपटांत विजेचे दिवे आणतात, आणि कृष्णाच्या अंगांत आजच्या पद्धतीचा शर्ट घालतात या प्रकारच्या गोष्टी प्रेक्षक वर्गाकडून मंजूर होतात !! ज्ञात असलेल्या ऐतिहासिक जनतेच्या तीक्ष्ण दृष्टीचें भय जोंपर्यंत लेखकांत नसतें तोंपर्यंत असेच प्रकार चालावयाचे, आणि ते प्राचीनकाळीं देखील चालत होते. जनता तीक्ष्ण ऐतिहासिक दृष्टीची नव्हती आणि जर नवीन माहिती घालतांना कवीनें रामाच्या बऱ्याच नंतरच्या कालची तथापि आपल्या अगोदरच्या कालची माहिती ग्रंथांत दडपून दिली तर त्याचा स्वकालीन कवींकडून उपहास होण्याचा संभव नव्हता. उल्लेखित परकीयांचें अस्तित्व रामाच्या कालीं होतेंच असें जरी म्हणतां येणार नाहीं तरी कुरुयुद्ध आणि तदुत्तर निकटवर्ती कालीं त्यांचें अस्तित्व देशांत नव्हतें असें नाहीं.

**२१४. रामरावणयुद्धाची अनैतिहासिकता.**

२१४. रामरावणयुद्धाला ऐतिहासिकता देण्याचा प्रयत्न अनेक जणांनीं केला आहे. वैद्यांच्या रामायणावरील निबंधांत (The Riddle of Ramayana) तसा प्रयत्न झाला आहे. रामायणांत जे चमत्कार वर्णिले आहेत तशा प्रकारचे चमत्कार इतर इतिहासकारांनीं वर्णिले आहेत; त्याअर्थी रामायणवर्णनांत केवळ कविस्वाभाविक अतिशयोक्ति झाली आहे, तथापि त्याच्या बुडाशीं शक्य पण चमत्कृतिजनक गोष्टी आहेत एवढेंच वैद्यांनीं दाखविलें आहे. दलाल यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासावर इंग्रजींत एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत बुद्धाचें कार्य सुरू होण्यापूर्वी १८४४ वर्षें रामरावणयुद्ध झालें, असें राजावलिय या सिंहली ग्रंथाच्या आधारें म्हटलें आहे. या राजावलींत ग्रंथाचें अवलोकन न होतां त्याचा आधार देण्याची क्रिया "महाराष्ट्रीय" यांच्या "श्रीरामायणसमालोचना" या श्रेष्ठ प्रतीच्या पुस्तकांत झाली. "राजावलिय" या पुस्तकाचें खरें स्वरूप प्रो. चिंतामण विनायक जोशी, एम्. ए. यांनीं आविष्कृत केलें.† त्यांत त्यांनीं असें दाखविलें कीं राजावलि हें पुस्तक यूरोपीयांनीं सिंहलद्वीप ताब्यांत घेतल्यानंतर तयार झालें आहे. हा प्राचीन ग्रंथ नव्हे. या ग्रंथाचा ( वस्तुतः चोपड्याचा ) कर्ता ख्रिस्ती सिंहली गृहस्थ असावा असा संशय येण्यास कांहीं कारणें प्रो. जोशी यांनीं दिलीं आहेत. राजावलिय ग्रंथांत आलेल्या रावणकथेमध्यें राम नाहीं आणि रामकथेमध्यें रावण नाहीं ! रामाची कथा दशरथ जातकांतील कथेप्रमाणेंच आहे. अरिष्ट राजाची राणी हस्तपाला ही चार पुत्र आणि पांच कन्या झाल्यानंतर मरण पावली. त्यानें दुसरी पट्टराणी केली तिला जन्हु नामक मुलगा झाला. तिनें जन्हुसाठीं राज्य मागितलें. राजानें तें दिलें, आणि पहिल्या राणीच्या चार पुत्रांस वनवासास पाठविलें. त्यांबरोबरच त्यांच्या पांच बहिणी होत्या. त्या पांच बहिणींपैकीं धाकट्या चौघींबरोबर चार भावांनीं लग्नें केलीं तेव्हां ते खरे शाक्य आहेत असें राजांस वाटलें. चार भावांची थोरली बहिण त्या आठहि जणांस आई सारखी होती पण तिला महारोगानें पछाडलें. तेव्हां तिच्या आठही भावंडांनीं तिला रानांत सोडून दिलें. पुढें वाराणशीचा राजा राम हाहि महारोगानें पछाडला तेव्हां त्यानें राज्य सोडून वनवास पत्करिला. त्यानें या थोरल्या बहिणीला पाहिलें. तिला औषध देऊन बरे केलें. कोळो या झाडाचीं पानें, फुलें व साल यांवर तीं राहूं लागून दोघें बरीं झालीं. त्यांनीं लग्न केलें तेव्हां त्यांना सोळा मुलगे व सोळा मुली अशीं बत्तीस अपत्यें झालीं.

येणेंप्रमाणें राजावलींतील मजकूर आहे. राजावलि अलीकडील ग्रंथ आहे म्हणून त्याचें महत्व अगदींच नाहीं असें नाहीं.

---

† सहविचार, आक्टोबर १९३०, बडोदें.

या ग्रंथकारानें आपल्या कथा पूर्वकालीन ग्रंथावरून घेतल्या हें उघड आहे. यांत राम, दशरथ, कुश वगैरे नांवें आलीं आहेत, तथापि वनवासाचा संबंध दशरथाशीं लावला नाहीं. कैकयीचें नांवच नाहीं. भरताच्या स्वार्थत्यागासारखी गोष्टच नाहीं. रावण ही एक युद्ध करणारी व्यक्ति म्हणून उल्लेखिली आहे तथापि त्या व्यक्तीनें जानकी हरण केल्याचा उल्लेख नाहीं. आणि रावणाची लढाई रामाशीं झाल्याचें हा ग्रंथ सांगत नाहीं. हीं सर्व बौद्ध परंपरेशीं बहुतांशीं जुळणारीं कथावैशिष्टयें कांहींतरी पूर्वींच्या कथेचें अवतरण करण्यामुळेंच उत्पन्न झालेलीं आहेत.

राजावलिय ग्रंथांत रावणाचा उल्लेख आहे, पण त्याबरोबर रामाचा उल्लेख नाहीं. रावणाच्या युद्धानंतर १८४४ वर्षांनीं गौतमबुद्धाचा कर्तृत्वप्रारंभ ग्रंथ सांगत आहे. ज्याअर्थी काळ शून्यांत न देतां सामान्य आंकडयांत दिला आहे त्याअर्थी हा आंकडा खरा असावा अशी रा. दलाल यांची कल्पना झाली. तथापि भरमसाट आंकडे द्यावयाचे आणि त्यांना खरे-पणा आणण्यासाठीं निश्चितांकता द्यावयाची या तऱ्हेचा प्रयत्न राजावलींत अनेकदां झाला आहे. उदाहरणार्थ महासंमत राजापासून शुद्धोदनापर्यंत ७०७७९७ राजे ग्रंथ सांगत आहे.

रावणयुद्ध आणि बुद्धकाळ यांच्या मधल्या काळांत यक्षाची वस्ती होती म्हणून राजावलिय सांगत आहे.

राजावलिय ग्रंथांत कपिलवस्तूची स्थापना कपिलमुनीच्या नांवावरून झाली आणि ज्याप्रमाणें पांडवांबरोबर धौम्य मुनी गेले त्याप्रमाणें कपिलमुनि अरिष्टराजाच्या हस्तपाला राणीपासून झालेल्या नऊ मुलांबरोबर होते आणि आपल्या आश्रमाच्या जागेवरच नगरस्थापनेसाठीं मुनींनीं राजपुत्रांस सूचना केली त्यावरून कपिलवस्तूची स्थापना झाली असें सांगितलें आहे.

या पुस्तकानें सगर उल्लेखिला आहे. भगीरथ उल्लेखिला आहे. कुश दशरथ राम इत्यादि राजे झाले असें सांगितलें आहे.

थोडक्यांत सांगावयाचें म्हटल्यास रामरावणयुद्धाच्या कथेचें स्पष्टीकरण करण्यास बौद्ध वाङ्मय उपयोगी पडत नाहीं.

## २१५. रामास देवत्व, रामरावणयुद्ध, रामाचा सेतू या सर्व गोष्टींचा पाश्चात्य जगाशीं संबंध.

२१५. रामायणाच्या मुख्य कथेची घटना कशी झाली हा एक प्रश्न आहे. केवल कृत्रिम कथा उत्पन्न करून एकादा वीर पुरुष निर्माण केला तर तो सर्वमान्य होऊं शकत नाहीं आणि दशरथ जातकांत जेवढी कथा आली आहे तेवढया कथेच्या भांडवलावर जगद्वंद्यता आणण्यासाठीं अधिक अद्भुत प्रकार जोडण्याचें धैर्य कोणात्याहि कवीस होणार नाहीं. अगोदर चालू असलेल्या उपासनेचें ऐतिहासिक समर्थन करणें अधिक सोपें आहे. तर तसें कांहीं झालें आहे काय हें आतां पाहूं.

बालकांड आणि अयोध्याकांड एवढेंच रामायण घेतलें तर तेवढी कथा स्वतंत्र महाकाव्य होऊं शकतें आणि बौद्धांच्या दशरथ जातकाशीं त्याचें स्वरूप मिळतें होईल. रामकथेस पुरवणी जर इराणी साहित्यांतून आली असेल आणि ती वर-रुचीच्या कालानंतर आली असेल तर ती कैकेयी संबंधाच्या उल्लेखांची असावी. उत्तरकांड तर खास बृहत्कथेनंतरचें आहे, तथापि मधल्या कोणत्या तरी कालांत दक्षिणेमध्यें ‘असुर’ संस्कृतीचा पगडा बसला होता. असुरांचा देव म्हणून रामपूजन प्रचलित झाल्यानंतर रामाचें देवत्व कायम ठेऊन त्या देव-तेच्या अस्तित्वाचें भारतीय दैविक इतिहासानें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न झाला असावा. त्या प्रयत्नांतील एक भाग त्या संस्कृतीचें उच्चाटन वर्णन करणारें काव्य तयार झालें असावें आणि तेंच अरण्यकांडापासून युद्धकांडापर्यंत रामायण असावें असें दिसतें. राम आसुर आणि बाबिलोनी कथांतून कसा येतो तें आतां पाहूं.

रा म्म न आ णि शा ला.

राम्मन देव आणि त्याची देवी शाला या दोघांचें स्वरूप जें बाबीलोनी कथांतून दिसून येतें त्याचें राम आणि सीता या दंपतीकल्पनेशीं बरेंच साम्य आहे. शालेचें स्वरूप आणि सीतेचें स्वरूप यांत साम्य आहे. शाला देवीवर जीं स्तोत्रें रचलीं आहेत त्या स्तोत्रांमध्यें तिला क्षेत्रभूमिदेवता म्हटलें आहे. भारतीयांनीं सीतेस भूमिकन्या बनविलें आहे.†

दाशरथि रामास देवत्व कसें आलें याचा विचार आपणांस करणें अवश्य आहे. दक्षिणेचा विजेता कोसलराजपुत्र राम-चंद्र हा असल्यास मोठ्या वीरास देवत्व देण्याच्या चाली-प्रमाणें रामासहि येणें अशक्य नाहीं. तथापि दशरथ जात-कांतील कथेमध्यें जें रामचरित्र आलें आहे त्यावरून रामवन-वास जरी सिद्ध होत असला तरी दक्षिणदेशनिवास सिद्ध होत नाहीं आणि लंकाविजय त्याहूनहि सिद्ध होत नाहीं.

राम नांवाची देवता असेल आणि त्या देवतेचें दक्षिणेंत महत्त्व स्थापन झालें असेल तर उत्तरेकडील दाशरथी रामाची कथा आणि दक्षिणेकडील रामदेवतामहत्त्व यांचा संयोग होऊन आज जें रामस्वरूप तयार झालें आहे त्याचें अस्तित्त्व संभवतें. तर दक्षिणेकडे रामोपासना कशी वृद्धिंगत झाली असावी याचा विचार करणें प्राप्त आहे.

---

† प्रस्तुत विधानें प्रो. मॉरिस जास्ट्रा यांच्या आसुरी आणि बाबिलोनी धर्मांवरील अनेक पुस्तकांतून घेतलीं आहेत.

रामन् किंवा रम्मन् ही देवता असुर देशांत होती. या देवाचें महत्त्व 'असुर' देवाएवढें नेहमीं नसलें तरी अनेक कालांत या देवतेचें महत्त्व दिसून येतें. रामन् देवाचें स्वरूप एका बाबतींत दाशरथिरामासारखें आहे. हा देव सपत्नीक स्वरूपांत दिसून येतो. दाशरथिराम हा सूर्यवंशी आहे तर रामन् देव प्रत्यक्ष सूर्य आहे. दाशरथिराम हा योद्धा आहे तर असुरांचा रामन् हा युद्धदेव आहे. असुरांचा देव राम हा वादळाचा देव आहे तर रामन् हा वादळाचा देव 'मरुत्' त्या देवाचा पुत्र जो मारुति त्याचा उपास्य आहे.

**२१६. रामकथेचा विकास आणि त्यांत आसुर किंवा बाबीलोनी कथांचा समावेश.**

२१६. रामकथेविषयीं एकंदर विचार करतां असें वाटूं लागतें कीं रामकथा प्रथमच्या स्वरूपांत रावणवधाची नसून दशरथजातकाप्रमाणें केवळ राजकुलांतील कारस्थानाची व गडबडीची असावी. आणि अयोध्याकांडापर्यंत माहिती देणारें एखादें प्राकृत काव्य देखील झालें असावें आणि दक्षिणेकडील पराक्रमाचें कथानक त्याला मागाहून जोडलें असावें. हें कथानक कोठून आलें याची कल्पना पूर्णपणें करतां येत नाहीं. तथापि विविध कथानकें एकत्र होऊन हें कथानक तयार झालें असणें शक्य आहे. आदामाची कथा त्यावेळेस प्रचलित असावी आणि ती भिन्न स्वरूपांत असावी. आदाद आणि रम्मन् हीं एकाच देवतांचीं दोन नांवें असल्यामुळें सेमेटिक लोकांत आदाद हें नांव प्रचलित झालें असावें तर हिंदुस्थानांत रम्मन् हें नांव प्रचलित झालें असावें. आणि सेमेटिक लोकांतील आदादचा म्हणजे आदामचा सेतू तो भारतीयांत रामाचा सेतु झाला असावा. रम्मनहा सूर्य देव म्हणून बाबीलनमध्यें प्रख्यात होता तर इकडचा राम सूर्यवंशी झाला. तो युद्धदेव म्हणून प्रख्यात होता तर इकडे देखील तो मोठा पराक्रमी देव म्हणून झाला. आणि जसे मत्स्यादि अनेक अवतार खालडियामधून आपल्याकडे आले त्याप्रमाणें रम्मन् हा देवही आपल्याकडे आला आणि त्याचें आणि दाशरथिरामाचें ऐक्य कवींनीं केलें.

विजयादशमीच्या सणासंबंधानें हा सण दक्षिणेंत उद्भवला आणि तो रामाच्या स्वारीच्या वेळेस उद्भवला अशा तऱ्हेनें स्पष्टीकरण आज केलें जात आहे, तथापि ज्याअर्थी यहुद्याचा किप्पुर आणि वैदिक वाङ्मयास अपरिचित असलेला दसरा हा एकाच दिवशीं येत आहे त्याअर्थी या सणास परदेश मूलकता होऊं पहाते. शिवाय ज्याअर्थी यहुद्यांनीं आपली बरीचशी पंचांगपद्धति आसुरी लोकांकडूनच घेतली आहे, त्याअर्थी दसरा हा सण देखील आसुरांशीं असलेल्या संबंधामुळेंच दक्षिणेंत अगोदर पसरला आणि रामायण विस्तारकालीं दाक्षिणात्य उत्सवदिन रामाच्या नांवाला जोडला गेला.* दसऱ्याच्या दिवशीं शमी वृक्षांत पांडवांनीं आयुधें लपविलीं म्हणून शमीपूजन करावें हा विधि आहे पण त्यापेक्षां महत्त्वाचा विधि जो रेडा मारणें त्याला रामकथेंत किंवा पांडवकथेंत स्थान नाहीं. यहुदी ग्रंथांत मात्र प्रतिपदेपासून विजयादशमीपर्यंत यज्ञ सांगितला आहे आणि किप्पूरच्या म्हणजे विजयादशमीच्या दिवसांत एकमेकांस भेटावयास जाणें हा विधि इस्राईल मंडळी अजूनहि पाळतात. त्यामुळें दसऱ्याच्या विधीची उत्पत्ति स्वतंत्रपणें असून त्या सणाचा संबंध अखिल भारतीय वाङ्मयाशीं आणि आचारधर्माशीं रामकथा व पांडवकथा या मार्फत जोडण्यांत आला असला पाहिजे असें विधान करण्यास जागा होते. सेमेटिक लोकांच्या फोनिशिअन शाखेमध्यें वृक्षपूजा किंवा तत्प्रतिनिधि म्हणून स्तंभपूजा होती आणि त्या पूजेला "अशेरा" † असें म्हणत. दसऱ्याचें अधिक प्रचलित रूप देखील दशेरा असें आहे आणि तें उत्तरहिंदुस्थान व बंगाल यामध्यें वापरलें जातें. आणि त्याचें इंग्रजी स्पेलिंग 'दशेरा' उच्चार होईल असेंच अधिक लिहिलें जातें.

**२१६. अ. रामकथेंत न आलेलीं कांहीं असुर-भारतीय सामाजिक सादृश्यें**

२१६. अ. बाबिलोनी देवकृत्यामध्यें स्त्रियांना जें स्थान आहे तें आजच्या अनेक पाश्चात्य संशोधकांस आश्चर्यकारक वाटतें. कारण ख्रिस्ती प्रवृत्ति स्त्रियांनीं उपाध्येपण करूं नये अशा प्रकारची आहे. तथापि आपणांस त्याचें आश्चर्य वाटण्याचें

---

* विजयादशमीच्या दिवशींच राम निघाले असा वाल्मीकीच्या रामायणांत स्पष्ट उल्लेख नाहीं. रामप्रयाण आणि विजयादशमी यांचा संबंध दुसऱ्या कोणीतरी जोडला असावा. रामप्रयाणाच्या दिवसासंबंधानें रामायणांत श्लोक पुढील प्रकारचे ( युद्धकांड सर्ग ४ ) आहेत.

**श्रुत्वा हनुमतो वाक्यं यथावदनुपूर्वशः**
**ततोऽब्रवीन्महातेजा रामः सत्यपराक्रमः**
**यन्निवेदयसे लंकापुरीं भीमस्य रक्षसः**
**क्षिप्रमेनां वधिष्यामि सत्यमेतद्ब्रवीमि ते**
**अस्मिन् मुहूर्ते सुग्रीव प्रयाणमभिरोचय**
**युक्ते 'मुहूर्ते विजये' प्राप्तो मध्यं दिवाकरः**

वरील श्लोकांतील 'मुहूर्ते विजये' या शब्दांवर उत्तरकालीनांचें भाष्य तो दिवस दसऱ्याचा होता हें असावें.

नाक्षत्र स्थिति पुढीलप्रमाणें वर्णिली आहे.

**उत्तरा फाल्गुनी ह्यद्य श्वस्तु हस्तेन योक्ष्यते**
**अभिप्रयाम सुग्रीव सर्वानीकसमावृताः**

† Lectures on the Religion of the Semites by W. Robertson Smith London 1907.

कारण नाहीं. कोळी, वारली वगैरे जातींत लग्नें लावण्यासारख्या सांस्कारिक विधींमध्यें स्त्रियांना स्थान आहे. या स्त्रियांना दवलेरी म्हणतात. बाबिलोनमध्यें हमुरब्बीच्या कालानंतरचे ऐतिहासिक लेख आहेत त्यांत देवालयांत सेवेसाठीं असलेल्या स्त्रियांचे उल्लेख पुष्कळच आहेत. 'गुडिया' ग्रंथांत शोक करणाऱ्या स्त्रियांचा उल्लेख आहे. त्यावरून देवळांत शोक करण्यासाठीं पुरुष होते तशाच स्त्रियाहि होत्या. त्याप्रमाणेंच भुतें काढणाऱ्या पंचाक्षरी स्त्रियांचे देखील उल्लेख आहेत व कौल देणाऱ्या स्त्रियांचे उल्लेख आहेत. याप्रमाणें देवकृत्यांत गढलेल्या स्त्रियांचे अनेक वर्ग करतां येतील. या वर्गांमध्यें वेश्यावर्गास स्थान नाहीं असें कसें होईल ? वेश्याकर्म करणारा तथापि देवसंबंधामुळें पवित्र समजला जाणारा वर्ग त्यांच्यांतहि होताच. एरेक येथील इश्तरच्या देवळांत अशा अनेक प्रकारच्या परिचारिका होत्या. त्यांचे संप्रदायस्वीकाराचे जे अनेकविधि होते ते वरवर पहाणारांस अश्लील किंवा चावट असे वाटत यांत शंका नाहीं. आणि तसल्याच भावनेंत हिरोडोटसनें त्या विधींचें वर्णन केलें आहे. तथापि त्या वरवर चावट दिसणाऱ्या विधींत अध्यात्मिक अर्थ आहे आणि तसल्या प्रकारचे विधी कांहीं सर्वदेशव्यापी झाले नव्हते असें त्या संस्कृतीची कड घेऊन बोलणारांचें म्हणणें आहे.*

बाबिलोनी लोकांच्या कथांचे वारस यहूदी आणि आरब हे होत, तर रामकथेचीं कांहीं अंगें शोधण्यासाठीं त्यांच्याकडे देखील वळलें पाहिजे

## २१७. रामायणांत सेमेटिक क्रियांचा समावेश; रामच्या सेतूचा आदामशीं संबंध, आणि 'राम' नांवाचा सेमेटिक उद्भव.

२१७. आरब लोकांमध्यें ज्या पूर्वेतिहासविषयक दंतकथा प्रचलित होत्या त्यांत आणि ख्रिस्ती अगर यहूदी दंतकथांत बराच फरक आहे. अरबांच्या दंतकथांप्रमाणें आदाम हा सिंहलद्वीपांत झाला आणि आद्य स्त्री अरबस्तानांत उत्पन्न झाली. ज्याला आपण 'रामाचा सेतु' म्हणतों त्याला आरबलोक आदामाचा सेतु म्हणतात. "राम" हा शब्द पुरुष अशा अर्थानें अनेक भाषांत आहे. तर "आद्य पुरुषाचा सेतु" ही कल्पना अत्यंत प्राचीन काळीं असल्यास ती व्यक्त करण्यास 'रामाचा सेतु' किंवा 'आदामचा सेतु' हे दोन्ही शब्द संभवतात. रामायणकथा जेव्हां विस्तारिली गेली तेव्हां त्या सेतूची कथा रामकथेस जोडली जाणें अत्यंत स्वाभाविक आहे. प्राचीन काळीं हिंदुस्थान व सिलोन या दोहोंमधील प्रस्तरराजि कोणतरी दैवी पुरुषाचा सेतु आहे अशी कल्पना प्रसृत झाली असावी आणि ती कल्पना सेमेटिक लोकांनीं अरबस्तानांत नेतांना त्या काल्पनिक सेतूचा संबंध आदामाशीं जोडला तर उत्तरेकडील कवीनें दक्षिणेकडील स्थलांचा संबंध रामाशीं किंवा अगस्त्याशीं जोडला. शिवाय आदामाशीं संबंध सांगणारें दुसरें स्थान म्हटलें म्हणजे आदामशिखर अथवा सुमनकूट होय. हें स्थान 'आदामाचें' शिखर या नांवानें आरा लोकांत प्रसिद्ध आहे तर तें बुद्धपादस्थान म्हणून बौद्धांत प्रसिद्ध आहे. आदामाचा संबंध सिलोनशीं असणें आणि ती कथा अत्यंत प्राचीन म्हणून समजली जाणें ही गोष्ट प्राचीन सेमेटिक लोकांचें अनेकस्थलव्यापित्व दाखविते. सेमेटिक लोक सिंहलद्वीपांत जात येत असल्याखेरीज त्यांच्या दृष्टीनें सिंहलद्वीप व त्यांतील स्थानें पौराणिक कशीं होतील ?

पूर्वगत पुराव्यावरून दक्षिणेच्या प्राचीन इतिहासाविषयीं पुढील प्रकारचीं विधानें करण्याचें साहस करतां येईल.

( १ ) राम ही देवता दक्षिणेकडे प्रचलित आहे ही गोष्ट बृहत्कथेच्या उपान्त्य म्हणजे कथापीठलंबकपूर्व संपादनाच्या काळापूर्वीं यांच्या उत्तरेकडील कवींस समजली असावी. तथापि त्याच्या पूर्वीं अनेक शतकें 'राम' ही देवता प्रचलित असावी. बुद्धपूर्वकाळीं अवतारी रामकथा उत्तरेकडे नव्हतीच अशी खात्री नाहीं.

( २ ) ज्याअर्थीं मारुति आणि राम यांची सांगड घालण्याचा प्रयत्न झाला, त्याअर्थीं, "मारुति" महत्त्व त्या कालाच्या अगोदर स्थापन झालेलें असावें, आणि ज्याअर्थीं मारुतिकथेंत मरुताचा इंद्रावर विजय दाखविला आहे, त्याअर्थीं मरुतांना इंद्राचा सहायक व दुय्यम करण्याचा आणि तेणेंकरून इंद्रपूजक आणि मरुतांचे पूजक यांतील द्वैत काढून टाकण्याचा अगस्त्यगोत्रीयांचा प्रयत्न पूर्णपणें यशस्वी झाला नव्हता.

( ३ ) दक्षिणेकडे लोकवसती अत्यंत प्राचीनकाळीं होती, व सेमेटिक लोकांचा विशेषेंकरून फोनिशिअन लोकांचा व्यवहार इकडे चालू होता, अशाकाळीं होती, आणि त्यांच्या देवता व सणाचे दिवस इकडे सुरू झाले होते. ही सर्व स्थिति अर्थात् बृहत्कथेच्या उपान्त्य संपादनाच्या पूर्वीं अनेक शतकें होती, व त्यामुळें त्या सर्व दाक्षिणात्य धर्मांशांचें संग्रहण रामकथेवर महाकाव्य रचूं इच्छिणारांस अवश्य झालें.

## २१८. बुद्धोत्तरकालीन ब्राह्मणी पांडित्याची खटपट.

२१८. सेमेटिक कथाभागाचा रामायणासारख्या वाङ्मयांत प्रवेश झाला ही गोष्ट हिंदुस्थानांत कोणती वाङ्मयविषयक चळवळ चालू असतां झाला हें सांगतां येण्याजोगें आहे. रामायणाची आजची आवृत्ति सूत्र ग्रंथोत्तर कालीन आहे. सूत्र ग्रंथ

* Morris Jastraw. RBA PAGE 660.

देखील रामचंद्र पढला असें ती दाखवीत आहे; त्यावरून रामायणाचा बराचसा भाग सूत्र ग्रंथ तयार होत असतांनाच तयार होत होता हें स्पष्ट आहे. रामायण हा ग्रंथ वैदिक धर्मास आणि सूत्र ग्रंथास सन्मान देणारा आहे. भागवत हा ग्रंथ वैदिक धर्माची टर उडविण्याची खटपट करणारा आहे. सूत्रग्रंथविषयक वृत्ति रामायणांत दाखविली गेली असल्यामुळें रामायणग्रंथविकासाची चळवळ सूत्रकालांत झाली हें सांगतां येतें. त्या गमकानें पाहिलें तरी देखील उत्तरकांड खेरीज मुख्य रामायणाच्या रचनेचा काळ आद्य सूत्रग्रंथ आणि बृहत्कथेंतील वररुचिज्ञात रामायणकथा यांच्या दरम्यान येतो, म्हणजे महाराष्ट्र हें नांव पुरें संस्थापित ज्यावेळेस झालें होतें त्यावेळेस येतो. महाराष्ट्राचा त्यांत उल्लेख नाहीं, तथापि तेवढ्यावरून महाराष्ट्राचा अभाव सिद्ध होत नाहीं; कारण आपल्या ग्रंथास जुन्या काळाची चव आणण्यासाठीं जुनाट परिस्थिति विशेषेंकरून महाराष्ट्राच्या ठिकाणीं वर्णन करणें हें कवीचें कर्तव्य होतें. वररुचीच्या महाराष्ट्राची माहिती पुढें दिलीच आहे.

ब्राह्मणी विद्येच्या अंतर्गत अशी त्यावेळची जी क्रिया चालू होती ती म्हटली म्हणजे भोंवतालचा दैवतग्राम एका पद्धतींत आणावयाची होय. राम, मारुति, या देवतांच्या उपासनेचें रामायणाच्या युद्धकांडानें समर्थन केलें. अवतारकल्पना, पुनर्जन्माच्या कल्पना, स्वर्ग कल्पना, आणि मोक्ष कल्पना यांचा मिलाफ करावयाचा होता. या गोष्टी रामायणांतच साधल्या एवढेंच नाहीं तर भिन्न प्रदेशांतील जुन्या कथा संग्रहित करून त्या आपल्या पूर्वपरिचित पार्थिव आणि दैवी इतिहासास जोडणें अवश्य होतें म्हणून याच क्रियांची घडण रामायण ग्रंथानें झाली असें दिसून येईल. आरबी समुद्राकडून इराणी, आसुर, इत्यादि लोक देशावर परिणाम करीत होते तर वायव्येकडून तिकडील लोक मुख्यतः कैकेय परिणाम घडवीत होते. तर कैकेय देखील रामायणोक्त बनविणें अवश्य होतें.

### २१९. 'अश्वपति कैकेय' या व्यक्तीचा रामायणाशीं संबंध.'

२१९. अश्वपति कैकेय ही व्यक्ति कोणत्या कालांतील होती हें निश्चित नाहीं. उदयनपूर्व एकदोन शतकें असेल किंवा ती व्यक्ति उत्तरकालीन असून तिचा रामायणांत अंतर्भाव उदयनोत्तर किंबहुना बुद्धोत्तरकालीं झाला असेल. आपली संस्कृति जगद्व्यापी करावयाची आणि तीसाठीं जगांतील दैवतांना व धार्मिक विचारांना आपल्या संस्कृतींत आणि त्यासाठीं ग्रंथांत स्थान देण्याची ब्राह्मणांकडून कुरुयुद्धापासून जी चाल चालू होती ती बुद्धकालांत देखील बंद पडली नव्हती.

अश्वपति कैकेयाचें नांव रामकथेशीं जोडलें आहे त्याप्रमाणेंच उद्दालक आरुणि याच्या कथेशीं जोडलें आहे. या दोन्ही तऱ्हांनीं त्याचा उल्लेख करणें हें ज्या काळांत रामचंद्र उद्दालक आरुणि आणि अश्वपति कैकेय या सर्व व्यक्ति प्राचीन होऊन जेव्हां लोकांचें दूरताकालविषयक ज्ञान मलिन होतें, तेव्हां शक्य होतात. बुद्धाच्या कालानंतर दोन तीनशें वर्षांनीं रामकथा सजत आली असेल आणि अश्वपति कैकेय ही एक प्राचीन ऐतिहासिक थोर व्यक्ति म्हणून लोकांच्या लक्षांत राहिली असेल अशा वेळेस म्हणजे वररुची नंतरच्या काळांतील कवीनें आणि उपदेशकानें तीं नांवें आपल्या कथांशीं जोडणें हें अत्यंत संभवनीय दिसतें. पण वररुची नंतरच्या कालीं अश्वपति कैकेयाचा रामायणांत समावेश ही अनेक शक्यतांपैकीं एक आहे हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे.

अश्वपति कैकेय याविषयीं भारतीय वाङ्मयांत दोन उल्लेख आले आहेत. हे दोन्ही उल्लेख सत्य असतील अशी खात्री नाहीं. उपदेशग्रंथांत कांहीं उपदेशाचें सत्य सांगावयाचें असल्यास तें सत्य वर्णन करण्यासाठीं जी कथा तयार करावयाची ती एका ऐतिहासिक व्यक्तीच्या नांवाला चिकटवून गोष्टीला सत्याभास उत्पन्न करावयाचा, या तऱ्हेची पद्धत सर्व जगभर गेल्या शतकापर्यंत दिसून येत होती आणि खरें बोलण्याचें महत्त्व शिकविण्यासाठीं वाशिंगटनच्या कुऱ्हाडीची काल्पनिक गोष्ट सर्वविश्रुत आहेच. अलीकडेच त्या पद्धतीवर टीका करकरून ती बंद करण्यांत आली आहे. अश्वपति कैकेयाचा प्राचीनशालादि भारतीय तत्ववेत्त्यांशीं संबंध आला असो अगर नसो, आला होता असें धरलें तर इराण व हिंदुस्थान यांची बौद्धिक देवघेव चालू होती हें सिद्ध होईल. तथापि संबंध आला नसून एका प्रसिद्ध नांवाशीं ही कथा जोडली असें धरल्यास या प्रकारची देवघेव चालू होती आणि प्राचीनशाल, उद्दालक व आरुणि यांच्यामध्यें आणि इराणच्या राजकुलामध्यें बौद्धिक देवघेव असणें त्या कथालेखनाच्या प्रसंगीं लेखकास अत्यंत स्वाभाविक वाटत असावी यांत शंका नाहीं. व त्यामुळें त्या उपनिषदाची रचना देखील फार उत्तरकालीन धरावी लागेल.

मुख्य उपनिषदांनाच इतकें अर्वाचीन ठरविणें कठिण जातें. याविषयासंबंधानें मला स्वतःला असें वाटत आहे कीं कुरुयुद्धोत्तरकालीं वैदिक म्हणजे पंजाबच्या मात्र संस्कृतीशीं जेव्हां सूतसंस्कृतिवाल्यांचा म्हणजे गंगातीरवासी लोकांचा मिलाफ झाला तेव्हां पंजाबचे आर्यन् लोक इराणशीं पूर्णपणें वियुक्त झाले नव्हते आणि त्यामुळें इराणच्या राजाचा उल्लेख वैचारिक ग्रंथांत येत होता.

अश्वपति कैकेय म्हणजे दारयवहूचा बाप विस्तास्प तोच होय असें मात्र नाहीं. तर ज्यास अश्वपति म्हणतां येईल अशा व्यक्ती दारयवहूच्यापूर्वी अनेक शतकें इकडच्या लोकांस माहीत असतील.

## २२०. सिंहावलोकन.

२२०. एवंच दशरथजातक म्हणून जें बौद्ध जातक आहे त्यांत आलेली श्रीरामाची कथा बऱ्याच अंशीं मूलस्वरूपी आहे तरी रामायणांत आहे तें रूपांतर अगदींच बुद्धोत्तरकालीन नाहीं असें आज आमचें निश्चित मत आहे. दाशरथि रामाचा उल्लेख पुराणांतील याद्यांत आहे आणि याद्यांतील पौर्वापर्याचा अभ्यास केला तर राम सुदासपूर्वकालीं म्हणजे वेदपूर्वकालीं जातो. यावरून असें दिसतें कीं राम हा प्राचीन राजा म्हणून तरी बुद्धपूर्वकालीं ठाऊक असला पाहिजे. दशरथ जातकांत दिसणारी तेवढीच कथा मूळ असल्यास रामास अवतारी पुरुष बनविणें, त्याच्या कथेला रावणसेतुकथा व इतर कथा जोडणें, त्याचा प्रवास दक्षिणेंत घडविणें या क्रिया देखील वररुचीच्या पूर्वी झाल्या असें म्हणावें लागेल. सविस्तर रामकथा बुद्धोत्तर काळीं तयार झाली असलीच पाहिजे असा आग्रह धरतां येणार नाहीं. एखादी कथा लोकप्रिय झाली म्हणजे मुद्दाम सांप्रदायिक रूप बनविण्यांत येतें तसेंहि झालें असेल, व दशरथ जातक हें ब्राह्मणी कृतीस उत्तर म्हणून झालें असेल. दशरथ जातकामधील रामास पूर्वीच्या जन्मीचा बुद्ध बनविलेंच आहे. रामास बुद्धाचा पूर्व जन्म बनविण्यांत राम बुद्धाचें केवळ अपूर्ण स्वरूप होय असेंच बौद्धांस दाखवायचें असावें.

रामकथा बुद्धपूर्वकालीं तयार झाली असो अगर नसो, सेमेटिक संस्कार म्हणजे रामदेवत्व, आणि सेतुबंधन कथा या फार जुन्या होत्या यांत शंका नाहीं. दाक्षिणात्य रामकथा म्हणजे रम्मनच्या कथा बुद्धपूर्वकालीं दाशरथी रामास जोडल्या होत्या कीं नंतर जोडल्या गेल्या एवढाच प्रश्न आहे. त्या बुद्धपूर्वकालीं जोडल्या गेल्या असाव्यात हेंच आम्हांस अधिक शक्य वाटतें.

आपल्या पुढें प्रश्न असा येतो कीं रामकथेला जोडलेल्या इराणी कथांपैकीं निरनिराळ्या कथांचें प्राचीनत्व कितपत आहे. दक्षिणेकडील आणि उत्तरेकडील कवीनें ज्या कथा जोडल्या त्यांत कांहीं अत्यंत प्राचीन आठवणी समाविष्ट असतील तर कांहीं थोडक्या पिढ्या पूर्वीच्या आठवणी घातल्या असतील. या दोन्ही ज्या अर्थी शक्यता आहेत त्याअर्थी इराणच्या हखामणी राजाच्या कारकीर्दीच्या दर्शक कांहीं आठवणी त्यांत शिरल्या आहेत काय ? असा प्रश्न उत्पन्न होतो.

हखामणींच्या काळाच्याच आठवणी शिरल्या आहेत असें एक संशोधक म्हणत आहेत. दशरथाची बायको कैकेयीचें पात्र आणून कवीनें इराणच्या लोकांविषयीं आपली जुगुप्सा व्यक्त केली आहे. त्यांच्या मतें कैकेयीच्या दासीचें नांव मंथरा ठेवणें हेहि सहेतुक होय. मंथरा म्हणजे "मंथ्र देणारी बया." "मंथ्र" हा शब्द प्राचीन इराणी लोकांचा "मंत्र" याला प्रतिशब्द आहे, मंथरा म्हणजे कानमंत्र देऊन भांडणें लावणारी असा अर्थ लोकांना सहज समजावा म्हणून तें नांव तयार करण्यांत आलें. दुष्टावा करणाऱ्या व्यक्तीचा संबंध इराणशीं जोडण्याचा स्पष्ट प्रयत्न रामायणांत दिसतो. तो प्रयत्न हखामणी राजांच्या कारकीर्दीला अनुलक्षूनच आहे असें सुचविलें आहे; परंतु या सूचक लेखकाची समजूत अशी होती कीं, दारयवहूच्यामुळेंच इराणी लोकांशीं हिंदुस्थानचा संबंध आला. आम्हांला हेंच मत मान्य नाहीं. आमच्या मतें कुरुयुद्धाच्या कालाच्या पूर्वीपासून दारियसच्या कालापर्यंत एकसारखा इराणी लोकांशीं हिंदूंचा संबंध येतच होता. हखामणी राज्यापूर्वीचा जो इराणच्या इतिहासांतील पौराणिक काल तो भारतीय पौराणिककालाशीं कांहीं अंशीं जुळता होता. या कालांतील दोन्ही लोकांच्या कथा एकत्र करून अधिक पद्धतशीर अभ्यास होणें अवश्य आहे.

बृहत्कथा ही एक मोठी रामायणविकासदर्शक पायरी आहे. तींत रामकथा जवळ जवळ पूर्ण येत असून तीपासून देखील कांहीं फेरफार दिसत आहेत; तर बृहत्कथेवरून तिच्यानंतर झालेले मुख्य फेरफार म्हटले म्हणजे रामाच्या नरमेधाचा अश्वमेध बनविणें आणि कैकेयांशीं संबंध जोडणें हे होत.

तथापि हें विवेचन एवढ्यानें पूर्ण होत नाहीं. बृहत्कथेच्या विकासांत वररुचीचें स्थान महत्त्वाचें आहे आणि वररुचि हा प्राचीन महाराष्ट्राविषयीं अत्यंत प्राचीन असा भाषाशास्त्रवेत्ता लेखक होय. त्याच्या संपूर्ण कृतीकडे लक्ष दिल्याशिवाय बृहत्कथेच्या ऐतिहासिक उपयोगाचें, त्याचप्रमाणें रामायणाचें, आणि रामायणांत व्यक्त झालेल्या दक्षिणेचें विवेचन पुरें होणार नाहीं.

दक्षिणेकडे सेमेटिक लोकांचें महत्व केव्हांपासून केव्हांपर्यंत होतें यासंबंधानें मात्र आजहि गूढ आहे. त्या दृष्टीनें अभ्यास व्हावयास प्रारंभ देखील झाला नाहीं, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

# प्रकरण २६ वें.

# उदयनकालीन जग आणि त्याविषयींचा बृहत्कथेचा पुरावा.

## २२१. रामायणविकास आणि बृहत्कथाविकास यांचें अन्योन्यदर्शन.

२२१. आजचें वाल्मीकिरामायण जसा एक कालदर्शक ग्रंथ नसून वाङ्मयविषयक फेरफारांच्या परंपरेचा परिणाम आहे, त्याप्रमाणेंच क्षेमेंद्रसोमदेवीय बृहत्कथा देखील मूल-ग्रंथवर्धनाची अंतिम पायरी आहे.

मूल रामकथा जरी अत्यंत प्राचीन आहे तरी भारत-रचनेंतील कांहीं भाग रामायणाच्या कांहीं भागापेक्षां जुना असणें शक्य आहे, त्याचप्रमाणें बृहत्कथेची देखील स्थिति आहे. रामकथा, भारतीयुद्ध आणि उदयनकाल या तीहींमध्यें जरी उदयनकाल अत्यंत अर्वाचीन आहे, तरी देखील उदय-नाच्या वाङ्मयांत अर्वाचीन रामायणाच्या अगोदरचें एक रूप कसें दिसून येतें तें दाखविलेंच आहे. उदयनवाङ्मय म्हणजे बृहत्कथेची क्षेमेंद्रसोमदेवीय आवृत्ति. तें तयार झाल्या-नंतर स्वतंत्रपणें वाढ पावत असलेलें उत्तरकांड रामा-यणांत समाविष्ट होऊन आजचें रामायण तयार झालें असावें. ज्या दंतकथा प्रचलित असतील त्यांचा रामायणांत समावेश करण्याचा काल जरी बृहत्कथेच्या 'उपान्त्य' आवृत्ती (कथापीठलंबकांखेरीज बृहत्कथा) नंतरचा असेल, तरी देखील त्या भागाची वाढ स्वतंत्रपणें होत असावी.

## २२२. दक्षिणेच्या इतिहासाविषयीं रामायणाची उपयुक्तता.

२२२. कथासरित्सागरांत दक्षिणेची माहिती फारच थोडी आहे. प्रतिष्ठान व कुंडिनपूर इत्यादि महाराष्ट्रांतील राज्या-विषयीं ज्या कथा आहेत, त्या त्यांत आल्या आहेत. कर्नाट-कांतील राज्याविषयीं आणि सिंहलद्वीपापर्यंत दक्षिणेचे उल्लेख सांपडतात. चीनहि उल्लेखित आहे. त्यांत आढळून येणाऱ्या द्वीपांचे उल्लेख कदाचित् सोकोत्रापासून जाव्हापर्यंत प्रदेशा-विषयीं असतील; पण बृहत्कथा दक्षिणेविषयीं माहिती देणारा ग्रंथ नव्हे. दक्षिणेकडील प्राचीनतम माहिती देण्याचा बाणा बाळगणारा मुख्य ग्रंथ रामायण हाच होय. रामायणामध्यें जी दक्षिणेविषयीं माहिती आहे ती भारतांतील माहितीपेक्षां अधिक प्राथमिक स्वरूप दाखविणारी आहे असें कांहीं लेख-कांचें म्हणणें आहे आणि त्यामुळें रामायणग्रंथास भारतपूर्वत्व देऊं पहातात. उलटपक्षीं रामायणांतील भाषेच्या सफाईकडे आणि काव्यमयतेकडे बोट दाखवून रामायणास उत्तरकालीन बनविणारा पक्ष आहे. भाषासफाई आणि काव्यमयता एवढ्यावरच भिस्त ठेवून काव्यास उत्तरकालीन करण्यांत अर्थ नाहीं. कारण रामायण काव्य हें भारतापेक्षां अधिक लहान असल्यामुळें त्यांत सफाई अधिक शक्य झाली ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे.

बृहत्कथा आणि रामायण हे ग्रंथ जर एकमेकांस पूरक धरले तर तें कृत्य आक्षेपणीय होणार नाहीं. बृहत्कथेंत दक्षि-णेवर विशेष लिखाण नाहीं, तर रामायणांत पुष्कळच आहे. बृहत्कथादृष्ट भारतमंडळाचें स्वरूप साकल्यानें पुढें ठेवलें तर ती गोष्ट अनेक वाचकांस इष्ट वाटेल यांत शंका नाहीं. बृहत्कथादृष्ट जगाचें स्थूल वर्णन पुढें ठेवतों. हें टांचण संपूर्ण नाहीं. बेताच्या परिश्रमानें जें शक्य झालें तें दिलें आहे. बृहत्कथेवर संशोधकांची दृष्टि वळली नसल्यामुळें त्रोटक टांचण देखील उपयुक्त होईल.

## २२३. उदयनपूर्वकाळीं भारतीय संस्कृतीचें दार्ढ्य आणि व्यापकता.

२२३. कुरुयुद्धकालासंबंधानें आर्ष महाकाव्य आपणांस सांगूं इच्छीत आहे कीं हिंदुस्थानभर चोहोंकडच्या राष्ट्रांनीं भारती युद्धांत भाग घेतला. प्रत्येक भाग लोकवस्तीनें भरला होता असेंच महाभारत दाखवीत आहे. उदयनाच्या काळीं तेंच हिंदुस्थान पुन्हां जंगली स्थितीप्रत पोंचलें होतें असें समजण्याचें कारण नाहीं. चोहोंकडच्या राष्ट्रांचा वृत्तांत कथासरित्सागरांत आला आहे, आणि त्यामुळें उदयनाच्या काळीं देश कोणत्या स्थितींत होता याची माहिती सर्व उल्लेख पाहून जुळवितां येण्याजोगी आहे, आणि ती माहिती भारतोक्त सत्यास दुजोरा देत असून कथाविषय झालेला भारतीय संस्कृतीचा प्रदेश अत्यंत विस्तृत होता असें दाखवीत आहे. उदयनोत्तर वररुचीच्या काळांत बृहत्कथेचें संहितीकरण होतांना नवीन कथा शिरल्या असतील पण त्या वररुचीच्या पूर्वीच्या काळांतील जुन्या म्हणून समजल्या गेलेल्याच असतील, आणि त्यामुळें प्राचीन काळाच्याच दर्शक असतील ही शक्यता पुढील टांचण तयार करतांना गृहीत धरली आहे. वररुचीचा काळ देखील उदयनापासून फारसा दूर नसावा.

स्वाभाविकपणें या ग्रंथांत पाटलिपुत्र, कौशांबी, उज्जयिनी वगैरे स्थलांची माहिती इतरांपेक्षां जास्त आली आहे.

कांहीं स्थलांविषयीं एखादाच उल्लेख आहे. तथापि हिंदु-संस्कृतीच्या प्रसाराचें क्षेत्र उदयनकालींच पूर्वेस कांबोडिया पर्यंत पोंचलें असावें आणि आग्नेयीस जाव्हापर्यंत पोंचलें असावें असा अदमास लोकांचा द्वीपांतरगमनाचा वृत्तांत पाहून द्वीपनिश्चय चांगला होत नसला तरी वाटतो.

## २२४. प्राचीन द्वीपनामें.

२२४. यांत द्वीपांचीं नांवें म्हणून आलेल्या उल्लेखांकडे प्रथम लक्ष देऊं. यांत पुढील द्वीपनामें आलीं आहेत. तीं म्हटलीं म्हणजे उत्स्थल द्वीप, कटाह द्वीप, कर्पूर द्वीप, रत्नकूट द्वीप, मुक्तिपुर द्वीप, हंस द्वीप, सिंहल द्वीप, सुवर्ण द्वीप हीं होत. या सात द्वीपांचा उल्लेख वारंवार येतो, तथापि इतर द्वीपनामें देखील आढळतात. उ. नारिकेलद्वीप (९. ६) व मुक्तिपुरद्वीप (९. १).

सप्तद्वीपांचा संस्कृत वाङ्मयांत वारंवार उल्लेख आला आहे तथापि सप्तद्वीपें हींच होतीं असें मात्र म्हणतां येत नाहीं. या द्वीपांचें वर्णन योग्य स्थळीं पुढें आलेंच आहे. ('कटाह' पहा).

## २२५. निरनिराळ्या राष्ट्रांचें व नगरांचें ग्रंथांतील वर्णन.

२२५. ज्या अनेक देशाचे आणि नगराचे या महाग्रंथांत उल्लेख आले आहेत, त्यांचें संपूर्ण विवेचन येथें करण्यास अवकाश नाहीं. तथापि कांहीं ठळक स्थळांसंबंधानें विधान केलें आहे.

**अनंगपूर**—वीरबाहु नामक राजाची राजधानी. वेताळपंचविशींत उल्लेख (१० वी कथा) मदनसेना कथेची नायिका. हिनें एका प्रेमप्रार्थना करणाऱ्या तरुणापासून आपलें कौमार्य रक्षण करण्याच्या हेतूनें लग्न झाल्यावर त्याच्या प्रेमाचा स्वीकार करण्याचें अभिवचन दिलें आणि पतीच्या संमतीनें त्याच्या प्रेमाचा स्वीकार करण्यास आली तेव्हां त्या तरुणानें तिचें तें सत्यव्रत पाहून तिला भ्रष्ट न करतां सन्मानानें परत पाठविलें अशी कथा आहे. देशाचें स्थान दाखविणारा उल्लेख यांत नाहीं.

**अयोध्या**—या नगरीचे अनेक उल्लेख यांत आले आहेत. उदयनाची आई मृगावती ही 'कृतवर्म' राजाची कन्या म्हणून उल्लेखिली आहे. 'कृतंजय' नांवाचा एक राजा शाक्य शुद्धोदन इत्यादि प्रसेनजितापूर्वीच्या काल्पनिक नांवांच्या पूर्वी येतो. प्रसेनजितापूर्वीच्या अनेक राजांचीं नावें नष्ट झाल्यामुळें शाक्यादि नांवें आलीं असें असल्यास हाच कृतंजय उदयनाचा आजा असणें अशक्य नाहीं. बाराव्या शशांकवती लंबकांत मुख्य कथेचें स्थान अयोध्याच केलें आहे आणि तेथें अमरदत्त या नांवाचा एक राजा सांगितला आहे. याचाच मुलगा मृगांकदत्त हा कथाविषयक आहे. हा राजा इक्ष्वाकु वंशांतील आहे असें तेथें दिलें नाहीं. वेताळपंचविशींत शूर चोराला नवरा करून घेणाऱ्या श्रीमान् वैश्याच्या रत्नवती नामक कन्येचा वृत्तांत आला आहे आणि तें वृत्त अयोध्या येथें वीरकेतु राजाच्या कारकीर्दीत घडलें म्हणून सांगितलें आहे. आणि अयोध्या ही विष्णुरूप राजा राम याची राजधानी होती असाहि उल्लेख आहे. पुढें सुरतमंजरीलंबकांत ( तरंग २ ) तीच चोरस्वीकार कथा थोड्या फरकानें पुन्हां आली आहे. या कथेंत वैश्यकन्येचें नांव वामदत्ता असें आलें आहे.

**अलका नगरी**—निषध पहा.

**अवंतिदेश**—अवंतिदेश या नांवानें उल्लेख ज्याप्रमाणें बृहत्कथेंत आहे त्याप्रमाणें मालवदेश या नांवानें देखील उल्लेख आहे. मालव हें नांव कमी येत असेल, पण नाहीं असें नाहीं. कथामुखलंबकांत 'श्रीदत्त' ब्राह्मणाची कथा आली आहे, तींत ( तरंग २ ) तो मालव देशांतील यज्ञसोम ब्राह्मणाचा मुलगा होता असें दाखविलें आहे. पुढें त्याच कथेंत अवंतिदेशाचा उल्लेख आहे. कदाचित् त्या वेळेस माळव्यांतच अवंतिदेश हा एक पोटविभाग असावा. उज्जयिनी नगरी अवंति देशांत होती असें विषमशील लंबक सांगत आहे. उज्जयिनी नगरीचे किंवा पुरीचे उल्लेख पुष्कळच आहेत. महेंद्रवर्मा आणि जयसेन, विक्रमादित्य आदित्यसेन, चंडमहासेन आदित्यवर्मा महासेन इत्यादि राजांचे व अशोकवती इत्यादि राण्यांचे उल्लेख त्यांत आहेत. उज्जयिनीचे जे उल्लेख आहेत ते देखील लक्षिले पाहिजेत. उज्जयिनीच्या धर्मध्वज नांवाच्या राजाचा उल्लेख वेताळ पंचविशींत आला आहे ( ११ वी कथा ) आणि त्यांत तीन सुकुमार राण्यांची कथा आली असून या तिघींत अत्यंत सुकुमार कोण असा प्रश्न केला आहे शशांकवती लंबकांतील नायिका शशांकवती ही उज्जयिनीच्या कर्मसेन राजाची मुलगी होती असें दाखविलें आहे. ( मालव पहा. )

**अहिच्छत्र नगर**—पुष्करावती नगरीचा राजपुत्र या नगरीच्या राजकन्येच्या पाणिग्रहणासाठीं जात असतां त्याला वाटेंत इक्षुमती नदी लागते. ही भूमीवरील प्रसिद्ध नगरी म्हणून उल्लेखिली आहे आणि तिचा उदयतुंग नांवाचा राजा उल्लेखिला आहे. तेथील विनीतमति नांवाच्या प्रतीहारपुत्राची कथा आली आहे. ती संपूर्ण जैन बनावटीची आहे; आणि त्या कथेची घुसड उत्तरकालीं झाली असावी ही एक शक्यता आहे, व जैन ग्रंथकार कृत्रिम इतिहासाचे व्यवसायी असल्यामुळें त्या कथेकडे लक्ष देण्यांत अर्थ नाहीं.

**इक्षुमती नगरी**. ही नगरी इक्षुमती नदीच्याच कांठीं होती आणि विश्वामित्रानें बसविलेली होती अशी कथा आहे.

**उज्जयिनी**—अवंति व मालव पहा.

**उत्स्थल द्वीप**—उत्स्थलद्वीपाचा उल्लेख कथासरित्सागरांत चतुर्दारिका लंबकांत आला आहे. कमकरेखा राजकन्येनें अपमान केल्यामुळें कनकपुरीचा शोध लावण्याकरितां निघालेल्या शक्तिदेव ब्राह्मणाला विंध्यारण्यापलीकडे दूर असलेल्या सरोवरावरील एक मुनि कनकपुरीविषयीं माहिती विचारली असतां समुद्रांतील उत्स्थलद्वीपस्थ सत्यव्रत निषादपतीकडे जा म्हणून सांगतो. त्यासाठीं शक्तिदेव समुद्रतीरीं विटंकपुरास येतो. एका वैश्याबरोबर जलमार्गानें जात असतां त्यांची नौका फुटते; तेव्हां शक्तिदेव पाण्याच्यावर तरंगत असतां पाठीन नांवाच्या माशाच्या पोटांत जातो. तो पाठीन मासा उत्स्थलद्वीपाला पोंचतो; व सत्यव्रताचे सेवक त्याला सत्यव्रताकडे नेतात. तेथें ते त्या माशाला चिरतात व त्याच्या पोटांतून शक्तिदेव गुदमरल्या स्थितींत जिवंत बाहेर निघतो अशी कथा आहे.

**उदयगिरि**—हा पर्वत व त्याच नांवाचें सिद्धक्षेत्र पूर्वसमुद्राच्या पलीकडे कर्कोटक म्हणून नगर आहे त्याच्या पलीकडील शीतोदा नगरीच्या पलीकडे होतें असें दिलें आहे. हें कर्कोटक नांवाचें नगर खरेंखुरें ऐतिहासिक असावें असें त्याच्या उल्लेखावरून वाटतें, व त्याच्या पलीकडे ज्याअर्थी सिद्धक्षेत्र होतें त्याअर्थी तितक्या दूरपर्यंतचा प्रदेश ब्राह्मणी संस्कृतीशीं बृहत्कथेच्या कालांत संयुक्त झाला असावा असें अनुमान अप्रयोजक होणार नाहीं.

**ऋषभ पर्वत**—ऋषभपर्वताचा उल्लेख कथासरित्सागरांत आलेला आहे. हा पर्वत चक्रवर्ती राजांचें महाभिषेकस्थान होता. सूर्यप्रभाचा अभिषेक ऋषभ पर्वतावर झाला होता. त्याला त्रिकूटाधिपति प्रभृति विद्याधरेशांनीं अभिषेक केला. या अभिषेकाचें आमंत्रण देण्यासाठीं सूर्यप्रभ स्वतः सुमेरु वनाहून कैलासास शंकराकडे गेला होता ( सूर्यप्रभ लं. तरंग ७ )

चतुर्दारिका लंबकांतही ऋषभपर्वताचा उल्लेख आला आहे. शक्तिदेव ब्राह्मण कनकपुरीला पोंचल्यावर चंद्रप्रभेला भेटतो. तेथें ती त्याला आपणास ऋषभपर्वतावर जावयाचें आहे म्हणून सांगते. या पर्वतावर आषाढ शुक्ल चतुर्दशीस सर्व विद्याधर त्र्यंबकाची पूजा करण्याकरितां जमत असत. तिच्या म्हणण्यावरून कनकपुरीला परत येण्यास दोन दिवस लागत असें दिसतें. ऋषभ पर्वताचें वर्णन कांहीं अंशीं काल्पनिक सृष्टींतलें व कांहीं अंशीं खऱ्या सृष्टींतील असें वाटतें; आणि हा पर्वत हिंदुकुश पर्वतराजीपैकीं कोणतातरी भाग असावा, असें वाटतें.

**एकलव्या**—या नगरींतील एक वेश्या पूर्वजन्मीं नैष्ठिक ब्राह्मण ब्रह्मचारिणी होती तथापि संजातकाम झाली असतांहि व्रतपालनासाठीं तिनें मरण पत्करलें, त्यामुळें ती पुढील जन्मीं या नगरींत वेश्या झाली ( १२–२ ). एकलव्या नगरी ही राजधानी देखील होती ( १२–७ ).

**ऐरावती नगरी**—गोमुख नांवाच्या एका कथकानें सांगितलेल्या ऐरावती म्हणून एका नगरीच्या परित्यागसेन म्हणून राजाचा उल्लेख केला आहे. या राजाच्या दोन राण्या होत्या आणि एकीनें पुत्रोत्पत्तिसाधक दिव्य फळें स्वतःच खाऊन टाकलीं, आणि त्यामुळें भयंकर सवतीमत्सराची एक कथा आलेली आहे. या कथेंत नगरी ऐरावती नगरी 'अलकेहूनहि उत्तम' असें सांगितलें आहे ( ७. ८ ).

**अंगदेश**—अंगदेशाचे उल्लेख देखील याची राजधानी विटंकपूर होती असें सांगितलें आहे. वनवासी नल-दमयंतीस अंग देशाचा मार्ग दाखवीत आहे असा यांत उल्लेख आहे. महाभारतांतील कथेंत रस्त्यांचें वर्णन नल करतो आहे असें जरी दाखविलें आहे तरी तो तिला दाखविलेल्या रस्त्यांत अंगाचा उल्लेख करीत नाहीं. शशांकवतीलंबकांत वेताळपंचविशी आहे तींतील आठवा वेताळ अंगदेशांतील वृक्षघट नांवाच्या गांवांतील विष्णुस्वामी नामक एका सुप्रसिद्ध द्विजाची गोष्ट आहे अशा प्रकारचें वर्णन सरित्सागरानें केलें आहे.

अंगदेशचा राजा प्रसेनजित् म्हणून आणला आहे आणि त्याचा राजवाडा विटंकपुर गांवीं होता असें सांगितलें आहे.

**अंतर्वेदी**—अंतर्वेदीचा उल्लेख देखील या ग्रंथांत आहे आणि तो उल्लेख वसुदत्त या ब्राह्मणाच्या गोष्टीच्या आनुषंगानें आला आहे. हा ब्राह्मण अंतर्वेदींत रहाणारा असून विद्याभ्यासास वल्लभीस जाऊं इच्छीत होता. त्यावरून गंगातीरचे ब्राह्मण अन्यत्र म्हणजे गुजरातसारख्या ठिकाणीं विद्याभ्यासास जात असें दिसतें.

**कच्छदेश**—सूर्यप्रभाची कथा आठव्या लंबकांत आली आहे. तेथें त्यानें अनेक देशच्या राजकन्या वरल्या म्हणून वर्णन करतांना कच्छ देशाचें देखील नांव आलें आहे.

**कटाह द्वीप**—ताम्रलिप्ता नगरीचे वैश्य व्यापारासाठीं कटाह द्वीपास जात असा उल्लेख आहे. ( देवस्मितेची कथा. कथामुखलंबक तरंग ५). पुढें एक ब्राह्मण आपल्या लुप्त झालेल्या पुत्रास शोधीत शोधीत कटाह, कर्पुर, सुवर्ण आणि सिंहल या द्वीपांप्रत गेला असें दाखविलें आहे. ( अलंकारवती लंबक तरंग ६ ) त्यानंतर शक्तियशलंबकांत एका मूर्खाची कथा आली आहे. तींत असें दाखविलें आहे कीं एक मूर्ख

व्यापारी काळा ऊद घेऊन कटाहद्वीपास गेला. तेथें उदाचा उपयोग लोकांस माहीत नसल्यामुळें कोणी माल घेईना. तथापि लोक कोळसे खरेदी करतात असें त्यानें पाहिलें आणि आपल्या कृष्णागरूचे त्यानें कोळसे बनवून ते विकले आणि तसा आंतबट्टयाचा व्यापार करून स्वदेशीं परत आला.

**कर्नाटक**—कर्नाटक देशाचे जे थोडे उल्लेख आहेत त्यांत शेवटच्या लंबकांत अवंतीच्या विक्रमादित्याचा कर्नाट-देशीय राजा जयध्वज हा एक अनुयायी म्हणून दिला आहे. त्याप्रमाणें सूर्यप्रभाची एक राणी कर्नाटकांतली होती म्हणून सांगितलें आहे. कर्नाटकांतील एका विजयमाली वैश्याची अत्यंत मनोरम कथा आली आहे. या वैश्याचा पुत्र मलमाली हा इंदुकेसरी राजाची कन्या इंदुयशा हिच्यावर मोहित झाला आणि तिचें चित्र तयार करून आपली शृंगारिक तहान भागवूं लागला; पण पुढें त्या मोहांतून एका मुनीनें सोडविलें अशी कथा आहे ( १२–५१ ). याच लंबकांत चवथ्या वेतालाच्या कथेंत शूद्रक राजानें कर्नाटयुक्त लाट देशाचें राज्य वीरवर नामक आपल्या सेवकास दिलें असा उल्लेख आहे. यावरून कोणच्या तरी प्राचीनकालीं कर्नाट आणि लाट हीं संयुक्त राज्यें होतीं असा लेखकाचा अभिप्राय आहे. हा राज्यदान देणारा शूद्रक शोभावती नगरीचा राजा होता. शोभावती नांवाची एक नगरी कलिंग देशांत होती, व त्यावरून हा मुख्यत्वें करून कलिंग देशी सम्राट असावा असें दिसतें.

**कनकपूर**—गंगातीरावरील एक नगर व राजधानी म्हणून वर्णिली आहे. राजाचें नांव कनकवर्ष असें दिलें आहे.

**कनकपुरी**—ही विद्याधरांची पण काल्पनिक असावी अशी शंका येते. ' ऋषभ पर्वत ' पहा.

**कनक क्षेत्र.**—कनकक्षेत्र नांवाचें एक रत्नांची खाण असलेलें क्षेत्र म्हणून उल्लेख केला आहे. तेथें मथुरेचा पवनसेन नांवाचा वैश्यपुत्र गेला होता; पण त्याला एकहि रत्न आढळलें नाहीं. तो स्वर्णद्वीपास जाऊं लागला वगैरे कथा पुढें आली आहे. कनकक्षेत्राचा स्थलनिश्चय करण्यास उपयोगी माहिती नाहीं. ( ७. २. )

**कनखल तीर्थ**—पृ. १५२ पहा.

**कमलपुर**—महीपाल ब्राह्मणपुत्राची कथा म्हणून मरुभूतीनें नरवाहनास सांगितली आहे.

**करजशपुर**—या नांवाचें देखील पुरराष्ट्र उल्लेखित आहे तें समुद्रकांठीं असावें, एवढेंच त्या वर्णनावरून दिसतें. हर्षपुर येथील एक वैश्य तेथें आला होता व त्यावर चोरीचा आळ येऊन वधाची शिक्षा झाली, पण तींतून तो सुटला असें वर्णन आलें आहे.

**कर्कोटक नगर.**—कर्कोटक नगराचा उल्लेख कथासरित्सागरांत आला आहे. हें नगर पूर्वसमुद्राच्या पलीकडे असून त्याच्या पलीकडे शीतोदा नदी आहे, व ती उतरल्यावर उदयगिरी पर्वत लागतो, असें लावाणक लंबकाच्या चौथ्या तरंगांत आहे. त्या पर्वतावर एक सिद्धक्षेत्र होतें व तेथें विद्याधरांना जातां येत नसे. उज्जयिनी नगरींत रहाणारा विदूषक नामक ब्राह्मण त्यावर अनुरक्त अशा भद्रा नांवाच्या विद्याधरीचा वियोग झाला तेव्हां तो तिच्या शोधाला निघाला. कांहीं दिवसांनीं तो पौंड्रवर्धन नांवाच्या नगराला पोंचला. तेथून तो पूर्वसमुद्राच्या तीरीं असलेल्या ताम्रलिप्तिका नगराला आला. तेथून तो समुद्राच्या पार जाऊन नग्नदेशास पोंचला. तेथून सात दिवस प्रवास करून तो कर्कोटक नगराला पोंचला. तेथें आर्यवर्त नांवाचा राजा होता. येथून साठ योजनांवर दुर्गम अशी शीतोदा नदी आहे, व तिच्या पलीकडे उदयाद्री आहे, असें वर्णन आहे.

**कर्पूरद्वीप**—याचा उल्लेख देखील आहे पण स्थलनिश्चय होत नाहीं. हें कटाहद्वीपाजवळच कोठेंतरी असावें. (९. ६)

**कर्पूरसंभवपुर.**—अर्पूरसंभवपुराचा उल्लेख कथासरित्सागरांत ( रत्नप्रभा लं. १. ८ ) आला आहे. हें नगर समुद्राच्या पलीकडे असून तेथें कर्पूरक राजा राज्य करीत होता. त्याची कन्या कर्पूरिका नांवाची होती, व ती पुरुषद्वेष्टी होती. कौशाम्बीच्या नरवाहनदत्तानें एका अरण्यवासिनी तापसीकडून तिचा वृत्तांत ऐकला व तो तिला मिळविण्यासाठीं उद्युक्त झाला. अरण्यांतून जातांजातां त्याला आंबे, फणस, डाळिंबें इत्यादि फलांनीं युक्त असें एक सरोवर लागलें. पुढें जातांजातां त्याला समुद्रकांठीं एक अद्भुत नगर लागलें. तेथील राज्यधर या राजपुत्रापासून त्यानें एक वातयंत्र विमान घेऊन आकाशमार्गानें कर्पूरसंभव नगर गांठलें. त्यानें कर्पूरिकेचा पूर्वजन्मवृत्तांत जाणून घेऊन युक्तीनें कर्पूरिकेला अनुकूल करून घेतलें व तिच्याशीं विवाह करून तो आकाशमार्गानें परत कौशांबीस आला असा वृत्तांत आला आहे.

**कलापग्राम**—या नांवाचें एक स्थल मयानें सूर्यप्रभ कुमारास दाखविलें असा उल्लेख आहे ( ८. ३ ). त्या ठिकाणीं इतस्ततः पसरलेलें सैन्य व्यवस्थितपणें ठेवतां येईल इतकें तें मोठें होतें.

**कलिंग देश**—याचे उल्लेख तर पुष्कळच आले आहेत. येथील कर्णोत्पल राजाचा एक दंतघाटक संग्रामवर्धन आणि त्याची कन्या यांचा वृत्तांत वेताल पंचविशींत आला आहे. वेतालपंचविशींतच तेविसाव्या कथेंत यज्ञसोम ब्राह्मणाची कथा आली आहे. तींत कलिंग देशचा

प्रतापी राजा प्रद्युम्न या नांवानें वर्णिला आहे. तथापि येथें ज्या नगरीचा तो राजा म्हणून सांगितला आहे तिचें नांव "शोभावती" असें दिलें आहे. शोभावती नगरीच्या एका शूद्रक राजाविषयीं उल्लेख कर्नाटकविषयक टीपेंत आलाच आहे. त्या नगराच्या आसपासच्या खुणा देखील वर्णन केल्या आहेत. या नगराचा राजा प्रद्युम्न नांवाचा होता व त्या नगराच्या एका बाजूला यज्ञस्थळ नांवाचा अग्रहार होता, असें सांगितलें आहे ( २२. ३० ). या शोभावतीचें वर्णन आणखी एका कथेंत आलें आहे. मदिरावतीलंबकांत नरवाहनदत्तास एक ब्राह्मण आपली रहस्यकथा सांगत आहे. तेथें जी कथा आली आहे तींतच पुढें थोडेसे फेरफार करून भवभूतीनें 'मालतीमाधव' हें प्रकरण तयार केलें. त्या कथेंत या शोभावतीचें वर्णन ब्राह्मणपुत्र करीत आहे तें असें "कलिंगदेशांत शोभावती नांवाची नगरी आहे. कलीनें तिच्यामध्यें प्रवेश केलेला नाहीं व परराष्ट्रानें तिला पाहिलेंहि नाहीं. कारण धात्यानें तिला अशाच कांहीं अपूर्व विधीनें निर्मिलें आले ( मदिरावती लंबकतरंग १ )" पुढें विषमशील लंबकांत विक्रमादित्य कलिंगराजास त्याचें कन्यारत्न आपणांस देण्यास हुकूम करीत आहे असा देखावा दिसत आहे आणि वेताळाच्या साहाय्यानें कलिंगपतीस घाबरवून त्याची मुलगी मिळविली आहे. शोभावतीजवळ गौरीतीर्थ म्हणून एक यात्रेचें स्थान होतें. तेथें आलेल्या शोभावतीच्या मदनसुंदरीनामक एका परिटाच्या मुलीची कथा देखील शशांकवतीलंबकांत (तरंग १३) आली आहे. तींत तिच्या पतीनें व दुसऱ्या एका व्यक्तीनें आपले शिरच्छेद करून घेतले पण ते पुढें जिवंत झाले; पण पुन्हां डोकीं धडांना लावतांना अदलाबदल झाली 'तर स्त्रीचा पती या दोहोंत कोण' असा प्रश्न त्रिविक्रमसेनास विचारला आहे.

**कांचनपुर**—नांवाचें एक शहर हिमालयाच्या एका शिखरावर होतें, असें जीमूतवाहनाच्या कथेंत वेताळानें सांगितलें आहे ( १२. २३ ). शक्तियशोलंबकामध्यें दोघां विद्याधरींच्या कथेंत याचा उल्लेख आहे आणि या विद्याधरींच्या कथांवरूनच बाणानें आपली कादंबरी लिहिली असावी, असें दिसतें.

**कांची**—कांची नगरीचा उल्लेख सूर्यप्रभलंबकांत आला आहे. येथील राजा कुंभीर याची कन्या वरुणसेना हिचा विवाह मद्रदेशांतील शाकल–नगरीं रहाणाऱ्या चंद्रप्रभ नांवाच्या राजाच्या सूर्यप्रभ या पुत्राशीं झाला. वज्रसार नगरीचा राजा रंभ हा चंद्रप्रभाचा कनिष्ठ भ्राता. याच्याहि कन्येचा सूर्यप्रभाशीं विवाह झाला होता. या नगरींत बाहुबल नांवाचा सार्थनाम राजा होऊन गेला. ही नगरी अत्यंत समृद्ध होती असें दिसतें.

**कांपिल्य देश**—कांपिल्य देशाचा उल्लेख कथासरित्सागरांत आलेला आहे. वर्धमान नगरांतील शक्तिदेव नांवाचा ब्राह्मणकुमार राजकन्येकडून अपमानित झाल्यामुळें कनकपुरी पहाण्याकरितां जात असतां त्याला कांपिल्यदेश लागतो. वर्धमाननगराच्या दक्षिणेस विंध्यारण्य आहे व त्याच्या पलीकडे कांपिल्य देश आहे. विंध्यारण्यापासून जात असतां शक्तिदेवाला कित्येक पर्वत, आश्रम वगैरे लागले; त्याला पुष्कळ दिवस लागले व श्रमहि बरेच झाले असें वर्णन आहे. कांपिल्य देशाचा उल्लेख यजुर्वेदांत अश्वमेध प्रकरणांत येतो तर दक्षिणेकडून उत्तरेकडे अश्वमेध गेला याचा स्मारक तर कांपिल्याचा उल्लेख नसेल ना असा विचार मनांत येतो.

**कान्यकुब्ज**—हा उत्तरकालीं त्याचप्रमाणें पौराणिक काळांत प्रसिद्ध देश होता. प्रसिद्ध राजा विश्वामित्र हा कान्यकुब्ज पति होता. बृहत्कथा मध्यकाळ दाखवितो आणि कान्यकुब्जाचें स्वतंत्र देश या नात्यानें सातत्य कुरुयुद्धापासून उदयन यांच्या मधल्या काळांतहि होतें याची साक्ष देत आहे. शशांकवती लंबकांत कान्यकुब्जाच्या बाहुशक्ति नामक राजाचा उल्लेख आहे. त्यानें आपल्या राज्यांत एका ब्राह्मणाला शंभर गांवें दान दिलीं होतीं. त्या ब्राह्मणाला एक विद्वान मुलगा होता, पण त्याची बायको शाकिनीच्या नादीं लागून स्वेच्छाचारिणी बनली. अशा तऱ्हेची कथा आलेली आहे.

**कामंदिका**—येथील श्रीमान वैश्याचा मुलगा जुगारानें कसा बिघडला ती कथा आली आहे. ( १२–१० ).

**काश्मीर**—या देशाच्या देखील अनेक कथा यांत आल्या आहेत. एक राजधानी हिरण्यपुर या नांवानें आली आहे. तेथील राजा कनकाक्ष, त्याची राणी रतिप्रभा आणि राजपुत्र हिरण्याक्ष या नांवाचा आला आहे. त्याला मृगांकलेखा नांवाच्या सुंदर स्त्रीची कथा एका तापसीकडून कळली व तो आतुर झाला वगैरे गोष्ट आली आहे. (शक्तियशलंबक तरंग ९ ). त्याच शक्तियशलंबकांत जलवासी पुरुषाचा वृत्तांत आला आहे. (तरंग ७). तो पूर्वजन्मीं तेथें ब्राह्मण होता. त्याला दोन भार्या होत्या. एका स्त्रीनें रात्रीं त्याच्या शय्येवर येऊन त्यास व्रतभ्रष्ट केलें त्यामुळें तो जलपुरुष झाला, वगैरे वृत्तांत सांगितला आहे. या काश्मीरांत "विजय" नांवाचें एक शंभूचें क्षेत्र होतें आणि तेथें आपल्या विद्येचा अभिमान बाळगणारा एक संन्यासी होता वगैरे कथा आली आहे. याशिवाय शशांकवतीलंबकाच्या सहाव्या तरं-

गांत काश्मीरच्या भूनंदन राजाचा वृत्तांत आला आहे. त्याचा स्वप्नांत एका दैत्यकन्येशीं संयोग झाला, आणि पुढें त्यानें एका तपस्व्याच्या साहाय्यानें त्या स्त्रीची प्राप्ति करून घेतली; ती करून घेण्यास त्यानें बारा वर्षें तपश्चर्या केली असें वर्णिलें आहे. विषमशील लंबकांत विक्रमादित्यानें अंकित केलेल्या राजांमध्यें काश्मीरचा सुनंदन राजा उल्लेखिला आहे.

या सर्व ठिकाणीं जेथें जेथें काश्मीरचा उल्लेख आला आहे, तेथें तेथें कवीनें देशाची प्रशस्ती बरीच केली आहे. तें सर्व वर्णन उदयनपूर्व कालाचें दर्शक होणार नाहीं. क्षेमेंद्र आणि सोमदेव हे दोघेहि काश्मीरासच होते त्यामुळें त्यांनीं त्या वर्णनांत स्वकालीन स्थिति आणि प्रशस्तिपर वाक्यें स्वेच्छेनें मिसळलीं असतील आणि मूळच्या बृहत्कथेंत तीं नसतील हें संभवनीय आहे.

**कीचकवन**—कीचकवनाचा उल्लेख कथासरित्सागरांत सूर्यप्रभलंबकांत आला आहे. हेमकूट पर्वताच्या उत्तरेस मानस सरोवर आहे व तेथेंच कीचकवन आहे. या वनांतील वेळू तोडून सरोवरांत टाकले असतां त्यांचीं धनुष्यें होतात अशी कथा आहे. या वनाचा रक्षक चंडदंड नांवाचा होता. सूर्यप्रभाचे सेवक या वनांत गेले होते, व त्यांनीं धनुष्यें मिळविलीं होतीं.

**कुंडिनपुर**—कुंडिनपुराचा उल्लेख कथासरित्सागरांत दोनतीनदां आला आहे. मदनमंचुका लंबकांतील सात ब्राह्मणांच्या कथेवरून तें विद्येचें स्थान होतें असें दिसतें. अलंकारवती लंबकांत कनकपुरच्या कनकवर्ण राजाचें कुंडिनपुरच्या देवशक्ति नामक राजाच्या मदनसुंदरी या कन्येशीं झालेल्या विवाहाचें वर्णन आलें आहे. विवाहासाठीं जातांना त्यानें अरण्यांतील सिंह व शबर यांचा संहार केला, असें वर्णन आहे. (पृ. १०८ पहा).

**कुसुमपुर**—गंगातीरीं होतें असें चतुर्दारिकालंबकांत सांगितलें आहे. (५–१). त्यांत हरस्वामीची कथा आली आहे. हरस्वामी बालकांस खातो अशी खोटी हूल उठली; लोक चौकशी न करतां घाबरे होऊं लागले; पुढें ती खोटी आहे असें कळून आलें. मिथ्या आरोपाची शक्ति दाखविण्यासाठीं ही कथा आली आहे. हरस्वामीच्या कथेंत कुसुमपुर गंगातीरावर होतें ही गोष्ट त्याचें पाटलीपुत्राशीं ऐक्य सुचविण्यास साधक आहे. वेतालपंचविशीमध्यें जें कुसुमपुर आलें आहे तें कोठलें, हें समजत नाहीं. (१२–२९). तेथील राजाचें नांव धरणीवराह असें दिलें आहे. मागधवंशांत धरणीवराहाचा उल्लेख नाहीं.

**कोंकणदेश**—सूर्यप्रभाच्या कथेमध्यें त्याचा कोंकणराजकन्येशीं विवाह झाला त्याची कथा आली आहे. (८–४) (प्रकरण २३ पहा).

**कोसलदेश**—नल-दमयंती आख्यानांत याचा उल्लेख आला आहे; आणि त्या आख्यायनाच्या स्वरूपावरून नल-दमयंती कथेची रचना महाभारतांतील रचनेसारखीच असावी, असें स्पष्ट होत आहे. (९–६)

**कोट्ट**—सूर्यप्रभलंबकामध्यें कोट्टस्थ सोमकेश्वराच्या सैन्यास उज्जयिनीच्या महासेन राजानें वेढा दिला अशी कथा आली आहे. ही कथा सूर्यप्रभास त्याच्या एका सचीवानें सांगितली आहे. (८–६).

**कौतुकपुर**—कौतुकपुराचा उल्लेख कथासरित्सागरांत आला आहे. तेथें बहुसुवर्णक नांवाचा उदार राजा रहात असे. येथें राहणारा यशोवर्मा नांवाचा त्याचा तरुण क्षत्रिय सेवक दारिद्र्यामुळें विंध्यवासिनीकडे गेला. असें सांगून त्याची कथा दिली आहे. यांतील उल्लेखांवरून स्थलनिश्चय होत नाहीं.

**कौशांबी**—उदयनाची नगरी.

**कंबुकपुर**—कंबुकपुरांतील देवदत्त नांवाच्या एका जुगारी बनलेल्या ब्राह्मणपुत्राची कथा आली आहे. हें पुर कोठें होतें याविषयीं माहिती दिली नाहीं (५–३).

**गोकर्णपुर**—याची सविस्तर कथा तेविसाव्या प्रकरणांत आलीच आहे.

**चिंचिनी**—चिंचिनीचा उल्लेख कथापीठलंबकांत आलेला आहे. हें नगर दक्षिणापथास समुद्रकांठीं होतें. बृहत्कथेंतील तारापुराचा उल्लेख (९. ६.) चिंचिणी शेजारच्या ग्रामाविषयीं असणें अशक्य नाहीं (पृ. १५४–८ पहा).

**चित्रकूट**—येथील एका धनाढ्य वेश्येची कथा 'आलजाल कथा' या नांवानें आली आहे. या कथेमध्यें त्या कालची वेश्यांची विद्या आली आहे (१०. १). चित्रकूटास सिंहलद्वीपावरून नावेंत बसून एक वैश्य गेला असेंहि विधान महीपाल ब्राह्मणपुत्राच्या कथेंत आलें आहे (९. ६). दुसऱ्या एका ठिकाणीं म्हणजे वेतालपंचविशींत (१२. २७) चंद्रावलोक राजाची कथा आली आहे. तो राजा चित्रकूट नगराचा होता आणि या नगरांत वर्णभेदाची व्यवस्था उत्तम होती, असा उल्लेख आहे. शहराच्या वर्णनावरून हें समुद्रकांठीं असावें असें स्पष्ट होत नाहीं (१२. २७). चित्रकूट नगरांत ब्राह्मणवर नांवाचा एक राजा होऊन गेला होता, व तो ब्राह्मणभक्त होता. त्याच्या सेनापतीची कथा यांत आली आहे (७. १).

**चिरपुर**—चिरदाता राजा चिरपुर नगरांत होता या पलीकडे माहिती नाहीं (९. ६).

**चिरायु**—नागार्जुनाच्या कथेंत असें सांगितलें आहे कीं, चिरायु नगरच्या चिरायु नांवाच्या राजाचा दिवाण होता. ज्याअर्थी ही कथा काल्पनिक राजा व काल्पनिक देश यांच्या-भोंवतीं गुंडाळिली गेली आहे, त्याअर्थी ही कथा सुप्रसिद्ध बौद्ध नागार्जुनाविषयीं मूळची नसून वररुचीच्या किंवा त्या-नंतरच्या संपादकाच्या हातून त्या कथेचा बौद्ध नागार्जुनाशीं संबंध जोडला गेला असावा असें वाटतें. बौद्धांमध्येंच दोन नागार्जुन झाले होते, तथापि चिरायु येथील नागार्जुन निराळा असून त्यालाच चुकीनें बौद्ध बनविलें असावें. ( ७. ७ ) नागार्जुन हा स्वतंत्र चर्चेचा विषय पुढें होणारच आहे.

**चीन**—येथील राजा सुरोह याची कन्या विद्युन्माला सूर्यप्रभानें वरली. ( ८. १ )

**चेदि**—येथील राज्य उदयनानें जिंकून मेहुण्यास दिलें.

**तक्षशिला**—तक्षशिलेंतील भद्राक्ष नांवाच्या राजाचा उल्लेख आला आहे, आणि तो कमलांनीं लक्ष्मीची पूजा करी असें दाखविलें आहे. ( १२. २ ). तक्षशिलेंतील जैनधर्मी राजा कलिंगदत्त याची कथा अन्यत्र आलीच आहे, ( ६. १ ) यावरून ब्राह्मणी पौराणिक धर्म आणि जैनधर्म या दोहोंचाहि कथारचनाकालीं तेथें प्रचार झाला होता हें स्पष्ट होतें.

**ताम्रलिप्ता**—अपररूप ताम्रलिप्तिका. पूर्वसमुद्राच्या तीरीं ( ३. ४) व्यापारस्थल आणि राजधानी. येथील वीरभट राजाची कन्या सूर्यप्रभाची एक राणी होती. ( ८. १ ) येथील वैश्यानें यज्ञ केला. (२. ५ ) एका वैश्याची मोलकरीण पण कडकडीत पतिव्रता शीलवती येथील होती (६. ३). (रत्नकूट द्वीप पहा.)

**तिमिरा**—येथील विहितसेन राजाची कथा स्त्रीवरील आत्यंतिक प्रेमाची द्योतक म्हणून आलेली आहे ( ३. ३ ).

**तुरुष्कराज्य**—याचा उल्लेख रत्नप्रभालंबकांत आला आहे. हें तुरुष्क राज्य फार उत्तरेस होतें, व त्याच्या पलीकडे वितस्ता अगर झेलम नदी होती. त्याच्या वाटेंत कित्येक अरण्यें, नद्या व डोंगर होते. तेथें मुरवार नांवाचा राजा होता. तुरुष्क लोक हे म्लेच्छ असून फार होते. ते ताजिक जातीचे असून गुलामांचा व्यापार करीत असें दिसतें व मृताबरोबर त्यास परलोकीं सेवक मिळावेत म्हणून जिवंत माणसें पुरीत† ( ७. ३ ).

**त्रिघंटा** हें नगर हिमालयावर होतें. तेथें लब्धजिव्ह नांवाचा राक्षसाधिपति होता.

**द्वारका**—द्वारकानगरीचा उल्लेख कृष्णकथेच्या, विशेषें-करून अनिरुद्धाच्या कथेच्या अनुरोधानें आला आहे (६. ५).

**नागस्थल**—मथुरेजवळील एक गांव ( २. २ ).

**निषध**—या देशाचें नांव वेदांत त्याप्रमाणेंच पौराणिक वाङ्मयांत येतें. नडनैषध म्हणून व्यक्ति शतपथ ब्राह्मणास ठाऊक आहे. बौद्धवाङ्मयास निषध ठाऊक नाहीं, त्याप्रमाणें उत्तरकालीन वाङ्मयांत निषधाचा उल्लेख फारसा येत नाहीं. आंध्रांनंतर त्यांच्या राज्याचें काय झालें म्हणून उत्तर देतांना काय तो निषधाचा उत्तरकाळीं उल्लेख येतो. नाहींतर नल-कथेंतील एक देश एवढाच काय तो त्याचा उल्लेख संस्कृत-वाङ्मयास परिचित आहे तथापि बृहत्कथेंत निषधविषयक आणखी एक कथा येत आहे आणि ती कथा बृहत्कथेचें कालक्षेत्र सामान्यतः बुद्धपूर्वकालीन आहे असें दाखविते.

येथें निषधविषयक भौगोलिक माहिती पुढीलप्रमाणें दिली आहे. तिनें उत्तर दिशेचें मुख आलंकृत केलें असें वर्णन आहे, पण त्यावरून कांहीं बोध होत नाहीं. कथेचा उगम दक्षिणेंत झाला असें मात्र यावरून निघेल. निषधाची राज-धानी अलकापुरी होती. निषध देशाचा राजपुत्र सुंदरसेन याचें हंसद्वीपच्या राजा मंदारसेन याची मुलगी मंदारवती हिच्याशीं लग्न झाल्याचा वृत्तांत शशांकवती लंबकांत ( तरंग ३४ ) दिला आहे. ही अलका कुबेराच्या अलकेहून भिन्न होती, याचें निदर्शक वाक्य यांत आहे. हिला कुबेराच्या अलकेशीं तुल्य बनविलें आहे. हंसद्वीप हें बेट पश्चिमसमुद्रांत होतें असें शशांकवतीलंबक तरंग ६ यांत सांगितलें आहे. अलकेहून प्रथम समुद्रतीरावरील महेंद्रादित्य राजाच्या शशांकपुरास जावयाचें आणि तेथून नौकेंत बसून थोड्याच दिवसांनीं मनुष्य हंसद्वीपास जाऊं शके असें मंदारवतीच्या प्रस्तुत कथेंत दाखविलें आहे. पण एवढ्या माहितीवरून निषधाचा स्थलनिश्चय होत नाहीं. शशांकपुर हें कोंकणच्या किनाऱ्यावरील एखादें बंदर असेल. पण तें कोणतें हें ठर-विण्यास अवांतर साधन पाहिजे.

**नेपाळ**—या देशाची राजधानी शिवपूर होती, असा उल्लेख वेतालपंचविशींत आहे ( १२. २२ ).

**नंदिक्षेत्र**—काश्मीरदेशांतील एक क्षेत्र ( ७. ५ ).

**पद्माख्य**—या नगराचा स्थाननिश्चय होत नाहीं.

**पाटलीपुत्र**—या नगराच्या कथा पुष्कळच आहेत. उदयनपूर्वकालांत हें नगर अस्तित्वांत होतें असेंच सामा-न्यतः बृहत्कथा गृहीत धरीत आहे. पाटलिपुत्राचे उल्लेख चोहोंकडे पसरले आहेत.

---

†क्रमादुत्तरदिग्भूमिं प्राप स म्लेच्छभूयसीं
तत्र तैरेव सहितः पथि प्राप्यैव ताजिकैः
नीत्वापरस्मै मूल्येन दत्तोऽभूत् ताजिकाय सः
तेनापि तावद्भृत्यानां हस्ते कोशलिकाकृते
मुरवाराभिधानस्य तुरुष्कस्य व्यसृज्यत
तत्र नीतः स तद्भृत्यैर्युक्तस्तैरपरैस्त्रिभिः
मुरवारं मृतं बुद्ध्वा तत्पुत्राय न्यवेद्यत
पितुः कोशलिका ह्येषा मित्रेण प्रेषिता मम
तत्तस्यैवांतिके प्रातः खाते क्षेप्या इमे मया

**पुष्करावती**—पुष्करावतीच्या गूढसेन राजाचा उल्लेख आला आहे. या त्या गूढसेनास एक मुलगा होता; त्याची एका वैश्यपुत्राबरोबर मैत्री होती; आणि मैत्रीमुळें ते पुढें एकरूप झाले अशा तऱ्हेची कथा आलेली आहे; तथापि ही नगरी कोठें असावी याचें दर्शक त्यांत कांहीं एक नाहीं ( ६. २ ). तथापि पुढें रत्नप्रभा लंबकांत ( त. ३ ) निश्चयदत्त नांवाच्या उज्जयिनीच्या वैश्यपुत्राची कथा आलेली आहे. त्याची प्रियकरी अनुरागपरा ही होती. ही विद्याधराधिपाची मुलगी होती आणि त्याचें राज्य हिमालयावरील पुष्करावती येथें होतें असें दाखविलें आहे. या उल्लेखित पुष्करावती दोन होत्या कीं एकच होती हेंहि सांगतां येत नाहीं.

पुष्करावतीचा आणखी एक उल्लेख प्रभावतीच्या कथेंत आला आहे. प्रभावती ही पिंगल गांधार नांवाच्या एका विद्याधरेश्वराची मुलगी. अर्थात् ही नगरी हिमालयाच्या एखाद्या खोऱ्यांतच असली पाहिजे.

**पौंड्रवर्धन**-पौण्ड्रांचा उल्लेख भारतांत येतो. पौण्ड्र तेच अर्वाचीन पोद नांवाची जात होत, अशा सूचना बंगालच्या सेन्सस रिपोर्टांतून व्यक्त झाल्या आहेत.

**प्रतिष्ठान**—यावर अनेक प्रकरणांत मजकूर आला आहे.

**प्रयाग**—प्रयागचा उल्लेख यांत अगदीं थोडा आला आहे. ( ९. २ ) सागर वर्माराजा यानें आपला पुत्र चक्रवर्ती झाला, हें पाहून वानप्रस्थश्रमासाठीं प्रयाण केलें तेव्हां त्याला प्रयागपर्यंत त्याचा मुलगा पोंचविण्यास गेला. या राजाची राजधानी सागरपूर होती. ती आजचें बुंदेलखंडांतील सागर नसेलना ?

**बदरिकाश्रम**—गंगेच्या तीरावरील एक गांव ( १–७ ).

**बहुसुवर्णक ग्राम**—बहुसुवर्णक ग्रामाचा उल्लेख कथापीठ लंबकांत आलेला आहे. काणभूतीच्या प्रश्नावरून त्याला पुष्पदंत हें नांव कोठून प्राप्त झालें तें गुणाढ्य सांगतो. हागांव गंगेच्या तीरावर होता.

**मडव क्षेत्र**—काश्मीर देशांतील एक क्षेत्र ( ७–५ ).

**मथुरा**—मथुरेंतील यइल्लक नांवाच्या एका वणिक्पुत्राच्या पत्नीवरील आत्यंतिक प्रेमाची कथा आली आहे ( ३–१ ).

**मथुरा**—नगरीचा उल्लेख मदनमंचुकालंबकांत आला आहे. तेथील पाशुपत मताच्या एका ब्राह्मणाचा वृत्तांत यक्षाच्या कथेंत आला आहे ( ६–८ ).

**मद्रदेश**—येथील सूर्यप्रभावर एक लंबक खर्ची पडला आहे. येथील राजधानी शाकल नगर होती. ( ८. १ ).

**महाराष्ट्र**—सूर्यप्रभाची एक राणी महाराष्ट्रीय होती ( ८. ५ ).

**मधुपुर**—एक राक्षस राजधानी ( ७. ५. ).

**मध्य देश**—सूर्यप्रभाची एक राणी येथील होती (८.५).

**मालव देश**—मालवदेशांतून एक ब्राह्मण कौशाम्बीच्या उदयनाकडे पुरोहित म्हणून राहिला होता आणि त्याची भावजय चोरांनीं तिचें लुटल्यानंतर आपल्या इतर भावजयींसह घर सोडून पळाली आणि पुढें ती वासवदत्तेच्या आश्रयास येऊन राहिली अशी कथा आहे. तिचा दीर हा घराबाहेर पडला. तो विद्येच्या हेतूनें पडला व तिचा नवरा बायकोला घरीं एकटी सोडून तीर्थयात्रेस गेला, आणि तो तेथें सरस्वतीच्या तीरीं मृत्यु पावला अशी दुर्दैवी ब्राह्मण कुलाची कथा त्यांत आली आहे. शशांकवती लंबकांत ज्या अनेक उपकथा आल्या आहेत, त्यांत सहाव्या तरंगामध्यें मालवदेशाच्या श्रीसेन नांवाच्या एका राजाचा उल्लेख आहे. त्यानें श्रीदर्शन नांवाच्या ब्राह्मणपुत्रास धर्मपुत्र करून आपलें राज्य दिलें.

**मुक्तापुर**—हिमालयांतील विद्याधर ग्राम ( ७. ८ ).

**यज्ञस्थल**—यज्ञस्थल ग्रामाचा उल्लेख मदनमन्चुकालम्बकांत आला आहे. 'मित्रद्रोह करणारे ते पिशाच होत, राजपुत्र नव्हत' याच्या स्पष्टीकरणार्थ पिशाच व ब्राह्मणकन्या यांची कथा सांगितली आहे. यज्ञस्थलग्रामांतील एक दरिद्री ब्राह्मण रानांत लांकडें फोडीत असतां एक ढलपी त्याच्या मांडींत शिरली. त्याची नाडी व्रण होऊन तो मरावयास टेंकला असतां त्याचा एक मित्र येऊन त्याला उपाय सांगता झाला. ( ६. २ ) हा गांव अग्रहार होता ( १७. १ ).

**रत्नकूट द्वीप**—रत्नकूट द्वीपांत रत्नाधिपति म्हणून यथार्थनामधारक राजा होता. तो विष्णुभक्त होता. विष्णूच्या कृपेनें त्याला आकाशगामी श्वेतगज मिळाला. त्यावर बसून त्यानें सर्व पृथ्वी व ऐशीं सहस्र राजकन्या जिंकल्या. एकदां द्वीपांत राहून येत असतां त्या हत्तीवर एका गरुडवंशज पक्षानें चंचुप्रहार केला, व तो हत्ती मूर्च्छींत होऊन पडला. तो सावध होत नाहीं असें पाहून तो राजा आत्मघात करून घेऊं लागला असतां 'साध्वी स्त्रीच्या स्पर्शानें तो हत्ती सावध होईल' अशी आकाशवाणी झाली. परंतु राजाच्या ऐशीं सहस्र राण्या त्याचप्रमाणें नगरांतील इतर स्त्रिया यांच्याकडून तो हत्ती उठेना. इतक्यांत ताम्रलिप्तीच्या हर्षगुप्त नामक वैश्याची मोलकरीण त्याच्याबरोबर तेथें आली. तिनें स्पर्श करतांच तो हत्ती उठला. तेव्हां राजानें त्या शीलवती नामक मोलकरणीला तिच्या बापाच्या घरीं एकादी अविवाहित कन्या आहे काय म्हणून विचारलें असतां, राजदत्ता नांवाची तिची बहीण ताम्रलिप्तींत असल्याचें त्याला कळलें. तेव्हां रत्नाधिपति ताम्रलिप्तीला गेला, व त्यानें राजदत्तेला पाहिलें. जोशांनीं पहिला मुहूर्त व्यभिचारप्रवर्तक आहे असें सांगितलें असतांही त्या उत्सुक राजानें तिच्याशीं विवाह केला, व तिला एका निर्जन बेटांत ठेविलें. पण दैववशात् एक वैश्यपुत्र, वादळांत

सांपडून त्याचें जहाज फुटल्यामुळें त्या बेटास लागला व तिच्या दृष्टिपथांत आला. तेव्हां ती मोहित होऊन त्याशीं रत झाली असतां राजा त्या ठिकाणीं प्राप्त झाला; पुढें राजाला वैराग्य आलें अशी कथा आहे.

**रत्नपूर**—मध्यप्रांतांतील हैहयांची राजधानी म्हणून उत्तरकालीं प्रसिद्ध असलेलें रत्नपूर तेंच हें ( ५. १ ) असणें अशक्य नाहीं.

**राढा**—नगरीचा उल्लेख बृहत्कथेंत आला आहे. 'राढ देश' या नांवाचा बंगालचा विभाग आहे, आणि बंगाली ब्राह्मणांमध्यें 'राढी' 'वरेंद्र' 'वैदिक' असे भेद आहेत, त्यांपैकीं राढी आणि वरेंद्र हे मुख्य स्थानमूलक भेद आहेत. आणि यावरून "राढ" राष्ट्राचें सातत्य फार प्राचीन कालापासून आजच्या कालापर्यंत आहे. जेव्हां ब्राह्मणांचे पंचगौड आणि पंचद्राविड असे भेद मान्य झाले, त्याच्या अगोदर राढांतच काय तर पूर्वकांबोजापर्यंत ब्राह्मणवस्ती असावी, तथापि जातिगणकांची दृष्टी दूरवर न पोंचल्यामुळें गौडांतील पांचच प्रदेशांतील जाती अंतर्भूत झाल्या, आणि पुढच्या काळांत राढांतील ब्राह्मणांना आपण कान्यकुब्ज किंवा मैथिल यांच्यांत अंतर्भूत होतों असें सांगणें भाग पडलें.

शशांकवतीलंबकांतील नायक मृगांकदत्त याला एक भीमभट आणि समरभट यांची कथा सांगितली आहे. भीमभट हा थोरल्या राणीचा मुलगा आणि समरभट हा राजानें एक नर्तकी दुसरी राणी करून घेतली तिचा मुलगा. त्या राणीनें भीमभटास नालायक ठरवून राजाकडून देशाबाहेर घालविलें. तो पुढें लाट राजकन्येशीं लग्न लावून पुढें राज्याधिपति बनला आणि पुढें त्याचा बाप जेव्हां मृत्यु पावला, तेव्हां राज्य समरभटाला मिळालें होतें, तें त्यानें समरभटास मारून परत घेतलें, अशी कथा आहे. कथासरित्सागरांत प्रत्येक देशांत उत्पन्न झालेल्या कथा समाविष्ट करण्याची प्रवृत्ति बाळगल्यानें राढदेशीय कथा आली आहे. राढांचें नांव पुराणांत येत नाहीं, व धर्मशास्त्रांत येत नाहीं. म्हणून तो देश प्राचीन नव्हता किंवा वसलेला नव्हता अशा तऱ्हेच्या कल्पना करण्यांत अर्थ नाहीं. देश वसला असला पाहिजे. जेथें अंग वंग कलिंग अधर्म्याचरण करणारे म्हणून त्यांच्या देशांत मध्यदेशीयांस मज्जाव तर राढाची वासलात त्याबरोबरच लागणार.

**लक्षपुर**—हें काल्पनिक गांव दिसतें. येथील लक्षदत्त नांवाच्या दानशूर राजाची कथा ( ९–३ ) ग्रंथांत आहे.

**लाट**—अनेक उल्लेख. 'राढा,' 'कर्नाटक' पहा.

**लंका**—बिभीषणाचा उल्लेख रामकथेशिवाय स्वतंत्रपणें यांत आला आहे.



**वक्रोलक**—( १२. २६. ) येथें त्याचा उल्लेख आहे. तेथें एका ब्राह्मणास वैश्यस्त्रीपासून मुलगा झाला व तो तेथें राजा झाला असें दिलें आहे. स्थाननिश्चय होत नाहीं. वातावरण खरीखुरी राजधानी असावी असें दाखवितें. हा ब्राह्मणपुत्र पुढें मोठा राजा झाला.

**वज्रसार**—सूर्यप्रभ हा ताम्रलिप्तीहून येथें विमानानें जाऊन तेथील राजकन्या हरण करता झाला. ( ८. १ )

**वत्सदेश**—वत्सदेश कथासरित्सागरांत विवेचनाचा प्रधान विषय आहे. कथेस सुरवात शतानीक व सहस्रानीक यांच्यापासून झाली आहे. हा देश 'स्वर्गाचा प्रतिस्पर्धी' होता असें त्याचें वर्णन आहे. कौशांबी ही नगरी यांतील राजधानी होती. तेथें परीक्षिताचा नातु व जनमेजयाचा पुत्र शतानीक हा पांडववंशीय राजा राज्य करीत असे. हा राजा इंद्राचा युद्धांतील साहाय्यक होता. शतानीक स्वर्गांत देवांच्या वतीनें युद्ध करीत असतां मृत्यु पावला व सहस्रानीक हा त्याचा पुत्र राज्यावर आला. सहस्रानीक स्वर्गलोकीं इंद्राकडे सत्कारिला जात असतां देवांचे विलास पाहून दुःखी झाला. तेव्हां इंद्रानें त्याच्या पूर्वजन्माचा खुलासा करून 'मृगावती नामक अयोध्येची राजकन्या तुझी पत्नी होईल' असें सांगितलें. तें ऐकून सहस्रानीक आनंदित होऊन तिच्या चिन्तनांत मग्न झाला, व त्याला एक देवपत्नीची प्रेमयाचना ऐकूं आली नाहीं. तेव्हां तिनें रागावून मृगावतीशीं १४ वर्षें वियोग होईल असा त्याला शाप दिला. पुढें अयोध्येच्या कृतवर्मा राजानें त्याला आपली मृगावती कन्या दिली. ती पुढें गरोदर असतां सहस्रानीकानें तिचे डोहळे काय आहेत असें विचारल्यावरून तिनें रक्तवापींत स्नान करण्याची इच्छा दर्शविली. राजानें एका विहिरीचें पाणी रक्तवर्ण केलें. त्यांत स्नान करीत असतां त्या पाण्यानें तिचें अंग लाल झाल्यामुळें तो मांसाचा तुकडा आहे असें वाटून एका गरुडपक्ष्यानें तिला उचलून नेलें. ती जिवंत आहे असें पाहून त्या गरुडपक्ष्यानें तिला उदय पर्वतावर टाकिलें. एका मुनीला तिची दया येऊन त्यानें तिला जमदग्नीकडे नेलें. पुढें तेथेंच ती प्रसूत झाली. तिला जो मुलगा झाला तोच प्रख्यात उदयन होय. कौशांबी जेथें होती तें आजचें कोसम नांवाचें गांव होय.

**वर्धमानपुराचा** उल्लेख रत्नप्रभालंबकांत आला आहे. तेथें वीरभुज नांवाचा राजा होता. त्याच्या शंभर राण्या होत्या. त्यांतील गुणवरा ही महादेवी असून तिला शृंगभुज नांवाचा सर्वगुणसंपन्न पुत्र होता. या राण्यांच्या मत्सराची कथा या लंबकांत दिलेली आहे ( ७. ५ ).

**वलभी नगरी**—वलभी या सौराष्ट्रांतील नगरीचा




चित्रांक २९. कुरुयुद्धांत भाग घेणाऱ्या राष्ट्रांचीं पार्गिटरच्या मताप्रमाणें स्थानें.

उल्लेख जीमूतवाहनाच्या कथेंत आला आहे. वलभी हें व्यापाराचें स्थान असावें, व तें समुद्रकांठीं असावें, असें, 'तेथून द्वीपांतरीं पाठविलें' अशा अर्थाच्या शब्दांवरून व्यक्त होत आहे. तें श्रीमान् वैश्याचें स्थान होतें असें दाखविलें आहे. (लं. ४, तरंग २). पण तें विद्येचेंहि स्थान होतें असें अंतर्वेदींतील विद्यार्थी तेथें जाऊं इच्छीत यावरून दिसतें. गुप्तकालाच्या पूर्वी हिचें अनेक शतकें महत्त्व होतें ( अंतर्वेदी पहा ).

**वसुदत्तपुर**—याचा उल्लेख मदनमंचुका लंबकांत आला आहे. पाटलीपुत्र नगरांतील कीर्तिसेना नामक प्रोषितभर्तृका वैश्यस्त्री सासूच्या जुलमानें तळघरांतून पळून गेली. ती वलभीपुरास जात असतां वाटेंत एका अरण्यांत राहिली. या अरण्याच्या सीमेवरच वसुदत्त नांवाचा धर्मपरायण राजा राहत असे ( ६. ३ ).

**वाराणसी**—हें अत्यंत प्राचीन काळापासून श्रीशंकराचें आवडतें स्थान होतें अशा तऱ्हेचा उल्लेख शशांकवतीलंबकांत अंतर्भूत केलेल्या वेताळपंचविशींतल्या पहिल्या गोष्टीच्याच आरंभीं आहे—

**अस्ति वाराणसी नाम पुरारिवसतिः पुरी ।**
**स्थलीव कैलासगिरेर्या पुण्यजनसेविता ॥**

व तीवरून वाराणसीच्या पावित्र्याचा लौकिक त्या प्राचीन काळीं देखील होता असें दिसतें.

या राज्याविषयीं उल्लेख अत्यंत विपुल आहेत. वाराणसी येथें एक ब्रह्मदत्त नांवाचा राजा होता. त्यानें सुवर्ण हंस पाहिलेले पुन्हा दिसावेत म्हणून त्यानें एक सुंदर सरोवर निर्माण केलें; तेव्हां तेथें तें हंसाचें जोडपें आलें. त्या जोडयानें आपली कथा सांगितली कीं पूर्वी आम्ही कावळे होतों, पण शिवकुंडांत मृत झाल्यामुळें त्या नकळत घडलेल्या पुण्यानें सुवर्णदेही झालों. ही कथा कथापीठकलंबकांत त्याचप्रमाणें पद्मावतीलंबकांत ( तरंग १ ) आली आहे. कथापीठलंबकांत प्रस्तुत कथा शिवपूजनाचें महत्त्व सांगण्यासाठीं सांगितली नसून ज्याप्रमाणें हंसांनीं यावें म्हणून तळें निर्माण करणें शहाणपणाचें काम झालें त्याप्रमाणें पुत्रकानें दानें करणें शहाणपणाचें होईल, म्हणजे स्वाभाविकपणें तुझे ब्राह्मण पितर तेथें येतील हें सांगण्यासाठीं ही कथा आली आहे. वाराणसीच्या विक्रमचंड राजाच्या पदरीं असलेल्या सिंहपराक्रमाची कथा. सिंहपराक्रमाची भार्या कलहकारी त्यास नेहमीं छळी. ती त्याला छळण्याचें कारण ती पूर्वजन्मींची आस्वली होती व हा सिंह होता, असें त्यास कळलें व नंतर त्यानें पूर्वजन्मीं सिंही असलेल्या स्त्रीशीं लग्न लावलें व सुख पावला अशी कथा आहे ( नरवाहनलंबक, तरंग ३ ).

वाराणसी येथील सोमस्वामी नांवाच्या एका काशींतल्या ब्राह्मणाला त्याच्या प्रियकरणीनें गुप्तपणीं पुरुष बनवून व्यवहार करितां यावा म्हणून त्याच्या संमतीनें माकड बनविलें होतें; पण प्रवासांत पुष्कळ वानरांनीं त्याच्या वर हल्ला केल्यामुळें सोडून दिलें आणि त्याला पुढें इतर वानरांनीं ओरबाडिलें वगैरे कथा आहे (रत्नप्रभालंबक तरंग ३). त्याच तरंगांत वाराणशीच्या ब्राह्मण स्त्रीनें एक वेळ आपला प्रियकर असणाऱ्या पण पुढें तिच्याविषयीं संशय घेणाऱ्या ब्राह्मणाला गाढव करून विकलें अशा कथा आहेत. त्याच लंबकांत सहाव्या तरंगांत विरूपशर्मा ब्राह्मणाची कथा आहे. हा दारिद्र्यामुळें खिन्न असे. पुढें त्यानें एका कुरूप आणि रोगी कोल्ह्याला पाहिलें व तो स्वतःला कमी दुःखी मानूं लागला. वाराणसीच्या ब्राह्मणांच्या कथांना कमताई मुळींच नाहीं. श्रीकंठ नांवाचा एक ब्राह्मण गुरूकडे राहून विद्या पूर्ण करता झाला आणि घरीं परत आल्यावर पहातो तों आईबापें मृत झालीं आहेत. दारिद्र्यामुळें तो लग्न करून संसार करण्यास समर्थ नव्हता. हें त्याचें वृत्त समजल्यावर एका राजसेवकानें त्यास पुरेसें द्रव्य दिलें व तो गृहस्थाश्रमी बनूं शकला. तसेंच वाराणसीच्या देवस्वामी नांवाच्या एका श्रीमान् ब्राह्मणाच्या सुंदर स्त्रीस एक विद्याधर उचलून नेता झाला अशीहि एक विप्रकथा आली आहे. वाराणसीचा धर्मगोप राजा शशांकवतीलंबकांत आला आहे ( तरंग २ रा ). याची कन्या अनंगलीला ही फार सुंदर होती. ती मगध देशच्या भद्रबाहु राजास हवी होती, पण वाराणसीचा राजा पूर्व वैरामुळें मगधाधिपास द्यावयास तयार नव्हता. लढावें तर त्याच्यापाशीं एक भद्रदंत नांवाचा अत्यंत बलाढ्य हत्ती होता. तेव्हां मगधराजानें त्या हत्तीला माणसें पाठवून, साप चाववून मारविलें; तेव्हां हतबल झालेला धर्मगोप राजा आपली कन्या मगधाधिपास द्यावयास कबूल झाला. येणेंप्रमाणें वाराणसी राज्याविषयीं आणि तेथील ब्राह्मणांविषयीं कथा या ग्रंथांत आल्या आहेत. त्या कथांत आलेलें एकंदर स्वरूप असें आहे कीं वाराणसी हें श्री विश्वेश्वराचें एक पवित्र स्थान होतें. तेथें व्यापार जोराचा होता आणि तें विद्येचें आणि सर्व प्रकारच्या वैभवाचें स्थान होतें.

**वाराह क्षेत्र**—काश्मीर देशांतील एक क्षेत्र (७–६).

**विक्रमपुर**—( ९–३ ) यांतील कथा शोभावतीच्या राजाच्या कथेचीच नक्कल आहे व त्यावरून विक्रमपुर हेंहि नांव काल्पनिक असावें असें दिसतें.

**विद्याधर राष्ट्र**—याविषयीं एक प्रकरण पुढें आहे.

**विजयक्षेत्र**—काश्मीर देशांतील एक क्षेत्र ( ७–५ ).

**विंध्याद्रि**—विद्याधरांच्या आनुषंगानें स्वतंत्र प्रकरणांत माहिती सांपडेल. विंध्यवासिनीचें स्थान बृहत्कथेमध्यें महत्वाचें आहे.

**वीरपुर**—हें एक हिमालयांत विद्याधरनगर होतें (९–२).

**वेतस**—वररुचीचे गुरुबंधु व्याडि व इंद्रदत्त यांचा गांव ( १–२ ).

**शशांकपुर**—कोंकणांतील बंदर. ( निषध पहा. )

**शोभावती**—'कलिंग' पहा.

**श्रावस्ती**—या नगरीचे उल्लेख अनेक; मदनमंचुकालंबकांत येथील प्रसेनजित् राजाचा वृत्तांत आहे ( ६–४ ).

**श्रीकंठ देश**—श्रीकंठ देशाचा उल्लेख लावाणक लंबकांत फलभूमीच्या कथानुरोधानें आलेला आहे. पद्मदेशाचा सोमदत्त ब्राह्मण चिंताक्रांत होऊन पडला असतां त्यानें आकाशवाणी ऐकली कीं आदित्यप्रभ राजाच्या श्रीकंठ देशास तो गेला तर त्याचें कल्याण होईल. तो तेथें जातांना त्याला कित्येक दुर्गम अरण्यें लागलीं. तेथें तो जाऊन पोंचल्यावर यक्षप्रसादानें श्रीमंत झाला.

**शूरपुर**—येथील राजकन्या अनंगरति हिच्या पाणिग्रहणासाठीं चार वर्णांचे चार दाक्षिणात्य खटपटत होते असें दाखविलें आहे.

**सागरपुर**—प्रयाग पहा.

**सिंधु**—या देशाचा राजा गोपाळ विक्रमादित्याचा अंकित होता (१८–३). या देशच्या राजानें पारसीकांस जिंकण्यास उदयनास मदत केली होती.

**सिंहलद्वीप**—याचे उल्लेख पुष्कळच आहेत. सिंहलद्वीपाशीं उदयनपूर्वकालांत देखील निकट संबंध असावा.

**सुरपुर**—येथील राजा सुरसेन याची कन्या विद्याधरी हिचा एका नपुंसकाबरोबर विवाह झाला, पण त्यास पुढें पुरुषत्व आलें अशी कथा आहे.

**सुवर्णद्वीप**—याचे उल्लेख पुष्कळच आहेत, पण स्थलनिश्चय होत नाहीं.

**हर्षपुर**—येथील वैश्य सुवर्णपुराशीं व्यापार करीत (९-४).

**हिरण्यपुर**—काश्मीरामधील एक नगर. तेथें कनकाक्ष नांवाचा राजा होता, त्याला हिरण्याक्ष नांवाचा मुलगा झाला. तो मृगांकलेखा नांवाच्या एका राजकन्येचें वर्णन एका तापसीच्या तोंडून ऐकून फार आतुर झाला [ काश्मीर पहा ]

**हंसद्वीप.**—हंसद्वीपाचा उल्लेख शशांकवतीलंबकांत सुंदरसेन व मंदारवती यांच्या उपकथेच्या अनुरोधानें आलेला आहे. कात्यायनी नांवाची एक प्रव्राजिका सुंदरसेनाला मंदारवती राजकन्येची माहिती देते. ही मंदारवती हंसद्वीपाच्या मंदारदेव राजाची कन्या होती, त्या तापसीनें दिलेलें चित्र पाहून सुंदरसेन मोहित झाला, व तिच्याविषयींच्या आशेनें झुरत चालला. तेव्हां त्याच्या बापानें आपला दूत हंसद्वीपास पाठविला. हा दूत शशांकपुर या महेंद्रादित्याच्या समुद्रावरील नगराला जाऊन तेथून थोड्या दिवसांच्या जलप्रवासानें हंसद्वीपास गेला अशी कथा आहे.

**हर्षवती** ( १२–१० )—येथील एका श्रीमान वैश्याची कन्या ताम्रलिप्तीच्या वैश्यास दिली होती, ती वाईट निघाली. जाराच्या शरीरांत प्रवेश केलेल्या वेताळानें तिचें नाक तोडलें, तेव्हां तिनें नवऱ्यावर आळ घेतला.

**हस्तिनापूर**—येथें एक चमरबळ नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या दायादांनीं विनाकारण त्याजवर स्वारी केली. ज्योतिषांनीं चांगला मुहूर्त नाहीं म्हणून सांगितलें तरी स्वारी केली. त्यांचा पराभव झाला. त्यामुळें चमरबळाला अगणित धन, वाहनें व सेवकवर्ग मिळाला (९–४). प्रतापसेन महाराजाची देवी 'यशोलेखा' देखील त्याच्या हातीं सांपडली. तिला क्षात्रधर्मानें त्यानें जिंकलें असल्यामुळें त्यानें तिला अवरोधवधू केलें व ती देखील तें 'धर्म' समजून त्यास अनुकूल झाली. हस्तिनापुरच्या एका ब्राह्मणाची आई दुष्ट होती आणि त्यामुळें त्यास वैताग येऊन तो जुगारी बनला अशीहि एक कथा आहे ( १२–७ )

### २२६. देशवर्णनांची थोडी चिकित्सा.

२२६. उपयुक्त वर्णनांत जीं नगरें दिलीं आहेत तीं सर्व खरींखुरीं आहेत असें म्हणण्याचा इरादा नाहीं. कथांतील मनोरंजक आशय तोच राखून व्यक्तींचें अगर स्थानांचें नांव भिन्न होतें असें दाखविणाऱ्या कथा देखील आल्या आहेत. पूर्वीपेक्षां अधिक सुकर नांवें घेऊन त्याच कथेनें पुन्हा अवतरण करावयाचें अशी परिस्थिति यांत आहे. तथापि जेव्हां दूरदूरचे उल्लेख येतात तेव्हां त्या देशांचें कांहीं तरी ज्ञान लोकांत होतें हें सहजच सिद्ध होतें आणि या दृष्टीनें कथासरित्सागरांतील संग्रहाचें महत्त्व आहे.

### २२७. विद्याधरांच्या ग्रंथभर उल्लेखांच्या अल्प विवेचनाचें कारण.

२२७. येथें एकंदर विद्याधर संस्कृतीविषयीं लिहितां येत नाहीं. तो एक स्वतंत्र प्रकरणाचा विषय करणें भाग आहे.

### २२८. उल्लेखांचें प्रचंडत्व, उद्धरित उल्लेखांचें अल्पत्व, आणि उद्धरणहेतूंचें विविधत्व.

२२८. बृहत्कथेंतील प्रदेशांविषयींचे उल्लेख म्हणजे न संपणारें भांडार किंबहुना एक सागरच आहे. त्या उल्लेखांतील

एक अल्पांश येथें दिला आहे. तो देतांना कांहीं निरनिराळे हेतु प्रेरक झाले होते व त्यामुळें प्रस्तुत उल्लेखसमुच्चय ग्रंथांतील सर्वप्रकारच्या उल्लेखांचा दर्शक नाहीं. अनेक ग्रामांचीं नांवें संरक्षित झालीं आहेत; दिलेले अनेक ग्रामोल्लेख केवळ काल्पनिक असतील असेंहि वाटतें. तथापि काल्पनिक आहेत असें म्हणण्यास देखील भय वाटतें. नागार्जुनाच्या कालचा राजा चिरायु आणि देश चिरायु यावरून ही एक कथा उदयनाच्या फार अगोदरच्या कालांतली पण स्वकालीन कालस्थलदर्शक उल्लेखांतून मोकळी केलेली अशी वाटते. तथापि या नागार्जुनाची कथा बुद्धोत्तरकालीन नागार्जुनापासूनच बनविली असावी असें वाटत नाहीं. बृहत्कथेच्या बुद्धोत्तरकालीन आवृत्तिकारांनीं प्राचीन प्रसिद्ध वैद्य आणि राजमंत्री असलेला नागार्जुन माध्यमिक संप्रदायाच्या संस्थापकाशीं घोंटाळविला असला पाहिजे. दोंहोंचें ऐक्य शक्य वाटत नाहीं. संप्रदायसंस्थापनासारख्या क्रिया राजमंत्र्याकडून होत नाहींत. शास्त्रज्ञ म्हणून बुद्धपूर्वकालीं प्रसिद्ध असलेल्या नागार्जुनाचें चरित्र बुद्धोत्तर कालीं माध्यमिक संप्रदायाच्या संस्थापकाशीं जोडल्याचें स्पष्ट दिसत आहे. पुढें नागार्जुनाविषयीं लिहावें लागेल म्हणून ही कथा उद्धृत केली आहे. दुसऱ्या अनेक कथा उद्धृत करण्याचीं कारणें आहेत.

## २२९. बृहत्कथाकालीन दक्षिणेचें ज्ञान

२२९. हें नाहीं नाहीं म्हटलें तरी बरेंच दिसत आहे.

दक्षिणेकडील ज्या उल्लेखाकडे आपलें लक्ष वेधतें त्यांपैकीं प्रतिष्ठान, दक्षिणापथ, कुंडिनपूर, महाराष्ट्र, कोंकण, अपरान्त याविषयींच्या उल्लेखांचें सविस्तर अवतरण मागें केलेंच आहे. त्याशिवाय दुसरे उल्लेख म्हटले म्हणजे निषध, अलकापुरी, ताम्रलिप्ती, लंका, सिंहल इत्यादि होत. ताम्रलिप्ता हें एक मोठें व्यापाराचें बंदर दाखविलें आहे, आणि त्याप्रमाणें दुसऱ्याहि अनेक बंदरांचा उल्लेख केलेला आहे. तेथून व्यापारी द्वीपांतरीं जात, असे उल्लेख जागोजाग आहेत. कांचीपुराचा उल्लेख त्या भागाची भरभराट दाखवितो. महाराष्ट्राविषयींचा उल्लेख एकच आहे आणि तो मध्यदेशासारख्या राष्ट्रेतर प्रादेशिक उल्लेखाबरोबर आलेला आहे. त्यावरून महाराष्ट्र हा भूभाग या नात्यानेंच ज्ञात असावा हें स्पष्ट आहे.

कर्कोटक नगरीचा उल्लेख अत्यंत पूर्वेकडील वसाहत दाखवितो आणि राजेलोकांचे चीनपर्यंत वैवाहिक संबंधही दाखविले आहेत.

## २३०. बृहत्कथेंतील ज्ञात आणि संबद्ध समाजाचें क्षेत्र आणि बुद्धपूर्व समाजविस्तार.

२३०. हिंदुसमाज प्रसरणक्षम होता किंवा नव्हता कीं बौद्धसंप्रदाय स्थापन झाल्यानंतरच भारतीय संस्कृति चोंहोंकडे पसरूं लागली, असा प्रश्न बृहत्कथेंत दिसून येणारें विस्तीर्ण कथाक्षेत्र पाहून उत्पन्न होतो. ब्राह्मणांचें परिभ्रमण अगोदरचेंच दिसतें आणि बौद्धांनीं नवीन वाटा पाडल्या नसून संस्कृतीचें ऐक्य स्थापन करण्याची क्रिया झाल्यानंतर ब्राह्मणांनीं रुळविलेल्या वाटेनेंच बौद्ध भिक्षुक मार्ग आक्रमण करते झाले असें दिसतें.

या प्रकरणांत दिलेल्या नकाशावरून बुद्धपूर्वकालीन स्थिति स्पष्ट होत आहे. नकाशांतील सर्वच स्थाननिश्चय बिनचूक आहेत असें नाहीं. तथापि इतर लेखकांनीं केलेल्या स्थाननिश्चयापेक्षां पार्गिटेर यांचे स्थाननिश्चय अधिक बरोबर वाटतात, आणि यामुळें कुरुयुद्धकालीन तुलनेसाठीं त्यांचाच नकाशा दिला आहे.

प्रकरण २७ वें.

# विद्याधरसंस्कृति आणि तिचे खेळ

## २३१. बृहत्कथा आणि विद्याधर.

२३१. बृहत्कथेचें वैशिष्ट्य काय असा जर प्रश्न केला तर दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीपेक्षां तींत आलेल्या विद्याधरांच्या वृत्तांतास प्रामुख्य द्यावें लागेल. विद्याधरकथा अनेक प्रकारें यांत आली आहे आणि सर्व वृत्तांताची जुळणी करावयाची म्हटल्यास विसंगतता आढळून आल्याशिवाय रहाणार नाहीं. विद्याधर हे देवयोनि धरले आहेत त्याप्रमाणेंच सामान्य व्यक्तीदेखील दिसत आहेत. त्यांत प्रजासत्ताक राज्यपद्धतीचे किंबहुना गणराज्याचे अंश आहेत आणि विंध्यपरिसरांत मालवगण होता आणि विद्याधरराज्येंहि होतीं. त्यामुळें मालवांच्या गणराज्याशीं त्यांची संगति जुळविण्याचा थोडासा मोह उत्पन्न होतो.

## २३२. विद्याधरसंस्कृति व जैन संप्रदाय.

२३२. विद्याधर वर्ग आणि जैनसंप्रदायाचें जें कांहीं विलक्षण नातें दिसतें त्यांचें पूर्ण स्पष्टीकरण निदान आज तरी स्पष्टपणें देतां येत नाहीं. जैनग्रंथांत विद्याधरांचे उल्लेख सपाटून येतात, आणि विद्याधरांना देवयोनींत धरलें आहे. ऋषभ तीर्थंकर एका पूर्वजन्मीं विद्याधरांचा राजा होता असें सांगितलें आहे. तीर्थंकराचें विद्याधरजन्माचें नांव 'शतवल' असें दिलें आहे. त्यालाच महावल असेंहि म्हणत.

महाबलानें बलवान विद्याधरांच्या साहाय्यानें पृथ्वीचें राज्य केलें. आखंडाप्रमाणें त्याच्या आज्ञा पाळल्या जात असतां सुंदर स्त्रियांच्या मंडळांत तो आपल्या उद्यानराजींत विहरत असे. वैताढ्य पर्वताच्या गुहांतून त्याच्या जलशांचा प्रतिध्वनि उमटे. ज्याच्या पुढं स्त्रिया आहेत आणि पाठीशीं स्त्रिया आहेत असा तो जणुं काय मूर्त कामदेवच आहे असें वाटे, असें वर्णन हेमचंद्र देत आहे.*

त्या विद्याधर राजाचा देश 'पश्चिमविदेह' आणि प्रांत गंधिलावती असा दिला आहे. आणि हा देश "वैताढ्य" नांवाच्या पर्वतावर होता म्हणून सांगितलें आहे. यांतच 'गांधार' होता आणि 'गंधसंमृद्धक' नांवाचें नगर होतें. असें दिलें आहे.†

या वर्णनांतील वैताढ्य नांवानें उल्लेखिलेला पर्वत विंध्य पर्वतच होय. कारण भारताचा दक्षिण आणि उत्तर यांच्या मध्यें तो मापनयष्टीसारखा आहे असें सांगितलें आहे ( ३. १७६ ). या पर्वताच्या दक्षिणेच्या उतरणीवर विद्याधरांचीं पन्नास नगरें आहेत आणि उत्तरेकडच्या बाजूस विद्याधरांचीं पन्नास नगरें आहेत. दक्षिणेकडील नगरें नमी राजाचीं आहेत आणि उत्तरेकडील विनमि राजाचीं आहेत.

याशिवाय १६ शहरें विद्यांचींच होतीं. गौरी, गांधारी, मानवी वगैरे विद्यांचीं नांवें देऊन तत्सदृश नगरनामें दिलीं आहेत. त्यांत मातंगीविद्या आणि श्वपाकीविद्या देखील दिल्या आहेत. त्यावरून 'मातंग' ( मांग ) आणि 'श्वपाक' ह्या कनिष्ट म्हणून समजल्या जाणाऱ्या जाती प्राचीन विद्याधरसंस्कृतीच्या अंशभाक् आहेत काय किंवा त्या तशा नसतांना त्या आत्मोन्नतीपर प्रयत्न व्हावा यासाठीं किंवा समाजांत अस्वास्थ्य उत्पन्न करण्यासाठीं जैनाचार्यांनें त्यांना विद्याधरता दिली काय असे प्रश्न मनांत येतात.

## २३३. विद्याधर आणि विंध्यपर्वत.

२३३. नमि आणि विनमि यांनीं विद्याधरनगरें स्थापन कोणत्या निमित्तामुळें केलीं याविषयीं कथा दिलेली आहे.

भरतादि पुत्रांस ऋषभदेवानें भूमि दिली. त्यावेळेस ऋषभदेवाच्याच कामासाठीं नमिविनमि बाहेरदेशीं गेले असल्यामुळें त्यांना भूमि मिळाली नाहीं म्हणून ते तेव्हां रुसले, तेव्हां त्यांना वैताढ्य पर्वतावर नगरें स्थापन करण्यास परवानगी मिळाली असें सांगून ज्याप्रमाणें बृहत्कथेंत उदयनाचा दिग्विजय वर्णन केला आहे त्याप्रमाणें त्रिषष्टिशलाकेंत भरताचा दिग्विजय वर्णन केला आहे. प्रत्येक पौराणिक कथेची जैन आवृत्ति बनवितांना कांहींतरी विकृति व्हावयाचीच. त्याप्रमाणें जैनांच्या भारतदिग्विजयांत केलें आहे. भरत दौष्यंति हा दिग्विजयी पुरुष होता अशा अर्थाचे उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत आणि पुराणांत व भारतांत आलेच आहेत. हेमचंद्रानें आपल्या त्रिषष्टिशलाकेंत जें वर्णन दिलें आहे, त्यांत त्याला विद्याधरविजेता बनविलें आहे, आणि जीं विद्याधर नगरें त्यानें जिंकिलीं तीं वैताढ्यपर्वतावर म्हणजे विंध्याद्रीवर होतीं असें वर्णन त्यांत आहे व ऋषभनाथाची सर्व पृथ्वी होती ती त्यानें भरतादींस वांटून दिली असेंहि सांगितलें आहे. जो जो कोणी थोर पुरुष असेल, तो जैनसंप्रदायांतील दुय्यम ऐतिहासिक व्यक्ति

---

* त्रिषष्टिशलाकेचें भाषांतर पृ. ३४. डॉ. मिस जानसनकृत ( गा. ओ. सीरीज ).

† त्रिषष्टिशलाकापुरुषचरित्र १. २३९. (गा. ओ. सीरीज व्हा. ५१.)

बनवावयाची या जैन सांप्रदायिक नियमाप्रमाणें भरताला जैन तीर्थंकराचा वारस बनविलें आहे. तुम्ही ब्राह्मणी हिंदु ज्याला थोर मानतां, तो केवळ आमच्या एका तीर्थंकराचा वारस असल्यामुळेंच मोठा होता असें जैन ग्रंथकार भासवीत आहेत.

जैन आणि विद्याधर यांच्यासंबंधाचें परीक्षण करण्या-पूर्वी विद्याधरांविषयीं दुसरी कांहीं माहिती मांडली पाहिजे.

**२३४. विद्याधर आणि पिशाच.**

२३४. विद्याधर आणि पिशाच यांच्या योनी भिन्न आहेत असेंच संस्कृत ग्रंथकार सांगत आहेत. ते गंधर्वांहून देखील निराळेच आहेत.

**विद्याधरास्तु विद्याथ्राः कामरूपाः कलाविदः**
**जीमूतवाहनाद्यास्ते गंधर्वेभ्योऽवराः स्मृताः**

हा श्लोक केशवकृत कल्पद्रुकोशांत आला आहे *

यावरून आपलें रूप बदलण्यांत हे हुशार होते, आणि अनेक कलांनीं युक्त होते. "जीमूतवाहन" हा एक विद्याधर होता, आणि जीमूतवाहनाची कथा म्हणून जी पुढें जैनकथा म्हणून प्रसिद्ध झाली, ती मूळतः "विद्याधरीय" असली पाहिजे अशी कल्पना उत्पन्न होते.

विद्याधराहून पिशाच भिन्न होते. पिशाच दुष्टयोनि म्हणून लोकांत प्रसिद्ध होते. त्यांना दिलेल्या विशेषणांत त्यांच्या कांहीं पोटजातींचा उल्लेख असावा असें वाटतें.

**सूमास्या वानरास्याश्च पिशाचा नाम ते गणाः**
**दुष्पूरणा विशादाश्च ज्वलना कुंभमात्रकाः†**

पिशाचांचीं अनेक प्रकारचीं वर्णनें नाट्यशास्त्रांत दिलीं आहेत त्यावरून असें वाटतें कीं रंगभूमीवर पिशाचांचीं अक्राळविक्राळ स्वरूपें आणतांना अनेक जाती दाखविण्यांत येत असाव्यात.

**अंगारकाः प्रतुंडश्च उपवीरा उलूखला**
**अकर्णाश्चक्रखंडाश्च पांसवः पात्रपाणयः**
**पिशिताशन पैशाचौ पलादश्च पलादनः**
**आशार आशरोपिश्चादाशिरः कुणपोश्रयः**
**अस्त्रपः कर्वरोपिस्यात् क्रव्यादो जातुधानकः**
**क्रव्याश्चापि पिशाचश्च कापिशियोऽस्पमातरि**

( शारदातनयकृत भावप्रकाशन—नवमाधिकार ६०–६१)

विद्याधराचीच भाषा पैशाची असावी काय? ती असावी याप्रकारच्या विधानाला आक्षेपक म्हणून नाट्यशास्त्रांतील पुरावा आणतां येण्याजोगा आहे. पण तो पुरावा वस्तुतः विद्याधरांचें पिशाचांशीं नातें लावण्यास विरोधक होत नाहीं. विद्याधरींची भाषा संस्कृत असावी असें कांहीं नाट्यवेदपंडित सांगत आहेत*

**विद्याधरीवर्षवरमहादेवीविलासिनाम्**
**योगिनां योगिनीनांच संस्कृतं संप्रयोजयेत्**

विद्याधरींच्या तोंडीं संस्कृत वापरावी या आदेशा-वरून विद्याधरांची भाषा पैशाची नव्हती असें मात्र म्हणतां येणार नाहीं. असें शक्य आहे कीं इराणी लोकां-पैकीं जो उच्चवर्ग असेल तो विद्याधर या नांवानें प्रसिद्ध असेल आणि त्याच्या लष्करांतील सामान्य लोकांस पिशाच म्हणत असतील. इराणी लोक स्वसदृश पण अन्यजाती-यांची सेना घेऊन हिंदुस्थानांत आल्यानंतर संस्कृत भाषेचा स्वीकार करते झाले असावेत.

**२३५. पैशाची ही देशभाषा होती काय?**

२३५. पिशाच ही केवळ योनि असती तर पैशाची ही जातिभाषा ठरली असती, देशभाषा ठरली नसती. पण ती देशभाषा म्हणून मान्य झाली त्यावरून पिशाच हे प्रदेश-विशिष्ट जाति होते हें स्पष्ट होत आहे. पैशाची ही देश-भाषा समजली जाति होते यावद्दल पुरावा उत्तरकालीन नाट्यग्रंथांत देखील अवशिष्ट आहे.

**भाषा स्यात्सप्तधा देश्या विभाषाऽपिच सप्तधा**
**मागध्यवंतिका प्राच्या शौरसेन्या च मागधी**
**पैशाची दाक्षिणात्या च तत्तद्देशेषु भाष्यते***

पैशाची भाषा ही देशभाषा आहे तथापि ती बोलणारे लोक सामाजिक दृष्ट्या नीचत्व पावले होते या गोष्टीची देखील आठवण नाट्यशास्त्रांत संरक्षित झाली आहे.†

**पिशाचात्यंतनीचादौ पैशाचं मागधं तथा**
**यद्देश्यं नीचपात्रं स्यात्तद्देश्यं तस्य भाषितम्**

बृहत्कथा ज्या भूभागावर इतर दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथा-पेक्षां अधिक प्रकाश पाडते असा प्रदेश म्हटला म्हणजे विंध्य पर्वत होय. येथें मोठें अरण्य होतें. तेथें भिल्लशब्दादि रानटी जातींची वसती होती. या जाती देखील युद्धोपयोगी होत. तेथील लोक क्रूर व नरबलि देणारे होते अशा तऱ्हेची कल्पना त्यांत अनेक प्रसंगीं येऊन गेली आहेत. येथेंच पिशाचांची वसती होती असें बृहत्कथा सांगत आहे तर विंध्याद्रीच्या दोन्ही बाजूंनीं उतरणीवर विद्याधरांचीं प्राचीन काळीं अनेक नगरें होतीं अशा तऱ्हेची साक्ष हेमचंद्राची त्रेसष्टिशलाका देऊं पहात आहे. विद्याधरांची वसती जेथें तेथेंच पिशाचांची वसती होती अशा तऱ्हेचे

* केशवकृत कल्पद्रुकोश पृ. ३७२ ( गा. ओ. सी. ) षोडशप्रकांड २२. † कल्पद्रुकोश १६. ४२-४३.

* भावप्रकाशन प्रथमाधिकार पृ. १३ ( गा. ओ. सी. )
† भावप्रकाशन नवमाधिकार पृ.–२७० (गा. ओ. सी.)

उल्लेख स्पष्ट आहेत. त्यावरून अशी एक शंका उत्पन्न होते कीं पिशाच हा एक विद्याधरांशीं नातें असलेला एखादा वर्ग नसेल ना? ज्यांस पर्शियन म्हणत असे लोक थोडे होते. त्यांचें इतरांवर राज्य स्थापन झाल्यानंतर ते त्यांना नीट वागवीत, आपल्या फौजेंत घेत अशी माहिती ग्रीक इतिहासकार सांगतच आहेत. पैशाची ही इराणी लोकांबरोबर आलेल्या त्यांच्या अन्यदेशीय आश्रितांची भाषा असावी असें वाटतें. तथापि आश्वलायन श्रौतसूत्रांतील (१०. ७.) पारप्लवाख्यानांत पिशाच विद्यावेद उल्लेखिला आहे, हें विसरतां कामा नये.

## २३६. पैशाची आणि चूलिका पैशाचिका.

२३६. हेमचंद्रानें पैशाचीचे हे दोन भेद सांगितले आहेत तथापि चूलिका पैशाचिकेचे दोन भेद पुन्हा वर्णिले आहेत. यापैकीं एक भेद वररुचीच्या पैशाचीशीं अधिक जुळता आहे व दुसरा भेद पूर्वेकडील वैयाकरणांच्या म्हणजे रामशर्मा व मार्कंडेय यांनीं उद्धृत केलेल्या पैशाचीशीं अधिक जुळता आहे व यासाठीं पैशाचीचे तीन प्रकार आहेत असें धरलें पाहिजे (जॉर्ज ग्रीअरसन् इंडि. अँ. जानेवारी १९२३).

वरील सर्व विवेचनाचा आढावा घेतां बुद्धपूर्वकालीन महाराष्ट्राची स्थिति पुढीलप्रमाणें देतां येईल. महाराष्ट्राच्या उत्तरेस इराणी किंवा तत्सम लोकांची (कदाचित शकांची) सत्ता स्थापित झाली; ती बुद्धाच्या जीवनकालापासून शातवाहनांच्या कालांत देखील चालू असावी. कदाचित् इराणशीं सातत्य तुटल्यामुळें प्रथम पूर्वी सुसंस्कृत असलेले लोक पुढें जंगली झाले असवेत, आणि त्यांच्या जंगली आयुष्यक्रमामुळेंच त्यांच्या भाषेस भूतभाषा हें नांव प्राप्त झालें असावें. भूतभाषा हे शब्द राजशेखरानें व त्याप्रमाणेंच बाणभट्टानेंही वापरले आहेत, व यामुळें भूतभाषा या शब्दानें व्यक्त झालेली भाषा एकच लोकांची होती कीं भिन्न लोकांची होती, यासंबंधानें उत्पन्न झालेलीं मतें बरींच भिन्न आहेत.

## २३७. पारशांच्या आगमनाचें सातत्य.

२३७. ज्याप्रमाणें दरायसच्या पूर्वी पारसीकांचें आगमन देशांत होत होतें आणि तें पौराणिक काळापासून होत होतें त्याप्रमाणेंच तें सस्सन साम्राज्य चालू असतां देखील चालू असलें पाहिजे. त्याच्या साम्राज्यविनाशानंतर त्याच्या वसाहतींत भरती झाली असेल. पण त्यांच्या आगमनाचें सातत्य होतें यांत शंका नाहीं.

पारशांची वसाहत त्यांच्या स्वातंत्र्यनाशाच्या काळापासून सुरू झाली असें आजचें प्रचलित मत आमच्या मतें बरोबर नाहीं. पारशांचें आगमन इ. स. ७०० च्या पुढचें आहे अशा समजुतीच्या सत्यतेविषयीं संशय बऱ्याच लोकांनीं पूर्वी संशय व्यक्त केलाच आहे. उदाहरणार्थ वेस्टरगार्ड (झेंदावेस्ता भाग १ ला) असें समजतात कीं पारसीकांचा आणि हिंदुस्थानचा संबंध पूर्वापार आहे. पारसीकांची पश्चिम किनाऱ्यावर वस्ती मुख्यत्वेंकरून स्वातंत्र्यनाशाकाळापूर्वींची आणि व्यापारी निमित्तानें झालेली असणेंच अधिक शक्य आहे. पारसीकांना रघूच्या विजयमार्गावर कालिदासानें आणून ठेविलें आहे. पारसीकांकडून त्या विशिष्ट प्रदेशाची व्याप्ति ही गोष्ट रघुकालीन सत्य नसलें तरी उदयनकालीन सत्य आहे खचित. कालिदासानें जरी उदयनाच्या स्वारीचें वर्णन घेतलें असलें तरी पारसीकांनीं हिंदुस्थानाच्या कांहीं भागांत वसती केली होती याची ऐतिहासिक सत्यता नाहींशी होत नाहीं. इराण व भारत यांच्या परस्परसंबंधाचे उल्लेख दोघांच्याहि पौराणिक काळांत आहेत, तसेच ऐतिहासिक काळांतले देखील आहेत. जोदिराण्याच्या काळांतच जर पारसीक प्रथम आले असते तर त्यांनीं जातिरीतिवर्णनात्मक संस्कृतमध्यें कवित्व कसें केलें असतें? अगोदरच्या वसाहतींतील कोणीतरी श्लोकरूपानें नवीन येणाऱ्या लोंढ्याची ओळख करून देण्यासाठीं श्लोकरचना केली असें दिसतें.

## २३८. विद्याधरांचें देवयोनित्व.

२३८. इराणी वगैरे लोकांचे जे देव असतील त्या लोकांच्या देवांचें लोकांबरोबर भारतांत आगमन झाल्यावर त्यांचें पूजन देखील सुरू झालें असेल. सामान्य भारतीय हा देवांच्या बाबतींत अत्यंत निःपक्षपाती आहे. जो नवसाला पावेल तो देव. आणि तो त्याच्या दृष्टीनें पूजनार्ह आहे. त्यास तुम्ही भूत म्हणा किंवा वेताळ म्हणा. एका काळीं लोकांत प्रसिद्ध झालेले देव त्या लोकांचें प्रामुख्य नष्ट झाल्यावर देवयोनीच्या रूपांत जाणें अत्यंत स्वाभाविक आहे. पिशाचांना देखील देवयोनींतच कोशकार समाविष्ट करीत आहे.

**विद्याधराप्सरोयक्षरक्षोगंधर्वकिन्नराः**
**पिशाचो गुह्यकस्सिद्धो भूतोऽमी देवयोनयः**

हा अमरकोशांतील श्लोक वाचकवर्गांपैकीं बऱ्याच जणांनीं लहानपणीं घोकला असेल. तथापि देव आणि उल्लेखित देवयोनी यांचा संबंध काय आहे अगर होता याची कल्पना फारच थोड्यांस असेल.

धर्मकल्पनांच्या पाश्चात्य अभ्यासकांनीं विद्याधरांकडे फारसें लक्ष दिलें नाहीं आणि भारतीय अभ्यासकांनींहि दिलेलें नाहीं. समाजांतील उच्च वर्गाचा धर्म तेवढा अभ्यासला जातो. सामान्यांच्या धर्मकल्पनांच्या अभ्यासाकडे लक्ष कोणी दिलेलें नाहीं; तथापि मानवी विचारविकासाच्या दृष्टीनें सामान्यांच्याच धर्मकल्पनांचें महत्त्व अधिक असतें. धर्मकल्पनामध्यें देवांचे प्रकार उत्पन्न कसे झाले, देवांमध्यें वरचा आणि

खालचा दर्जा कसा उत्पन्न झाला या गोष्टीचा विचार आपणांस हवा आहे. कारण त्या सर्व प्रकारांमध्यें कांहीं तरी विशिष्ट सामाजिक इतिहास गढला असतो.

## २३९. कलांचें आगमन, इराणी विजय.

२३९. इराणी लोकांबरोबर अनेक विद्या आणि कला आल्या असाव्यात अशी कल्पना होते.

इराणी महत्वासंबंधानें नवीन चळवळ उत्पन्न करणारा लेखक डॉ. स्पूनर होय. अशोकाच्या शासनामध्यें डॅरीअसच्या शासनांचा प्रतिध्वनि उमटतो तर एकंदर मौर्यांच्या राज्यव्यवहारावर इराणी कलेचा व व्यवहाराचा परिणाम झाला आहे काय इत्यादि प्रश्न उत्पन्न करून पाटलिपुत्र येथील उत्खननाचे अधिकारी डॉ. स्पूनर यांनीं तो परिणाम तसा झाला आहे असें मांडलें आहे व हिंदुस्तान एकंदर इराणी सत्तेचा परिणाम पुष्कळच पावलें असें दाखविलें आहे. जी खरोष्ठी लिपी पंजाबांत वापरली गेली, ती आरामेइक कारकुनांनीं आणली. हे कारकून हिंदुस्थानांत डारियस या हखामणी सम्राटानें आणिले असें मांडलें आहे. (चित्रांक ३१ पहा). मथुरा येथील सिंहशीर्षकाची कल्पना देखील डारीयसच्या कबरीवरून तयार झाली, हिंदुस्थानांतील बरीच बौद्धकला ही खरोखर परकीय आहे असें प्रो. ग्रूनवेडेल यांचें मत झालेंच होतें. तें डॉ. स्पूनर यांनीं स्वीकारलें आहे. डॉ. स्पूनर यांनीं परकीय परिणाम तो इराणच्या साम्राज्याचाच परिणाम आहे असें आग्रहानें म्हटलें आहे.

महाभारतांतील असुर मयाची कथा घेऊन 'असुर मय' हा अहुर मज्दच होय असें म्हटलें आहे. मज्द ही मेधा शब्दाची इराणी प्रतिकृति होय असें स्पूनर सांगत आहे.

मौर्य हे इराणी होते, व अवेस्तामध्यें मौर्य हें नाम आहे व ते झरतुष्ट्रीय धर्माचे होते अशा तऱ्हेची मांडणी स्पूनरनें केली आहे. शहर मर्व, मेरू पर्वत आणि मौर्य शब्द हे सर्व एकाच कारणामुळें निर्माण झाले आहेत असें गृहीत धरून मौर्यांची परदेशीयता डॉ. स्पूनर स्थापित करूं पहात आहे. मौर्यांचा धंदा मूर्ति बनविण्याचा व विकण्याचा होता असेंहि सांगत आहेत.* विद्याधरांविषयीं गंभीरपणें विचार स्पूनर यांनीं देखील केलेला नाहीं.

स्पूनरच्या प्रयत्नाचें महत्व सत्यशोधनापेक्षां सूचनात्मक अधिक झालें असें म्हणतां येईल.

## २४०. विद्याधर राष्ट्रें, विद्याधर शब्द.

२४०. बृहत्कथेंतील मुख्य विषय विद्याधरसंस्कृति हाच आहे असें धरण्यास हरकत नाहीं.

विद्याधरसंस्कृति हे शब्द वापरण्याचें मुख्य कारण असें आहे कीं एक निराळी संस्कृति येथें आली आणि तिनें देश व्यापिला आणि तिनें वाङ्मयावर बराच काळ परिणाम केला. विद्याधरकथांचा धार्मिक कल्पनांवर फारसा परिणाम झाला नाहीं तथापि वाङ्मयांत अद्भुताचा शिरकाव झाला. देव, असुर या अतिमानुष कोटी होत्या. मानवी आयुष्यक्रमापेक्षां कांहीं तरी अपूर्व आणि अद्भुत असें वर्णावयाचें झालें तर देव- आणि असुर या जराशा जास्त उच्च आणि दूरतर भासत; तथापि विद्याधरकल्पना अशी होती कीं कांहीं अंशीं मानुष तर कांहीं अंशीं दैवी शक्तींनीं युक्त अशी ही कोटी होती. मनुष्यास विद्याधरत्व प्राप्त होई. मनुष्यास या योनींत प्रवेश कधीं मृत्यूनें होई तर कधीं मृत्यूशिवाय होई.

विद्याधर हे जणूं काय देवस्वरूपी अद्भुत शक्तीचे लोक आहेत अशी कल्पना जरी उदयनकालीन कथा सांगणाऱ्या कुशीलवांची होती, आणि ती कल्पना जरी गुणाढ्याच्या कालांत पक्की झाली होती तरी त्यांचें मानवी स्वरूप त्यांच्या राज्याची घटना इत्यादि गोष्टींसंबंधीं उल्लेख शिल्लक राहिले आहेत. सूर्यप्रभानें अनेक विद्याधरांची कत्तल केली. त्यांचा पुढारी दामोदर याला जरी विष्णूनें सोडविलें तरी एकंदर त्यांची दाणादाणच झाली, असें सूर्यप्रभलंबकांत दाखविलें आहे. विद्याधरांचें राज्य हें गणराज्य असावें असें दिसतें. जे विद्याधर नव्हते ते विद्याधरांचे अधिपति झालेले दिसतात. यावरून असें दिसतें कीं विद्याधरांचा समाज परजनसंग्राहक होता आणि त्यांत नवीन प्रविष्ट झालेल्या पुरुषास त्यांचें आधिपत्य देखील मिळूं शके.

या संघाच्या देवता.

'जिन' नांवाचा संघ एकाकाळीं देवसंघ मानला जात असावा; आरब पुढें या 'जिन' देवसंघास भुतें मानूं लागले. तेच 'जिन' विद्याधर असावेत. "विद्याधर" हें खरोखर पश्चिम एशियाच्या 'जिन' कल्पनेचें भाषांतर होय. "जिन" नांवाची जी पिशाचरूपी योनि इराणी व आरबलोक अस्तित्वांत आहे असें समजतात त्या योनीच्या जादुगारी संबंधानें किंवा विद्याधरत्वासंबंधानें कल्पना पिशाच समजल्या जाणाऱ्या इराणीलोकांबरोबर भारतांत आली असावी. एकदां शब्द भाषांतरित होऊन आला असावा आणि नंतर मूळस्वरूपांत आला असावा आणि येणें-प्रमाणें दोन शब्द प्रचलित झाल्यानंतर "जिन" कल्पनेचीं 'विद्याधर' आणि 'जिन' (तीर्थंकर) हीं रूपें स्वतंत्रपणें संवृद्ध होऊन पुढें जिन आणि विद्याधर या दोन्ही कल्पना भिन्न स्वरूपांत विस्तार पावल्या असाव्यात. बृहत्कथेंत जैन संप्रदायाचें स्थान तक्षशिला म्हणजे पश्चिम एशियाच्या प्रवेशद्वारावर ही वसाहत दाखविली आहे.

* Zorastrian Period of Indian History, by Dr. Spooner JRAS. 1915.

विद्याधरांचीं जीं अनेक स्थानें होतीं त्यांचीं पुढील नांवें बृहत्कथेंत शिल्लक राहिलीं आहेत. तीं नांवें व तेथील कार्यकर्ता विद्याधर हे पुढें दिले आहेत.

**कैलास पर्वत**—येथें हेमप्रभ नांवाच्या विद्याधराचा उल्लेख आला आहे. ( ७-१ )

**मुक्तापुर**—येथें मुक्तासेन नांवाचा विद्याधर होता. (७-८)

**वज्रकूट**—वज्रधर ( ८-१ )

**कांचनाभ**—पद्मकूट ( १०-३ )

**वैदूर्यशृंग**—पद्मवेग, वज्रवेग, वज्रदंष्ट्र ( १०-९ )

**त्रिघंटा**—कौशिक.

**पुष्करावती**—विंध्यपट.

**वाराणसी**—रागभंजन.

**कांचनशृंग**—स्फटिकयश.

**कांचनपुरी**—जीमूतकेतु, जीमूत वाहन, मंदरदेव, गौरीमुंठ इत्यादि विद्याधर यांत उल्लेखिले आहेत.

**आषाढपुर**—मानसवेग. हा विद्याधर बरीच चळवळ करतांना दाखविला आहे.

**कनकपुरी**—लं. ५. १-३

इत्यादि अनेक विद्याधर संस्थानांचे या ग्रंथांत उल्लेख आले आहेत. एवंच 'जिन हें नांव चमत्कार करणाऱ्या देवयोनींविषयीं सेमेटिक लोकांत अगोदर प्रचलित असून त्यांच्या उपासनेचा प्रथम पूर्व एशियांत सर्वत्र प्रसार झाला असेल. जिन शब्दाचें विद्याधर हें संस्कृतीकरण असून तें प्रथम जिनास आणि नंतर त्यांच्या पूजकांस लागलें असावें. जे जिनपूजक अगर विद्याधरपूजक इकडे आले ते इराणी शक किंवा त्याहून निराळे लोक असतील आणि त्यांनीं हिंदुस्थानांत गणराज्यें स्थापिलीं असतील असा इतिहास असावा असें वाटतें.

वि द्या ध रीं शीं वि वा ह.

कैकेय इत्यादि प्राश्चात्य लोकांचा जेव्हां संसर्ग आला तेव्हां स्वाभाविकपणें एकमेकांशीं विवाह करण्यांत थोडासा संदेह असावयाचाच. त्याप्रमाणें या काळांत देखील होता असें दिसतें. एका दिव्य कन्येनें नरवाहनास मदनमंचुकेपासून चोरून नेलें आणि ती त्यापाशीं गांधर्व विधीनें लग्न करती झाली. तेव्हां तिचा स्वीकार करणारा नरवाहन तिच्याविषयीं संशय व्यक्त करता झाला "तूं अन्यजातीय आहेस, मजेपुरता माझा स्वीकार करून मी संकटांत सांपडलों म्हणजे मात्र मला सोडून तूं अन्यत्र जाणार नाहींस ना?" अशा तऱ्हेची पृच्छा करण्यासाठीं तिला एका कोल्हीची गोष्ट सांगितली. ती कोल्ही मंत्रानें हत्तीण झाली. तेव्हां हत्तीशीं रममाण झाली. पण जेव्हां तो हत्ती चिखलांत रुतला तेव्हां ही हत्तीण त्याला सोडून गेली. पण खरी हत्तीण त्याला सोडविती झाली. ही कथा ऐकून ललितलोचना त्याचें शंकानिवारण करती झाली कीं "मी खरी विद्याधरकन्या नव्हे तर मी एक ब्राह्मण योगिनीपाशीं लग्न करून पुढें एका विद्याधरपुराचा संस्थापक बनला त्याची मी मुलगी आहें." म्हणजे तिच्या मतें खऱ्या विद्याधरकन्या अविश्वास्य होत.

ब्राह्मणांपैकीं मोठे अधिकारी किंवा राजे होत. त्यांचीं अपत्यें देखील पुन्हां क्षत्रियकल्प वर्गांतच समाविष्ट होत, याचें हें कथावाङ्मयांतील उदाहरण होय. ऐतिहासिक वाङ्मयांत उदाहरणें अनेक आहेत. त्याचा आढावा पुढें घेण्यांत येईल.



**चित्रांक ३०. प्राचीन महाराष्ट्रांतील एक भालाईत. शातवाहनकाल. भाजें येथील लेण्यांतलें भित्तिचित्र.**

# प्रकरण २८ वें.

## मगांचा भारतीय इतिहास.

### २४१. पुराणकालीन आणि वेदकालीन अवैदिक समजला जाणारा समाज खरोखर वैदिक समाजाचा घटक आहे.

२४१. विद्याधरसंस्कृति या नांवानें जो परकीयांचा भारतीयांवर परिणाम वर्णन केला तो परिणाम इराणी लोकांचाच आहे किंवा नाहीं याविषयीं संशय असला तरी मगांचा भारतीय इतिहास लक्षांत घेतला असतां तो गांधारापलीकडील संस्कृतीचा एक परिणाम आहे, याविषयीं संशय नाहीं. पौराणिकांनीं उल्लेखिलेलें मगांचें आगमन इराणी लोकांच्या अगर शकांच्या आक्रमणाबरोबर झालें एवढाच प्रश्न आहे.

प्राचीन कालाचा सामाजिक इतिहास देतांना शकांचा व मगांचा उल्लेख प्रामुख्यानें केला पाहिजे* आणि त्यांचा इतिहास समजून घेतांना शकांच्या वेदपूर्व संस्कृतीचें स्वरूप जितकें जाणतां येईल तितकें जाणलें पाहिजे.

शकांचें आगमन वेदोत्तर कालीं झालें असेलच पण त्यांची कांहीं वसती वेदपूर्वकालीन असली पाहिजे. शक आले ते मगांबरोबर आपली उपासना घेऊन आले आणि जेव्हां वैदिक आर्य आले तेव्हां त्यांना शक व मग हे अगोदरच आलेले लोक भिन्न संस्कृतीचे वाटले ही गोष्ट मी वारंवार अनेक ठिकाणीं सांगितली आहे तरी त्या विधानांतर्गत पुरावा पुन्हां संक्षेपरूपानें येथें सांगतों.

'मग' केवळ वैदिक संस्कृतीचे शत्रु नव्हते तर ते अगोदर जरी भिन्न असले तरी मागाहून त्या संस्कृतीचे घटक झाले, व त्या दृष्टीनें पहातां वैदिक संस्कृतीची घटना ज्या लोकांनीं केली त्यांतील अत्यंत प्राचीन लोक म्हणजे मग आणि शक हेच असावेत. कारण हेच अत्यंत पूर्वेकडील म्हणजे मगधांतील लोक आहेत.

विशिष्ट दिशेनें जेव्हां लोक येतात आणि एकामागून एक स्वाऱ्या होऊं लागतात तेव्हां अगोदर आलेल्या लोकांचें कांहीं अंशीं उच्चाटण होऊन उच्चाटन झालेले लोक पुढें ढकलले जातात. हिंदुस्थानांत आगमनें पश्चिमेकडून झालीं असें मानलें तर प्राचीनतर आगमन शोधण्यासाठीं पूर्वेकडे वसती करणाऱ्या लोकांची यादी घेऊन त्यांत अत्यंत पूर्वेकडील लोकांचेंच आगमन आद्यागमन मानावें लागतें. त्याप्रमाणेंच शकांचें आणि मगांचें आगमन अत्यंत प्राचीन काळीं झालें कीं नाहीं हा विचार आपणांस कर्तव्य आहे.

### २४१ अ. कीकट आणि मगंद.

२४१ अ. मगांचें अस्तित्व फार प्राचीन आहे असा पुरावा प्रत्यक्ष वेदांत आहे.

(१) कीकटांविषयीं विश्वामित्र बोलत असतां "हे मगंद इंद्रा तुला पायस देत नाहींत तर त्यांचें धन (वेद) लुटून तूं आम्हांला दे" अशा अर्थाची प्रार्थना विश्वामित्रानें (ऋ० ३. ५३. १४.) केली आहे.

(२) यजुर्वेदांत मागधांचा उल्लेख पुरुषमेधांत येतो. बली म्हणून त्यांचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्याच्या अगोदर बराच काल मगध हा शब्द असला पाहिजे, आणि त्याच्याहि अगोदर मगांचा निवास त्या देशांत झाला असला पाहिजे. म्हणजे मगांचें नांव देशास मिळणें आणि पुढें त्या देशाचें नांव तेथील लोकांस मिळणें ही क्रियापरंपरा यजुर्वेदाच्या अगोदर झाली होती. मगधांचें अगोदरचें नांव 'कीकट' होतें ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे.

मगधांचा ऋग्वेदांत उल्लेख 'मगंद' या स्वरूपांत आहे, हें वर सांगितलेंच आहे. मगांस देणारे ते मगंद. मगध या शब्दाची व्युत्पत्ति मगांस धारण करतो तो मगध अशी पतंजलीनें दिली आहे; आणि ती देतांना मग म्हणजे पाप असा अर्थ पतंजली देतो. त्या अर्थास आक्षेप घेऊन 'मग' म्हणजे शकांचे आचार्य आणि मगध म्हणजे मगांचा देश असाच अर्थ राजवाडे जुन्या लोकशिक्षणांतील एका अंकांत सुचवितात. पतंजलीची व्युत्पत्ति जरा चुकीची असावी तरी त्या चुकीच्या व्युत्पत्तीची ऐतिहासिक उपयुक्तता आहे. ज्याअर्थी मग या शब्दाचा अर्थ पाप असा पतंजली करीत आहे त्या अर्थी 'मगध' देशास आक्षेपार्हतेची आठवण पतंजलीच्या काळापर्यंत म्हणजे पुष्यमित्र शुंग याच्या कालापर्यंत चालू होती हें स्पष्ट आहे. मगधांतील संस्कृतीच्या भिन्नत्वाची जाणीव कुरुयुद्धाच्या कवींनीं जरासंधाला असुर म्हणून संरक्षिली आहे. वैदिक वाङ्मयाचे लोक पूर्वीच्या थोड्याशा भिन्न संस्कृतीच्या लोकांत पाचरेसारखे शिरले

* ज्ञानकोश बुद्धपूर्व जग पृ. ६२ व पुढें

होते. पंजाबपासून मगधापर्यंत भाग त्यांनीं आपल्या सत्ते-खालीं आणला. त्या काळचें स्मारक एक वाक्य अथर्व वेदांत आहे. गंधारी आणि मूजवंत या उत्तरेकडील आणि अंग आणि मगध या पश्चिमेकडील लोकांमध्यें ताप जावो अशी इच्छा प्रगट केली आहे.

## २४१ आ. वैदिक आणि 'मागध' यांचा कुरु-युद्धकालीन संबंध.

२४१ आ. कुरुयुद्धकालीं मगधराज्य बलवान् होतें व त्याकडे कौरव खरोखर मत्सर बुद्धीनें पहात होते. विदर्भराज्य देखील मगधाचें मांडलिक बनलें होतें. मगधराज्य परकीय वाटत होतें आणि त्याच्यामध्यें जाऊन पश्चिमेकडील सरदार वर्गानें राज्य कमावावें अशीच स्थिति खुद्द जरासंधाच्या काळीं असावी. कर्णास अंगाचें राज्य मिळालें तें त्याच्या पराक्रमानेंच त्यानें मिळविलें आणि दुर्योधनासाठीं दिग्विजय करीत असतां त्यानें जरासंधावरहि मात केली होती आणि तीबद्दल कर्णास शाबासकी द्यावयाची ती भीष्मानें मरते वेळेस कर्ण जेव्हां त्यास भेटावयास आला तेव्हां त्याला दिली. तिची आठवण आपल्या मोरोपतांनीं—

**दिग्विजयाचीं केलीं सत्या त्वां वीरकुंजरा संधा**
**आलें गुणें उणेपण रणरंगीं तुजपुढें जरासंधा**

या आर्येनें महाराष्ट्रीयांस सोपी करून ठेविली आहे.

व्रात्यस्तोमाचा विधि मुख्यतः मागधांस चातुवर्ण्यांत स्थान देण्यासाठींच आला असावा. मागध आणि व्रात्य हे भाऊबंद होते. यांची आठवण व्रात्यानें चातुवर्ण्यांत समाविष्ट होतांना आपले जुने कपडे मगधदेशीयास अगर ब्राह्मणबंधूस देऊन टाकावेत असें दिलें आहे. ही गोष्ट पंचविंश ब्राह्मणांत नाहीं, आणि अथर्ववेदसंहितेंतील व्रात्यस्तोमाच्या प्रकरणांतही नाहीं. तथापि परंपरागत चाल लोकांत रूढ असेल, तीच उत्तरकालीन विधींत प्रविष्ट झाली असली पाहिजे. मागधांचें सामाजिक स्थान हलकेपणाचें होतें त्यामुळें मागध हा मिश्रजातीय आहे अशी कल्पना होऊन त्या हलक्या स्थानाचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न धर्मशास्त्र ग्रंथकारांकडून झाला आहे.

## २४२. पूर्वेकडील समुद्राकडून आगमन.

२४२. पार्गिटेर यांनीं अशी कल्पना केली आहे कीं, कीकट देशावर पूर्वेकडील लोकांनीं स्वारी केली असावी, आणि त्यामुळें मगधांत जातिमिश्रण झालें असावें. पार्गिटेर यांची कल्पना टाकाऊ नाहीं. तीवर अधिक विचार व्हावयास पाहिजे. वेदपूर्व काळींच समुद्रमार्गानें बंगालच्या उपसागरांतून बरेच शक, मगध आणि सेमेटिक वंशाचे लोक आले असावेत असें आम्हांस वाटतें. अंगाची राजधानी विटंकपूर ही समुद्र-कांठीं होती असें कथासरित्सागर सुचवीत आहे. तेंच नगर परकीय लोक पूर्वभारतांत येण्याचें महाद्वार असावें.

जरासंधादि मंडळी कुरुयुद्धपूर्वकालीन होती. विदेह आणि कोसल हे देश देखील वैदिक संस्कृतींत उत्तर काळीं आले तर कोसल, विदेह, अंग, मगध या देशांमध्यें वसाहत फार प्राचीन काळीं पूर्वसमुद्रमार्गानें झाली असावी आणि त्यांच्या संस्कृतीचें प्राचीन अवैदिक स्वरूप वेदकाळीं देखील राहिलें असावें, आणि उत्कलांतील मिश्र ब्राह्मण हे देखील वेदपूर्व-कालीन परकीय बहुतकरून ईजिप्तच्या संस्कृतीचे अंशभाक् असावेत अशी एक शक्यता आहे. या शक्यतेवर अधिक विवेचन आदिपर्वात सांपडेल.

जरी वेदपूर्वकाळीं शकांचें, असुरांचें, मगांचें आणि इराणी लोकांचें म्हणजे कैकेयांचें आगमन हिंदुस्तानांत झालें असलें तरी त्यानंतर एकसारखीं आगमनें होत असलींच पाहिजेत, पंजाबामध्यें चंद्रभागा ( रावी ) नदीच्या कांठीं त्यांनीं वसाहत केली, आणि मुलतान येथें त्यांचा मोठा अड्डाच असावा.

आज मगांचें जवळ जवळ स्वात्मीकरण झालें आहे. शाकद्वीपी ब्राह्मण, आंगिरस ब्राह्मण, आचार्य ब्राह्मण वगैरे नांवांनीं जरी ते आपलें पृथकत्व राखून आहेत तरी आज थोडेंसें वैशिष्ट्य राखून ठेवणारी हिंदु जात असेंच तिचें स्वरूप आहे. अजून त्यांच्याशीं अन्नोदक व्यवहार करण्यास त्यांचे शेजारी इतर स्थानिक ब्राह्मण तयार नाहींत. मगांचा इतिहास हा अत्यंत प्राचीनकाळापासून आतांपर्यंतच्या समाजविकास-रूपी पटांतील निराळ्या रंगाचा एक धागा आहे असें म्हटलें तरी वावगें होणार नाहीं. त्यांच्या स्वात्मीकरणाचा इतिहास समाजविकासांतर्गत अनेक क्रियांचा बोधक आहे.

## २४३. मगांतील विविध भेद आणि मगांचें स्वात्मीकरण.

२४३. या मगांच्या आगमनाचा समाजावर त्याचप्रमाणें सामाजिक वाङ्मयावर परिणाम झाला आहे. मगांच्या आगमनामुळें किंबहुना इराण व हिंदुस्थानच्या संबंधामुळें सामाजिक इतिहासाचीं अनेक कार्यें उल्लेखावीं लागत आहेत. समाजामध्यें परकीय लोकांचे उपाध्ये कसे समाविष्ट होतात, आणि जनतेचें एकीकरण कसें होतें याविषयीं व्यापक विवेचन पुढें करावेंच लागेल. मगांच्या स्वात्मीकरणा-विषयीं मात्र माहिती येथें देणें अवश्य आहे. एका विशिष्ट लोकांचें स्वात्मीकरण कसें झालें हें सविस्तर दिलें म्हणजे निरनिराळ्या सामाजिक शक्ति कसें कार्य करीत याचें स्पष्टी-करण करणें सोपें होतें. मगांचें हिंदुस्थानांत स्वात्मीकरण

## मगांच्या वांशिक इतिहासाचे घटक



चित्रांक ३१. कै. कुवरजी मानसिंग. प्राणशंकर कुवरजी (पृ. २०२) चे वडील; कच्छ देशीय शाकद्वीपी ब्राह्मण; मगांच्या गुजराती शाखेंतील एक व्यक्ति



चित्रांक ३१. आ. श्रीमाळी ब्राह्मणांपैकीं बराच वर्ग मुसलमान होऊन बोहोरी जातींत समाविष्ट झाला असा सिद्धपुर येथें लोकांचा समज आहे.



चित्रांक ३१ अ. भोजक स्त्रीपुरुष (भोजक ब्रदर्स, दादर यांचें कुटुंब.) श्रीमाळी ब्राह्मणांतील जे जैनांचे उपाध्ये आहेत ते आपणांस भोजक म्हणवितात; तथापि या संबंधामुळें प्राचीन मगांचा म्हणजे भोजकांचा शिष्यवर्ग परकीय व्यापारी असेल काय या प्रश्नास अवकाश उत्पन्न होतो.



चित्रांक ३१ इ. मगांची उत्तरकालीन शाखा म्हणजे पारसीक ज्या देशी जातींतून स्त्रिया घेते झाले त्या दुबळा कणबी जातीचें एक कुटुंब. परकया लोकांनीं देशी ग्राम्य वर्गांतून स्त्रिया घ्याव्यात व नंतर परक्यांस देशी स्वरूप यावें असा नियम दिसतो.

व्हावयास दोन गोष्टी झाल्या पाहिजेत. एकतर त्यांचें स्वकीय जनतेपासून वियुक्तीकरण, आणि दुसरें त्यांचें देश्यसंस्कृतींत अवगाहन. या दोन्ही क्रिया वर्णितां येण्याजोग्या आहेत.

मगांचा आगमनकाल आपणांस ठाऊक नाहीं. भविष्यपुराण त्यांचें आगमन सांबास रक्तपिती झाली त्यामुळें सूर्योपासनेच्या सहाय्यानें त्या रोगाचें निवारण व्हावें म्हणून सांबानें त्यास शाकद्वीपाहून आणलें आणि त्यांस यादवकन्या दिल्या याप्रमाणें कथा सांगत आहे. ही सांबकथा दुसऱ्या कोणत्याही पुराणांत नाहीं. पुराणांत त्यांच्यामध्यें मूळचेच भेद होते असें सांगितलें आहे.

( १ ) सौर ब्राह्मणांचे तीन भेद आहेत, ते म्हटले म्हणजे मग, भोजक आणि सोमक हे होत. शाकद्वीपाहून आलेल्या ब्राह्मणांत तीन वर्ग होते असें भविष्यपुराण ब्राह्मपर्व अ. १३६ ज्या श्लोकांत सांगतें तो श्लोक येणेंप्रमाणें—

**अग्निजात्या मगाः प्रोक्ता । सोमजात्या द्विजातयः ।**
**भोजका आदित्यजात्या । दिव्यास्ते परिकीर्तिताः ॥**

झरथुष्ट्र आणि मग यांत द्वैत झालें अशी एक कल्पना मांडण्यांत आली आहे. ती स्वीकारण्यास बरीच अडचण वाटते. मगांचें देशांत आगमन झरथुष्ट्रोत्तरकालीन करतां येणार नाहीं. मगांच्या आगमनाची झरथुष्ट्राशीं पूर्वोत्तरता सांगण्याचा प्रयत्नच अयोग्य होईल. संगति जुळवावयाची ती अधिक निश्चित गोष्टीशीं कमी निश्चित गोष्टीची जुळवावयाची असते. झरथुष्ट्राचा काळ आपणांस निश्चितपणें ठाऊक नाहीं. कित्येक त्याला बुद्धोत्तर काळांत आणून सोडतात तर कित्येक ख्रि. पू. २००० इतका प्राचीन काळ देतात. तथापि ज्याअर्थी पारशांच्या धर्मग्रंथांत गौतमबुद्धाचा उल्लेख आहे त्याअर्थी झरथुष्ट्र यास गौतमपूर्व बनविण्यास महत्त्वाचें कारण पुढें आलें पाहिजे. बेहिस्तान येथील अंकित लेखांत ज्याअर्थी झरथुष्ट्रपूर्व इराणी धर्म सांपडतो त्याअर्थी झरथुष्ट्राच्या अत्यंत प्राचीनकालीनत्वाचा सहसा स्वीकार करतां येणार नाहीं.

हिंदुस्थानांत "मग" आले, त्यांचीं भोजकन्यांबरोबर लग्नें झालीं, आणि त्यांना पुढें 'भोजक' हें नांव प्राप्त झालें असेंहि सांगितलें आहे. मूळ वाक्यांतील सर्व अर्थ स्पष्ट होत नाहीं तथापि यांतहि विप्र भोजक आणि शूद्र मदंग या तऱ्हेचे वर्ग होते. याविषयींचें विधान पुढील श्लोकांत आहे.

**ममैवैते मगा ज्ञेया अष्टौ शूद्रा मदंगजाः**
**दत्ता भोजकुलोत्पन्ना दशभ्यो दशकन्यकाः**

मगांशीं येथील ब्राह्मणांनीं लग्नव्यवहार केला नाहीं. राजाश्रयानें जर हे लोक आले असते तर त्यांना सपत्नीक येण्याची संधि खास मिळाली असती. ती संधि त्यांस मिळाली नाहीं. "भोजकुलोत्पन्ना" म्हणजे भोयांच्या मुली असाच अर्थ असावा. अर्थात् मगब्राह्मण आणि मगशूद्र या दोघांसहि भारतीयांनीं एकाच प्रकारचें धरलें नाहीं, शूद्रांना दासींच्या कन्या दिल्या असें श्लोक सांगतात. ( अध्याय १४१ )

भोजकांस एकदां शुद्ध रक्ताचे तर एकदां मिश्र रक्ताचे एकाच ग्रंथांत बनविलें आहे. ते आदित्योद्भव आहेत असें सांगून नंतर भोज कन्यांचे वंशज होते असें दिलें आहे.

**ततस्तु मंदकेभ्योपि दत्ताश्चाष्टौ हि कन्यकाः**
**ततौ निवेशितं तेषां मया सांब पुरं स्मर**
**दास्यकन्यास्तु याश्चाष्टौ भोजकन्याश्च या दश**
**एतास्तेषां कुमाराणां ज्ञेयास्ता दश चाष्ट च**
**तत्र ते भोजकन्यासु द्विजैरुत्पादिताः सुताः**
**भोजकास्तान्गणान् प्राहुः ब्राह्मणान् दिव्यसंज्ञितान्**
**दासकन्यासु ये जाता मदंगैरन्त्यसंज्ञितैः**
**मदंगा नाम ते ज्ञेया सवितुः परिचारकाः**

**२४४. प्राचीन भारतीय मगांची रहाणी.**

२४४. या शाखद्वीपी मगांचें स्वरूप कसें होतें, रहाणी कशी होती याविषयीं थोडें स्पष्टीकरण उपलब्ध आहे. ते अव्यंग धारण करीत. तें अव्यंग म्हणजे आजच्या पारशांच्या कस्ती सारखेंच असणें अशक्य नाहीं.

वासुकेनें सूर्यास आपली कांत दिली. ती "नागराजांगसंभूत" असलेली सूर्यानें धारण केली, आणि त्यासाठीं सूर्याची प्रीति असलेल्यांनीं ती धारण करावी.

'अव्यंग' आणि 'अभ्यंग' अशीं दोन्ही नांवें वापरलीं जात होतीं असें दिसतें.

**न धारयंति येत्वेवं भोजकाः पूजका रवेः**
**सौरहीना न ते याज्या उच्छिष्टा नात्र संशयः**
**स्मृत्याचारे तेहि भग्ना रविं नार्हंति पूजितुम्**
**पूजयंतो रविं ते हि नरकं यांतिरौरवम्**
**अहोरगात्समुत्पन्नो ह्यव्यंगस्तु ततःस्मृतः**

अध्याय १४२.

अर्थात् प्रत्यक्ष सर्पाची कात वापरावयाची नव्हती तर तत्सदृश दुसरीच कसली तरी निर्मिती वापरावयाची होती. तिची लांबी कमींत कमी १०८ ( अंगुलें ) हवी होती.

**शतमष्टोत्तरं ह्रस्वो न तु ह्रस्वतरस्ततः**
**तदाकृतिः कृतश्चैष निर्मितो विश्वकर्मणा**
**संस्कृतोऽपि विना तेन शुचि नैव भवत्युत**
**तेनास्य धारणाद्वीर शुचिरेव तदा भवेत्**




चित्रांक ३२. ( अंक १. २. ) कृष्णस्त्रिया सांबावर अनुरक्त झाल्या, त्याच्यामुळें कृष्णास मत्सर होऊन त्यानें सांबास शाप दिला, त्यामुळें सांबास रक्तपिती झाली, व पुढें मगांच्या साहाय्यानें सूर्याराधन केल्यामुळें सांब रोगमुक्त झाला या क्रियेचीं पोथींतील चित्रें ( वेंकटेश्वर आवृत्ति ). चित्रें ३, ४, ५ हीं भविष्यपुराणांतील कथाभाग प्रचलित कसा झाला यासंबंधीं आहेत.

ते कुंचला धारण करीत होते. तो कोठें धारण करीत होते हें स्पष्ट दिलें नाहीं. त्यांचा " कंचुक " कांहीं तरी निराळ्या लांबीचा असावा असें दिसतें. त्यांच्यापाशीं अग्निहोत्र होतें. आणि त्यांचे " दोले " पांच होते. त्याविषयीं अधिक स्पष्टीकरण उपलब्ध होत नाहीं.

**दिव्येति ते कथं प्रोक्ताः किमर्थं कूर्चधारणम्**
**अथाहि कंचुकस्यांगं किं प्रमाणं च कस्य वै**
**अग्निहोत्रं च किं तेषां पंच दोलाश्च काः स्मृताः**
**एतत्सर्वं समाख्याहि भोजकानां विचेष्टितम्**

अध्याय १४०

हे मग शाकद्वीपाहून आणले आहेत. त्यांची पूजा करून त्यांना गांव समर्पण केले.

**शाकद्वीपं मया गत्वा आनीता मगपुंगवाः**
**बाला यौवनसंपन्नाः संनिविष्टा मगोत्तमाः**
**सत्कृत्य पूजयित्वा तु पुरं तेषां समर्पितम्**

मगांचें जें ज्ञान आहे त्याला देखील " वेद " असेंच नांव लावलें, आणि त्यांच्या आचारांत " मौन " प्रधान असावें असें दिसतें.

**मगानां चरितं श्रेष्ठं शृणु त्वं कृष्णनंदन**
**ज्ञानं वेदि न एवैते कर्मयोगं समाश्रिताः**
**श्रूयंते ऋषयः सर्वे मौनेन नियमस्थिताः**
**भुंजते चापि मौनेन सर्वे वै परमर्षयः**
**ब्रह्मणोक्तास्तथा वेदा मगानामपि सुव्रत**

### २४५. मगांच्या अभोज्यत्वाचें निराकरण.

२४५ भोजकांचा भारतीय समाजांत समावेश सहज झाला नाहीं. त्यांच्या तर्फेचें काव्य गाणाऱ्या भविष्य पुराणास देखील त्यांचें सामाजिक हीनत्व लपवितां आलें नाहीं. इकडे त्यांचें श्रेष्ठत्व सांगावयाचें, त्यांनीं ब्राह्मणांची निंदा करूं नये म्हणून प्रयत्न करावयाचा, आणि त्यांना अपांक्तत्वच काय पण अभोज्यत्व काढून टाकण्यासाठीं खटपट करावयाची इत्यादि प्रयत्न या पुराणकारास करावे लागले आहेत.

**भास्करस्य प्रियाह्येते पूज्यत्वं च तथा गताः**
**दिव्याश्चैते स्मृता विप्रा आदित्याभः समुद्भवाः**
**अभोज्यत्वं कथं याता भोजकास्तद्वदस्व मे**
**किं कुर्वाणास्तथा कर्म भोज्यतां यांति मे वद**

याला अर्थात् उत्तरें दिलीं आहेत. त्यांत जे वाईट भोजक आहेत त्यांना जेवायला बोलवूं नका, जे चांगले आहेत त्यांना बोलवा, इत्यादि तऱ्हांनीं त्यांची तरफदारी चालली आहे. ज्या निंद्य गोष्टी भोजक करीत आहेत त्यांचा सत्कार करूं नका म्हणून जें सांगितलें आहे त्यांत तत्कालीन मगांच्या किंवा भोजकांच्या येथील लोकांच्या दृष्टीनें आक्षेप असलेल्या चालीच वर्णन केल्या आहेत—

**वृषली यस्य वै भार्या यश्चाव्यंगं न धारयेत्**
**अभोज्यः स तु विज्ञेयो भोजको नात्र संशयः**

अव्यंग न धारण करणें आणि शूद्र बायको करणें या गोष्टी गैर आहेत असें भोजकांचा पौराणिक अभिमानी कबूल करतो. क्षत्रिय आणि शूद्र यांच्या मधील विभाजक रेषा अत्यंत अस्पष्ट असतां भोयांच्या आणि गवळ्यांच्या मुली करणाऱ्या भोजकांनीं आपण शूद्रकन्या करीत नाहीं असें म्हणावें व इतरांनीं तुम्हीं करतां असें म्हणावें हा प्रकार चालत असावा. भोजकांनीं ब्राह्मणी धर्माचा पूर्ण स्वीकार करावा आणि आपले स्वतंत्र धर्म पाळावेत आणि ब्राह्मण ज्या गोष्टी अयोग्य समजतात त्या करूं नयेत अशा प्रकारचा प्रयत्न करून भोजकांस आपल्या सदृश करण्याचा प्रयत्न प्रस्तुत पुराणाचा आढळतो.

### २४६. भोजक आणि आरुणेय संस्कार.

२४६. भोजकांना कोणत्या तरी भारतीय परंपरेशीं जुळवून घेणें अवश्य होतें; आणि यासाठीं उद्दालक आरुणि याच्या स्मार्त संप्रदायाशीं जुळवून घेतलें असेल. आरुणि हा अश्वपति कैकेय याचें म्हणजे इराणी राजाचें गीत गाणाराच होता म्हणून आरुणेय संस्कारांशीं भोजकांचा संबंध जुळलासें दिसतें.

जातकर्मादि संस्कार ज्यांनीं केले नाहींत, ज्यांचें आरुणेय मंत्रांनीं उपनयन झालें नाहीं, जे भोजक पितृदेवमनुष्यांची पूजा करीत नाहींत ते सर्व दोषार्ह आहेत, पण त्यांच्याशीं संसर्गाबद्दल फार मोठें प्रायश्चित्त नको एवढेंच मांडलें आहे. भोजकांतील कांहीं लोक घरचे नोकर म्हणून राहिले असावेत आणि त्यांना शूद्रान्नाविषयीं विधिनिषेध नव्हता; तर त्याही भोजकांना वगळावें असें सांगितलें आहे. भोजकांनीं उपनयन करतांना आरुणेय मंत्राचा परिग्रह करण्याविषयीं आग्रह कां करावा असा प्रश्न उत्पन्न होईल. तर त्याचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न पुढें केलाच आहे.

**सेवको भोजको यस्तु शूद्रान्नं येन भुज्यते**
**कृषिं च कुरुते यस्तु देवार्चामपि वर्जयेत्**
**जातकर्मादयो यस्य न संस्काराः कृता विधो**
**आरुणेयैश्च मंत्रैश्च सावित्रीं नच वै पठेत्**
**तस्य गेहे द्विजो भुक्तः कृच्छ्रपादेन शुद्ध्यति**
**पितृदेवमनुष्याणां भूतानां भास्करस्य तु**
**अकृत्वा विधिवत्पूजां यस्तु भुंक्ते स धर्महा**

**अभ्यंगेन विहीनो यः शंखहीनस्तथैव च**
**शिरसा धारयेत् केशान् स ज्ञेयो भोजकाधमः**

अभ्यंगाचें महत्त्व एवढें होतें कीं—

**देवार्चनं तथा होमं स्नानं तर्पणमेवच**
**दानं ब्राम्हणपूजां च कुर्वतो भोजकस्य तु**
**अभ्यंगेन विहीनस्य सर्वं भवतु निष्फलम्**

अध्याय १४७.

**२४७. भोजकांचें वैशिष्ट्य रक्षिलें गेलें होतें.**

२४७. डोक्यावर केंस ठेवील तो भोजक अधम होय हें वर सांगितलेंच आहे. उलटपक्षीं चांगले भोजक कोणते तर ज्यांनीं डोक्याचें मुंडण * केलें असेल व जे शंख वाजवितील, आणि जे अभ्यंग धारण करीत असतील ते होत.

**येषां मुंडं शिरो नित्यं ये चाभ्यंगसमन्वितः**
**वादयंति च ये शंखं दिव्यास्ते भोजका मताः**

भोजकांना जेवण देण्याचें महत्त्व मोठेंच होतें, पण त्यांनीं एकभुक्त असावें, निदान रात्रीं जेऊं नये असाहि नियम सांगितला आहे.

**एकभुक्तेन ये नित्यं वर्तंते कश्यपात्मज**
**भुंजंते नच ये रात्रौ भोजकास्ते प्रिया मम**

भोजकांनीं रविवार पाळला पाहिजे, षष्ठी पाळली पाहिजे, आणि आईबापांचा दिवस पाळला पाहिजे. त्या दिवशीं त्यांनीं दान केलें पाहिजे, कारण अरुणास सांगितलें जात आहे कीं—

**प्रतिसंवत्सरं ये तु भोजका गरुडाग्रज**
**न यच्छंति पितुर्मातुर्दिवसे ते न मे प्रियाः**

ख्रिस्ती मंडळीनीं रविवार हा ईश्वरदिवस ठरविला तो इराणी संस्काराचाच परिणाम नसेल ना ? जैनांचें रात्रीं भोजन न करणें हें त्यांच्या परदेशीय आचारपरंपरेचें स्मारक नसेल ना, असाहि प्रश्न उत्पन्न होतो.

**मम वारे च ये वीरास्तथा षष्ठ्यां च केशव**
**न रात्रौ भुंजंते प्राज्ञा मत्प्रियास्ते मगाः खग**

भोजकांनीं शंख फुंकावा, नाचावें, नाट्य करावें हें सर्व सूर्यदेवास प्रियच आहे. सांगितलेंच आहे कीं—

**वाद्यानां शंखशब्दश्च नृत्यं नाट्यं मतं मम**

* सर्व डोक्याची हजामत करणें ही गोष्ट मुसलमानीपणाचें लक्षण समजतात, तथापि प्राचीन भारतांत देखील तो आचार होता. मानवगृह्यसूत्र ( प्रकाशक गायकवाड ओरिएंटल सीरीज ) १-१. ३ यांत आलेला शब्द 'संहृत केशो' यावर भाष्य करतांना अष्टावक्र भाष्यकार तीन पक्ष सांगतो, "शिखाजट इति वक्ष्यति, मुंडः शिखाजटः, सर्वजटो वा."

**२४७ अ. मग आणि नाट्यशास्त्र.**

२४७ अ. जी जात आपणांस ब्राह्मण म्हणविते तीच जात नटांनाच्यांचा धंदा करूं लागली म्हणजे नटणें नाचणें 'नाट्यवेद' होण्याच्या पंथास लागल्यास नवल नाहीं. नाट्यविद्येस मगांनीं नवीन चालना दिली असावी आणि धंद्याचा प्रतिष्ठितपणा मगांनीं वाढविला असावा ही शक्यता आहे. जुन्या नाट्य पंडितांत शिलालि आणि कृशाश्व हे लेखक उल्लेखिले आहेत, त्यापैकीं शिलालि हें नांव भारतीय आहे कीं अन्यदेशीय आहे हें सांगतां येत नाहीं. कृशाश्व हें नांव मूळचें इराणी असावें. कृशाश्व याचा अर्थ उत्तरकालीन वाङ्मयांत अग्नि असा घेतात, तथापि अग्नीचे घोडे कृश होते काय याविषयीं खुलासा फारसा कोठें दृष्टीस पडला नाहीं. कृशाश्व हें नांव अग्नि या अर्थानें भवभूतीनें उत्तररामचरित्रांत सरहस्यजृंभकास्त्र रामाकडे कसें गेलें तें सांगताना वापरलें आहे. ( कृशाश्वतनया ह्येते कृशाश्वात्कौशिकं गताः ) कृशाश्व हा शब्द 'केरशास्प' या शब्दाशीं संबद्ध दिसतो. अग्निपूजकांचा केरशास्प हा शब्द प्रचलित झाल्यानंतर कृशाश्व या शब्दाचा अर्थ अग्नि असा होऊन अग्नीचे घोडे कृश होते, अशी समजूत झाली काय असा प्रश्न उत्पन्न होतो.

नाट्यशास्त्रावर एक लेख रा. घोष† यांनीं लिहिला. त्यांत त्यांनीं पाणिनीपासून प्रारंभ करून शिलालि आणि कृशाश्व यांना नाटकाचे अत्यंत प्राचीन काळचे प्रचारक केले आहेत.

या दोन व्यक्तींस मात्र नाट्यशास्त्रकाराचा मान द्यावयाला रा. त्रिवेदी‡ तयार नाहींत. कारण त्यांच्या मतें पाणिनीतील नट हा शब्द स्पष्ट अर्थाचा नाहीं. तथापि नाट्यकला बुद्धकालापूर्वींच स्थापन झाली होती, असें ललितविस्ताराच्या आधारानें जेव्हां प्रो. कीथ सारखी मंडळी सिद्ध करूं लागतात तेव्हां मात्र कीथ सारख्या पंडिताच्या ऐतिहासिकतेच्या स्वीकारलेल्या कल्पनांविषयीं मौज वाटूं लागते. ललितविस्तार हा बुद्धनिर्वाणानंतर २१३ शें वर्षांनीं लिहिलेला काव्यग्रंथ: त्या ग्रंथांत अद्भुत आणि अशक्य याचाच संग्रह झाला आहे असें ज्यांस मान्य आहे त्यांनीं त्या ग्रंथाच्या आधारें बुद्धपूर्वकालीन नाट्याविषयीं लिहिणें अत्यंत अप्रोजक आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

इराणी लोकांनीं नाट्यकलेस कांहीं मदत केली काय याचा विचार पूर्वीं कोणी केलेला नाहींच व या दोघां अगदीं अलीकडच्या लेखकांपैकीं कोणी केलेला नाहीं.

† Problems of Natyashastra ( I. H. Q. for *March 1930 by M. Ghose.* )

‡ Problems of Natyashastra by H. Trivedi ( I. H. Q. June 1931 ).

मत्स्यजीवी जातीचा महाराष्ट्राशीं त्याचप्रमाणें मगाशीं संबंध दाखविणारी भोजकन्या



चित्रांक ३३ भोजकन्या; मग ब्राह्मण येथील ज्या स्त्रियांचा स्वीकार करते झाले, त्या स्त्रिया यादव अगर भोज ( भोई ) होत्या असें भविष्यपुराण सांगत आहे आणि त्यामुळें मगांस भोजक नांव पडलें असें सुचवीत आहे.



चित्रांक ३३ अ. उत्तर हिंदुस्थानांतील शाकद्वीपी ऊर्फ मग ब्राह्मण श्री. निरंजन शर्मा अजित, वेंकटेश्वर छापखाना, मुंबई



चित्रांक ३३ आ. प्राणशंकर कुंवरजी शर्मा, संचालक "शाकद्वीपीय ब्राह्मण बंधु". चित्पावन ब्राह्मण हे शाकद्वीपीयांचे एकवंशीय बांधव आहेत असें समजणाऱ्या शाकद्वीपीयांत हे एक आहेत.




चित्रांक ३४. पारसीकविजेता वत्सराज उदयन; याच्या चरित्राचें लोकहारित्व अजूनहि आहे याविषयीं अर्वाचीन बोलत्या चित्राची साक्ष ( वि. स. सुखटणकर यांचें बोलतें चित्र-वासवदत्ता—अजंठा सिनेटोन )



चित्रांक ३५. पारशी लोकांच्या गृह्याग्नीचें स्वरूप. आज हा गृह्याग्नि फारच थोडक्यांच्या घरीं आढळतो. मगांविषयींच्या वर्णनांत त्यांच्या अग्नीच्या उपासनेचा उल्लेख प्रामुख्यानें नाहीं.

## २४८. भोजकांचें सातत्य; चालुक्यकाल.

२४८. मगांचें म्हणजे भोजकांचें अस्तित्व दाखविणारे उल्लेख वाङ्मयांत जागोजाग आढळतात; त्यांचीं औद्योगिक क्षेत्रें अनेक दिसतात. चालुक्यपूर्व कालाचीच स्थिति जर वर्णन करून स्वस्थ बसावयाचें म्हटलें तर भोजकांचें सातत्य त्या काळापर्यंत होतें एवढेंच सांगितलें म्हणजे पुरे; पण तेवढ्यानें पुरें समाधान होत नाहीं. त्या समाजाचे आजचे अवशेषहि दाखविले पाहिजेत. आज त्यांचे अवशेष मुबलक आहेत. चालुक्यकालीनता दाखविण्यास बाणभट्टानें केलेला उल्लेख पुरा आहे.

भोजकांचा उल्लेख हर्षचरित्रांत आला आहे, त्यावरून बाणभट्टांच्या काळीं त्यांचें अस्तित्व दिसून येतें. त्यांचें वणन गणक म्हणून आलें आहे. भोजक ज्योतिष सांगत आहे, हस्तसामुद्रिक सांगत आहे. ( **त्रिकालज्ञानभाग्भोजकस्तारकोनाम गणकाः समुपसृत्य विज्ञापितवान** —चतुर्थ उच्छ्वास ) येथें भोजक या शब्दाचा अर्थ ' मग ' असाच आहे आणि तो वर्ग रविपूजक आहे असें टीकावर शंकरभट्ट सांगतात. ( **भोजको * रविमर्चयित्वा पूजका हि भूयसा गणका भवंति, ये मगा इति प्रसिद्धाः ।** ) भोजक व मग या शब्दांचा एकच वर्गास उद्देशून केलेला उपयोग शंकरभट्टाच्या काळापर्यंत दिसत आहे. पण पुढच्या कालांत एक ' मग ' न म्हणविणारा वर्ग भोजक म्हटला जात आहे असें दिसून येतें.

## २४९. भोजकांचें गुजरातेंत अस्तित्त्व, भोजक, श्रीमाळी ब्राह्मण, ओसवाल व उदेपूर.

२४९. इराणी आक्रमणाचे आणि मगांचे आजचे परिणाम पहावयाचे ते हिंदुसमाजांतच पाहिले पाहिजेत. ज्याअर्थी अश्वपति कैकेय हा उपनिषदांतील एक उपदेशक व्यक्ति म्हणजे पूज्य व्यक्ति म्हणून समाविष्ट झालेला दिसतो त्याअर्थी भारतीयांस या लोकांचा परकेपणा वाटत नसला पाहिजे. समाजांत त्यांचा प्रवेश अत्यंत स्वाभाविकपणें झालेला दिसतो. मग ब्राह्मण, आंगिरस ब्राह्मण व शाकद्वीपी ब्राह्मण म्हणून यांस अस्तित्व आहेच. आणि त्या नांवानीं ओळखल्या जाणाऱ्या लोकांची वसती अमदाबादपासून कलकत्यापर्यंत आहे, तरी अन्य नांवानें ओळखल्या जाणाऱ्या आणि मगांपासून निराळी जात पडलेल्या लोकांमध्यें देखील मगांचे वंशज असावेत असा आम्हांस संशय येतो. भोजक आणि मग यांचें कांहीं ठिकाणीं ऐक्य तर कांहीं ठिकाणीं भिन्नत्व पुराणांत सांगितलें आहे. भोजक हें नांव श्रीमाळी ब्राह्मणांसहि आहे. श्रीमाळी ब्राह्मण आपण ' मग ' आहों असें म्हणवीत नाहींत पण आपणास भोजक म्हणवितात आणि भोजक शब्दाच्या उपयोगाचें एक निराळेंच कारण देतात. श्रीमाळी ब्राह्मणांचा वेद कोणता यासंबंधानें पंचाईतच पडते. श्रीमाळी ब्राह्मण आज स्वैपाकी म्हणून सर्व मध्यप्रांतभर पसरले आहेत आणि खुद्द उदेपुरांत त्यांचा जो समाज आहे त्यांत ब्राह्मणाचार अत्यंत अल्प आहे. लग्नाच्या आधल्या दिवशीं मुंज करावी ही पद्धत फारच प्रचलित आहे. आणि त्यामुळें लग्नाशिवाय जेव्हां तीसचाळीस वर्षांचा पुरुष आढळून येतो तेव्हां त्याची मुंजहि व्हावयाची राहिलेली असते.

' श्री मा ळी भो ज क ' म ग आ हे त का य ?

श्रीमाळीपैकीं मंडळी आपल्याला भोजक हें नांव कसें मिळालें याचें स्पष्टीकरण असें करतात कीं, ओसवालांच्या बरोबर त्यांचें जेवण झालें आणि त्यामुळें त्यांना इतर ब्राह्मणांकडून बहिष्कार पडला आणि त्या जेवणामुळें त्यांना भोजक हें नांव मिळालें. ओसवालांचा श्रीमाळी ब्राह्मण जातीशीं असा निकट संबंध आहे. उदेपुरच्या राजघराण्याचे आजचे उपाध्ये जरी तैलंग ब्राह्मण असले तरी त्यांचे परंपरागत उपाध्ये श्रीमाळी ब्राह्मण होत. श्रीमाळी ब्राह्मणांवर वैदिक संस्कारांचें आवरण अत्यंत विरळ आहे. वैदिक मंत्र तर राहोतच–पौराणिक मंत्र देखील त्यांच्या लग्नांत म्हटले जात नाहींत; आणि मंत्रांचें बरेंचसें काम गुजराती किंवा राजस्तानी गाण्यांनीं होतें ! तुमचा वेद कोणता, शाखा कोणती, हें विचारलें तर लोक हवीं तीं उत्तरें देतात. त्यांच्यांतल्या पंडित समजल्या जाणाऱ्या एका मुंबापुरस्थ भोजकापाशीं चौकशी केली असतां तो म्हणाला कीं "आमचे लोक, आमचा वेद यजुर्वेद, सामवेद असें कांहीं तरी सांगतात पण आमचा खरा वेद अथर्ववेद आहे."

उदेपूरचे राजे शक आहेत असा जो वाद उत्पन्न झाला त्यांत ऐतिहासिक सत्य आहे, कीं केवळ प्रवाद आहे याविषयीं आज भिन्न मतें आहेत. तथापि श्रीमाळी ब्राह्मण हे मगांच्या वंशांतून उत्पन्न झाले आणि शकांतून उदेपूरचा राजवंश निघाला या गोष्टी आज शक्यतेच्या कक्षेच्या बाहेर वाटत नाहींत. या राजवंशाच्या सूर्यकुलत्वाचें स्पष्टीकरण अन्यत्र केलेंच आहे. पूर्वजांचें पूजन करावयाचें ही चाल भारतीय आहे आणि त्यामुळें ज्याचें पूजन होतें त्यास पूर्वजता मिळते. अनेक देवकें याप्रमाणें ऋषिगोत्रें झालीं आहेत. शक व इराणी राजे सूर्योपासक होते आणि त्यामुळें त्यांना सूर्यकुलोत्पन्नता सहजच स्थापित करतां आली. भिनमाळ ऊर्फ श्रीमाळ मुलतानहून दूर नाहीं. शकामगांची वसती प्रथम मुलतान येथें व नंतर मुलतानहून श्रीमाळ येथें आणि नंतर गुजरातेंत झालेली दिसते. कांहीं श्रीमाळी मारवाडांत देखील स्थायिक झाले, तरी ते आपणांस द्राविड ब्राह्मणच म्हणवून घेतात, कारण श्रीमाळ हा गुजरातचा भाग मानला जातो आणि गुजरातचा महाराष्ट्राप्रमाणें पंच द्राविडांत समावेश होतो.

* येथें अनेकवचन हवें असून मात्रा विनाकारण पडली आहे. हर्षचरिताची आवृत्ति चांगल्या हस्तलिखितावरून तयार झाली नाहीं किंवा संपादकानें तरी मुद्रितें चांगलीं तपासलीं नसावींत. प्रस्तुत अवतरण संस्कृत सीरीज मधील डॉ. फूहरर यांच्या आवृत्तींतील आहे.

श्रीमाळी ब्राह्मणांस भोजक हें नांव आहे, त्यावरून ते मगवंशीय आहेत असा निर्णय काढण्यास एक अडचण येण्याजोगी आहे. ती म्हटली म्हणजे 'भोजक' हें नांव सर्व श्रीमाळी मंडळींस नाहीं. त्यांतील जैन धर्माची जी पोट जात आहे तीसच आहे. या भोजकांबरोबर इतर श्रीमाळी मंडळी लग्नव्यवहार करीत नाहींत. शिवाय भोजक हें नांव जैन श्रीमाळींस कुमारपालकाळीं मिळालें असें ते सांगतात; पण त्यावर विश्वास बसत नाहीं. असें शक्य आहे कीं, 'मग' भोजक ब्राह्मणांत शिरकाव करून घेण्याचा प्रयत्न केल्यानंतर जैन-धर्मी झाले, आणि त्यानंतर त्यांतील कांहीं वर्ग वैदिक धर्माचा होऊन जैनापासून निराळा झाला असावा. आणि जैनेतर श्रीमाळींनीं भोजक हें नांव टाकून दिलें असावें, व जैनां-बरोबर लग्न-व्यवहार बंद केला असावा.

## २५०. 'मग' आणि अर्वाचीन हिंदुस्थान.

२५०. बाबू नगेंद्रनाथ वसु (विश्वकोश संपादक) हे आपल्या पुराणवस्तुसंशोधनग्रंथांत* मग ब्राह्मण यांच्या प्राचीनत्वाविषयीं आणि त्यांच्या संस्कृतिसातत्याविषयीं ज्या गोष्टी पुढें मांडतात त्यांत त्यांनीं पूर्व हिंदुस्थानमधील दिलेली वसतीची माहिती देतांना ऐतिहासिक भाग म्हणून भविष्य पुराणाचाच आधार घेतला आहे. त्याशिवाय ते पूर्वेकडील मगांची माहिती देत आहेत. ते मग, शाकद्वीपी आणि आंगिरस हीं तीन नांवें ते आपणांस लावून घेत आहेत असें नगेंद्रनाथ वसु सांगतात.

फलज्योतिष आणि वैद्यक हे आज आंगिरस ब्राह्मणांचे महत्त्वाचे धंदे आहेत. बरद्वान म्हणजे मध्यराढ देश यांत आंगीरसी नांवाचें एक गांव त्यांच्या वसतीचें द्योतक आहे. झारखंड ऊर्फ मयूरभंजमध्यें त्यांची वसती आहे आणि तेथून ते बलसोड जिल्ह्यांतील सूर्यपूर गांवीं आणि कोणार्क येथें गेले. कोणार्क येथील देवळांचे पुजारी आंगिरस ब्राह्मणच आहेत. मग ब्राह्मणच प्राचीन काळीं मूर्तिकाराचा धंदा करीत होते, आणि अजूनहि मूर्तीवर रंग लावण्याचें काम त्यांच्या करतां राखून ठेवावें लागतें.

मगांचा उल्लेख जुन्या पाली वाङ्मयांत आहे असें नगेंद्रनाथ वसु सांगतात (उल्लेखित मयूरभंज ग्रंथ पृ. iii) तथापि ते उल्लेख कोणते ते त्यांनीं दाखविले नाहींत. भविष्य पुराणाच्या प्रसिद्ध आवृत्तींशिवाय अनेक हस्तलिखितें नगेंद्रनाथ यांनीं चाळलीं. त्यांच्या संग्रहांत असलेल्या हस्तलिखितांत झरथुष्ट्राचा उल्लेख आहे व त्याचें जरथस्त्र असें रूप आहे. झरथुष्ट्र आणि मग यांच्यामध्यें भांडण झालें, कारण त्यांनीं वेदांचा अर्थ भलताच लावला. मित्र आणि सूर्य यांचें महत्त्व मगांस अधिक होतें आणि अग्नीचें महत्त्व झरथुष्ट्रास अधिक होतें, असा आपला अभिप्राय नगेंद्रनाथ वसु व्यक्त करतात; त्यास आधार प्रसिद्ध झालेल्या भविष्यपुराणाच्या आवृत्तींत मिळत नाहीं.

हें शक्य आहे कीं, इराण आणि हिंदुस्थान यांचें एकमे-कांशीं दळणवळण आज आहे त्यापेक्षां अधिक असेल आणि त्यामुळें इराणच्या लोकांच्या टोळ्या एकामागून एक एक सारख्या येत असतील. सांबानें आपली रक्तपिती घालविण्या-साठीं सूर्योपासक मग ब्राह्मणांस बोलाविलें हें खरें असो अगर नसो, प्राचीन यादवांचा आणि मगांचा निकट संबंध आला होता यांत शंका नाहीं. सूर्याचें देऊळ स्थापन केलें ती जागा मुलतान होय असें नगेंद्रनाथ वसु समजतात, तें आम्हांस अशक्य वाटत नाहीं. आणि मुलतान मुलशांबपुर याचा अपभ्रंश समजतात ! चिनी प्रवासी थुवान चुआंग यानें सूर्याची सुवर्ण मूर्ती मुळशांबपूर ऊर्फ मुलतान येथें पाहिली असें तो सांगत आहे. (आधारः जूर्नाल एशियाटिक पारीस १८८१ ग्रंथ १०, पृष्ठ ७२) हे मग ब्राह्मण मुलतानहून मथुरा व ओरिसा येथें गेले असें नगेंद्रनाथ बसु यांस वाटतें तें शक्य आहे. ते जसे पूर्वेकडे पसरले तसे ते गुजरातकडे देखील आले असावेत. शाकद्वीपी ब्राह्मण म्हणविणारी मंडळी अमदाबादेस थोडीशी भेटते आणि आपली वसती गिरनार आणि अबू येथें आहे असें सांगते. अमदाबादचे शाकद्वीपी प्रस्तुत लेखकानें पाहिले आहेत, तथापि गिरनारचे आणि अबू येथील पाहिले नाहींत.

## २५० अ. 'मग' ब्राह्मण, पांचाल चळवळ आणि कोंकणांतील दैवज्ञ.

२५०अ. 'मग ब्राह्मण' हे 'भोजक' नांव घेऊन गणक किंवा मूर्तिकार या नात्यानें सर्व हिंदुस्थानभर पसरले होते असें दिसतें. महाराष्ट्रांत किंबहुना दक्षिणेंत त्यांचें अस्तित्व कां दिसूं नये असा प्रश्न उत्पन्न होतो. त्यांनीं आपणांस ब्राह्मण म्हणवावें, इतरांनीं त्यांस ब्राह्मण म्हणूं नये किंवा तंटा होऊं नये म्हणून ब्राह्मण म्हटलें तरी सामाजिक दृष्टीनें दूर राखावें अशी त्यांच्यासंबंधानें समाजाची प्रवृत्ति दिसते. भविष्यमहापुराणांत देखील त्यांच्यासंबंधानें उल्लेख एकसारखे दिसत नाहींत. अगोदरच्या एका संपादनांत जो मजकूर जातीच्या विरुद्ध असेल तो दुसऱ्या संपादकांनीं काढावा किंवा पूर्वींच्या विधानाविरुद्ध नवीन मजकूर करावा, अशा तऱ्हेचें विवे-चन भविष्यमहापुराणांत झालें आहे आणि त्यामुळें मज-

*Mayurbhanja Archaelogical Survey. प्रकाशक मयूरभंज संस्थान.

कुरांत असंबद्धता उत्पन्न झाली आहे. जरी त्यांना जेवावयास बोलवावें असें सांगितलें आहे तरी त्यांच्या हातचें खाऊं नये अशा अर्थाचें वाक्य राहून गेलें आहे.

**न एते भोजकाः प्रोक्ता देवदेवस्य पूजकाः**
**नान्नं भोज्यमथैतेषां ब्राह्मणैश्च कदाचन**

सूर्योपासनेशिवाय गणक व मूर्तिकार हे भोजकांचे धंदे झाले तर त्या धंद्याच्या व्यवसायी मंडळींत पश्चिम हिंदुस्थानांतले व दक्षिणेंतले भोजक लुप्त झाले असावेत. दक्षिणेंत देखील मूर्तिकार आणि ब्राह्मण म्हणविणाऱ्या जाति या भोजकांच्या वंशांतील असणें अशक्य नाहीं. ब्राह्मण्याबद्दल ज्यांच्या मनांत अभिमान असून संस्कृतविद्या नाहीं, आणि लांकूड, दगड, तांबें, सोनें व लोखंड यांच्या मूर्ति ते करीत आहेत अशा स्थितींत दक्षिणेकडील भोजकांनीं आपल्या महत्त्वस्थापनेसाठीं जी चळवळ सुरू केली ती "पंचाल" चळवळींत परिणति पावली असावी या प्रकारची एक शक्यता आहे.




**चित्रांक ३६. मगांसंबंधानें माहिती अरुण गरुडास सांगत आहे त्याचें चित्र अगदीं वरचें ! सर्व चित्रें भविष्यपुराणाचा प्रसार कसा झाला तें दाखवीत आहेत.**

मूर्तिकार वर्गामध्यें अग्रगण्य वर्ग जो सोनारांचा त्या सोनारांच्या एका जातीनें आपणांस दैवज्ञ कां म्हणवून घ्यावें हा प्रश्न विचार करण्याजोगा आहे. ही दैवज्ञांची ज्ञाति एकीकडे कारागिरी करते, व दुसरीकडे गणकवर्गाचें नांव धारण करते; तर ही ज्ञाति मगवंशीयांच्या महाराष्ट्रांतील अस्तित्वाची दर्शक नाहीं कशावरून, असा विचार मनांत येतो. त्या प्रश्नाविषयीं अधिक विवेचन महाराष्ट्राच्या वांशिक इतिहासाच्या प्रकरणांत करण्यांत येईल.

## २५०. आ. आराकानी मग.

२५० आ. आराकानमध्यें सुमारें दहा लाख वस्ती असलेली मग नांवाची एक जात आहे. ती बौद्ध आहे. तिचा मंत्रतंत्रावर विश्वास आहे. ब्रह्मदेशांत युरोपियनपद्धतीचे स्वैपाकी या नात्यानें ते वारंवार दृष्टीस पडतात. ते भारतीय मगांचे वंशज असतील असें म्हणणें कठीणच वाटतें ( ज्ञानकोश आकाराचें शब्द पहा. )

## २५० इ. मगांच्या राष्ट्रीकरणाचें पर्यालोचन.

२५० इ. मगांच्या भारतीकरणांतील एकंदर पायऱ्या व त्यांचा इतिहास अत्यंत थोडक्यांत सांगावयाचा झाल्यास येणेंप्रमाणें सांगतां येईल. मगांचें मिश्रण यादवांबरोबर झालें असें जें सांगितलें आहे, ते यादव म्हणजे भोज किंवा भोई असावेत. याप्रमाणें त्यांचें मिश्रण बनल्यानंतर त्यांची ज्ञाति चोहोंकडे पसरली असावी, व भोजांचे वंशज म्हणून भोजक या नांवानें प्रसिद्ध झाली असावी. ती ज्या शकांबरोबर आली असेल त्यांचें हिंदूकरण होऊन उदेपूरचें राजघराणें पक्कें हिंदु मानलें जातांना उदेपूरच्या राण्यांनीं सर्वमान्य तैलंग ब्राह्मणांस उपाध्ये केल्यानंतर ज्यांचें उपाध्येपण सुटलें आहे अशा या भोजक ब्राह्मणांचा दुय्यम प्रतीचे ब्राह्मण किंवा अमान्य ब्राह्मण या नात्यानें चोहोंकडे प्रसार झाला असावा, आणि गणकत्त्व आणि मूर्तिकारत्त्व हींच यांचीं वैशिष्टयें राहिलीं असावींत. आणि त्यामुळें पुढें हिंदुस्थानभर कारागिरी करणाऱ्या व ब्राह्मण म्हणविणाऱ्या ज्ञातीचें अस्तित्व उत्पन्न होऊन कारागीर जाती आपलें ब्राह्मण्य सिद्ध करूं पहात आहेत असा प्रकार दिसूं लागला असावा.

प्रकरण २९ वें

# दारयवहूची साक्ष–बेहिस्तानचा लेख

**२५१. उत्तरकालीन लेखांतील पूर्वेतिहास—इराणी धर्मग्रंथांचा ऐतिहासिक उपयोग करण्यास अडचणी.**

प्रत्येक लेखामध्यें प्रत्यक्ष थोडासा आणि अप्रत्यक्ष बराचसा पूर्वेतिहास आलेला असतो. भारतीय इतिहासाचे धागे तपासतांना उत्तर हिंदुस्थान आणि पश्चिम आशिया यांचा प्रत्यक्ष संबंध काय होता, याविषयीं जसे भारतीय ग्रंथ महत्त्वाचे आहेत तसेच इराणांतील ग्रंथहि महत्त्वाचे आहेत. ग्रंथापेक्षां विशिष्ट कालाच्या लेखांच्या अवशेषांस महत्त्व आहे. अनेक ग्रंथ, त्यांच्या कालाविषयीं संदेह असल्यामुळें निश्चयात्मक विधान करण्यास सहाय्यक होत नाहींत. अशांतच पारशांच्या धार्मिक ग्रंथांची गणना होते. झरथुष्ट्राच्या कालाविषयीं बराच वाद आहे. कित्येक लेखक त्यास खिस्तपूर्व १००–१५० वर्षें इतका अर्वाचीन आणीत आहेत, तर कित्येक खिस्तपूर्व १००० वर्षांच्या पलीकडे तो झाला असावा असें समजत आहेत* आणि या इतक्या भिन्न मतांमुळें इराणी पवित्र ग्रंथांचा ऐतिहासिक उपयोग करणें कठीण होत आहे.

**२५२. इराणी अंकित लेखांचें महत्व.**

इराणी लोकांचे पवित्र ग्रंथ जरी निश्चितकाल नाहींत तरी अनेक अंकित लेखांची गोष्ट अशी नाहीं. दारयवहु ऊर्फ दरायस याचे अंकित लेख हा आपला इतिहासज्ञानासंबंधाचा एक महत्त्वाचा ठेवा आहे, आणि दारयवहूचा बेहिस्तान येथें जो मोठा लेख आहे, त्या लेखाचें महत्त्व इतिहासाला अशोकलेखांइतकें किंबहुना अधिक आहे. जगांतील अत्यंत सुप्रसिद्ध आणि महत्त्वाच्या लेखांमध्यें बेहिस्तानचा लेख मोडतो. दरायसचा बेहिस्तानचा लेख जरी त्याच्या भारतविजयापूर्वींचा आहे तरी भारतविजयोत्तर लेखांपेक्षां हा अधिक व्यापक माहिती देणारा आहे; त्याच्या साम्राज्यांत हिंदुस्थानचा अंतर्भाव करणारा नक्श–इ–रुस्तुम येथील लेख इतकी माहिती देत नाहीं. यासाठीं बेहिस्तानचा लेख आपण साग्र अवलोकिला पाहिजे; कारण त्या लेखांत भारतविषयक कांहीं महत्त्वाची माहिती येऊन गेली आहे. यासाठीं प्रस्तुत लेखाचें मूळ, त्याचें संस्कृतीकरण आणि मराठी भाषांतर हीं पुढें दिलीं आहेत. या लेखांतील कांहीं मुद्यांवर टिपणें दिलीं असतां लेखपरिचयास तीं सहाय्यक होतील.

**२५३. पेशावर येथें मगराज्य.**

या लेखामध्यें पेशावरसंबंधानें उल्लेख आहे. आणि तो असें दाखवीत आहे कीं, पेशावरवर मगांचें राज्य होतें. पैशाची हें नांव चालू होण्याला पेशावर हें शहर कारण होत असलें पाहिजे; किंवा पैशाची व पेशावर या शब्दांचा इतिहास एकमेकांशीं संबद्ध असला पाहिजे. कारण पेशावरला 'पॅशियाहुवाद' असें नांव होतें ही गोष्ट प्रस्तुत लेख उघड करून दाखवीत आहे. पेशावर शब्दाची व्युत्पत्ति 'पिशाचपुर' अशी राजवाडे यांनीं दिली आहे.

**२५४. क्षत्रिय आणि राजन्य.**

या लेखाच्या भाषेकडे देखील लक्ष देणें आपणास हितावह होईल. 'क्षत्र' याचा अर्थ यांत 'राज्य' असा आहे व 'क्षत्रिय' याचा अर्थ 'राजा' असा आहे. ऋग्वेदामध्यें 'राजन्य' हा शब्द वर्गाविषयीं लावला गेला आहे; तथापि 'क्षत्रिय' शब्द उत्तरकालीं इतका लोकप्रिय झाला कीं 'राजन्य' शब्द जवळजवळ मागें पडला; तो जुन्या काळची खुमारी दाखविणाऱ्या कवितेंत मधून मधून दृग्गोचर होतो. [उदाहरणार्थ, 'राजन्यानां सितशरशतैर्यत्र गाण्डीवधन्वा'—कालिदासकृत मेघदूत.] क्षत्रिय ह्या शब्दाचा उपयोग अथर्ववेदांत एका व्याधीच्या अर्थानें केला आहे. 'जो क्षतें उत्पन्न करितो तो क्षत्रिय' असा त्याचा अर्थ करून तो प्रमेह किंवा उपदंश याचा दर्शक असावा अशी कल्पना अनेकांनीं केली आहे (बुद्धपूर्वजग पृ० २८३). क्षतृ असा एक शब्द आला आहे त्याचा अर्थ 'राजपरिवारांतील एक व्यक्ति' असा करितात; उत्तरकालीन धर्मग्रंथांत क्षतृ हा शब्द मिश्रजातिवाचक आहे. एवंच क्षत्रिय या शब्दाचा उपयोग वैदिक संस्कृतीच्या बाहेरील आहे आणि ज्याअर्थी राजन्य हा शब्द मागें पडून क्षत्रिय हा शब्द जास्त प्रचारांत आला त्याअर्थी तो शब्द वापरणाऱ्यांचें सामाजिक प्राधान्य होतें असा निर्णय काढल्याखेरीज गत्यंतर नाहीं. क्षत्रिय शब्दाचा मूल अर्थ लोकांच्या

* उदाहरणार्थ Date of Zoraster by Jarl Charpentier प्रो. चार्पेंटियर आपल्या पुस्तकांत प्रो. हर्टल यांचीं मतें खोडून काढतात. प्रो. चार्पेंटियर, झरथुष्ट्राला बुद्धोत्तर किंवा बुद्धकालीन करावयास मुळींच तयार नाहींत, तर खि. पू. १००० ते ९०० हा काल ठरवितात; याला सर रिचर्ड टेंपल यांची संमति आहे. (review in JRAS)

दृष्टिपथांत नसल्यामुळें कालिदासासारखे अलंकार वापरणारे कवि त्यावर अर्थदर्शक भाष्य करूं लागले. 'क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः । क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः,' म्हणजे क्षतांपासून संरक्षण करतो तो क्षत्रिय होय असें पांडित्य कालिदास आपल्या रघुवंशांत करतो. क्षत्रिय हा शब्द जरी नाहीं तरी क्षत्र शब्द ऋग्वेदांत आहे. त्याचा अर्थ राज्य किंवा अधिकार असल्याचें पुढील ऋचेंत दिसून येईल.

**क्षत्राय त्वं श्रवसे त्वं महीया**
**इष्टये त्वमर्थमिव त्वमित्यै**
**विसदृशा जीविताभिः प्रचक्ष**
**उषा अजीगर्भुवनानि विश्वा**

ऋग्वेद १. १३३. ६.

कोणी क्षत्रासाठीं (अधिकारासाठीं), कोणी कीर्तिसाठीं (श्रवसे), कोणी मोठ्या द्रव्यासाठीं (महीया इष्टये), कोणी आर्थिक हेतूनें (अर्थ इत्यै), जावें याप्रमाणें भिन्नभिन्न जीवनोपाय (विशादृडः) साधण्यासाठीं उषेनें सर्वास जागृत केलें आहे.

क्षत्र याचा अर्थ अधिकार असा इराणी आणि भारतीय या लोकांमध्यें असावा. त्याचा अर्थ पुढें इराणी लोकांत सर्वात मोठा म्हणजे राज्याचा अधिकार असा प्रचलित झाला. 'क्षत्रिय' याशीं सदृश असलेला शब्द "क्षायथिय" हा राजा या अर्थानें इराणी लोकांनीं प्रचलित केल्यानंतर त्याचें पुन्हां संस्कृतीकरण होऊन तो शब्द पुढें भारतीय वाङ्मयांत प्रचलित झाला असा क्षत्रिय शब्दाचा इतिहास दिसतो. असें मात्र समजूं नये कीं दारियसच्या नंतर क्षत्रिय शब्द इकडे वापरला गेला. कारण इराणी लोकांचे म्हणजे कैकेयांचे परिणाम भारतावर कुरुयुद्धपूर्वकालापासून होत होते.

## २५५. दारयवहूची धार्मिक भावना आणि झरथुष्ट्र

२५५. बेहिस्तानमधील लेख दुसऱ्या एका कारणामुळें महत्त्वाचा आहे, तें कारण म्हटलें म्हणजे दरायसची धार्मिक वृत्ति हें होय. त्याच्या लेखांमध्यें एकदेवनिष्ठा दिसून येत आहे. अहुरमज्दानें आपणांस मोठें केलें, असें वारंवार सांगून आपल्या यशाचें श्रेय तो अहुरमज्दासच देत आहे. अशा तऱ्हेची एकदेवनिष्ठा, त्याचप्रमाणें कर्तृत्व ईश्वराधीन आणि आपण केवळ निमित्ताला कारण आहों अशी भावना या लेखांत व्यक्त झाली आहे, व ती देखील पाठीमागचा धार्मिक विचाराचा इतिहास पाहातां विशिष्ट विचारविकासाची पूर्णावस्था आहे असें वाटल्याखेरीज राहात नाहीं. त्याच्या धार्मिक उद्गारांमध्यें तो झरथुष्ट्राचा उल्लेख करीत नाहीं ही गोष्ट देखील लक्षांत ठेवण्याजोगी आहे; त्यावरून झरथुष्ट्र हा दारयवहूच्या काळापूर्वी नव्हता किंवा त्याच्या काळांत फारसा मान्य नव्हता, निदान त्यानें जुन्या मगधर्माला दिलेलें वळण राजमान्य झालें नव्हतें या गोष्टीची सूचक आहे.

विशिष्ट देवप्राधान्यमूलक एकेश्वरतेचा विकास सर्व देशांत होत होता. हिंदुस्थानांत त्या पद्धतीनें शिव आणि विष्णु यांस प्राधान्य उत्पन्न होत होतें. यहुदी लोकांत जुहोवाला प्राधान्य आलें आणि इराणी लोकांत अहुरमज्दाला आलें. वैदिकांत एकाकाळीं वरुणांस तर दुसऱ्याकाळीं प्रजापतीस आलें होतें. विशिष्ट देवतेला प्राधान्य द्यावयाची ही सामान्य जनांची पद्धत होती तर तत्त्वदृष्टीनें "ब्रह्म" सारखें तत्त्व काढून त्याला महत्त्व देण्याची तत्त्ववेत्त्यांची पद्धत होती.

## २५५ अ. शकांचा पंजाबवर पगडा.

२५५ अ. शकांचा पगडा पंजाबवर होता असें बेहिस्तानच्या लेखावरून बाबू नगेंद्रनाथ वसु सिद्ध करूं पहात आहेत; तथापि लेखावरून शकांचा पगडा पंजाबवर होता असें सिद्ध न होतां मगांचा होता असें सिद्ध होत आहे.

## २५६. बेहिस्तानच्या लेखाचें मूळ आणि अर्थ. पंक्तिस्तंभ पहिला.

बेहिस्तानच्या सुप्रसिद्ध लेखाचें मूळ त्याचें संस्कृतीकरण आणि भाषांतर हीं दिलीं आहेत. हें संस्कृतीकरण शापुरजी कावसजी होडीवाला यांनीं केलेलें असून तें जसेंच्या तसेंच दिलेलं आहे. संस्कृत छायेंत मूळांतील अर्थ पूर्णपणें व्यक्त न करितां त्याशीं सदृश असा संस्कृत शब्द देण्याचा प्रयत्न या रूपांतरांत झाला आहे. कृति निर्दोष आहे असें नाहीं. या तऱ्हेचे अनेक प्रयत्न पूर्वी झालेले आहेत. त्यांत खर्शेटजी रुस्तुमजी कामा या एका पारशी गृहस्थाचा आणि प्रो. कोस्लेविस्त्र या रशियन पंडिताचा उल्लेख त्रैमासिकाच्या * संपादकांनीं केलेला आहे. संस्कृतीकरण अनेक ठिकाणीं सुधारतां येण्याजोगें आहे असें तें वाचतांना वाचकास वाटेल, तथापि पूर्वीच्या एका प्रयत्नाचें फल जसेंच्या तसें देणें युक्त आहे म्हणून दिलें आहे.

* The Journal of the K. R. Cama Oriental Institute No. 19.

२५७. पंक्तिस्तंभ १ ला.

१. अदम् दारयव( हु )उश् क्षायथिय(:) वझ्रक(:) क्षायथाय(:) क्षायथियानाम् क्षायथिय(:) पार्सैय् क्षायथिय(:) दह्युनाम्* विश्तास्पह्या पुथ्र(:) अर्शामह्या नपा हखामनिशिय(:)

१. अहं दारयवहुः क्षत्रियः वज्रकः क्षत्रियः क्षत्रियाणां क्षत्रियः पार्से क्षत्रियः दस्यूनां विश्तास्पस्य पुत्रः अर्शामस्य नप्ता हखामनिशियः

१. मी दारयवहु राजा, राजांचा बलाढ्य राजा, पार्सा (देशां)त राजा, देशाचा राजा, विश्तास्पाचा पुत्र (व) अर्शामचा पौत्र, हखामनिशिय (आहें).

२. थातिय् दारयव(हु)उश् क्षायथिय(:) मना पिता विश्तास्प विश्तास्पह्या पिता अर्शाम अर्शामह्या पिता अरियारम्न अरियारम्नह्या पिता चिशूपिश् चिशपेश् पिता हखामनिश्

२. शास्ति दारयवहुः क्षत्रियः मम पिता विश्तास्पः विश्तास्पस्य पिता अर्शामः अर्शामस्य पिता अर्यारम्नः अर्यारम्नस्य पिता चिशूपिः चिशूपेःपिता हखामनिः

२. दारयवहु राजा आदेशित आहे कीं, माझा पिता विश्तास्प, विश्तास्पाचा पिता अर्शाम, अर्शामचा पिता अर्यारम्न, अर्यारम्नाचा पिता चिशिप, (व) चिश्पीचा पिता हखामनि ( होता ).

३. थातिय् इ० † अवह्यरादिय् वयम् हखामनिशिया थह्यामह्य् हचा परुवियत(:) आमाता(:) अमह्य् हचा परुवियत(:) ह्या अमाखम् तौमा क्षायथिया आह(न्)

३. शास्ति० अस्मात्—हि वयं हखामनिशियाः शस्यामहे सचा पूर्व्यतः आमात्याः स्मसि सचा पूर्व्यतः ये अस्माकं तोक्माः क्षत्रियाः आसन्

३. आज्ञापित आहे कीं, या कारणामुळें आम्हांला ‘ हखामनिशिय ’ (असें) म्हणतात. आम्ही पूर्वापार अमात्य ( राजे ) आहोंत; पूर्वापार जे आमच्या कुळांतील ( होते ), ते राजे होते ( होऊन गेले ).

४. थातिय् इ० मना तौमाया त्यैय् परुवम् क्षायथिया अह(न्) अदम् नवम(:) ९ दुवितापरनम् वयम् क्षायथिया अमह्य्

४. शास्ति० अष्ट मम तोक्माः त्ये पूर्वम् क्षत्रियाः आसन् अहं नवमः द्वितापर्णम् वयं क्षत्रियाः स्मसि

४. आज्ञा० पूर्वी, जे राजे होते असे माझे पूर्वज आठ होते. मी नववा (आहें); दोन घराण्यांत मिळून आम्ही ९ राजे होतों.

५. थातिय् इ० वश्ना अहुरमझ्दाह अदम् क्षायथिय अमिय् अ(हु)उर्मझ्दा क्षथ्रं मना फ्राबर(:)

५. शास्ति० वासना अहुरमज्दस्य अहं क्षत्रियः अस्मि अहुरमज्दः क्षत्रं मम प्राभरत्

५. आज्ञा० अहुरमज्दाच्या कृपेनें मी राजा आहें. अहुरमझ्दानें मला राजत्व दिलें.

६. ( थातिय् इ० ) इमा दह्याव(:) त्या मना पतियाइशन् वश्ना अ( हु )उरमझ्दाह(:) अदम्शाम् क्षायथिय(:) आहम् फ्रहरवम् दह्याव (:) २३

६. शास्ति० इमाः दस्यवः त्याः मम (मां) प्रत्यैष्यन् वासना अहुर्मज्दस्य अहं क्षत्रियः आसम् प्रसर्वम् दस्यवः २३

६. आज्ञा० माझ्याकडे हे देश एकंदर तेवीस‡ आले, ज्यांचा अहुरमज्दच्या कृपेनें मी राजा झालों.

* दह्यु किंवा दस्यु याचा अर्थ प्रांत किंवा देश; जित राष्ट्रें असा लावण्याची प्रवृत्ति आहे; राक्षस आणि वैरी असाहि अर्थ कधीं कधीं होतो. तेथें हा शब्द पुल्लिंगी आहे. अवेस्तांत स्त्रीलिंगी आहे.

† थातिय् इ० शब्द प्रत्येक परिच्छेदाच्या प्रारंभीं येत आहेत.

§ प्रो. अर्नेस्ट हर्जफेल्ड ( Prof. Ernest Herzfeld ) यांनीं हे नऊ राजे डॉ. जे. जे. मोदी मेमोरिअल व्हॉ. पृ. १८७ मध्यें खालीलप्रमाणें दिले आहेत.

| | | |
|---|---|---|
| १. चाहिश्पिश्, थोर राजा, अंझानचा राजा. | ४. सायरस दुसरा थोर राजा | ७. अशीम |
| २. सायरस पहिला, थोर राजा | ५. कॅंबीसिस् दुसरा ,, | ८. विश्तास्प |
| ३. कॅंबीसिस् पहिला, ,, | ६. अर्यारान्म, राजा | ९. दारियस, थोरराजा |

‡ ह्या तेवीस देशांचीं नांवें:— पार्स (:) (=पर्शिया), (हु) उवज(:) (=सुशियाना), बाबिरुश् (=बाबिलोन), अथुरा (=असीरिया), अरबाय (क) (=अरबस्तान), मुद्राय (:) (=मिसर, इजिप्त), समुद्राचे किंवा समुद्रकांठचे भूभाग, स्पर्द (:) (=सार्डीस्, लीडियाची राजधानी), यौना (=आयोनियन् देश), माद (:) (=मीडिया), अर्मिन (:) (=अर्मीनिया), कतपतुक (:) (=कॅंप्पाडोसिया), पार्थव (:) (=पार्थिया), झर(न्) क (:) (=द्रगियाना), हरैव (:) (=हिरात) (हु) उवाराझ्मिय (:) (=कोरस्मिया), बाख्त्रिश् (=बॅक्ट्रिया) सुगुड (:) (=सोगडियाना), ग(न्) दार (:) (=कंदाहार), सक (:) ( =सीथिया ), थातगुश् (=सत्तजीदिया), हर (हु) उवतिश् (=अरकोशिया), मक (:) (=मक्रान).

७. (थातिय् इ०) वश्ना अहुर-मझ्दाह (:) मना व (न्) द्का आह (न्)ता मना बाजिम् अबर (न्) ता त्यशाम् हचाम (:) अथाह्य् क्षपवा रौचपतिवा अव अकुनवय(न्) ता

८. ( थातिय् इ० ) अन्तर् इमा दह्याव(:) मर्तिय(:) ह्य(:) दौष्टा आह(:) अवं (हू)उब्रतं अबरं ह्य(:) अरैक(:) आह(:) अवं (हू)उफस्तं अप्रसम्. वश्ना अ(हू)उरमझ्दाह(:) इमा दह्याव (:) त्यना मना दाता आपरिया-य(न्). यथाशां हचाम(:) अथहूय् अवथा अकुणव(न्)ता.

९. ( थातिय् इ० ), अ(हू)उर-मझ्दा मना क्षथ्रं फ्राबर(:).अ(हू)-उरमझ्दा मेय् उपस्तां अबर(:), यथा इम (:) क्षथ्रं अदारय्. वशूना अ(हू)उरमझ्दाह(:) इम(:) क्षथ्रं दारयामिय्.

१०. ( थातिय् इ० ), इम(:) त्य(:) मना कर्तं पसाव( : ) यथा क्षायथिय(:) अबवम्. क(न्) बुजि-य( : ) नाम(न्) कूरौश् पुथ्र(:) अमाखं तौमाया; हौव...इदा क्षायथिय( : ) आह( : ). अवह्या क (न्)बुजियह्या ब्रता बर्दिय( : ), नाम(:) आह(:). हमाता हमपिता क ( न् ) बुजियहया पसाव ( : ) क ( न् ) बुजिय ( : ) अवं बर्दियं अवाज ( न् ). यथा क ( न् ) बुजि-य (:) बर्दियं अवाज ( न् ) कारह्या नैय् अझ्दा अबव( : ), त्य( : ) बर्दिय अवजत(:) पसाव(:) क-(न्) बुजिय(:) मुद्रायं अशियव(:) यथा क( न् )बुजिय( : ) मुद्रायं अशियव( : ) पसाव( : ) कार(:) अरैक( : ) अबव( : ) पसाव(:) द्रंग(:) दह्योवा वसिय् अबव (:) उता पार्सैय् उता मादैय् अनिया-(उ)वा दह्युशुवा.

७. शास्ति० वासना अहुर्मज्दस्य मम बद्धकाः आसन् मम भागं अभरन्त त्यत् ( अमीषाम् ) सचा मत् अशासि क्षपासु रोचिष्प-तिषु तत् अकृण्वन्त

८. शास्ति० अन्तर् इमान् दस्यवः मर्त्यः यः जुष्टः आस तं सुभृतं अभरम् यः अरिकः आस तम् सुपृष्टं अपृच्छम् वासना अहुर्मज्दस्य इमाः दस्यवः त्याः मम ज्ञाता (नि) पर्या-यन् यथा(ते)षां सचा मत् अशासि एवं अथ अकृण्वन्त

९. शास्ति० अहुर्-मज्दः मम क्षत्रं प्राभरत् अ-हुर्मज्दः मे उपस्थं अभरत् यथा इमत् क्षत्रं अधारि वासना अहुर्मज्दस्य इमत् क्षत्रं धारयामि

१०. शास्ति० इमत् त्यत् मम कृतं पश्चा वा यथा क्षत्रियः अभवम् कंबुजि-यः नाम्ना कूरोः पुत्रः अस्माकं तोक्मयः असौ..इह क्षत्रियाः आस अस्य कंबुजियस्य भ्राता बर्दियः नाम्ना आस सममाता समपिता कंबुजियस्य पश्चा वा कंबुजियः एनं बर्दियं अवाहन् यथा कंबुजि-यः बर्दियं अवाहन् कारस्य नहि आज्ञा (ज्ञानं) अभवत् त्यत् बर्दियः अवहतः पश्चा वा कं-बुजियः मुद्रायं अच्यवत् यदा कंबजियः मुद्रायं अच्यवत् पश्चा वा कारः अरिकः अभवत् पश्चा वा द्रोहः देशे वशी अभवत् उत पार्से उत मादे उत अन्ये-षु देशेषु

७. आज्ञा० अहुरमज्दाच्या कृपेनें ते माझ्या अंकित झाले; त्यांनीं मला खंडणी दिली. माझ्या कोणत्याहि आज्ञा त्यांनीं रात्रंदिवस पाळल्या.

८. आज्ञा० या देशांत जो मनुष्य माझा मित्र होता, त्याला मी चांगलें साह्य केलें; जो शत्रु होता, त्याला मीं चांगलें शासन केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें हे देश माझे कायदे पाळणारे होते. मी ज्याप्रमाणें आज्ञा केली त्या-प्रमाणें त्यांनीं केलें.

९. आज्ञा० अहुरमज्दानें मला राजत्व दिलें, अहुरमज्दानें मला साह्य केलें. त्यामुळें हें राज्य (मला) मिळालें. अहुरमज्दाच्या कृपेनें मी राज्य करितों.

१०. आज्ञा० मी राजा झाल्यानंतर जें कांहीं केलें तें हें: कंबुजिय (कॅबी सिस ) नांवाचा कुरूचा (सायरसचा) पुत्र आमचा ( आप्त ) होता; तो येथें राज होता. त्या कंबुजियाचा भाऊ बर्दि ( स्मेर्डिज् ) नांवाचा होता; त्याची आ व बाप हीं कंबुजियाचींही (मातापितरें होतीं. नंतर कंबुजियानें बर्दियाला ठा केलें; जेव्हां कंबुजियानें बर्दियाला ठा केलें तेव्हां सैन्याला बर्दिय मारल गेला हें ठाऊक नव्हतें. नंतर कंबुजि इजिप्तला गेला. जेव्हां कंबुजिय इजि प्तला गेला तेव्हां सैन्य शत्रु झालें. पु देशांत त्याचप्रमाणें पार्स आणि माद इतर देश यांत द्रोह फार माजला.

११. ( थातिय् इ० ), पसाव(:) १ मर्तिय (:) मगुश् आह(:) गौमात (:) नाम (न्). हौव् उद्पतता ह्चा पैशियाा (ह्) उवादाया. अरकद्रिश् नाम (न्) कौफ(:); ह्चा अवद्श्(:) वियखह्य माह्या १४ रौचाबिश् थकता आह (:), यदिय् उद्पतता. हौव कारह्या अवथा अदुरुजिय (:) अदं बर्दिय(:) अमिय् कुरौश् पुथ्र(:), क(न्)बुजियह्या ब्राता. पसाव(:) कार(:) हरुव(:) हमिथ्रिय(:) अबव(:) ह्चा क(न्)बुजिया(:), अविय् अवं अशियव(न्), उता पार्स(:) उता माद्(:) उता अनिया द्ह्याव(:). क्षथ्रं हौव् अग्रबायता गर्मपद्ह्या माह्या ९ रौचाबिश् थकता आह(:) क्षथ्रं अग्रबायता. पसाव (:) क(न्)बुजिय(:) (ह्) उवा—मर्शियुश् अम्रियता.

११. शास्ति० पश्चा वा
१ मर्त्यः मगुः आस
गौमातः नाम्ना असौ
उदपतत् सचा पैशियाहुवा-
दया अरकद्रिः नाम्ना कू-
पकः सचा अतः वियख्नस्य
मासस्य १४ रुचामिः
( रुग्भिः ) सक्ता ( भिः )
आस यदि उदपतत् असौ
कारस्य एवं अथ अद्रुह्यत्
अहं बर्दियः अस्मि यः कुरोः
पुत्रः कंबुजियस्य भ्राता
पश्चा वा कारः सर्वः अमै-
त्रेय अभवत् सचा कं-
बुजियेन अभि एनं अच्यव-
न् उत पार्सान् उत मादान्
उत् अन्यान् देशान् क्षत्रं असौ
अग्रभयत् गर्मपदस्य मासस्य ९
रुचिभिः ( रुग्भिः ) सक्ता
( भिः ) आस क्षत्रं
अग्रभयत् पश्चा वा कं-
बुजियः स्वमृत्युना अम्रियत

११. आज्ञा० नंतर एक 'मग' मनुष्य गौमात नांवाचा होता, तो* पैशियाहुवादहून उठला. अरकद्रि नांवाचा पर्वत ( आहे ); तेथून, वियख्न महिन्याचे चौदा दिवस झाल्यावर त्यानें बंड उभारलें. त्यानें सैन्याला अशा रीतीनें फसविलें कीं 'मी कुरूचा पुत्र ( व ) कंबुजियाचा भाऊ जो बर्दिय तो आहें; नंतर सर्व सैन्य कंबुजियाशीं शत्रु झालें, व त्याच्याशीं पार्स, माद ( पर्शिया, व मीडिया ) आणि इतर प्रांतांना गेलें. त्यानें त्या प्रांतांचें राज्य घेतलें; गर्मपद महिन्यांतील ९ दिवस पूर्ण झाल्यावर त्यानें तें राज्य घेतलें. पुढें कंबुजिय स्वमृत्यूनें मेला ( त्यानें आत्महत्या केली ).

१२. ( थातिय् इ० ), एत (:) क्षथ्रं त्य गौमात (:) ह्य (:) मगुश् अदिना क(न्) बुजियं, एत (:) क्षथ्रं ह्चा परुवियत (:) अमाखं तौमाया आह (:) पसाव (:) गौमात(:) ह्य(:) मगुश् अदिना क(न्)बुजियं उता पार्सं उता मादं उता अनिया द्ह्याव(:); हौव् आयस्ता (ह्)उवैपशियम् अकुता; हौव् क्षायथिय(:) अबव (:).

१२. शास्ति० एतत्
क्षत्रं त्यत् गौमातः यः मगुः
अह्निनोत कंबुजियं एतत्
क्षत्रं सचा पूर्व्यतः अस्माकं
तोक्मस्य (तोक्म्यं) आस पश्चा वा
गौमातः यः मगुः अह्निनोत
कंबुजियं उत पार्सं उत
मादं उत अन्याः दस्यवः
असौ आयसत् स्वपतित्वं
अकृत सः क्षत्रियः अभवत्

१२. आज्ञा० त्या मग गौमातानें, पूर्वीपासून जें आमच्या घराण्याचें होतें असें तें राज्य कंबुजियाकडून घेतलें. नंतर त्या मग गौमातानें कंबुजियाकडून पार्स, माद आणि इतर प्रांत घेतले. त्यानें स्वायत्तता मिळविली ( व ) ती उपयोगांत आणिली; तो राजा झाला.

१३. (थातिय् इ० ).—नेय् आह (:) मर्तिय (:) नेय् पार्स (:) नेय् माद (:), नेय् अमाखं तौमाया कश्चिय्, ह्य (:) अवं गौमातं त्यं मगुं क्षथ्रं दितं चखिया (:) कारशिम् ह्चा दर्श अत्रस(:) कारं वसिय् अवाजनिय(:) ह्य(:)

१३. शास्ति० नैव ( नहि )
आस मर्त्यः नहि पार्सः
नहि मादः नहि अस्माकं तोक्-
म्यः कश्चित् यः एनं गौमातं
त्यं, मगु क्षत्रं ह्रितं चक्रिरे (चक्रे)
कारः एनं सचा धृषुं अत्रस्यत्
कारं उश्या ( उशीभिः )
अवहन्यात् यः

१३. आज्ञा० पार्स ( पर्शियन ) माद ( मीडियन् ) किंवा आमचा नातलग असा कोणीहि मनुष्य नव्हता कीं ज्यानें या मग ( मॅगियन् ) गौमाताला राज्यविहीन केलें.

* पेशावर.

परनं बर्दियं अदाना(:) अवह्य-रादिय् कारं अवाजनिया(:) मा-त्यमां क्ष्नासातिय् त्य(:) अदं नेय् बर्दिय(:) अमिय् ह्य(:) कुरौश् पुथ्र(:) कश्चिय् नेय् अद्दश्नौश् चिश्चिय् थस्तनेय् परिय् गौमातं त्यं मगुं याता अदं अरसम्. पसा-व(:) अदं अ(हु) उरमझ्दां पतिया-वहयेय् अ(हु)उरमझ्दा मेय् उप-स्तां अबर(:)बागयादेश् माह्या १० रौचाबिश् थकता आह(:) अवथा अदं हदा कम्नेबिश् मर्तियेबिश् अवं गौमातं त्यं मगुं अवाजनं उता त्येशेय् फ्रतमा मर्तिया अनु-शिया अह(न्)ता. शिकय(हु)उव-तिश् नामा दिदा निशाय नामा दह्यौश् मोदय् अवदशिं अवाज-नम् क्षथ्रंशिं अदं अदिनं. वश्ना अ(हु) उरमझ्दा (:) अदं क्षायथिय्(:) अबवं अ (हु) उरमज्दा क्षथ्रं मना फ्राबरा (:)

पुराणं बर्दियम् अजानात् अस्मात् हि कारं अवहन्यात् मा त्यः मां जिज्ञासति त्यत् अहं नहि बर्दियः अस्मि यः कुरोः पुत्रः कश्चित् नहि अधृष्णोत् किंचित् शासनाय परि गौमातं त्यं मगुं यावत् अहं आर्षम् पश्चा वा अहं अहुर्मज्दं प्रत्यै-मही अहुर्मज्दः मह्यं उप-स्थं अभृत [बगयादेः मासस्य १० रूभिः सक्ता आस] एवं अथ अहं सह कतिभिः मर्त्यैः इमम् गौमातं त्यं मगुं अवाहनम् उत तस्य प्रथमाः मर्त्याः अनु-शयिनः ( आसत ) आसन् ( तान् ) शिकयहुव-तिश नाम्ना देही निशाय नाम्ना दस्युः (देशः) मादे अध तं अवाह-नम् क्षत्रं तं अहं आदाम् वासना अहुर्मज्दस्य अहं क्षत्रियः अभवम् अहुर-मज्दः क्षत्रं मां प्राभरत्

बर्दियाला पूर्वी (पूर्ण) ओळखत असलेलें सैन्य, तो आपला संपूर्ण संहार करील म्हणून अतिशय भीत असे. त्यानें सैन्याचा या कारणामुळें संहार केला असता कीं, कुरूचा पुत्र, जो बर्दिय तो आपण नाहीं, हें मला समजूं नये. मी येईपर्यंत कोणीहि त्या मग ( मॅगियन ) गौमाताविरुद्ध कांहीं बोलण्यास धजत नव्हता. पुढें (नंतर) मी अहुरमज्दापाशीं गेलों (त्याची प्रार्थना केली ). अहुरमज्दानें मला साह्य केलें; बगयादि महिन्याचे १० दिवस पूर्ण झाले तेव्हां थोड्या मनुष्यांनिशीं मी त्या मग ( मॅगियन ) गौमाताला व त्याच्या प्रमुख अनुया-यांना ठार केलें. शिकयहुवतिश नांवाचा किल्ला ( आणि )निशाय नांवाचा देश मादमध्यें आहे तेथें त्याला मी ठार केलें, ( व ) त्याच्याकडून मी राज्य घेतलें. अहुरमज्दाच्या कृपेनें मी राजा झालों. अहुरमज्दानें मला राजत्व दिलें.

१४. (थातिय् द०) क्षथ्रं त्य(:) हचा अमाखं तौमाया (:) परा-बर्तं आह (:) अव (:) अदं पति-पदं अकुनवं अदंशिं गाथवा अवास्तायम्. यथा परुवंचिय् अवथा अदं अकुनवम्. आयदना त्या गौमात (:) ह्य(:) मगुश् वियक(न्), अदं नियथ्रारयम्; कारह्या अबाचरिश् गेथांचा मा-नियंचा विथेबिशूचा त्यादिश् गौमात (:) ह्य (:) मगुश् अ-दिना (:). अदं कारं गाथवा अवस्तायं पार्सचा मादंचा उता अनिया दह्याव (:), यथा परुवं-चिय् अवथा अदं त्य(:) परावर्तं पतियाबरम्; वश्ना अ( हु )-उरमझ्दाह(:) इम(:) अदं अकुनवम्. अदं हमताक्षेय् याता

१४. शास्ति० क्षत्रं त्यं सचा अस्माकं तोक्मात् परा-भृतं आस एतत् अहं प्रति-पदं अकरवम् अहं तं गातुपु अवस्थापयम् यथा पूर्वंचित् एवं अथ अहं अकरवम् यजनान् त्यान् गौमातः यः मगुः व्यखनत् अहं न्यतारयम् कारस्य अवचारं गेहं च ( निर )-माणं—च विडभिश्च त्याः गौमातः यः मगुः अ-हिनोत् अहं कारं गातुपु अवास्थापयम् पार्सं च मादं च उत अन्यान् देशान् यथा पूर्वं-चित् एवं अथ अहं यः पराभृतं प्रत्याभरम् वासना अहु-र्मज्दस्य इमत् अहं अकरवम् अहं समतक्षे यथा

१४. आज्ञा० आमच्या पूर्वजां-पासून जें राजत्व घेतलें गेलें होतें तें मी मूलस्थानीं प्रस्थापित केलें. मी तें ठिकठिकाणीं स्थापन केलें. जसें तें पूर्वी होतें तसेंच मी तें केलें. यजनस्थलें, जीं त्या मग गौमा-तानें नष्ट केलीं होतीं, तीं मी पुनः प्रस्थापित केलीं; ( त्याचप्रमाणें ) सैन्याचीं क्षेत्रें, घरेंदारें आणि निवास-स्थानें व घराणीं, जीं त्या मग गौमातानें बळकाविलीं होतीं, तीं मी पुन्हा मिळविलीं. मी पार्स, माद (मीडिया) आणि इतर प्रांत यांमधून योग्य ठिकाणीं सैन्य ठेविलें. पूर्वी होत्या त्याचप्रमाणें, नेल्या गेलेल्या (वस्तु) मी परत आणिल्या, अहुरम-ज्दाच्या कृपेनें मी या गोष्टी केल्या.

**विथं त्यां अमाखं गाथवा अवास्तायं, यथा परुवंचियू अवथा अदं हमतक्षेयू. वशूना अ(हु)उरमझूदाह (:) यथा गौमात(:) ह्य (:) मगुश् विथं त्यां अमाखं नेयू पराबर(:)**

**विशं त्यां अस्माकं गातुषु अवास्थापयम् यथा पूर्वंचित् एवं अथ अहं समतक्षे वासना अहुर्मज्दस्य यथा गौमातः यः मगुः विशं त्याम् अस्माकं नहि पराभरत्**

मी आमचें (राज) घराणें (मूलस्थानीं) पूर्वीप्रमाणें प्रस्थापित होईपर्यंत प्रयत्न केला. अहुरमज्दाच्या कृपेनें, तो मग गौमात आमचें (राज)-घराणें नष्ट करणार नाहीं असा प्रयान केला.

**१५. (थातियू इ०) इम(:) त्य(:) अदं अकुनवं पसाव(:) यथा क्षायथिय(:) अबवम्.**

**१५. शास्ति० इमत् त्यत् अहं अकरवम् पश्चा वा यथा क्षत्रियः अभवम्**

१५. आज्ञा० मी जें कांहीं केलें तें हें; नंतर मी राजा झालों.

**१६. (थातियू इ०), यथा अदं गौमातं त्यं मगुं अवाजनम्. पसाव (:) १ मर्तिय (:) आत्रिन (:) नाम (न्), उपदर(न्)मह्या पुथ्र (:), हौवू उद्पतता (हु)उवजेयू. कारह्य अवथा अथाह(:) अदं (हु)उवजेयू क्षायथिय(:)अमियू. पसाव (:) (हु)उवूजिया हमिथ्रिया अबव (न्), अबियू अवं आथ्रिनं अशियव(न्). हौवू क्षायथिय (:) अबव (:) (हु) उवजेयू. उता १ मर्तिय (:) बाबिरुविय (:) नदि(न्)तबैर (:) नाम(न्) ऐनारह्य पुथ्र (:), हौवू उद्पतता बाबिरौवू कारं अवथा अदुरुजिय (:): अदं नबुकुद्रचर (:) अमियू, ह्य (:) नबुनैतह्या पुथ्र (:). पसाव (:) कार (:) ह्य (:) बाबिरुविय (:) हरुव (:) अबियू अवं नदि (न्)-तबैरं अशियव (:) बाबिरुश् हमिथ्रिय(:) अबव(:) क्षथ्रं त्य (:) बाबिरौवू हौव अग्रबायता.**

**१६. शास्ति० यथा अहं गौमातं त्यं मगुं अवाहनम् पश्चा वा १ मर्त्यः आत्रिणः नाम्ना उपदरमस्य पुत्रः असौ उदपतत् हुवजे कारस्य एवम् अथ अशासत् अहं हुवजे क्षत्रियः अस्मि पश्चा वा हुवजाः अमैत्रेयाः अभवन् अभि एनं आत्रिणं अच्यवन् सः क्षत्रियः अभवत् हुवजे, उत १ मर्त्यः बाबिरुवियः नदिन्तबैरः नाम्ना ऐनरस्य पुत्रः असौ उदपतत् बाबिरौ कारं एवं अथ अमुह्यत् अहं नबुकुद्रचरः अस्मि यः नबुनैतस्य पुत्रः पश्चा वा कारः यः बाबिरुवियाः सर्वाः अभि एनं नदिन्तबैरं अच्यवत् बाबिरुः अमैत्रेयः अभवन् क्षत्रं त्यत् बाबिरौ असौ अग्रभयत्**

१६. अशा रीतीनें मी त्या मग गौमाताला ठार केलें. पुढें एका आत्रिण नांवाच्या, उपदरमाच्या पुत्रानें उवज (सुशिआना) मध्यें बंड उभारलें. त्यानें सैन्याला असें सांगितलें: 'मी उवज (सुशिआना)-चा राजा आहें.' पुढें (सुशिआनिअन्) उवज शत्रु झाले; आणि त्या आत्रिणापाशीं गेले. तो सुशिआनांत राजा झाला; आणि एक नदिन्तबैर (निदिन्तु–बेल) नांवाचा बाबिलोनियन्, ऐनाराचा पुत्र, त्यानें बाबिलोनमध्यें बंड उभारलें. त्यानें सैन्याला अशा प्रकारें फसविलें 'मी नबुकुद्रचर (नेबुचद्नेझर) असून नबुनैताचा पुत्र आहें. तेव्हां तें सर्व बाबिलोनियन सैन्य त्या नर्दितबैर (निदिन्तु–बेल) पाशीं गेलें. बाबिलोन शत्रु झालें. (आणि) बाबिलोनचें राज्य त्यानें घेतलें.

**१७. (थातियू इ०) पसाव (:) अदं (कारं) फ्राइश्यं (हु)उवजम्. हौवू अथ्रिन (:) बस्त (:) अनयता अबियू माम्. अदंशि अवाजनम्.**

**१७. शास्ति० पश्चा वा अहं कारं प्रैषयम् हुवजं असौ आत्रिणः बद्धः अनीयत अभि मां अहं तं अवाहनम्**

१७. आज्ञा० नंतर मी सुशिआनाला सैन्य पाठविलें. त्या आत्रिणाला बद्ध करून माझ्यासमोर आणण्यांत आलें; मी त्याला ठार केलें.

१८. (थातिय् इ०) पसाव(:) अदं बाबिरुं अशियवं अवियू अवं नदि(न्)तबैरं, ह्य (:) नबु-कु(उ)द्रचर (:) अगौबता कार(:) ह्य(:) नदि(न्)-तबैरह्या तिग्रां अदारय (:) अवदा अ(ह्)इशतता उता अविश् नाविया आह (:). पसाव (:) अदं कारं मश्का(ह्)उवा अवा-कनम् अनियां (उ)शबारिं अकु-नवं अनियह्या अस्पा फ्रयानयम् अ(ह्)उरमझ्दामेय् उपस्तां अबर (:); वश्ना अ(ह्)उर-मझ्दाह (:) तिग्रां वियतरयाम. पसाव (:) अवदा कारं त्यं नदि-(न्)तबैरह्या अदं अजनं वसियू आथ्रियादियह्या माह्या २६ रौचा-बिश् थकता आह (:) अवथा हमरनम् अकुमा.

१८. शास्ति० पश्चा वा
अहं बाबिरुं अच्यवम् अभि एनं
नदिन्तबैरं यः नबु-
कुद्रचरः अगोपयत्
कारः यः नदि-
न्तबैरस्य तिग्रां अधारयत् अवत
अतिष्ठत उत अभितं
नाविकः आस पश्चा वा
अहं कारं मशकेषु अवा-
कनवम् अन्यं उष्ट्रभरं अक-
रवम् अन्यस्य अश्वान् प्राणयम्
अर्हुमज्दः मह्यः उपस्थं
अभूत वासना अहु-
र्मज्दस्य तिग्रां व्यतरयाम
पश्चा वा अवतः कारं त्यं नदि-
न्तबैरस्य अहं अहनम् उशीभिः
अत्रियादियस्य मासस्य २६ रू-
ग्भिः सक्ता (भिः) आस एवं अथ
समरं अकुर्म

१८. आज्ञा० पुढें मी बाबिलोनला स्वतःला नबुकुद्रचर म्हणवीत असलेल्या त्या नदिन्तबैर (निदिन्तु-बेल) वर चालून गेलों. नदि-न्तु-बैरचें सैन्य तैग्रिस (तिग्रा) ला धरून राहिलें, (आणि) तेथें तो थांबला; आणि त्याच्याजवळ एक नावि-कांची पलटण होती. नंतर मी सैन्याला चामड्याच्या तराफ्यांवर उभें केलें. एक भाग उंटांवर बसविला, दुसऱ्याक-रितां मी घोडे आणिले. अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें मी तैग्रिस ओलांडिली. नंतर मी तें नदिन्तु-बैरचें सैन्य पूर्णपणें कापून काढलें. अशाप्रकारें आम्ही युद्ध केलें तेव्हां आत्रियादिय महिन्याचे २६ दिवस पूर्ण झाले होते.

१९. (थातिय् इ०) पसाव(:) अदं बाबिरुं अशियवम्. अवियू बाबिरुं यथा नेय उपायं, झझान(:) नाम(न्), वर्दनं अनुव् हुफ्रातौवा, अवदा, हौव् नदि(न्)तबैर(:) ह्य(:) नबुकु(उ)द्रचर(:) अगौबता, पेश् हदा कारा पतिश् मां हमरनं चर्तनेयू. पसाव(:) हमरनं अकुमा अ(ह्) उरमझ्-दामेय उपस्तां अबर (:). वशूना अ(ह्)उरमझ्दाह (:) कारं त्यं नदि(न्)तबैरह्या अदं अजनं वसियू. अनिय (:) आपिया आ-ह्यता आपिशिं पराबर (:) अनामकह्य माह्या २ रौचाबिश् थकता आह (:) अवथा हमरनं अकुमा.

१९. शास्ति० पश्चा वा
अहं बाबिरुं अच्यवम् अभि
बाबिरुं यथा नहि उपायं झझानः
नाम्ना वर्धनं अनु हुफ्रातौ
अवतः असौ नदिंतबैरः
यः नबुकुद्रचरः
अगोपयत् ऐत सह कारेण प्रति
मां समरं करणाय पश्चा वा
समरं अकुर्म अहुरम-
ज्दः मह्यं उपस्थं अभूत वासना
अहुर्मज्दस्य कारं त्यं
नादिंतबैरस्य अहं अहनम्
वशी अन्यः आपे आ-
स्यत् आपस्तम् प्राभरत
[अनामकस्य मासस्य २ रूग्भिः सक्ता आस एवं अथ समरं अकुर्म]

१९. आज्ञा० पुढें मी बाबिलोनला गेलों. मी बाबिलोनला जाण्यापूर्वी युफ्राटिस (नदीच्या कांठा) वर झझान नांवाचें शहर होतें. तेथें तो, स्वतःला नबुकुद्रचर (नेबुचद्नेझर) म्हणवीत असलेला नदिन्तु-बैर सैन्यासह माझ्याशीं लढण्याला आला. नंतर आम्ही युद्ध केलें. अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें नदिन्तुबैरचें पुष्कळ सैन्य मीं कापून काढलें. राहिलेलें पाण्यांत फेकलें गेलें. तें पाण्यानें वाहून गेलें. अनामक महिन्याचे दोन दिवस पूर्ण झाल्यावर आम्ही अशा प्रकारें युद्ध केलें.

२५८. पंक्ति-स्तंभ २ रा.

१. ( थातिय् इ० ) पसाव(:) नदि( न् )तबैर (:) हदा कम्नेबिश् अस्बारिबिश् अबिय् बाबिरुं अशियव (:). पसाव (:) अदं बाबिरुं अशियवम् वशना अ(ह्)-उरमझ्दाह (:) उता बाबिरुं अग्रबायं, उता अवं नदि( न् )तबैरं अग्रबायम्. पसाव (:) अवं नदि( न् )तबैरं अदं बाबिरौव् अवाजनम्.

१. शास्ति० पश्चा वा नदिन्तबैरः सह कतिभिः अश्वपालैः(अश्ववहैः)अभि बाबिरुं अच्यवत् पश्चा वा अहं बाबिरुं अच्यवम् वासना अहुर्मेज्दस्य उत बाबिरुं अग्रभयम् उत एनं नदिंतबैरं अग्रभयम् पश्चा वा एनं नदिंतबैरं अहं बाबिरौ अवाहनम्

१. आज्ञा० नंतर निदिन्तु–बेल थोड्याशा घोडेस्वारांनिशीं बाबिलोनला गेला. नंतर मी बाबिलोनला गेलों. अहुरमज्दाच्या कृपेनें मीं बाबिलोन मुद्दां घेतलें व त्या निदिन्तु–बेलला पकडलें. पुढें मी निदिन्तुबेलास बाबिलोनमध्यें ठार केलें.

२. ( थातिय् इ० ) याता अदं बाबिरौव् आहं इमा दह्याव (:) त्या हचाम (:) हमिथ्रिया अबव( न् ): पार्स (:),( ह् )उवज(:), माद (:), अथुर, मुद्राय (:), पर्थव (:), मर्गुश्, थतगुश्, सक (:).

२. शास्ति० यदा अहं बाबिरौ आसम् इमे दस्यवः(देशाः) त्ये सचा मत् अमैत्रेयाः अभवन् पार्सः, हुवजः, मादः असुरःमुद्रायः, पर्थवः, मर्गुः, धतगुः, शकः.

२. आज्ञा० ज्यावेळीं मी बाबिलोनमध्यें होतों त्यावेळीं माझ्याशीं शत्रुत्व धरलेले प्रांत हेः—पर्शिया, सुशिआना, मीडिया, असीरिया, ईजिप्त, पार्थिया, मर्गिआना, सत्तजीदिया, सिथिया.

३. ( थातिय् इ० ) १ मर्तिय (:) मर्तिय (:) नाम( न् ) चि( न् )-चिखैश् पुथ्र (:) कुगनका नाम( न् ) वर्दनं पार्सेय् अवदा अदारय (:). हौव् उदपतता (ह्)उवूजेय्. कारह्या अवथा अथह (:). अदं इमनिश् अमिय् (ह्)उवूजेय् क्षायथिय (:)

३. शास्ति० १ मर्त्यः मर्त्यः नाम्नो चिंचिख्रेः पुत्रः कुगनका नाम्ना वर्धनं पारसे अवतः अधारयत् असौ उदपतत् हुवूजे कारस्य एवं अथ अशासत् अहं इमनिः अस्मि हुवूजे क्षत्रियः

३. आज्ञा० एक मर्त्य नांवाचा मनुष्य चिंचिख्रीचा पुत्र होता. पार्समध्यें कुगनका नांवाचें शहर आहे. तेथें तो मोठ्या अधिकारावर होता. त्यानें सुशियानामध्यें बंड केलें. त्यानें सैन्याला असें सांगितलें : ‘मी सुशियानाचा राजा इमनि आहें.’

४. ( थातिय् इ० ) अदाकेय् अदं अश्नेय् आहं अबिय् (ह्)-उवूजम्. पसाव (:) हचाम (:) अतर्स ( न् ) ( ह् ) उवूजिया. अवं मर्तियं अग्रबाय( न् ) ह्यशां मथिश्ता (:) आह(:); उताशिं अवाजन ( न् ).

४. शास्ति० अध चैव अहं अश्नाय (अजनाय) आसम् अभि हुवूजम् पश्चा वा सचा मत् अत्रसन् हुवूजियाः एनं मर्त्यं अग्रभयन् तेषाम् त्यः महिष्ठः आस उत तं अवाहन्

४. आज्ञा० नंतर मी हुवूज वर चालून गेलों. तेव्हां हुवूजचे लोक माझ्यापासून भयभीत झाले. त्यांनीं त्या मर्त्याला पकडलें. त्यांचा जो पुढारी होता त्याला त्यांनीं ठार केलें.

५. ( थातिय् इ० ) १ मर्तिय(:) फ्रवर्तिश् नाम ( न् ) माद (:), हौव् उदपतता मादेय्, कारह्या अवथा अथह (:): अदं क्षथ्रित (:) अमिय् ( ह् )उवक्षत्रह्य

५. शास्ति० मर्त्यः फ्रवर्तिः नाम्ना मादः असौ उदपतत् मादे कारस्य एवं अथ अशासत् अहं क्षथ्रितः अस्मि हुवक्षत्रस्य

५ आज्ञा० एक फ्रवर्ति नांवाचा मीडियन मनुष्य होता. त्यानें मीडियामध्यें बंड उभारलें : त्यानें सैन्याला असें सांगितलें, ‘मी सीक्झारचा (हुवक्षत्राचा) वंशज क्षथ्रित आहें.

तौमाया. पसाव (:) कार (:) माद (:) ह्य (:) विथापतिय् आह (:), हचाम (:) हमिथ्रि-य (:) अबव (:) अवियू अवं फ्रवर्तिम् अशियव (:) हौव् क्षायथिय (:) अबव (:) मादेयू.

तोक्मः पश्चा वा कारः मादः यः विशां पतिः आस सचा मत् अमैत्रे-यं अभवत् अभि एनं फ्रवर्तिम् अच्यवत् आसौ क्षत्रियः अभवत् मादे

तेव्हां तें मीडियन्-सैन्य ज्याच्याकडे त्या प्रांताची मालकी होती,–माझ्याशीं शत्रु झालें व त्या फ्रवर्तीपाशीं गेलें. तो मीडियाचा राजा झाला.

६. (थातिय् इ०) कार (:) पार्स (:) उता माद (:) ह्य (:) उपा मां आह (:) हौव् कम्नं आह (:) पसाव (:) अदं कारं फ्रैशयम्. विदर्न (:) नाम (न्) पार्स (:) मना ब (न्) दक (:), अवशां मथिश्तं अकुनवम्. अव-थाशां अथहम् (:) परैता अवं कारं त्यं मादं जता ह्य (:) मना नेय् गौबतेय्.

६. शास्ति० कारः पार्सः उत मादः यः उप मां आस असौ कतिपयः आस पश्चा वा अहं कारं प्रैष्यम् विदर्णः नाम्ना पार्सः मम बद्धकः एनं महिष्टं अकरवम् एवं अथ तेषां अशासम् प्रेत तं कारं त्यं मादं हत यः मम नैव गोपयति

६ आज्ञा० माझ्यापाशीं जें पर्शियन् आणि मीडियन् सैन्य होतें तें थोडें होतें. नंतर मी कांहीं सैन्य पाठविलें. त्यापैकीं विदर्ण नांवाचा पर्शियन माझा अंकित होता, त्याला मी त्याचें मुख्यत्व दिलें. त्यांना मी म्हणालों, "चला, आणि तें मीडियन् सैन्य कापून काढा कीं जें आपणास माझें म्हणवीत नाहीं." नंतर तो विदर्ण सैन्यासह गेला. जेव्हां तो मीडियाला पोंचला, तेव्हां मीडियामध्यें मारु नांवाचें शहर आहे, तेथें त्यानें मीडियनांबरोबर युद्ध केलें. मीडिय-नांतील कोणीहि जो मोठा (बलिष्ठ) होता तो सुद्धां टिकाव धरूं शकला नाहीं. अहुरमज्दानें मला साहाय्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें माझ्याशीं शत्रुत्व असलेलें तें सैन्य विदर्णाच्या सैन्यानें पूर्णपणें कापून काढलें.

पसाव (:) हौव् विदर्न (:) हदा कारा अशियव (:). यथा मादं परारस (:), मारुश् नाम-(न्) वर्दनं मादेय्, अवदा हम-रनं अकुनौश् हदा मादैबिश्. ह्य (:) मादेशुवा मथिश्त (:) आह (:), हौव् अदाकेय् नेय् अदारय (:). अ (ह्) उरमझ्दा-मेय् उपस्तां अबर (:). वश्ना अ (ह्) उरमझ्दाह (:) का-र (:) ह्य (:) विदर्नह्या अवं कारं त्यं हमिथ्रियं अज (न्) वसिय्.

पश्चा वा असौ विदर्णः सह कारेण अच्यवत् यदा मादं प्रार्षित् मारुः नाम्ना वर्धनं मादे अवतः सम-रं अकरोत् सह मादैः यः मादेषु महिष्ठः आस असौ अधं चैव नैव अधारयत् [ *अहुरमज्दः मां उपस्थं अभृत वासना अहुरमज्दस्य का-रः यः विदर्णस्य ] तं कारं त्यं अमैत्रेयं अहन् उशी(भिः)

अनामकह्य माह्या २७ रौचा-बिश् थकता आह (:), अव-थाशां हमरनं कृतम्. पसाव (:) हौव् कार (:) ह्य (:) मना क-(न्)पद (:) नामा दह्याउश् मादेय् अवदा मां चिता अमा-नय (:); याता अदं अरसं मादम्.

[ अनामकस्य मासस्य २७ रू-ग्भिः सक्ता आस एवं अथ समरं कृतम् ] पश्चा वा असौ कारः यः मम कं-पदः नाम्ना दस्युः मादे अवतः मां चित् अमा-नयत् यथ (यदा) अहं आर्षम् मादं

अनामक महिन्याचे २७ दिवस पूर्ण झाल्यावर अशाप्रकारें लढाई झाली.

नंतर, मीडियामध्यें कंपद नांवाचा प्रांत आहे तेथें माझें सैन्य मी मीडियाला जाईपर्यंत वाट पहात राहिलें.

* प्रस्तुत संस्कृतिकरण होडीवाला यांनीं केलेलें नसल्यामुळें आम्ही केलें आहे.

७. ( थातिय् इ० ) पसाव (:) दादर्शिस् नाम( न् ) अर्मिनिय (:) मना ब( न् )दक (:) अवं अदं फ्रैशयं अर्मिनं अवथाशेय् अथहम्; परेदिय् कार (:) ह्य (:) हमिथ्रिय (:) मना नेय् गौबतेय् अवं जदिय्. पसाव (:) दादर्शिश् अशियव (:) यथा अर्मिनं परारस (:) पसाव (:) हमिथ्रिया ह( न् )ग्मता परैता पतिश् दादर्शिम् हमरनं च्रर्तनेय्. झुझ (:) नाम( न् ) आवहनं अर्मिनेयेय्. अवदा हमरनं अकुनव( न् ). अ( ह् )उमरझ्दामेय् उपस्तां अबर (:) वश्ना अ( ह् )उरमझ्दाह (:) कार (:) ह्य (:) मना अवं कारं त्यं हमिथ्रियं अज( न् ) वसिय्. थुरवाहरह्य माह्या ८ रौचाबिश् थकता आह (:) अवथाशां हमरनं कृतम्.

७. शास्ति० पश्चा वा दादर्षिः नाम्ना अर्मिनियः मम बद्धकः एनं अहं प्रैष्यम् अर्मिनं एवं अथ तस्मै अशासम् प्रेहि कारः यः अमैत्रेयः मम नहि गोपयति एनं जहि पश्चा वा दादर्षिः अच्यवत् यदा अर्मिनम् प्रार्षित् पश्चा वा अमैत्रेयाः समगमन्त ( संगताः ) प्रेताः प्रति दादर्षिं समरं करणाय झुझः नाम्ना आवसनं ( वसनं ) अर्मिने अवतः समरं अकुर्वन् [ अहुरमज्दः मां उपस्थं अभृत वासना अहुरमज्दस्य कारः यः मम तं कारं त्यं अमैत्रेयं अहन् उशीभिः थुरवाहरस्य मासस्य ८ रूग्भिः सक्ता आस एवं अथ समरं कृतम्. ]

७. आज्ञा० नंतर दादर्षि नांवाचा आर्मीनियन माझा अंकित होता. त्याला मी आर्मीनियाला पाठविलें; त्याला मी असें सांगितलें: "असाच जा, आणि जें सैन्य माझ्याशीं शत्रुत्वानें वागतें व जें माझें म्हणवीत नाहीं त्याला कापून काढ." नंतर दादर्षि गेला. जेव्हां तो आर्मीनियाला पोंचला तेव्हां शत्रु एकत्र झाले व दादर्षीबरोबर युद्ध करण्यासाठीं चालून गेले. आर्मीनियांत झुझ नांवाचें खेडें आहे. तेथें त्यांनीं युद्ध केलें. अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें माझ्या सैन्यानें शत्रुसैन्याला पूर्णपणें कापून काढलें. थुरवाहर महिन्याचे आठ दिवस पूर्ण झाले होते तेव्हां हें युद्ध झालें.

८. ( थातिय् इ० ) पतिय् दुवितियं हमिथ्रिया ह( न् )ग्मता परैता पतिश् दादर्शिं हमरनं चर्तनेय्. तिग्र (:) नामा दिदा अर्मनियेय् अवदा हमरनं अकुनव( न् ). अ( ह् )उरमझ्दामेय उपस्तां अबर् (:) वश्ना अ( ह् )उरमझ्दाह (:) कार (:) ह्य (:) मना अवं कारं त्यं हमिथ्रियं अज ( न् ) वसिय्. थुरवाहरह्य माह्या १८ रौचा बिश् थकता आह (:) अवथशां हमरनं कृतम्.

८. शास्ति० प्रति द्वितीयं अमैत्रेयाः समगमन्त (संगताः) प्रेताः प्रति दादर्षिं समरं करणाय तिग्रः नाम्ना देही अर्मिने अवत् समरं अकुर्वन् [ अहुरमज्दः मां उपस्थं अभृत वासना अहुरमज्दस्य कारः यः मम तं कारं त्यं अमैत्रेयं अहन् उशीभिः थुरवाहरस्य मासस्य १८ रूग्भिः सक्ता आस एवं अथ समरं कृतं ]

८. आज्ञा०—पुन्हा दुसऱ्या वेळीं शत्रु एकत्र झाले व युद्ध करण्यासाठीं दादर्षीवर चालून गेले. आर्मीनियांत तिग्र नांवाचा किल्ला आहे. तेथें त्यांनीं युद्ध केलें. अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें माझ्या सैन्यानें शत्रुसैन्य पूर्णपणें कापून काढलें. थुरवाहर महिन्याचे १८ दिवस पूर्ण झाल्यावर हें युद्ध झालें.

९. ( थातिय् इ० ) पतिय् थ्रितियं हमिथ्रिया ह( न् )ग्मता परैता पतिश् दादर्शिं हमरनं चर्तनेय्. उयामा नामा दिदा...... इत्यादि अज( न् )वसिय् पर्यंत.

९. [ शास्ति० प्रति तृतीयं अमैत्रेयाः संगताः प्रेताः प्रति दादर्षिं समरं करणाय उयामा नाम्ना देही अर्मिने अवतः समरं अकुर्वन् अहुर्मज्दः मां उपस्थं अभृत वासना अहुर्मज्दस्य कारः यः मम त्यं यः अमैत्रेयः अहन् उशीभिः थैग्रचेः मासस्य ९ रूग्भि सक्ता एवं अथ समरं कृतम् ]

९. आज्ञा०—पुन्हा तिसऱ्या वेळीं शत्रु एकत्र झाले व युद्ध करण्यासाठीं दादर्षीवर चालून गेले. आर्मीनियांत उयामा नांवाचा किल्ला आहे; तेथें त्यांनीं युद्ध केलें. अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें माझ्या सैन्यानें शत्रुसैन्य पूर्णपणें कापून काढलें. थैग्रचि महिन्याचे ९ दिवस पूर्ण झाल्यावर हें युद्ध झालें.

पसाव (:) दादर्शिश् चिता मां अमानय (:)......याता अदं अरसं मादम्.

पश्चा वा दादर्षिः चित् मां अमानयत् (यदा) अहं आर्षम मादं

नंतर दादर्षि माझ्याकरितां, मी मीडियाला जाईपर्यंत, आर्मीनियांत वाट पहात राहिला.

१०. (थातिय् इ०) पसाव(:) व(ह्)उमिस(:) नाम (न्) पार्स(:) मना ब(न्)दक(:) अवं अदं फ्रैश्यं अर्मिनं अवथाशेय् अथहं परैदिय्, कार(:) ह्य (:) हमिथ्रिय(:), मना नेय् गौबतेय्, अवं जदिय्. पसाव(:) व(ह्)उमिस(:) अशियव(:). यथा अर्मिनं परारस(:), पसाव(:) हमिथ्रिया ह(न्)ग्मता परैता पतिश् व(ह्)उमिसं हमरनं चर्तनेय्. इझ्रा नामा दह्योश् अथुराया अवदा हमरनं अकुनव(न्).

११. (थातिय् इ०) पतिय् दुवितियम् इ०... *

थुरवाहरह्य माह्या...इमयनं पतिय् अवथाशां हमरनं कृतम्. पसाव इ० (९ व्या परिच्छेदाच्या अखेरीप्रमाणें).

१२. (थातिय् इ०) पसाव (:) अदं नियायं हचा बाबिरौश् अशियवं मादं परारसं कु(न्)दुरुश् नाम(न्) वर्दनं मादेय् अवदा हौव् फ्रवर्तिश् ह्य (:) मादेय् क्षायथिय (:) अगौबता ऐश् हदा कारा पतिश् माम् हमरनं चर्तनेय्. पसाव (:) हमरनं अकुमा. अ(ह्)उरमझ्दामेय् इ०

१३. (थातिय् इ०). पसाव(:) हौव् फ्रवर्तिश् हदा कम्नैबिश् अस्बारिबिश् अमुथ (:)

१०. शास्ति० पश्चा वा
वसुमिसः नाम्ना
पार्सः मम बद्धकः
एनं अहं प्रेष्यम् अर्मिनं एवं अथ
तस्मै अशासम् प्रेहि कारः
यः अमैत्रेयः मम नैव
गोपयति एनं जहि पश्चा वा
वसुमिसः अच्यवत्
यथा अर्मिनं प्रार्षित् पश्चा
वा अमैत्रेयाः संगताः
प्रेताः प्रति वसुमिसं सम-
रं करणाय इझ्रा नाम्ना दस्युः
अथुरे अवताः समरं अकुर्वन्

[ अहुर्मज्दः मां उपस्थं अभृत वासना अहुरमज्दस्य कारः यः ममः त्वं अमैत्रेयः अहन् उशीभिः अनामकस्य मासस्य १५ रूग्भिः सक्ता एवं अथ समरं कृतम् ]

११. शास्ति० [ प्रति द्वितीयं अमैत्रेयाः समगमन्त (संगताः) प्रेताः प्रति वसुमिसं समरं करणाय नाम्ना अन्तियार दस्युः अर्मिने अवतः समरं अकुर्वन् अहुरमज्दः मां अभृत उपस्थं वासना अहुरमज्दस्य कारः यः अमैत्रेयः अहन् उशीभिः ]

थुरवाहरस्य मासस्य यमनं प्रति एवं अथ तेषां समरं कृतम् [ पश्चावा वसुमिसः चित् मां अमानयत् यथ (यदा) अहं आर्वे मादम् ]

१२. शास्ति० पश्चा वा
अहं न्यायम् सचा बाबिरोः
अच्यवं मादम् यथ मादं प्रार्षम् कुं-
दुरुः नाम्ना वर्धनं
मादं अवतः असौ फ्रवर्तिः
यः मादे क्षत्रियः
अगोपयत ऐत् सह कारेण प्रति
मां समरं करणाय पश्चा वा
समरं अकुर्म [ अहुर्मज्दः

मां उपस्थंअभृत वासना अहुरमज्दस्य कारः यः फ्रवर्तेः त्वं अहम् अवाहनम् ]

१३. शास्ति० पश्चा
वा असौ फ्रवर्तिः सह कति-

१०. आज्ञा०— नंतर वसुमिस नांवाचा पार्स (पार्शी) माझा अंकित होता. त्याला मी आर्मीनियास पाठविलें. आणि त्याला असें सांगितलें: "असाच जा आणि जें सैन्य माझ्याशीं शत्रुत्वानें वागतें व माझें म्हणवीत नाहीं तें कापून काढ."

तेव्हां वसुमिस गेला. जेव्हां तो आर्मीनियास पोंचला तेव्हां शत्रु एकत्र झाले व वसुमिसाशीं युद्ध करण्यासाठीं चालून गेले. असीरियांत इझरा नांवाचा प्रांत आहे, तेथें त्यांनीं युद्ध केलें.

अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें माझ्या सैन्यानें शत्रुसैन्य पूर्णपणें कापून काढलें. अनामक महिन्याचे १५ दिवस पूर्ण झाल्यावर हें युद्ध झालें.

११. आज्ञा०—पुन्हा एकदां शत्रु एकत्र झाले आणि युद्ध करण्यासाठीं वसुमिसावर चालून गेले. अंतियार नांवाचा प्रांत आर्मीनियांत आहे. तेथें त्यांनीं युद्ध केलें. अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें माझ्या सैन्यानें शत्रुसैन्याला पूर्णपणें कापून काढलें. थुरवाहर महिन्याच्या अखेरीस त्यांच्याशीं हें युद्ध झालें. नंतर मी मीडियाला जाईपर्यंत वसुमिस माझ्यासाठीं थांबला.

१२. आज्ञा०—पुढें मी बाबिलोनहून मीडियाला गेलों. जेव्हां मी मीडियाला पोंचलों तेव्हां मीडियांत कुंदुरु नांवाचें शहर आहे, तेथें मीडियांत राजा म्हणून समजला जाणारा फ्रवर्ति, माझ्याशीं युद्ध करण्यासाठीं सैन्यासह चालून आला. नंतर आम्ही युद्ध केलें. अहुरमज्दानें मला साह्य केलें. अहुरमज्दाच्या कृपेनें मीं फ्रवर्तीचें सैन्य पूर्णपणें कापून काढलें. अदुकनै † महिन्याच्या २६ व्या दिवशीं आम्ही हें युद्ध केलें.

१३. आज्ञा०—नंतर फ्रवर्ति, मीडियांत रघा नांवाचा प्रांत आहे त्या ठिकाणीं कांहीं घोडेस्वारांनिशीं गेला.

**टीप :**—* हा परिच्छेद, शत्रु आणि युद्धभूमि यांच्या नांवाखेरीज ८ व्या परिच्छेदाप्रमाणेंच आहे. समग्र भाषांतर मराठींत केलें आहे. † कालवे खोदण्याचा महिना.

## महाराष्ट्र.

१. अश्मकांचें राज्य चालू.

२. थोडा वेळ नंदाची प्रतिष्ठानवर सत्ता.

३. अश्मक पुन्हा चालू.

४. शातवाहन घराण्याचें आगमन.

५. गुणाढ्यकाल.

## हिंदुस्थान.

**२६७. चवथा काल. हखामणी राज्याचा काल.**

१. **बौद्धेतिहास**—बुद्धजन्म. त्यांचें उपदेशासाठीं मगध व नजीकचे देश यांत पर्यटण.
बौद्धांच्या दोन संगीति.

२. **मगध**—शैशुनाग राज्य, नंदराज्य.

३. **अखिलभारत**—नंदराजांकडून सर्व जुन्या क्षत्रिय कुलांचें उत्पाटन. क्षत्रियसंहार.
वैष्णव धर्मांची संघटना.
रामायण व महाभारत व पुराणें यांची वाढ;
रामायणावर कैकेय परिणाम आणि सेमेटिक संस्कृतीचे परिणाम.

**२६८. पांचवा काल. इराणवरील ग्रीक सत्तेचा काल. भारतांतील**

१. मौर्य राज्य उत्तर महाराष्ट्र व उत्तर कोंकण यांवर असावें, नानाघाटापासून विदर्भाच्या टोंकापर्यंत शातवाहन राज्य असावें.

२. दीपकर्णी अश्मक राजा असावा आणि तो नंदाच्या अंतकाळीं असावा आणि त्याच्या नंतरच नवीन घराणें शातवाहनांचें आलें असावें.

३. ख्रि. पू. ३५० नंतर पहिलीं पंचाहत्तर वर्षें त्यांच्या सत्तेची वाढ होत होती. सिमुक शातवाहन ख्रि. पू. २५० च्या सुमारास असावा. तो काण्व घराण्याच्या अंतीं [ ख्रि. पू. २८ ] असावा हें पौराणिक वर्गाचें मत संशोधक वर्गास अमान्य.

१. अलेक्झांडरची स्वारी ३२७ ते ३२४.

२. अशोकाच्या कारकीर्दीत बौद्ध संप्रदायास राजबल मिळतें.

३. बौद्धांची तिसरी संगीति.

४. इराणी विद्या आणि कला यांचें महत्त्व कमी होतें तरी अंशेंकरून चालू रहातें.

## इराण.

### बुद्धापासून नंदलोपापर्यंत. ख्रि. पू. ५५३–३२७.

१. **इराणचें सत्तावर्धन.** ग्रीसपासून हिंदुस्थानांत वितस्तेपर्यंत देशाचें इराण्यांकडून आक्रमण.

२. **साहित्य**—ग्रीकवाङ्मय इराणी, बाबिलोनी, एलामी अंकित लेख.

३. **राजे**–( १ ) सायरस ( कुरुस ) ( २ ) कंबायसिस ( ३ ) पहिला दरायस, ( ४ ) पहिला क्झर्क्सीझ, ( ५.६ ) दुसरा व तिसरा आर्टाक्झरसीझ हे राजे.

४. **धर्म.** हे राजे झरतुष्ट्रपंथी नसून मझ्दयस्नपंथी असावेत असें अनुमान.

### मौर्यप्रामुख्यकाल—ख्रि. पू. ३३१–२४८.

**प्रथम काल.** अलेक्झांडरची सत्ता.

१. आक्टोबर ३३१ रोजीं गॉगमील येथें अलेक्झांडरनें इराणी सम्राट दारियसचा पराभव केला.

**द्वितीय काळ.** अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्याची सरदारांत वांटणी आणि सेल्युकिडी साम्राज्याची स्थापना.

## पश्चिम एशिया, पूर्वयूरोप, आफ्रिका.

१. **पश्चिम एशिया**–इराणचें अधिराज्य, असुरी धर्माच्या लोपास सुरवात, अहुर देवतेस प्रामुख्य.

२. **ईजिप्त.** इराणी घराणें इजिप्तचें २७ वें होय. त्याची सत्ता ख्रि. पू. ४०५ पर्यंत टिकली. २८ वें राजघराणें देश्य होतें. एक घराणें जाऊन दुसरें यावयाचें ही क्रिया चालू. २९ वें आणि तिसावें घराणें. देश्य पुन्हा इराणी साम्राज्याची सत्ता आणि हखामणींचा ईजिप्तवर अधिकार. ईजिप्तचे राजे इराणपासून आपलें स्वातंत्र्य ग्रीक सैन्याच्या साहाय्यानें रक्षित.

३. **यहूदी**–प्रवक्त्यांचा काळ चालू–हग्गे ( ५२० ) जखर्या ( ५१८ ) मलाखी अजमासें ( ४६०–४५० )
**नीतिसूत्रें**–ख्रि. पू. ४ थ्या शतकानंतर केव्हांतरी. **शलोमीन**चें गीत, तिसऱ्या शतकापूर्वी नसावें. **एस्तेर**चें पुस्तक त्याच सुमाराचें.

४ **ग्रीस.** आयोनियन ग्रीकांचे व इराण्यांचे सामने, हर्पेगसची स्वारी ख्रि. पू. ५४६; आयोनिक बंड ४९९–४९४. दरायस ( ४९० ) व क्झर्सीझ ( ४८० ) यांच्या स्वाऱ्या ख्रि. पू. ४७७. डेलीअन संघाची स्थापना, ग्रीक लोकराज्यांचा उत्कर्षकाळ ३३८–८४०–३३६–अलेक्झांडरचा उदय.

५ **रोम मध्यें लोकसत्ताक काल.** पूर्वार्ध ख्रि. पू. ५१० पासून; ३६७ सालीं प्लेबियन लोकांस पूर्ण हक्कांची प्राप्ति.

**ईजिप्त**–अलेक्झांडरची सत्ता आणि नंतर टालेमींचें राज्य.

**पश्चिमएशिया**–ग्रीक सत्ता ( सेल्युकिडी घराण्यांची.

**रोम**–३२६–२८२, सर्व इटली रोमनें आपल्या सत्तेखालीं आणला. कार्थेजशीं पहिलें युद्ध २६४–२४१. **ग्रीस**–मासिडोनी ग्रीक साम्राज्य. ३३६ ला प्रारंभ ३३६ आशिया मायनरमध्यें फिलिपनें सैन्य रवाना केलें. पण त्याच सालीं फिलिपचा वध होऊन आलेक्झांडरच्या हातीं सत्ता आली. ३२३. अलेक्झांडरचा मृत्यु; त्याच्या सरदारांत प्रदेशविभागणी. अलेक्झांडरच्या एका सरदारानें स्थापन केलेलें ग्रीसमधील राज्य. या कालाच्या अंतीं चालू होतेंच.

## महाराष्ट्र.

### २६९. सहावा काल. इराणांत पृथुप्रामुख्याचा काल. ख्रि. पू. २४८—इ. स. २२९.

१. शातवाहनांचें 'आंध्र' घराणें. (ख्रि. पू. ३५० पासून सुरू होतें) २५० च्या सुमारास नानाघाट लेख.

२. 'आंध्रां' चा मगधावर अधिकार ख्रि. पू. २८.

३. आंध्रांच्या महत्त्वाचा लोप इ. स. २२९ च्या सुमारास.

४. आंध्र आणि क्षत्रप यांची पश्चिम हिंदुस्थानांत स्पर्धा.

## हिंदुस्थान.

१. अशोकाचें राज्य चालू ख्रि. पू. २३२ पर्यंत.

२. मौर्य घराण्याचे इतर राजे (२३२–१८५) अशोकाचा नातु संप्रति याचा जैनास मोठा आश्रय.

३. खारवेलाचा उदय. तो मागधराज व शातकर्णी या दोघांसही पराभूत करतो.

४. **शुंग घराणें** (ख्रि. पू. १८५–७३)

५. मिनॅंडरची स्वारी १७५ च्या सुमारास.

६. **काण्व घराणें** ख्रि. पू. ७३–ख्रि. पू. २८

७. आंध्रांचा म्हणजे शातवाहनांचा मगधावर अधिकार ख्रि. पू. २८ पासून सुमारें इ. स. २२९ पर्यंत म्हणजे सुमारें २५६ वर्षें.

८ इंडो ग्रीक व इंडो पार्थिअन घराणीं, ख्रि. पू. २५० ते इ. स. ६०.

९. **कुशान अगर इंडो सीथियन घराणें.** इ. स ४८ ते २२५

१०. कुशान आणि शातवाहन यांची स्पर्धा.

११. इराणांत सस्सनांचा उदय आणि हिंदुस्थानांतील शातवाहन व कुशान राज्यांना धक्का.

१२. विदिशा नागराज्य ख्रि. पू. ३१ पासून

१३. भारशिव नागांचा महत्त्वकाल इ. स. १७५–१८०; वाकाटकांचा भारशिवांच्या आश्रयानें उदय.

### २७०. सातवा काल. हिंदुस्थानांत शातवाहन महत्त्व लोपाचा आणि वाकाटक प्रामुख्याचा काल. २४८–५६०.

**महाराष्ट्र.**

१. आंध्रांचें राज्य संपल्यानंतर निरनिराळीं स्थानिक घराणीं. त्यांत आभीर, गर्दभी, शक, यवन, तुषार, मुरुंड, मौन वगैरे राज्यें. चवथ्या शतकांत चालू होतीं.

२. त्याच्या नंतर किलकिला राजे, किलकिला तेच नागराजे असावेत.

३. किलकिलांनंतर विंध्यशक्ति येऊन वाकाटक घराण्याची स्थापना झाली. वाकाटक शक इ. स. २४८ पासून.

४. त्रैकूटक, कुंतल हीं राज्यें वाकाटकांच्या सार्वभौमत्त्वा खालीं होतीं.

५. दक्षिणेकडे गंग आणि कदंब यांचीं राज्यें.

६. चुटु शातवाहन, श्रीपर्वतीय, आभीर राज्यें; दक्षिणेंतील श्रीपर्वतीय घराणें इक्ष्वाकू म्हणवी.

७. पल्लव राज्य ४५० पर्यंत.

८. चालुक्यांचा महाराष्ट्रावर पूर्ण पगडा इ. स. ६०० च्या सुमारास.

**हिंदुस्थान.**

१. शातवाहनांच्या मगधावरील सत्तेचा लोप.

२. मध्यहिंदुस्थानांत नागराज्यें. भारशिवांचें नागसाम्राज्य. त्यांतून वाकाटकांचा उदय. वाकाटक शक २४८ इ. स. पासून गुप्तसाम्राज्य.

३. गुप्त आणि वाकाटक यांत स्पर्धा.

४. समुद्रगुप्त ३३०—३७५.

५. दुसरा चंद्रगुप्त इ. ३७५—४१३.

६. पहिला चिनी प्रवासी फाहिआन. इ. स. ४०५—४११.

७. कुमारगुप्त ४११—४५५, स्कंदगुप्त ४५५—८०.

८. हूणांचा उपद्रव इ. स. ४७० पासून हूण राजे. तोरमाण (५००—५१०) आणि मिहिरकुल.

९. मिहिरकुलाचा पराभव (इ. स. ५२८) संयुक्तसैन्याकडून.

१०. मिहिरकुलाचा मृत्यु इ. स. ५४०च्या सुमारास.

११. वाकाटकांची समाप्ती इ. स. ५५० च्या सुमारास. हर्षवर्धन इ. स. ६०६—६४७.

१२. हुएन्संग प्रवास ६३७ ते ६४४ च्या दरम्यान.

## इराण. पश्चिम एशिया, पूर्वयूरोप, आफ्रिका.

### हिंदुस्थानांत शातवाहनप्रामुख्याचा काल. खि. पू. २५०-इ. स. २२७.

१. **पार्थिअन राजे** खि. पू. २४८ इ. स. २२९.

२. **सलूक्षसी यवनराज्याचा स्फोट.** खि. पू. २५० च्या सुमारास सिल्युकिडी यवन राज्याचा स्फोट होऊन बॅक्ट्रिआ आणि सोग्डिएना हीं राज्यें फुटलीं.

३. **शक आणि यूएची.** फुटलेलीं स्वतंत्र यवन राज्यें. शक व युएची यांनीं एक शतकानंतर काबीज केलीं.

४. खि. पू. शतक दुसरें पश्चिम इराण सेल्युकिडी साम्राज्यांतून फुटून पार्थिअन राज्यांत समाविष्ट झालें.

५. ग्रीक संस्कृतीचा पार्थियन राजांच्या कारकीर्दींत लोप.

६. जुन्या ग्रीक साम्राज्याचा जो मुलूख पार्थियन व रोमन साम्राज्यांनीं घेतला नाहीं तो शक आणि यूएचि लोकांच्या भक्ष्यस्थानीं पडला.

**पश्चिम एशिया**–युफ्रेटीसपर्यंत जी सत्ता ग्रीकांकडे होती ती पांपीच्या कालापासून रोमन लोकांकडे गेली. इराणनें स्वतःचें साम्राज्य स्थापन केलें, पण आजचा टर्की यूरोपीयांच्याच ताब्यांत राहिला.

**ग्रीस**–मासिडोनी ग्रीक सत्ता रोमनें धुळीस मिळविली. खि. पू. १६८. पुढें ग्रीस रोमच्या अंमलाखालीं होता.

**रोमन इतिहास.** कार्थेजचा पूर्ण विध्वंस खि. पू. २०६ सालांत.

**रोमनलोकांचें ग्रीकांवर राज्य.** खि. पू. २०० पासून १६८ पर्यंत तीन युद्धें करून मासिडोनी सत्ता धुळीस मिळविली.

**रोमनलोकसत्ताकाचा उत्तरार्ध.**

खिस्तपूर्व ३० मध्यें आगस्टस हा रोमन साम्राज्याचा अधिपती बनला आणि नामधारी लोकसत्ताक राज्य नष्ट झालें. खि. पू. ३०–इ. स. २२९ रोमन पातशाही चालू. इ. स. २३१ रोमन पातशाहीचा इराणबरोबर संग्राम.

### इ. स. २२६–६३० इराणांत सस्सन साम्राज्याचा आणि रोमन सत्तेशीं स्पर्धेचा काल.

१. सस्सन साम्राज्य. पार्सिसमध्यें एका छोट्या संस्थानांत अर्देसिर नांवाचा एक पुरुष निपजला. त्यानें पार्थिअन राजा आर्टाबेनस याचा पराभव करून ठार मारलें आणि आपलें राज्य सुरू केलें तें ४००हून अधिक वर्षें चाललें.

२. पार्थिअन ( आर्सेसिडी ) घराण्यांतील कांहीं पुरुष आर्मिनियांत पळून गेले. तेथें त्यांचें राज्य इ. स. ४२९ पर्यंत चालू होतें.

३. हें साम्राज्य कट्टें झरथुष्ट्री पंथाचें होतें.

४. इ. स. ४५० श्वेतहूण लोकांनीं बॅक्ट्रीआ प्रदेश घेतला.

५. सस्सन लोकांनीं बॅक्ट्रिआ जिंकला ( इ. स. ५६० )

६. ६३३ सालीं आरबी सैन्यानें इराणांत प्रवेश केला व ६५१ मध्यें शेवटच्या सस्सन राजाचा खून होऊन इराणी राजसत्ता लयास गेली.

१ रोमन साम्राज्य.

हूणांच्या पूर्व रोमन साम्राज्यावर स्वाऱ्या [ ३७२–४५३ ]

कान्स्टंटाइन घराणें ३०५–३६३

व्हॅलेन्शिनियन घराणें ३६४–३९२

थिओडोशिअन घराणें ३९२–४५७

लिओनाइन घराणें ४५७–५१८

जस्टिनिअन घराणें ५१८–६०२

अंतर्घराणें ६०२–६१०

२ इराणच्या रोमन साम्राज्याशीं लढाया.

३ अरबस्तानांत इस्लामाची स्थापना. आणि त्याकडून इराणी सस्सन साम्राज्याचा नाश आणि आरबांची रोमन सम्राज्याशीं स्पर्धा.



चित्रांक-४५. मगांच्या सूर्योपासनेचें महाराष्ट्रांतील महत्त्वाचें एक दृश्य.
भाजें येथील लेण्यांतील चित्र.

*




चित्रांक ४६. अलेक्झांडरचें साम्राज्य.



चित्रांक ४७. मागच्या पृष्ठांतील चित्राचें रेषाचित्र.




चित्रांक ४८. अशोकाचें साम्राज्य.

## २७०. अ. कैकेय-महत्त्व-लोपाचा पैशाचीवर परिणाम.

२७० अ. कैकेय महत्त्व समाप्ति आणि यवन महत्त्व-वृद्धि यांचा परिणाम भारतीय संस्कृतीवर आणि त्यांतल्या त्यांत पैशाची भाषेच्या महत्त्वावर झालेला आहे. त्यामुळें जे चोहोंकडे सामाजिक फेरफार झाले तो स्वतंत्र विवेचन करण्याजोगा विषय आहे.

## २७० आ. दक्षिणेकडे यवनाशीं असंबंध.

२७०. आ. शातवाहनांच्या आद्यकालांत म्हणजे मौर्य-कालांत कैकेयमहत्त्वाचा नाश हिंदुस्थानांत झाला असावा, आणि तो खुद्द इराणांत त्यांच्या महत्त्वलोपाचा प्रतिध्वनि असला पाहिजे.

वरील कालैक्यांच्या कोष्टकावरून एकंदर विकास वाचकांच्या लक्षांत येईलच. इराणचें महत्त्व पश्चिम एशियांत कमी होऊन ग्रीसचें महत्त्व वाढलें व त्यामुळें हिंदुस्थानावर इराणी संस्कृतीच्या परिणामांचें सातत्य थांबलें. येथील कैकेयांचा परदेशांशीं संबंध तुटून त्यांची एकंदर संस्कृति भारतीय संस्कृतीच्या विस्तारांत आणि विकासांत जिरली.

ग्रीकांची सत्ता जर हिंदुस्थानांत टिकली असती तर इराणी लोकांनीं भारतीय स्वरूप धारण न करतां ग्रीकांच्याच आयुष्यक्रमाशीं सादृश्य राखण्याचा प्रयत्न केला असता.

उत्तरेस जरी यवनाशीं संबंध उत्पन्न झाला तरी तो थोडाच वेळ टिकला आणि दक्षिणेस तो मुळींच उत्पन्न झाला नाहीं. दक्षिणेस त्यावेळेस अश्मकांचें राज्य चालूच होतें आणि अश्मक राजाकडून शातवाहनांच्या हातीं सत्ता जाण्यास प्रारंभ झाला असावा. हें सत्तेचें स्थानांतर कसें झालें या संबंधानें जरी ऐतिहासिक सत्य संरक्षित झालें नसलें तरी त्याचें निगूहन करूं पहाणाऱ्या कथा शिल्लक उरल्या आहेत आणि त्यांच्याकडे लक्ष देणें आपलें कर्तव्य आहे. तसें तें दिलें आहे.

मौर्य कालांत उत्तरेकडे कैकेयांशीं संबंध अजीबाद समाप्त झाला असें नाहीं. शातवाहनांच्या कालापासून इस्लामाच्या उदयापर्यंत जोदिराण्याच्या काळापर्यंत देशांत कैकेयांचें आगमन चालूहि असेल, पण राजकीय दृष्टीनें त्याचें महत्त्व नाहींसें झालें आणि यवन आणि त्याशीं मिश्र अशा लोकांना महत्त्व उत्पन्न झालें. त्याविषयीं अधिक विवेचन पुढें क्षत्रपांच्या अनुषंगानें करण्यांत येईल.

आतां आद्य शातवाहनांसंबंधाच्या व तत्कालीन समजल्या जाणाऱ्या कथांकडे लक्ष देऊं आणि प्राचीन भारतीय कथा-वाङ्मयास महत्त्व आहे तें केवळ भारतीय आहे किंवा तें अतिभारतीय आहे याचा थोडासा विचार त्या कथांच्या सांनिध्यांत असतांनाच करूं. शातवाहनांच्या काळांत ग्रीक साम्राज्याचे आणि त्यांच्या पडत्या काळांत रोमन साम्राज्याचे पश्चिम एशियांत पाय रोंवलें गेले ही गोष्ट लक्षांत ठेऊन भारतीय कथांच्या परदेशगमनाविषयीं विचार केला पाहिजे.

## प्रकरण ३१ वें.

# आद्य शातवाहन; तद्विषयक आणि तत्कालविषयक दंतकथाजाल.

### २७१. सातवाहनकथावाङ्मय

२७१. शातवाहनविषयक कथावाङ्मय बरेंच मोठें आहे. त्यांच्याविषयीं आख्यायिका जागोजाग पसरल्या आहेत. त्या सर्वांचा ऐतिहासिक उपयोग काय याविषयीं बरेंच विवेचन करावें लागणार आहे. आख्यायिकांमध्यें शातवाहन घराण्यांतील विशिष्ट राजा येत नाहीं. जणूं काय शातवाहन किंवा शालिवाहन नांवाचा एकच राजा होऊन गेला असें समजून सबंध घराण्याच्या कथा एका व्यक्तींत समाविष्ट केल्या आहेत. त्या कथांतील पौर्वापर्यविचार, सत्यासत्यविचार हे दंतकथोपयोगशास्त्रांतील खेळ आहेत. ते खेळ खेळण्यापूर्वी कथांचें निवेदन प्रथम केलें पाहिजे. सर्वच कथा प्रथम घेतां येत नाहींत. बृहत्कथेचा विषय संपला नाहीं यासाठीं बृहत्कथेंत अंतर्भूत झालेल्या कथांनाच आपण प्रथम निर्देशाचा मान देऊं. या कथा अनेक आहेत व कथापीठलंबकांत आल्या आहेत. बृहत्कथेंत अंतर्भूत झालेला कथापीठलंबक हा खरोखर अत्यंत भिन्नकालीन स्वतंत्र ग्रंथ आहे आणि कथामुखलंबकापासून अत्यंत दूरावलेला आहे. कथापीठ लंबकाच्या घटनेविषयीं स्वतंत्रपणें विचार केला पाहिजे.

आद्य शातवाहनांची कथा गुणाढ्यानें सांगितली तशी संरक्षिली गेली असेलच असें नाहीं. तशीच संरक्षिली गेली असल्यास गुणाढ्याच्या कालांत आद्य सातवाहनकथा अद्भुतमिश्रित झाली होती असें म्हणतां येईल. बृहत्कथेंतील आद्य शातवाहनाची कथा पुढीलप्रमाणें आहे.

कथेंतील अंगेंच स्वतंत्र कथा असल्यामुळें तीं तोडून भिन्न परिच्छेद शीर्षकें घालून दिलीं जात आहेत.

### २७१ अ. आद्य सातवाहन आणि "सातवाहन" शब्दाची व्युत्पत्ति.

२७१ अ. पूर्वी दीपकर्णी या नांवाचा एक प्रख्यात व मोठा पराक्रमी राजा होता. त्याची शक्तिमती या नांवाची प्रिय भार्या होती. एकदां विषयोपभोग भोगून उद्यानांत निजली असतां तिला साप चावला, त्यामुळें ती साध्वी मरण पावली. तेव्हां तिच्या ठायींच आसक्त असलेल्या राजानें अपत्य नव्हतें तरी ब्रह्मचर्यव्रत धरिलें. पुढें या राज्याचें रक्षण करील असा आपल्याला योग्य पुत्र नाहीं, असें मनांत आणून दुःखित झालेल्या त्या राजास भगवान शंकरानें स्वप्नांत अशी आज्ञा केली–" राजा, तूं महा अरण्यांत जाऊन भ्रमण करीत रहा. तेथें जो सिंहावर बसलेला कुमार दिसेल त्याला तूं आपल्या घरीं घेऊन ये. तोच तुझा पुत्र होईल", हा साक्षात्कार पहातांच तो जागा झाला. त्याला मोठा आनंद वाटला. व दुसरे दिवशीं मृगयेची तयारी करून तो अरण्यांत गेला. माध्यान्ह–समयीं पद्मसरोवराच्या तीरीं सिंहासनावर बसलेला सूर्यासारखा तेजस्वी बालक त्यास दिसला. कांहीं वेळानें तो बालक सिंहाच्या पाठीवरून खालीं उतरला आहे, असें पाहून राजानें जलाची अभिलाषा करणाऱ्या सिंहास एका बाणानें मारिलें. त्याबरोबर सिंहाचें शरीर सोडून तो पुरुषाच्या आकाराचा झाला. तो चमत्कार पाहून 'हें काय आहे' असें राजानें विचारलें. तेव्हां तो म्हणाला, " राजा, मी कुबेराचा सात या नांवाचा यक्ष, मित्र आहें. मी एकदां गंगेंत स्नान करीत असलेल्या एक ऋषिकन्येस पाहिलें. तिचीहि दृष्टि मजकडे वळली. एकमेकांस पाहून आम्हीं दोघेहि कामवश झालों. गांधर्वविधीनें मी तिचें पाणिग्रहण केलें. पण तिच्या घरच्या लोकांना जेव्हां हें वर्तमान कळलें तेव्हां, त्यांनीं क्रोधानें तिला व मलाहि 'अरे पाप्यांनो, तुम्ही दोघेंही स्वेच्छाचारी सिंह व्हा,' असा शाप दिला. पुढें पुष्कळ प्रार्थना केल्यावर 'पुत्र होईपर्यंत तूं सिंही होऊन राहशील व दीपकर्णी राजाचा बाण लागेपर्यंत तो यक्ष सिंहयोनींत राहील,' असा त्यांनीं उःशाप दिला. पुढें आम्ही सिंहाचें जोडपें झालों. कांहीं दिवसांनीं या पुत्रास जन्म देऊन ती मरून गेली. तेव्हां मीं या बालकास दुसऱ्या सिंहीचें दूध पाजून वाढविलें. आतां तुझ्या कृपेनें मी शापापासून मुक्त झालों. मी हा बालक तुला देतो. त्याचें तूं रक्षण कर. त्या मुनीनेंच मला असें करण्याविषयीं सांगितलें आहे."

इतकें सांगून तो यक्ष गुप्त झाला, आणि राजा त्या सुंदर बालकास घेऊन घरीं परत आला व सात नामक यक्षानें त्यास आपल्या पाठीवरून वाहिल्यामुळें त्यानें सातवाहन असें त्याचें नांव ठेवलें. कांहीं दिवस गेल्यावर तो सर्व विद्या व कला यांत निष्णात झाला आहे, असें पाहून दीपकर्णीनें त्यास राज्याभिषेक केला व स्वतः तपश्चर्या करण्याकरितां अरण्यांत गमन केलें. पुढें सातवाहन स्वपुरुषार्थानें सार्वभौम राजा झाला. असो.

## २७२. शातवाहनाच्या संस्कृत भाषेच्या अज्ञानाची कथा.

२७२. काणभूतीनें मध्येंच प्रश्न केल्यामुळें त्यास एवढा हा प्रासंगिक वृत्तांत सांगून गुणाढ्य चालू कथा पुनः सांगूं लागला.

एकदां वसंतोत्सव प्रसंगीं, नंदनवनांत विहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें, सातवाहन स्त्रियांसह त्या देवीकृत उद्यानांत राहून विहार करूं लागला. एके दिवशीं वापीजलांत उतरून प्रमदांसह तो जलक्रीडा करीत होता. त्याच्या स्त्रियांनीं त्या वेळीं सर्व भूषणें काढून ठेवलीं होतीं. त्यामुळें ज्यांच्यावरील पुष्पें खालीं गळून पडलीं आहेत, अशा जाई, जुई इत्यादि उद्यानस्थ वेलींप्रमाणें त्या दिसत होत्या. राजा आपल्या हातानें त्यांच्या अंगावर पाणी उडवूं लागला असतां त्याही निर्भयपणें त्याच्या अंगावर शिंपडूं लागल्या. हत्तिणींनी परिवेष्टित असलेल्या गजांची जशी मोठ्या सरोवरांत क्रीडा चालते तशीच त्यांची जलक्रीडा चालली होती. इतक्यांत त्याच्या राण्यांतील एक राणी फारच सुकुमार होती. त्यामुळें ती जलक्रीडा करितां करितां थकली. पण राजा तिच्या अंगावर जल शिंपडीतच होता. तें तिला असह्य झालें, व ती म्हणाली,:—"मोदकैः परिताडय माम्" तें ऐकून राजानें मोदक आणविले व तो ते तिच्या अंगावर मारूं लागला. तें पाहून राणी हंसून म्हणाली, "राजन्, पाण्यांत मोदकांचा काय उपयोग ? येथें काय ते खातां येणार आहेत ? मी तुला म्हटलें कीं "मा उदकैः परिताडय माम्" म्हणजे मला जलानें ताडन करूं नकोस; मा व उदकैः यांचा व्याकरणाच्या नियमाप्रमाणें "मोदकैः" असा संधि होत असतो. पण तोही तुला कळत नाहीं, व तूं व्याकरणहि जाणत नाहींस, तूं असा मूर्ख कसा झालास ? त्या शब्दशास्त्रज्ञ राणीनें असें धिःकारवचन उच्चारिलें असतां त्याचा सर्व परिवार हसूं लागला, व सामान्य सेवकांनीं लज्जेनें आपल्या माना खालीं घातल्या, त्याबरोबर राजाचा सर्व दर्प गेला, त्याचा अपमान झाला, त्यानें तत्काल जलक्रीडा संपविली व खिन्न मनानें आपल्या मंदिराकडे गमन केलें. तेव्हांपासून तो अत्यंत चिंतेंत पडला; कोणतेंही कार्य करण्याचा त्याला उत्साह राहिला नाहीं; फार काय पण भोजनहि त्यानें सोडलें. चित्राप्रमाणें स्तब्ध होऊन राहिलेल्या त्या राजाला कोणी कांहीं प्रश्न केल्यास त्याचें उत्तरही तो देईना. पांडित्य किंवा मरण यांतील कांहींतरी एक मला संपादन केलें पाहिजे, असा निश्चय करून तो शय्येवर संतप्त चित्तानें पडून राहिला.

राजाची अकस्मात् झालेली ती अवस्था पाहून सर्व परिजन घाबरून गेले, शेवटीं ती वार्ता मला व शिववर्म्याला कळली. राजाचा तो सर्व दिवस अशाच अस्वस्थपणांत गेला, तेव्हां आम्ही राजहंस नामक राजाच्या चेटास बोलावून अस्वस्थतेचें कारण विचारलें, त्यावर तो म्हणाला, "आमच्या स्वामींस आजपर्यंत आम्ही कधीं खिन्न अवस्थेंत पाहिलें नाहीं, पण आज आपणांस व्यर्थ पंडिता समजणाऱ्या विष्णुशक्तीच्या कन्येनें असें राजाला अस्वस्थ केलें" असें इतर राण्या क्रोधानें म्हणत होत्या, त्यांच्या तोंडचे हे शब्द ऐकून मीहि उद्विग्न झालों, व शिववर्म्यासह असा विचार करूं लागलों."

"राजाला जर कांहीं शारीरिक व्यथा होत असती तर त्यानें वैद्यास बोलाविलें असतें, पण तसें कांहीं झालेलें नाहीं, बरें मानसिक व्यथा आहे म्हणून म्हणावें तर तिचें कांहीं कारण दिसत नाहीं, याच्या राज्यांतील सर्व कंटक नष्ट झाले आहेत, याला कोणी शत्रूहि नाहींत, सर्व प्रजा अनुरक्त आहे. कोणत्याही प्रकारची हानीहि झालेली नाहीं. मग याच्या स्वास्थ्यांत असें अंतर कां पडावें ? असा विचार करीत असतां शिववर्मा म्हणाला, "मला त्याच्या दुःखाचें कारण कधींपासूनच ठाऊक आहे. 'तो मी मूर्ख आहें' असें समजून सदा संतप्त होत असतो. मला पांडित्य कसें प्राप्त होईल अशी चिंता तो सतत करीत रहातो. आज तर राणीनें त्याचा अपमान केला, असें आतांच चेटानें सांगितलें. तस्मात् त्याच्या चिंतेचें व अस्वस्थतेचें तेंच कारण आहे, यांत मुळींच संशय नाहीं."

"असा आपसांत विचार करून व ती रात्र कशीबशी घालवून दुसऱ्या दिवशीं सकाळींच नित्य व अवश्य कर्में केल्यावर आम्ही दोघे राजगृहास गेलों, पण आंत कोणालाहि सोडूं नये अशी राजाची आज्ञा झालेली असल्यामुळें आम्हांलाही द्वारावर प्रतिबंध झाला. तथापि युक्तिप्रयुक्तीनें अगोदर मी व मागून शिववर्मा अशा क्रमानें हळूहळू आम्ही राजापाशीं जाऊन बसलों."

## २७३. गुणाढ्याच्या भाषात्यागाची आणि "कलाप" व्याकरणाच्या प्रादुर्भावाची कथा.

२७३. "शातवाहनापाशीं जाऊन बसल्यावर अवसर सांपडतांच मी म्हटलें, "महाराज, आपण विनाकारण असे खिन्न कां बसलांत ?" पण त्यावर त्यानें कांहींएक उत्तर दिलें नाहीं. तेव्हां शिववर्म्यानें असें अद्भुत भाषण केलें, "देवा, आपण मला पूर्वी सांगितलें होतें कीं, आपणाला कसेंतरी विद्वान कर. तें लक्षांत धरून आपल्याला विद्वान कसें करतां येईल हें जाणण्याकरितां मी काल रात्रीं एक स्वप्न पडण्याचें कुन्हेडें केलें. त्यामुळें

स्वप्नांत आकाशांतून एक कमल पडलें. त्यास कोणाएका दिव्य कुमारानें फुलविलें. त्यांतून एक शुभ्र वस्त्र नेसलेली दिव्य स्त्री निघाली, व ती आपल्या मुखांत शिरली, असें मी पाहिलें, आणि लागलाच जागा झालों. मला वाटतें कीं, ती साक्षात सरस्वतीच होय," हें अद्भुत स्वप्न ऐकतांच शातवाहनानें मौन सोडलें व " एकादा पुरुष मोठ्या प्रयत्नानें शिकूं लागल्यास किती दिवसांनीं पंडित होतो ? " असें गूढ अभिप्रायानें मला विचारलें. " " शिवाय पांडित्य नसल्याकारणानें मला ही लक्ष्मी शोभत नाहीं, कारण काष्ठाला अलंकार घालणें जसें व्यर्थ तसेंच मूर्खाला वैभव मिळणें व्यर्थ आहे. " असें तो म्हणाला. तें ऐकून मी उत्तर दिलें, " राजन्, व्याकरण सर्व विद्यांचें मुख अथवा द्वार आहे. तें शिकण्यास बारा वर्षें लागतात. पण मी सहा वर्षांत तें तुम्हांला शिकवीन. " त्यावर शिववर्मा ईर्षेनें म्हणाला, " सुखांत वाढलेल्या राजाच्या हातून इतके दिवस क्लेश कसे सहन करवतील ? हे महाराज, मी तुम्हाला सहा महिन्यांत तें शिकवीन. " हें त्यांचें असंभाव्य भाषण ऐकून मला मोठा राग आला, "व, तूं जर या राजास सहा महिन्यांत व्याकरण शिकविलेंस तर मी संस्कृत, प्राकृत व या देशांतील देशी भाषा अशा मनुष्य लोकांतल्या तिन्ही भाषा सोडीन, ' असें त्यांस म्हटलें. त्यावर शिववर्मा उलट म्हणाला, मी " जर राजाला सहा महिन्यांत व्याकरण शिकवूं शकलों नाहीं, तर बारा वर्षें तुझ्या पादुका आपल्या मस्तकावर वाहीन. इतकें भाषण झाल्यावर आम्ही दोघेहि आपापल्या घरीं गेलों. राजाहि या दोघांच्या कलहांत आपलें कार्य सिद्ध होणार म्हणून आनंदित झाला. "

"घरीं गेल्यावर आपण केलेली प्रतिज्ञा अत्यंत दुस्तर आहे असें जाणून व्याकूळ झालेल्या त्या शिववर्म्यानें सर्व वृत्तांत आपल्या शहाण्या भार्येला सांगितला. तेव्हां दुःखित झालेली ती साध्वी म्हणाली, " स्वामिन् या संकटसमयीं स्वामी कुमारावाचून दुसरी गति दिसत नाहीं. " तेव्हां ' तूं म्हणतेस तें अगदीं खरें आहे ' असें सांगून, त्याच रात्रीं चवथ्या प्रहरीं शिववर्मा उपाशीं स्वामी कार्तिकाकडे जावयास निघाला. हें वर्तमान मला हेरांच्या द्वारा समजलें. मीहि तें राजास कळविलें. तेव्हां, " काय होईल कोण जाणे " असें म्हणून तोही चिंतेंत पडला. पण इतक्यांत सिंहगुप्त नामक एक राजपुत्र म्हणाला, " देव, आपण खिन्न झालां असें पाहून मला फार वाईट वाटलें व आपलें हित व्हावें या उद्देशानें मी या नगराच्या बाहेरील चंडिकेच्या मंदिरांत जाऊन देवीपुढें आपलें मस्तक कापून घेऊं लागलों, तों इतक्यांत, " राजपुत्रा, असें साहस करूं नकोस. राजाचे मनोरथ पूर्ण होतील " अशी आकाशवाणी झाली. तेव्हां मला असें वाटतें, कीं आपली इच्छा सफल होईल. असें सांगून व राजाची आज्ञा घेऊन त्यानें शिववर्म्याचे मागोमाग दोन हेर पाठविले. "

" तिकडे शिववर्मा आपल्या घरांतून निघाल्यावर वायु भक्षण करीत, मौन धरून व आपला निश्चय दृढ ठेवून स्वामिकुमाराजवळ येऊन पोंचला. तेथें आपल्या श्रांत शरिराचीही अपेक्षा न करितां, तपश्चरणानें त्यानें स्वामीस प्रसन्न करून घेतलें. त्या देवानेंही त्यास प्रसन्न मनानें अभीष्ट वर दिला. हा सर्व प्रकार प्रत्यक्ष पाहून शिववर्म्याच्या पूर्वीच परत आलेल्या हेरांनीं राजाला शिववर्म्यास सिद्धि मिळाली असें सांगितलें. तेव्हां मेघ दर्शन होतांच हंस व चातक यांस जसा क्रमानें विषाद व आनंद होतो, त्याप्रमाणें तें वर्तमान ऐकून मला व राजाला क्रमानें विषाद व हर्ष झाला. कांहीं वेळानें सिद्ध शिववर्माहि परत आला, व चिंतन करतांच पुढें प्रकट झालेल्या सर्व विद्या त्यानें राजास अर्पण केल्या. त्यावरोबर सातवाहनास त्या सर्व प्राप्त झाल्या, दैवी सिद्धीच हातीं आल्यावर दुर्लभ काय असणार ? असो. राजाला सर्व विद्यांची प्राप्ती झाली आहे असें ऐकून नगरांतील सर्व लोक संतुष्ट झाले. त्यांनीं महोत्सव केला. नगरभर पताका लाविल्या, तोरणें बांधिलीं व राजाचा जयजयकार केला. "

अर्थात यानंतर गुणाढ्यास मौनाचा स्वीकार करणें प्राप्त झालें. याच कथेची पूर्वता म्हणून शातवाहन मागच्या जन्मीं ऋषि व तपस्वी होता व शापानें मर्त्य लोकांत जन्म घेऊन राजा झाला असें सांगितलें आहे.

प्रस्तुत कथेशीं थोडीशी विसंगत अशीहि लोकवार्ता संस्कृत ग्रंथकारांनीं उल्लेखिली आहे. ती म्हटली म्हणजे शातवाहनानें आपल्या अंतःपुरांत प्राकृत भाषेसच स्थान दिलें होतें, संस्कृतला दिलें नाहीं अशा प्रकारची लोकवार्ता राजशेखरानें आपल्या काव्यमीमांसेंत दिली आहे.

### २७४. शातवाहनांचा भरुकच्छावर अधिकार.

२७४. शातवाहन कथांमध्यें कांहीं तरी राजकीय महत्त्वाची माहिती मिळते अशा प्रकारची माहिती म्हटली म्हणजे त्यांचा भरुकच्छावरील अधिकारासंबंधानें होय. मागच्याच शातवाहनास व्याकरण शिकविण्याच्या कथेचा पुढील भाग येणेंप्रमाणें आहे. " इकडे विद्याभारानें नम्र झालेल्या राजानें शिववर्म्यास गुरु समजून राजास योग्य असलेल्या रत्नांनीं त्याची पूजा केली, व नर्मदातीरावरील भरुकच्छ नामक प्रदेशाचें आधिपत्य त्यास दिलें. ज्यानें दूतांच्या द्वारा शिववर्म्याच्या

सिद्धीची वार्ता आणविली होती, त्या सिंहगुप्तास संपत्तीच्या योगानें संतुष्ट करून राजानें त्यास आपल्या बरोबरीचा राजा केलें. विष्णुशक्तिकन्या अर्थात् त्याची राणी विद्याप्राप्तीस कारण झाली, म्हणून त्यानें तिला स्वतः अभिषेक करून सर्व राण्यांत मुख्य राणी केलें. ''

प्रस्तुत उल्लेख महाराष्ट्राच्या त्याचप्रमाणें गुजरातच्या इतिहासास महत्त्वाचा आहे. यादवांच्या पौराणिक उल्लेखानंतर मौर्य काळापर्यंत गुजराथचा इतिहास उपलब्ध नाहीं. असें शक्य आहे, कीं अश्मकांचेंच राज्य गुजरातेंत चालू असावें आणि तेथें अश्मकांनंतर शातवाहनांचा अंमल असावा. अशोकानें काठेवाड घेऊन उत्तरकोंकणांत देखील आगमन केलें होतें. ही स्वारी आद्य शातवाहनानंतर कांहीं वर्षांनीं झाली असावी. मौर्यांच्या कालानंतर क्षत्रपांचा इतिहास गुजराथेंत सुरू होतो. गुजराथवर या क्षत्रपांचा पगडा अनेक पिढ्या किंबहुना अनेक शतकें होता. या क्षत्रपांची व शातवाहनांची स्पर्धा चालू होती, तर शातवाहनांचा गुजराथेंत अंमल कांहीं काल होता, याविषयीं थोडेंतरी अनुमान करण्यास दोन उल्लेख बृहत्कथेंतच उपलब्ध आहेत.

पहिला उल्लेख वर दिलाच आहे. भरुकच्छ येथें शातवाहनाचा अधिकारी होता त्याला साक्ष देणारा श्लोक पुढील प्रमाणें आहे:—

**राजार्हरत्ननिचयैरथ शर्ववर्मा**
**तेनार्चितो गुरुरिति प्रणतेन राज्ञा**
**स्वामीकृतश्च विषये भरुकच्छ नाम्नि**
**कूलोपकंठविशिवेशिनि नर्मदायाः**

शालिवाहनानें शर्ववर्म्याला भरुकच्छ येथें विषयपति केलें.

शर्ववर्मा ऊर्फ शिववर्मा भरुकच्छांत जाण्यापूर्वी भरुकच्छांत शातवाहनांचें राज्य होतें असें दाखविणारा आणखी एक उल्लेख आहे. तो देखील मांडण्याचें श्रेय बृहत्कथा गुणाढ्यासच देत आहे.

गुणाढ्य प्रतिष्ठान येथें गेला तेव्हां त्यानें तेथें गोदेच्या कांठीं एक देवीकृति सुंदर उद्यान पाहिलें. त्याविषयीं त्यानें चौकशी केली असतां त्याला असें समजलें कीं तें एक " दे वी कृ ति उ प व न " आहे. त्या उपवनाच्या निर्मितीच्या कथेंत असें दाखविलें आहे कीं " प्रतिष्ठान " नगरीच्या अलंकरणाची फिकीर भरुकच्छांतील देवतांना देखील होती. ती कथा गुणाढ्य सांगतो—

"एकदां मी मोठ्या कौतुकानें गोदावरीच्या तटीं स्वैर हिंडत असतां, तेथें एक 'देवीकृति' या नांवाचें नंदनवनासारिखें रम्य उपवन पाहिलें व 'हें कोणी निर्माण केलें' असें मी त्या पालकांस विचारिलें असतां तो म्हणाला, "प्रभो, वृद्धांच्या तोंडून याच्या उत्पत्तीविषयीं आम्हीं असें ऐकलें आहे—पूर्वी कोणी एक निराहार व मौनी ब्राह्मण येथें आला व त्यानें देवमंदिरासह हें उद्यान निर्मिलें. तो चमत्कार पाहून आसपासचे सर्व ब्राह्मण त्याच्याजवळ आले व त्यांस मोठ्या आग्रहानें तुम्हीं कोण, कोठून आलां इत्यादि त्याचें वृत्त विचारूं लागले तेव्हां त्यानें आपला वृत्तांत असा सांगितला—नर्मदेच्यातीरीं भरुकच्छ ( भडोच ) म्हणून एक प्रांत आहे. त्यांत माझा जन्म झाला. पण मी दरिद्री व आळशी असल्यामुळें मला कोणी भिक्षाही घालीना, तेव्हां मी विरस झालों व घरदार सोडून तीर्थाटन करीत विंध्यवासिनीचें दर्शन घ्यावयास गेलों. त्या महादेवीच्या पुढें गेल्यावर लोक 'पशूचा बळी देऊन या देवीस प्रसन्न करितात, पण मजजवळ पशु नाहीं, यास्तव मूर्ख असल्यामुळें या पशुतुल्य असलेल्या आपल्या शरीराचाच बळी देऊन मी तिला संतुष्ट करितों, असें म्हणून आपला शिरच्छेद करण्याकरितां मी शस्त्र घेतलें, त्याबरोबर ती कृपाळू देवी मजवर प्रसन्न होऊन मला म्हणाली, 'वत्सा, मजजवळ सुखानें रहा, तूं सिद्ध आहेस, आपल्याला मारून घेऊं नकोस' हा वर मिळतांच मी दिव्य पुरुष झालों व माझी क्षुधा व तृष्णा पार नाहींशी झाली. व कांहीं दिवसांनीं देवी म्हणाली, "वत्सा, हें दिव्य बीज घेऊन तूं प्रतिष्ठानसंज्ञक नगराजवळ जा, व गोदेच्यातीरीं एक रम्य उद्यान निर्माण कर." ही तिची आज्ञा शिरसामान्य करून मी येथें आलों व तिच्या प्रभावानें हें दिव्य उद्यान येथें रचिलें, आतां यापुढें तुम्हीं याचें रक्षण करा असें सांगून तो ब्राह्मण गुप्त झाला. याप्रमाणें देवीच्या प्रभावानें हें उद्यान निर्माण झालें आहे, असें ऐकून मला मोठें आश्चर्य वाटलें व मी आपल्या घरीं परत आलों."

### २७५. गुणाढ्यकालीन प्रतिष्ठान.

२७५. गुणाढ्यानें प्रतिष्ठान ज्या कालाचें वर्णिलें म्हणून सांगितलें आहे त्या कालांतील शातवाहन हा पहिलाच शातवाहन होता असें स्पष्ट दिसत आहे. त्याचा पूर्वगामी दीपकर्णी म्हणून सांगितला आहे आणि तो कोणत्या वंशाचा होता हें दिलें नाहीं. दीपकर्णी हा वंशहीन झाल्यामुळें जो नवीन राजा आला त्याचें नवीन कुल स्थापन झालें आणि त्याचें नांव त्या कुळाला मिळालें. तर शिमुक शातवाहनाच्या अगोदर कित्येक पिढ्या दीपकर्णी होऊन गेला असें समजण्यास आणि त्याला वररुचि याच्या आसपास धरण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं. व गुणाढ्यासहि वररुचीपासून दोनचार पिढ्यांनंतरचा धरण्यास हरकत दिसत नाहीं याविषयीं सविस्तर विवेचन पुढें करावें लागणारच आहे.

गुणाढ्यानें वर्णिलेल्या कालीं प्रतिष्ठान हें विषयनाम होतें पण नगरनाम प्रतिष्ठान असें निश्चित झालें नव्हतें. त्यासंबंधानें दोन भिन्न तऱ्हेचे उल्लेख सरित्सागरांत आहेत. एका उल्लेखांत सुप्रतिष्ठित हें नगरनाम दिलें आहे आणि अन्य उल्लेखांत 'प्रतिष्ठान' हेंच नगरनाम दिलें आहे.

गुणाढ्याच्या काळांत प्रतिष्ठान येथील जुनें घराणें जाऊन शातवाहन घराणें स्थापन झालें होतें. गेलेलें घराणें कोणाचें असावें हें दिलें नाहीं पण तें अश्मकांचें असावें असें वाटतें. महापद्मनंदीनें अश्मक घराणें नष्ट केलें तेथें दुसरा एक नंद असतां वररुचि आला होता; पण पुढें नंदहि गेले, मौर्य आले, पण मौर्यांच्या काळांत अश्मक पुन्हां परत येऊन शातवाहन स्थापन झाले असावेत असें दिसतें. चंद्रगुप्तकालीन मेगास्थिनीच्या ग्रंथामार्फत युरोपांत पसरलेली आणि प्लिनीच्या ज्ञानकोशांत आलेली माहिती दक्षिणेकडील अश्मकांचाच उल्लेख करीत आहे.

**२७६. गुणाढ्याचें जन्मवृत्त, आणि वत्सगुल्म, नागकुमार, दक्षिणेकडे विद्यार्जनासाठीं गमन, प्रतिष्ठानास पुनरागमन.**

२७६. "प्रतिष्ठान प्रांतांत सुप्रतिष्ठित म्हणून एक नगर आहे. तेथें सोमशर्मा नांवाचा कोणी एक उत्तम ब्राह्मण होता. त्यास वत्स व गुल्मक असे दोन पुत्र व श्रुतार्था नांवाची तिसरी कन्या, अशीं तीन अपत्यें होतीं. कांहीं कालानें भार्येसह तो ब्राह्मण मरण पावला. तेव्हां त्या दोघां पुत्रांनीं आपल्या भगिनीचें पालनपोषण केलें. पण एकाएकीं ती कन्या गर्भवती झाली, तेव्हां तेथें दुसरा कोणी पुरुष नसल्यामुळें त्या दोघां बंधूंस परस्परांविषयीं शंका आली. परंतु श्रुतार्था फार शहाणी होती. तिला आपल्या भावांची वृत्ति साशंक झाली आहे, असें समजलें व त्याबरोबर ती न विचारतांच त्यांस म्हणते–तुम्हीं मजविषयीं पापशंका करूं नका. मी तुम्हांस खरा प्रकार सांगतें. कुमार कीर्तिसेन या नांवाचा नागराजा वासुकीचा पुतण्या आहे. मी स्नानाला गेलें असतां त्यानें मला एकदां पाहिलें व त्याचें चित्त कामासक्त झालें, त्यानें आपुलें कुल व नांव सांगून गांधर्वविधीनें माझ्याशीं लग्न लाविलें. पण भगिनीचें तें भाषण ऐकून, तूं सांगतेस तें खरें कशावरून असें विचारिलें, तेव्हां तिनें त्या नागकुमाराचें स्मरण केलें. त्यावरोबर तो प्रत्यक्ष पुढें आला आणि तो त्यांस म्हणाला, "हिला मी आपली भार्या केली आहे, व त्यामुळें ही सुरसुंदरी शापापासून मुक्त झाली आहे. हिला पुत्रच होईल व त्याचा जन्म होतांच तुम्ही तिघेंही शापापासून मुक्त व्हाल" असें सांगून तो गुप्त झाला. पुढें कांहीं दिवसांनीं श्रुतार्थी प्रसूत झाली व तिला पुत्र झाला. तोच मी आहें असें समज. मी जेव्हां जन्मास आलों तेव्हां हा गुणवंताचा अवतार झाला आहे असें आकाशवाणीनें सांगितलें तें ऐकून माझ्या बांधवांनीं माझें गुणाढ्य असें नांव ठेविलें. माझ्या उत्पत्तीनें माझ्या आईचा व मामांचा शाप क्षीण झाला व तीं तिघेंही कांहीं कालानें मरण पावलीं. त्यामुळें मला फार दुःख झालें, व माझें सर्व धैर्य गळालें."

"पण प्रसंगच पडला म्हणजे सर्व प्राणी तो सहन करण्यास सिद्ध होतात या न्यायानें मी आपल्या शोकाचा त्याग केला आणि मी जरी लहानच होतों, तरी ईश्वरावर सर्व विश्वास टाकून विद्या संपादन करण्याकरितां दक्षिण देशांत एकटाच गेलों. योग्य गुरूजवळ राहून सर्व विद्या शिकलों. यामुळें माझी प्रसिद्धि झाली. पण मित्रा, जन्मभूमीचें प्रेम कांहीं अवर्णनीय असतें. मला परदेशांत बरें वाटेना म्हणून मी आपल्या देशांत परत आलों. माझे गुण सर्वांच्या अनुभवास येऊं लागले. माझ्या विद्येवर लुब्ध होऊन पुष्कळ शिष्य मजबरोबर आले होते. त्यांच्यासहवर्तमान मी फार दिवसांनीं प्रतिष्ठानांत प्रवेश केला व तेथें मला अवर्णनीय शोभा दिसली."

**२७७. गुणाढ्यकथांचें शातवाहनकालीन सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्व.**

२७७. गुणाढ्याची जन्मकथा ही एक मासलेवाईक कथा आहे. नागानें येऊन ब्राह्मणकन्येपासून पुत्रोत्पत्ति करण्याची कथा बरीच जुनी असावी. ही प्रथम गुणाढ्यास चिकटून पुढें प्रत्यक्ष शालिवाहनासच चिकटली. शातवाहनाविषयीं ज्या ज्या कथा आज अस्तित्वांत आहेत त्यांतील प्रत्येक कथा बृहत्कथेंतील आहे, व ती पुढें अद्भुत रसाच्या भोक्त्यांनीं अधिक प्रसिद्ध व्यक्तीला चिकटविण्याचा उपक्रम सुरू केल्यामुळेंच शातवाहनकथांची वाढ झालेली दिसत आहे.

गुणाढ्यानें दिलेलें प्रतिष्ठानवर्णन देखील अनेक कारणांनीं संस्मरणीय आहे. त्यांत एका सामवेदी वैदिकाच्या व्यवहारमूढत्वाबद्दल चेष्टा झाल्याची गोष्ट दिली आहे, ती गोष्ट आजच्या महाराष्ट्राला देखील लागू पडणारी आहे. महाराष्ट्रांत सामवेदी ब्राह्मण नाहींत. सोपाऱ्याला म्हणजे महाराष्ट्राच्या वायव्य सरहद्दीवर जी सामवेदी ब्राह्मणांची वस्ती आहे, तींत वेदाभ्यासाची परंपरा मुळींच नसून आपण कधीं भिक्षुकी केली नाहीं यांतच त्यांना अभिमान वाटतो, आणि त्यांच्यातला भिक्षुक वर्ग आणि वेदवेत्ता वर्ग नष्ट झाला असल्यामुळें त्यांचीं कर्में आज यजुर्वेदी आपल्या वेदाप्रमाणें करतात. प्रतिष्ठानला ज्या व्यव-

हारशून्य सामवेद्याचें वर्णन आलें आहे, तो बहुतकरून तैलंगी किंवा द्राविड असावा. महाराष्ट्रांत विशेषतः नागपुरास आजकाल ज्याप्रमाणें तैलंगी भटजी म्हणजे चेष्टेचा विषय आहे, त्याप्रमाणेंच त्यावेळेस देखील स्थिति असावी असें दिसतें. तेलंगणांतून सामवेदी मंडळींनीं दक्षिणा मिळण्यासाठीं बाहेर पडावयाचें हा परिपाठ त्यावेळेस सुद्धां दिसतो. उत्तरहिंदुस्तानांत अनेक राजघराण्यांचे उपाध्ये पूर्वापार दाक्षिणात्य आहेत. तर यावरून ब्राह्मणांचा संचार दक्षिणेकडून उत्तरेकडे व उत्तरेकडून दक्षिणेकडे एकसारखा होत होता, आणि जे ब्राह्मण आपणांस राजाश्रय ज्या ठिकाणीं मिळवूं शकत तेथें ते रहात. ब्राह्मणाचीं विद्यापीठें तक्षशिलेपासून ताम्रपर्णीपर्यंत पसरलीं होतीं. कथासरित्सागरांत पाटलीपुत्र शहर स्थापन करणाऱ्या पुत्रक नामक ब्राह्मणाच्या पूर्वजांची एक पिढी हरिद्वारजवळील कनखल येथें गेली आणि दुसरी एक पिढी उत्तरकोंकणांत चिंचणी येथें गेली असें दाखविलें आहे, व हा ब्राह्मणवंश मुळचा दक्षिणेचा होता असें सांगितलें आहे. * या विषयीं सविस्तर वर्णन मागें आलेंच आहे.

वर उल्लेखिलेली गुणाढ्यानें सांगितलेली सामवेदी ब्राह्मणाची कथा पुढीलप्रमाणें आहे.

सा म वे दी ब्रा ह्म ण व वे श्या.

एकदां एका सामवेदी ब्राह्मणास आठ मासे सुवर्ण दक्षिणा मिळाली. तेव्हां त्यास एक विट म्हणतो, "ब्राह्मणा, तुझ्या ब्राह्मण्यवृत्तीनें तुला भोजन तर अनायासें मिळण्यासारखें आहे. यास्तव हें सुवर्ण खर्च करून लोकयात्रेचें ( व्यवहाराचें ) ज्ञान होण्याकरितां तूं चातुर्य शीक." त्यावर "मला व्यवहारचातुर्य कोण शिकविणार बाबा ?" असें जेव्हां त्यानें म्हटलें, तेव्हां तो पुनरपि म्हणाला, "ही जी चतुरिका नामक वेश्या आहे तिच्या जवळ जा." पण "तेथें जाऊन मी काय करूं ?" असें त्यानें विचारिलें असतां तो पुनः म्हणाला, "तिला हें सुवर्ण देऊन सामाच्या योगानें तिचें चित्तरंजन कर," तें ऐकून तो ब्राह्मण चतुरिकेच्या घरीं गेला, तेव्हां या, बसा. असें हंसत बोलून तिनें त्याचा योग्य सत्कार केला, बैठकीवर बसल्यावर 'हें सुवर्ण घे, व मला तूं लोकयात्रा शिकव,' असें बोलून त्यानें तें सोनें तिला दिलें तें पाहून तेथील सर्व लोक हंसूं लागले, इतक्यांत त्यानें आपले हात गोकर्णाकृति करून उंचस्वरानें सामगानास आरंभ केला. तो अपूर्व शब्द ऐकून त्या वेश्येचे सर्व विट तेथें जमले व पोट धरधरून हंसूं लागले. शेवटीं त्यांतील कित्येक म्हणाले "अरे हा कोल्हा कोठून आला ? त्याला अर्धचंद्र ( गचांडी ) मारून बाहेर घालवा " तें ऐकून हे अर्धचंद्र बाण आपल्यावर सोडणार आहेत असें समजून व त्यामुळें आपला शिरच्छेद होईल या भीतीनें 'मी लोकयात्रा शिकलों.' असें म्हणून तो तेथून पळून गेला. नंतर पुनः त्या विटाजवळ जाऊन त्यानें सर्व हकिकत त्यास सांगितली. ती ऐकून 'अरे वेड्या, मी तुला 'सामा' च्या ( सलोख्याच्या ) गोष्टी सांगून तिचें चित्तरंजन करावयास सांगितलें होतें, पण तूं साम या शब्दाचा अर्थ वेद असा समजून तो तेथें म्हणूं लागलास; पण वेदाध्ययनाचा काल कोणता, व अकाल कोणता हेंही अर्थविरहित अक्षरें घोकणाऱ्या तुला कळूं नये ना ! शाबास !' असें म्हणून तो त्याला तिच्याकडे घेऊन गेला, व 'या पशूचें सुवर्णतृण फेंकून दे' असा तिला म्हणाला; त्याबरोबर तिनें हंसून तें सुवर्ण परत दिलें, व परत दिलेलें तें सुवर्ण घेऊन तो ब्राह्मण आज हें माशानें गिळलेलें माणिकच हातीं लागलें, असें म्हणत आपल्या घरीं गेला.

प्रतिष्ठान राजधानींतील वैश्यकथा आणि वेश्याकथा आज अस्तित्त्वांत आहेत ही गोष्ट भाग्याची आहे. इतक्या प्राचीन कथा जिवंत कशा रहातात यांत आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. याहूनहि जुन्या महाराष्ट्रीय कथा अस्तित्त्वांत आहेत एवढेंच नव्हे तर जागतिक वाङ्मयाचा अंश झाल्या आहेत.

## २७८. जागतिक वाङ्मयांत शिरलेली एक गुणाढ्योक्त प्रतिष्ठान कथा.

२७८. कथापीठलंबक ज्या एका वैश्यकथेचें संरक्षकत्व गुणाढ्यास देत आहे ती कथा म्हटली म्हणजे मूषक वाण्याची कथा होय. ही कथा आज जगभर पसरली आहे आणि अनेक देशांतील शालोपयोगी क्रमिक पुस्तकांत प्रविष्ट झाली आहे. ज्या कथांचें उगमस्थान महाराष्ट्र असून ज्यांचा प्रसार चोंहोंकडे झाला आहे अशा कथा अनेक आहेत. विषया आणि चंद्रहास यांची म्हणजे एक महाराष्ट्रांतील कथा प्रेमविषयक अद्भुत कथा म्हणून पसरली आहे तर मूषक वाण्याची कथा बोधपर म्हणून प्रसृत झाली आहे. ती कथा थोडक्यांत येणेंप्रमाणें देतां येईल. ही कथा गुणाढ्यच सांगत आहे.

"प्रतिष्ठानांत एकदां वैश्यांच्या वाणिज्यासंबंधीं गोष्टी चालल्या असतां एक वाणी म्हणाला, "अहो, भांडवलावर व्यापार करून कोणीहि श्रीमंत होईल; पण मी कांहींच भांड-

* तीर्थं कनखलं नाम गंगाद्वारेऽस्ति पावनम् । दाक्षिणात्यो द्विजो कश्चित् तपस्यन् भार्यया सह, । तत्रासीत् तस्यचात्रैव जायन्ते स्म त्रयः सुताः । ( कथापीटलंबक तरंग ३. )



चित्रांक ४९. चंद्रहासानें आणलेल्या पत्रांत विषया बदल करीत आहे.

बल नसतां धनवान् झालों." नंतर त्यानें आपल्यास श्रीमंती कशी प्राप्त झाली हें सांगितलें, तें असें. तो आईच्या पोटांत असतांच त्याचा बाप वारला. तेव्हां त्याची आई कुमारदत्त नांवाच्या त्याच्या बापाच्या मित्राच्या घरीं जाऊन राहिली. पुढें तो लिपी व गणित शिकला. नंतर आईच्या सांगण्यावरून तो विशाखिल नांवाच्या व्यापाराकरितां भांडवल देणाऱ्या वैश्यापाशीं गेला. तो गेला त्यावेळीं विशाखिल एका वैश्या-पुत्राची, त्यानें दिलेल्या धनाची वृद्धि केली नाहीं व तें घाल-विलें, याबद्दल कानउघाडणी करीत होता. तो त्याला म्हणाला, 'हा येथें एक उंदीर मरून पडला आहे त्यावर सुद्धां व्यापार करतां येईल.' हें ऐकून या नवीन आलेल्या वाण्यानें तो उंदीर विशाखिलापासून मागून घेतला, व बाजारांत जाऊन एका मोठ्या वैश्याच्या मांजराकरितां दोन मुठी चण्यास विकला. घरीं येऊन त्यानें ते चणे भाजले, व ते फुटाणे व एक पाण्याची घागर घेऊन गांवाबाहेर गेला. तेथें रहदारीच्या मार्गावर एका झाडाखालीं श्रांत मोळीविक्ये विश्रांतीसाठीं बसत, त्यांस ती त्यांतील चणे व थंड पाणी देत असे. तेव्हां त्यांनीं तुष्ट होऊन त्याला दोन दोन लांकडें दिलीं, तीं त्यानें बाजारांत विकलीं व पुनः चणे घेऊस पूर्ववत् केलें. असें तीन दिवस करून त्यानें थोडेंसें द्रव्य सांठविलें व त्यांचीं सर्व लांकडें विकत घेतलीं. दैववशात् त्याचवेळीं अति-वृष्टी झाल्यामुळें लांकडें मिळेनात, व त्यामुळें त्याच्या लांक-डांना चांगला भाव आला. नंतर त्यानें एक दुकान घेतलें व आपल्या चातुर्यानें तो धनाढ्य झाला. त्यानें एक सुवर्णाचा उंदीर करून विशाखिलास दिला. तेव्हां त्यानें आनंदित होऊन आपली कन्या त्याला दिली. तेव्हांपासून लोक त्याला मूषकवाणी म्हणून ओळखूं लागले.

## २७९. जागतिक लोकप्रियता असलेल्या कांहीं कथांची महाराष्ट्रांत निर्मिति व कांहींचा महाराष्ट्रा-कडून प्रसार.

२७९. जागतिक वाङ्मयांत महाराष्ट्रीय कथा केव्हांपासून प्रविष्ट होऊं लागल्या याविषयीं जर प्रश्न केला तर त्यास देखील सुरवात शातवाहन कालीं झाली असावी असें वाटतें. कान्स्टंटाइन बादशहाचा इराणी साम्राज्याशीं झगडा चालू होता. त्याच्या कालच्या कथांत चंद्रहासकथेशीं सदृश अशी कथा आली आहे एवढेंच नव्हे, तर प्राचीन नार्स कथांत प्रविष्ट झाली आहे. तिपिटकाच्या चिनी आवृत्तींत चंद्रहासकथा आलीच आहे. यावरून भारतीय कथासंरक्षणकार्याचा परिणाम बाह्य जगावर कसा झाला हें स्पष्ट होईल. भारतीय कथासंरक्षण-पद्धति व प्रसारपद्धति यांकडे थोडेंसें वळलें पाहिजे. त्याशिवाय जगांतील सांस्कृतिक इतिहासाचे धागे लक्षांत येणार नाहींत. ही प्राचीन चंद्रहासकथा जगांत कशी प्रसृत झाली तें पाहूं.

कथासंकलन आणि प्रसार यांच्या इतिहासांत प्रतिष्ठानचें कार्य देखील महत्त्वाचें होतें.

## २८०. प्रो. विंटरनिझ्झ यांचें महाराष्ट्रीय-कथा-प्रसार-शोधक कार्य.

२८०. चंद्रहासकथेचा जगभर प्रसार कसा झाला ह्याचें सविस्तर विवेचन प्रो. विंटरनिझ्झ यांनीं आपल्या "हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर (व्हा १. मिसेस केतकरकृत भाषांतर, प्रकाशक कल. युनि. पृ. ५८६) मध्यें दिलेलें पुढीलप्रमाणें आहे.

"चंद्रहास आणि विषया यांची कथा (चंद्रहासोपाख्यान) ही जगाच्या वाङ्मयांत महत्त्वाची आहे. ही कथा हिंदी–बौद्ध व जैन–त्याचप्रमाणें पाश्चात्य कथात्मक वाङ्मयांत अनेक रूपांतरें पावली आहे. या कथेचा थोडक्यांत सारांश असा आहेः चंद्रहास नांवाचा मुलगा शुभनक्षत्रीं जन्माला येतो, आणि आपल्या शत्रूच्या अनेक कपटजालांतून निसटतो. अखेरीस शिक्षेस पात्र झालेला हा तरुण, ज्यांत आपल्याला मृत्यूची आज्ञा आहे असें पत्र घेऊन तें ज्याचें त्याला देण्यास जातो. वाटेंत एक तरुणी तें पत्र बदलते किंवा त्यांत बदल करते, आणि मग तिच्याशीं त्याचा विवाह होतो. तेव्हां त्याला संपत्ति व सत्ता यांचा लाभ होतो. इकडे त्याचा शत्रु दुसऱ्याकरितां खणलेल्या खड्ड्यांत स्वतःच पडतो, किंवा त्याचा मुलगा पडतो, अशा प्रकारची कथा टी. व्हीलर यानें प्रथम यूरोपांत नेली. तिचें जर्मन भाषेंत भाषांतर ए. वेबर यानें केलें.*

वेबरनेंच प्रथम या कथेशीं सदृश अशा पाश्चात्य कथांकडे लोकांचें लक्ष वेधलें. नंतर जे. शिक् यानें इकडे लक्ष दिलें.†

शिकनें आपल्या पुस्तकांत या कथेचीं बौद्ध व जैन रूपांतरें, हल्लींचीं हिंदी रूपांतरें, व ज्या कथांच्या माध्य-मानें ही कथा यूरोपांत गेली त्या पश्चिम आशियांतील या कथेचीं रूपांतरें यांचा बारकाईनें विचार केला आहे.

---

* (Monatsberichte der preuss. Akademie der Wissenschaften, 1869, pp. 10 ff; 377 ff.)

† (Corpus Hamleticum i, i, Das Glück Ind mit dem Todesbrief, Orientalische Fassungen, Berlin, 1912, P. 167 ff.

१. यूरोपांत ही कथा 'गेस्टा रोमानोरम' ( Gesta Romanorum ) या लॅटिन पुस्तकाच्या २० व्या प्रकरणांत, †

२. डेसंद्र याच्या नॉर्स कथांत कान्स्टांटिनोपल या शहराचा नामदायक बादशहा कॉन्स्टन्टाइन याच्या फ्रेंच नवल कथांत,‡ आणि

३. सॅक्सो ग्रामातिकस याच्या ॲम्लेथूची कथा, यांत प्रविष्ट झाली आहे. ॲम्लेथूचा पुढें शेक्सपीअरकडून हॅम्लेट बनला. शेक्सपीअरच्या हॅम्लेट या नाटकांत या कथेंतील प्राणघातक पत्राचा केलेला फरक तेवढा घेतला आहे. महाराष्ट्रीय चंद्रहास कथेचा आणि शेक्सपीअर 'हॅम्लेट' नाटक लिहितांना ऋणी झाला असेल ही कल्पनाहि आजच्या महाराष्ट्रीयांस सहज येणार नाहीं. जर्मन भाषेंत ही कथा शिलरच्या "Der Gang nach dem Eisenhamme" एका काव्यामुळें विशेष प्रख्यात झाली.†

आजपर्यंत उपलब्ध असलेल्या रूपांतरांत चिनी तिपिटकांतील रूपांतर सर्वांत जुनें आहे. हा ग्रंथ सेंग हुएई (मृत्युकाल इ. स. २८०) यानें चिनी भाषेंत प्रविष्ट केला.§

जैमिनी-भारतांत असें दिलें आहे कीं या चंद्रहासाला त्याच्या विष्णुभक्तीनें सर्व संकटांपासून वांचविलें. चंद्रहास विष्णुभक्त होता, व तो नेहमीं आपल्याबरोबर शालिग्राम बाळगीत असे. पौराणिक लेखकांच्या दृष्टीनें या कथेंतील सारांश म्हणजे शालिग्राम आणि तुळस यांची महती हा होय.

भागवतामध्यें चंद्रहास हा वैष्णव साधु म्हणून म्हटलें आहे, आणि नाभादासाच्या भक्तमालेंत तो ईश्वराच्या ४२ प्रिय भक्तांपैकीं ३१ वा होता असें म्हटलें आहे.× बंगाल, पंजाब आणि काश्मीर यांतील लोककथांतून या कथेंतील प्राणघातक पत्राचा तेवढा भाग येतो.†

जैमिनी भारताच्या, विशेषतः त्याच्या आश्वमेधिकपर्वाच्या कालासंबंधानें निश्चित सांगतां येत नाहीं. या ग्रंथांतील विष्णुभक्तीच्या स्वरूपाकडे लक्ष देतां "तें उत्तरकालीन पौराणिक वाङ्मयापेक्षां पूर्वीचें नाहीं. कसेंहि असलें तरी चंद्रहासकथेच्या शेवटीं निर्देशिलेल्या भागवतपुराणापेक्षां तें अलीकडचें आहे" अशा तऱ्हेचें मत प्रो० विंटरनिझ्झ यांनीं व्यक्त केलें आहे. त्याविषयीं वाचकांस सावध करणें अवश्य आहे. जैमिनि हा व्यास शिष्य होता हें मत आम्हांस अधिक ग्राह्य आहे. आणि चंद्रहासकथा कुरुयुद्धाच्या कालांत प्रचलित असावी असें आम्हांस वाटतें. तथापि चंद्रहासकथेस जी जागतिक लोकप्रियता मिळाली ती मिळण्यास सुरवात बौद्ध व जैन यांच्या मार्फत आणि कैकेय वर्चस्वाच्या अंतिम भागांत झाली असें आहे.

## २८० अ. कथावाङ्मयरक्षक वर्ग आणि त्याचा भारतीय पंडित वर्ग आणि पश्चिम एशिया व यूरोप यांतील कथा प्रवर्तकांशीं संबंध.

२८० अ. गुणाढ्यकाल म्हणजे ज्या काळांत पंडितवर्गानें कथावाङ्मय हातीं घेतलें तो काल होय. आणि याच कारणामुळें पंडिताख्यायिकांचा संग्रह कथावाङ्मयास जोडला गेला आहे. पाणिनि, व्याडि, वररुचि, कलाप व्याकरण या सारख्यांच्या कथा विद्याधरकथांस प्रस्तावनारूपी होणें ही गोष्ट कथासंरक्षकांचें कार्य निराळ्या वर्गाच्या हातीं गेलें होतें याची दर्शक आहे. बौद्धांच्या वाङ्मयविषयक व्यापक चळवळीच्या कालांत भारतीय वैयाकरणांवर कथा तयार होत होत्या आणि त्याच कालांत भारतीय कथा आणि वाङ्मय अति भारतीय होत होतें याविषयीं अधिक विवेचन प्रसंगानुरूप पुढें येईलच.

---

† ( पहा M. Gaster *JRAS*. 1910, P. 449 H. )

‡ ( पहाः C. H. Tawney in Ind. Ant. 10, 1881, P. 1904 )

* ( पहाः—Joseph Jocobs याच्या Old French Romances done into English by William Merrise, London 1896 या पुस्तकांतील प्रस्तावनेंत P. viii ff.

† पहाः—Th. Benfey, Pantschatantra 1, 321, 340: E. Kuhn in Byzantinische Zeitschrift iv 242 ff E Cosquin la legende du page de Portugal Paris 1912.

§ पहा० Chavanes–Guia centes et centes apologues extraits du Tripitaka Chinois ( No. 45 )

× ( ग्रीयर्सन, JRAS 1910 P. 252 ff. )

( पहाः—एन्. बी. गोडबोले, इंडि. ॲंटि. ११, १८८२, पृ. ८४ ) ही कथा काशीरामच्या बंगाली महाभारतांतहि आढळते ( पहा कलकत्ता रिव्ह्यु, दिसें. १९२४, पृ. ४८० )

† पहाः—Hatim's tales. Kashmir Stories and Songs by Sir Aurel Stein and Sir G. A. Grierson, London 1923, P. 97 with notes by W. Crooke.

## प्रकरण ३२ वें.

# गुणाढ्यापर्यंत सूत्राकर्षण

### २८१. वररुचीचें बृहत्कथाविषयक कर्तृत्व.

२८१. बृहत्कथेचा सामाजिक, सांस्कृतिक आणि वाङ्मयात्मक इतिहासासाठीं उपयोग करून घेतांना या ग्रंथाचा मुख्य भाग म्हणजे कथामुखलंबकापासून अंतापर्यंतचा भाग कोणी संपादन केला याविषयीं विचार अवश्य आहे. ग्रंथकर्तृत्वाचा विचार ग्रंथांतर्गत साहित्यावरून निगमनें काढण्यापूर्वीच अवश्य होतो. त्यासाठीं तो कांहीं अंशीं करून संशोधनफल वाचकांस दिलें आहे, ग्रंथकर्तृत्वविषयक सविस्तर विचार ग्रंथांतर्गत मजकुराशीं परिचय करून दिल्यानंतरच देण्यांत वाचकांस सौख्य आहे.

ग्रंथविकासाविषयीं विचार करतां बृहत्कथेची कथापीठलंबकाविरहित काश्मीरी आवृत्ति हीच वररुचीच्या आवृत्तीनंतर काणभूति व गुणाढ्य यांनीं तयार केलेली आवृत्ति असावी असें वाटावयास लागतें. वररुचीचें साहित्य इतरांपाशीं आलें असेल. तेव्हां त्या साहित्यावर लंबकाचीं नांवें दिलीं गेलीं असावींत, व लंबकांचा अनुक्रम ठरलेला नसावा असें त्याच्या भिन्न रूपांतरांतील अनुक्रमांत जो फरक दिसत आहे, त्यावरून स्पष्ट आहे, तसेंच त्यांत सर्व कथांची एकमेकांत गुंतवणी देखील पुरी झाली नसावी. या आवृत्तीस आपण आद्यशातवाहन आवृत्ति हें नांव देऊं.

ज्या आद्य संग्राहकानें उदयनाच्या व नरवाहनदत्ताच्या कालापर्यंतच्या कथा गोळा केल्या अगर करविल्या तो पुरुष त्यांच्या कालापासून दूर नसावा. नाहीं तर त्यानें त्याच वंशांतील उदयनोत्तर पुरुषांच्या चरित्रांचा भाग बृहत्कथेंत आला असता. या आद्य संग्राहकापासून कथापीठलंबकाच्या अंतिम संपादकापर्यंतच्या रक्षकांसंवर्धकांच्या परंपरेंत गुणाढ्याचें स्थानव कार्य हीं ठरविलीं पाहिजेत.

वररुचीपाशीं जें साहित्य झालें असेल त्याची अधिक व्यवस्थित मांडणी उत्तरकालीन संपादकांकडून झाली असेल, तथापि संग्रहणास प्रेरक मुख्य वररुचीच असावा आणि त्यांत आलेल्या बहुतेक कथा त्याच्या कालच्या अगोदरच्या असाव्यात असें वाटतें. तसें वाटण्याचें कारण म्हटलें म्हणजे वाङ्मयप्रगतीचा अनेक ठिकाणीं आढळून येणारा नियम होय. एक वाङ्मयविषयक महत्कार्य होत असलें म्हणजे त्याच्या अनुषंगानें इतर कार्यें होत असतात. एका नवीन प्रकारच्या साहित्याचें संग्रहण करणें आणि त्याची सामान्य संस्कृतीस जोड देऊन त्याला गौरव आणणें यांसारख्या क्रिया विद्याविकासविषयक व्यापक संकल्पाच्या मनुष्याशिवाय होत नाहींत, आणि या प्रकारच्या व्यापक संकल्पाची व्यक्ति वररुचीशिवाय दुसरी दिसत नाहीं. वररुचीचा संग्राहक, वैयाकरण आणि भाषाशास्त्रज्ञ या प्रकारांनीं कर्तृत्वाचा विचार पुढें केलाच आहे.

बौद्ध आणि जैन उल्लेखांचा काळ.

बृहत्कथेंत उदयनपूर्व आणि उदयनकालीन कथा आहेत आणि उदयनविषयक कथांचें संकलन होतांना संग्राहकाच्या अगोदरचा परंतु उदयनोत्तर भाग येणें शक्य आहे. वररुचि हा बुद्धाच्या अगोदर झाला असें आमचें मत वररुचीचें व्याकरण पाहून झालें आहे तर त्या विरुद्ध "बौद्धांचा व जैनाचा उल्लेख करणाऱ्या कथा त्या संग्रहांत कशा आल्या" असा प्रश्न स्वाभाविकपणें उत्पन्न होतो. त्या प्रश्नाला देखील उत्तर आहे. वररुचीनंतरच्या संपादकानें बौद्ध व जैन कथा घुसडल्या असाव्यात. ही शक्यता लक्षांत ठेवली असतां आंतील बौद्ध आणि जैन उताऱ्यांचें सहज स्पष्टीकरण होतें. तथापि दुसऱ्या एका शक्यतेकडे देखील लक्ष दिलें पाहिजे. बौद्ध आणि जैन या नांवानें जे संप्रदाय कार्यकारी झाले त्यांचा प्रारंभ महावीर आणि गौतम यांच्या अगोदरहि असणें शक्य आहे. ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. बृहत्कथेंत जैन आहेत पण महावीर उल्लेखित नाहीं यावरून महावीरपूर्व जैन संप्रदाय यांत दृष्ट होतो असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. †

### २८२. उदयन आणि गुणाढ्य यांच्या मधल्या कालाच्या इतिहासाचें साहित्य.

२८२. उदयनाच्या कालापासून गुणाढ्याचा काल बराच दूर आहे. उदयन आणि नरवाहन यांच्या कथांची 'गुणाढ्य आवृत्ति' उदयनाच्या कालानंतर सुमारें चारशेंपासून पांचशें वर्षांनीं झाली असावी. त्यामुळें बृहत्कथेंत ज्या कथा आल्या आहेत

---

† महावीरापूर्वीचा इतिहास देण्याची आशा दाखविणारें अलीकडील एक पुस्तक Jainism in Northern India 800 B. C.–5–29 A. D. S. ( ले. चिमणलाल शहा ) या नांवानें प्रसिद्ध झालें आहे तथापि त्यांत महावीरापूर्वीची कोणतीच नवीन माहिती नाहीं.

त्यांपैकीं कांहीं उदयनपूर्व आहेत तर कांहीं फक्त गुणाढ्याच्या पूर्वींच्या आहेत. खुद्द गुणाढ्य विषयक कथा गुणाढ्यानंतर शतका दोन शतकांनीं तयार झाल्या असतील या सर्वांचें जर यशस्वी पृथक्करण झालें तर मधल्या दीर्घ काळाच्या इतिहासासंबंधानें हा कथाग्रंथ आपणांस चांगलाच उपयोगी करून घेतां येईल. मधल्या काळांत काय क्रिया झाल्या व त्या क्रिया अगर घडामोडीचें दर्शक दुसरें कांहीं साहित्य आहे काय याचा विचार आपणांस करणें अवश्य आहे. मधल्या कालाच्या ज्ञात इतिहासाच्या साहाय्यानेंच आपणांस बृहत्कथेचा उपयोग करून घेतला पाहिजे.

या कालांतील वाङ्मयोत्पादक वर्ग म्हटले म्हणजे पुढील होत.

( १ ) वेदवेदांगीयविद्यासंवर्धक वर्ग, ( २ ) बौद्ध, ( ३ ) जैन, ( ४ ) पुराणसंवर्धक वर्ग, ( ५ ) कथारक्षक व संरक्षक वर्ग, ( ६ ) प्राकृत काव्याचा कर्ता व संरक्षक वर्ग ( ७ ) भारतविषयक ग्रीक लेखकांचा वर्ग. येणेंप्रमाणें अत्यंत विविध वाङ्मयाची उत्पत्ति याच कालांतील आहे. या सर्व वर्गांचा एकमेकांवर परिणाम झाला होता असें दिसतें.

( १ ) वैदिक परंपरेमध्यें उदयनोत्तर काळांत मोठेंच कार्य होत होतें. वेदांगें, सूत्रग्रंथ, स्मृति, व दर्शनें हीं या काळांत वाढतच होतीं.

( २ ) या मधल्या कालावर बौद्ध साहित्य बरेंच आहे. उदयनपूर्व काळांतील वातावरण बौद्ध असणें शक्य नाहीं, शातवाहनांच्या आद्य काळांत देखील महाराष्ट्रांत बौद्धसंप्रदायाचा पगडा दिसत नाहीं. तथापि उत्तरेकडे ती चळवळ दोन शतकें हळुहळू जोरावत असावी आणि उत्तरेस आणि दक्षिणेस जवळजवळ एकाच काळांत फोंफावली. आद्य शातवाहनकाल म्हणजेच मौर्यकाल होय. आद्य शातवाहन राजा मौर्यपूर्व कालीं देखील असणें शक्य आहे. मौर्यकालांत देखील बौद्ध संप्रदायाचें महत्त्व हळूहळू वाढत असेल पण तें राजमंदिरांत दोन पिढ्या स्थापन झालें नव्हतें. तर तें दक्षिणेंत नव्हतें यांत आश्चर्य नाहीं, आणि यामुळें कथापीठलंबकाचेंहि वातावरण बौद्ध नाहीं. तें पौराणिक हिंदु विशेषतः शैव आहे. बृहत्कथा देखील बौद्ध नाहीं त्यामुळें तींतील विषयांची बौद्ध साहित्याशीं संगति लावणें हें इतिहाससंशोधकास दमवील असें पण एक महत्त्वाचें कार्य होईल.

( ३ ) जैनाचें आद्यवाङ्मय बरेंचसें लुप्त झालें आहे. एकदम गुंतागुंतीचा धर्म आपल्या डोळ्यांसमोर येतो. जैनांच्या धर्मांचा प्राचीन कर्नाटकांत त्याचप्रमाणें महाराष्ट्रांत पगडा पुष्कळच होता, जैन धर्मविकास खरोखर महाराष्ट्रांतच झाला नसेलना अशी जैनाच्या अर्धमागधीस जैन "महाराष्ट्री" असें अपर नाम प्राप्त झालें आहे, त्यावरून शंका येते. थोडक्यांत सांगावयाचें म्हटल्यास शातवाहनांच्या इतिहासासाठीं जैन वाङ्मय देखील पडताळलें पाहिजे.

( ४ ) पुराण संवर्धनासंबंधानें अनेक विचार उत्पन्न होतात. रामायणविस्तार दशावतारकल्पना सूर्यवंश चंद्रवंश इत्यादि कल्पनांचा पूर्ण विकास उदयनपूर्व काळांत झाला असला पाहिजे या निर्णयास आपण पोंचतों.

( ५ ) कथासंरक्षक वर्गाविषयीं कांहीं विवेचन मागें झालेंच आहे व कांहीं पुढें येणार आहे. सध्यां एवढेंच येईल कीं कथावाङ्मयसंग्रहण उत्तरेकडील पुरुष वररुचि याच्याकडून म्हणजे उत्तरेस झालें आणि कथासंरक्षण प्रतिष्ठानांत झालें असा वाङ्मयेतिहास कथापीठलंबक स्थूलपणें सांगत आहे. उत्तरेकडील वाङ्मयाची दक्षिणेकडे जोपासना झाली ती पंडितवर्गाकडून झाली आणि त्यामुळें पंडितवर्गांत प्रचलित असलेल्या दंतकथा त्या पीठलंबकांत समाविष्ट स्वाभाविकपणें झाल्या, त्यामुळें कथांचें रक्षण व बृंहण याचें श्रेय महाराष्ट्रास येत आहे. या मधल्या काळांत कथासंग्रह कथक वर्गाच्या हातून निघून पंडितांच्या हातीं पडला त्यामुळें त्यांत वर्धनात्मक फारसा फेरबदल झाला नसावा. भारतीय कथांचा पश्चिम एशिया आणि यूरोप यांत झालेला प्रसार हाहि सांस्कृतिक इतिहासांतील विषय आहे.

( ६ ) प्राकृत काव्यांच्या कर्त्या आणि संरक्षक वर्गाविषयीं विवेचन हाच यांच्या सप्तशतीच्या अनुषंगानें पुढें सांगतां येईल.

**२८३. या मधल्या काळांतील राजकीय घडामोडीचें स्थूल विधान. कथापीठलंबकांतील विधानांचें परीक्षण.**

२८३. अशोकाचा बुद्धधर्मस्वीकार हा बौद्ध संप्रदायविजयाच्या कालाचा प्रारंभबिंदु धरतां येईल, तोंपर्यंत राजे लोकांच्या दृष्टीस आलेला तथापि फारशी मान्यता नसलेला हा संप्रदाय दिसतो. तथापि त्या मधल्या काळांत बौद्धवाङ्मयनिष्पत्ति बरीच झाली.

बुद्धाचें चरित्र आणि बौद्धांच्या आद्यवाङ्मयाची निष्पति यांवर येथें विवेचनाची आवश्यकता नाहीं. तें "बुद्धोत्तर जग" या पुस्तकांत सविस्तर केलेंच आहे. उदयनोत्तरकाल आणि बौद्धसंप्रदायविजयाचा काल यांच्या दरम्यान मगधांत प्रद्योत, शैशुनाग, नंद आणि मौर्यांचे दोन पुरुष झाले. दक्षिणेकडे अश्मकांचें राज्य चालू असावें आणि तात्पुरतें नंदांचें स्वामित्व



**चित्रांक ५०. नानाघाट घाटाचा देखावा. पूर्वभागाकडून शातवाहनसत्तेच्या अत्यंत प्राचीन अवशेषांचें स्थान.**



चित्रांक ५१. नानाघाटांतील शालीवाहनांचा अत्यंत प्राचीन लेख असलेलें लेणें (घाटघर)



चित्रांक ५२. नानाघाट–लेख असलेल्या लेण्यासमोरील लेणें पायऱ्यांसह.

कांहीं वर्षें असावें. चंद्रगुप्ताच्या कालीं अश्मक पुन्हां स्थापन झालें असावें अशी कल्पना अश्मकांविषयीं प्लीनीकडून झालेल्या उल्लेखावरून होतें. अश्मकांचें राज्य गेलें व पुन्हां स्थापन झालें, या प्रकारची त्यांच्यामध्यें स्थितिस्थापकता उत्पन्न होण्यास त्यांच्यामधील मागें उल्लेखिलेली राज्याचे वांटे होण्याची पद्धति असावी. राज्याचे वांटे झाले म्हणजे मध्यवर्ती घराणें दुर्बल असणारच. तें महापद्म नंदीनें जिंकिलें म्हणजे सर्व सामंत जिंकले किंवा त्यांचें उच्चाटन केलें असें होत नाहीं. फार तर केंद्रवर्ती राज्य खालसा होऊन तेथें आपला प्रतिनिधि ठेवला असेल पण त्या नंदाची पाठ फिरतांच शेजारच्या पूर्वकालीन घराण्याच्या दायादांनीं त्यांचें उच्चाटन केलें असेल अशा प्रकारचा इतिहास त्यांचा उल्लेख मेघास्थिनीसच्याच आधारावर प्लीनीनें केला असल्यास व्यक्त होत आहे. तथापि मेघास्थिनीसच्या अगोदरच्या ग्रीक लेखकावरून प्लीनीनें माहिती घेतली असल्यास तो उल्लेख शिकंदरकालीन स्थितीचा दर्शक होईल. अश्मकांकडून शातवाहनांकडे राज्य जाण्याची क्रिया शिकंदराच्या कालापासून चंद्रगुप्त मौर्याच्या अंतिम कालापर्यंत केव्हांतरी झाली असावी आणि शिमुक शातवाहनाच्या अगोदर शेंपन्नास वर्षें दीपकर्णी झाला असावा आणि तो अश्मक राजा असावा असें स्पष्ट होतें. आद्य शातवाहन हा दीपकर्णीचा कृतकपुत्र होता असें विधान कथापीठलंबकांत आहेच. याच आद्य शातवाहनाच्या कारकीर्दीत गुणाढ्य होऊन गेला असें कथापीठलंबक आपणास सांगत आहे. तथापि गुणाढ्य अगोदरचा असणें देखील शक्य आहे. गुणाढ्याकडून शातवाहनाकडे कथा आली एवढ्याच परंपरागत माहितीवर पुढील कथा रचण्यांत आल्या असाव्यात.

### २८४. शातवाहनांची प्राचीनता.

२८४. शातवाहनांच्या कुलाचा आदिपुरुष मौर्यपूर्व कालांत नेतां येतो, आणि प्रथम शातवाहनाचा बाप दीपकर्णी हा त्याच्याहि अगोदरचा आहे. या दोन गोष्टी शक्य धरून बुद्धोत्तर पहिल्या शतकाचें महाराष्ट्राचें स्वरूप दाखविणारे अनेक उल्लेख विचारास घेतले पाहिजेत. शातवाहनाचीच उत्पत्ति ब्राह्मण स्त्रीस नागापासून झाली अशी कथा उत्तरकालीन ग्रंथांत आहे, ती पुढें अवतरण्यांत येईलच. तीच कथा कथासरित्सागरांत गुणाढ्याची जन्मकथा म्हणून दिली आहे. ( २७६ पहा. ) दोन्ही कथा एकच आहेत.

एकच कथा दोन व्यक्तींच्या नांवावर असतां पौर्वापर्य निश्चय.

प्रथम गुणाढ्याची कथा म्हणून उत्पन्न होऊन नंतर ती शातवाहनांच्या उत्पत्तीचें स्पष्टीकरण करण्यास लावली असणें जितकें शक्य आहे त्यापेक्षां अगोदरच्या कालांत ती कथा शातवाहनोत्पत्तीचीच असून ती पुढें गुणाढ्याविषयीं सांगितली गेली आणि शातवाहनाच्या उत्पत्तीस निराळी कथा निर्माण झाली असें कमी शक्य वाटतें. कारण अद्भुत कथांचा प्रसार पुढच्या काळांत होतांना अप्रसिद्ध व्यक्तींच्या नांवा भोंवतालीं जमलेल्या कथा अधिक परिचित व्यक्तीच्या नांवावर ढकलल्या जातात.

एवढें मात्र खरें कीं कथासरित्सागरांतील कथापीठलंबक हा मूलकथेनंतर अनेक पिढ्यांनीं तयार झाला असेल कारण त्याच्या कालांत शातवाहन, गुणाढ्य, नंद, चाणक्य याच काय परंतु पाणिनि, व्याडि, वररुचि या देखील अद्भुत चरित्राच्या व्यक्ति झाल्या होत्या.

पैशाचीचा दक्षिणेकडे प्रचार केव्हां झाला.

हा मौर्यपूर्व कालांत झाला नसून मौर्यांच्याच कालांत झाला असावा. मौर्यागमानंतर वररुचि व काणभूति यांची भेट झाल्याचें कथापीठलंबक सांगत आहे. मौर्यागमनानंतर झालेला इराणी लोकांचा महत्त्वलोप मगधांतील पैशाची वाङ्मयाच्या सेवकाचें उच्चाटन होण्यास कारण झाला काय हा विचार मनांत आल्याशिवाय रहात नाहीं.

बुद्धकाल हाच हखामणी साम्राज्याचा काल होय आणि त्यामुळें जें बुद्धकालाच्या आसपास झालें तेंच हखामणींच्या कालांत झालें असें धरलें पाहिजे. मौर्यकालाच्या प्रारंभींच हखामणी साम्राज्य आटोपून तेथें ग्रीक सत्ता स्थापन झाली होती, त्या अर्थी पैशाचीच्या राजकीय महत्त्वाचा लोप होऊन पंडितांस उपयोगी अशा साहित्याची भाषा म्हणून राहिली होती. तथापि यवनांचें सांस्कृतिक महत्व शिकंदर विजयानंतर वाढल्यामुळें ग्रीक भाषेचें महत्त्व हिंदुस्तानांत वाढलें असावें आणि कात्यायनास यवन लिपीचा विचार त्यामुळेंच करावा लागला असावा.

पैशाचीचें पांडित्य त्यावेळेस संस्कृत पंडितांत चालू होतें आणि त्यामुळें संस्कृत पंडितांचा वर्ग विश्वकुटुंबी झाला असावा. व्यापक पांडित्याचें स्थान उत्तर नसून प्रतिष्ठान होतें. आणि प्रतिष्ठान नगरास व्यापक पांडित्याचें स्थान होण्याचें कारण ती साम्राज्यनगरी होऊं लागली होती हेंच असावें.

### २८४. अ. ग्रंथोत्पत्तीचा स्वाभाविक इतिहास.

ग्रंथ वत्सदेशीय राजांची कथा सांगणारा, मगध देशांतील पंडिताकडून विरचित झालेला दाक्षिणात्य राजाकडून संरक्षित झाला ही गोष्ट स्वाभाविकपणें ऐतिहासिक स्पष्टीकरण माग-

णारी आहे. आणि तीस आमचें स्पष्टीकरण असें आहे कीं पैशाची भाषा बोलणाऱ्या कैकेयांचें प्राबल्य हिंदुस्थानांत उदयनकालींच झालें आणि त्यामुळें कथासंग्रह उदयनोत्तर काळीं पैशाची भाषेंत झाला. पुढें पौराणिकांचें व कथकांचें स्थान मगध बनलें त्यामुळें तो मगध देशांतील संग्राहकांच्या हातीं पडला आणि प्रतिष्ठान विद्वानांचें आश्रयस्थान झालें त्यामुळें तो शातवाहनांकडून संरक्षित झाला. चंद्रगुप्तकालीन शातवाहनाच्या कारकीर्दीत मगधदेशीय पंडितांकडून महाराष्ट्रांत ही कथा आली ही गोष्ट कथापीठलंबकाच्या रचनाकालीं ठाऊक होती, पण पैशाचीचें महत्व अजीबात नष्ट झालें होतें; आणि पैशाची बोलणाऱ्या लोकांच्या राज्याची विस्मृति पडली होती तेव्हां मगध, पैशाची भाषा आणि गुणाढ्य याची जोड करणारी आणि पिशाचामार्फत वररुचीपासून गुणाढ्यापर्यंत लोण पोंचविणारी कथा निर्माण करण्यांत आली असली पाहिजे.

कथापीठलंबकांत अनेक गोष्टी याच कालांतल्या म्हणून दिल्या आहेत. वररुचीकडून पाटलिपुत्राच्या नंदराजांचा व चंद्रगुप्ताचा उल्लेख करविला जात आहे. त्याच कालांत शातवाहन देखील दक्षिणेंत होते असें दाखविलें गेलें आहे. आणि यामुळें इतिहाससंशोधक एकदम इतिहासाच्या विपर्यासाचें आणि अज्ञानाचें श्रेय प्रस्तुत ग्रंथास देण्यास प्रवृत्त होतात. बोलूनचालून मनोरंजक कथांचा जो संग्रह त्यांत इतिहास तो काय पहावयाचा, त्यांत इतिहासविपर्यासच अधिक स्वाभाविक आहे अशी कित्येक संशोधकांची वृत्ति होते. तथापि अशी वृत्ति बरोबर नाहीं. या संबंधानें असें सांगितलें पाहिजे कीं इतिहास फिरविण्यास देखील सहेतुक प्रयत्न लागतो. पैशाची भाषेंत ग्रंथोत्पत्ति कशी झाली याचें ऐतिहासिक कारण सांगणें अवश्य झाल्यामुळें पण खरा इतिहास दृष्ट न झाल्यामुळें ज्या कथा उत्पन्न केल्या गेल्या त्यांत इतिहासविपर्यास कसा झाला हें वर दाखविलेंच आहे.

### २८५. गुणाढ्यकाल; त्याची चंद्रगुप्ताशीं समकालीनता तथापि वररुचीपासून दूरता

२८५. कथासरित्सागरामध्यें शातवाहनकुलाच्या प्रारंभींच्या कालाची कथा आहे. ज्या ग्रंथाचा काल बराच निश्चित आहे अशा दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत कथासरित्सागर सांगत आहे तितक्या प्राचीन कालाची कथा नाहीं. ग्रंथाचा कर्ता गुणाढ्य त्याचा जो काल कथासरित्सागर सांगत आहे तो अमान्य होण्याजोगा आहे काय हें आपणास पाहिलें पाहिजे. गुणाढ्य हा शातवाहनास नरवाहनदत्त आणि उदयन यांच्या कथा सांगता झाला. हा गुणाढ्य आणि वररुचि हे एकाच कालाचे आहेत असा आपला विश्वास त्या कथा दाखवीत आहेत. वररुचि हा आपली कथा सांगतांना आपण नंदराज समकालीन आहों असें दाखवीत आहे. म्हणजे शातवाहनांचा कोणतातरी राजा नंदराजाशीं समकालीन होता असें ही सरित्सागरांत आलेली कथा सांगत आहे. काणभूतीस वररुचीनें कथा सांगितली आणि काणभूतीनें गुणाढ्यास सांगितली तथापि काणभूति हा पिशाच होता व पिशाचास आयुष्य शेकडों वर्षें असूं शकतें असें आपण धरलें तर गुणाढ्य हा वररुचीशीं समकालीन होता असें ग्रंथांचें मत असेलच असें म्हणतां येत नाहीं. तथापि काणभूति हा पिशाच होता असें कथामुखलंबकांत सांगितलें नाहीं.

**कैलासे धूर्जटेर्वक्त्रात् पुष्पदंतं गणोत्तमम् ।**
**तस्माद्वररुचीभूतात्काणभूतिं च भूतले ॥**

( प्रथमतरंग श्लो. २. )

कथापीठलंबक मागाहूनची जोडणी होय हें स्पष्ट आहे आणि त्या कालांत काणभूति हा पिशाच होता अशी कल्पना तयार होऊन ग्रंथीं प्रविष्ट होणें देखील शक्य आहे. कथारक्षकांसंवर्धकाच्या परंपरेंत धूर्जटि, पुष्पदंत, वररुचि, कात्यायन, काणभूति आणि गुणाढ्य हींच नांवें उरलीं असा जेव्हां काळ आला तेव्हां आणि वररुचि व गुणाढ्य यांमध्यें बराच काल गेला असावा अशी कल्पना कथापीठलंबकाच्या एका संपादकाची झाली असल्यास त्यानें काणभूतीस दीर्घ आयुष्याचें पिशाचत्व देऊन वररुचि आणि गुणाढ्य या दोहोंत संबंध जोडणारा करणें स्वाभाविक आहे.

शातवाहन आणि आदिमौर्य हे समकालीन गृहित धरून त्यांचा संबंध वररुचि व गुणाढ्य या मार्फत जोडला आहे. या सांखळींतला एक दुवा जरी काल्पनिक ठरला तरी तेवढ्यावरून शातवाहनांची आद्यमौर्यकालीनता सिद्ध होणार नाहीं. कारण कथा निर्माण करणाऱ्या कवीनें त्या दोन राजांची समकालीनता गृहितच धरली होती.

गुणाढ्य आणि वररुचि समकालीन धरण्यास, विशेषतः शातवाहन आणि नंद समकालीन होते, या प्रकारच्या विधानाला संमति देण्यास संशोधक वर्ग अत्यंत नाखूष आहे. कारण शातवाहनांचा प्रारंभकाळ नंदांपर्यंत नेण्यास शातवाहनांची गृहित धरलेली उत्तरकालीनता आडवी येत आहे. वररुचीस कात्यायन समजणारे आणि कात्यायनाची पतंजलिपूर्वता मान्य करणारे पुष्कळच लेखक वररुचीस बरीच प्राचीनता किंबहुना मौर्यपूर्वता देण्यास प्रवृत्त होत आहेत. तथापि




**चित्रांक ५३. शातवाहनांच्या सत्तेच्या वाढत्या काळांत पश्चिमेला त्यांच्या इतक्याच योग्यतेस चढलेलें रोमनसाम्राज्य. हें इराणच्या साम्राज्यास पश्चिमेकडे पेंच देत होतें व शातवाहन सत्ता इराणच्या पूर्वेस विजयी राहिली होती.**

शालिवाहन शक इ. स. ७८ च्या सुमाराचा, तेव्हां घराण्याची स्थापना बहुतेक त्याच काळांत झाली असावी या तऱ्हेची कल्पना मनाच्या अगदीं आंतल्या कप्प्यांत अडकून राहिली असल्यामुळें शातवाहनांस नंदकालीन करण्यास विरोधक वृत्ति अनेक लेखकांत झाली होती. नानाघाटांतील लेखांस अक्षररूपावरून ख्रि. पू. २५० पर्यंत न्यायवयास तयार झाले आणि शातकर्णीचा पराभव केला म्हणून सांगणाऱ्या खारवेलास देखील ख्रिस्तपूर्व २०० च्या पलीकडे लोटलें तेव्हां त्याच्या आणखी पाठीमागें शातवाहन कुलाचे धागेदोरे किंवा प्रारंभींचे राजे असले तर ते मौर्यपूर्वकालीन देखील असतील अशी कल्पना करणें आज तरी अयोग्य मानण्यास कारण उरलें नाहीं. गुणाढ्याचें प्राचीनत्त्व नाकारणें आज सयुक्तिक नाहीं आणि वररुचीची मौर्यपूर्वता नाकारण्यास खरोखर प्रमाण नाहीं. वररुचि याहूनहि प्राचीनकाळीं जाऊं शकतो काय याचा विचार पुढें स्वतंत्रपणें करूं.‡

आद्य शातवाहन म्हणून दाखविलेला राजा नंदकालीन असेल अशीहि खात्री नाहीं. शातवाहन या नांवाचें स्पष्टीकरण करण्याचा जींत प्रयत्न केला आहे अशी जी वंश-प्रारंभ कालीन कथा ती गुणाढ्यकालीन म्हणजे नंदकालीन नसून आणखी कांहीं प्राचीनतर काळांतील असणें शक्य आहे, व या दृष्टीनें नंदाच्यापूर्वी दोन तीन पिढ्या अगोदरच्या काळांत म्हणजे शिकंदरापूर्वी पन्नास साठ वर्षे दीपकर्णी हा होऊन गेला असा पक्ष स्वीकारावा लागतो. येणेंप्रमाणें पहातां शातवाहनांचा प्रारंभींचा इतिहास बुद्धोत्तर काळीं तर खराच पण बुद्धनिर्वाणोत्तर पहिल्याच शतकापर्यंत जाऊन पोंचतो. शातवाहनांचाच काय पण बौद्ध संप्रदायाच्या अस्तित्त्वाचा आपल्या शब्दसंग्रहांत वासहि न दाखविणारा वररुचि त्याहूनहि अगोदरच्या काळांत जातो. कथापीठलंबकांतील भिन्न कथांचें पृथक्करण झाल्यानंतर कोणत्या कथा प्राचीनतम आहेत आणि बुद्धोत्तर पहिल्या शतकाइतक्या जुन्या काळाच्या दर्शक आहेत या विषयीं विचार शक्य होईल आणि दक्षिणेंतील प्राचीन काळाविषयीं कथा काय सांगत आहेत तें समजेल, आणि माहितीच्या ग्राह्याग्राह्यतेचा पुन्हां विचार करावा लागेल. प्रस्तुत साहित्याचा उपयोग करण्यास खात्रीचा आक्षेप नाहीं एवढेंच आपणांस अधिक शोधांत शिरण्यास पुरे आहे.

## २८६ अ. बृहत्कथेंतील विक्रमादित्य कथा मौर्यपूर्व किंबहुना बुद्धपूर्व आणि वररुचिपूर्व असणें शक्य आहे.

२८६ अ. बृहत्कथेंत विक्रमादित्याचा उल्लेख अनेक प्रसंगीं आला आहे आणि विक्रमादित्याचा काळ ख्रि. पू. ५६ याच्यापूर्वी कोणीं नेत नाहीं आणि सातवाहनाचा शक ख्रिस्तोत्तर ७८ पासून सुरू होतो तर शातवाहन राजे विक्रमादित्याच्या अगोदर कसे संभवतील व या दोहांचा उल्लेख करणारा ग्रंथ वररुचीच्या पूर्वी कसा झाला असेल असे प्रश्न उत्पन्न होतात. शातवाहन कुलाचा प्रारंभ ख्रिस्तोत्तर ७८ इतक्या उत्तरकालीं झाला नाहीं आणि त्याचप्रमाणें विक्रमादित्य याच्या शकाचा आरंभ बृहत्कथेंतील अवंतिराज विक्रमादित्य यांच्या काळीं होऊन गेला असें धरणें मुळींच योग्य नाहीं.

बृहत्कथेंतील विषमशील लंबकाच्या अंतर्भावाचा काल.

विक्रमादित्याची कथा बृहत्कथेंत विक्रमशकानंतर घातलेला भाग आहे असें म्हणण्यास आधार नाहीं. विक्रमादित्याची कथा केवळ शात वाहनांना सांगितली आहे एवढेंच दृश्य असतें तर आपणास विचार पडला असता कीं विक्रमापूर्वी शातवाहनास कसें घालावें पण विक्रमाची ही कथा नरवाहनदत्तास सांगितली आहे. म्हणजे विक्रमशकापूर्वी अनेक शतकें झालेल्या पुरुषांस सांगितली आहे. म्हणजे जेव्हां विक्रमादित्य हा अद्भुत पुरुष म्हणून मान्य झाल्यावर जी कथा तयार झाली, ती कथा या ग्रंथांत समाविष्ट झाली आणि अंतिम भागास जोडली गेली. पिशाचें, वेताल इत्यादिकांवर स्वामित्व गाजविणाऱ्या विक्रमाचा उल्लेख करणारा वेतालपंचविशी हा ग्रंथच्या ग्रंथच समाविष्ट केला गेला.

विषमशील लंबकासंबंधानें भिन्न शक्यता.

विषमशीलाची कथा बृहत्कथेच्या वररुचिसंकलित आवृत्तींत नव्हती तथापि गुणाढ्याकडून किंवा गुणाढ्योत्तर कालांत ती कथा ग्रंथांत समाविष्ट झाली ही एक शक्यता आहे व तीप्रमाणेंच ती कथा वररुचिसंकलित बृहत्कथेंत होती हीहि शक्यता आहे. पहिली शक्यता दाखविणारा पुरावा म्हटला म्हणजे गुणाढ्य हा माल्यवान् नांवाचा शापभ्रष्ट शिवगण होता, अशी मांडणी कथापीठलंबकांत केली आहे तिचा होय. विक्रमादित्य हा देखील माल्यवान् गण होता असें अंतिम म्हणजे विषमशील लंबकांत सांगितलें आहे. असें दिसतें कीं

‡ कै. डॉ. गुणे वररुचीस ख्रिस्तोत्तर समजत होते असें वाटण्याचा संभव आहे. पण वररुचि ख्रिस्तोत्तर होताच असें त्यांचें मत होतें असें खात्रीपूर्वक म्हणतां येत नाहीं. अत्यंत प्राचीनकाळीं वररुचि असावा असें त्यांस वाटलें पण प्राचीनता सांगतां सांगतां त्यांची उडी ख्रिस्तोत्तर तिसरें शतक येथपर्यंतच जाऊं शकली. भविसयत्तकहा ( प्रस्तावना पृ. ६१. गा. ओ. सी. )




चित्रांक ५४. घारापुरी शिवपार्वती आणि भोंवतालचे आकाशचारी'यांचें दर्शन.

शापभ्रष्ट माल्यवान् हा गण जेव्हां निर्माण झाला तेव्हां त्या गणाचे अवतार सुरू होऊं लागले; विक्रमादित्य आणि गुणाढ्य यांपैकीं एक अगोदर व दुसरा नंतर त्याच गणाचे अवतार बनले व त्यांच्या कथा तयार झाल्या आणि त्या पुढील संपादकानें बृहत्कथेंतीलच अनुपलब्ध तुकडा म्हणून समाविष्ट केल्या असाव्यात. ज्या संग्रहाच्या सहा कथा गेल्या, सातवी तेवढी उरली अशी प्रसिद्धि असेल त्या कथेचे हरवलेले तुकडे इकडे तिकडे शोधण्याची प्रवृत्ति व्हावयाचीच. नष्ट झालेल्या तुकड्याचे जे भाग सांपडतील ते आपण समाविष्ट करावेत असें पुढच्या एखाद्या संपादकाला वाटून नवीन कथांचा जुन्या कथेंत समावेश होणें सोपें झालें असावें. कथामुखलंबकांत कथेच्या प्रसाराची परंपरा दिली आहे पण 'कथानाश' उल्लेखिलेला नाहीं. कथेच्या मुख्य भागाचा नाश कथागौरवासाठीं कथा पीठलंबकांत उल्लेखित झाला आहे.

## २८६ अ. कथाप्रगतिविषयक निर्णयात्मक विधान.

२८६ अ. एवंच मूळकथा उदयनाच्या नंतर दोनतीन पिढ्यांतच तयार झाली असावी ती नंदमौर्यकालांपूर्वी वररुचीनेंच संग्रहीत केली असावी आणि त्या कथेची प्रसिद्धि प्रथम काणभूतीनें व नंतर गुणाढ्यानें केली असावी. एकंदर कथेस प्रस्तावनारूपी असलेला कथापीठलंबक हा गुणाढ्यानंतर केव्हां झाला, बृहत्कथा या ग्रंथाला क्षेमेंद्रसोमदेवीय स्वरूप येण्याचा अंतिम काळ कोणता यासंबंधानें एवढेंच सांगतां येईल कीं कथापीठलंबक हा आवंत्यविक्रमपराभवकथेच्या बराचसा अगोदर तयार झाला होता, कारण त्यास विक्रम किंवा शालिवाहन यांच्या शककर्तृत्वाची मुळींच माहिती नाहीं. हा संपूर्ण संग्रह ख्रिस्तपूर्वकालांतच तयार झाला असावा अशी कल्पना कोणत्याहि अस्तित्त्वास असलेल्या पुराव्याशीं विसंगत दिसत नाहीं.

## २८७. बुद्धपूर्व अश्मक राज्याचें स्थूल स्वरूप.

२८७. आतांपर्यंत जें विवेचन झालें त्यांत नवीन माहिती जरी बरीच असली तरी अनेक गोष्टींचें विवेचन अपूर्ण आहे. तर अलक्षित प्रश्नावर चर्चा करण्याच्या निमित्तानें त्याचें सिंहावलोकन करावें लागणारच आहे, तेणेंकरून विवेचनांतर्गत विविध भागांची संगति चांगल्या तऱ्हेनें लक्षांत येईल.

कुरुयुद्धानंतर पण शातवाहनपर्वाच्या प्रारंभापूर्वीची परिस्थिति चित्रिण्यासाठीं प्रस्तुत प्रयत्न झाला आहे. शातवाहनांचा पहिला राजा दीपकर्णी नांवाच्या राजाचा वारस होता. त्यासंबंधाची कथा आलीच आहे. तो दीपकर्णी राजा कोणत्या कुलांतील होता याविषयीं आपणांस निश्चित माहिती नाहीं. तथापि महापद्मनंदीनें ज्या अश्मक कुलाचें उच्चाटन केलें असावें अशी माहिती पुराणें देतात त्याच कुलांतला असावा असें वाटतें. याचें निवासस्थान पैठण हेंच होतें. दीपकर्णीनें स्वीकारलेल्या पुत्रापासून शातवाहन राजकुल स्थापन झालें ही बृहत्कथेनें दिलेली माहिती आहे. ती चुकीची ठरविण्यास पुरावा उपलब्ध नाहीं. तथापि तेवढ्यावरूनच असाहि एक निर्णय काढतां येईल कीं सातवाहनांस अधिकार अन्य कारणानें प्राप्त झाला असून आपण अश्मकांचे कायदेशीर वारस आहोंत आणि आपली उत्पत्ति अद्भुत प्रकारामुळें झाली आहे असें सांगणाऱ्या कथांना चालना देण्याची आवश्यकता शातवाहनांस होती.

कुरुयुद्धापासून शातवाहनांपर्यंतच्या इतिहासाविषयीं असें सामान्य विधान करतां येईल कीं येथें शातवाहनांपूर्वी अश्मकांचें राजकुल मुख्य होतें. बुद्धकालापर्यंत तेंच राज्य करीत होतें. बुद्धापासून ख्रिस्ती शकाच्या आरंभापर्यंत, अश्मक आणि शातवाहन हीं दोन घराणीं झालीं आणि हिंदुस्थानांतील इतर भागांप्रमाणें महाराष्ट्रांत देखील संयुक्त सामंतपद्धति सुरू होती, राजाचे भाईबंद ते भूभागाचे अधिकारी होत, आणि त्यामुळें राजघराण्यांत गृहकलहास अवकाश सांपडे. भाईबंदाशीं लढाया आणि परदेशीयांचीं आक्रमणें संयुक्तसांप्रत पद्धति आणि दायादांत गृहकलह या दोहोंचा उपसर्ग महाराष्ट्राला झाला होता.

"अश्मकाः पंचविंशति" असें पुराणें सांगत आहेत तर अश्मकांचे पंचवीस राजे महापद्मनंदीच्या पूर्वी होऊन गेले म्हणजे अश्मकांचें राज्य महापद्माच्या काळा पूर्वी पांच सहाशें वर्षें जातें. अश्मकांचें अस्तित्व भारतीयुद्धांत त्यांनीं भाग घेतला असें सांगून पौराणिकांनीं दाखविलें आहे. भारती युद्धाशीं हिंदुस्थानांतील सर्व प्रदेशांचा संबंध जुळवून भारत हा राष्ट्रीय किंवहुना सांस्कृतिक ग्रंथ करण्याची खटपट परीक्षितापासून अधिसीमकृष्णाच्या कालापर्यंत झाली असली तर असेंहि म्हणतां येईल कीं अधिसीमकृष्णाच्या कालीं जो राजा सांपडला तेव्हांपासून त्या घराण्याच्या कारकीर्दीची मोजदाद लोक करूं लागले. या दृष्टीनें विचार करतां अश्मकांचें राजकुल अधिसीमकृष्णाच्या कालापासून महापद्म नंदीच्या कालापर्यंत चालू असणें संभवनीय आहे.

नरसिंह, विक्रमसिंह, पृथ्वीरूप, प्रसेनजित्, धर्म इत्यादि दक्षिणापथाचे आणि प्रतिष्ठानचे राजे म्हणून ज्या सात व्यक्तींच्या कथा मागें दिल्या आहेत त्या सर्व अश्मक राज्याविषयींच्याच असाव्यात आणि त्यांपैकीं सर्वच कथा बुद्धपूर्वकालीन असाव्यात. या अश्मकांच्या सत्तेखालींच महाराष्ट्राची



चित्रांक ५५. कुरळया केसाचा टोप दाखविणाऱ्या देवगणाचें चित्र ( घारापुरी )
हें सेमेटिक देवता आणि आर्यन देवता यांचा मिलाफ झाला होता याचें सूचक आहे.




चित्रांक ५६. कार्लें येथील लेणीं व लेण्यांच्या समोर दिसत असलेलें एकवीरा देवीचें देऊळ. येथें बकरीं, कोंबडीं वगैरेंचें बलिदान मोठ्या प्रमाणावर होतें. ब्राह्मणेतरांची विशेषतः कोळ्यांची ही आवडती देवता आहे.

वाढ झाली असावी, आणि यांच्या राज्याची वाढ कोंकणापासून तैलंगणापर्यंत म्हणजे महाराष्ट्राच्या पश्चिमेस आणि आग्नेयीस समुद्रापर्यंत असावी. कथासरित्सागरांत आंध्रांचा उल्लेख फारसा येत नाहीं, कलिंगांचा येतो; तथापि आंध्रांचें राज्य शतपथ ब्राह्मणाच्या काळीं देखील होतें. तथापि ज्याअर्थी आंध्रांचा उल्लेख या प्रचंड कथासमूहांत येत नाहीं, त्या अर्थी आंध्र राज्य कलिंग, विदर्भ किंवा कर्नाटक यांमध्यें मोडत असावें.

विदर्भाचें अस्तित्व महाभारत कालापासून आहे, किंबहुना दाशरथिरामाच्या काळापूर्वी कांहीं पिढ्या इतक्या प्राचीनकाळापासून विदर्भ आणि निषध हीं राज्यें आपणांस माहीत आहेत. कुरुयुद्धापूर्वी कांहीं वर्षे हें राज्य मगधाचें मांडलिक झालें होतें, व मगधास चौथाई देखील देत होतें. ( चतुर्थभाङ् महाराजो इ० परिच्छेद ९१ पहा ) कुंडिनपुराचें राज्य चालू होतें असा उल्लेख बृहत्कथेंत आहेच.

## २८८. महाराष्ट्र आणि उत्तर हिंदुस्थान यांत सामाजिक सादृश्य. श्रीमान वेश्यांच्या अस्तित्वाचें रहस्य.

२८८. राजकीय स्थितीचा विचार करतांना दुसऱ्या एका मोठ्या सामाजिक प्रश्नाचा विचार करणें प्राप्त होतें. तो प्रश्न म्हटला म्हणजे मातृसत्ताक आणि पितृसत्ताक कुटुंब पद्धतींचें सामीप्य आणि त्याचा राजकारणावर परिणाम हा होय. बृहत्कथेंत अनेक श्रीमान् वेश्यांचा उल्लेख आहे. या वेश्यांपाशीं हत्ती, घोडे, वगैरे सैन्य असतें, त्यांच्यापाशीं श्रीमंती इतकी असते कीं राजे लोकांनीं देखील यांच्याकडे उतरावें. यांनीं राजेलोकांकडून पैसे घेण्याच्या ऐवजीं त्यांना दिल्याचेच उल्लेख आहेत. या तऱ्हेच्या वेश्यांनीं पैसे मिळविले तरी कसे ? उज्जयिनीची कुमुदिका एका ब्राह्मणपुत्रावर प्रेम करीत आहे आणि राजाशीं वैर करीत आहे असें दाखविलें आहे. यावरून या वेश्यांची श्रीमंती शरीरविक्रयावर अवलंबून होती असें मुळींच दिसत नाहीं. अशी कल्पना होते कीं श्रीमंत वेश्या या मातृकन्यापरंपरेचा अवशेष असाव्या. ज्या काळांत जमिनीची मालकी स्त्रियांकडेसच असेल तो काल नाहींसा होऊन जेव्हां पितृपुत्रपरंपरायुक्त समाज सुरू झाला असेल तेव्हां या जमिनीच्या मालक असलेल्या स्त्रिया वेश्या आहेत असेंच लोकांना वाटत असेल. शहरांचा विकास होतो तो शिल्पी वर्गाकडून होतो; आणि त्यांत पुरुषांचेंच आर्थिक प्राधान्य असल्यामुळें स्त्रीसत्तेचा शहरांतून लोप होत असावा, अशा कालांत मोठमोठ्या जमीनदार असलेल्या स्त्रिया स्वेच्छेनें पुरुषसेवनाचें स्वातंत्र्य राखीत व नगरांत रहात; असल्या स्त्रिया आणि गरीब शरीरविक्रयावरच उपजीविका करणाऱ्या स्त्रिया या दोहोंचें शहरांत अस्तित्व असावें. दोन्ही प्रकारच्या स्त्रियांस पौरुष नीतिशास्त्रानें मापन करणारे लोक एकाच वर्गांत घालतील यांत कांहीं आश्चर्य नाहीं. या प्रकारच्या श्रीमंत "वेश्या" प्रतिष्ठानांत त्याचप्रमाणें उज्जयनींत होत्या. आणि त्यांवरून त्या बाबतींत दोन्हीं प्रदेशांतील समाजांत सादृश्य होतें.

वेश्याव्यवसाय राजगृह आणि सामान्य वेश्याव्यवहार.

एका शाक्य राजानें आपल्या एका कन्येला वेश्यापण दिलें त्याचा अर्थ ती दरिद्री होऊन शरीरविक्रयावरच तिची जीविका ठेवली असा अर्थ मुळींच नाहीं. जो श्रीमंत आणि स्वतंत्र अशा स्त्रियांचा वर्ग समाजांत होता त्यांच्या घरींच सर्व प्रकारचे उपभोग असावयाचे. राजपुत्रीस वेश्या बनविलें या गोष्टीवरून सामाजिक स्थितीविषयीं अनिष्ट अनुमान करणें देखील योग्य होणार नाहीं. राजे लोकांना वामसंबंधापासून जी प्रजा उत्पन्न होते त्यांतील स्त्रियांच्या लग्नाची पंचाईत नेहमींच असावयाची. राजस्त्रियांमध्यें अंतःपुरचारिणी, दासी, वेश्या, वगैरे अनेक प्रकार असतां व त्यांच्या मार्फत देखील 'राजकन्या' निर्माण होत असतां एकाद्या "राजकन्येला" जर वेश्यापण दिलें तर त्यांत विलक्षण असें कांहींच नाहीं. वेश्यामंदीर हा एक तऱ्हेचा क्लब असे आणि तेथें सर्व प्रकारचे विलासप्रिय लोक जमत असत. वेश्यांचा वर्ग सुशिक्षित असे. वेश्या संस्कृत बोलत म्हणजे त्या ग्राम्य नसून 'नागरिक' असत. ज्याला आज आपण वेश्या म्हणतों अशा स्त्रियांना अनेकदां ग्राम्य स्त्री म्हटलें आहे, त्यावरून वेश्यांमध्यें देखील वर्ग असत. आणि त्यांच्यामध्यें देखील सामाजिक स्थित्यंतरें अनेक असलीं पाहिजेत. केवळ द्रव्यशोषण हाच धर्म ज्या स्त्रियांचा, व ज्या स्त्रियांची व्यवहारपद्धति क्षेमेंद्रानें आपल्या समयमातृकेंत उत्तम तऱ्हेनें वर्णिली आहे त्या प्रकारच्या स्त्रियांचा वर्ग देखील उदयनपूर्वकालांत दिसत आहे आणि त्याचें चित्र मदनदंष्ट्रेच्या कथेंत स्पष्ट आलें आहे. आर्थिक हिताच्या दृष्टीनें श्रीमान् स्त्रियांनीं संबंध जोडणें किंवा तोडणें फारसें गैर नसावें. राजे लोकांना लग्नें जर राज्याच्या हिताहिताच्या दृष्टीनें लावावयाचीं तर ज्यांचें स्वतःचें राज्य अगर जमीनदारी आहे अशा स्त्रियांनीं जर "संबंध" आपल्या संस्थानाच्या बलाच्या दृष्टीनें जोडले तर त्यांत गैर तें काय आहे ? या जमीनदार स्त्रियांच्या नीतीस 'वेश्यानीति' म्हणण्यापेक्षां नृपनीति म्हटलें तर कांहीं गैर होणार नाहीं. वेश्यानीति आणि नृपनीति यांत इतकें विलक्षण सादृश्य आहे हें प्राचीनांनीं

जाणलें होतें आणि "वेश्यांगनेव नृपनीतिरनेकरूपा" या वाक्यानें व्यक्त केलें होतें. तथापि मातृसत्ताककुटुंबपद्धति नष्ट होऊन पितृसत्ताक कुटुंबपद्धति सुरू झाली त्या स्थितींत जमीनदारणींना 'वेश्या' म्हणण्याचा रिवाज पडला असावा.

## २८९. सामाजिक आणि लैंगिक ऊर्फ ऐंद्रिय नीतिनियमांची घटना.

२८९. श्रीमंत जमीनदार वेश्या उज्जयिनींतच होत्या असें नाहीं तर महाराष्ट्रांत होत्या. महाराष्ट्रांतहि मातृकन्यापरंपरा आणि मातृसत्ताक कुटुंबपद्धति ही शातवाहन काळांत देखील चालू होती हें पुढें सविस्तर दाखविण्यांत येणार आहेच. मातृसत्ताक कुटुंबपद्धतींतील लैंगिक नीतिकल्पना पितृसत्ताक कुटुंबपद्धतींतील कल्पनांपेक्षां निराळ्या असावयाच्याच आणि जेव्हां दोन समाज एकत्र होत जातात तेव्हां कांहींतरी भिन्न कल्पनांचें एकीकरण करणारे संप्रदाय निघावयाचेच. शाक्त संप्रदायाची लोकप्रियता असल्याच परिस्थितीची द्योतक असावी. कापालिकांचा संप्रदाय देखील लैंगिक निर्बंध सोपे ठेवणारा असावा.

कथासरित्सागरांत म्हणजे बृहत्कथेंत कापालिकांचें वर्णन आहे. यांचें आणखी वर्णन भवभूतीच्या नाटकांतून वगैरे आढळतें. अनेक ठिकाणीं या कापालिकांचें स्वरूप पूर्णपणें भयानक असेंच वर्णन केलें आहे. यांना लैंगिक निर्बंध कमी होते असेंहि दाखविलें आहे. त्या प्रकारचीच कापालिकासंबंधानें कल्पना करून दक्षिणारंजन शास्त्री त्या पंथाचा वैदिक कालापासून इतिहास देण्याचा महत्त्वाकांक्षी प्रयत्न करीत आहेत. त्यांचें विवेचन आमच्या मतें फारच चुकांनीं भरलें आहे.*

वेदांत उल्लेखिलेले "शिश्नदेव" यांचा केवळ उल्लेख करून छांदोग्योपनिषदांत आलेल्या वामदेवव्रताशीं या पंथाचा त्यांनीं संबंध जोडला आहे. तेथील "न कांचन परिहरेत्तद् व्रतम्" (२. १३-१-२.) हा उतारा घेऊन लेखक असें सांगत आहे कीं उपासकानें कोणत्या तरी स्त्रीशीं किंवा अनेक स्त्रियांशीं रत होणें हेंच त्या व्रताचें साधन आहे! परलोकविषयक विचारांच्या बाबतींत प्रचलित विचार नाकारणारे हे लोक अनेक स्थित्यंतरांतून गेले. आपल्या कृतीचें समर्थन करतां करतां त्यांनीं तत्त्वें शोधून काढलीं. त्या तत्त्वांपैकींच 'स्वभाववाद' आहे असें लेखक मांडीत आहे! स्वभाववाद या मताची जरी व्यवस्थित मांडणी झाली नसली तरी "स्वभाववाद" मनुस्मृतीसारख्या बऱ्याच ग्रंथांमध्यें सांपडतो. त्या वादाचा उपयोग लैंगिक निर्बंधाच्या शैथिल्याच्या समर्थनासाठीं मात्र थोडक्याच लोकांनीं लावला आहे अशामध्येंच देहात्मवादी आहेत. 'देह हाच आत्मा आहे असें समजणें' देहात्मवाद यालाच हें नांव होतें. तसलीं मतें शाबरभाष्यांत उल्लेखिलीं आहेत असें दक्षिणारंजन सांगत आहेत. व पुढील आधार देत आहेत.

**(१) "अपरे स्वभावं जगतः कारणमाहुः स्वभावादेव जगद् विचित्रमुत्पद्यते, स्वभावतो विलयं याति तदा च तद्वाक्यं"**

**(२) कः कंटकानां प्रकरोति तैक्ष्ण्यं**
**विचित्र भावं मृगपक्षिणां च**
**माधुर्यमिक्षोः कटुतां च निंबे**
**स्वभावतः सर्वमिदं प्रवृत्तम्**

(भट्ट उत्पलाची बृहत्संहितेवरील टीका)

या प्रकारच्या वाक्यांनीं ज्या प्रवृत्ति मनुष्यांत स्वभावतः असतात त्यांचें देहात्मवादी ग्रंथकार समर्थन करीत हें खरें आहे. तथापि तेवढ्यावरून दक्षिणारंजन सांगतात त्याप्रमाणें देहात्मवादी ग्रंथकार अनीतीचे प्रवर्तक होते असें म्हणतां येणार नाहीं.

या पंथाचा इतिहास देण्याचें जें पांडित्य दक्षिणारंजन शास्त्री यांनीं केलें तथापि त्यांत कोणतीहि गोष्ट चांगल्या तऱ्हेनें मांडली नाहीं आणि लोकायतिकांचा कापालिकांशीं संबंध सिद्ध केला नाहीं. कापालिक हे शैव होते, आणि लोकायतिक हे ईश्वरवादी नव्हते. आणि या दोहोंचा संबंध जोडण्यांत लेखकानें बरीच ओढाताण केल्याचें दिसतें. लैंगिक नीतिनियमांच्या बाबतींत अघळपघळपणा याचा नास्तिक्याशीं कसातरी संबंध जोडण्याची ही खटपट आहे. खरें म्हटलें असतां ईश्वरावर किंवा विशिष्ट शक्तीवर विश्वास आणि लैंगिक नियमांचा कठोरपणा यांचा कोणताच संबंध नाहीं. याला एकंदर शाक्त धर्माचा इतिहास प्रमाण आहे.

एवंच उदयनपूर्व किंवा उदयनोत्तर कोणत्याहि काळांत उत्तर हिंदुस्थानांत अगर महाराष्ट्रांत लैंगिक धर्माच्या बाबतींत अघळपघळपणा होता असें दाखविण्यास आधार नाहीं.

## २९०. प्राचीन महाराष्ट्र आणि लैंगिक धर्म.

२९०. बृहत्कथेंत कापालिकांच्या धर्माचें अस्तित्व महाराष्ट्रांत दाखविलेलें नाहीं. महाराष्ट्रांत त्यावेळेस लैंगिक नीतिनियमांविषयीं अघळपघळ कल्पनांचा वर्ग नसेलच असें म्हणवत नाहीं. 'शाक्त' संप्रदायाचें अस्तित्त्व महाराष्ट्रांत अत्यंत प्राचीनकाळापासून असावें. त्याचा परिणाम मराठी भाषेवर झाला आहे. 'छाकटा' हा शब्द 'शाक्त' या शब्दाचाच अपभ्रंश दिसतो. तथापि महाराष्ट्री भाषेंत जोंपर्यंत "छाकटा" शब्दाचें त्याच अर्थानें पूर्वरूप सांपडलें नाहीं तोंपर्यंत शाक्त संप्रदायाच्या महाराष्ट्रांत प्रचारास चालुक्यपूर्वता खात्रीपूर्वक देतां येत नाहीं.

* IHQ. March 1931.



चित्रांक ५७. शातवाहनकालीन एक महत्त्वाचा अवशेष.
जुन्नरच्या म्हणजे यवननगरीच्या मानमोड्या लेण्यांतील भूतलिंग नांवाच्या लेण्यांचा समूह.

प्रकरण ३३ वें.

# मौर्यांपासून शातवाहनांपर्यंत मगधेतिहास व त्यासंबंधीं पौराणिक पुरावा.

## २९१. मौर्यपूर्व सिंहावलोकन; महाराष्ट्रेतर इतिहासांत अवगाहनाचें समर्थन.

२९१ नंदांचा अंत्यकाल हा महाराष्ट्राच्या त्याचप्रमाणें अखिल भारताच्या आणि त्याचप्रमाणें पश्चिम एशियाच्या इतिहासांत महत्त्वाचा काल आहे. बुद्ध आणि कुरुस यांचा पूर्वीचा काल म्हणजे पौराणिक स्वरूपाच्या इतिहासाचा काल जाऊन त्याच्या जागीं खऱ्या इतिहासाचा काल आला होता. महाराष्ट्रांत मात्र या कालांत ( पंचवीस राजांचा ? ) अश्मक वंश राज्य करीत असून तो इराणचे पौराणिक काल आणि हखामणी राजांचा काल हे दोन्ही व्यापिता झाला, आणि अश्मकांच्या अंत्यकालींच यवनमहत्वाचा काल सुरू झाला. पश्चिम आशियांतील या यवनमहत्वाच्या कालीं उत्तर हिंदुस्थानांत मौर्यांचा काल होता.

पाठीमागें आतांपर्यंत जें विवेचन झालें आहे, त्यांत लेखक आपणांस महाराष्ट्रापासून दूर नेत आहे असें वाचकवर्गास वाटणारच; पण वादविवादाच्या अरण्यांत नेणें अपरिहार्य झालें. प्रकृत प्रश्नाच्या स्पष्टीकरणासाठीं दुसऱ्या चौकशींत शिरावयाचें आणि ती चौकशी पुरी करण्यासाठीं तिसऱ्या चौकशींत शिरावयाचें असें झालें तथापि तो सर्व परिश्रम सकारण होता. बृहत्कथेंत संरक्षित झालेल्या प्रतिष्ठानकथांचा ऐतिहासिक उपयोग करण्यासाठीं हें सर्व अवश्य होतें. प्रतिष्ठानकथांचा कालनिश्चय करण्यासाठीं बृहत्कथेंतील मुख्य वर्णित राजा उदयन याचा कालनिर्णय करणें अवश्य होतें. तो निर्णय करतां करतां असें दिसून येऊं लागलें कीं, उदयन ही व्यक्ति खरोखर होती. ती बुद्धपूर्व खास आहे, एवढेंच नव्हे तर दोन बुद्धाहून अडीचशें वर्षें जुनी आहे यांत शंका नाहीं.

उदयनाच्या काळापासून बुद्धापर्यंतच्या काळांत वत्सदेशाचें महत्त्व कमी होऊन मगधाचें महत्व स्थापन होण्याला प्रारंभ झाला होता. उदयनाशीं समकालीन असलेले बिंबिसार आणि अजातशत्रु यांची कोसलच्या घराण्याशीं स्पर्धा चालूच होती. शैशुनाग घराणें फारसें बलाढ्य नव्हतें, तर तें साधारणपणें जीव धरून होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सूतवर्गानें शैशुनाग घराण्याचें महत्व दाखविणारें काव्य रचिलें असल्यास तें राखून ठेवलें गेलें नाहीं; आणि त्यामुळें त्याची आठवण आज विशेषेंकरून बौद्ध ग्रंथामुळेंच राहिली आहे. शैशुनाग घराण्याची समाप्ति ज्या नंद घराण्यामुळें झाली त्या नंदाची सत्ता दूरवर पसरली, आणि नंदांची तरवार महाराष्ट्रासहि चाटून गेली असावी असें वाटण्यास कारण होणाऱ्या विधानांची माहिती मागें दिलीच आहे.

## २९२. नंदांपासून सातवाहनांच्या म्हणजे आंध्रांच्या मगधविजयापर्यंत पुराणांचा पुरावा.

२९२. महापद्माच्या कालीं नंद दक्षिणेंत आले तर त्या नंतर शातवाहन उत्तरेस राज्यकर्ते झाले. या दोन कालांमधला इतिहास अर्थात् दक्षिणेच्या उत्कर्षाचा इतिहास होय. त्या इतिहासाचे कोणते धागे हातीं येतात तें पाहिलें पाहिजे.

नंद देखील नष्ट झाले. त्यांच्या जागीं मौर्य आले आणि मौर्यांनीं महाराष्ट्रावर पुन्हा आक्रमण करण्याचा प्रयत्न केलाच. तथापि त्यांचा प्रभाव कोंकणपट्टींतील उत्तर भागांतच काय तो दृष्ट झाला. त्यांच्या काळांत दक्षिणेकडे जे शातवाहन उदय पावत होते त्यांचीच सत्ता वाढून पुढें त्यांनींच मगधविजय केल्यामुळें त्यांच्याकडे लक्ष देणें मगधांतील सूतवर्गास निदान पौराणिकांस आवश्यक झालें. शातवाहनसत्ता दक्षिणेस वाढत होती त्यावेळेस खुद्द मगधांतच राज्यक्रांत्या होत होत्या. नंदांनंतर मौर्य आले, मौर्यांनंतर शुंग आले आणि शुंगांनंतर काण्व आले आणि ते पुढें आंध्र म्हटल्या जाणाऱ्या शातवाहनांच्या भक्ष्यस्थानीं पडले ही गोष्ट भविष्य सांगण्याच्या भाषेंत पुराणकारांनीं पुढील प्रमाणें लिहून ठेवली आहे.

### मौर्य घराणें.

( मत्स्य-पुराण )

**कौटिल्यश्चंद्रगुप्तं तु ततो राज्येऽभिषेक्ष्यति ।**
**षट्त्रिंशत् तु समा राजा भविताऽशोक एव च ॥**
**सप्तानां दश वर्षाणि तस्य नप्ता भविष्यति ।**
**राजा दशरथोऽष्टौ तु तस्य पुत्रो भविष्यति ॥**
**भविता नव वर्षाणि तस्य पुत्रश्च संप्रतिः ।**
**भविता शतधन्वात्र तस्य पुत्रस्तु षट् समाः ॥**

**बृहद्रथस्तु वर्षाणि तस्य पुत्रश्च सप्ततिः ।**
**इत्येते दशमौर्यास्तु ये भोक्ष्यंति वसुंधराम् ॥**
**सप्तत्रिंशच्छतं पूर्णं तेभ्यो शुंगान् गमिष्यति ।**

कौटिल्य चंद्रगुप्ताला राज्याभिषेक करील. राजा अशोक ३६ वर्षें राज्य करील. त्याचा नातू १७ वर्षें राज्य करील. राजा दशरथ ८ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र संप्रति हा ९ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र शतधन्वा ६ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र बृहद्रथ ७० वर्षें राज्य करील.

याप्रमाणें हे दहा मौर्य राजे १३७ वर्षेंपर्यंत या पृथ्वीचा उपभोग घेतील व नंतर राज्य शुंगांकडे जाईल.

याच कालाचा इतिहास वायुपुराण पुढीलप्रमाणें देत आहे.

**चंद्रगुप्तं नृपं राज्ये कौटिल्यः स्थापयिष्यति ।**
**चतुर्विंशत्समाराजा चंद्रगुप्तो भविष्यति ॥**
**भविता नंदसारस्तु पंचविंशत्समा नृपः ।**
**षट्त्रिंषत्तु समा राजा भविताऽशोक एव च ॥**
**तस्य पुत्र कुलालस्तु वर्षाण्यष्टौ भविष्यति ।**
**कुलालतनयाश्चाष्टौ भोक्तारो बंधुपालितः ॥**
**दशोनः सप्त वर्षाणि तेषां नप्ता भविष्यति ।**
**राजा दशरथस्त्वष्टौ तस्य पुत्रो भविष्यति ॥**
**भविता नव वर्षाणि तस्य पुत्रस्तु संप्रतिः ।**
**शालिशूकः समा राजा त्रयोदश भविष्यति ॥**
**सप्त वर्षाणि देवधर्मा भविष्यति नराधिपः ।**
**राजा शतंधनुश्चाष्टौ तस्य पुत्रो भविष्यति ॥**
**बृहद्रथस्तु वर्षाणि सप्ताशीतिम् भविष्यति ।**
**इत्येते नवमौर्यास्तु ये भोक्ष्यंति वसुंधराम् ।**
**सप्त त्रिंशाच्छतम् पूर्णं तेभ्यः शुंगो भविष्यति ॥**

वरील श्लोकांचा आशय पुढील प्रमाणें आहे.

कौटिल्य चंद्रगुप्ताला राज्याभिषेक करील. चंद्रगुप्त २४ वर्षे राज्य करील. नंदसार २५ वर्षें राज्य करील. राजा अशोक ३६ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र कुलाल (कुणाल) ८ वर्षें राज्य करील. कुलालाचा पुत्र बंधुपालित ८ वर्षें राज्याचा उपभोग घेईल. त्याचा नातू दशोन ७ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र दशरथ ८ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र संप्रति ९ वर्षें राज्य करील. शालिशूक १३ वर्षें राज्य करील. देवधर्मन् ७ वर्षें राज्य करील, त्याचा पुत्र शतधनु ८ वर्षें राज्य करील. बृहद्रथ ७० वर्षें राज्य करील.

**हे नऊ मौर्य राजे पूर्ण १३७ वर्षेंपर्यंत या पृथ्वीचा उपभोग घेतील व नंतर ती शुंगांकडे जाईल.**

वायु पुराणाच्या कांहीं प्रती आणि ब्रह्मांड पुराण तोच इतिहास पुढीलप्रमाणें देतात.

**चंद्रगुप्तं नृपं राज्ये कौटिल्यः स्थापयिष्यति**
**चतुर्विंशत्समा राजा चंद्रगुप्तो भविष्यति**
**भविता भद्रसारस्तु पंचविंशत्समा नृपः**
**षट् त्रिंशत्तु समा राजा अशोको भविता नृषु**
**तस्य पुत्रः कुणालस्तु वर्षाण्यष्टौ भविष्यति**
**कुणालसूनुरष्टौच भोक्ता वै बन्धुपालितः**
**बंधुपालिन दायादो दश भावींद्रपालितः**
**भविता सप्तवर्षाणि देववर्मा नराधिपः**
**राजा शतधनुश्चाष्टौ तस्य पुत्रो भविष्यति**
**बृहद्रथश्च वर्षाणि सप्त वै भविता नृपः**
**इत्येते नव मौर्या वै भोक्ष्यन्ति च वसुंधराम्**
**सप्तत्रिंशच्छतं पूर्णं तेभ्यः शुंगो गमिष्यति**

कौटिल्य चंद्रगुप्ताची राज्यावर स्थापना करील. चंद्रगुप्त २४ वर्षें राज्य करील. भद्रसार २५ वर्षें राज्य करील. अशोक ३६ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र कुणाल ८ वर्षें राज्य करील. कुणालाचा पुत्र बंधुपालित ८ वर्षें राज्य करील. बंधुपालिताचा वारस ( दायाद ) इंद्रपालित १० वर्षें राज्य करील. देववर्मा ७ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र शतधनु ८ वर्षें राज्य करील. बृहद्रथ ७ वर्षें राज्य करील.

याप्रमाणें हे नऊ मौर्य राजे १३७ वर्षेंपर्यंत या पृथ्वीचा उपभोग घेतील व नंतर राज्य शुंगांकडे जाईल.

या श्लोकांत जी थोडी भिन्न माहिती आहे तीवर विशेष चर्चा करण्याचें कारण नाहीं. आपणांस मगधावर चर्चा करावयाची नाहीं. हे भिन्न श्लोक मौर्यराज्याची वर्षसंख्या तीच ( १३७ वर्षें ) देत आहेत हें आपणांस पुरें आहे.

### २९३. महाराष्ट्रावर मौर्यसत्ता कितपत होती.

२९३. नंदाच्या क्रांतीनंतर मौर्य, शुंग आणि कण्व हीं तीन घराणीं मगधांत राज्यकर्ती झालीं. त्यांपैकीं मौर्यांनीं महाराष्ट्रांत प्रवेश केला. उत्तर कोंकण त्यांच्या सत्तेखालीं आलें होतें त्या संबंधानें सविस्तर विवेचन पुढें येणारच आहे.

### २९४. मौर्यांच्या अंतानंतरच्या राजकारणांत महाराष्ट्र सामील झालें होतें काय.

२९४ विदर्भ मौर्यांच्या सत्तेखालीं होतें असें म्हणतां येणार नाहीं. तथापि कालीदासानें विदर्भ राजाला मौर्यांचा पक्षपाती बनविलें आहे, व त्यास शुंगाकडून पराभूत करून शुंगांची सत्ता वऱ्हाडावर स्थापित करविली आहे. तो प्रश्नहि पुढें सविस्तर विवेचिला जाईल.

**२९५. शुंग घराणें आणि त्याचें सांस्कृतिक दृष्टीनें महत्त्व.**

२९५ मालविकाग्निमित्र नाटक आपण वाचूं लागलों तर असें दिसतें कीं त्यांत पुष्यमित्रास कालिदासानें सोवळा बनविला आहे. त्याचे हात स्वामिघातामुळें रक्तानें भरलेले दाखविलेले नाहींत. यावरून त्याची पुष्यमित्राविषयीं सहानुभूति दृष्टीस पडते. त्या सहानुभूतीचें कारण पुष्यमित्र ब्राह्मणी धर्माचा होता व कदाचित् ब्राह्मणच असावा. अनेक लोकांनीं पुष्यमित्राच्या आगमनांत आनंद दाखविला असें दिसतें. कलियुग संपलें. सत्य युग सुरू झालें असें सांगणारें कल्कि अवताराचें वर्णन पुष्यमित्राला अनुलक्षून आहे असें प्रो. देवदत्त भांडारकर सांगत आहेत. बऱ्याच लोकांना शुंगागमन आनंदकारकच वाटलें. "इह पुष्यमित्रं याजयामः" या व्याकरणाचें रूप दाखविण्याच्या निमित्तानें पुष्यमित्रास पतंजलि अमर्त्य करूं पहात आहे. तोच पतंजलि दक्षिणेकडील संस्कृतज्ञ आणि उत्तरेकडील संस्कृतज्ञ यांमध्यें स्पर्धेची किंवा असूयेची भावना दाखवीत आहे आणि यावरून शुंगकालीं दाक्षिणात्यांचें संस्कृत पांडित्य देखील असूयाविषय झालें असावें. कदाचित् असें झालें असेल कीं मौर्यांच्या अमदानींत ज्याप्रमाणें ब्राह्मणी धर्माचें महत्त्व राजदरबारांतून कमी झालें त्याप्रमाणें संस्कृत विद्येचेंहि महत्त्व कमी झालें असावें. आणि त्यामुळें उत्तरेकडील संस्कृत पंडितांनीं दक्षिणेचा आश्रय धरिला असावा आणि शातवाहनांच्या दरबारांत त्यांची संभावना झाली असावी. दक्षिणेंतील पांडित्याचा इतिहास हा विषय स्वतंत्रपणें चर्चिला जाणारच आहे. शुंगकालीन पतंजलीचें महाभाष्य उत्तरेकडील मावळत्या संस्कृत ज्ञानाच्या पुनरुज्जीवनासाठीं असावें.

सांगावयाचें तें एवढेंच कीं शुंगांच्या आगमनाचें ब्राह्मणांनीं स्वागत केलें असावें आणि ब्राह्मणी विद्येच्या वर्धनाला शुंगांकडून चेतना मिळाली असावी असें दिसतें.

**२९६. शुंगांची राजावलि.**

२९६ शुंगांच्या राजावलीकडे आतां आपण वळूं आणि ती देणाऱ्या पौराणिक श्लोकांचें अवतरण करूं.

**शुंग घराणें.**

( मत्स्य पुराण )

**पुष्यमित्रस्तु सेनानीरुद्धृत्य स बृहद्रथम्**
**कारयिष्यति वैं राज्यं षट्त्रिंशति समा नृपः**
**अग्निमित्रस्सुतश्चाष्टौ भविष्यति समा नृपः**
**भविताऽपि वसुज्येष्ठः सप्त वर्षाणि वै नृपः**
**वसुमित्रः सुतो भाव्यो दश वर्षाणि पार्थिवः**
**ततोन्ध्रकः समे द्वे तु तस्य पुत्रौ भविष्यति**
**भविष्यति समास्तस्मात् त्रीण्येवं स पुलिंदकः**
**भविष्यति च योमेधस्त्रीणि वर्षाणि वै ततः**
**भविता वज्रमित्रस्तु समा राजा पुनर्नव**
**द्वात्रिंशत्तु समाभागः समाभागात्ततो नृपः**
**भविष्यति सुतस्तस्य देवभूमिः समा दश**
**दशैते शुंगराजानो भोक्ष्यन्तीमां वसुंधराम्**
**शतं पूर्णं दश द्वे च ततः कण्वान् गमिष्यति.**

सेनापति पुष्यमित्र बृहद्रथाचा नाश करून ३६ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र अग्निमित्र ८ वर्षें राज्य करील. वसुज्येष्ठ ७ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र वसुमित्र १० वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र अंध्रक २ वर्षें राज्य करील. पुलिंदक ३ वर्षें राज्य करील; नंतर योमेधहि ३ वर्षें राज्य करील. नंतर वज्रमित्र ९ वर्षें राज्य करील. समाभाग ३२ वर्षें राज्य करील; नंतर त्याचा पुत्र देवभूमि १० वर्षें राज्य करील.

हे दहा शुंग राजे या भूमीचा ११२ वर्षेंपर्यंत उपभोग घेतील, व नंतर राज्य कण्वांकडे जाईल.

वि ष्णु पु रा णा चें वि धा न

**पुष्यमित्रस्तु सेनानीरुद्धृत्य स बृहद्रथम्**
**कारयिष्यति वै राज्यं समा षष्टिं सदैव तु**
**अग्निमित्रस्सुतश्चाष्टौ भविष्यति समा नृपः**
**भविता चापि सुज्येष्ठः सप्त वर्षाणि वै ततः**
**वसुमित्रः सुतो भाव्यो दश वर्षाणि पार्थिवः**
**ततोन्ध्रकः समे द्वे तु तस्य पुत्रो भविष्यति**
**भविष्यति समास्तस्मात् तिस्र एव पुलिंदकः**
**राजा घोषः सुतश्चापि वर्षाणि भविता त्रयः**
**सप्त वै वज्रमित्रस्तु समा राजा ततः पुनः**
**द्वात्रिंशद्भविता चापि समा भागवतो नृपः**
**भविष्यति सुतस्तस्य देवभूमिः समा दश**
**दशैते शुंग राजानो भोक्ष्यन्तीमां वसुंधराम्**
**शतं पूर्णं दश द्वे च ततः कण्वान् गमिष्यति**

सेनापति पुष्यमित्र बृहद्रथाचा नाश करून एकसारखा ६० वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र अग्निमित्र ८ वर्षें राज्य करील. नंतर सुज्येष्ठ ७ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र वसुमित्र १० वर्षें राज्य करील, नंतर त्याचा पुत्र अंध्रक दोन वर्षें राज्य करील. नंतर पुलिंदक ३ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र घोष ३ वर्षें राज्य करील. नंतर वज्रमित्र ७ वर्षें राज्य करील. नंतर भागवत ३२ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र देवभूमि १० वर्षें राज्य करील.

हे दहा शुंगराजे या वसुंधरेचा पूर्ण ११२ वर्षें उपभोग घेतील व नंतर ती कण्वांकडे जाईल.

### २९७. काण्वायन (शुंगभृत्य) घराणें.

२९७. शुंगांनंतर काण्व आले त्याच्या संबंधाचे पुराणांतील श्लोक पुढील प्रमाणें आहेत.

(मत्स्यपुराण)

**अमात्यो वसुदेवस्तु बाल्याद्व्यसनिनं नृपम्**
**देवभूमिं अथोत्साद्य शुंगस्तु भविता नृपः**
**भविष्यति समा राजा नवः काण्वायनो द्विजः**
**भूमिमित्रः सुतस्तस्य चतुर्दश भविष्यति**
**नारायणसुतस्तस्य भविता द्वादशैव तु**
**सुशर्मा तत्सुतश्चापि भविष्यति दशैव तु**
**इत्येते शुंगभृत्यास्तु स्मृताः काण्वायनो नृपाः**
**चत्वारस्तु द्विजा ह्येते कण्वा भोक्ष्यन्ति वै महीम्**
**चत्वारिंशत्पंच चैव भोक्ष्यन्तीमां वसुंधराम्**
**एते प्रणतसामंता भविष्या धार्मिकाश्च ये**
**येषां पर्यायकाले तु भूमिरांध्रान् गमिष्यति**

अमात्य वसुदेव आपल्या बाल्यापासून व्यसनी अशा राजा देवभूमी याचा बलपूर्वक नाश करील; तो शुंगांमध्येंच गणला जाईल. तो काण्वायन राजा ९ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र भूमिमित्र १४ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र नारायण १२ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र सुशर्मा १० वर्षें राज्य करील.

हे राजे शुंगभृत्य काण्वायन या नांवानें ओळखले जातील. हे चार कण्व ब्राह्मण ४५ वर्षेंपर्यंत या भूमीचा उपभोग घेतील. आसपासचे राजे यांचे मांडलिक बनतील. हे राजे धार्मिक वृत्तीचे होतील. नंतर क्रमानें ही भूमि आंध्रांकडे जाईल.

(विष्णु व भागवत पुराणें)

**अमात्यो वसुदेवस्तु बाल्याद्व्यसनिनं नृपम्**
**देवभूमिं तथोत्पाट्य शुंगेषु भविता नृपः**
**भविष्यति समा राजा नव काण्वायनो द्विजः**
**भूमिमित्रः सुतस्तस्य चतुर्दश भविष्यति**
**भविता द्वादश समास्तस्मान्नारायणो नृपः**
**सुशर्मा तत्सुतश्चापि भविष्यति दशैव तु**
**चत्वारस्तुंगकृत्यास्ते नृपाः काण्वायना द्विजाः**
**भाव्याः प्रणतसामंताश्चत्वारिंशच्च पंच च**
**तेषां पर्यायकाले तु भूरान्ध्रानां भविष्यति**

अमात्य वसुदेव बाल्यापासून व्यसनी अशा देवभूमि राजाचा नाश करील; तो शुंगांमध्येंच राजा म्हणून गणला जाईल. तो काण्वायन राजा ९० वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र भूमिमित्र १४ वर्षें राज्य करील. त्याच्यानंतर नारायण १२ वर्षें राज्य करील. त्याचा पुत्र सुशर्मा १० वर्षें राज्य करील. हे चार शुंगभृत्य काण्वायन ब्राह्मण राजे आसपासच्या राजांना आपले सामंत बनवून ४५ वर्षें राज्य करतील. नंतर कालक्रमेंकरून ही भूमि आंध्रांची होईल.

### २९८. आंध्राचें आगमन.

२९८. यानंतर पुढें आंध्रांसंबंधीं श्लोक मागध राज्याचे कवि देत आहेत. आंध्र म्हणजेच शातवाहन. तथापि शातवाहन जातीनें आंध्र असतील असें नाहीं. आंध्रांची मूळची जात कोणती असावी यासंबंधानें प्रश्न आहे. आणि "आंध्रांचे राजे ते आंध्र" अशी जी देशना मराजाला लावण्याची पद्धति होती तीप्रमाणें त्यांनीं शातवाहनांना आंध्र म्हटलें आहे. त्यामुळें त्या काळचें नांव जातिनिर्णायक होत नाहीं.

आंध्रांचा इतिहास म्हणून पुराणें देत आहेत त्यांत ते शातवाहनांचा उल्लेख करीत नाहींत. शातकर्णी हें नांव आंध्रांच्या यादींत येतें. आणि शातकर्णी हे आपणांस शातवाहन म्हणवीत या गोष्टीमुळें शातवाहन आणि आंध्र यांचें ऐक्य आजच्या संशोधकांनीं जोडलें आहे. पुराणांतून शातवाहनाचा उल्लेख येतो त्याचें स्वरूप कसें काय आहे हें आपणांस अवलोकिलें पाहिजे. त्या संबंधानें एवढेंच सांगतां येईल कीं केवळ भविष्यपुराणांत शातवाहनासंबंधानें कांहीं तरी माहिती आली आहे. ती केवळ काल्पनिक असली तरीदेखील ती अवतरणें आणि तिचा वाचकांस परिचय करून देणें अवश्य आहे.

शा लि वा ह न आ णि भ वि ष्य पु रा ण

शातवाहनाविषयीं जें कथाजाळ पुढें निर्माण झालें त्याविषयीं कांहीं उपयुक्त निगमनें भविष्यपुराणाच्या उपलब्ध प्रतीवरून काढतां येतील. यासाठीं त्या प्रतीच्या स्वरूपाविषयीं विधान येथें केलें पाहिजे.

### २९९. भविष्यपुराणाचें स्वरूप.

२९९. भविष्यपुराण हें मूळचें लहान असून नंतर विस्तार पावलेलें आहे असा कबुलीजबाब ग्रंथांत दिला आहे.

**द्वादशैव सहस्राणि प्रोक्तानीह मनीषिभिः**
**पुनर्वृद्धिं गतानीह आख्यानैर्विविधैर्नृप ।**
**यथा स्कांदं तथा चेदं भविष्यं कुरुनंदन**
**स्कांदं शतसहस्रं तु लोकानां ज्ञातमेवहि**
**भविष्यमेतदृषिणा लक्षार्द्धं संख्यया कृतम्**

मौर्यकालीन आणि शातवाहनकालीन तीन थोर पाश्चात्य सम्राट.



चित्रांक ५८.
(१) शिकंदर ऊर्फ अलेक्झांडर दी ग्रेट. चंद्रगुप्त कालीन "वायव्य भारत विजेता"



चित्रांक ५९. (२) पहिला रोमन सम्राट. आगस्टस व्हॅटिकन येथील पुतळा. शालिवाहन शकाच्या आरंभाच्या कालीं याचें साम्राज्य पश्चिम एशियांत स्थापन झालें होतें.



चित्रांक ६०. (३) रोमन सम्राट ट्राजन (इ. स. ९८-११७) कॅपिटलमधील ऊर्ध्वांग प्रतिमा. ट्राजन हा प्रदेश जिंकीत हिंदुस्थानच्या अगदीं जवळ आला होता.

भविष्यपुराणाची जी प्रसिद्ध आवृत्ति आपल्याकडे दृष्टीस पडते ती वेंकटेश्वर छापखान्याची होय. या आवृत्तींत व्हिक्टोरिया राणी आणि पार्लमेंट यांचा उल्लेख आणला आहे. ( प्रतिसर्गपर्व तृतीय खंड अध्याय २२ ) त्यावरून या प्रतीचा 'आजतागाईतपणा' सहजच लक्षांत येईल. या पुराणाच्या आवृत्तींत सर्व फेरफार आजच्या काळांत केला नसून निरनिराळ्या काळीं निरनिराळे भाग समाविष्ट केले आहेत, असें अनेक भागांवरून स्पष्ट होत आहे. कारण ज्या विषयाचें आज महत्त्व मुळींच नाहीं, असे अनेक विषय विस्तारानें वर्णिले आहेत. उदाहरणार्थ कृष्णांशाची कथा घ्यावी. शिवाय: अनेक श्लोक मध्येंच घुसडल्यासारखे दिसत आहेत. उदाहरणार्थ पुष्यमित्र हाच कलंकी होय अशा भावनेनें परकीय राजांचा वृत्तांत पुष्यमित्राच्या अगोदर घातला आहे. मुरुंड राज्य विध्वंसून टाकलें गेलें, तेंच इंग्रजांचें राज्य असावें अशी कल्पना केली आहे. व त्याच्याबरोबरच किलकिला येथील राज्याचा उल्लेख केला आहे. यावरून मुरुंड राजे, किलकिला राजे आणि पुष्यमित्र इत्यादि गोष्टी कलंकी अवताराच्या आगमनाच्या सुमारास आहेत अशी कल्पना करून तिमिरलंग(तैमूरलंगा)पासून व्हिक्टोरिया राणी पर्यंतचा इतिहास हा पुष्यमित्राच्या अगोदर घातला आहे. अर्थात् पुष्यमित्र येतांच कलियुग नष्ट झालें ही कल्पना प्रधान असतां भविष्यपुराणाची एक आवृत्ति तयार झाली होती परंतु पुढच्या संपादकांना कलियुग संपलें नाहीं असें वाटल्यामुळें पुष्यमित्रास अधिक पुढें घालण्याची त्यांस बुद्धि झाली. पुष्यमित्र हाच कल्की होय अशी कल्पना होती, तीवरून मौर्यांच्या पाडावाचें आणि शुंगांच्या आगमनाचें आल्हादकारकत्व एका काळीं बरेंच मोठें होतें यांत शंका नाहीं व त्यामुळें मौर्यांच्या अंताचें सांस्कृतिक इतिहासांत महत्त्व मोठें असलें पाहिजे.

अर्वाचीन इतिहास पुष्यमित्राच्या अगोदर घालण्याची प्रेरणा अंतिम संपादकास नवीनच झाली नसून त्या विचाराचा उपक्रम अगोदरच झाला आहे. विक्रमसंवत् अगोदर स्थापन होऊन त्यांत एकंदर इतिहास बसविण्याची क्रिया या भविष्यपुराणाच्या आवृत्तींत झाली आहे.

भविष्यपुराणांतील कित्येक भाग निःसंशय आधुनिक रचनेचे आहेत; परंतु सबंध ग्रंथच निराधार असें कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं. उलटपक्षीं आम्हांस असें वाटतें कीं पुस्तक जितकें जुनें तितकें तें मजकूरघुसड्या लोकांना वापरावेंसें वाटतें आणि आपल्या इष्ट विषयास साधार बनविणें सुकर होतें. भविष्यपुराणाचा पहिला भाग जो ब्रह्मकर्म तो उघड उघड फार जुना आहे. आपस्तंबासारख्या जुन्या धर्मसूत्रग्रंथांत भविष्यपुराणांतील श्लोक उद्धृत केले आहेत. नारदीय पुराण अध्याय १०० ब्रह्मपुराणाचा गोषवारा देतें आणि वराहपुराण या भागाला म्हणजे सूर्यपूजक मग यांजविषयीं माहिती देणाऱ्या भागास उल्लेखितें. प्रसिद्ध ऋषि जो वराहमिहिर हा आपल्या बृहत्संहितेंत ( ६०, १९. ) भविष्यपुराणांतील एक श्लोक ( १३८, ६. ) उद्धृत करतो. त्या श्लोकांमध्यें त्यावेळेस प्रचलित असलेले अनेक संप्रदाय उल्लेखिले आहेत; ते म्हटले म्हणजे भागवत, मग ऊर्फ सौर, विभूतिधारी शैव, मातृकापूजक, श्वेताम्बर जैन आणि लाल वस्तु धारण करणारे बौद्ध श्रमण हे होय. या उल्लेखांवरून आजच्या भविष्यपुराणापैकीं बरेंचसें ख्रि. पू. दोन शतकें इतकें तरी अगोदर असावें असें नगेंद्रनाथ वसु मांडीत आहेत. † पुष्यमित्राच्या आगमनाबद्दल आनंद दाखविणाऱ्या शुंगकालांत तें तयार झालें असावें.

### ३००. विक्रमादित्य आणि शातवाहन.

३००. भविष्यपुराण कर्त्यांनीं शालिवाहन आणि आंध्र हे एकच होते हें ओळखलें नव्हतें असें दिसतें.

**स्वर्गते विक्रमादित्ये राजानो बहुधाऽभवन्**
**तथाष्टादश राज्यानि तेषां नामानि मे शृणु**
**पश्चिमे सिंधुनद्यंते सेतुबंधे हि दक्षिणे**
**उत्तरे बदरीस्थाने पूर्वे च कपिलांतिके**
**अष्टादशैव राष्ट्राणि तेषां मध्ये बभूविरे**
**इंद्रप्रस्थं च पांचालं कुरुक्षेत्रं च कापिलं**
**अंतर्वेदी व्रजश्चैवाजमेरं मरुधन्व च**
**गौर्ज्जरं च महाराष्ट्रं द्राविडं च कलिंगकम्**
**आवंत्यं चोडुपं वंगं गौडं मागधमेवच**
**कौशल्यं च तथा ज्ञेयं तेषां राजा पृथक् पृथक्**
**नाना भाषाः स्थितास्तत्र बहुधर्मप्रवर्तकाः**
**एवमब्दशतंजातं ततस्ते वै शकादयः**
**श्रुत्वा धर्मविनाशं च बहुवृंदैः समन्विताः**
**केचित्तीर्त्वा सिंधुनदीमार्य्यदेशं समागताः**
**हिमपर्वतमार्गेण सिंधुमार्गेण चागमन्**
**जित्वार्य्यांल्लुँठयित्वा तान्स्वदेशं पुनराययुः**
**गृहीत्वा योषितस्तेषां परं हर्षमुपाययुः**
**एतस्मिन्नंतरे तस शालिवाहनभूपतिः ॥**
**विक्रमादित्यपौत्रश्च पितृराज्यं गृहीतवान्**
**जित्वा शकान् दुराधर्षान् चीनतैत्तिरिदेशजान्**

†Mayurbhanj Survey, Introduction, Page V.

**बाह्लीकान् कामरूपांश्च रोमजान् खुरजान् शठान्**
**तेषां कोशान् गृहीत्वा च दंडयोग्यान् अकारयत्**
**स्थापिता तेन मर्य्यादा म्लेच्छार्याणाम् पृथक् पृथक्**
**सिंधुस्थानमितिज्ञेयं राष्ट्रमार्य्यस्य चोत्तमम्**
**म्लेच्छस्थानं परं सिंधोः कृतं तेन महात्मना ॥**

विक्रमादित्य स्वर्गांत गेल्यानंतर राजे बहुविध झाले, त्यामुळें १८ राज्यें झालीं. त्यांचीं नावें ऐकावीं. पश्चिमेकडे सिंधूनदीच्या टोंकापर्यंत व दक्षिणेकडे सेतुबंधापर्यंत, उत्तरेकडे बदरीस्थानापर्यंत आणि पूर्वेला कपिल प्रदेशाच्या टोंकापर्यंत, इतक्या प्रदेशांमध्यें अठरा राज्यें होऊन गेलीं. त्यांचीं नावें (खालीलप्रमाणें) इंद्रप्रस्थ व पांचाल, कुरुक्षेत्र व कपिल, अंतर्वेदी व व्रज, अजमीर व मरू गुर्जर, महाराष्ट्र, द्रविड, कलिंग, अवन्ती, उड्डुपवंग, गौड, मगध, व कोसल यांचे राजे वेगवेगळे होते असें समजावें.

तेथें अनेक प्रकारच्या भाषा प्रचारांत होत्या व पुष्कळच प्रवर्तक होते. अशीं शंभर वर्षें लोटलीं तेव्हां शकादि लोक धर्माचा नाश झाला आहे असें ऐकून मोठ्या जमावानें आले. कांहीं सिंधु नदी ओलांडून आर्य लोकांच्या देशांत आले. कांहीं हिमालयपर्वतमार्गानें व सिंधु नदीच्या खोऱ्यांतून आले. आर्यांना युद्धामध्यें जिंकून व त्यांस मारून पुन्हां आपल्या देशाप्रत गेले. त्यांच्या बायका घेऊन ते अतिशय आनंदित होत्साते असे झाले. त्याच कालामध्यें शालिवाहन नामक राजा झाला. तो विक्रमादित्याचा नातू. तो आपल्या बापाचें राज्य घेता झाला. त्यानें शकांना, दुराधर्षांना व चीन व तैत्तिरीय देशांतील लोकांना जिंकलें. बाल्हिक, कामरूप, रोमज, खुरज, शठ, इत्यादि लोकांना जिंकलें. त्यांच्या द्रव्याचें अपहरण केलें, व योग्यप्रकारें त्यांना शासन करिता झाला; व त्यानें म्लेंछ व आर्य यांच्या वेगवेगळ्या हद्दी तोडून दिल्या. आर्यांचें उत्तम राष्ट्र "सिंधुस्थान" या नांवानें प्रज्ञेय आहे. आणि म्लेंच्छस्थान सिंधूच्या पलीकडे केलें.

विक्रमादित्याचा पराभव शातवाहनांनीं केला ही कल्पना उत्तरकालीन बनावट आहे ती भविष्य पुराणांत देखील नाहीं. भविष्यपुराणांत ती कथा नसण्याचें महत्त्व आहे.

एवंच भविष्य पुराण विक्रमादित्याचें राज्य अठरा राज्यांत वाटलें गेलें असें सांगत आहे. त्यांतील कांहीं शालिवाहनाकडे आलें तें त्यांचा पौत्र म्हणून आलें आणि शालिवाहन भूपति हा दिग्विजय पुरुष होता आणि त्यानें शकांचा पराभव केला आणि त्यांस सिंधूच्या पार घालविलें आणि सिंधू नदी ही आर्य आणि शक यांच्या राज्यांची विभाज्य रेषा होती असें सांगत आहे.

शा लि वा ह न आ णि ये शु ख्रि स्त.

वरीलप्रमाणें शातवाहनाची हकीकत दिल्यानंतर शकाधीश म्हणजे शालिवाहन आणि येशूख्रिस्त यांच्या भेटीची हकीगत दिली आहे. आणि येशूख्रिस्ताची म्लेच्छ देशाच्या ठायीं स्थापना केली असा कथाभाग दिला आहे. येशूख्रिस्त आपलें वर्णन पुढीलप्रमाणें करतो असें दाखविलें आहे.

**ईशपुत्रं च मां विद्धि कुमारीगर्भसंभवम्**
**म्लेंच्छधर्मस्य वक्तारं सत्यव्रतपरायणम्**

मी ईशपुत्र, कुमारी गर्भापासून झालेला म्लेंच्छ धर्माचा वक्ता आणि सत्यव्रतपरायण असें समज.

भविष्यपुराणांतील या हकीकतींवरून पुढील गोष्टी सिद्ध होतात.

(१) भविष्यपुराणाची एक आवृत्ति फार जुनी व्यासशिष्यकालीन होती.

(२) शुंगकालांत भविष्यपुराणास एक संस्करण झालें, त्या वेळेस कलियुग मौर्यराज्याबरोबर संपलें असा समज ग्रंथकारांचा झाला असावा.

(३) भविष्यपुराणांत जेव्हां शालिवाहन कथा प्रविष्ट झाली तेव्हां शालिवाहन हा शकांचा उच्छेदक या नात्यानें प्रसिद्ध होता पण विक्रमविजेता या स्वरूपांत प्रसिद्ध नव्हता. तर विक्रमाचें कार्य पुरें करणारा, त्याचा नातु अशी त्याची प्रसिद्धी होती. तथापि या कालांत शालिवाहन शक प्रचलित असला पाहिजे. एरव्हीं शालिवाहनास ख्रिस्ताशीं समकालीनता दिली गेली नसती.

# ब्राह्मण आणि त्यांची समाजविस्तारक विद्या

## ३०१. ब्राह्मणांच्या कार्याचें व्यापकत्व.

३०१. बुद्ध व महावीर यांच्या पूर्वींचा आणि भारतीय युद्धानंतरचा जो काल होऊन गेला, त्या काळांतील ब्राह्मण आणि त्यांच्या विद्येविषयीं सविस्तर माहिती दिल्याशिवाय त्या काळाचा बौद्धिक आयुष्यक्रमाशीं परिचय होणार नाहीं. आणि त्या काळाविषयीं आपणांस आपलेपणा वाटणार नाहीं. या काळाच्या ब्राह्मणविद्येविषयीं माहिती जगाच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे. ब्राह्मणांनीं जगाच्या संस्कृतीच्या घटनेच्या दृष्टीनें अत्यंत अपूर्व कामगिरी केली आहे. त्या त्यांच्या कामगिरीचें यथार्थ स्वरूप अजून कोणाहि ग्रंथकारानें चांगल्या तऱ्हेचें मांडलें नसल्यामुळें त्यांच्या महत्वाच्या पज अनभ्यासित गोष्टीकडे लक्ष ओढणें हें कर्तव्य होतें.

ब्राह्मणांच्या समाजघटनात्मक कामगिरीचें खरें स्वरूप द्वैपायन व्यासांच्या काळापूर्वींच सुरू झालें आणि त्या कामगिरीची बहुतांशीं पूर्णता मौर्यपूर्व बृहत्कथारचनाकाळीं झाली असें दिसून येतें.

सामाजिक कारण आणि ज्ञानविकास यांचा निकट संबंध आहे. ब्राह्मणांची विद्या वृद्धिंगत झाली ती कांहीं तरी विशिष्ट सामाजिक विकासाचें ब्राह्मणांचा विद्याविकास हा एक उपांग होता त्यामुळें झाली. वेदांचें संहितीकरण सामाजिक हेतूनें झालें, पुराणांचें साहित्य एकीकृत होण्यास सामाजिक हेतूच प्रधान होता. साहित्याचें एकीकरण झाल्यानंतर त्या साहित्याचें रक्षण, त्या साहित्याचा विशेष पद्धतशीर अभ्यास या गोष्टी आवश्यकच होतात. ब्राह्मणी विद्येच्या विकासाचा अभ्यास अर्थात् समाजाच्या विकासाचें अंग या दृष्टीनेंच झाला पाहिजे. निरनिराळे लोक एकत्र आले असतां त्यांना दिसणाऱ्या भिन्न विचारांचें आणि आचारांचें एकीकरण करणें, विद्येचाच विकास व्हावा यासाठीं समाजास इष्ट वळण लावून देणें इत्यादि गोष्टी साध्य करण्यासाठीं जी ब्राह्मणांनीं प्राचीनकाळीं कामगिरी केली ती जगाच्या इतिहासांत अपूर्व आहे आणि ज्या वर्गाच्या एकंदर कार्याचा इतिहास इतका श्रेयस्कर आहे असा दुसरा वर्ग जगांत नाहीं; आणि त्यामुळेंच ब्राह्मणांच्या जातीला समाजप्राधान्य मिळालें आणि भारतांत तें अनेक सहस्र वर्षें टिकलें.

## ३०२. मगांशीं व यहूद्यांच्या आचार्योशीं ब्राह्मणांची तुलना.

३०२. ब्राह्मणासारखी जात इतर देशांत नव्हती असें नाहीं. प्राचीनकाळीं 'मग' होते, त्यांचा पौरोहित्याचा अधिकार पश्चिम एशियापासून सिंधुनदापर्यंत मान्य होता आणि सिंधुनदाच्या पूर्वेस देखील त्यांचें थोडेंसें वर्चस्व स्थापन झालें होतें. पण त्यांची विद्या आपल्या समाजाचें सातत्य आणि प्रामुख्य राखण्यास अपुरी पडली आणि पारशांतील मोबेद आणि गया, झारखंड, राजपुताना आणि गुजरात या ठिकाणीं थोडथोड्या दिसून येणाऱ्या शाकद्वीपि ऊर्फ मग ब्राह्मणांशिवाय आणि बंगालमधील आचार्य ब्राह्मणांशिवाय त्यांचे प्रतिनिधि आज उरले नाहींत. यहूदी लोकांत कोहन आणि लेव्ही या दोन उपासकांचीं घराणीं आज आडनांवांच्या रूपानें उरलीं आहेत. तथापि त्यांना आपली संस्कृति व्यापक आणि अनेकजनमान्य करतां आली नाहीं. त्यांना ब्राह्मणी पद्धतीचे विधिनिषेध नव्हते असें नाहीं. यहूदी ब्राह्मणांना विधवाविवाह निषिद्ध होता. आज तो निषेध फारसा पाळला जात नाहीं. यहूदी कोहन हे आपलें आचार्यत्व और्ध्वदेहिक कार्यें करणाऱ्या व्यक्तीपेक्षां उच्चतर समजत आणि आज देखील प्रेतयात्राप्रसंगीं कोहन वंशांतील यहूदी कबरस्थानाच्या बाहेरच रहातात. त्याचें फाटक ओलांडीत नाहींत.

यहूद्यांच्या विद्येचें सातत्य चांगल्या तऱ्हेनें राहिलें आणि त्याबरोबर त्या धर्माचें अस्तित्त्व देखील राहिलें. एक दुसऱ्याचा परिणाम आहे असें म्हणतां येत नाहीं. शिवाय कोहन मंडळींना यहुदी समाजांत पृथक्त्व मुळींच राहिलें नाहीं. कोहन मंडळीचीं व इतरांचीं लग्नें होतात, व लग्नांतील देवघेव अगदीं बरोबरीच्या नात्यानें होते. पारशांमध्यें ही स्थिति नव्हती. दस्तूर मंडळी अगदीं कालपर्यंत आपल्या मुली इतर पारशांस देत नसत.

## ३०३. आग्रही धर्मांची जोपासना व संग्राहक धर्मांची जोपासना यांचे भिन्न परिणाम.

३०३. ब्राह्मणांनीं जसें कार्य केलें तसें करण्यास यहूदी लोकांतील याजक मंडळीस क्षेत्र नव्हतें असें नाहीं. क्षेत्र होतेंच पण त्याचा त्यांनीं फारसा उपयोग करून घेतला नाहीं, किंबहुना त्यांची त्याप्रकारें प्रवृत्ति न होण्यास कारणें झालीं. त्यांच्या धर्मकर्मांची जी वाढ झाली ती अगदीं विरुद्ध दिशेनें झाली. इतरांशीं मिळतें करून घेऊन व्यापक अशा

ब्राह्मणी कर्माची व विद्येची स्थापना करण्याकडे जर ब्राह्मणांनीं लक्ष दिलें, तर यहुदी याजकांनीं आपले अनुचर इतर दैवतांच्या उपासनेकडे जाऊं नयेत या तऱ्हेचीच अपेक्षा करून ती पूर्ण करण्याकडेसच वळले. त्यामुळें आग्रही आणि असहिष्णु प्रकारच्या धर्मास त्यांनीं स्थान दिलें. त्यांनीं आपल्या आग्रहीपणाचें कर्तव्यक्षेत्र आपलाच समाज ठेवला होता. आपल्या क्षेत्रांत दुसऱ्या देवाच्या याजकास फिरकूं द्यावयाचें नाहीं व दुसऱ्या लोकांच्या उपासनापद्धतींत आपण ढवळाढवळ करावयाची नाहीं किंबहुना आपला देव तो आपलाच आहे इतरांचा नाहीं अशी त्यांनीं वृत्ति ठेवली. तथापि त्यांनीं आपल्या आग्रही विचाराचें जें लोण ख्रिस्ती समाजास आणि आरबांस दिलें तें जगास अजून उपद्रवकारक होत आहे असें म्हटल्याशिवाय राहावत नाहीं.

### ३०४. आर्यन् लोकांचें समाजशास्त्र द्राविड-संबंधापूर्वींच तयार झालें ?

३०४. आर्यन् आणि द्राविड यांचा एकमेकांशीं संबंध येण्यापूर्वींच त्याप्रमाणेंच आर्यन् लोकांच्या निरनिराळ्या काळीं हिंदुस्थानांत आलेल्या जातींना व सामाजिक वर्गांना एकमेकांशीं संबंधाविषयीं नियम करावे लागले असणें शक्य आहे.

वैदिक सूक्तांच्या रचनेचा काल संपण्यापूर्वींच महत्त्वाचे सामाजिक प्रश्न उत्पन्न होण्यास व त्यावर वाङ्मय उत्पन्न होण्यास प्रारंभ झाला. भारतीय समाजामध्यें आपले सामाजिक प्रश्न सोडविण्यास व त्यांवर वाङ्मय उत्पन्न करण्यास सुरवात एकाच वेळेला झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेव्हां जेव्हां जो सामाजिक प्रश्न उत्पन्न होई तेव्हां तेव्हां तो सोडविण्याचाहि प्रयत्न होई व त्यामुळें जे विचार उत्पन्न होत त्यांस ग्रंथांत स्थान मिळे. यामुळें भारतीयांच्या सामाजिक प्रश्न सोडविण्यास लागणाऱ्या व्यावहारिक समाजशास्त्रास आणि ग्रांथिक समाजशास्त्रास एकाच वेळीं प्रारंभ झाला असें म्हटलें पाहिजे.

भारतीयांचें मुख्य सामाजिक शास्त्र म्हणजे धर्मशास्त्र होय. भारतीयांच्या सामाजिक क्रियांच्या योग्यायोग्यतेविषयीं कल्पना याच शास्त्रांत आहेत. आतां धर्मशास्त्र हें ज्याअर्थी वेद इतिहास-पुराणें यांचा आश्रय करतें, त्याअर्थी समाजशास्त्राला देखील तें सर्व वाङ्मय उपयोगी पडणार आहे व यासाठीं भारतीयांच्या समाजशास्त्रीय कल्पनांचें अवगमन होण्यास प्रथम धर्मशास्त्रग्रंथांचें आणि नंतर त्यास उपबृंहक होणाऱ्या इतर ग्रंथांचें अवगमन केलें पाहिजे. तथापि त्याबरोबर हेंहि सांगून ठेवलें पाहिजे कीं भारतीयांच्या समाजशासनाच्या प्रयत्नांचा इतिहास द्यावयाचा म्हणजे केवळ धर्मशास्त्रें आणि वेदविद्या यांत दृष्ट होणारा इतिहास देऊन कार्य पुरें व्हावयाचें नाहीं; तो इतिहास केवळ ब्राह्मणी प्रयत्नाचा होय. तथापि तो प्रयत्न अत्यंत महत्वाचा होता यांत शंका नाहीं. हिंदुस्थानांतील राजन्यवर्गानें या बाबतींत चांगलासा प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं. त्या काळचें ब्राह्मणी नाहीं असें वाङ्मय म्हटलें म्हणजे बौद्ध-वाङ्मय; तें उत्तरकालीन आहे, आणि तें समाजघटनानिर्णायक क्रियांच्या स्पष्टीकरणास फारसें उपयुक्त नाहीं. शासनशास्त्र-विषयक जे ग्रंथ झाले आहेत त्यांत देखील ब्राह्मणांचें महत्व दिसून येतें. शासनशास्त्रविषयक जो अत्यंत महत्वाचा ग्रंथ आहे तो तर ब्राह्मणाचा म्हणजे चाणक्याचा होय. शुक्रनीतीमध्यें धर्मशास्त्रांतील अनेक मतांविरुद्ध बंड आहे. उदाहरणार्थ, न्यायासनावर ब्राह्मणांनींच बसावें ही जी धर्मशास्त्राची मागणी आहे तीविरुद्ध शुक्रनीति क्षत्रियांचा अधिकार सांगत आहे. शासनशास्त्रविषयक स्वतंत्र विचार व्यक्त करणारें क्षत्रिय वाङ्मय फारसें अस्तित्वांत नाहीं. जें आहे तें केवळ ब्राह्मणी वाङ्मयाच्या मागणींत थोडा बहुत बदल करूं इच्छिणारें आहे. सामान्य जनतेचें कामचलाऊ धर्मशास्त्र समाजनिरीक्षणानेंच काढलें पाहिजे.

### ३०५. समाजास प्राचीन वाङ्मयाचें समाज-नियंत्रणाच्या दृष्टीनें महत्त्व.

३०५. समाजानें कसें चालावें याविषयीं जेव्हां विचार होऊं लागला तेव्हां प्राचीन वाङ्मयाकडे धांव घेण्यांत येऊं लागली आणि वेद हें धर्माचें आदिस्थान आहे अशी मांडणी होऊं लागली; तथापि ब्राह्मणांनीं इतरांच्या प्राचीन साहित्याकडे दुर्लक्ष केलें नाहीं; उलट त्यांचें संग्रहण, संस्कृतीकरण व अभ्यास हीं केलीं; त्यामुळें ब्राह्मणविद्येचें गौरवच स्थापन झालें. वेदांचा धर्मशास्त्रापासून निराळेपणा सांगणारी मनुस्मृति ('श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः') देखील वेदांसच आद्यस्थान देती झाली. वेदांस समाजनियमनाच्या बाबतींत आद्यस्थान लोकांनीं दिलें यास कारण असें होतें कीं, जुनी परंपरा ज्यांत शब्दरूपानें अवतार पावली आहे असें दुसरें वाङ्मयच नव्हतें. आणि तें नसल्यामुळें नाखुषीनें वेदांस प्राधान्य द्यावें लागलें.

चारहि वेद संपल्यानंतरचा काल जर आपण घेतला तर आपणांस असें दिसून येईल कीं, चारहि वेदांच्या संहिता तयार होण्यापूर्वींच भारतीय समाजशास्त्राचे अत्यंत बिकट प्रश्न अगोदरच सोडविले गेले आहेत, आणि हिंदुसमाजाची



चित्रांक ६२. भरहुतच्या प्रसेनजित् स्तंभा
वरील उठावदार खोदकाम.
वरचा लेख. भगवतो संकमुनिनो बोधो.
खालचा लेख. राजा प्रसेनजि कोसलो
काल ख्रि. पू. १५०-१००.



चित्रांक ६१.
घारापुरी येथील एक द्वारपाल चित्र.
एका खुजा माणसाच्या चित्रासहित.



चित्रांक ६३. ( १ ) घारापुरींतील देखावा. मुख्य शिवालयाचे द्वारपाल. भव्य मूर्ति. शिल्पाचा
नमुना. येथील स्तंभशीर्षकाची कल्पना पावसाळ्यांत उगवणाऱ्या
छत्री वरून घेतली आहे कीं काय असा भास होतो.
मुकुटांचे नमुनेदेखील लक्षांत घेण्यासारखे आहेत.

रचना निश्चित स्वरूपावर आलेली आहे. ही रचना अनेक शतकें पुढें टिकली व तींत म्हणण्यासारखा समाजघटनेंत बदल पुढें झाला नाहीं. जर आपणांस भारतीयांची खरी समाजशास्त्रीय विद्या पहावयाची असेल तर ज्या काळांत वैदिक वाङ्मय तयार होत होतें व जमत होतें, त्या काळाकडे-सच संशोधक दृष्टीनें पाहिलें पाहिजे. वेदोत्तर काळांतील सामाजिक इतिहास हा वैदिक कालांत जीं सामाजिक तत्त्वें शिरलीं त्यांच्याच विस्तरणाचा इतिहास आहे. वैदिक कालांत ज्या सामाजिक क्रिया झाल्या त्या मुख्यतः येणेंप्रमाणें:—

( १ ) अनेक भिन्न संस्कृतींच्या समाजांचें एकीकरण करून एक सामान्य संस्कृति तयार करणें ( २ ) आणि त्या संस्कृती-खालीं अनेक समाज येऊं शकतील आणि समाजविस्तारक क्रिया शक्य होईल असें समाजांचें व त्यांच्या संस्कृतीचें स्वरूप बनविणें.

## ३०६. हिंदुसमाजविस्तारक पद्धतीचें बलाबल.

३०६. हिंदूंच्या समाजशास्त्रामध्यें ज्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टी आहेत त्यांमध्यें त्यांची समाजविस्तारक पद्धति अधिक यशस्वी होती ही एक महत्वाची गोष्ट आहे. जगांत पूर्वी लहान लहान समाज चोहोंकडे होते तथापि त्या लहान समाजांस एकत्व आणणाऱ्या कांहीं क्रिया झाल्या; त्या क्रियांमध्यें राष्ट्रें तयार करणें व अनेकजनव्यापी संप्रदाय तयार करणें या क्रिया येतात. ख्रिस्त व महंमद यांच्या अनुयायांनीं अनेक लोकांत जें सादृश्य उत्पन्न केलें, तें संप्रदायसंवर्धनाच्या क्रियेनें केलें. हिंदूंनीं अनेकजनव्यापि संप्रदाय उत्पन्न केला नाहीं असें नाहीं. त्यांनीं बौद्ध संप्रदाय उत्पन्न केला पण तो हिंदुस्थानांत यश पावला नाहीं, त्यास अन्यत्र यश आलें. तथापि अनेकजन-व्यापि संस्कृति निर्माण करून त्या संस्कृतीचें आवरण अनेक लोकांवर पसरवून त्यांना एक स्वरूप आणण्याची क्रिया हिंदूंनीं केलीच. जगास आत्मसदृश करण्याच्या क्रियेंत हिंदूं-इतकें यश कोणासच आलें नाहीं असें म्हटलें तर एका दृष्टीनें बरोबर होईल. वीस कोटी हिंदु प्रजेस एका संस्कृति–छत्रा-खालीं आणणें आणि त्या संस्कृतींत जो एक संप्रदाय उत्पन्न झाला त्याच्या छत्राखालीं आणखी तीस–चाळीस कोटी लोक आणणें ही क्रिया करणाऱ्या लोकांचें समाजशास्त्र जगांतील सर्व लोकांच्या समाजशास्त्रापेक्षां श्रेष्ठ प्रतीचें समाजशास्त्र होय असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं.

ऐतिहासिक समर्थन किंवा आक्षेप उत्पन्न करणारानें त्याचप्रमाणें व्यापक सुधारणा करूं इच्छिणारानें जगांतील यशस्वी समाजशास्त्रांचें बलाबल पाहिलें पाहिजे. व्यापकतेच्या दृष्टीनें जें समाजशास्त्र अत्यंत बलवान् ठरलें तेंच समाजशास्त्र दाढर्याच्या दृष्टीनें अगदीं दुर्बल ठरलें आहे हें देखील त्याबरोबरच कबूल केलें पाहिजे. आणि कांहीं अंशीं अत्यंत व्यापकपणामुळें सामाजिक दृढीकरण कठीण होत गेलें. अत्यंत भिन्न समाज एका छत्राखालीं आणल्यामुळें आणि तो देखील सक्तीनें न आणतां खुशीनें आणला गेल्यामुळें जो अत्यंत भिन्नस्वरूपी लोकांचा समुच्चय बनला आहे तो संघटित कार्य करण्यास असमर्थ झाला आहे अशीहि भीति आज पुष्कळांना वाटूं लागली आहे. तथापि आपलें स्वतंत्र समाजविस्तारक तत्त्वज्ञान आणि व्यवहारपद्धति निर्माण करणारा हिंदुसमाज आपल्या सामाजिक दृढीकरणाचा प्रश्न आपल्या तऱ्हेनेंच सोडवील आणि आपल्या समाजामध्यें दृढीकरणाची क्रिया उत्पन्न करील यांत शंका नाहीं.

## ३०७. वैदिक कालांतच झालेल्या समाजसंघटनात्मक आणि विस्तारक गोष्टी.

३०७. हिंदूंची अनेकजनव्यापी समाज तयार करण्याची पद्धति आपण तपासूं लागलों तर आपण आश्चर्यानें थक्क होतों. परिजनग्राहकत्व हिंदूंत नाहीं म्हणून बोभाटा आहे तथापि डोळे उघडून पहातां हिंदूंत चांगल्या प्रमाणांत आहे असें दिसून येतें. हिंदूंमध्यें अनेक मानववंशांतील लोक आहेत. बंगाल मधील हिंदूंमध्यें आर्यन रक्ताच्या जाती फारच थोड्या आहेत व द्राविड व मंगोलियन रक्त बरेंच आहे असें दिसून येतें. तसेंच शिवपूजा व ब्राह्मणादर हीं हिंदूंचीं लक्षणें धरलीं तर सयाममध्यें व पलीकडेहि बरेच लोक हिंदु आहेत ही गोष्टहि नजरेस येते. तर हा इतका समाज कोणत्या कारणांनीं सदृश झाला हें पाहिलें पाहिजे.

वेदकालांत समाजविस्तारक ज्या क्रिया केल्या किंवा झाल्या त्यांची येणेंप्रमाणें गोषवारता येतील.–( १ ) जिंकणाऱ्या राजानें जितांच्या आचार्यांस आपले आचार्य बनविणें. ( २ ) जुन्या कथांस देश्य लोकांच्या पूर्वजांशीं संबद्ध करून आपला धर्म त्यांच्याच पूर्वजांचा होता असें भासविणें. ( ३ ) व्रात्यस्तोमासारख्या विधींनीं, "निषादस्थपतिं यजेत्" यासारख्या विधिवाक्यांनीं, यजनविशिष्ट धर्मास यजनकर्माच्या बाहेरील मंडळीस लायक करणें. ( ४ ) निरनिराळ्या परकीय राष्ट्रजातींस, ते एखाद्या ऋषीच्या द्वाड मुलांचे वंशज आहेत म्हणून काल्पनिक इतिहास त्यांना चिकटवणें. ( ५ ) स्थानिक दैवतें, वाङ्मय यांचा स्वीकार करणें. ( ६ ) व ही नवस्वीकाराची क्रिया नवीन उत्पन्न झालेल्या व पाखंडी समजल्या जाणाऱ्या संप्रदायाकडून होणें.

अनेकजनव्यापी समाज तयार करण्याची क्रिया ऋग्वेदांतील अत्यंत प्राचीन मंत्रांच्या कालापासूनच दृष्टीस पडते. वैदिक मंत्र ज्या लोकांत उत्पन्न झाले ते मांत्र लोक म्हटले म्हणजे दिवोदास व सुदास यांच्याबरोबर आलेले भरत लोक आणि सतलज नदीपर्यंत वसाहत केलेले देश्य लोक होत. या इतक्या लोकांमध्यें यज्ञपद्धति दिसून येते. तथापि त्यांत देखील बरेच फरक दृष्टीस पडतात. दिवोदासाची एक पद्धति अशी दिसत होती कीं, जो प्रदेश जिंकावयाचा असेल त्या प्रदेशांतील राजाचे गुरू ते आपले गुरू करावयाचे. जित व जेते यांचा मिलाफ करून एक समाज करण्याची ही अगदीं जुनी पद्धति असावी असें दिसतें.

मांत्र कालांतच एक मोठी सामाजिक क्रिया झालेली दिसते. जेव्हां वैदिक वाङ्मय प्रसवतच होतें तेव्हां देश्य आर्यन् लोकांस मांत्र संस्कृतीच्या आर्यन् लोकांनीं पूर्णपणें आत्मसात केलें व त्यांच्यांतीलच अनेक संस्कृत्यंगें घेऊन दोन्ही संस्कृतींची एक संस्कृति बनविली. ऋग्वेदामध्यें लिंगपूजकांचा "हे शिश्नास देव समजणारे" म्हणून उपहास केला आहे तर यजुर्वेदांतील अनेक संहितांत देश्य लोकांच्या देवांचा सत्कार केला आहे. पार्वती, षडानन, गणपति इतक्यांसह शिवदैवत स्वीकारलें आहे. तसेंच यज्ञसंस्थेंत प्राचीन वीरकथांस स्थान देऊन एकंदर सूतवाङ्मयाचा सत्कार केला आहे. तसाच नाग व सर्प यांचा देखील "वेद" मान्य केला आहे.

अगदीं प्राचीन सूतवाङ्मय कोणत्या भाषेंत होतें हें सांगतां येत नाहीं. वैदिक भाषा ही एक तऱ्हेची प्राकृत भाषाच होती. तशीच अगदीं प्राचीन सूतवाङ्मयाची भाषा देखील एक तऱ्हेची प्राकृत असणें शक्य आहे. पाणिनीय संस्कृत हें ब्राह्मणें व उपनिषदें यांच्या संस्कृत भाषेशीं मिळतें आहे. सूतसंस्कृतीचें आद्यवाङ्मय पाणिनीय संस्कृत भाषेंत असेल, असें संभवत नाहीं. तें कोणत्या तरी महाराष्ट्रीसदृश प्राकृत भाषेंत असेल. त्या सूतवाङ्मयावर जी ब्राह्मणी छटा पडली तीवरून असें दिसून येतें कीं, सर्व सूतवाङ्मयाची इतिहासपुराणें म्हणून जी आवृत्ति झाली त्या आवृत्तीमध्यें दोन क्रिया झाल्या; त्या क्रिया म्हटल्या म्हणजे तें वाङ्मय संस्कृत भाषेंत आणणें, तें वाङ्मय वैदिक संस्कृतीशीं संबद्ध करणें आणि त्या वाङ्मयांत ब्राह्मणाचें महत्त्व बिंबविणें. हें वाङ्मय तयार करतांना ब्राह्मणांनीं स्थानिक उपासना व विचारपद्धति ही आपली केली आणि व्यवस्थित केली. वेदांच्या संहिता झाल्या त्यावेळेसच वेदभाषा समजेनाशी झाली होती हें ज्या मंत्रांचा अर्थ विनियोगाला अनुकूल नाहीं पण ज्या मंत्रांचा केवळ नाद विशिष्ट विनियोगाशीं सदृश दिसतो असे मंत्र यजुर्वेद संहितेंत आहेत. मंत्रांच्या विशिष्टस्थानीय अस्तित्वावरून हेतु स्पष्ट होत आहे. "हे कोंबड्या तूं गोड आवाजाचा आहेस" अशा अर्थाचा मंत्र ("कुक्कुटोसि मधुजिव्ह") कुटण्याकडे लावला आहे. यावरून त्यावेळेस वेदभाषा लोकांस अपरिचित झाली होती असें दिसून येतें. या मंत्राची भाषा ज्यांस पाणिनीय संस्कृत येत असेल अशा लोकांस न समजण्याइतकी गूढ नाहीं, तथापि तसले मंत्र याज्ञवल्क्याच्या कालांत लोकांस न समजण्याइतकी सामान्य लोकांची भाषा निराळी असावी. "कुक्कुटोसि मधुजिव्ह" या एका मंत्रावरून लोकांची भाषा निराळी होती असा निर्णय काढण्याचें धैर्य आम्हांस होतें. याचें कारण असें आहे कीं, हा कुटण्यासाठीं घातलेला मंत्र या संहितेंत नवीन आहे. याज्ञवल्क्य हा यज्ञविषयक नवीन संप्रदाय काढणारा तर त्यास विशेष जपून वागावयास हवें होतें. त्यास श्रौती आपली ही चूक बाहेर काढील अशी भीति यत्किंचितहि न वाटण्यास कारण होतें. आपली चूक सामान्यास समजणार नाहीं, याज्ञिक तेवढे समजतील, पण त्यांना बिचकण्याचें कारण नाहीं; कारण नवे याज्ञिक आपल्या तर्फेचे आणि जुन्या याज्ञिकांस ते मत्सरी व ते आम्हांस विनाकारण नांवें ठेवतात अशी बतावणी आपणांस सहज करतां येईल असें याज्ञवल्क्यास वाटत असलें पाहिजे.

### ३०८. व्रात्यस्तोमांनीं परकीयांस सदृश करणेची कृति.

३०८. परकीयांस स्वसदृश करावें आणि त्यांस आपल्या समाजाचें सदस्य करावें म्हणून जी चळवळ झाली तींत व्रात्यस्तोमास महत्वाचें स्थान दिलें पाहिजे. हा विधि कीटकांत उत्पन्न झाला. तेथील लोक मांत्र संस्कृतीच्या लोकांपेक्षां भिन्न होते. हे शक असावेत आणि त्यांचे उपाध्याय मग असावेत. या कीटकांतील मगंद ( मगांस धन देणारे ) लोक "इंद्रा तुला पायस देत नाहींत तर त्यांचें धन लुटून तूं आम्हांला दे" अशी प्रार्थना विश्वामित्र करता झाला. त्याच मगधांतील लोकांस उभें जाळावें म्हणून आदेश यजुर्वेदांतील पुरुषमेधाचा विधि करतो, तर अथर्ववेदांत या मगधांतील व्रात्यांचा सत्कार करा, तर तेहि ब्रह्म आहेत असें सांगणारीं सूक्तें आणि त्यांना चातुर्वर्ण्यांत स्थान मिळावें असा प्रयत्न दिसत आहे. व्रात्यस्तोमाचा विधि तांड्यब्राह्मणांत लाट्यायनसूत्रांत आलेला आहे. त्या विधींत व्रात्यांचे जुने कपडे काढून त्यांस आर्यांचे कपडे देण्याचा विधि आहे. व्रात्यस्तोम झाला म्हणजे व्रात्य याची त्याच्या पूर्वीच्या समाजांत जी

पदवी असेल त्याप्रमाणें त्याचें स्थान नवीन समाजांत उत्पन्न होई. अर्थात् प्राचीनांच्या स्वसमाजविस्ताराच्या पद्धतींत व्रात्यस्तोम हा महत्त्वाचें स्थान असलेला विधि होता. या विधींत देखील अनेक कुटुंबें एकदम यजनयोग्य करावींत अशी पद्धति दिलेली आहे. अनेक कुटुंबांना व्रात्यस्तोमाचा संस्कार एकदम करण्यांत नवीन आलेल्या लोकांना लग्नाची वगैरे अडचण पडूं नये हा हेतु असावा. ज्यांना आगापिछा फारसा नाहीं असेच लोक परकीयांशीं लग्नें करावयास तयार होतात. तर एकेक समाज स्वीकृत न करतां समूह समाजस्वीकृत करावेत ही पद्धत ब्राह्मणांनीं उचललेली दिसते.

### ३०९ अन्य जनांच्या सदृशीकरणाची क्रिया मोठ्या प्रमाणावर करण्याची पद्धति.

३०९ इतरांस आपल्यासारखें करून आपल्या शास्त्रांत त्यांचा अंतर्भाव करून घ्यावयाची क्रिया ब्राह्मण करीत. तींत दोन वैशिष्ट्यें होतीं. एक वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे ते मोठ्या प्रमाणावर करीत आणि दुसरें वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे जातींचा मूल आयुष्यक्रम न बिघडवितां करीत.

स दृ शी क र ण आ णि खो टा इ ति हा स.

आर्यन् लोकांना हिंदुस्थानांत अनेक असंस्कृत जाती आढळल्या. त्या जातीविषयीं नवीन आलेल्या आर्यन् लोकांस असलेली जुगुप्सा काढावयाची होती व त्याचप्रमाणें या देश्य जातीचा वैदिक परंपरेशीं संबंध चिकटवावयाचा होता या क्रिया करण्याकडे दुर्लक्ष झालें नाहीं. त्यादेखील इतर विकासाबरोबर चालू होत्या. हें काम कांहीं अंशीं काल्पनिक कथांनीं केलें. आंध्रादि कांहीं जातींना ब्राह्मण ग्रंथांतून विश्वामित्रपुत्र केलेलें आहे. या प्रकारच्या काल्पनिक इतिहासाकडे लक्ष गेल्यामुळें रमेशचंद्र दत्तासारख्या भोळसर लेखकास प्राचीन ग्रंथकारांच्या इतिहासाभिज्ञतेच्या अभावावर टोला मारण्याची हुक्की वारंवार येत आहे; पण खरोखर पाहिलें असतां या काल्पनिक कथांनीं समाजाच्या एकीकरणाचें काम बरेंच केलें. म्हणजे इतिहास या दृष्टीनें ती कथा जरी 'चुकली' होती तरी समाजशास्त्रीय प्रयत्नाच्या दृष्टीनें त्या कथेसारखीं स्पष्टीकरणें 'बरोबर'च होत.

ऋ त्वि ग्व र्गां त इ त रां चा प्र वे श.

नवीन लोकांस आपणांमध्यें समाविष्ट करण्याची जी क्रिया झाली ती आपण सूक्ष्मपणें पाहूं गेलों असतां ती त्या वेळच्या पाखंडी लोकांकडून थोडीशी अधिक झाली असें दिसेल. वेदकालांतील जबर पाखंडी म्हटले म्हणजे याज्ञवल्क्य व त्याचे अनुयायी शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण होत. हे त्यावेळचे आर्यसमाजी होत असें म्हटल्यास हरकत नाहीं. याज्ञवल्क्यानें नवीन संप्रदाय स्थापन केला व त्यांत अनेक असे अनुयायी मिळविले कीं ज्यांना आपली आईच ठाऊक आहे आणि बाप ठाऊक नाहीं. त्या मंडळीचे वंशज पुढें ब्राह्मण झालेच पण त्यांचा प्रवेश जुन्या ब्राह्मणांत विवाहदृष्टया कधीं झालाच नाहीं (वेदविद्या पृ. २२०). जुन्या जातीं प्रवेशाची अवश्यकता त्यांच्यामध्यें बाप ठाऊक नसलेली मंडळी असल्यामुळें झाली असें मात्र नाहीं. कारण तसली मंडळी शुक्ल यजुर्वेद्यांत शिरली आणि ऋग्वेद्यांत शिरली नाहीं असें नाहीं. ऋग्वेद्यांत देखील "क्षेत्रप्रधान" आचार्य होतेच. खुद्द ऋग्वेद्यांचा जो ब्राह्मणग्रंथ शिल्लक आहे त्याचा कर्ता "ऐतरेय" म्हणजे "इतरेचा मुलगा" आहे. याज्ञवल्क्याच्या अनुयायांस जें निराळेपण आलें तें लेकवळे आपल्यांत समाविष्ट केल्यानें आलें असें नाहीं, तर तें त्यांच्या मतामुळें, यज्ञविषयक भिक्षुकीच्या भांडणांमुळें, याज्ञवल्क्याच्या एकंदर दंडेली स्वभावामुळें आणि देश्य संस्कृतीविषयीं आणि शूद्रांविषयीं जी त्यांनीं उदार वृत्ति ठेवली तीमुळें आलें. यज्ञसंस्था जोंपर्यंत जिवंत होती तोंपर्यंत ऋत्विजांच्या वर्गांत नवीन लोक शिरतच होते. केवळ बुद्धीच्या योगानें उपजीविका करणाऱ्या लोकांमध्यें जो वर्ग शिरावयाचा तो जमीनदार किंवा घरंदाज लोकांचा वर्ग थोडाच शिरतो? तो हुशार पण दरिद्री असा वर्ग शिरावयाचा आणि त्यामुळें ज्या लोकांना वडिलोपार्जित द्रव्याचा अंश लेकवळेपणामुळें मिळाला नसेल अशा मंडळींतल्या कांहीं व्यक्ती ऋत्विजाच्या धंद्याकडे वळल्या असल्या तर नवल नाहीं. अनेक जैन साधू व ग्रंथकार ब्राह्मण विधवांचीं मुलें आहेत. ऋग्वेदी मंडळीच्या मनांत असल्या लेकवळ्यांना ऋत्विजाचें शिक्षण देऊन ऋत्विज म्हणून स्वीकारण्यास संकोच उत्पन्न होऊं नये म्हणून त्या प्रकारच्या प्रजेचें समर्थन करण्यासाठीं ऐतरेयानें कवष ऐलूषाची कथा सांगितली आहे (ऐ. ब्रा. २—११; वेदविद्या पृ. २३७ पहा)

स र्व लो क व्या पी च ळ व ळ आ णि आ चा र्य- व र्गां ती ल द्वै ता चा ना श.

सर्वलोकव्यापी सांस्कृतिक चळवळ सुरू करण्यापूर्वीं जो चळवळ करणारा वर्ग असेल त्यांतील द्वैतें नाहींशीं होऊन एक सामान्य संस्कृतीचा वर्ग तयार होण्याची क्रिया व्हावी लागते. ती क्रिया जर झाली नाहीं तर जी संस्कृति पसरवावयाची ती संस्कृतीच उदार होणार नाहीं. वेदकालाच्या अगदीं प्रारंभींच्या भागांत ही अडचण होतीच, पण ती

अडचण प्राचीनांनीं सोडविली. वदिक धर्म अगदीं बाल्यावस्थेंत होता तेव्हां यज्ञसंस्था अशी स्थापन झाली नव्हती. प्रत्येक कुटुंबांत कांहीं स्तोत्रें होतीं तर त्या स्तोत्राचें एकीकरण होणें आणि निरनिराळे याजकांचे संप्रदाय असणें या क्रिया समाजविस्तारास बाधक होत्या. वैदिक कुलांचा असा एक धर्म नव्हताच. प्रत्येक कुलाचे मंत्र निराळे, दैवतें निराळीं. तर अशा प्रसंगीं धर्माचें एकीकरण होईल तरच तो धर्म प्रसारक्षम होईल. तर धर्माच्या एकीकरणास ज्या क्रिया कारण झाल्या, त्याच क्रिया धर्माच्या प्रसारास कारण झाल्या असें म्हणतां येईल. त्या सर्व क्रियांचें सविस्तर वर्णन 'वेदविद्या' व 'बुद्धपूर्व जग' या विभागांत दिलेंच आहे. तथापि त्यांचें सिंहावलोकन येथें उपयुक्त होईल म्हणून तें देत आहें.

लोकांचे भिन्न आचार व वाङ्मय हीं सर्व एकत्र करून यज्ञसंस्था सर्वसामान्य करण्याचा प्रयत्न प्रथम झाला. मोठमोठे सोमयाग होऊं लागले तेव्हां निरनिराळ्या ठिकाणचे स्थानिक यज्ञसंप्रदाय बंद पडून सर्वसामान्य यज्ञपद्धति निघाली. ती यज्ञपद्धति तयार करतांना पुरोहिताच्या धंद्यांतल्या सर्व लोकांचा संग्रह व्हावा असा प्रयत्न झाला. सर्वांचीं स्तोत्रें एकत्र केलीं गेलीं व मोठमोठ्या संहिता बनल्या. निरनिराळ्या यज्ञसंप्रदायांत जीं ऋत्विजांचीं निरनिराळीं नांवें उत्पन्न झालीं होतीं तीं नांवें कायम ठेवून कांहीं ऋत्विजांस दुसऱ्यांचे साहाय्यक बनविलें. त्रैविद्य (ऋग्वेदी, सामवेदी व यजुर्वेदी) व अथर्वे यांच्यांत स्पर्धा असे व अथर्व्यांस नामशेष करण्याचाहि प्रयत्न चालू होता. पण शेवटीं अथर्वे देखील त्रैविद्यांच्या मोठ्या यज्ञांच्या पद्धतींत समाविष्ट झाले व येणेंप्रमाणें सर्वसामान्य वाङ्मय व सर्वसामान्य यज्ञसंस्था हीं तयार झालीं.

सामान्य लोकांचा कर्मलोप आणि त्याचा एकीकरणावर परिणाम.

वेदकालांतच घरोघरचें अग्निहोत्र बंद पडलें, मोठे यज्ञ सुरू झाले आणि सामान्य जनांचें कर्तव्य मोठ्या सुरू असलेल्या यज्ञास पैशांची मदत करावी एवढेंच उरलें. या परिस्थितीचा वाङ्मयविषयक आणि कर्मविषयक एकीकरणाचा परिणाम झाला. तथापि वैयक्तिक कर्मलोपामुळें देखील महत्वाचा परिणाम झाला. कर्मलोपामुळें यज्ञसंस्था असलेले लोक व नसलेले लोक यांत फरक कमी कमी होत चालला व ही गोष्ट सर्व लोकांच्या एकीकरणास कारण झाली. मांत्र व सूत या संस्कृतींच्या म्हणजे जुन्या आर्यन लोकांस व नव्या लोकांस करावयाचें कर्म एकच उरलें. आणि तें म्हटलें म्हणजे पैसा देणें हें होय. या फरकाचा समाजघटनेवर जो मोठा परिणाम झाला त्यांत भाषेवरहि झाला व तो आज दिसून येत आहे. "वर्ण" हा शब्द वैदिक कर्मभेदामुळें म्हणजे यजनभेदामुळें भिन्न दिसणाऱ्या वर्गांना म्हणजे आर्य आणि दास यांना चिकटून न रहातां पुढें लौकिक कर्मभेदामुळें भिन्न दिसणाऱ्या ब्राह्मणक्षत्रियादि वर्गांना लागला.

कर्मलोपाचा "वर्ण" कल्पनेवर परिणाम.

ऋग्वेदाच्या काळांत ब्राह्मणादि चारहि वर्ग होते पण त्यांस वर्ण ही संज्ञा नव्हती. वर्ण हा शब्द आर्य व दास या दोन वर्गांना लावीत असत. कालांतरानें हा शब्द ब्राह्मणादि चार वर्णांना लागूं लागला. तर असा बदल होण्याचें कारण काय? 'वर्ण' या शब्दानें जी कल्पना व्यक्त होत होती ती पालटली कीं काय? शब्दाच्या अर्थांत जें स्थित्यंतर झालें तें समाजामधील कोणत्या स्थित्यंतरामुळें झालें? ज्या लोकांनीं शब्दाचें अर्थांतर केलें त्यांच्या मनांत कांहीं सामाजिक कल्पना होत्या काय? याविषयीं विचार करतां त्यावेळची बदलत जाणारी स्थिति लक्षांत येते. आर्यांचें लक्षण यजनशीलता आणि दासांचें लक्षण म्हटलें म्हणजे त्याचा अभाव. जर केवळ यजनशीलतेमुळेंच दोन प्रकारच्या व्यक्तींत भेद मानावा असें तत्व ठरलें व ग्राह्य झालें तर ज्या वर्गांतील यजनशीलता नाहींशी होत जाईल तो दास वर्ण ठरूं लागेल. पण समाजामध्यें असें स्थित्यंतर होऊं लागलें होतें कीं, चांगल्या लोकांतीलच घरोघरचें अग्निहोत्र नाहींसें होऊन केवळ धंदेवाईकांनीं ऋत्विजाचें कर्म करावें आणि कोणी तरी म्हातारपणीं अग्निहोत्र घ्यावें, व सामान्य लोकांनीं चालू यज्ञांत दक्षिणा दिली म्हणजे त्यांचें कर्तव्य आटोपलें. शिवाय यजन हा जसजसा धंदा होऊं लागला तसतशी निषादस्थपतींस देखील यज्ञविषयक कर्म करण्यास अधिकार देण्याकडे प्रवृत्ति झाली. तेव्हां केवळ यजनकर्मावरून समाजाचे वर्ग पाडणें अयोग्य होऊं लागलें. कारण आर्यन् समाजाचा बहुतेक वर्ग यज्ञ न करणारा आणि चालू यज्ञांत दक्षिणा देऊन आपलें कर्तव्य आटोपलें असें समजणारा आणि निषाद देखील यज्ञ करण्यास अधिकारी; अशा स्थितींत आर्य आणि दास हा फरकच नाहींसा झाला आणि वर्ण हा शब्द निरुपयोगी होऊं लागला. त्याच स्थितींत ब्राह्मणादि वर्गांस समुच्चयवाचक सामान्य शब्द नव्हता. कां कीं यांपैकीं प्रत्येक शब्द समुच्चयवाचक असल्यामुळें कदाचित् सर्वांस लागू पडणाऱ्या वर्गवाचक शब्दाची बराच काळ गरजहि लागली नसावी. वर्ण हा शब्द इतर संहितांतून पुढें येत नाहीं. तर तो एकदम

धर्मशास्त्रांत दृष्टीस पडतो, त्यांनीं हा वैदिक शब्द निराळ्या अर्थानें उपयोगांत आणला.

संहितीकरण पौराहित्य करणाऱ्या जातीचें ऐक्य व राष्ट्रीय संस्कृति.

एवंच वेदांच्या संहितीकरणामुळें आणि त्याबरोबर विकास झालेल्या यज्ञसंस्थेमुळें, आणि यज्ञकर्म धंदेवाईकांच्या हातांत गेल्यामुळें सर्वजनमान्य वाङ्मय तयार झालें. वाङ्मयाचा अभ्यास करून त्यावर उपजीविका करणारी आणि सर्वत्र आपल्या विद्येचें महत्व सांगणारी जात तयार झाली. लोकांतील यजनविषयक भेद नाहींसा झाला व ब्राह्मणांनीं यजन करावें व इतरांनीं ब्राह्मणांकडून यजन करवावें अशी परिस्थिति झाली आणि त्या वाङ्मयांत सूतवाङ्मयासहि स्थान मिळाल्यामुळें राष्ट्रीय संस्कृति तयार झाली.

समाजामध्यें अनेकजनव्यापी संस्कृति तयार करण्याचें काम झालें तरी जो मोठा जनसमूह झाला त्याच्या दृढीकरणाचें काम व्हावयाचें होतें. आणि तें काम पुढें हळू हळू सुरूहि होतें. ब्राह्मण चोहोंकडे पसरले आणि त्यामुळें प्रत्येक ठिकाणीं समाज ब्राह्मणयुक्त झाला. जेथें ब्राह्मण जात तेथें इतर लोकांचें क्षत्रिय, वैश्य, शूद्र या तीन वर्णांत वर्गीकरण करण्याचें आणि त्या प्रकारच्या वर्गीकरणावर पुस्तकें लिहिण्याची क्रिया व्हावयास हवी होती व ती पुढें झालीहि. हें पुढचें काम धर्मशास्त्रांनीं व पुराणांनीं केलें. जेथें ब्राह्मण जात त्यांनीं तेथील राजास क्षत्रिय संस्कार करावेत आणि तेथील राजांस त्या संस्कारांमुळें हिंदुस्थानांतील राजांच्या तोडीचें करावें ही क्रिया चालूच होती. ही क्रिया करतांना त्यांचा प्रसार जर जगभर झाला असता तर जगभर हिंदु समाज स्थापन झाला असता. ही क्रिया नाहीं तरी बराच प्रदेशभर झाली आणि तो प्रदेश म्हटला म्हणजे इराणपासून इंडोचायनापर्यंतचा मुलुख होय. इतक्या व्यापक प्रदेशाचें एकत्व ग्रीकांनीं पाहिलें होतें आणि यासाठीं त्यांनीं गंगा नदी ही हिंदुस्थानची मध्य रेषा धरून गंगेच्या अलीकडचा इंडिया अशी आणि गंगेपलीकडचा इंडिया अशी विभागणी केली होती. अजूनहि त्या भागास इंडो-चायना अथवा फरदर इंडिया म्हणजे 'पलीकडचा हिंदुस्थान' हें नांव आहे.

## ३१०. धर्मशास्त्रकारांचा काल आणि समाजसंस्करण आणि समाजाचें दृढीकरण.

३१०. धर्मशास्त्रकारांचा काल वैदिक वाङ्मयाच्या कालापुढचा होय. धर्मशास्त्रकारांना मोठमोठे प्रश्न सोडवावयाचे नव्हते. ते अगोदरच सुटलेले होते. पौराणिक कल्पना, उपनिषदांतील विचार हीं सर्व स्थापित झालेलीं होतीं आणि या वेळेस समाजामध्यें स्थिर आयुष्यक्रम उत्पन्न झालेला होता. आणि राष्ट्रशासनास उपयोगी असें जरी वाङ्मय त्यांस उत्पन्न करतां आलें नाहीं तरी अव्यवस्थित व अत्यंत भिन्न आयुष्यक्रमांना कांहीं सर्वसामान्य रीतींच्या नियमाखालीं आणण्याची क्रिया चालू होती.

धर्मशास्त्रीकरणामध्यें समाजाचें समाजशास्त्रीय ज्ञान दृष्ट होतें. जो समाज आत्मशासनक्षम असतो त्याची कायदेपद्धति पाहिली म्हणजे त्या समाजाचें समाजशास्त्रीय ज्ञान कितपत उच्च प्रकारचें आहे हें दिसून येतें. राजे लोकांनीं शासननियम करावेत हें तत्त्व फार उशीरा जगांत मान्य झालें आहे. जेव्हां नवीन नियम करण्याचा कोणास अखत्यारच नाहीं, जसा धर्म किंवा "लॉ" असेल तसाच अमलांत आणणें राजाचें कर्तव्य असेल तेव्हां धर्मशास्त्रांत सुधारणा करीत जाणें हें लेखकांवरच पडतें. या दृष्टीनें धर्मशास्त्रकारांचें समाजांत महत्व असतें. भारतीयांच्या समाजशास्त्रीय ज्ञानाची किंमत ठरवावयाची तर हें धर्मशास्त्रच त्यांनीं कसें वाढविलें, त्यांत सुधारणा त्यांनीं कितपत केली हें पाहिलें पाहिजे. आणि या दृष्टीनें भारतीयांच्या धर्मशास्त्रदृष्ट समाजनियमनशास्त्रांत बरींच प्रगतिचिन्हें दिसून येतात. धर्मशास्त्रांकडे समाजशास्त्रदृष्टीनें अवलोकन करूं लागलें असतां असें दिसून येतें कीं, भारतीयांचें धर्मशास्त्रविकासकालीन समाजशास्त्र बरेंच उच्च तऱ्हेचें होतें.

प्रकरण ३५ वें.

# वैदिकेतर धर्म आणि त्याचें संग्रहण.

## ३११ वैदिकधर्म आणि प्रचलित हिंदुधर्म.

३११. वैदिक धर्मांचे जे प्रकार आहेत, त्यापेक्षां प्रचलित हिंदुधर्माचे प्रकार पुष्कळच अधिक आहेत. श्रौतधर्म जवळजवळ अस्तंगत झाला आहे आणि त्याच्या मोठ्या चलतीच्या काळांत देखील श्रौतधर्म हा दैनंदिन आचरला जाणारा धर्म कधींच नव्हता. बृहत्कथेंत श्रौतधर्माचा उल्लेख क्वचितच येतो. स्मार्त धर्म पहातां त्यांत कर्में अनेक दिसतात आणि संस्कार अनेक आहेत. मनुष्याच्या आयुष्यक्रमाला संस्कार चिकटलेच आहेत आणि त्यापैकीं बरेचसे संस्कार ब्राह्मण किंवा शूद्र या सर्वांना सारखेच असावेत.

ज न ते चे विधि आ णि ब्रा ह्म णां चे वि धि.

सामान्य जनतेपासूनच ज्यांचा आरंभ झाला आहे अशा संस्कारांना आपल्या ज्ञातीपुरतें वैशिष्ट्य ब्राह्मण वैदिक मंत्रांची जोड देऊन आणीत. सामान्य जनता जर आपलीं मृत शवें अमंत्रक दहन करीत असतील तर ब्राह्मण समंत्रक दहन करीत एवढेंच; तथापि सामान्य जनतेचे संस्कार अमंत्रक होत असा भाग मुळींच नाहीं. लग्नांत ब्राह्मणांमध्यें जे संस्कार होतात, तेच संस्कार जवळजवळ त्याच स्वरूपांत अनेक जातींत होतात, आणि त्या जातींत मंत्राऐवजीं प्राकृत गाणीं असतात. हीं प्राकृत गाणीं देखील अनेक जुनाट शब्द मिसळलेलीं असतात. त्यावरून त्या गाण्यांचें प्राचीनत्व दिसत आहे. पुष्कळ प्रसंगीं गाणीं इतकीं दुर्बोध झालेलीं असतात कीं, त्यांचा अर्थ काढावयाचा म्हणजे संशोधनच करावें लागेल.

ब्रा ह्म ण आ णि प्रा कृ त मं त्र.

प्राकृत मंत्र आणि प्राकृत गाणीं यांचें अस्तित्व ब्राह्मणांत नाहीं असें नाहीं. तसले मंत्र ब्राम्हणांतहि प्रचलित असतात, व कित्येक मंत्रांत जुन्या आठवणी भरलेल्या असतात. उदाहरणार्थ, "इडा पिडा टळो, बळीचें राज्य येवो" या मंत्रांत दिसणारा बळी कोण हा प्रश्नच आहे. जेवतांना माशी लागूं नये म्हणून तीस चाळीस वर्षांपूर्वी मक्षिकामंत्र म्हणत असत. त्याचे शब्द पुढीलप्रमाणें आहेत. "कांचीकामाक्षी मधुरा मीनाक्षी, धर्मराजभट्ट चांदेकर साक्षी गोविंद" प्रस्तुत शब्दांचा ऐतिहासिक अर्थ आज लोकांस गूढच आहे. * गुजराती ब्राह्मणांमध्यें संस्कृत पांडित्य बेताचेंच असतें. त्यांच्या विशेषतः श्रीमाळी ब्राह्मणांच्या लग्नांत इतर ब्राह्मणांमध्यें होणारे अनेक विधि होतात, पण ते संस्कृत मंत्रांऐवजीं प्राकृत गाणीं म्हणून होतात. महाराष्ट्रीय ब्राह्मणांमध्यें अत्यंत महत्त्वाचा विधि जो "वधूवर दर्शन" हा प्राकृत श्लोकांनींच होतो.

## ३१२. ब्राह्मणी विधींचा अन्यजनविधींत उगम, व त्यांशीं वैदिक मंत्रांची सांगड.

३१२. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे ब्राह्मणी आचारधर्मांपैकीं बराचसा भाग प्रचलित सामान्यांचा धर्मापासूनच घेतला असल्यामुळें आणि त्याचा संबंध संस्कृत मंत्रांशीं मागाहून जोडला असल्यामुळें मंत्र आणि तंत्र यांच्यामध्यें कृत्रिम संबंध उत्पन्न झाला आहे. जे धार्मिक प्रकार आपणांस श्रौतधर्मात किंवा स्मार्तधर्मात किंबहुना ग्रांथिक पौराणिक धर्मात सांपडत नाहींत असे अनेक प्रकार आज महाराष्ट्रांत प्रचलित आहेत. त्यांचें स्वरूप प्राचीन आसुरी धर्मात सांपडतें. भुतें काढणारे पंचाक्षरी पौराणिकधर्मात देखील विहित नाहींत. पौराणिकधर्मांत भुतांची पूजा देखील विहित नाहीं, व क्षुद्र देवतांची पूजा नाहींशी करून विष्णूसारख्याच एका थोर देवाची किंवा त्याच्या अवतारांची पूजा स्थापन करावयाचा प्रयत्न झालेला आहे. भागवतादि पुराणें ज्याप्रमाणें वैदिक ब्राह्मणांच्या कर्मठपणाचा उपहास करीत आहेत, त्याप्रमाणेंच जाखाई जोखाई सारख्या देवतांच्या उपासनेपासून परावृत्त करूं पहात आहेत. मुरळ्या, देवदासी इत्यादि प्रकार प्रचारांत आहेत ते पौराणिक धर्मात देखील विहित नाहींत; तथापि तसले प्रकार आपणांस प्राचीन आसुरी धर्मांत दृष्टीस पडतात. प्रचलित धर्माची आणि प्राचीन असुरांच्या धर्माची तुलना केली असतां अनेक सादृश्यें आपणांस दिसून येतात.

---

* या शब्दाचें स्पष्टीकरण गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर यांच्या **तीर्थयात्राप्रबंध** नामक पुस्तकांत दिलें आहे. सध्यां लेखकास पुस्तक अनुपलब्ध झाल्यामुळें त्या स्पष्टीकरणाचें अवतरण येथें केलें नाहीं.

वैदिक काळापासून चालुक्यपूर्व कालाकडे आपण नजर फेंकली असतां आपणांस एक धार्मिक विकास दृष्टीस पडतो. हा धार्मिक विकास होण्यास कारण झालेली ब्राह्मणविद्या विशेषेंकरून देशांत असलेल्या भिन्न संस्कृति, भिन्न उपासना, भिन्न संप्रदाय, भिन्न परमार्थसाधनें यांचें एकीकरण करून त्यांमध्यें अन्योन्याश्रय आणि परस्परयुक्तता उत्पन्न करण्याकडे खर्ची पडली आहे. श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्मांची जी सांगड घालण्यांत आली तींत समाजांतील विचारवंतांचें बरेंच कौशल्य खर्च झालें आणि त्यामुळें श्रौतधर्म, स्मार्तधर्म, पौराणिकधर्म आणि कांहीं अंशीं मंत्रतंत्रधर्म हा सर्व आपल्याच एकस्वरूपी पैतृकधर्माचा भाग आहे कल्पना लोकांच्या हाडींमासीं खिळली आणि सामाजिक विरोध नष्ट झाला. ही क्रिया होण्यास बराच काल लागला आणि त्यामुळें त्या क्रियेंत स्वाभाविकता उत्पन्न झाली.

### ३१३ संशोधकांच्या श्रमणविषक जुन्या कल्पनांचा परिहार.

३१३. श्रौतधर्मामध्यें श्रमणास स्थान नाहीं तथापि स्मार्तधर्मांत म्हणजे सूत्रोक्त धर्मांत त्यास स्थान आहे.

जेथें श्रमणाचें नांव दिसेल तेथें बुद्धोत्तरता कल्पावयाची हा एका काळीं बौद्ध संप्रदायाच्या यूरोपीय अभ्यासकांत रिवाजच पडला होता; पण ती कल्पना इतर यूरोपीय संशोधकांनीं खोडून काढली. पाणिनीस बुद्धोत्तर करण्यासाठीं "कुमारश्रमणादिभिः" हें पाणिनीचें सूत्र मांडलें जात होतें; पण आज श्रमणांचा वर्ग बुद्धाहून फार प्राचीन आहे याविषयीं संशोधकवर्गापैकीं कोणासहि शंका नाहीं.

बुद्धानें श्रमणांचा वर्ग तयार केला अशी कल्पना एका काळीं होती, ती आज नष्ट झाली आहे; एवढेंच नव्हे तर श्रमणांचें प्राचीनत्व बुद्धाच्या मागें हजारों वर्षे नेलें जात आहे.

श्र म णां चें सिं धु सं स्कृ तीं त अ स्ति त्व.

हिंदूंच्या धर्मशास्त्रांतील आश्रमधर्माची कल्पना वेदपूर्वकालीन असावी अशा तऱ्हेची मांडणी रा. ब. रामप्रसाद चंदा यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत* केली आहे. त्यांचें असें म्हणणें आहे सिंधुसंस्कृतिकालीन जे ठसे सांपडले आहेत त्यांत कांहीं ठशांवर श्रमणांचीं चित्रें आहेत आणि ते श्रमणपूजा सुरू झाली होती याचे दर्शक आहेत. गौतमबुद्धाच्या वेळेस ब्राह्मण आणि श्रमण या दोन प्रकारचे पूज्यव्यक्तिसमुदाय होते; त्यांतील श्रमणांचे समुदाय सिंधुसंस्कृतिकालापासून असावेत अशी त्यांची कल्पना आहे. त्या कल्पनेचें पूर्ण परीक्षण येथें करतां येत नाहीं. येथें हें सांगतां येईल कीं धार्मिक किंवा पारमार्थिक दृष्टीनें जे महत्त्वाचे संप्रदाय आहेत त्या संप्रदायांचें अस्तित्व वेदकाळीं त्याप्रमाणेंच वेदपूर्वकाळीं अशक्य नाहीं, आणि उदयनकाळीं किंवा त्याच्या पूर्वींच्या काळीं ज्याप्रकारच्या धार्मिक परिस्थितीचें चित्र बृहत्कथा दाखवीत आहे त्यावरून श्रमणांचा व वानप्रस्थांचा संप्रदाय उदयनपूर्व काळांत चांगला संस्थापित झाला होता असें दिसतें आणि तो वेदपूर्वकाळीं असणें अशक्य दिसत नाहीं.

बृहत्कथेंत ज्या अनेक कथा आल्या आहेत त्यांत पारमार्थिक उपासनेचीं आणि दैवतकल्पनांचीं आणि देवयोनींचीं जीं वैशिष्ट्यें दिसून येतात तीं जाणणें आणि त्याबरोबरच त्या दैवतांशीं संबद्ध जी ब्राह्मणकृति झाली ती समजून घेणें अवश्य आहे.

### ३१४. यक्ष, योगिनी व मातृका.

३१४. ब्राह्मणांनीं योगिनी, मातृका व यक्ष यांचा आपल्या दैवतांत पूर्णपणें समावेश केलाच होता. यांपैकीं योगिनी व मातृका यांना बृहत्कथेंत महत्त्व दिलें आहे, व त्यावरून बुद्धपूर्वकालीं यांचा देवतांत स्वीकार झाला होता हें स्पष्ट आहे.

यक्षांचा स्वामी कुबेर याचा सेनापति मणिभद्र होता. कुबेराचें नांव वैश्रवण व कुबेर या नात्यानें जरी ब्राह्मणांत सांपडतें तरी यक्षाधिपति या नात्यानें त्याचा तेथें उल्लेख नाहीं. यक्षांचें नांव उपनिषदांत आलें आहे; "ब्रह्म" यालाच मोठा यक्ष म्हटलें आहे. प्रस्तुत विधान डॉ. आनंद कुमारस्वामी यांनीं "यक्ष" यावरील ब्रिटानिकाच्या आवृत्तींत केलें आहे; तथापि कोणत्या उपनिषदांत हा उल्लेख आहे हें दिलें नाहीं. कुमारस्वामींनीं यक्षांवर एक पुस्तक लिहिलें आहे व तें स्मिथसोनियन इन्स्टिटयूटनें प्रसिद्ध केलें आहे. शाक्यांचा शाक्यवर्धन नांवाचा एक यक्ष देव होता. कांहीं यक्षांना आरख देवता म्हटलें आहे वगैरे विधानें डॉ. कुमारस्वामी यांनीं केलीं आहेत.

योगिनींची पूजा वेदांत नाहीं. पौराणिक वाङ्मयांत योगिनींचा फारसा उल्लेख नाहीं; तथापि योगिनींचें महत्व एका काळीं बरेंच होतें, व अजूनहि तें अंशेंकरून आहेच.

**तृतीयेचे दिवशीं मिळती चौसष्ट योगिनी हो।**
**सकलांमध्यें श्रेष्ठ, सर्वांमध्यें श्रेष्ठ**
**परशुरामाची जननी हो।**
**उदो बोला उदो, अंबाबाई माउलिचा हो।**

* इंडियन सायन्स कांग्रेस—मानववंशशास्त्रशाखा मुंबई अधिवेशन जानेवारी १९३४.

प्रस्तुत आरतीचें कडवें अनेक दृष्टींनीं विचारणीय आहे. योगिनींचा उल्लेख आजच्याहि आरत्यांत येत आहे आणि चौसष्ट योगिनी अंबाबाईच्या सेवक झाल्या असें दाखविलें आहे. परशुरामाची आई रेणुका हिचें भवानीशीं ऐक्य स्थापन करून तें ऐक्य या आरतीमार्फत घरोघर घोकवलें गेलें आहे. कार्लें येथें असलेली एकवीरा देवी देखील परशुरामाची जननीच बनविली आहे. म्हणजे प्रमुख स्त्रीदेवतांचें भवानीशीं ऐक्य जोडावयाचें आणि स्त्री देवतांचा जो गण असेल त्या गणास मुख्य देवीचें सहायक करावयाचें या क्रिया प्रस्तुत कडव्यांत दिसून येत आहेत. बृहत्कथेंत योगिनींचा भवानीशीं संबंध जोडलेला दिसत नाहीं.

### ३१४. अ. मानुष योगिनी.

३१४ योगिनी देवता होत्या. त्याचप्रमाणें त्या मांत्रिक होत्या. अद्भुत कर्म करणारे मांत्रिक मानवी शरिरांत असले तर त्यांस देवपण येणार आणि ते मेल्यावर तर ते खरोखरच देव बनणार. चौसष्ट योगिनींचें मूळ जादुगारणींत तर नाहींना असा कथासरित्सागरांतील अनेक उल्लेख पाहून संशय येतो.

ब्राह्मणविद्येच्या बाहेरच्या विद्या होत्या त्यांच्या प्रचारकांत शाकिनींची आणि योगिनींची विद्या होती. त्या विद्यांच्या योगानें माणसावर मोहऱ्या टाकून त्याला पशु बनवीत असें वर्णन आहे.* या तऱ्हेची समजूत अजून देखील आहे. वाईट बायका पुष्कळदां मंत्रसाधन करून मंत्रानें मोहऱ्या मंत्रवून ठेवतात आणि नवऱ्यावर टाकून त्याला 'कोंबडा' बनवितात अशा कथा माझ्या लहान वयांत मी ऐकिल्या होत्या, आणि त्या प्रकारचा समज ब्राह्मण किंवा प्रभु यांसारख्या जातींत देखील प्रचलित होता. अशाच तऱ्हेच्या कथा अरेबिअन नाइट्समध्यें अनेक आहेत. याप्रकारची मांत्रिक शक्ति आपल्यामध्यें आहे असें दाखविणाऱ्या स्त्रिया त्या काळीं मगांच्याच होत्या किंवा दुसऱ्या कोणाच्या होत्या हें सांगता येत नाहीं. या स्त्रियांस देखील अवगत असलेल्या विद्यांपैकींच एक "कालसंकर्षिणी" नांवाची विद्या होती. त्या विद्येच्या साहाय्यानें वामदत्त ब्राह्मणाला एक दिव्य खड्ग प्राप्त झालें आणि त्याच्या साहाय्यानें तो विद्याधरेश झाला असें सांगितलें आहे.

शा कि नी व यो गि नी.

चांगलें कृत्य करणाऱ्या स्त्रिया मांत्रिक असत, त्याचप्रमाणें वाईट कृत्यें करणाऱ्याहि असत. दोघांच्या कलेंत किंवा कृतींत विशेष फरक दाखविला नाहीं. वाईट मांत्रिक स्त्रियांस शाकिनी म्हटलें आहे. चांगल्या स्त्रियांना योगिनी म्हटलें आहे. एका वामदत्त ब्राह्मणाची स्त्री शाकिनीच्या साह्यानें बिघडली आणि मांत्रिक बनली, आणि तिनें आपल्या नवऱ्याला रेडा बनविलें. दुसऱ्या एका मांत्रिक स्त्रीनें त्या रेड्याला पाहिलें आणि त्याला रेडेपणापासून सोडवून मनुष्य परत दिलें. आणि पुढें त्याला आपली मुलगी देखील दिली. आणि त्याच्या पहिल्या बायकोस घोडी बनविलें. तिला तो दररोज मार देवून जेवावयास बसे असें दाखविलें आहे. अर्थात् त्या ब्राह्मणास सहायक झालेली मांत्रिक स्त्री शाकिनी नसून 'योगिनी' होती.† असली कथा अरेबियन नाइट्समध्यें आली आहेच.

वाईट असतील त्या शाकिनी हीत तथापि चांगल्या असतील त्या सर्व योगिनी होत्या असें मात्र नाहीं.

शशांकवती लंबकांतील मुख्य नायक जो मृगांकदत्त त्याच्या एका मंत्र्यास एका दुष्ट 'योगिनीनें' त्याच्या गळ्यांत दोरा बांधून मोर बनविलें होतें. ही दुष्ट योगिनी खाटिक होती. हिची मैत्रिण एक खाणावळवाली बाई होती. तिच्याकडे हा मृगांकदत्ताचा मंत्री भीमपराक्रम पाहुणा म्हणून उतरला होता. त्यानें रात्रीं जागा होऊन पाहिलें कीं, दुसऱ्या एका खोलींत त्या स्त्रीनें मंत्र म्हणत मूठभर जव पेरले. कांहीं वेळानें ते उगवले. त्यांना कणसें आलीं. त्यांतील जव स्त्रीनें भाजून दळून त्याचा सातु करून ठेवला. त्यावरून ही शाकिनी आहे असें तो समजला. ती स्त्री बाहेर गेली तेव्हां त्यानें सातूची अदलाबदल केली. परत आल्यानंतर त्या स्त्रीनें ते सातु खाल्ले. तेव्हां तीच बकरी झाली. तिला त्यानें नेऊन खाटकाला विकलें. त्याची बायको 'योगिनी' होती आणि तिनें रागाऊन त्याचा वचपा काढला. तो निजला असतां त्याच्या गळ्यांत दोर बांधून मोर बनविलें. या कथेंत त्या कसायाच्या बायकोला 'योगिनी' असेंच म्हटलें आहे. ‡

### ३१५. अद्भुत कृत्यें आणि वैद्यक.

३१५. विशिष्ट अद्भुत विद्यांच्या अस्तित्वामुळें मनुष्यास देवत्व येतें ही कल्पना कुरुयुद्धोत्तर काळांत प्रधान दिसते आणि यामुळेंच "विद्याधर" या तऱ्हेच्या शब्दाची निर्मिति झाली असावी. अद्भुत कृत्यें करण्याची शक्ति उच्चयोनित्वामुळें उपजत असते असेंच नाहीं तर ती मंत्र, योग आणि आयुर्वेद इत्यादि शास्त्रें यामुळें देखील उत्पन्न होते अशी लोकांची समजूत होती.

---

* शशांकवतो लंबक तरंग १.

† शशांकवती लंबक तरंग १ ला.

‡ तथाभूतस्य मे तत्र तया सौनिकभार्यया
आगत्य दुष्ट योगिन्या गलेऽबध्यत सूत्रकम् (१२-४-२७६)

ना गा र्जुन क था.

अद्भुत कृत्यें करण्याचें श्रेय मांत्रिकांसच होतें असें नाहीं. तर शास्त्रज्ञांसहि मिळे. नागार्जुन नांवाचा एक रसायनज्ञ वैद्य होता आणि त्याचीं अद्भुत कृत्यें करण्याबद्दल प्रसिद्धि होती. पुढें नागार्जुन नांवाचे दोन पुरुष बौद्ध सांप्रदायांत प्रसिद्ध झाले. आणि त्या सर्वांचें दंतकथांत एक कोडबोळें झालें असें दिसतें. वैद्य आणि रसायनज्ञ नागार्जुनाची कथा पुढील प्रमाणें आहे.

मागें चिरायु नामक नगरांत, चिरायु नांवाचा एक चिरायु ( दीर्घायु ) राजा होता. तो राजा सर्व संपत्तींचें जणुं काय घरच होतें. त्याचा नागार्जुन म्हणून एक ज्ञानी, दयाळु व दानशील मंत्री होता. त्याला सर्व औषधींचें यथार्थ ज्ञान असून, त्यानें अनेक रसायनें सिद्ध केलीं होतीं, आणि त्यांच्या योगानें त्यानें आपल्याला व राजाला चिरायु केलें. एकदां त्या मंत्र्यांचा सर्व पुत्रांत अतिशय आवडता असलेला पुत्र मेला. त्यामुळें नागार्जुनाला फार दुःख झालें. त्यानें मनुष्यांच्या मरणदुःखाची शांती व्हावी, म्हणून तप व दान यांच्या प्रभावानें अनेक विचित्र द्रव्यें जमविलीं आणि त्यांतून अमृत काढलें; पण त्यांत एक द्रव्य मिळायाचें राहिलें होतें, त्याच्या योग्य कालाची तो महामंत्री वाट पहात होता. परंतु इतक्यांत इंद्राला तें वर्तमान समजलें. तेव्हां इतर देवांची संमति घेऊन त्यानें अश्विनीकुमारास अशी आज्ञा केली कीं, तुम्हीं भूलोकीं नागार्जुनाकडे जाऊन त्याला असें सांगा, कीं तूं मंत्री असूनही हा काय अन्याय करीत आहेस ? तूं हल्लीं प्रजापतीला जिंकावयास तयार झाला आहेस कीं काय ? कारण,त्यानें मर्त्यांस मरणधर्मयुक्त केलें आहे, व तूं अमृत-रसायन तयार करून त्यांस अमर करण्याची इच्छा करीत आहेस; पण असें झाल्यावर देव व मानव यांमध्यें अंतर कोणतें रहाणार ! यज्ञकर्ते मानव व यज्ञभोक्ते देव यांचा अभाव झाल्यामुळें, जगन्मर्यादा तुटणार नाहीं का ? यास्तव आमच्या सांगण्यास मान देऊन तूं हा अमृतसाधनाचा नाद सोड, नाहींतर देव रागावून तुला खचित शाप देतील. ज्याच्या शोकानें तूं या अघटित कामांत प्रवृत्त झाला आहेस, तो हा तुझा पुत्र स्वर्गलोकीं सुखानें रहात आहे. असा निरोप सांगून इंद्रानें त्या दोघां स्वर्गांतील वैद्यांस भूलोकीं पाठविलें. तेव्हां तेही सत्वर नागार्जुनाकडे आले. त्यांस पाहातांच मंत्री संतुष्ट झाला. त्यानें त्यास अर्घ्य-पाद्य इत्यादि देऊन त्यांचें पूजन केलें. नंतर त्यांनीं नागार्जुनास इंद्राचा निरोप सांगितला. तो ऐकून मंत्री मनांत म्हणला, "मी जर हें देवेंद्राचें म्हणणें अमान्य केलें, तर इतर देव तर दूरच राहिले, पण आतां अगोदर हे दोघे वैद्यच मला शाप देतील. यास्तव अमृताचा नाद सोडावा हें बरें. पूर्वसुकृत कर्मामुळें माझा पुत्र तर उत्तम गतीस प्राप्त झालाच आहे. आतां उगीच आशा करून उपयोग नाहीं. असा पोक्त विचार करून नागार्जुन त्यांस म्हणाला,—बरें आहे. तुमच्या आज्ञेप्रमाणें मी अमृताच्या प्रक्रियेला बंद ठेवतों. तुम्ही जर आणखी पांच दिवस आलां नसतां तर या लोकीं अमृतरस सिद्ध होऊन सर्व पृथ्वी अमर झाली असती."—असें सांगून त्यांच्या समक्ष त्या मंत्र्यानें अगदीं तयार होत आलेला अमृतरस भूमींत पुरून टाकला, तें त्यांचें कृत्य प्रत्यक्ष पाहून व त्याची अनुज्ञा घेऊन अश्विनीकुमार स्वस्थानीं गेले, व झालेला वृत्तांत इंद्राला सांगून सर्व देवांस त्यांनीं आनंदित केलें.

इतक्यांत इकडे नागार्जुनाच्या चिरायु राजानें आपल्या जीवहर पुत्रास यौवराज्याभिषेक केला. तेव्हां राज्याभिषेकामुळें आनंदित झालेला पुत्र आपल्याला नमस्कार करण्याकरितां आला आहे, असें पाहून धनपरा राणी म्हणाली,— "बाळा, हें यौवराज्य मिळालें म्हणून व्यर्थ इतका आनंद कशाला मानतोस ? कारण हा मान तुला केवल कुलक्रमानें मिळाला आहे, तपाच्या प्रभावानें नव्हे. तुझ्या पित्याचे अनेक पुत्र आजपर्यंत युवराज झाले, पण त्यांतील एकालाहि राज्य मिळालें नाहीं. नागार्जुनानें कांहीं रसायन तयार करून राजाला दिलें आहे त्यामुळें तो पुष्कळ दिवस जगला आहे. हल्लीं त्याचें वय आठशें वर्षांचें आहे. आणखी असे किती शेंकडे जातील याचा कांहीं नेम नाहीं."

आपल्या आईचें हें भाषण ऐकून जीवहर खिन्न झाला, पण त्याची दुःखी मुद्रा पाहून धनपरा पुन्हा म्हणाली,— "वत्सा, तुला जर राज्य हवें असेल, तर मी सांगतें तशी युक्ति योज. तो ज्ञानी नागार्जुन प्रत्यहीं आन्हिक कर्में आटोपल्यावर 'येथें कोण याचक आहे ? मी कोणाला काय देऊं ?' असा घोष करितो, व त्यावेळीं जो जें मागतो तें त्याला देतो, आणि त्यानंतर भोजन करतो. यास्तव तूं तेथें जाऊन त्या वृद्ध मंत्र्याचें मस्तक माग. तो सत्यवक्ता आहे, त्यामुळें आपलें मस्तकहि तोडून देईल. आणि या युक्तीनें तो मेला म्हणजे त्याच्या दुःखानें व्याकुल झालेला राजाही प्राण सोडील. अथवा निदान तो वनांत तरी निघून जाईल, मग तूं खरा राजा होशील. यावांचून दुसरा उपाय दिसत नाहीं."

आपल्या आईचें हें घोर भाषण ऐकून जीवहर राजपुत्र संतुष्ट झाला व 'ठीक आहे' असें म्हणून त्यानें त्याप्रमाणें करण्याचा निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं भोजनाच्या वेळीं जीवहर गुप्तपणें मंत्र्याच्या येथें गेला. इतक्यांत नागार्जुनहि आह्निक संपवून 'कोण याचक आहे?' इत्यादि विचारूं लागला. तेव्हां राजपुत्र आंत जाऊन–'मी याचक आहें, मला तुझें शिर दे!' अशी याचना करूं लागला. तेव्हां, 'वत्सा, मोठेंच आश्चर्य आहे. तूं माझ्या मांस, हाडें, व केंस यांनीं भरलेल्या मस्तकाला घेऊन काय करणार? तुला त्याचा काय उपयोग होणार आहे? पण त्यांतूनही तुला तें हवेंच असेल, तर आपल्या खड्गानें तोडून घे.' असें बोलून त्यानें आपलें शरीर त्याला अर्पण केलें. राजपुत्रानेंही त्याच्या मानेवर तीक्ष्ण तरवारीचा वार केला; पण रसायनानें दृढ झालेल्या त्याच्या मानेवर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. युवराजाचीं खड्गें तुटलीं. इतक्यांत हा वृत्तांत राजाला कळला. तेव्हां तोही तेथें धांवून आला. त्यानें शिरोदान न देण्याविषयीं मंत्र्याला पुष्कळ आग्रह केला, पण राजाच्या म्हणण्यास मान न देतां नागार्जुन म्हणाला,–"राजन्, मी जातिस्मर आहें, मागच्या नव्याण्णव जन्मांत मी आपलें मस्तक दान दिलें आहे. हें माझें शंभरावें दान आहे. यास्तव आपण माझें निवारण करूं नका. कोणताही याचक माझ्या येथून आजपर्यंत विमुख गेलेला नाहीं. आतां मी तुमच्या पुत्रालाही पूर्ण मनोरथ करून येथून पाठविलें. केवळ शेवटीं आपलें दर्शन व्हावें, म्हणून मी इतका उशीर लावला." असें बोलून नागार्जुनानें आपल्या औषधालयांतून एक चूर्ण आणून तें जीवहराच्या तरवारीस फासलें, व 'आतां तूं माझ्यावर वार कर' असें म्हणून तो दानशूर हात जोडून भूमीवर बसला. तों देठापासून जसें कमल खुडावें, त्याप्रमाणें युवराजानें त्याचें शिर उडविलें. त्याबरोबर तेथें मोठाच आक्रोश सुरू झाला, व राजाही जीव द्यावयास तयार झाला; पण इतक्यांत 'राजन्, असें अकार्य करूं नकोस. हा तुझा मित्र नागार्जुन मुक्त होऊन भगवान् बुद्धाच्या गतीस प्राप्त झाला आहे. यास्तव याच्या करितां शोक करूं नकोस' अशी गंभीर आकाशवाणी झाली. ती ऐकून राजानें आपला मरणाचा निश्चय शिथिल केला. सर्वस्व दान दिलें, व तपस्या करण्याच्या इच्छेनें वनाचा मार्ग धरिला. पुढें कांहीं दिवसांनीं त्याला आत्मसाक्षात्कार होऊन तो मुक्त झाला.

त्याच्यामागें त्याचें राज्य जीवहराला मिळालें; पण थोडक्याच दिवसांत नागार्जुनाच्या पुत्रांनीं पित्याच्या वधाचा सूड घेण्याकरितां त्याच्या राज्यांत वैर उत्पन्न केलें व त्याला मारून टाकलें. त्यामुळें पुत्रशोकानें त्याच्या आईचें हृदय विदीर्ण होऊन तीहि मरण पावली. कारण क्षुद्र जनांच्या मार्गानें जाणारांचें कल्याण कसें होणार? असो; त्यानंतर त्या मंत्रिपुत्रांनीं चिरायु राजाच्या दुसऱ्या राणीच्या ठायीं जन्मलेल्या शतायु नांवाच्या पुत्रास राज्यावर बसविलें.

तात्पर्य, याप्रमाणें नागार्जुनानें मृत्यूचा नाश करण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केला, पण देवतांना ती गोष्ट सहन झाली नाहीं. शेवटी तोही मरण पावला. तस्मात् विधात्यानें केलेला हा जीव–लोक अनित्य आहे. व त्यांत अनेक अनिवार्य दुःखें आहेत. यास्तव कोणालाही शेंकडों यत्नांनींहि त्याच्या (विधात्याच्या) इच्छेविरुद्ध कांहीं करतां येत नाहीं.

### ३१६. नागार्जुन कथेच्या फलकांत घुसलेले खिळे.

३१६. माध्यमिक संप्रदायाचा प्रचारक प्रस्तुत नागार्जुन होऊं शकत नाहीं. ज्याचा वेळ राजकारण आणि रसायन यांत गेला तो नागार्जुन धार्मिक पंथाचा संस्थापक होणें शक्य दिसत नाहीं. तथापि बृहत्कथेच्या बुद्धोत्तर संपादकांनीं या माध्यमिक संप्रदायाच्या नागार्जुनाचें आणि प्राचीन वैद्य नागार्जुनाचें ऐक्य कल्पिलें आहे.

नागार्जुन नांवाच्या एका बौद्ध पुरुषाचा शातवाहनांशीं संबंध आला होता. तो नागार्जुन रसायनवेत्ता नसून बौद्ध संप्रदायी होता आणि तो वऱ्हाडांतील असावा. त्या नागार्जुनाविषयीं विवेचन पुढें येईलच. याचें निर्याणस्थान उत्तर तैलंगणांत निश्चित झाल्यासारखें आहे. शातवाहनकालीन नागार्जुन आणि "चिरायु"-कालीन नागार्जुन यांचें ऐक्य शातवाहनकालीन नागार्जुनानंतर थोडक्याच काळानें बृहत्कथेच्या संपादकांनीं बनविलें होतें असें दिसतें.

पहिला बौद्ध नागार्जुन ख्रिस्तपूर्व असावा आणि त्यावरून अंतिम संपादनाचा काळ ख्रिस्तपूर्व पहिलें शतक इतका अर्वाचीन होऊं शकतो.

कथापीठलंबकांतील गोष्टी व इतर भागांतील गोष्टी या दोन गोष्टी कालदृष्टीनें एकमेकांपासून दूर आहेत. त्याविषयीं विवेचन मागें आलेंच आहे. चंडमहासेन आणि उदयन या बुद्धपूर्व कालांतील व्यक्ति होत्या, गुणाढ्य आणि वररुचि या व्यक्ती कथासंपादकाच्या दृष्टीनें नंदकालीन होत्या म्हणजे दोहोंमध्यें तीनशेंवर वर्षांचें अंतर होतें एवढेंच. आमच्या मतें वररुचि नंदपूर्वकालीन आहे. इतक्या थोड्या काळांतच उदयनादि व्यक्ति अद्भुत कथांचा विषय कशा झाल्या अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. रामदास मारुतीचा अवतार आहे अशी त्याच्याविषयीं कथा निर्माण होण्यास आणि त्यांच्या नांवावर अनेक अद्भुत कृत्यें पडण्यास फार अवकाश लागला नाहीं

आणि त्यामुळें दुसऱ्या नागार्जुनाच्या नंतर शातवाहनाच्याच कालांत बुद्ध संप्रदायी व्यक्तींविषयीं अद्भुत कथा मतलबी मंडळीकडून प्रचलित झाल्या असें विधान स्वीकारण्यास अडचण दिसत नाहीं.

## ३१७. मुहूर्त सांगणारे आणि रत्नांचा पाऊस पाडणारे.

३१७. जातक ग्रंथांत दिग्दर्शित केलेल्या विद्येचें स्वरूप संपूर्णपणें लक्षांत घेतलें असतां श्रुतिस्मृतिपुराणवाङ्मयास एक महत्त्वाची पुरवणी जोडतां येईल. जातकांत उल्लेखिलेल्या गोष्टी पुढील प्रमाणें आहेत.

१ मुहूर्त पाहून विवाहादि मंगल कार्यें करण्याची चाल होती आणि मुहूर्त सांगण्याचें कार्य आजीवक पंथाचे परिव्राजक करीत असत. अशी माहिती नक्खत्त जातक (४९) देतें. हें काम केवळ आजीवकपंथीय करीत असतीलच असें सांगतां येत नाहीं; तथापि त्या प्रकारची खरीखोटी विद्या समाजांत होती हें अनेक प्रकारच्या इतरत्र पुराव्यावरून दिसून येतें.

२. वेदजातकांत धनवर्षक नक्षत्राचा उल्लेख आहे. वर्षांतून एकदां धनवर्षक नक्षत्राचा योग येई आणि त्यावेळेस मंत्र म्हणून रत्नांचा पाऊस पाडणारा ब्राह्मण पुढें चोरांच्या हातून मेला असें दाखविलें आहे.

## ३१८. तंत्रधर्म बुद्धपूर्व आहे.

३१८ भारतीयांत तंत्रवाङ्मयाचें * महत्व फार हळू हळू वाढलें आणि तें पुराणमतवादी लोकांनीं स्वीकारण्यापूर्वी बौद्ध संप्रदायाच्या सावलींत त्याची बरीचशी वाढ झाली. अनेक तांत्रिक देवता त्यामुळें बौद्ध समजल्या गेल्या. स्थानिक देवतांस किंवा कार्यदेवतांस बौद्ध म्हणण्याची चुकीची क्रिया अनेकांकडून झालेली आहे. एखादा संप्रदाय विशिष्ट देवतांच्या कक्षेंतील प्रदेशांत चालू होतो तेव्हां त्या संप्रदायांस त्या देवता मान्य कराव्या लागतात.

तांत्रिक देवतांना; मुसलमान देवता म्हणावयाचें जितकें कारण नाहीं, तितकेंच बौद्ध म्हणण्याचें कारण नाहीं.

* सर्व अर्थांची म्हणजे हिताहिताची मांडणी ज्यानें केली जाते, तें तंत्र होय, आणि भयापासून तारण ज्यापासून होतें तें तंत्र होय. (सर्वेऽर्था येन तन्यंते, त्रायंते च भयाज्जनाः इति तंत्रस्य तंत्रत्वं तंत्रज्ञाः परिचक्षते) अशीं दोन स्पष्टीकरणें असण्याचें कारण तंत्र हा शब्द अगोदर लोकमान्य झाला आणि त्यानंतर त्याचा अर्थ निश्चित करण्यासाठीं खटपट झाली हें होय.

प्रत्येक ठिकाणीं स्थानिक महत्वाच्या देवता असतातच. त्या देवतांवर विश्वास ठेवूं नका म्हणून न सांगतां किंवा अस्तित्वांत असलेल्या उपास्यांस विरोध न करतां जर मत मांडलें गेलें तर तें लवकर पसरतें आणि जुन्या देवता कायम रहातात व त्यांचा स्वीकार होतो आणि मतसंस्थापक देखील पूज्य होऊन देवता बनतो. मतसंस्थापक देव बनला म्हणजे जुनीं दैवतें नष्ट होत नाहींत. तुर्कस्तानामध्यें महंमद पैगंबराचा स्वीकार केला आहे तरी जुनीं दैवतें आहेतच. मुसलमानांनीं तेथें मूर्तिभंजकता प्रथम जरी बरीच चालविली असली तरी पुढें ती कमी झाली असावी असें दिसतें. जुन्या देवतांस मान द्यावयाचा ही गोष्ट महंमदाला पैगंबर मानण्याशीं विसंगत धरली जात नाहीं. बौद्धसंप्रदायाच्या वाढींत तेंच झालें. जुन्या देवता कायम राहिल्या व जुन्या उपासनापद्धती देखील कायम राहिल्या; पण त्या सर्व जुन्या पद्धतींवर बौद्धसंप्रदायाचा मुलामा चढविला गेला.

## ३१८ अ. परकीय देवता आणि तंत्रशास्त्र.

३१८ अ. डॉ. प्राणनाथ यांनीं दक्षिण हिंदुस्थानांत सांपडलेल्या भांड्यांवरील खुणांचा अभ्यास केला तेव्हां त्यांस असें दिसून आलें कीं त्या खुणा तांत्रिक देवतांचीं नांवें आहेत. का रा. श्रा इन्नि श्ली, ऱ्हीं क्लीं, इत्यादि देवतांचीं नांवें होतीं. या देवतांपैकीं कांहीं देवता अर्थात् परकीय होत्या. उदाहरणार्थ क्लीं ही देवता इश्तरचेंच एक रूप आहे असें ते म्हणतात.† या शिवाय देवतारा ही राम या देवतेचेंच संक्षेप चिन्ह तंत्रग्रंथांप्रमाणें आहे. यावरून राम ही देवता ज्या काळांत इश्तर 'क्लीं' या नांवाखालीं पूजिली जात होती, त्या काळांत पूजली जात होती हें स्पष्ट आहे.

डॉ. प्राणनाथ यांचें मत त्याकडे लक्ष जावें म्हणून मांडलें आहे. तथापि त्यांचीं विशिष्ट देवताविषयक विधानें स्वीकारलीं आहेत असें नाहीं.

## ३१९. पौराणिक धर्माची बुद्धपूर्वता.

३१९. बृहत्कथेंत पौराणिक हिंदूधर्म पूर्णपणें स्थापित झाला आहे असें चित्र दिसत आहे. हें चित्र ग्रंथास अर्वाचीनत्व आणूं शकत नाहीं. जें पौराणिक स्वरूपी तें अर्वाचीन आणि बुद्धोत्तरकालीन असें जें मत होतें तें देखील आज त्यागिलें जात आहे. महाभारताचा मुख्य भाग बुद्धपूर्वच आहे. शिवपूजा व लिंगपूजा ही वेदपूर्वकालीन आहे हें ऋग्वेदानें तसेंच सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांनीं सिद्ध केलें आहे.

† Dr. Prananath. The scripts on Indus Valley Seals I. H. Q. June 1932.

लो. ना. अणे यांनीं आपल्या विद्वत्तापूर्ण लेखामध्यें * महाभारताची शतसाहस्रीसंहिता बुद्धपूर्वकालीन आहे हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. महाभारताचा काल ठरवितांना त्यामधील प्रक्षिप्त भाग कोणता हें ठरविणेंच फार कठीण असतें. लो. ना. अणे यांनीं महाभारतांत वार व राशी यांचा उल्लेख नाहीं तेव्हां तें अलेक्झँडरच्या पूर्वीचें असावें असें जें अनुमान काढलें आहे तें योग्यच आहे, पण तें बुद्धपूर्वकालीनहि असेल कीं काय याबद्दल प्रो. आळतेकर यांस शंका वाटते. लो. ना. अणे यांनीं एड्डक हा शब्द एडी देवतेपासून कसा साधित होतो हें व्याकरणशास्त्रदृष्ट्या प्रथमच दाखविलें आहे. महानिर्वाणसूत्रामध्येंही स्तूप किंवा डागोबा किंवा एड्डक हे बुद्धपूर्वकालीन होते असें दिसून येतें; कारण त्यामध्यें बुद्धाच्या निर्वाणाचे पूर्वींसुद्धां थोर विभूति अगर राजे लोक यांच्या अवशेषावर स्तूप बांधीत असल्याचा उल्लेख आढळतो. † पण महाभारत जर बुद्धपूर्वकालीन मानलें तर शांतिपर्वामधील ३४८–९ मध्यें केलेला बुद्धाचा दशावतारांतील अंतर्भाव, १४३ व्या श्लोकांत केलेला बौद्धमतउल्लेख 'काषायवस्त्रसंवीतो मुंडितः शुक्लदन्तवान्,' 'शुद्धोदनसुतो-बुद्धो मोहशिष्यामि मानवान्' ३४८, १४३ दोन्हीहि प्रक्षिप्त मानावे लागतील. सारांश प्रक्षिप्ततेच्या संशयाच्या अस्त्राच्या उपयोगावर महाभारताच्या कालाचा प्रश्न बराचसा अवलंबून आहे. 'यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न कुत्रचित्' अशी जी सौतीनें शतसाहस्री संहितेच्या प्रारंभीं प्रतिज्ञा केली आहे, त्यावरून प्रस्तुत महाभारत हें प्राचीन वैदिक संस्कृतीच्या संरक्षणाच्या हेतूनें रचलेला ग्रंथ आहे असें दिसून येईल. बौद्धधर्माचा प्रसार ज्यावेळीं होऊं लागला त्यावेळींच अशा प्रयत्नांची जरुरी वाटली असावी असें वाटतें. तेव्हां इ. स. पूर्वी ४ थ्या शतकाच्या सुमारास ग्रीक राशी व वार यांचीं नांवें अवगत होण्यापूर्वी महाभारत रचलें असावें असें प्रो. आळतेकर यांस वाटतें. ‡

## ३२०. बौद्ध धर्मांगांची बुद्धपूर्वता.

३२०. केवळ पौराणिक धर्मच बुद्धपूर्व होता असें नाहीं तर बराचसा बौद्ध किंवा जैन समजला जाणारा धर्मच महावीर आणि बुद्ध यांच्या अगोदर होता. प्रस्तुत गोष्टीविषयीं प्राचीनांची साक्ष चांगल्या तऱ्हेची आहे, पण त्या साक्षीच्या संशोधकांकडून विचार झालेला नाहीं.

उदयनाच्या काळीं तर गौतमीय बुद्धधर्म नव्हता. तथापि कापालिक वगैरे सांप्रदायांचें अस्तित्व होतें. तंत्रवाङ्मयाचा उद्भव झाला असावा, तथापि त्याचें 'श्रौतस्मार्त आणि पुराणोक्त' धर्माशीं संयुक्तीकरण झालें नव्हतें, एवढेंच नव्हे तर या तिन्ही धर्मांचा पूर्णपणें मिलाफ झाला नव्हता. शैव आणि वैष्णव हे दोन्ही संप्रदाय व्यवस्थित स्वरूप पावूं लागले होते. गंगातीर पवित्र झालें होतें. कुंडिनपुर येथील ब्राह्मण गंगातीरीं तपश्चर्येला गेलेला दाखविला आहे. कुंडिनपुराच्या सात ब्राह्मणांच्या उपकथेंत त्यांनीं गाय मारून तिचें मांस सेवन केलें आणि उरलेलें गुरूला आणून दिलें असें आहे. त्यावरून या कालांत गोमांसालाहि निषेध नसावा. कारण तें मांस निषिद्ध असतें तर उरलेलें मांस त्यांनीं गुरुसाठीं आणलें नसतें.

दक्षिणेकडील देवतांमध्यें स्वामीकुमाराचा उल्लेख वारंवार आला आहे. स्वामीकुमार ही एक लोकप्रिय देवता होती यांत शंका नाहीं. या स्वामी कुमार देवाचें आणि यहूद्यांतील "सैन्यांचा येहोवा" याचें एकत्व होतें काय हा प्रश्न विचारार्ह आहे.

वैदिक परंपरेहून भिन्न अशी जी एक परंपरा होती तिचें पूर्ण निरीक्षण झाल्याशिवाय बौद्ध आणि जैन संप्रदायांचा उगम आणि विकास समजावयाचा नाहीं. हे दोन संप्रदाय वैदिक परंपरेंतच वाढले असें नाहीं. जीस आम्ही सूतसंस्कृति म्हटलें आहे त्या संस्कृतींतच या दोन सांप्रदायांचा उद्भव झाला हें मत मागें ज्ञानकोशाच्या प्रस्तावना खंडांत प्रतिपादिलेलें आहे. तथापि तेवढ्यानें स्पष्टीकरण पूर्ण होत नाहीं. महायान धर्माच्या मूळाशीं ज्या अनेक कल्पना आहेत, त्या बौद्धधर्माच्या पूर्वी होत्याच. जें काय झालें तें एवढेंच कीं त्या कल्पना बौद्धसांप्रदायामध्यें केंद्रीभूत झाल्या. वज्रयान माध्यमिक संप्रदाय यांतील कल्पना देखील पूर्वी होत्याच. त्या श्रौत किंवा पुराणोक्त धर्माशीं बौद्धांच्या अगोदर संयुक्त झाल्या नसतील तथापि त्या श्रौतस्मार्त धर्माशीं उत्तरकालीं संयुक्त झाल्या. समाजांत श्रमणांचा वर्ग होताच. बुद्धपूर्व असलेला पाणिनि मागें उल्लेखिलेल्या "कुमारश्रवणादिभिः" या सूत्रानें श्रमणांचें स्वकालपूर्वक अस्तित्व स्पष्ट करीत आहे. अर्हत्, बुद्ध वगैरे अनेक नांवें गौतमास त्याप्रमाणें जिनास देखील लागू आहेत आणि अर्हत्, बुद्ध या नामांनीं व्यक्त होणाऱ्या कल्पनांचा उद्भव बुद्धपूर्वकालीन आहे.

कथासरित्सागरांत म्हणजे बृहत्कथेंत बौद्ध आणि जैन धर्म यांविषयीं जे उल्लेख आले आहेत त्यांचा विचार स्वतंत्रपणें

* शारदाश्रम प्रथम वार्षिक, यवतमाळ.

† Dialogues of the Buddha, Vol. 2, pp. 155–7.

‡ वागीश्वरी वर्ष ४. विलास ११ यांतील प्रो. आळतेकरांचा शारदाश्रम वार्षिकाच्या परिक्षणाचा लेख.

केला पाहिजे. हे उल्लेख ग्रंथास अर्वाचीन करूं पहातात किंवा निदान त्यांत बराचसा भाग क्षेपक असावा अशी भ्रामक कल्पना करून देतात. परंतु ते उल्लेख बुद्धोत्तर आहेत अशा प्रकारच्या निर्णयास निश्चयेंकरून पोंचतां येत नाहीं. कारण बौद्ध अगर जैन धर्माचें अस्तित्व महावीर व बुद्ध यांच्या पूर्वींहि होतें.

शशांकवती लंबकाच्या पांचव्या लंबकांत विनीतमति नांवाच्या एका प्रतीहारपुत्राची कथा आली आहे. ती निःसंशय जैन कथा या संग्रहांत संग्रहित करून घेतली आहे, यांत शंका नाहीं. ती कथा लंबकनायक जो मृगांकदत्त त्याच्या पासून दूरावलेला त्याचा मंत्री जो **गुणाकर** तो स्वामिवियोग-दुःखामुळें आत्महत्या करण्यास प्रवृत्त झाला असतां त्याचें निवारण करण्यासाठीं एका तापसीनें सांगितली आहे. त्या कथेंत ज्या अंतर्भूत झालेल्या इतर कथा आहेत व त्यांत आणखीहि दुसऱ्या कथा अंतर्भूत झाल्या, अशा प्रकारच्या कारणानें जी कथाप्रणाली ह्यांत आली आहे तींत अनेक प्रकारचें जैन आणि बौद्ध वातावरण दिसून येतें. विनीतमतीनें एका राजकन्येचा पराभव करून तिला मिळविलें. असें सांगितलें आहे. जैन वाङ्मयांत वादविवादांत भाग घेणाऱ्या स्त्रिया दाखविण्याची वरीच आवड दिसून येते. पुढें त्या विनीतमतीचा वादविवादांत एका जैन भिक्षूनें पैजेनें पराभव केला असें दाखविलें आहे. तो भिक्षु बोधिसत्त्वचर्या करण्यास राजास सांगत आहे. 'बोधिसत्व' म्हणजे बुद्ध असाच अर्थ असेल तर जैन व बौद्ध यांच्या गट्टीचा प्रस्तुत उल्लेख द्योतक आहे. तथापि दुसरीहि एक गोष्ट संभवते. हिंदुस्थानच्या भारंतीयुद्धानंतरच्या आणि बुद्धापूर्वींच्या कालांत ज्ञानाचें व संयमधर्माचें महत्व सांगणारा संप्रदाय असावा आणि त्या संप्रदायाचे यती असावेत. बुद्ध, जैन, अर्हत् वगैरे पदव्या घेणाऱ्या व्यक्ति त्या काळांत उत्पन्न झाल्या आणि त्याच व्यक्तींनीं उत्पन्न केलेल्या पदव्यांचाच महावीर आणि बुद्ध यांनीं उत्तरकालीं आश्रय केला असला पाहिजे. या संयमधर्माचें महत्त्व सांगणाऱ्या धर्माचे कांहीं प्रवर्तक पश्चिम एशियांतीलहि असणें शक्य आहे. संयमधर्मोचा उपदेश करणारे लोक वेदपूर्वकालापासून देखील समाजांत होते हें अगस्त्यलोपामुद्रासंवादसूक्तावरून दिसून येतें.

## ३२० अ. ब्रह्मचारिणी, ब्राह्मणकुमारी व ब्राह्मण-समाजाच्या कित्येक गोष्टी.

३२० अ. कामंदकी वगैरे भिक्षुणी नाटकांत येतात. ब्राह्मणांचा गृहस्थाश्रमावर भर असल्यामुळें आणि विवाह हाच स्त्रियांना संस्कार समजला गेल्यामुळें ब्राह्मणांत धार्मिक कारणाकरतां कुमारी व्रत पत्करणाऱ्या स्त्रिया नसतील असें वाटण्याचा संभव आहे; पण तशी कल्पना चुकीची होईल. स्त्रियांचें ब्रह्मचर्य ही गोष्टदेखील बौद्धांनीं किंवा जैनांनीं नव्यानें सुरू केली असें नाहीं. ब्राह्मण कुमारींमध्यें कांहीं कुमारी नैष्ठिक ब्रह्मचारिणी असत. स्त्रियांना अविवाहित रहाण्यासाठीं कोणत्या तरी देवाला वहावें हें आवश्यक नव्हतें. उज्जयिनी येथें लावण्यमंजरी नांवाची एक नैष्ठिक ब्रह्मचारिणी होती. ती कमलोदय नांवाच्या एका ब्राह्मणास पाहून कामवश झाली. अर्थात् त्या दोघांच्या लग्नाला जातीचा अडथळा नव्हता; तथापि व्रतपालनाच्या इच्छेनें तिनें मरण पत्करलें, असें सांगितलें आहे ( तरंग २ ).

ब्रा ह्म ण द्वे ष

ब्राह्मणांना सदा सर्वदा अनुकूल काल होता असें नाहीं. ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्या आणि त्यांच्या स्त्रियांचा अपमान करूं इच्छिणाऱ्या व्यक्ति होत्या असें दाखविण्यासाठीं पांचाल देशांतील देवभूति नामक ब्राह्मणाची कथा दिली आहे. ( शशां. तरंग ५ )

ब्राह्मण पुरुषांच्या लग्नाविषयीं अनेक कथा आहेत. अनेक स्त्रिया करणारे ब्राह्मण पुष्कळच असावेत. ब्राह्मणाचे ब्राह्मण स्त्रियांशीं होणारे विवाह वर्णन करणांऱ्या कथा वगळतां इतर प्रकारचे विवाह वर्णन करणाऱ्या अनेक कथा दृष्टीस पडतात. पवित्रधर नांवाच्या एका ब्राह्मणानें मंत्रानुष्ठान करून यक्षिणीलाच प्रसन्न करून घेतलें व आपली भार्या व्हावयास सांगितलें ( शशांक. लंबक तरंग ६ ) ! ! ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्या विवाहामुळें श्रौत आणि पौराणिक धर्मांच्या एकीकरणास मदत झाली असावी.

ब्राह्मणांच्या आयुष्यक्रमाविषयीं ज्या अनेक गोष्टी दिसून येतात त्यांत कुमारींचा उल्लेख केला आहेच. ब्राह्मणस्त्रिया तरुणपणीं लग्न करीत व ज्यावर आपलें प्रेम जडलें आहे, अशा व्यक्तीशीं लग्न करीत असें कंदर्पाच्या कथेंत दाखविलें आहे ( विषमशीललंबक तरंग ३.४ ). ब्राह्मणगुरूच्या घरीं ब्राह्मण शिष्य जात आणि गुरुकन्या शिष्यावर प्रेम करूं लागून त्याच्याशीं विवाहबद्ध होत, अशा प्रकारचीहि कथा कुसुमायुध आणि कमललोचना यांची दिली आहे ( तरंग ४ ). ब्राह्मण स्त्रियांत बुरखा घेण्याची चाल होती असें त्या कंदर्पाच्या सुमनसा पत्नीच्या वृत्तावरून स्पष्ट होतें.

### ३२० आ. जैनच्या पूर्वपीठिकेविषयीं एक शक्यता.

३२० आ. जैनाचें मत अत्यंत प्राचीन काळापासून आहे असें सांगत आहेत आणि त्यांच्या मागचा संबंध परकीय धर्माशीं जोडण्यास काय कारणें आहेत त्यांचें विवेचन मागें केलें आहे. प्राचीन साबी धर्मांत 'जिन' नांवाचा पिशाचसमूह किंवा देवतासमूह होता; त्याचेंच 'जिन' हें विशेषण तयार होऊन कांहीं अंशीं जुन्या आणि कांहीं अंशीं नव्या विचारांनीं युक्त अशी ती कल्पना बनली. हिंदुस्थानांत 'जिन' व्यापारी लोकांमार्फत आले आणि रूपांतर पावले. व्यापारी मंडळींत निराळ्या देवता प्रचलित होत्या. कुबेर आणि मणिभद्र हे त्यांचे देव प्रामुख्यानें होते. व्यापारी वर्ग जिकडे जात तिकडील देवता ते स्वीकारीत ही गोष्ट स्वाभाविक आहे. बुद्धपूर्व कालांतच मणिभद्र हा हिंदुस्तानांतील व्यापारी लोकांचा देव होता ही गोष्ट जो सार्थवाह नलोपाख्यानांत दमयंतीशीं बोलतांना दाखविला त्याच्या बोलण्यावरून स्पष्ट होत आहे. आज जैनांत कुबेर आणि मणिभद्र यांस मोठेंच महत्व आहे. यावरून अशी कल्पना होते कीं बुद्धपूर्वकाळीं शेंकडों वर्षें व्यापारी लोकांचा प्रसार चोहोंकडे झाला असल्यामुळें जिकडे जे व्यापारी गेले, तिकडील देवता त्यांनीं घेतल्या आणि त्यामुळें त्या व्यापारी वर्गानें जिनपूजा देखील आणली. त्या व्यापारी वर्गांतच महावीरानें प्रचारकार्य केल्यामुळें महावीराचा जो उपदेश असेल त्याचें आणि प्राचीन व्यापारी लोकांच्या देवधर्माचें ऐक्य झालें. हें ऐक्य बुद्धजन्मापूर्वीच स्थापन होत होतें; आणि अर्हत्, बोधिसत्व हीं विशेषणें ज्या अर्थी गौतमास आणि महावीरास लागतात त्या अर्थी त्या प्रकारच्या कल्पना पूर्वनिर्मीत असून त्या कल्पना महावीर आणि शाक्यमुनि यांच्या ठायीं स्थित झाल्या.

थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे आपण एक निराळा संप्रदाय स्थापन करीत आहोंत असें सांगावयाचें धैर्य महावीर किंवा शाक्य गौतम यांपैकीं कोणींच केलें नाहीं. दोघेहि पूर्व आचार्यांच्या धर्माचें स्पष्टीकरण करण्याची क्रिया करते झाले. गौतम हा चालु युगांतील चार बुद्धांपैकीं एक होय असें मत अशोककाळींच स्थापन झालें होतें. पहिला बुद्ध ककुच्छंद, दुसरा कनकमुनि, तिसरा कश्यप आणि चौथा गौतम अशी मांडणी अशोककाळांतच झालेली आहे. अशोक कनकमुनीच्या जन्मस्थानीं आपण गेल्याबद्दल कनकमुनीप्रीत्यर्थ स्तंभ उभारता झाला. त्यावरून असें दिसतें कीं यज्ञधर्मापासून भिन्न अशी जी एक निराळी परंपरा होती ती गौतमापूर्वींची होती; आणि यासाठीं जेव्हां बोधिसत्त्वाचें नांव येईल तेव्हां ती कथा बुद्धोत्तर समजण्याचें कारण नाहीं.

---

प्रकरण ३६ वें.

# ब्राह्मणजाति आणि तिचा बुद्धपूर्वकालीन सांस्कृतिक इतिहास.

### ३२१. सामाजिक घटनानियमांचें प्राचीनकाळापासून सातत्य; प्राचीन सामाजिक ध्येयें व प्राचीन समाजशास्त्र शोधण्याचें महत्त्व.

३२१. राज्यें नष्ट होतात, आणि साम्राज्येंहि नष्ट होतात. जुनी घटना नष्ट झाली तरी नवी घटना जेव्हां तयार होते, तेव्हां जुन्या घटनेमध्यें जे सामाजिक नियम कार्य करीत होते, तेच सामाजिक नियम नव्या घटनेंतहि कार्य करीत असतांना दिसतात; त्यामुळें सामाजिक घटनेंत दिसणाऱ्या नियमांचें कार्य अत्यंत दीर्घकालपर्यंत सांगतां येईल. सामाजिक घटना आणि आर्यभाषाविशिष्ट संस्कृति यांच्या सातत्याच्या चार हजारांपेक्षां अधिक वर्षांचा इतिहास आज संगतवार सांगतां येतो. सामाजिक घटना आणि सामाजिक विचार यांच्यांत अन्योन्याश्रयाचा संबंध आहे. समाज आपले सर्व व्यवहार पद्धतशीर चालावेत म्हणून ज्या विधिनिषेधांचा अवलंब करतो त्या विधिनिषेधांचा अंत त्या नियमांनीं बद्ध असलेला समाज नष्ट झाला तरी होत नाहीं. एक समाज म्हणजे एक लोकघटना नष्ट झाली तरी नवीन लोकघटनेंत पहिल्या घटनेंतील विधिनिषेध सातत्य राखण्यासाठीं चालू ठेवले जातात. जेता समाज, जित राष्ट्राच्या व्यवहारनियमांचें ज्ञान मिळवण्याचा प्रयत्न करतो, आणि ते चालू ठेवतोच.

हे विधिनिषेधमूलक नियम संस्कृतीच्या इतिहासांत महत्त्वाचे आहेत. आपणांस संस्कृतीच्या घटनेसंबंधानें जिज्ञासा मुख्यतः आपले भावी समाजसुधारणेचें शास्त्र तयार करण्यासाठीं हवी आहे.

निरनिराळ्या दैवतांची उपासना करणारे लोक समाजांत एकत्र आले तेव्हां त्यांनीं काय वृत्ति ठेवली, भिन्न लोकांमध्यें सादृश्य कसें उत्पन्न झालें आणि एकीकृत समाजास आपल्या तत्त्वाच्या दृष्टीनें उच्च प्रकारचा आयुष्यक्रम त्यांनीं कोणत्या प्रकारचा कल्पिला होता, त्याची माहिती आपणांस असली पाहिजे. जें मारलें जातें तें नाशार्हच असतें असें नाहीं. उच्च ध्येयें बाळगणारा समाज प्रसंगीं त्याच्या लष्करी दौर्बल्यानें चिरडून जाईल, तथापि तो चिरडला गेला एवढ्यावरून त्याच्या ध्येयांचें, विद्येचे आणि संस्कृतीचें महत्त्व नष्ट होत नाहीं.

प्राचीन इतिहासाच्या अभ्यासाचें व्यावहारिक दृष्टीनेंहि समर्थन करण्याजोगें आहे. विशिष्ट घटना उध्वस्त झाली ती ज्या अनिष्ट कारणामुळें उध्वस्त झाली असेल तें कारण वगळून इतर बाबतींत संस्कृतीचा होणारा विनाश थांबविण्याचा प्रयत्न समाजास अवश्य आहे.

युद्धाची दाणादाण आटपल्यानंतर विखुरलेल्या गोष्टींतून संपत्ति पुन्हां शोधणें आपलें कर्तव्य आहे. ज्या चांगल्या संस्था नष्ट झाल्या असतील त्या नष्ट होऊं द्यावयाच्या कीं त्या जिवंत ठेवावयाच्या याचा विचार समाजास अवश्य आहे. नष्ट राज्यामध्यें राजकीय बाबतींत जे 'उपाय' वापरले गेले असतील त्यांची योग्यायोग्यता त्या वेळच्या यशापयशावरून ठरते. तरी ज्या इतर सामाजिक गोष्टी त्या कालापासून आतांपर्यंत टिकल्या असतील त्या सामाजिक गोष्टींची योग्यायोग्यता एकंदर इतिहास पाहून ठरवावी लागते. आपणांस आपल्या सांस्कृतिक आयुष्यक्रमाचीं अंगें व त्यांचा इतिहास हीं चांगल्या तऱ्हेनें तपासलीं पाहिजेत. अल्पकालीन परिस्थितीमध्यें जो कांहीं व्यक्तींना अनुभव येतो, त्यामुळें विशिष्ट संस्थेविषयीं अदूरदृष्टीमुळें जो रागद्वेष उत्पन्न होतो, त्याच्या योग्यायोग्यतेविषयीं इतिहासकारानें समाजास जागें केलें पाहिजे.

आपल्या समाजाचीं जीं अंगें अनेक सहस्रकें आपणांस दृष्ट होत आहेत तीं येणेंप्रमाणें:—

(१) देशांत अनेक जाती आहेत. त्या जातींत ब्राह्मण जातीस प्राधान्य आहे.

(२) देशांत जाती जरी हजारों असल्या तरी समाजांत वर्ण चार आहेत हें एक सामाजिक तत्त्व लोकांनीं मनाशीं बाळगलें आहे, आणि हें तत्त्व समाजांत परस्परसंबंध सुकर आणि सुखावह करण्याचें, त्याचप्रमाणें असुखकरहि करण्याचें कार्य करीत आहे.

(३) देशांत व्यक्तीस आवडणाऱ्या दैवताच्या भिन्नतेमुळें समाजांत फारसा परस्पर द्वेष नाहीं. व दैवतभिन्नता विवाहाला अडचण करीत नाहीं.

हीं तिन्ही तत्वें आजच्या सामाजिक विचाराच्या ऐरणीवर ठोकलीं जात आहेत.

### ३२२. समाजाचें स्वयंशासन, तदंतर्गत उच्च आयुष्यक्रमाच्या कल्पना.

३२२. प्राचीनांनीं आपल्या समाजाचें नियमन कसें केलें व समाजास शिस्त कशी लावली याविषयींचा इतिहास लक्षांत घेतल्याशिवाय लोकांच्या कर्तृत्वाचें खरें स्वरूप समजणार नाहीं. समाजामध्यें विविध प्रकारची जनता असते, आणि त्या जनतेनें कांहीं तरी शिस्तीनें वागल्याशिवाय प्रत्येक मनुष्यास आपले व्यवहार करण्यास लागणारें स्वातंत्र्य प्राप्त होत नाहीं. यासाठीं समाजाची स्वयंशासनाची विद्या अभ्यासण्याजोगी आहे; त्याप्रमाणेंच उच्चतर आयुष्यक्रम आचरण्यासाठीं समाजाचे जे जे प्रयत्न झाले तेहि शोधले पाहिजेत. समाजामध्यें समाजाचा अनुभव संरक्षित करण्यासाठीं वाङ्मयनिर्मिति व्हावी लागते. वाङ्मय निर्माण करणारा वर्ग जे ग्रंथ निर्माण करील त्यांचें संरक्षण आणि वर्धन या क्रिया व्हाव्या लागतात. या क्रियांचें सातत्य चालू ठेवणें ही गोष्ट सोपी नाहीं. व्यवहारामध्यें ज्या वस्तूचा ताबडतोब विक्रय करण्यांत येतो त्या वस्तूंचें उत्पादन करणें हा धंदा होऊं शकतो; तथापि जेव्हां प्रयत्नांचें फल कालांतरानें मिळावयाचें आहे असें कार्य करण्यासाठीं कांहीं तरी निराळीच योजना करावी लागते. समाज सुधारलेला म्हणावयाचा कशावरून, तर ज्या प्रयत्नांचें फल कालांतरानेंच मिळणार आहे त्या प्रयत्नाची शक्यता ज्या समाजांत असते तो समाज अधिक सुधारलेला, असें म्हणतां येईल. सद्गुणाची व्याख्या काय असा प्रश्न जर कोणी केला तर नास्तिकाच्या दृष्टीनें उत्तर एवढेंच येईल कीं जेव्हां मनुष्य भावी सुखांसाठीं आजचें सुख त्यागितो, तेव्हां तो सद्गुण होय. प्रकृति चांगली राहावी म्हणून खाण्यावर नियमन ठेवणें हा वैयक्तिक सद्गुण झाला, आणि पुढच्या पिढीस सौख्य व्हावें म्हणून आज प्रयत्न करणें ही गोष्ट सामाजिक सद्गुणांत मोडेल. समाजाच्या दृष्टीनें सद्गुण म्हटला म्हणजे ज्या गोष्टींची ताबडतोब गरज नाहीं, तर मधून मधून केव्हां तरी लागणार, त्या गोष्टींचा पुरवठा करून ठेवणें, विद्येची गोष्टी अशीच आहे. विद्यासंरक्षक वर्गास समाज जिवंत ठेवण्यास जितका तत्पर असेल त्या मानानें तो समाज अधिक प्रगमनशील आहे असें धरण्यास हरकत नाहीं; आणि या दृष्टीनें भारतीय समाजाची उच्चता पटण्याजोगी आहे.

### ३२३. संस्कृतिसंवर्धक वर्ग; त्याची कर्तव्यपरता, आणि समाजाकडून त्याचा परामर्ष.

३२३. समाज नेहमीं स्वतः विचार न करणारा असेल, तथापि त्यास कर्तव्याची जाणीव करून दिली तर ती जाणीव बाळगणारा होतो. मुख्य गोष्ट ही कीं, समाजाच्या ज्या गरजा तात्कालिक नाहींत त्या गरजा पुरविण्याचें कार्य हातीं घेणारा वर्ग लागतो. पाणिनीच्या सारखें व्याकरण ज्या संस्कृतींत तयार झालें ती संस्कृतीच अत्यंत उच्च दर्जाची होती असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. कारण त्या तऱ्हेच्या व्याकरणाची उत्पत्ति ही एका एकसारख्या अनेक पिढ्या चालू असलेल्या प्रयत्नाचें अंतिम फल आहे. मीमांसक आणि वैय्याकरण यांनीं शास्त्रीय दृष्टीनें भाषेचा जितका अभ्यास केला, तितक्या सूक्ष्म अभ्यासाचें प्राचीन किंवा मध्ययुगीन जगांत दुसरें उदाहरण नाहीं, आणि त्यामुळें ज्या परिस्थितींत असलीं कार्यें घडलीं ती परिस्थिति जगाच्या संस्कृतिविकासाचें महत्त्वाचें अंग होतें यांत शंका नाहीं.

ब्राह्मणांनीं ही विद्या वाढविली ती राजाश्रयानें वाढविल्याचें मुळींच दिसत नाहीं. तत्त्वज्ञान अरण्यांत तयार झालें ही गोष्ट 'आरण्यक' या शब्दानेंच स्पष्ट होत आहे. इतर वेदांगें देखील अरण्यांतच, म्हणजे ऋषींच्या आश्रमांतच संवृद्ध झालीं. ऋषींच्या आश्रमामध्यें आयुष्यक्रम कशा प्रकारचा होता, या विषयींचीं शब्दचित्रें आपणांस पौराणिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं दृष्टीस पडतात. ब्राह्मण आपला आयुष्यक्रम शक्य करण्याकरितां शेती, पशुपालन इत्यादि गोष्टी करीतच होते, व या गोष्टी करून ते विद्या आपल्याच बलावर रक्षून ठेवीत होते. आपलें कर्तव्य विद्यारक्षणाचें आहे, त्याबद्दल आपणांस द्रव्यलाभ होवो कीं न होवो या तऱ्हेची वृत्ति ब्राह्मणांत असल्याशिवाय त्यांच्याकडून प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासाचें आणि अभ्यासाच्या संरक्षणाचें व संग्रहणाचें कार्य झालें नसतें. जेव्हां यज्ञ होत असतील तेव्हां संभावनेचा विषय सबंध विद्वज्जन होत असे. पण त्या वेळच्या दानांच्या योगानें जन्माची सोय होत होती असें थोडेंच आहे ! ब्राह्मणाला गाई दान दिल्या तरी त्या गाईंना चारा चोण घालतो हा प्रश्न आहेच, व त्यामुळें आजकालच्या दिवसांत गाय आपण पाळूं या अटीनें गोप्रदान घेण्यास तयार असा ब्राह्मण मिळण्याची मारामार पडते. यासाठीं स्वतंत्र आश्रमांची पद्धति प्रचलित झाली होती. आश्रम म्हणजे उच्च प्रकारचा बौद्धिक आयुष्यक्रम आचरणारीं स्वतंत्र क्षेत्रें म्हणजे खेडीं होतीं. तेथें विद्येस प्राधान्य होतें आणि इतर प्रकारच्या चढाओढींपासून जनता मुक्त होती. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे प्राचीन ब्राह्मण आपली जीविका स्वावलंबनानेंच करून विद्यावर्धनाचें आणि विद्यासंरक्षणाचें कार्य करीत होते.

'क्षेत्र' या शब्दापासून उत्पन्न झालेला अगर त्याशीं वांशिक संबंध असलेला शब्द 'शेत' हा आहे. तथापि क्षेत्र हा

शब्द आज पवित्र स्थलाचा व्यंजक आहे. या शब्दाच्या अर्थाच्या इतिहासावरून शेतांमध्यें ब्राह्मणांनीं निवास करून त्याची पुढें विद्यापीठें म्हणजे पवित्रस्थलें बनविलीं असा इतिहास दृष्ट होत आहे.

**३२४. विद्याविकासास साधक झालेली ब्राह्मणांची वृत्ति.**

३२४. ब्राह्मणांनीं जीं अनेक शास्त्रें निर्माण केलीं त्यांच्या इतिहासाकडे जाण्यास आज आपणास अवकाश नाहीं; तथापि त्या विद्यावर्धनाच्या अनुषंगानें जो सामाजिक इतिहास आपणास दिसत आहे तो मात्र येथें मांडला पाहिजे. संस्कृत भाषेची जोपासना ज्या वर्गानें केली त्या वर्गानें एकेक शास्त्र पुढें संस्कृत भाषेशीं संबद्ध करून एक सामान्य संस्कृति तयार केली. भिन्न भिन्न लोकांचें एकीकरण करावयाचें तें सामान्य भाषाशिक्षणानें तयार करावयाचें, त्याच्या जुन्या पारमार्थिक मार्गामध्यें ढवळाढवळ करावयाची नाहीं, त्याच्या उन्नतीस लागणारें तत्त्वज्ञान तेवढें आपण द्यावयाचें आणि त्याचा जातिविशिष्ट किंवा कुलविशिष्ट जो रिवाज असेल तो त्यानें संरक्षित करून आपली स्वतःची जुनी परंपरा कायम ठेवावी अशी त्याची प्रवृत्ति होती. या बाबतींत त्यांची पद्धति अर्वाचीन जगाच्या पुढें आहे. सामान्यविद्याविकासानें भिन्न भिन्न लोकांना सदृश करून त्यांचें ब्राह्मणांनीं एकीकरण केलें; आणि ही त्यांची पद्धति सर्व जगास आजहि आदर्शभूत होईल यांत शंका नाहीं. संस्कृतींच्या भिन्नतेमुळें जे सामाजिक व राजकीय प्रश्न उत्पन्न होतात ते सोडविण्यास आजचें जग असमर्थ आहेसें दिसत आहे, पण प्राचीन भारतीयांनीं ते प्रश्न केव्हांच सोडविले होते. राष्ट्रीकरण करणें किंवा सर्व विश्व एक संस्कृतीखालीं आणणें या क्रिया करण्यासाठीं ब्राह्मणांची निरपेक्षवृत्तीनें केलेली विद्यासंघटनाच कारण झाली. प्राचीन ब्राह्मणांच्या पद्धतीचेंच विस्तरण करणें ही गोष्ट आजहि अवश्य आहे.

ब्राह्मणांस निरनिराळ्या काळीं राजाश्रय थोडाबहुत असे; तथापि तो केवळ राजाश्रयावर अवलंबून राहणारा वर्ग नव्हता. तसा तो वर्ग असता तर तो केवळ शास्त्रनिरक्षर किंबहुना शास्त्रद्वेष्टा तथापि स्तुतिपाठक असा वर्ग बनला असता. तो वर्ग तसा बनला नाहीं याचें कारण तो वर्ग अत्यंत स्वाभिमानी आणि आपल्या विद्येमुळें आपणांस उत्पन्न होणाऱ्या गौरवाचा आग्रही संरक्षक होता व त्यामुळें दारिद्र्यास न भिणारा होता. त्यामुळेंच त्याला विद्याविकास आणि संस्कृतिविकास या गोष्टी शक्य झाल्या.

**३२५. विद्यासंरक्षक वर्गास प्राधान्य देणाऱ्या समाजाची उच्चता.**

३२५. सत्ताधीश मनुष्यानें देखील ब्राह्मणांस पूज्य मानावें ही गोष्ट समाजाच्या संस्कृतीच्या अत्यंत उच्चतेची दर्शक आहे; आणि जो समाज विद्याविकासी वर्गास याप्रमाणें प्राधान्य देणारा आहे तो इतर सर्व समाजांहून श्रेष्ठ आहे, यांत शंका नाहीं. ज्या वर्गास गौरव उत्पन्न होतो त्या वर्गांतील कांहीं व्यक्ति लायकी नसतांना देखील आदरास पात्र होतात, ही गोष्ट अनिवार्य आहे. त्याप्रमाणें नालायक ब्राह्मणास देखील लोकांकडून मान्यता मिळाली तर त्यांत नवल नाहीं. त्या प्रकारच्या स्थितीनें मुख्य वर्गाच्या मान्यतेस आक्षेप उत्पन्न होत नाहीं. क्षत्रियास म्हणजे सत्तेस आणि वैश्यास म्हणजे पैशास मान देणें या गोष्टी इतक्या स्वाभाविक आहेत कीं त्या उत्पन्न करण्यास प्रयत्न मुळींच लागत नाहीं. ज्या समाजामध्यें क्षत्रियवैश्यांपेक्षां विद्याविकासक वर्गासच अधिक मान आहे त्या समाजाची मोठ्या प्रयत्नानें साध्य केलेली अत्यंत स्पृहणीय प्रगति आहे, यांत शंका नाहीं.

**३२६. ब्राह्मणगौरवाविरुद्ध जनता उठविण्यांत परकीयांचा हात.**

३२६. ब्राह्मण जातींच्या महत्वाचें समर्थन एकंदर इतिहास पहातां होऊं शकतें, एवढेंच नव्हे तर विद्यासंरक्षक वर्गाचा गौरव हें एक अत्यंत महत्त्वाचें समाजनियमनाचें तत्त्व भारतीयांनीं जागृत ठेवलें होतें ही गोष्ट मान्य करावी लागते. भारतीयांच्या संस्कृतीस मारून टाकावें, त्याच्या समाजाविरुद्ध मुसलमानांस उठवावें निदान त्यांवर कृपा दाखवावी आणि भारतीयांच्या समाजहननासाठीं भारतीय समाजाचे केंद्रीभूत असलेला जो ब्राह्मणवर्ग त्यापासून जनता फोडावी या तऱ्हेची वृत्ति इंग्रजांनीं धरल्यामुळें आज समानतेच्या नांवानें उत्पन्न केलेल्या तत्त्वांच्या आणि धर्मसुधारणेच्या नांवाखालीं ब्राह्मणद्वेषाचा प्रसार इंग्रजांनीं त्यांच्याकडे हिंदुस्तानची पेशवाई आल्यापासून करविल्यामुळें विद्यासंवर्धक वर्गाचा गौरव ही समाजांतील अत्यंत आवश्यक गोष्ट ती आक्षेपार्ह वाटूं लागली आहे. विद्येमुळें पूज्य होणाऱ्या वर्गांत नवीन सुविद्यांचा समावेश करविणें यासारख्या सुधारणांची आवश्यकता आहे यांत शंका नाहीं. तथापि विद्याविकासी वर्गास समाजप्राधान्य असणें ही गोष्ट अश्रेयस्कर नाहीं. पूजनविषयक अत्यंत स्वातंत्र्य देणारी, मतविषयक वैविध्यांत आनंद मानणारी संस्कृति ब्राह्मणांनीं प्रयत्नानें निर्माण केली आणि त्या संस्कृतीइतकी उदार संस्कृति जगांत दुसरी कोणतीच नाहीं. भारतीय संस्कृतीमध्यें परकीय संस्कृतीचा अंतर्भाव होत नव्हता असें नाहीं. परकीयांच्या विद्येचें महत्त्व समजल्यानंतर ती विद्या ब्राह्मणाकडून

घेतली जाई, आणि परकीयांचा गौरव केला जाई. आणि विद्यावर्धक वर्ग यवन असला तरी त्यास पूज्यता प्राप्त होई याविषयीं गर्गमुनींचें वचन अलबेरुणीनें अवतरून लोक-विश्रुत केलेंच आहे.

### ३२७. ब्राह्मणांची इतर लोकांबरोबर वागणूक.

३२७. ब्राह्मणांनीं इतर जनतेस वाईट रीतीनें वागविलें याबद्दल पुरावा मुळींच नाहीं. ब्राह्मणांची उच्चत्व सांगणारीं वाक्यें जेव्हां अत्यंत दर्पोक्तीची भाषा वापरीत तेव्हां त्यांची वागणूक दुष्टपणाची होतो असें मुळींच नाहीं. ज्या वर्गाच्या हातीं सत्ता नाहीं, त्या वर्गाला आपलें प्राधान्य जनमान्य करविण्यासाठीं आत्यंतिक अतिशयोक्तीची भाषा वापरणें आवश्यक होतें आणि त्यामुळें तीं वाक्यें आज अनेकांना बोंचतात. लोकांस ब्राह्मणाविरुद्ध उठविणें हिंदुस्थानच्या शत्रूंना आवश्यक असल्यामुळें त्यांनीं ग्रंथोक्त वाक्यांचा विपर्यास केलेला आहे. इतर सर्व देशांतील धार्मिक व्यवहार पाहिला असतां हिंदुस्थानांतील धार्मिक व्यवहारच समाजाला अत्यंत श्रेयस्कर झाला. मतभिन्नतेसाठीं माणसें जाळणें वगैरे क्रिया ज्या देशांतील लोकांनीं केल्या त्या देशांतील लोकांनीं ब्राह्मणांनीं दुसऱ्यावर जुलूम न करतां आपल्या कर्तृत्त्वावरच आपलें समाजप्राधान्य राखलें याबद्दल नेहमीं ब्राह्मणांविरुद्धच आरडाओरड करावी याचें आश्चर्य स्वाभाविकपणें वाटावें. तथापि विचार केला असतां तें वाटण्याचें कारण नाहीं. कारण ब्राह्मणांनीं स्थापन केलेली समाजपद्धति युरोपियांस बोंचत आहे. आपण कर्तृत्त्व मोठें केलं तरी समाजदृष्ट्या आपली किंमत म्लेच्छापेक्षां अधिक नाहीं ही गोष्ट युरोपियांस बोंचल्याशिवाय कशी राहील. बौद्धसमाजांत मात्र इंग्रजांना आपली उच्चजातीयता मिरवितां येते. तशी हिंदूंनीं वसलेल्या देशांत मिरवतां येत नाहीं.

### ३२८. ब्राह्मणांची स्वाध्यायप्रवृत्ति आणि तीस प्रेरक होणारी सामाजिक स्थिति.

३२८. कुरुयुद्धापासून बुद्धाच्या कालापर्यंत ब्राह्मणांची विद्या एकसारखी वाढत होती. वेदांचें संग्रहण झालें, संग्रहणानंतर त्यांचा अभ्यास अधिक होऊन त्यांच्यापासून वेदांगें तयार झालीं. सूतविद्या एकीकृत केली गेली आणि इतिहास, पुराणें म्हणून जें साहित्य उपलब्ध झालें त्याचें संस्कृतीकरण झालं. शब्दोत्पत्ति, व्याकरण, मीमांसा या सारख्या शास्त्रांचा विकास झाला. शिवाय तत्त्वज्ञानस्वरूपी दर्शनें निर्माण झालींच. या तऱ्हेच्या बौद्धिक आयुष्यक्रमाचें पिढ्यान् पिढ्या सातत्य कसें राहिलें आणि हें कार्य चालू असतां त्यांची उपजीविका कशी चालू होती या सर्व गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. मनुष्य केवळ जेवण्याखाण्यास मिळालें म्हणजे कार्य करीत रहातो असें नाहीं. पोटावारी राहून शास्त्रविकास होत नाहीं. समाजामध्यें द्रव्योत्पत्तीच्या उपायाचें आणि द्रव्यामार्फत मिळणाऱ्या सुखाचें विविधत्त्व असतां केवळ पोटावारीं राहून कोण कार्यें करीत रहातो ? तथापि ब्राह्मणवर्ग मात्र तसें करीत राहिला, याला कारणें अनेक होतीं. आश्रमवासी ब्राह्मणांस व त्यांच्या स्त्रियांस भोंवतालीं श्रीमान आणि डौलानें वागणारा वर्ग आणि त्याच्या स्त्रियांचीं भूषणें हीं जर दररोज दिसत असतीं तर ब्राह्मणांचें विद्येच्या विकासाकडे लक्ष राहिलें नसतें, आणि त्यांचें लक्ष जरी लागलें असतें तरी त्यांच्या स्त्रियांनीं त्यांना विद्याविकासाऐवजीं द्रव्यप्राप्तीकडेसच पिटाळलें असतें. विद्याव्यवसायी लोकांची वसाहत आश्रम स्थापना करून निराळी करावी आणि सर्व 'जनतेनें या गोष्टीबद्दल त्यांस समाजांत अग्रस्थान द्यावें या गोष्टी त्यामुळें अत्यंत महत्वाच्या ठरतात. इतर समाजापासून वियुक्त अशा विद्याविकाससाधकांच्या आश्रम नामक वसाहती झाल्या नसत्या तर त्यांनीं जें कर्तृत्व केलं तें साध्य झालें नसतें.

### ३२९. ब्राह्मण वर्ग आणि राजकारण.

३२९. ब्राह्मण जातीचा राजकारणांत प्रवेश बुद्धपूर्व कालींच झालेला होता आणि कांहीं ब्राह्मण राजे देखील होते; तथापि त्यांची विद्या राजकारणाकडे बरीच उत्तरकालीं वळलेली आहे. धर्मशास्त्र हें कल्पशास्त्राचें अंग म्हणून संवर्धित झालें, आणि चारहि वर्णांचीं कर्में सांगण्याच्या निमित्तानें राजव्यवहार धर्मशास्त्रांत शिरला. राजकारणाचें मुख्य शास्त्र म्हटलें म्हणजे अर्थशास्त्र होतें. तथापि ब्राह्मणांनीं जेव्हां राजकारण हातीं घेण्यास प्रारंभ केला तेव्हां त्यांच्यामध्यें विद्याविकास चांगला झाला होता आणि वादविवादपद्धति आणि तर्कशास्त्र हीं विकास पावलीं होतीं आणि त्यामुळें त्यांच्या या अधिक सुविद्य वर्गाचें दरबारांत स्वाभाविकपणें वजन वाढलें. अर्थशास्त्राचे अनेक आचार्य महाभारतांत उल्लेखिले आहेत, आणि त्याप्रमाणेंच कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत दिलेले आहेत. त्यामुळें राजकारणामध्यें ब्राह्मणांच्या ध्येयांचा प्रवेश झाला आणि ब्राह्मणी विद्येस राजाश्रय मिळाला; आणि त्यामुळें कालांतरानें वैदिक विद्येचें स्थान नगरें देखील बनलीं. तक्षशिला ही राजधानी होती, पण ती विद्येचेंहि महत्त्वाचें स्थान होती हें दाखविणारे उतारे मागें दिलेच आहेत.

### ३३०. कुरुयुद्धोत्तर ब्राह्मणविद्येचा आणि तदनुषंगिक समाजस्वरूपाचा इतिहास.

३३०. कुरुयुद्धकालीं ब्राह्मणग्रंथरचना पुरी झाली नव्हती हें पारीक्षित जनमेजयाच्या ऐतरेय ब्राह्मणांतील उल्लेखावरून

उघड आहे. त्या कालांत ऋग्वेदसंहिता आजच्यापासून भिन्न होती हें ज्या ऋग्वेदसूक्तांचा ऐतरेय ब्राह्मणांत विनियोग सांगतांना प्रतीकांनीं उल्लेख केला आहे त्या ऋचा ऋग्वेदांत नाहीं यावरून उघड आहे. आश्वलायन श्रौतसूत्र हा सूत्रग्रंथ असल्यामुळें ऐतरेय ब्राह्मणापेक्षां उत्तरकालीन आहे हें स्पष्ट आहे, आणि ज्याअर्थी आश्वलायन श्रौतसूत्र दहाही मंडलें पूर्णपणें संस्थापित झाल्याचें दाखवीत नाहीं त्याअर्थी ऋग्वेद्यांच्या शाकलसंहितेची पूर्णता कुरुयुद्धपूर्व कालीं झालेली नव्हती, एवढेंच नव्हे तर त्यानंतर अनेक पिढ्या किंबहुना शतकें झाली नव्हती.

व्यासशिष्यामध्यें जैमिनि, वैशंपायन इत्यादि मंडळींस सूतसंस्कृतीच्या इतिहासांत महत्त्व आहे त्याप्रमाणेंच वैदिक संहिता व वेदशाखा यांच्या घटनांत महत्त्व आहे. व्यासशिष्यांचा काल कुरुयुद्धानंतरचा होय. कुरुयुद्धानंतर थोडा काल यज्ञधर्म फोफावला आणि पुढें तो स्तंभित झाला. जनमेजयाचें नांव ब्राह्मण ग्रंथांतून अनेक श्रौतविषयक प्रश्नांवरील चर्चेमध्यें येतें, तथापि त्याचें नांव श्रौतसंस्थांच्या इतिहासांतील शेवटचा महत्त्वाचा पुरुष या रीतीनें पुराणांत येतें. अश्वमेध जनमेजयाचाच शेवटचा अशा तऱ्हेची पुराणांत वृत्ति दिसत आहे. यावरून आजचा श्रुति आणि पुराणें या दोन्ही प्रकारच्या वाङ्मयास मान देणारा धर्म तो कुरुयुद्धाच्या कालापासूनच व्यवस्थितपणें स्थापित झाला असें धरण्यास हरकत नाहीं. भारतीयांच्या धर्मास त्या काळीं जें रूप प्राप्त झालें तेंच जवळजवळ आजहि आहे.

श्रौतसंस्थांच्या विकास जाणणाऱ्या त्या व्यक्तींचीं नांवें आज आपणांस दिसत आहेत ( वेदविद्या पृ. २१० पहा ). त्यांतील कांहीं व्यक्ती कुरुयुद्ध पूर्व असतील तर कांहीं नंतरच्या काळांतील असतील. या त्रिरात्राची संस्था सांगणारा गर्ग, चतुरात्राची संस्था स्थापन करणारा जमदग्नि हे कुरुयुद्धपूर्व असतील तर वृष्णिपुत्र गोबल, उदन्युपुत्र मुंडिभ हे कुरुयुद्धोत्तर काळांतले असावेत.

वेदविद्येचा अभ्यास अत्यंत विविधप्रकारें झाला. वेदांगें वाढलीं, त्यांच्या अभ्यासकांच्या परंपरा स्थापित झाल्या भाषाशास्त्रें व तर्कशास्त्रें वाढलीं, हा विकास ब्राह्मणांची सांस्कृतिक प्रगति दाखवितो.

तथापि ज्ञानसंवर्धक वर्ग केवळ वेदांच्या आश्रयानेंच आपली विद्या वाढवीत होता असें नाहीं. उपनिषदें मूळची निराळ्या लोकांची विद्या असून ती पुढें वैदिक परंपरेंतील लोकांनीं संग्रहित केली असें दिसतें. शास्त्रज्ञान सांपडेल तेथून संग्रहित करावें ही प्राचीन आचार्यांची वृत्ति एकसारखी दिसत आहे. मीमांसाशास्त्र वाढलें तें देखील ब्राह्मणें व उपनिषदें या दोन भिन्न प्रकारच्या साहित्यावर भिन्न लोकांकडून अभ्यास होऊन वृद्धिंगत झालें असावें. ब्राह्मणें हें जुनें वाङ्मय, त्याबरोबर आली ती पूर्वमीमांसा; आणि उपनिषदें हें नंतर स्वीकारलेलें वाङ्मय, त्याबरोबर आलेली ती उत्तर मीमांसा, असा अर्थ गर्भित होता. वेदांगांशिवाय जें वाङ्मय वाढलें तें म्हटलें म्हणजे दर्शनाचें होतें. यांतच दोन्ही मीमांसा समाविष्ट होत. हें दर्शनवाङ्मय वेदपूर्वकालापासून आपलें स्वतंत्र अस्तित्व राखून आहे.

तार्किकांच्या भिन्न मतांचे प्रकार वैदिक वाङ्मयापेक्षां देखील अधिक विस्तृततेनें बौद्ध वाङ्मयांत विवेचिलेले आहेत.

वैदिकांचे संप्रदाय किती होते याचा पूर्ण पत्ता लागणें शक्य नाहीं. चरणव्यूहांत सांगितलेले संप्रदाय त्या मानानें फारच थोडे आहेत. आज चरणव्यूहांत उल्लेखिलेले संप्रदाय देखील सांपडत नाहींत. तथापि ज्यांचा उल्लेख अनेक वैदिक ग्रंथांतून येतो अशांपैकीं पुष्कळांची परंपरा बुद्धपूर्व कालींच नष्ट झाली आहे. कांहीं संप्रदाय मूळचे वैदिक नसतां उत्तरकालीं वैदिकांनीं त्यांना स्थान दिल्यामुळेंच त्यांची आठवण आज राहिली आहे; अशामध्यें वैखानसांचा संप्रदाय येतो. त्यांचें ऋग्वेदांत एक सूक्त घेतलें त्यामुळें त्यांचा उल्लेख होऊन त्यांची स्मृति जिवंत राहिली. पाणिनीनें उल्लेखिलेले अनेक संप्रदाय इतरत्र कोठें मुळींच सांपडत नाहींत. त्यांची हजेरी चिंतामणराव वैद्यांच्या संस्कृत वाङ्मयाच्या इंग्रजी इतिहासांत घेतलेली आहे.

पाणिनीपासून पतंजलीच्या कालापर्यंत म्हणजे सुमारें ५००।६०० वर्षें संस्कृतभाषेची एकसारखी वाढ होत होती. ती होत असतांना वेदाभ्यासाशीं निगडित झालेलें असें जें वाङ्मय आहे त्याचा इतिहास लिहिला जातो. तथापि त्याच वेळच्या वैय्याकरणांस जें वाङ्मय दृष्टीस पडलें होतें तें केवळ वेदमूलकवाङ्मयापेक्षां अधिक होतें. त्या काळाच्या वाङ्मयानें दृष्ट, भोक्त, उपज्ञात, आणि कृत, आणि व्याख्यान इत्यादि प्रकार वैय्याकरणांनीं उल्लेखिले आहेत.* यावरून जेव्हां वेदमूलक शास्त्रें संवृद्ध होत होतीं तेव्हां तीं इतर वाङ्मयाकडे देखील लक्ष देत होतीं आणि आपली संस्कृति व्यापक आणि एकरूप करण्याचा प्रयत्न करीत होतीं हें स्पष्ट होईल. संस्कृत वाङ्मय आणि प्राकृत वाङ्मय आणि विद्या यांचेंहि एकीकरण होत होतें. त्या प्रयत्नांच्या कर्त्यांत वररुचीचें स्थान महत्वाचें आहे.

* Dr. Radhakumud Mukarjee, Ind. Anti, February 1923.

प्रकरण ३७ वें.

# समाजप्रगति आणि धर्मशास्त्र.

## ३३१. सामाजिक इतिहासांत धर्मशास्त्राची योग्यता.

३३१. विशिष्ट लोकांच्या संस्कृतीची योग्यता ठरविण्याच्या दृष्टीनें महत्वाचें शास्त्र म्हटलें म्हणजे त्यांचें समाजशासनाचें शास्त्र होय. समाजशासनाच्या शास्त्रामध्यें नेहमीं असें होतें कीं, वागण्याचीं ध्येयें मनुष्य उच्च ठरवितो परंतु प्रत्यक्ष वागणूक त्या ध्येयांपेक्षां कमी दर्जाची असते. राजा, मंत्री, ही सर्व मंडळी कायद्याचें उच्चत्व कबूल करतील, तथापि वागणुकींत कायदा गुंडाळून ठेवतील, आणि आपलें वर्तन त्या शासन-नियमाच्या कक्षेंत आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करतील. उच्च दर्जाचा कायदा कायदेमंडळें देखील मोडतात. आणि त्यामुळें दुय्यम कायदेमंडळाची कृती न्यायासनापुढें न्यावी लागते. राजानें सोडलेल्या हुकुमाची जागा संस्थानी कायद्यांनीं पटकावली आहे. आणि ज्या कायद्यास मान देण्याचें राजे लोक सांगत त्या कायद्याचें ते जसें अतिक्रमण करीत, त्याप्रमाणें आज संस्थानें मूलभूत कायद्याचें अतिक्रमण करूं इच्छितात. अमेरिकेच्या मूल घटनेचें तत्व हें कीं, जातिविशिष्ट कायदा करावयाचा नाहीं; म्हणजे निग्रोंना अमूक गोष्टीची मनाई आहे वगैरे गोष्टी अमेरिकेंत कॉन्स्टि-ट्यूशनच्या विरुद्ध आहेत; तथापि त्याप्रकारचे कायदे अमे-रिकेंतील संस्थानें वारंवार करतात. निग्रोंनीं त्या गोष्टी अंतिम न्यायासनापुढें नेल्या म्हणजे तो नियम रद्द ठरतो. पण अंतिम न्यायासनापुढें जातां जातां वीस पंचवीस वर्षे सहज निघून जातात. तोंपर्यंत तो बेकायदेशीर कायदा चालूच असतो. हिंदुस्थानामध्यें धर्मशास्त्र आणि नीतिशास्त्र ऊर्फ अर्थ-शास्त्र हीं राजव्यवहारांचें नियमन करणारीं शास्त्रें होतीं. भार-तीयांच्या शत्रूंनीं भारतीयांच्या धर्मशास्त्रावर अज्ञानानें किंवा बुद्धिपुरस्सर झोड उठविली आहे आणि धर्मशास्त्रकार हे दुष्ट बुद्धीचे लोक होते असें दाखविणाचा प्रयत्न केला आहे त्यांच्या लिखाणावर विश्वास ठेवल्यामुळें आपल्याहि कांहीं लोकांचीं मतें तशा प्रकारचीं होत आहेत. उलटपक्षीं प्राचीन धर्मशास्त्रकार अत्यंत योग्य पुरुष होते असें माझें मत आहे; आणि यासाठीं धर्मशास्त्रकारांच्या प्रयत्नाचें स्थूल स्वरूप आणि त्यांच्या नियमांच्या मागें असलेलें समाजशास्त्र यांवर विवेचन करणें प्राप्त आहे.

## ३३२. श्रीकृष्णाचा धर्म आणि जैमिनीचा धर्म.

३३२. धर्मशास्त्र हें मूलतः समाजनियमनाचें शास्त्र नव्हतें. 'धर्म' याचा अर्थ कर्म असा होतो. 'तानि धर्माणि प्रथमानि आसन्' या ऋक्पादांत त्याप्रमाणेंच सर्व ऋग्वेद-भर 'धर्म' याचा अर्थ 'कर्म' असाच होता. वैदिक वर्गांत धर्म याचा अर्थ कर्म असा जरी असला तरी सूत-संस्कृतीच्या महाभारतांत त्याचा अर्थ समाजसंरक्षक गोष्टी असाच होता. यासंबंधाचा एक श्लोक लोकमान्य टिळकांनीं आपल्या व्याख्यानांत वारंवार आणून लोकप्रिय केला होता. तो श्लोक म्हटला म्हणजे—

**धारणाद्धर्ममित्याहुः धर्मो धारयते प्रजाः ।**
**यत्स्याद्धारणसंयुक्तं स धर्म इति निश्चयः ।**

( धारणेमुळें ते त्यास धर्म म्हणतात. धर्म प्रजेचें संरक्षण करतो. जें धारणपर असेल तें निश्चयें करून धर्म होय. )

जैमिनीनें वेदांचें नित्यत्व आणि चोदनापरत्व जरी आग्र-हानें सिद्ध केलें तरी त्यामुळें तो समाजाच्या प्रगतीच्या विरुद्ध होता असें दूषण त्यास देतां येणार नाहीं. त्यानें उलट समाजाच्या व्यावहारिक धर्मास स्वातंत्र्य दिलें. तो श्रौतक्रिया म्हणजे तीन अग्नींवरील करावयाची यज्ञक्रिया हाच काय तो धर्म समजे. बाकी इतर गोष्टी त्याच्या मतें केवळ व्यवहार होत्या. त्या गोष्टींमध्यें वेदांचें बंधकत्व त्याच्या दृष्टीनें नव्ह-तेंच. यज्ञ करावयाचा झाल्यास तत्संबद्ध क्रिया मात्र जशा श्रुतींत सांगितल्या असतील तशा करा, इतर बाबतींत वेदां-कडे जाण्याचें कारणच नाहीं, त्या सर्व व्यवहार होत, त्या तुम्हीं आपल्या हिताहिताच्या दृष्टीनें करा अशी त्याच्याकडून मोकळीक होती. म्हणजे ज्यास आपण धर्मशास्त्र म्हणतों त्या धर्मशास्त्राच्या बाबतींत जैमिनीनें स्वातंत्र्य दिलें होतें.

## ३३३. धर्मशास्त्रकारांची प्रगमनशीलता—

३३३. 'धर्म म्हणजे तीन अग्नींवरील कर्में' असें जे म्हणत ते इतर सामाजिक बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य देते झाले, आणि धर्म म्हणजे समाजधारणा करण्याचें शास्त्र असें जे म्हणत त्यांना आपण उपदेशिलेलीं कर्में 'धारणसंयुक्त' आहेत किंवा नाहींत हें पहाणें आलेंच. धर्म या नांवाखालीं चालू असलेले सर्व प्रकार समाजधारणापर होते असें नाहीं, तथापि धर्माधर्मविवेचना-

साठीं समाजधारणेसारखें तत्त्व डोळ्यांसमोर असलें म्हणजे जुन्या अनवश्यक गोष्टी नाहींशा करण्यास आणि नव्या गोष्टी आणण्यास वाट मोकळी होते. त्यामुळें धर्मशास्त्रांत प्रगमनशीलतेस वाव मिळाला आहे. जसा काळ बदलेल तसा नवीन नियम सांगावा इत्यादि क्रिया धर्मशास्त्रांत फारच झाल्या आहेत. उत्तरकालीन धर्मशास्त्रकार कांहीं सामाजिक बाबतींत समाजास विनाकारण जास्त जखडते झाले आहेत हेंहि खरें आहे. उदाहरणार्थ, लग्नाच्या बाबतींत गोत्रविषयक नियम त्यांनीं जास्त संकुचित केले, तथापि एकंदरींत त्यांच्यामध्यें प्रगमनशीलता होती ही गोष्ट लपत नाहीं. त्यांनीं ज्या विषयावर धर्मशास्त्रांत कांहीं नियमच नव्हते अशा अनेक विषयांवर धर्मशास्त्रांत नियम घातले आहेत. बौधायन, वसिष्ठ इत्यादि जुन्या धर्मशास्त्रकारांचे विवेचनविषय आणि मनु, याज्ञवल्क्य, बृहस्पति व नारद यांचे विवेचनविषय यांमध्यें जें अंतर दिसून येतें तें मुख्यतः हें आहे कीं, अधिक उत्तरकालीन धर्मशास्त्रकार आपले विवेचनविषय पूर्वकालीन धर्मशास्त्रकारांपेक्षां अधिक व्यापक करीत आहेत.

हिंदूंच्या धर्मशास्त्रांत जो एक विशेष भाग उत्तरोत्तर वाढत चाललेला दिसतो तो हा कीं, त्यांच्यामध्यें सोवळ्या–ओवळ्याचे नियम एकसारखे वाढत चालले आहेत. हा परिणाम कशाचा, याचा विचार करतां असें म्हणावें लागेल कीं, कांहीं अंशीं 'शौचधर्म'विषयक नियम हा खरोखर समाजविकास आहे. आरोग्यविषयक स्थिति चांगली रहावी म्हणून स्पर्शास्पर्श विचार जगांत वाढतच आहे. तथापि हा विचार वाढत असतां लोकांचें आरोग्यशास्त्रच जर प्रगत झालें नाहीं तर मात्र ते नियम आरोग्यशास्त्राचे न राहतां, केवळ विचार न करतां मानावयाचे आणि तत्त्व बाजूस ठेवून बाह्यस्वरूप तेवढें पाळावयाचें असे विधी बनतात. समाजाच्या शौचकर्मविषयक भावना वाढल्या पण शुचि किंवा अशुचि सांगणारें शास्त्र वाढलें नाहीं म्हणजे वेडा स्पर्शास्पर्शविचार समाजांत बोकाळतो. स्वच्छ किंवा अस्वच्छ हें न पाहतां शूद्रस्पृष्ट किंवा ब्राह्मणस्पृष्ट हा विचार उत्पन्न झाला, आणि उत्तरकालीन धर्मशास्त्रांचे ग्रंथ याच कारणामुळें आजच्या लोकांस आक्षेपणीय झाले आहेत.

धर्मशास्त्राचें वाङ्मय पुष्कळच आहे. त्या सर्व वाङ्मयांतील सर्व सामाजिक तत्त्वें येथें मांडण्यास अवकाश नाहीं. तथापि धर्मशास्त्रांतील एकच ग्रंथ घेऊन त्यांत समाजशास्त्राची काय स्थिति दृष्टीस पडते हें पाहूं गेल्यास काम जरासें कमी होतें. यासाठीं धर्मशास्त्रावरील अत्यंत व्यापक ग्रंथ जो मनुस्मृति * त्यांत येणाऱ्या सामाजिक विचारांपैकीं कांहीं मुख्य विचारांकडे लक्ष वेधणें ही क्रिया येथें करतों.

### ३३४. धर्माधर्मनिश्चयाचें आणखी एक साधन.

३३४. धर्म किंवा अधर्म हें ठरवावयाचें कशावरून ? या प्रश्नाचें मनुस्मृति उत्तर देत आहे तें असें कीं, "ज्याचा परिणाम सुखांत होतो तो धर्म", आणि "ज्याचा परिणाम दुःखांत होतो तो अधर्म." धर्माधर्मविवेक हा कर्मांच्या विवेचनासाठीं पाहिजे आहे. म्हणजे सुख कशानें होतें व दुःख कशानें होतें हें पाहूनच कर्म चांगलें कीं वाईट हें ठरविलें पाहिजे (अध्याय १ श्लोक २६). या बाबतींत मनुस्मृतीचें वचन अगदीं अर्वाचीन लोकांसहि मान्य होणारें आहे. सुखदुःखाचा विचार जसजसा अधिकाधिक सूक्ष्म होत जाईल, तसतशी धर्माधर्मविवेकांतहि सुधारणा झाली पाहिजे हें कोणीहि मान्य करील.

### ३३५. धर्माचरण हें स्वाभाविक कीं प्रयत्नमूलक.

३३५. प्राचीन धर्मशास्त्राच्या मूळ कल्पनांतील हें वचन जरी सर्वमान्य झालें, तरी प्राचीनांच्या अनेक कल्पना मान्य होण्याजोग्या नाहींत. उदाहरणार्थ, प्रत्येक प्राणिमात्राच्या ठायीं कांहीं गुण प्रजापतीनेंच नियुक्त केले आहेत त्याप्रमाणेंच धर्माचरण व अधर्माचरण नियुक्त केलें आहे, हें वचन घ्या.

**हिंस्राहिंस्रे मृदुक्रूरे धर्माधर्मावृतानृते**
**यद्यस्य सोऽदधात्सर्गे तत्तस्य स्वयमाविशत्**
(१. २९)

प्रस्तुत श्लोकांत स्मृतिकर्त्यानें जो घोटाळा केलेला आहे तो असा–हिंस्रपणा किंवा अहिंस्रपणा, मृदुता किंवा कठोरता हे गुण जसे स्वाभाविक आहेत तसेच धर्मानें वागणें किंवा अधर्मानें वागणें हेहि आहेत. सृष्टिकर्त्यानें हे गुण सर्गप्रसंगींच घातले आहेत. या बाबतींत मनुस्मृतींतील विचार आणि ॲरिस्टॉटलचे विचार यांत सादृश्य आहे. ॲरिस्टॉटलहि गुलामगिरी ही स्वाभाविक म्हणजे निसर्गोत्पन्न समजे. सत्यानें वागणें किंवा असत्य आचरणें हे गुण स्वाभाविक आहेत असें स्मृतिकारानें धरलें आहे. कांहीं व्यक्तींचा किंवा जातींचा असत्यानें वागणें किंवा अधर्मानें वागणें हा धर्मच आहे असें सांगणें अत्यंत भयंकर तत्त्व आहे. असें सांगितल्यानें, त्यांच्यासाठीं धर्मविवेचनाचा प्रश्नच उरत नाहीं.

---

* मनुस्मृतीचा काळ ब्यूलरनें ख्रिस्तपूर्व २०० पासून ख्रिस्तोत्तर २०० पर्यंत केव्हांतरी असा धरला आहे. डॉ. केतकर यांनीं ख्रिस्तोत्तर २२७ ते ३२० या काळांत केव्हांतरी असा धरला आहे. History of Caste in India, Vol. I. Ithaca N. Y. U. S. A.

खरोखर वस्तुस्थिति अशी आहे कीं, सत्यानें आणि धर्मानें वागण्याचे गुण हे मनुष्यास शिक्षणानें व अभ्यासानें त्याचप्रमाणें ज्ञानविकासानें वाढत असतात. तथापि या प्रकारचा अनुभव ज्या प्राचीनांस नव्हता त्यांस असें वाटणें स्वाभाविक आहे कीं, धर्मानें किंवा सत्यानें वागण्याचा गुण देखील स्वाभाविक आहे. हेंच तत्त्व अधिक स्पष्ट करण्यासाठीं त्याच अध्यायाच्या पुढील श्लोकांत ( १. ३० ) असें उदाहरण घेतलें आहे कीं, ज्याप्रमाणें ऋतुऋतुपरत्वें आम्रादींच्या ठायीं मंजरीसारखीं चिन्हें धारण करितात, त्याचप्रमाणें देही आपले अंतर्भूत गुण व्यक्त करतो.

प्रयत्नानें मनुष्यास उच्च नैतिक आचरण करतां येतें व धर्मानुचरण उत्पन्न होतें या गोष्टी प्राचीनांस अगदीं पारख्या होत्या अशांतला भाग मुळींच नाहीं. कारण तसें असतें तर नीति व धर्म यांच्या प्रवचनाची आवश्यकताच नव्हती. ज्याअर्थी ते त्यावर इतके परिश्रम करीत त्याअर्थी उपदेश व शिक्षण यांचें महत्त्व ते ओळखीत होते. असें असतां वरील प्रकारची त्यांची कल्पना होण्याचें कारण येणेंप्रमाणें दिसतें.—" धर्म " या शब्दाचा एक अर्थ वस्तूच्या अंतर्गत स्वाभाविक गुण असा आहे व " धर्म " याचा दुसरा एक अर्थ कर्तव्यकर्म असा आहे. वस्तूंचें बाह्य कर्म हा वस्तूंच्या अंतर्गत जे गुण असतील त्यांचाच विकास आहे अशीहि कोणी मांडणी केली तरी ती चूक होणार नाहीं. असें असतां ज्या कनिष्ठ जाती आपला आयुष्यक्रम सोडीत नाहींत त्यांचा तो धर्म आहे असें वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. अनेक असंस्कृत जाती व अत्यंत निकरानें प्रयत्न करणारे व अत्यंत अल्प फल अपेक्षिणारे जे यूरोप व अमेरिकेंतील समाजसुधारक आहेत त्यांना समाजांतील कनिष्ठ वर्ग, त्यांच्या आयुष्यक्रमांत पालट करण्याच्या बाबतींत जर निराश करतात तर प्राचीनांस असें वाटणें शक्य आहे कीं, चोरी करणें व अधर्माचरण हा पुलिंद, बर्बर इत्यादि जातींचा धर्म म्हणजे स्वभाव आहे. पण त्याचा अर्थ चोरी व अधर्माचरण हा त्यांचा धर्म म्हणजे कर्तव्यकर्म आहे असा धर्मशास्त्रकारांचा आशय मुळींच नाहीं. जर या जातींच्या अंगांत असा " धर्म " आहे तर तो उत्पन्न कसा झाला? तर धर्मशास्त्रकार याचें असें स्पष्टीकरण करील कीं तो त्यांच्यांत परमेश्वरी संकल्पानें तद्विषयक गुण शिरून उत्पन्न झाला. या तऱ्हेची एकदां समजूत सामान्य लोकांत झाली म्हणजे ती समाजांतील अधिक अभागी वर्गांच्या उन्नतीस अपकर्षक आहे यांत शंका नाहीं.

### ३३६. धर्माचा युगानुयुग लोप.

३३६. धर्म पूर्वी चतुष्पाद होता. पण तो कलियुगांत एकपाद उरला आहे ( मनु. १. ८१. व पुढें ) असें जें धर्मशास्त्रकारांनीं मांडलें आहे त्याचें स्पष्टीकरण फारसें कठीण नाहीं. आपले पूर्वज आपल्यापेक्षां अधिक चांगले होते व गेला दिवस सोन्याचा होता अशा तऱ्हेची इतिहासाविरुद्ध विचारसरणी प्रत्येक लोकांत आढळून येते, त्याचाच हा प्रकार आहे. तथापि यापुढें जें युगधर्मविवेचन आहे तें अधिक चौकशी करावयास लावतें.

धर्माची कालपरत्वें भिन्नता

निरनिराळ्या कालांत धर्माचें स्वरूप निरनिराळें आहे असें तत्त्व धर्मशास्त्रकारांनीं वारंवार मांडलें आहे ( मनु. १. ८५–८६. ). त्यांत कृतयुगीं तप, त्रेतायुगीं ज्ञान, द्वापारयुगीं यज्ञ आणि कलियुगीं दान अशी मांडणी केली आहे ( १. ८६ ). या मांडणीचा आपणांस विचार करणें प्राप्त आहे. कारण यांत प्राचीनांची समाजविकासाची कल्पना व्यक्त झाली आहे.

द्वापार युगांत यज्ञ हाच धर्म होता व कलियुगांत दान हाच धर्म उरला आहे असें जें सांगितलें आहे ती गोष्ट त्यांच्या समोरचीच होती. द्वापारयुगांत म्हणजे कुरुयुद्धापूर्वी यज्ञसंस्था जोरानें चालू होती, व तेव्हांपासून ती लोपावयास लागली होती ह्या गोष्टी त्यांच्या आठवणींतल्या होत्या, एवढेंच नव्हे तर कांहीं अंशीं त्या फरकाकडे मनुस्मृतिकालीन ब्राह्मण खेदयुक्त दृष्टीनें पहात असत. लोक पूर्वी ब्राह्मणांकडून यज्ञ करवीत असत आणि आतां करवीत नाहींत, याबद्दल त्यांस दुःख होत असावें. आतां प्रश्न असा उरतो कीं ज्ञानधर्म आणि तापसधर्म यांस मनुस्मृतीनें व पौराणिकांनीं ऐतिहासिक पूर्वता कां दिली? या विषयीं स्पष्टीकरण आमच्या मतें अगदीं सोपें आहे. धर्मशास्त्रें व पुराणें हें सरस्वतीच्या पूर्वेकडील प्रदेशाचें वाङ्मय आहे. धर्मशास्त्रांवर वेदांपेक्षां इतिहासपुराणवाङ्मयाचाच परिणाम अधिक झाला आहे.

वैदिक वाङ्मयाचें संहितीकरण आणि इतिहासपुराणवाङ्मयाची जपणूक या क्रिया झाल्या त्या वैदिक वाङ्मयाची उत्पत्ति ज्या पंजाबांत झाली त्या स्थानीं झाल्या नाहींत तर मध्य देशांत झाल्या. आणि पंजाब म्हणजे पंचनददेश हा असंस्कृत स्थितींत राहिला. या पंचनदांतील निरनिराळ्या भागांस मद्र, आरट्ट आणि वाहिक इत्यादि नांवें होतीं आणि हा देश अधर्माचा म्हणून भारतरचनाकाळीं विख्यात होता हें कर्ण मद्रराज शल्याच्या उखाळ्या पाखाळ्या काढतांना सांगतो. या मध्य देशाचा इतिहास पाहूं गेलें असतां असाच सांपडेल कीं सूतवाङ्मय हें त्याचें प्रथमवाङ्मय होतें, आणि वैदिक वाङ्मय हें

त्यांचें नंतरचें वाङ्मय व वैदिक धर्म म्हणजे श्रौत–धर्म म्हणजे यज्ञयागादि धर्म देखील त्यांचा उत्तरकालीन धर्म होता. या मध्य देशीय लोकांचा अगोदरचा धर्म पुराणांत दाखविला आहे. त्यांचे प्राचीन ऋषी पुराणांत यज्ञ करतांना दिसत नसून तपश्चर्या करतांना दिसतात. सूतसंस्कृतीमध्यें तपश्चर्येकडून ज्ञानमार्गाकडे लोक वळत होते. अशा स्थितींत पश्चिमेकडून वैदिक धर्म आला हें स्थित्यंतर ज्यांनीं पाहिलें त्यांना असें वाटणें स्वाभाविक आहे कीं, अगदीं पहिला परमार्थसाधनाचा मार्ग म्हटला म्हणजे तापसमार्ग, नंतरचा ज्ञानमार्ग, त्यानंतरचा यज्ञमार्ग व शेवटचा दानमार्ग.

प्रस्तुत विवेचनांत हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, धर्म या शब्दाचा अर्थ येथें पालटला आहे. येथें हा शब्द सामाजिक नियमनाच्या पद्धतीचा वाचक नसून परमार्थाच्या साधनाचा मार्ग या अर्थानें वापरलेला आहे. आणि अर्थात् परमार्थसाधन या दृष्टीनें धर्माविषयीं विचार करणें येथें अनवश्य आहे.

वर सांगितलेले युगानुयुग झालेले फरक लक्षांत घेतले म्हणजे प्रश्न असा उद्भवतो कीं, हे फरक समाजाची प्रगति दाखवितात कीं दुर्गति दाखवितात. धर्मशास्त्रकारांना हे फरक समाजाच्या दुर्गतीचेच द्योतक आहेत असें वाटत होतें, यांत शंका नाहीं. प्रत्येक मनुष्यास त्याच्या दौर्बल्यामुळें तपश्चर्या होईनाशी झाली म्हणून पुढें ज्ञानमार्ग उत्पन्न झाला. पुढें यज्ञधर्म जो उत्पन्न झाला तो देखील मनुष्याचें दौर्बल्यच दाखवितो. यज्ञ म्हणजे काय, तर स्वतःचें देहदंडन करण्याऐवजीं पशूस मारून व त्यास अर्पण करून आपली सुटका करून घ्यावयाचा मार्ग. पण पुढें लोकांना तोहि कठीण वाटूं लागला व लोक त्याहूनहि सोपा जो दानमार्ग त्याकडे वळले. म्हणजे लोकांस कठीण धर्माच्या ऐवजीं अधिकाधिक सोपा धर्म अवश्य होऊं लागला तर तें त्यांचें दौर्बल्य नव्हे काय ? या दृष्टीनें धर्मशास्त्रकार या एकंदर विकासाकडे पहात होते. आजचे मनुष्यविकासाचे अभ्यासक असें म्हणतील कीं, धर्माचा हेतू समाजाचें रक्षण व स्वास्थ्य हा आहे. आणि तें होण्यासाठीं धर्मविचाराचें पर्यवसान दानाच्या श्रेष्ठतेंत झालें ही गोष्ट प्रगतीचीच द्योतक आहे.

### ३३७. कर्माचें महत्त्वमापन.

३३७. समाजांतील प्रत्येक कर्म सारखेंच महत्वाचें आहे काय, हा प्रश्न वारंवार पुढें येतो. वर्गविशिष्ट भावना या संबंधाच्याच विचारामुळें उत्पन्न होतात. व कांहीं कर्मांस कनिष्ठ मानल्यामुळें तीं कर्में करणाऱ्यांस हलकें मानण्याची प्रवृत्ति समाजांत होते. उलटपक्षीं उच्च प्रतीचीं कर्में नाहींतच, सर्व कर्में सारख्याच प्रतीचीं आहेत असें म्हणणें समाजाच्या अपकर्षास कारण होतें. यासाठीं कर्ममहत्त्वाच्या तारतम्याविषयीं विचार समाजांत पाहिजे. जर कर्तृत्व, बुद्धिमत्ता इत्यादिकांस समाजांत मान मिळणार नाहीं तर समाजाची प्रगतीच बंद होईल. यामुळें कर्मांच्या महत्त्वमापनाचा विषय धर्मशास्त्रकारांना महत्त्वाचा आहे व मनुस्मृतीनें याविषयीं विवेचन करण्याचें कर्तव्य मुळींच चुकविलें नाहीं.

मनुस्मृतीमध्यें मनुष्याच्या उच्चतेविषयीं तारतम्य येणेंप्रमाणें मांडलें आहे—

“ ब्राह्मणेषु च विद्वांसो विद्वत्सु कृतबुद्धयः
कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवादिनः ” ( १. ९७ )

मनुष्याच्या आयुष्याची इतिकर्तव्यता काय, कोणता मनुष्य उच्च योग्यतेचा आहे, इत्यादि प्रश्नांस मनुस्मृतीचें वरील विवेचन विचार करण्याजोगें आहे. ब्राह्मणांमध्यें विद्वान ब्राह्मण उच्च, विद्वान ब्राह्मणांत कृतबुद्धिता उत्तम असें स्मृति सांगते. “ विद्वत्सु कृतबुद्धयः ” म्हणजे काय, याचें कुल्लूक स्पष्टीकरण “ शास्त्रोक्तानुष्ठानेषु उत्पन्नकर्तव्यताबुद्धयः ” येणेंप्रमाणें करतो. म्हणजे विद्वान लोकांपैकीं ज्यांच्यामध्यें आपल्या कर्तव्याची जाणीव झाली आहे असे लोक श्रेष्ठ आहेत असें तो म्हणतो. व ज्या लोकांमध्यें कर्तव्याची जाणीव उत्पन्न झाली आहे अशा लोकांपैकीं जे कर्ते पुरुष आहेत तेच श्रेष्ठ असें स्मृतीचें म्हणणें आहे. “ कर्तृषु ब्रह्मवादिनः ” म्हणजे जी कर्ती माणसें आपलें कार्य करतांना जगदैक्याची भावना ठेवतात ते कर्त्या पुरुषांत उच्चतम पुरुष आहेत. ही कर्तव्य मीमांसा लक्षांत घेतली तर अर्वाचीन जग नैतिक विचारांच्या निर्मितींत अजूनहि पुढें गेलें नाहीं असें म्हणतां येईल.

### ३३८. समाज आणि धर्म.

३३८. मनुष्यास जें कर्तव्यकर्म आहे तें तो ज्या संघाचा सदस्य असेल त्या संघाच्या सदस्यत्वामुळें आहे आणि तो जितक्या समुच्चयांचा सदस्य असेल तितक्या सर्व समुच्चयाच्या दृष्टीनें त्याला कर्तव्यकर्म आहे व म्हणून—

“ देशधर्मान् जातिधर्मान् कुलधर्मांश्च शाश्वतान्
पाषंडगणधर्मांश्च शास्त्रेस्मिन्नुक्तवान् मनुः ”

( मनु. १. ११८ )

या श्लोकांत देश, जाति व कुल या सर्वांच्या दृष्टीनें धर्माचें अस्तित्व मनुस्मृतीनें मान्य केलें आहे. आणि तेंच मत वारंवार इतर ग्रंथांतहि मांडलें गेलें आहे. वरील श्लोकांत एक शब्द महत्त्वाचा आहे. आणि तो म्हटला म्हणजे “पाषंडगण-

धर्मान्" हा होय. जे लोक धर्मशास्त्रकारास संमत असलेलें परमार्थविषयक मत स्वीकारतात तेच लोक धार्मिक होत, इतर लोक धार्मिक नव्हेत, अशी कोती बुद्धी या स्मृतिकारानें ठेवली नाहीं. जे लोक वेद मानीत नसतील त्यांनाहि धर्मबंधन म्हणजे कर्तव्याकर्तव्यांचें बंधन आहेच आणि त्यांस मान्यता देणें देखील मनुप्रणीतच आहे असें त्यानें मांडलें आहे. या विवेचनाकडे पाहिलें म्हणजे मनुस्मृतीचें हें मत विसाव्या शतकांतल्या सुधारलेल्या लोकांना देखील लाजविणारें आहे. इतकी सरळ मान्यता देण्याइतकी उदारबुद्धी जगांत अजून उत्पन्न व्हावयाचीच आहे. हें मत केवळ पुस्तकांतच राहिलें होतें असें नाहीं तर हें प्रत्यक्ष व्यवहारांत होतें. राजधर्मांत ज्ञातिकुलगणादींच्या नियमांची चौकशी करून राजानें ते अमलांत आणावे हें सांगितलें आहे. हिंदु राजांनीं आपल्या राजव्यवस्थेंत हें तत्त्व अमलांत आणलें होतें व मलबारच्या प्राचीन राजांनीं सीरियन ख्रिस्ती लोकांस व यहुदी लोकांस आपल्या परंपरागत धर्मानें चालण्याचा अधिकार दिला होता, एवढेंच नव्हे तर त्यांच्या मुख्यास त्याबद्दलचें राजशासन ( ताम्रपट ) हि दिलें होतें.

का म ना व क र्म.

सामाजिक कार्यामध्यें व्यक्तीच्या मनोधर्माकडे दुर्लक्ष केलें तर कोणतेंच इष्ट साध्य होणार नाहीं. निष्काम कर्म करावें, वासनात्याग करावा इत्यादि आध्यात्मिकांचा आग्रह असतो. धर्मशास्त्राची त्याविषयीं वृत्ति काय होती हें पहाण्याजोगें आहे. केवळ कामात्मता योग्य नाहीं हें मनुस्मृति म्हणते, पण त्या कामात्मतेवर ती कोरडे ओढीत नाहीं. " अकामता इह नास्ति " " वेदाधिगमोहि काम्यः " ( २. २. ) असें स्मृति स्पष्ट सांगत आहे. कामनेच्या जोडीला " संकल्प " पाहिजे. किंवहुना " संकल्पाचा " कामना हा स्वाभाविक परिणाम आहे असें स्मृति म्हणते; " संकल्प " म्हणजे फल आणि कर्म यांच्या कार्यकारणभावांचें ज्ञान. हें ज्ञान मनुष्यमात्रास हवें. व्रतें, यम, नियम, हीं संकल्पाशिवाय शक्य नाहींत. मनुष्यानें फलाकडे लक्ष न देतां काम करावयाचें झाल्यास कर्म व फल यांचें कार्यकारण ज्ञान नको आहे. पण जर फल व कर्म यांच्या कार्यकारणभावांचें ज्ञान नसलें तर धर्माधर्मविवेकच उत्पन्न होणार नाहीं. कारण धर्माधर्मविवेक हाच सुखदुःखविषयक परिणामांच्या ज्ञानावर आहे. हें जर ज्ञान असलें तर फलाकडे लक्ष न देतां धर्म करणें अशक्य आहे. एवंच भगवद्गीतेंत फलाशा न ठेवतां कर्म करण्याविषयीं जो आक्रोश केला आहे तो मनुस्मृतीस संमत नाहीं.

## ३३९. उच्च राष्ट्राचें अनुकरण.

३३९. संस्कृतींत जीं राष्ट्रें मागें पडलीं असतील त्यांनीं, जीं राष्ट्रें संस्कृतींत पुढें गेलीं असतील त्यांचें अनुकरण करावें हें तत्त्व मनुस्मृतींत सांगितलें आहे. श्रुति, स्मृति, सदाचार व आपणांस आवडेल तें, येणेंप्रमाणें धर्मलक्षण चतुर्विध आहे असें मनुस्मृति म्हणते हें मागें सांगितलेंच आहे. पण सदाचार म्हणजे कोणाचा आचार याचें स्पष्टीकरण विशेष केलें पाहिजे. नाहींतर, "सद्" कोण हें आपणच ठरवावें आणि त्याच्या आचाराला सदाचार म्हणावें ही परिस्थिति उत्पन्न होईल. यासाठीं मनुस्मृति पुढें निश्चयेंकरून सांगते.

"तस्मिन् देशे य आचारः पारंपर्यक्रमागतः
वर्णानां सांतरालानां स सदाचार उच्यते" २. १८

"तस्मिन् देशे" हें ब्रह्मावर्ताविषयीं म्हटलें आहे. सरस्वती व दृषद्वती यांच्यामधील प्रदेशास " ब्रह्मावर्त " म्हटलें आहे. त्या देशांतील ब्राह्मणादि वर्णांचे आणि मिश्रवर्णीयांचे जे आचार आहेत ते सदाचार होत. ब्रह्मावर्त व त्या शेजारचे कुरु, मत्स्य, पंचाल व शूरसेन या देशांतील ब्राह्मणादि वर्णाप्रमाणें इतर देशांतील लोकांनीं आपले आचार ठेवावेत असें तत्त्व पुढें ( २. २० ) सांगितलें आहे. एवंच धर्मशास्त्रकार ज्या ज्या देशांत जो जो आचार असेल तोच योग्य आहे असें म्हणत नाहींत तर अमुक एका देशांतील आचार श्रेष्ठ प्रकारचे आहेत व इतर राष्ट्रांनीं त्या राष्ट्रांचें अनुकरण करावें हें तत्त्व मांडीत आहेत; असें तत्त्व मांडण्यास धर्मशास्त्रकारास कारणहि होतें. कारण इतर भाग ब्रह्मावर्ताच्या व मध्यदेशाच्या मानानें असंस्कृत होता.

## ३४०. चातुर्वर्ण्य आणि वर्गविशिष्ट नियम.

३४०. वर्गविशिष्ट सर्वच नियम निरनिराळ्या वर्गांत उच्चत्वाचें किंवा नीचत्वाचें वारें उत्पन्न करण्यासाठीं नसून अनेक नियम वर्गविशिष्ट अभिमान उत्पन्न करण्यासाठीं आहेत. ब्राह्मणादि तीन वर्णांच्या निरनिराळ्या स्नातकांस निरनिराळे नियम दिसतात, कमरेची दोरी कोणत्या प्रकारची असावी, दंड कोणत्या लांकडाचा असावा इत्यादि विषयींचे नियम आहेत ( २, ४१, ४९,६५ ). ब्राह्मणांस किंवा त्यांच्या धर्मशास्त्रकारांस दूषण देणाऱ्या लोकांनीं या भेदासंबंधानें धर्मशास्त्रकारांस दूषण दिलें आहे. पण विचार करतां त्यांस दूषण देण्याचें कारण नाहीं असें दिसून येईल. कारण ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे जर तीन निरनिराळे उपजीविकेचे क्रम आहेत तर त्या तिहींसाठीं अभ्यासक्रम

देखील निरनिराळे पाहिजेत हें उघड आहे व त्यासाठीं जर एखाद्या आश्रमांत निरनिराळे अभ्यासक्रम असले तर विद्यापीठांत आपल्या अभ्यासक्रमाचें वैशिष्ट्य दाखविणारा निराळा पोषाख असावा ही गोष्ट देखील गैर नाहीं. तर ती वेषभिन्नता उच्चनीचतेची द्योतक नसून वैशिष्ट्याच्या अभिमानाची उत्पादक आहे. आजचीं पाश्चात्यांचीं विद्यापीठें देखील निरनिराळ्या अभ्यासशाखांचे पदवीदान प्रसंगाचे पोषाख मुद्दाम भिन्न ठेवीत आहेत.

चातुर्वर्ण्याची कल्पना ही कर्मविशिष्ट आहे. जो जें कर्म करतो त्यावरून त्याचा वर्ण ठरवावयाचा, पण वर्णविशिष्ट संस्कार, शिक्षण वगैरे गोष्टी अगोदरच ठरतात, त्यामुळें एका वर्णाचे संस्कार व अधिकार आणि दुसऱ्या वर्णाचें कर्म अशी असंगति उत्पन्न होते. ही असंगति कशी काढावी यासंबंधानें प्रश्न होता. धर्मशास्त्रकार शास्ते नव्हते व या प्रकारच्या भानगडींत ते पडत नसत. त्यामुळें धर्मशास्त्रकारांना एवढेंच शक्य होतें कीं जी वस्तुस्थिति चालू आहे तिच्याशीं धर्मशास्त्र मिळवून घेणें. या तऱ्हेची क्रिया मनुस्मृतीनें केली आहे. धर्मशास्त्रकारांच्या प्रयत्नाव्यतिरिक्त जातिभेदाची अनवस्था दूर करण्यासाठीं प्रयत्न झाले नाहींत. बौद्धांचे प्रयत्न या बाबतींत कांहींच झाले नाहींत. बुद्धानें ब्राह्मणांस शिव्या दिल्या एवढेंच. स्वतः समाजसुधारणेची कोणतीच क्रिया केली नाहीं.

धर्मशास्त्रकार चार वर्ण आहेत असें तत्त्व कबूल करीत, पण त्यांस असें दिसून येई कीं समाजांत वर्गसदृश व जातिसदृश असे अनेक समुच्चय आहेत. तेव्हां धर्मशास्त्रकारांना असा प्रश्न पडला कीं मूळ जर चारच वर्ण आहेत तर त्यांत दिसून येणाऱ्या पन्नास—साठ जातींच्या अस्तित्वाचें स्पष्टीकरण करावें कसें ? तसेंच अनेक जाती कर्मानें क्षत्रिय दिसतात, पण लोकांत त्यांची गणना शूद्रांमध्यें होत आहे. असेंहि त्यांस दिसून आलें. अशा स्थितींत त्यांनीं स्पष्टीकरण केलें तें येणेंप्रमाणें–(१) कांहीं जातींचें अस्तित्व दोन जातींच्या मिश्रणानें झालें आहे असें सांगितलें तर (२) कांहीं जाती किंवा कुळें क्षत्रिय असतां तीं संस्कारलोपानें हीनवर्ण झालीं असें सांगितलें. याशिवाय जेव्हां वर्ण ब्राह्मणाचा पण कर्म वैश्य–शूद्राचें अशा व्यक्ती दिसल्या तेव्हां त्याविषयीं देखील कांहीं विवेचनाची आवश्यकता होती. तेव्हां धर्मशास्त्रकारांनीं "आपद्धर्मप्रकरण" लिहिलें. म्हणजे वस्तुस्थितीचें "आपद्धर्म" या नांवानें समर्थन होई. धर्मशास्त्रकार हे कायदे करणारे नव्हते. त्यांस वस्तुस्थिति पालटण्याची सत्ता नव्हती. त्यांना जें काय शक्य होतें तें हेंच कीं ज्यामुळें धर्मशास्त्राचे नियम आणि सामाजिक स्थिति यांतील अंतर कमी होत जाईल असें स्पष्टीकरण करीत जाणें. असें केल्यानें धर्मशास्त्राप्रमाणें आपण चाललों आहों ही कल्पना लोकांत रहाते आणि धर्मशास्त्राचें महत्त्व रहातें.

मनुस्मृतींत जो धर्मशास्त्रीय प्रश्नासंबंधानें तात्विक खल झाला त्याचें स्थूल समालोचन वर दिलें आहे. मनुस्मृतींत अनेक व्यवहारांचे नियम आले आहेत आणि त्या नियमांच्या पाठीमागें कांहीं तरी सामाजिक दृष्टि आहेच. त्या सर्व गोष्टींचा येथें खल करूं गेल्यास फारच विस्तार होईल म्हणून तें विवेचन येथें करीत नाहीं. दिलेल्या विवेचनावरून एवढें स्पष्ट होईल कीं, धर्मशास्त्रकारांच्या नियमांच्या पाठीमागें कांहीं विशिष्ट समाजशास्त्रीय विचार आहे.

## ३४० अ. वर्गस्पर्धा.

३४० अ. प्रत्येक वर्ग आपापल्या हिताचें संरक्षण करीत असतां समाजास विशिष्ट स्वरूप देत असतो. ब्राह्मणांना आपल्या विचाराप्रमाणें समाजास स्वरूप देतांना काय करावें लागलें याचें स्वरूप वैदिक ग्रंथकार व स्मृतिकार यांच्या प्रयत्नावरून समजण्यासारखें आहे. क्षत्रिय आणि वैश्य या वर्गांनीं आपल्या इच्छेचा परिणाम सामाजिक तत्त्वज्ञानावर काय केला हें पाहाण्याजोगें आहे.

चातुर्वर्ण्यामध्यें क्षत्रियांचें स्थान ब्राह्मणांच्या बरोबरीचें असावें किंबहुना ब्राह्मणांहून उच्च असावें यासंबंधानें जो प्रयत्न झाला त्याचा इतिहास चांगलासा देतां येणार नाहीं. तथापि क्षत्रियांचा त्या बाबतींत निश्चित प्रयत्न होता असें सहज सांगतां येईल. ब्राह्मणांनीं क्षत्रियापेक्षां आपली उच्चता मोठी आहे असें सांगण्यासाठीं जो अट्टाहास केला तो क्षत्रियांचे पूर्वप्रयत्न स्पष्टपणें सूचित करतो. ब्राह्मणांचें वाङ्मय शिल्लक राहिलें, पण क्षत्रियांच्या क्रियांच्या आठवणी शिल्लक राहिल्या. त्यांचें वाङ्मय मुळीं नव्हतेंच. क्षत्रियांची खटपट ब्राह्मणी ग्रंथावरून किंबहुना ब्राह्मणी प्रयत्नांच्या इतिहासावरूनच काढावयाची आहे.

ब्राह्मणांच्या वाङ्मयांत ब्राह्मणांची थोरवी सांगण्याचे जे प्रयत्न झाले त्यांत विश्वामित्राची कथा निर्देशिली पाहिजे. विश्वामित्र ब्राह्मण होण्याचा प्रयत्न करितो असें दाखविलें आहे; आणि जेव्हां त्याचा प्रयत्न असंभाव्य तऱ्हेचा झाला, तेव्हांच तो ब्राह्मण बनला असें दाखविलें आहे. तसेंच अनेक राजांना ब्राह्मणच्छलाबद्दल मोठीं प्रायश्चित्तें मिळालीं अशा कथा रामायण-महाभारतादि ग्रंथांत पसरून दिल्या आहेत. एवढेंच नव्हे तर क्षत्रियांना इतर लोकांकडून मान्यता मिळूं नये म्हणून जुना क्षत्रियवंश नाहींसाच झाला, आतां

केवळ दासीपुत्रांचाच वर्ग शिल्लक राहिला आहे असें त्यांच्या संबंधानें लोकमत पसरवून दिलें आहे. परशुरामानें २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली, आणि नंदांनंतर क्षत्रियकुल नष्ट झालें इत्यादि कथा पसरविणें या सर्व गोष्टी ब्राह्मण–क्षत्रियस्पर्धेचीं अंगें दाखवितात. मनुस्मृतीच्या काळांतच कित्येक राजे शूद्र होते म्हणून उल्लेख आहे. राजत्वावरून जर क्षत्रियत्व ठरतें तर राजा शूद्र कसा असेल? शूद्र याचा अर्थ एवढाच कीं, उपनयनासारखे वैदिक संस्कार नसलेला मनुष्य. ब्राह्मण व क्षत्रिय यांची स्पर्धा चालू असतां क्षत्रियांस हीनत्व देणें हें ब्राह्मणांस अवश्यच होतें. पण केवळ हीनत्वच देऊन भागत नव्हतें तर क्षत्रियत्वच नाकारणें त्यांस अवश्य होत होतें. क्षत्रिय व वैश्य हे दोन्ही वर्ण लुप्त झाले ही गोष्ट, आपलें अनेक पायऱ्यांनीं इतरांवर उच्चत्व राखण्यास अवश्य होत होती. पण तसें करण्यांत ब्राह्मण आपलेच पाय कापून घेत होते. संस्कारांस अधिकारी वर्ण पडले तीन; ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य. शूद्रांस फारशा संस्कारांचें–तो शूद्र म्हणून–प्रयोजनच नव्हतें. पण वैश्य व क्षत्रिय समजले जाणारे वर्णच जर शूद्र ठरते तर वैदिक धर्माची बूज कशी राहील आणि ब्राह्मणांची उपजीविका कशी चालेल हा प्रश्न होता.

तो प्रश्न सोडविण्यासाठीं पुराणोक्त कर्में निघालीं म्हणजे कर्म वैदिक कर्मासारखेंच पण वैदिक मंत्रांच्या ऐवजीं पुराणोक्त म्हणजे दुसरे कसले तरी मंत्र घालण्यांत आले व शूद्रकमलाकरासारखे ग्रंथ करण्यांत आले. शूद्र मंडळीकडे उपाध्येपणा मिळविण्याच्या बाबतींत शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण अधिक पटाईत दिसून आले. "शूद्रा वाजसनेयिनः" म्हणून शूद्रकमलाकरांत यासंबंधानें विधान आहे. वाजसनेयी ब्राह्मण नवीनच होते, व त्यांस शूद्राकडे जाऊन कर्म करण्यास संकोच कमी वाटत असावा असें दिसतें. आज शूद्रकमलाकरानें वापरलेल्या म्हणजे वस्तुस्थितीसच मान्यता देण्याच्या तऱ्हेनें शास्त्राधार लिहावयाचाच झाल्यास "आर्यसमाजिनः अहिंदूनाम्" म्हणजे मुसलमान, ख्रिस्ती वगैरे मंडळी हिंदु झाली, तर त्यांच्याकडील कर्म आर्यसमाजी मंडळीनें करावें असा नियम देतां येईल. असो. ब्राह्मणांच्या हातीं संस्कार आणि वाङ्मयरूपानें आपलेंच म्हणणें टिकविण्याचें साधन या गोष्टी असल्यामुळें त्यांच्यापुढें क्षत्रियवर्गाचा पराभव झाला असें म्हणतां येईल.

क्षत्रियांच्या चळवळींत बुद्धाचें नांव देतां येण्याजोगें आहे; पण त्यास ब्राह्मणांना शिव्या देण्यापलीकडे कांहीं करतां आलें नाहीं. त्यानें नवीन संप्रदाय स्थापन केला, पण संस्कारांचें काम ब्राह्मणांकडेसच राहिल्यामुळें ब्राह्मणांचें समाजप्रामुख्य बुद्धास बिघडवितां आलें नाहीं. क्षत्रिय व वैश्य यांच्यामध्यें संस्कारलोप उत्पन्न करून ब्राह्मणांचें उच्चत्व अधिक स्थापन करण्याकडे मात्र बुद्धाच्या प्रयत्नाचा उपयोग झाला.

बौद्धांच्या एकंदर प्रयत्नाचें स्वरूप अवलोकिल्यानंतर त्यामुळें समाजाचें कांहीं बाबतींत स्थित्यंतर झालें काय हा विचार पुढें करण्यांत येईल.

---

प्रकरण ३८ वें.

# वररुचि आणि त्याचें विद्याविकासांत स्थान.

**३४१. कथांची उत्पत्ति आणि संग्रहण; संग्राहक वर्ग आणि त्या वर्गांत पंडित वर्गाचा समावेश.**

३४१. वेदसंग्रहण आणि पुराणसंग्रहण या हेतूंनीं श्री द्वैपायनांच्या प्रयत्नानें जो संघ संस्थापित झाला त्यांत नवीन विद्या एकसारखी प्रविष्ट होत होती. निराळ्या लोकांच्या विद्येच्या संग्रहणानें एक संस्कृति प्रौढ करण्याची क्रिया चालू होती, तथापि प्रत्येक काळांत अशिष्ट वर्ग आणि त्याचें वाङ्मय होतेंच. त्यांचें वाङ्मय आणि आचार यांस क्रमानेंच मान्यता मिळे. ती मान्यता मिळण्याची क्रिया होत असतांना सुप्रतिष्ठित वर्गातील व्यक्तींकडून अशिष्ट वर्गाच्या विद्येचें संग्रहण आणि तीस उत्तेजन या प्रकारच्या ब्राह्मणविद्यावक्रीकरणाच्या क्रिया होतच होत्या.

ब्राह्मणवर्गाच्या विद्येंत जें थोडेंसें वक्रीभवन झालें तें घडवून आणणारामध्यें वररुचीचें नांव महत्त्वाचें आहे. त्या वक्रीभवनास बुद्धपूर्व उदयनाच्या कालापासूनच सुरवात झाली असली पाहिजे.

कथासरित्सागरांतील मुख्य कथेचा काल चक्रवर्ती उदयन याचा होय. कथामुखलंबकापासून ग्रंथाच्या अंतापर्यंत कोणताहि भाग उदयनाच्या कालानंतरचा नाहीं असें त्या संग्रहाचा बाणा आहे.

प्रथम लंबक जो कथापीठलंबक तो मात्र नंदकालापासून आद्य शातवाहनाच्या कालापर्यंतचा वृत्तांत सांगण्याचा बाणा बाळगीत आहे. म्हणजे ग्रंथाच्याच सांगण्याप्रमाणें उदयनकाल आणि नंदकाल या दोन परस्परांपासून भिन्न अशा काळांमधील खळगी भरून काढलेली नाहीं. ग्रंथकाराचें म्हणणें असें कीं, ज्याप्रमाणें अनेक विद्या शिवाच्या ठायीं स्थित होतात आणि शिवापासून त्यांचा प्रसार पुन्हां होतो, त्याप्रमाणेंच नरवाहन आणि विद्याधर यांची जुनी कथा प्रचलित झाली. शिवापासून पुन्हा शिवगणामार्फत ही जुनी विद्याधरकथा प्रचलित झाली असें सांगण्यांत वररुचीच्या काळीं कथेचें प्राचीनत्व होतें ही गोष्ट कथेची परंपरा चालविणाऱ्यानें दिली आहे.

कथेचे विषय राजा उदयन आणि विद्याधर. त्यांचा महाराष्ट्राशीं संबंध बेताचाच होता. उदयन दक्षिणेकडे स्वारी करता झाला पण वळसा घालून गेला, एवढा संबंध मागें दिलाच आहे.

उदयनाच्या पूर्वीपासून महाराष्ट्रांत जे नरसिंहादि राजे होऊन गेले ते 'अश्मक' वंशांतील होत आणि अश्मक संपुष्टांत आले तेव्हां पुढें शातवाहन आले असें इतिहाससातत्य आहे. पौराणिक अश्मकांचा इतिहास देत नाहींत; शातवाहनांची राजावलि 'आंध्र' या नांवानें देतात. तथापि उत्तरेकडच्या राजांचीं नांवें मात्र पुराणें देतात. उत्तरेकडे उदयनकालीं जर वत्सदेशास प्रामुख्य मिळालें असेल तर तें थोडे दिवसच टिकलें असावें. आणि पुढें वत्सदेश आणि अयोध्या हे दोन्ही प्रदेश कलिरूप झाले किंवा त्यांचें राज्य नष्ट झालें अशीं पुराणांतील उल्लेखांवरून अनुमानें काढावीं लागत आहेत. मगधदेशांत प्रद्योत राज्यकर्ते होते, प्रद्योतानंतर शैशुनाग आले. शैशुनागराजांपैकीं बिंबिसार आणि अजातशत्रु यांच्या कारकीर्दींत बुद्ध होऊन गेला. बुद्धोत्तरकालीं अपरांत आणि महारट्ठ यांत सुत्तनिपाताच्या साक्षीप्रमाणें बौद्ध प्रचारक गेले ही गोष्ट मागें उल्लेखिलीच आहे. तथापि बौद्धग्रंथांत शातवाहनांचा उल्लेख नाहीं. त्यावरून अत्यंत प्रारंभाच्याकालीं शातवाहन नसावेत, त्या वेळेस अश्मक राज्यच असेल. अश्मकराजापासून कांहीं भाग नंदांनीं व पुढें मौर्यांनीं जिंकला असेल, पण कुरुयुद्धकालापासून वाकाटकांच्या काळापर्यंत दोनच घराणीं प्रामुख्यानें दिसतात. पहिलें घराणें अश्मकांचें व दुसरें शातवाहनांचें होय.

शातवाहनांच्या आगमनाच्या काळापर्यंत आपण येऊन पोंचलों. पौराणिकांच्या कालापर्यंत मागें नेणाऱ्या क्षेमेंद्रसोमदेवी बृहत्कथेनें जो विस्तीर्ण कालखंड आपला विवेचनविषय केला आहे, त्याचें आद्य शातवाहन हें शेवटचें टोंक होय. या दोन टोकांच्या मधील फक्त एका पौरव राजाचा काल हा मुख्य विषय असतां त्यास पुरवण्या मिळत मिळत हा विस्तीर्ण ग्रंथ झाला आहे. पांडवांपासून हजार बाराशें वर्षांतील विविध कथा या ग्रंथानें संग्रहित केल्या असल्यामुळें त्यांतील महाराष्ट्रविषयक कथांचें अवतरण मागें करण्यांत

आलें. या कथांचें संग्राहकत्व आणि प्रसार या क्रिया होण्यासाठीं त्या पुन्हा ब्राह्मण पंडितवर्गांच्या हातीं आल्या. पुराणांच्या घटनेंत अशी क्रिया झाली कीं उदयनाच्या अगोदरच्या काळांत सूतवाङ्मय ऋषिवर्गांतील संग्राहकांच्या ताब्यांत आलें, तेव्हां तें ऋषिकथांशीं संबद्ध झालें; आणि उत्तरकालीन अद्भुतकथावाङ्मय वैय्याकरणादि भाषाशास्त्रज्ञांनीं संग्रहित केलें तेव्हां त्या ग्रंथास वैय्याकरणांच्या कथा स्वाभाविकपणें जोडल्या गेल्या.

भारतीय वाङ्मयामध्यें कथावाङ्मयास महत्त्वाचें स्थान आहे. कारण भारतीय कथावाङ्मय सर्व जगभर परिणाम करतें झालें. अनेक प्राचीन कथा दृष्टांतासाठीं म्हणून बौद्ध व जैन या संप्रदायांनीं उचलल्या, आणि त्यामुळें जेथें जेथें या संप्रदायांचा प्रसार झाला तेथें तेथें त्या पसरल्या. कथांचा प्रसार केवळ धार्मिक पुरुषांकडूनच होत होता असें नाहीं. ज्या सेवकांस गोष्टी चांगल्या सांगतां येतात, अशा सेवकांचा संग्रह करण्याची प्रवृत्ति सर्व देशांत होती. राजघराण्यामध्यें नोकर निरनिराळ्या देशांतील होते, व नोकरीपेशाचे लोक देखील इतस्ततः संचार करीत. आणि यामुळें या नोकरांमार्फत देखील कथांचें स्थानांतर होत असे. बृहत्कथेंतच अनेक कथांचे कथक कोण आहेत हें दिलें आहे. ग्रंथारंभींच सहस्रानीकास त्याचें अंग रगडण्यासाठीं संगतक नांवाचा एक पादसंवाहक आला, तो गोष्टी सांगण्यांत निपुण होता असें दाखविलें आहे. उदयन राजाचा मित्र वसंतक हा शास्त्रनिपुण नव्हता तरी कथानिपुण होता. यामुळें राजगृहांत प्रिय होता. कथांचा संग्रह करणें व त्या सांगून मनोरंजन करणें या गोष्टी केवळ संवाहक आणि विदूषक हेच करीत असत असें नव्हे तर मोठमोठाले मुत्सद्दी आणि मंत्री करीत असत. यौगंधरायण हा अनेक कथा सांगतांना दाखविला आहे. आणि त्याप्रमाणेंच हरिशिख, गोमुख, तपंतक इत्यादि राजसेवक आणि मुत्सद्दी कथा सांगतांना दाखविले आहेत. आणि गोष्ट चांगली कोण सांगतो याविषयीं स्पर्धा लागत. राजदरबारच्या मंडळींना दरबारी व राजगृहाच्या गोष्टी ठाऊक असावयाच्या. दोन संस्थानांचे मुत्सद्दी एकत्र जमले आणि त्यांची दोस्ती जमली म्हणजे राजगृहाच्या अंतर्गत कथानिवेदनास ऊत येतो ही गोष्ट आजचीहि अनुभवाची आहे. शिवाय राजघराण्यांतील पुरुषांबायकांस इतर राजघराण्यासंबंधानें बऱ्यावाईट गोष्टी ऐकावयास हव्याच असतात; त्यामुळें मुत्सद्द्यांना देखील कथकांचा पेशा स्वीकारावा लागे.

## ३४२. कथासंग्राहक वररुचि आणि पुष्पदंत; त्यांचा एकमेकांशीं आणि महाराष्ट्राशीं संबंध.

३४२. या कथांचा संग्रह कोणीं केला यासंबंधानें प्रश्न उत्पन्न होतो. नरवाहनदत्ताच्या काळच्या गोष्टी संग्रहित आहेत, त्याच्या नंतरच्या काळच्या नाहींत; त्याअर्थी कथासंग्रहाचा पहिला काळ नरवाहनदत्ताच्या आयुष्यांतीलच होय. त्या काळीं जो संग्राहक असे त्या संग्राहकापासून वररुचीपाशीं कथासंग्रह कसा आला याविषयीं जर आपण कथापीठलंबक काळजीपूर्वक पाहिला, तर गूढ रहात नाहीं. पुष्पदंत या शिवगणापासून पुढें प्रचार झाला असें दाखविलें आहे. त्या पुष्पदंताला कथासंग्रह भगवान् श्री शंकराकडून असें जरी वृत्त कथापीठलंबक सांगत आहे तरी देखील पुष्पदंताच्या मानवी आयुष्यक्रमाची कथा या कथापीठलंबकानें संरक्षून ठेविली आहे. पुष्पदंत हा गंगातीरवासी बहुसुवर्णक ग्रामांतील एका द्विजाचा मुलगा. तथापि तो विद्यार्जनासाठीं प्रतिष्ठान येथेंच येऊन राहिला होता असें सोमदेवीय आवृत्तींत दिलें आहे. पुष्पदंत आणि वररुचि यांत एका गोष्टींत साम्य होतें. दोघेहि गंगथडींतील जन्माचे पण प्रतिष्ठान येथें कांहींकाल राहिलेले पुरुष होते; आणि गुणाढ्य हा तर अस्सल प्रतिष्ठानीय; त्याअर्थी कथासंग्रहणाची क्रिया प्रतिष्ठान येथें देखील कांहीं पिढ्या चालत असावी, आणि पैशाचींतून ती संरक्षिली जाण्याचें कारण कांहींतरी दुसरें राजकीय किंवा सामाजिक असावें या तऱ्हेचा इतिहास आपणास सूचित होत आहे. तर्क असा होतो कीं, आज पठाण ज्याप्रमाणें चोहोंकडे भटकत फिरत आहेत, त्याप्रमाणेंच ते प्राचीनकालीं भटकत असावेत. उत्तरेकडच्या राजांच्या गोष्टी त्यांच्यापाशीं असाव्यात, आणि वररुचीसाठीं त्यांचा संग्रह पुष्पदंतानें केला असावा. कथासंग्रहणाचें कार्य करणारी वररुचि ही एक मोठी व्यक्ति होऊन गेली. वररुचीचा पुष्पदंताशीं संबंध काय होता हें नक्की सांगतां येत नाहीं. पुष्पदंत हा वररुचीचा संग्राहक असावा. तो केवळ स्वर्ग्य व्यक्ति असता तर पुष्पदंताची भौमकथा संग्रहित झाली नसती.

## ३४३. वररुचीची शास्त्रज्ञता.

३४३. वररुचि हा राजकारणी पुरुष होता त्याप्रमाणेंच मोठा शास्त्रज्ञ होता. शास्त्रज्ञास संग्राहक बनावें लागतें त्याप्रमाणें तोहि संग्राहक बनला असावा. भाषाशास्त्रज्ञास संग्राहक बनावयाचें तें गोष्टींचें आणि गाण्यांचें. वररुचीनें ज्या गोष्टी संग्रहित केल्या त्या पैशाचींतीलच कां ? त्याबरोबर दुसऱ्या भाषांत कशा झाल्या नाहींत. याविषयीं उत्तर देतांना असें

दिलें पाहिजे कीं सर्वच गोष्टी पैशाचींत असतील असें नाहीं. बृहत्कथेचीं प्राकृत हस्तलिखितें उपलब्ध झाल्याशिवाय आपणांस या विषयावर निःसंशयपणें लिहितां यावयाचें नाहीं. वररुचीचें प्राकृत व्याकरण उपलब्ध आहे. पण वररुचि हा संस्कृत वैयाकरण होता आणि पाणिनीचा प्रतिस्पर्धी होता असें बृहत्कथा आपणास सांगत आहे.

## ३०४. वररुचीसंबंधानें बृहत्कथेचें विधान; त्याची विद्यार्थिदशा.

३४४. वररुचीविषयीं बृहत्कथा काय विधानें करीत आहे तीं समजावून घेऊं आणि नंतर तीं ग्राह्य आहेत कीं त्याज्य आहेत याचा विचार करूं.

बृहत्कथा पुढील विधानें करीत आहे.

१. बृहत्कथा ही वररुचीस समजली कारण तो पुष्पदंताचा अवतार आहे.

२. वररुचि हा एकपाठी होता, म्हणून त्यास श्रुतधर म्हणत; त्यास कात्यायन हेंहि अपरनाम होतें.

३. वररुचीचा बाप सोमदत्त नांवाचा ब्राह्मण होता. त्यास अग्निशिख असेंहि म्हणत. त्याच्या भार्येचें नांव वसुदत्ता.

४. वररुचीच्या बापाचा नंद नांवाचा एक मित्र नट होता. याचें नृत्य वररुचीनें पाहिलें व त्यानें तसेंच नाचून दाखविलें तें पाहून त्यांच्याकडे आलेले व्याडि आणि इंद्रदत्त यांनीं त्यास सहाध्यायी करावयाचें ठरविलें.

५. व्याडि आणि इंद्रदत्त हेहि वररुचीचे सहाध्यायी झाले, आणि वर्ष त्याचा गुरु होता. अर्थात् हे सर्व त्याच्याच ऐंद्रव्याकरण संप्रदायाचे होते.

६. वररुचीची बायको उपकोशानामक होती. ती त्याच्या गुरूचा भाऊ जो उपवर्ष त्याची कन्या होती. आणि ती चतुर व पतिव्रता होती. त्यांचें एकमेकांवर प्रेम जडलें असतां वडिलांच्या संमतीशिवाय किंवा त्यांना कळविल्याशिवाय परस्पर स्वीकार करावा हें वररुचीनें नाकारलें आणि त्यांचा विवाह वडिलांच्या संमतीनें झाला. तिच्या पातिव्रत्यरक्षणचातुर्यामुळें नंदानें तिला आपली भगिनी म्हटलें होतें.

७. उपकोशेचा मानलेला भाऊ जो नंदराजा होता तो अन्य ठिकाणीं असतां वररुचि आपल्या मित्रासह तेथें गेला, पण त्या वेळेस तो नंद मृत्यू पावला. नंदाच्या मृत्यूनंतर इंद्रदत्तानें नंदाच्या शरिरांत प्रवेश केला. तोच योगनंद होय. त्या योगनंदाचा वररुचि हा मंत्री झाला. वररुचीच्या अंगीं व्यवहारचातुर्य थोर होतें.

८. वररुचि याचा पाणिनीनें पराभव केला आणि त्यामुळें वररुचि ज्या ऐन्द्र व्याकरणपद्धतीचा अनुयायी होता तें व्याकरण नष्ट झालें.

९. पाणिनीपासून पराभव पावलेला वररुचि शिवाराधन करण्यासाठीं गृह सोडून निघाला. आपलें द्रव्य हिरण्यगुप्त नांवाच्या वैश्याजवळ ठेवलें आणि त्याजवळून लागेल तें घे असें बायकोला सांगून आपण हिमालयाकडे गमन केलें. पतिवियुक्त झालेल्या उपकोशेला राजपुरोहित, न्यायाधीश, प्रधानपुत्र यांनीं पाहिलें व ते तिची प्राप्ति होण्यासाठीं प्रयत्न करूं लागले. हिरण्यगुप्त वैश्य देखील, 'मला वश झालीस तरच तुझ्या नवऱ्याचें धन तुला देईन.' असें म्हणूं लागला. तिनें सर्वांस बोलावून त्यांतील तिघांस पेट्यांत पकडून ठेवलें आणि चवथ्या हिरण्यगुप्ताचें म्हणणें त्या पेटींतल्या लोकांना ऐकविलें आणि दुसऱ्या दिवशीं हिरण्यगुप्तावर फिर्याद करून त्या पेटींतल्या "देवता" ची साक्ष देवविली. खरा प्रकार नंदास कळून नंदानें तिला आपली भगिनी म्हटलें.

१०. शंकर वररुचीस प्रसन्न झाले आणि त्यांनीं तेंच शास्त्र पुढें वररुचीस सांगितलें आणि वररुचीनें तें वार्तिकांनीं पूर्ण केलें.

## ३४५. वररुचीची कारकीर्द.

३४५. वररुचीच्या कर्तेपणाचा काल पांडित्यकालानंतर सुरू झाला. त्या कालांतील गोष्टी पुढीलप्रमाणें आहेत.

११. वररुचीनें नंदाची भेट घेण्यासाठीं गमन केलें तें प्रतिष्ठानला केलें ( बृहत्कथामंजरी ). नंद मृत्यू पावला आणि योगनंदानें त्याच्या शरीरांत प्रवेश केला, ही गोष्ट पाटलिपुत्रांत घडली नाहीं. याला सरित्सागरहि साक्ष देत आहे; कारण पुढें राजधानीस परत आल्याचा उल्लेख सरित्सागरांत येत आहे, त्यावरून वररुचीचा बराच काल दक्षिणेंत गेला असला पाहिजे.

१२. योगनंद राज्य करूं लागला तेव्हां शकटालानें इंद्रदत्ताचें शरीर जाळून इंद्रदत्तास नंदाच्या शरीरांतच अडकावून ठेवलें होतें व तेणेंकरून योगनंदाला राज्यावर स्थित केलें होतें. तथापि शकटाल जिवंत आहे तोंपर्यंत योगनंद सुरक्षित नाहीं असें वररुचीस वाटून त्यानें योगनंदास म्हणजे इंद्रदत्तास तसें सांगितलें. तेव्हां इंद्रदत्तशरीर म्हणजे जिवंत ब्राह्मण जाळ-

ण्याचा आरोप शकटालावर ठेवून इंद्रदत्तानें त्याच्या शत-पुत्रांसह कारागृहांत ठेवलें. आणि त्यांस मारून टाकण्यासाठीं एका पुरतेंच अन्न पाठविलें. शकटाल आणि त्याचे पुत्र यांनीं संगनमत करून तें अन्न एका शकटालानेंच खावें असें ठरविलें. शकटाल सूड उगविण्याच्याच इच्छेनें जगून राहिला.

इंद्रदत्त नंदराजा ( योगनंद ) झाल्यावर गुरूस एक कोट सुवर्ण दक्षिणा देऊन व्याडि तप करावयास निघून गेला आणि फक्त वररुचीसह योगनंद पाटलिपुत्रास गेला. अर्थात् शकटाल बरोबर होताच. राज्यलक्ष्मी मिळाल्यावर इंद्रदत्त उच्छृंखल बनला आणि प्रजारक्षणाची चिंता वररुचीवर पडली आणि त्यामुळें त्याचा धर्म क्षीण होऊं लागला. तेव्हां वररुचीनें आपल्या साहाय्यास शकटालास घेतलें. शकटाल वररुचीच्या आदेशाप्रमाणें राजकार्यें करूं लागला. जोंपर्यंत वररुचि आणि योगनंद यांत द्वैत उत्पन्न झालें नव्हतें तोंपर्यंत शकटाल योगनंदावर सूड घेण्यास असमर्थ होता. वररुचीच्या बुद्धीपुढें आपली मात्रा चालणार नाहीं ही जाणीव त्यास होती. तथापि वररुचीविषयीं योगनंदाच्या मनांत पुढें द्वेष उत्पन्न झाला.

१३. योगनंदाच्या महादेवीचें चित्र चितार्‍यानें काढलें त्या चितार्‍याच्या चित्रांत अपूर्णता होती. तिच्या आच्छादित भागीं म्हणजे कटिप्रदेशीं तीळ नव्हता. तो तीळ अंतर्ज्ञानानें जाणणार्‍या वररुचीनें काढला. † तेव्हां वररुचीसंबंधानें योगनंदाच्या मनांत संशय उत्पन्न झाला आणि त्यानें शकटालास जवळ केलें आणि वररुचीस मारून टाकण्याचा हुकूम त्यास केला. तथापि शकटालास हें ठाऊक होतें कीं वररुचि हा महापुरुष आहे त्याचा घात करूं नये म्हणून त्यानें वररुचीसच ती राजाज्ञा कळविली आणि दुसर्‍या एका दुष्ट मनुष्यास मारलें, आणि वररुचीस आपल्याच घरीं ठेवलें.

१४. कालांतरानें योगनंदाचा मुलगा हिरण्यगुप्त हा मित्रद्रोहामुळें मिळालेल्या शापामुळें भ्रमिष्ट झाला. त्याचें कारण कोणी जाणूं शकला नाहीं तेव्हां राजाला वररुचीची आठवण झाली आणि तेव्हां तो भरसभेंत वररुचि असता तर त्यानें निवारण केलें असतें असें बोललाहि. तेव्हां शकटालानें अभय देऊन वररुचि जिवंत आहे असें सांगितलें आणि वररुचीनें अंतर्ज्ञानानें भ्रमाचें कारण जाणलें असें सांगितलें व तें सांगून राजपुत्रास भ्रममुक्त केलें. आणि ज्याप्रमाणें हें आपण जाणलें त्याप्रमाणेंच महादेवीचा तीळ आपण जाणूं शकलों, आपण गैरवर्तन केलें नाहीं असें सांगितलें. राजानें त्याचें म्हणणें मान्य केलें, त्यास दोषमुक्त केलें व त्याचा गौरव केला.

१५. वररुचीनें दोषमुक्तता स्वीकारली आणि तो घरीं गेला, तेव्हां त्यास कळलें कीं, त्याची पत्नी उपकोशा हिनें नवर्‍याचा मृत्यु ऐकून अग्निप्रवेश केला आणि शोकानें त्याच्या आईचें हृदय फुटलें; तेव्हां आपलें कांहीं उरलें नाहीं असें जाणून वररुचीनें तपोवनाचा आश्रय केला.

१६. कांहीं दिवसांनंतर अयोध्येकडून वररुचीकडे आलेल्या एका ब्राह्मणाकडून वररुचीस कळलें कीं शकटालानें चाणक्य-सहाय्यानें योगनंदास मारून टाकलें आणि चंद्रगुप्तास स्थापन केलें आणि पुढें चाणक्याची मंत्रिपदीं योजना करून आपण तपोवनांत गमन केलें.

१७. काणभूतीस कथा सांगून वररुचि बदरिकाश्रमीं गेला. तो देवीस भक्तीनें शरण गेला. तिनें त्यास एक धारणा सांगितली. त्या धारणेच्या योगानें शरीरास दग्ध करून वररुचि मुक्त झाला.

† महादेवीचें चित्र दैववशात् योगनंदाच्या अंतःपुरांतच गेलेल्या वररुचीच्या दृष्टीस पडलें असें दाखविलें आहे. महादेवी वररुचीच्या किंवा इतर लोकांच्या दृष्टीस पडत होती, पण तिचा कटिप्रदेश लोकांना दिसणें शक्य नव्हतें अशा तऱ्हेचा तिचा पोषाख होता; तथापि राजासाठीं आणि केवळ अंतःपुरांत ठेवण्यासाठीं जें चित्र काढलें होतें त्यांतच कटिप्रदेश उघडा दाखविला होता असें येथें विधान आहे आणि तें विधान प्राचीन चित्रांच्या अवगमनास उपयुक्त होईल. प्राचीन कालच्या अनेक चित्रांत बराचसा कटिप्रदेश उघडा दाखविला आहे. पण तो तसा चित्रांत दाखविणें हा चित्रकार-संप्रदाय असावा असें दिसतें. स्त्रीचें चित्र आकर्षक करावयाचें म्हणजे कांहीं आच्छादित शरीरप्रदेश उघडा ठेवून तें आकर्षक करावयाचें असा परिपाठ असावा. अर्थात् अशीं चित्रें कांहीं नियमित ठिकाणींच असावयाचीं. चित्रकारापुढें स्त्रिया त्याप्रमाणें तो भाग उघडा ठेवून बसत असतीलच असें नाहीं. तर तो चित्रभाग त्यास कल्पनेनेंच काढावा लागत असेल. कदाचित् स्त्रीचित्रकारांचा देखील उपयोग होत असेल अर्थात् बाहेरच्या लोकांमध्यें जेव्हां स्त्रिया हिंडत असतील तेव्हां तो भाग झांकलेला असे.

## ३४६. वररुचिकालनिर्णयमहत्त्व.

३४६. शातवाहनांच्या अगोदर अनेक पिढ्या वररुचि होऊन गेला यांत शंका नाहीं. शातवाहन जर नंदाच्या अंतिमकालांत असेल तर वररुचीनें आपलें व्याकरण त्या कालापूर्वीच लिहिलें असावें. त्या कालाच्या प्रारंभानंतर वररुचि झाला असता तर 'सदकणि' वगैरे प्राकृत रूपांचें स्पष्टी-

करण त्यानें केलें असतें. शालिवाहन, सातवाहन, सदकणी, शातकर्णी हे शब्द ज्यांचें वैयाकरणाकडून स्पष्टीकरण अवश्य आहे असेच होते. बृहत्कथेचा कथापीठलंबक वररुचीस एक तर पाणिनीशीं समकालीन करीत आहे आणि पुन्हां राज्यक्रांति होऊन मौर्यागमन वररुचीच्या अंतिमकालांत झालें असें दाखवीत आहे. पाणिनि तर बुद्धपूर्वकालीं होऊन गेला. वररुचि जर पाणिनीशीं समकालीन असला तर मौर्यागमकालीं येऊं शकणार नाहीं. आपणांस दोन्ही शक्यतांचा विचार केला पाहिजे. नंदांच्या अगोदर आणि पाणिनीशीं समकालीन वररुचि असणें अशक्य नाहीं. केवळ अपरनामावरून वररुचीला पाणिनीनंतर बऱ्याच काळानें घातलें आहे काय असा विचार मनांत येतो. वररुचीचें अपरनाम कात्यायन होतें असें कथापीठलंबक सांगत आहे. 'कात्यायन' हा प्राकृतप्रकाशाचा एक टीकाकारहि होता. त्यानें प्राकृतमंजरी * लिहिली. हा कात्यायन अत्यंत प्राचीन काळीं होऊन गेला असल्यामुळें आणि अनेक ग्रंथकार मूळ सूत्रें व त्यावर टीका लिहितात ही गोष्ट परिचित असल्यामुळें वररुचि हाच कात्यायन अशी परंपरा उत्पन्न होण्यास कारण झालें असावें; अशी कल्पना डॉ. वैद्य यांनीं आपल्या प्राकृत प्रकाशाच्या आवृत्तीच्या † प्रस्तावनेंत मांडली आहे ती बरीच ग्राह्य वाटते. पाणिनीवर वार्तिककार कात्यायन आहे आणि प्राकृतप्रकाशावरील भाष्यकार जर तोच कात्यायन असेल तर वररुचि बृहत्कथेंतील दंतकथेप्रमाणें पाणिनीशीं समकालीन होणें अशक्य नाहीं. पाणिनीच्या इतक्या प्राचीन कालांत वररुचीस नेणें अनेकांस आक्षेपार्ह वाटेल तथापि आक्षेपार्हता विनाकारण पूर्वग्रहामुळें आहे कीं सकारण आहे याचा विचार अवश्य आहे. आमच्या मतें पाणिनिकाळापासून वररुचीस दूर ढकलण्यास निश्चयात्मक आधार नाहीं. संस्कृतभाषा प्राचीन. तीपासून अपभ्रंश होऊन झालेली भाषा ती प्राकृत म्हणजे उत्तरकालीन अशी चुकीची समजूत मनांत असल्यामुळें उत्तरकालीन भाषेचा वैयाकरण तो उत्तरकालीन अशी वृत्ति अनेकांच्या मनांत असते. आणि तीमुळें वररुचीचा काळ पाणिनीच्या काळाजवळ नेण्यास त्यांच्या मनांत संकोच उत्पन्न होतो. तर तो संकोच दूर करून या प्रश्नाकडे पाहण्याची आवश्यकता आहे. वररुचीच्या कालनिर्णयाचें महत्त्व मोठें आहे. महाराष्ट्राच्या किंबहुना अखिल भारतीय संस्कृतीच्या विकासांत वररुचीचें व्याकरण हा एक महत्त्वाचा टप्पा आहे. ज्याची प्राचीनता साधारणपणें बरीच आहे असा महाराष्ट्रदेशविषयक लेख म्हटला म्हणजे वररुचि याचा 'प्राकृतप्रकाश' होय. ऐतिहासिकांना हा ग्रंथ अनेक तऱ्हांनीं उपयोगी आहे. हा ग्रंथ देशांतील भाषाविषयक स्थिति अंशेंकरून दाखवितो त्याचप्रमाणें 'भाषाशास्त्रविकासा' ची पायरी देखील दाखवितो. राजकीय आणि सामाजिक स्थितीचीं महत्त्वाचीं दर्शकें देखील या ग्रंथांत अनेक उरलीं आहेत. येणेंप्रमाणें अनेक क्षेत्रांतील विकासाच्या इतिहासांतील विशिष्ट पायरी दाखविणारा हा ग्रंथ असल्यामुळें या ग्रंथाचें पूर्ण अवतरण आणि त्यापासून होणारी इतिहासनिष्पत्ति हीं देणें अवश्य आहे. हें कार्य वाचकांना थोडेंसें डोकें फोड करावयास लावणार आहे. तर डोकेंफोड करण्यापूर्वी या वैयाकरणाविषयींच्या मनोरंजक कथांचा थोडासा आढावा दिला आहे.

### ३४७. वररुचीचें संस्कृतपांडित्य.

३४७. प्रथम वररुचीचें एकंदर कर्तृत्व काय होतें याकडे लक्ष देऊं. प्राकृत व्याकरणाचें श्रेय वररुचीस आहेच. पण त्याशिवाय त्याचें संस्कृत भाषेसंबंधाचें कार्य देखील बरेंच आहे. संस्कृत शब्दांचा संग्रह करून त्यांच्या लिंगाविषयीं वर्गीकरणनियमन करण्याचें कार्य वररुचीनें केलें. बृहत्कथेंतील कथापीटलंबक त्यास प्राकृत वैयाकरण न समजतां संस्कृत वैयाकरणच समजतो आणि त्याचा व्याडि व पाणिनि यांशीं संबंध दाखवितो. बृहत्कथा वररुचीपासून गुणाढ्याकडे गेली. गुणाढ्याशीं शर्ववर्म्यानें जी स्पर्धा केली तिची हकीगत कथापीठलंबक देत आहे. बृहत्कथेची पशाची आवृत्ति वररुचीमुळें उत्पन्न झाली नाहीं, तर ती कथा काणभूतीच्या चाळणींतून गेल्यामुळें कथेस पैशाचीपणा आला असें तो लंबक दाखवीत आहे.

वररुचीसंबंधानें पुढील उल्लेख लक्षांत घेतले पाहिजेत.

( १ ) शर्वानंद अमरकोशाच्या दुसऱ्या श्लोकावर टीका करतांना सांगत आहे कीं व्याडि आणि वररुचि यांच्या कोशांच्या एकीकरणानें केला असल्यामुळें अमराचा कोश पूर्णता पावला आहे. त्रिकांड उत्पलिनी इत्यादि कोश शब्द देतात. व्याडि व वररुचि यांचे कोश लिंग–मात्र–तंत्र आहेत.*

* या पुस्तकाची निर्णयसागरची तृतीयावृत्ति १९१८ मध्यें प्रसिद्ध झाली आहे.

† ओरिएंटल बुक एजन्सी, पुणें, १९३१.

* अन्यतंत्राणि व्याडिवररुचि प्रभृतीनां तंत्राणि, समाहृत्य एकीकृत्य । अतएव संपूर्णमिदम्, यतस्त्रिकाण्डोत्पलिन्यादीनि नाममात्रतंत्राणि व्याडिवररुच्यादि प्रणीतानि तु लिंगमात्रतंत्राणि ।

( शर्वानंदाची टीका गणपति शास्त्रीसंपादित; चार भाग. त्रिवेंद्रम् १९१४–१९१७ ).

( २ ) पुरुषोत्तम याचा त्रिकांडशेष हा ग्रंथ कात्य, कात्यायन आणि वररुचि या एकच व्यक्ति आहेत असें समजतो. ( २. ७. २५ ).

( ३ ) वररुचि हा ' लिंगविशेषविधि ' या पुस्तकाचा कर्ता आहे. हर्षवर्धन, वामन आणि शर्वानंद हे प्रस्तुत ग्रंथाचें कर्तृत्त्व वररुचीस देतात.

वररुचीच्या प्राकृत व्याकरणावर विचार पुढें येतील. आतां प्राथमिक विधान एवढें करून ठेवतों कीं वररुचीची पाणिनीशीं समकालीनता कोणत्याहि पुराव्याशीं विरुद्ध नाहीं. तथापि ही गोष्ट देखील लक्षांत घेतली पाहिजे कीं ब्राह्मणांनीं प्राचीन आचार्यांना तर्पण केलें आहे त्यांत वररुचीस तर्पण केलें नाहीं. यासाठीं तर्पण कोणास होई या प्रश्नाकडे थोडेंसें लक्ष दिलें पाहिजे.

### ३४८. ब्राह्मणांचें आचार्यतर्पण आणि त्यांत वररुचीचा अनुल्लेख.

३४८. ब्राह्मणांनीं आपल्या जातीला जें शिक्षण दिलें त्यांत बरीच शास्त्रीय पद्धति दिसून येते. प्रत्येक मनुष्याला पंडित बनतां येणार नाहीं. तथापि पांडित्याची अभिज्ञता उत्पन्न होईल व पंडिताचा बोजा ठेवण्यास प्रवृत्त करील इतपत ज्ञान सर्वांसच अवश्य आहे. सामान्य पांडित्याविषयीं अभिज्ञतासंवर्धनाचें महत्त्व बरेंच आहे तर वैदिक पांडित्यासंबंधानें विशेषच आहे. ऋग्वेदी ऋग्वेद वाचतील असें नाहीं. विस्मृत देवतांसाठीं लिहिलेलीं स्तोत्रें वाचण्याचा परिश्रम कोण करितो, तथापि ऋग्वेदी मनुष्यास आपल्या वेदशाखेमध्यें कोणकोणते मोठे पुरुष झाले याचें ज्ञान अवश्य आहे. तशीच गोष्ट इतर वेदांच्या अनुयायांसंबंधानें आहे आणि यासाठीं गृह्यविधींच्या योजकांनीं तर्पणपद्धतीचा अंगिकार केला. तर्पणाविषयींचे अदेश गृह्यसूत्रांत आहेत. आजच्या ब्रह्मकर्मांत तर्पणार्ह व्यक्तींची संख्या वृद्धिंगत झाली आहे. ब्रह्मयज्ञ दररोज कोणी करीत नाहीं. तथापि वर्षांतून एकाद दिवशीं आपल्या पूर्वाचार्यांचीं नांवें कानावरून गेलीं तर त्यांची स्मृति कायम रहाण्यास मदत होते, हें मध्यकालीन धार्मिक संस्कर्त्यांनीं ओळखलें व त्यासाठीं प्रत्येक वैदिक शाखेच्या अनुयायांना ब्रह्मयज्ञांत त्यांच्या शाखेंतील थोर मनुष्यास तर्पण करण्याचें कर्म सांगितलें आहे. ही तर्पणमंत्राची म्हणजे खरोखर मालिकेची रचना करण्याचें काम कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंतच्या मधल्या काळांत झालें आहे. देवांस, वेदांस द्यावापृथ्वीस तर्पण आहेच; नदी समुद्रादि स्थानदेवतांस तर्पण आहे. गंधर्व, अप्सरा यांनांहि आहे. विप्र, यक्ष, राक्षस, भूतें यांस आहे. पण विद्याधरांस तर्पण नाहीं, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

ऋग्वेदांतील सर्व प्रसिद्ध सूत्रकारांस विशेष करून गोत्रमंडळाच्या ऋषींस नांवानें तर्पण करण्याची व्यवस्था केली आहे. ऋग्वेदी मनुष्यानें केवळ आपल्या संहितेंतील मंत्रद्रष्ट्यांस तर्पण करावें असें सांगितलें नाहीं. तर भारताच्या कर्त्यांस म्हणजे व्यासांस आणि व्यासशिष्यांमध्यें जे कर्तृत्त्ववान् पुरुष झाले त्यांस म्हणजे पैल, सुमंतु, जैमिनी यांसारख्या व्यक्तींस तर्पण सांगितलें आहे. तसेंच आपल्या संप्रदायांत ज्या थोर स्त्रिया होऊन गेल्या त्यांस देखील तर्पण सांगितलें आहे. धमात स्त्रियांस हिंदु महत्त्व देत नाहींत असें म्हणणारांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवावी. ऋग्वेदाच्या शाखा अनेक झाल्या, सूत्रकारहि झाले, त्या सर्वांची आठवण ठेवण्यास ऋग्वेदीमंडळीस सांगितलें आहे.

ब्रह्मयज्ञ खरोखर दररोज केला पाहिजे पण दररोज ब्रह्मयज्ञ करणारी व्यक्ति विरळा. श्रावणीच्या वेळीं मात्र ब्रह्मयज्ञ होतो.

ब्रह्मयज्ञांतील विधि श्रावणींतील उत्सर्जन विधींत घेतांना तोडून दोन ठिकाणीं दिला आहे. श्रावणीच्या वेळीं पूर्वाचार्यांचें आणि ऋषींचें स्मरण दोन प्रकारें करावें लागतें. उत्सर्जनांत निरनिराळ्या स्वाध्याय ग्रंथांचें स्मरण गोंवलें आहे. पुढें उत्सर्जनांत ऋषितर्पण म्हणून विधींत येणाऱ्या मंडळींचीं नांवें पुढें दिलींच आहेत, पण स्वाध्यायाचे ऋषि पूर्णपणें त्यांत आले नाहींत म्हणून स्वाध्याय ग्रंथाचीं प्रतीकें उत्सर्जनविधींत दिलीं आहेत. त्या सर्व प्रतीकांचें अवतरण अनुक्रमानें करतों आणि अवतरणानंतर साध्या टाइपांत तें प्रतीक कशाचें याविषयीं स्पष्टीकरण देतों.

**अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमः ।** ( ऐतरेय ब्राह्मण )

**अथ महाव्रतं ।** ( ऐतरेय आरण्यक अध्याय १ ला )

**एष पंथा एतत्कर्म ।** ( ऐ. आरण्यक अ. २ रा )

**अथातः संहिताया उपनिषत् ।** ( ऐ. आ. अ. ३ रा )

**विदामघवन्विदा ।** ( ऐ. आ. अ. ४ था )

**महाव्रतस्य पंचविंशतिं सामिधेन्यः ।** ( ऐ. आ. अ. ५ वा )

**इषेत्वोर्जेत्वा ।** ( यजुर्वेदारंभ, शुक्ल व कृष्ण ).

**अग्न आयाहि वीतये ।** ( सामवेदारंभ )

शंन्नोदेवीरभिष्टये। ( अथर्ववेदारंभ )
अथैतस्य समाम्नायस्य। ( आश्वलायन श्रौतसूत्र )
समाम्नायः समाम्नातः। ( यास्ककृत निरुक्त )
मयरसतजभनलगसंमितं। ( छंदःशास्त्र )
गौः। ग्माः। ( निघंटु )
पंचसंवत्सरमयं। ( ज्योतिषग्रंथप्रतीक )
अथ शिक्षां प्रवक्ष्यामि ( शिक्षाग्रंथ–प्रथम वाक्य )
वृद्धिरादैच ( पाणिनि व्याकरणांतील आद्यसूत्र )
( यदिंद्रो दाशराज्ञे मानुषं व्यगाहथाः।
इदं जना उपश्रुत। )——सांगतां येत नाहीं.
योगीश्वरं याज्ञवल्क्यं। ( याज्ञवल्क्य–स्मृतिवाक्य )
नारायणं नमस्कृत्य ( महाभारत–आद्यवाक्य )
अथातो धर्मं व्याख्यास्यामः। ( कणादन्यायसूत्र-प्रारंभ )
अथातो धर्मजिज्ञासा ( जैमिनीय पूर्वमीमांसा प्रथमसूत्र )
अथातो ब्रह्मजिज्ञासा–( बादरायणकृत उत्तरमीमांसा प्रथमसूत्र )

ब्रह्मयज्ञांत या ग्रंथप्रतीकांचा उच्चार सांगितला असून पुढें ऋषितर्पण सांगितलें आहे तें पुढीलप्रमाणें आहेः—

**३४९. ऋग्वेदीयांचें तर्पण.**

३४९. ऋग्वेदीयांची तर्पणाची यादी पुढीलप्रमाणें आहे.

**प्रजापतिस्तृप्यतु। ब्रह्मा तृप्यतु। वेदास्तृप्यंतु। देवास्तृप्यंतु। ऋषयस्तृप्यंतु। सर्वाणिच्छंदांसि तृप्यंतु। ॐकारस्तृप्यतु। वषट्कारस्तृप्यतु। व्याहृतयस्तृप्यंतु। सावित्री तृप्यतु। यज्ञास्तृप्यतु। द्यावा पृथिवी तृप्यतां। अंतरिक्षं तृप्यतु। अहोरात्राणि तृप्यंतु। सांख्यास्तृप्यंतु। सिद्धास्तृप्यंतु। समुद्रास्तृप्यंतु। नद्यस्तृप्यंतु। गिरयस्तृप्यंतु। क्षेत्रौषधि वनस्पति गंधर्वाप्सरसस्तृप्यंतु। नागास्तृप्यंतु। वयांसि तृप्यंतु। गावस्तृप्यंतु। साध्यास्तृप्यंतु। विप्रास्तृप्यंतु। यक्षास्तृप्यंतु। रक्षांसि तृप्यंतु। भूतानि तृप्यंतु। एवमंतानि तृप्यंतु। इत्येकोनत्रिंशन्मंत्रैः।**

**[ अथ निवीती ऋषितीर्थेन कुशमध्येन द्विः प्रत्येकं। ]**

**शतर्चिनस्तृप्यंतु। माध्यमास्तृप्यंतु। गृत्समदस्तृप्यतु। विश्वामित्रस्तृप्यतु। वामदेवस्तृप्यतु। अत्रिस्तृप्यतु। भरद्वाजस्तृप्यतु। वसिष्ठस्तृप्यतु। प्रगाथास्तृप्यंतु। पावमान्यस्तृप्यंतु। क्षुद्रसूक्तास्तृप्यंतु। महासूक्तास्तृप्यंतु। इति द्वादश मंत्रैः।**

**[ अथ प्राचीनावीति पितृतीर्थेन कुशमूलैस्त्रिः प्रत्येकं ]**

**सुमंतुजैमिनिवैशंपायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्यास्तृप्यंतु।**

**जानन्तिबाहविगार्ग्यगौतमशाकल्यबाभ्रव्यमांडव्यमांडूकेयास्तृप्यंतु।**

**गर्गीवाचक्नवी तृप्यतु। वडवाप्रातीथेयी तृप्यतु। सुलभामैत्रेयी तृप्यतु।**

**कहोळं तर्पयामि। कौषीतकं त०। महाकौषीतकं त०। पैंग्यं त०। महापैंग्यं त०। सुयज्ञं त०। सांख्यायनं त०। ऐतरेयं त०। महैतरेयं त०। शाकलं त०। बाष्कलं त०। सुजातवक्रं त०। औदवाहिं त०। महौदवाहिं त०। सौजामिं त०। शौनकं त०। आश्वलायनं त०। ये चान्ये आचार्यास्ते सर्वे तृप्यंतु।**

व्यासांचे चार शिष्य सुमन्तु वगैरे होत. त्या प्रत्येकाला चार वेदांपैकीं एक एक वेद व्यासांनीं शिकविला. सुमंतूला अथर्ववेद शिकविला, जैमिनीला सामवेद शिकविला, वैशंपायनाला यजुर्वेद शिकविला आणि पैलाला ऋग्वेद शिकविला; म्हणजे हे चार त्या त्या वेदांचे आद्यप्रवर्तक होत.

सूत्र म्हणजे सर्व श्रौत, स्मार्त व वेदान्त वगैरेंचीं सूत्रें-त्याचप्रमाणें त्यावरचीं भाष्यें.

व्यासांनीं प्रथम 'जय' नांवाचा ग्रंथ केला, तो वाढवून वैशंपायनानें भारत ग्रंथ केला आणि सध्यांचें महाभारत सौतीनें भारत वाढवून केलें आहे.

जानन्ति, बाहवि, गार्ग्य, गौतम, शाकल, बाभ्रव्य, माण्डव्य आणि माण्डूकेय हे माण्डूकेयगणांतील आचार्य होत.

गर्गी वाचक्नवी, वडवा प्रातीथेयी, सुलभा मैत्रेयी, कहोळ, कौषीतक, महाकौषीतक, पैंग्य, महापैंग्य, सुयज्ञ आणि सांख्यायन हे सांख्यायनगणांतील आचार्य होत.

ऐतरेय, शाकल, बाष्कल, सुजातवक्त्र, औदवाहि, महौदवाहि, सौजामि, शौनक आणि आश्वलायन हे आश्वलायन गणांतील आचार्य होत. ( ही माहिती चरणव्यूहपरिशिष्टावरील पण्डित महीदास यांच्या भाष्यांतून घेतली आहे. )

बाभ्रव्य यानें ऋग्वेदाचा क्रमपाठ केला असें शौनकाच्या ऋक्प्रातिशाख्यांत म्हटलें आहे. ( शौ. ऋ. प्रा. ११–६५ )

गर्गी ही वचक्नूची कन्या. हिनें जनकाच्या यज्ञांत याज्ञवल्क्याशीं वादविवाद केला. ( बृ. ३।६।८ ) ही वेदांतविद्येंत फार निष्णात होती. त्याचप्रमाणें वडवा प्रातीथेयी आणि सुलभा मैत्रेयी याहि स्त्रिया आहेत. गर्गी, वडवा आणि मैत्रेयी हीं त्या स्त्रियांचीं विशेष नामें असून वाचक्नवी, प्रातिथेयी आणि मैत्रेयी हीं कुलनामें आहेत. मैत्रेयी ही याज्ञवल्क्याची पत्नी होती.

कहोळ हा एक जनकाच्या यज्ञांत याज्ञवल्क्याबरोबर तत्त्वज्ञानांत वादविवाद करणारा तत्त्वज्ञानी होता. याच्या बापाचें नांव कुशीतक होय. ( बृ. ३–२ )

कौषितक हा सांख्यायनब्राह्मणाचा कर्ता होय.

पैंग्य याचे नांवावर पैंग्यब्राह्मण नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. निरुक्तकार यास्क यालाहि पैंग्य म्हणत असत.

सांख्यायनाचें श्रौतसूत्र प्रसिद्ध आहे.

शाकल हा शाकल नांवाच्या ऋग्वेदाच्या शाखेचा प्रवर्तक होय.

आश्वलायन हा सुप्रसिद्ध आश्वलायनगृह्य व श्रौतसूक्तांचा कर्ता होय.*

या यादींत पाणिनीचें नांव नाहीं; यास्काचें नाहीं; तथापि त्यांचें स्मरण करण्याचें कर्तव्य विधिप्रयोगकारांनीं सांगावयाचें ठेवलें नाहीं.

ग्रंथांच्या आदिवाक्यासारख्या प्रतीकांची जी यादी दिली आहे ती यादी ऋषितर्पणाच्या यादीनंतर तयार झाली असावी असें दिसतें. ऋषितर्पण आणि आचार्यतर्पण म्हणून ज्या लोकांचीं नांवें आलीं तीं म्हटलीं म्हणजे सूत्रकालापर्यंतच्या लोकांचीं. त्यांत जैमिनि, यास्क, पाणिनि वगैरे जे थोर वेदांगांचें अभ्यासक आणि आचार्य होऊन गेले त्यांचीं नांवें आलीं नाहींत. पूर्वीच्या यादींत ढवळा ढवळ तर करावयाची नाहीं. यादी वाढवतां येत नाहीं, कारण सूत्रसंख्या देऊन तीं बंद केली. नवीन आचार्यांची सोय कशी लावावयाची तर त्या ग्रंथकारांच्या ग्रंथांच्या प्रतीकांचें अवतरण केलें म्हणजे त्या ग्रंथकाराचें नाहीं तरी ग्रंथांचें स्मरण झालेंच. इतिहास एकसारखा वाढत होता. कर्तृत्त्ववान् मंडळींचीं नांवें राखावयाचीं होतीं, त्यांत वाढ होऊं द्यावयाची म्हटली म्हणजे विद्यार्थ्यांस ओझें होईल म्हणून ती यादी सूत्रसंख्या घालून बंद करून ठेवावी, अशी क्रिया झाली. त्या क्रियेमुळें उत्पन्न होणारी गैरसोय नंतरच्या लोकांस भासली आणि त्यामुळें नवीन उपक्रम करावा लागला; तो उपक्रम म्हटला म्हणजे ग्रंथांतलें वाक्यच काढून तें घोकविण्याचा होय. विधींची घटना आपल्या पुढें आहे त्यांत निरनिराळ्या कालाच्या लोकांच्या भावनांची आणि अडचणींची आणि अडचण आल्यानंतर ती सोडविण्याच्या युक्तींचीं स्मारकें स्पष्ट आहेत.

### ३५०. कृष्णयजुर्वेदी मंडळीकडून उपेक्षा.

३५०. यजुर्वेदीमंडळीच्या यादीपेक्षां कृष्णयजुर्वेदी मंडळीची ब्रह्मयज्ञांतील तर्पणाची यादी अधिक व्यापक आणि विस्तृत आहे. ऋग्वेद यजुर्वेदापेक्षां आकारानें मोठा आहे पण ब्रह्मयज्ञांतील यादी लहान कां, असा प्रश्न उत्पन्न होईल.

अ थ दे व र्षि पि तृ त र्प णं।

**ब्रह्माणं तर्पयामि। प्रजापतिं तर्पयामि। बृहस्पतिं तृर्पयामि। अग्निं तर्पयामि। वायुं तर्पयामि। सूर्यं तर्पयामि। चंद्रमसं तर्पयामि। नक्षत्राणि तर्पयामि। इंद्रँराजानं तर्पयामि। यमँराजानं तर्पयामि। वरुणँराजानं तर्पयामि। सोमँराजानं तर्पयामि। वैश्रवणँराजानं तर्पयामि। वसूंस्तर्पयामि। रुद्रांस्तर्पयामि। आदित्यांस्तर्पयामि। विश्वान्देवान्तर्पयामि।**

[ हीं वरील देवनामें आहेत त्याविषयीं स्पष्टीकरण नकोच. ]

**साध्यांस्तर्पयामि। ऋभूंस्तर्पयामि। भृगूंस्तर्पयामि। मरुतस्तर्पयामि। अथर्वणस्तर्पयामि। अंगिरसस्तर्पयामि।**

[ हीं वरील नांवें आद्यर्षी देव समजल्या जाणारांचींच आहेत. ]

अ थ नि वी ती

**विश्वामित्रं तर्पयामि। जमदग्निं तर्पयामि। गौतमं तर्पयामि। अत्रिं तर्पयामि। वसिष्ठं तर्पयामि। कश्यपं तर्पयामि। अरुंधतीं तर्पयामि। अगस्त्यं तर्पयामि। कृष्णद्वैपायनं तर्पयामि।**

[ हे सर्व ऋषि सुप्रसिद्ध आहेत. ह्याविषयीं विशेष माहितीची आवश्यकता नाहीं. ]

**जातूकर्ण्यं तर्पयामि। तरुक्षं तर्पयामि। तृणबिंदुं तर्पयामि। वर्मिणं तर्पयामि। वरूथिनं तर्पयामि। वाजिनं तर्पयामि। वाजश्रवसं तर्पयामि। सत्यश्रवसं तर्पयामि। सुश्रवसं तर्पयामि। सुतश्रवसं तर्पयामि। सोमशुष्मायणं तर्पयामि।**

---

* चित्रावकृत " ब्रह्मयज्ञ " पृ. १३.

**सत्ववतं तर्पयामि। बृहदुक्थं तर्पयामि। वामदेवं तर्पयामि। वाजिरत्नं तर्पयामि। हर्यश्वानं तर्पयामि। उद्मयं तर्पयामि। गोतमं तर्पयामि। ऋणंजयं तर्पयामि। ऋतंजयं तर्पयामि। कृतंजयं तर्पयामि। धनंजयं तर्पयामि। बभ्रुं तर्पयामि। त्र्यरुणं तर्पयामि। त्रिवर्षं तर्पयामि। त्रिधातुं तर्पयामि। शिबिं तर्पयामि। पराशरं तर्पयामि।**

[ हीं नांवें कमी प्रसिद्ध आहेत तरी त्या शाखेच्या इतिहासांतील प्रमुख व्यक्तींचीं आहेत. ]

**विष्णुं तर्पयामि। रुद्रं तर्पयामि। स्कंदं तर्पयामि। काशीश्वरं तर्पयामि। ज्वरं तर्पयामि। धर्मं तर्पयामि। अर्थं तर्पयामि। कामं तर्पयामि। क्रोधं तर्पयामि। वसिष्ठं तर्पयामि। इंद्रं तर्पयामि। त्वष्टारं तर्पयामि। कर्तारं तर्पयामि। धर्तारं तर्पयामि। धातारं तर्पयामि। मृत्युं तर्पयामि। सवितारं तर्पयामि। सावित्रीं तर्पयामि।**

[ वरील यादींत देव आणि भावरूपी देवता यांचाहि अंतर्भाव केलेला आहे. ]

**ऋग्वेदं तर्पयामि। यजुर्वेदं तर्पयामि। सामवेदं तर्पयामि। अथर्ववेदं तर्पयामि। इतिहासपुराणांस्तर्पयामि।**

[ एवंच धर्मविषयक ग्रंथ हे देखील तर्पणार्ह आहेत. ]

प्रा ची ना वी ति.

**वैशंपायनं तर्पयामि। पलिंगुं तर्पयामि। तित्तिरं तर्पयामि। उखं तर्पयामि। आत्रेयं पदकारं तर्पयामि। कौंडिण्यं वृत्तिकारं तर्पयामि। सूत्रकारं तर्पयामि। सत्याषाढं तर्पयामि। प्रवचनकर्तृंस्तर्पयामि। आचार्यांस्तर्पयामि। ऋषींस्तर्पयामि। वानप्रस्थांस्तर्पयामि। ऊर्ध्वरेतसस्तर्पयामि। एकपत्नींस्तर्पयामि।**

[ शाखेंतील अत्यंत महत्त्वाच्या आचार्यवर्गास वरील तर्पण आहे. ]

### ३५० अ. ब्रह्मयज्ञांत उल्लेखाचें महत्त्व.

३५० अ. हिरण्यकेशीयांच्या ब्रह्मयज्ञामध्यें स्वाध्यायविषयक जे मंत्र आहेत त्यामध्यें वेदांगें तयार करणाऱ्यांचा किंवा त्यांच्या ग्रंथांचा प्रतीक रूपानें उल्लेख नाहीं. ऋग्वेदांतील 'अग्नीमीळे' ही पहिली ऋचा घेतली आहे त्यानंतर इषेत्वोर्जेत्वा...पशून् पाहि' हें यजुर्वाक्य आलें आहे, त्यानंतर अनुक्रमानें सामवेद सूक्तांतील पहिलें सूक्त आलें आहे व 'शंनोदेवी' हा अथर्वांतील प्रथम मंत्र आला आहे. त्यांचें ग्रंथस्मरण एवढ्यावरच संपतें. ज्याअर्थीं ऋग्वेदी आणि हिरण्यकेशी या दोघांच्याहि ब्रह्मयज्ञांत अथर्ववेदाचें प्रतीक 'शंनोदेवी' हेंच दिलें आहे; त्याअर्थीं त्यांच्यापाशीं अथर्ववेदाची आजची आवृत्ति नसून भिन्न आवृत्ति प्रचलित होती असें वाटतें. ऋग्वेदी आणि हिरण्यकेशी या दोघांच्या ब्रह्मयज्ञाची तुलना केली असतां हिरण्यकेशीयांचा ब्रह्मयज्ञ प्रयोग अधिक जुनाट वाटतो; तथापि तो जुनाटपणा फारच थोडक्या मर्यादेंत खेळत आहे. हिरण्यकेशीयांनीं त्याचप्रमाणें ऋग्वेद्यांनीं आपले सूत्रकार आश्वलायन आणि सत्याषाढ या दोघांहि सूत्रकारांस तर्पण केलेलें आहे त्यावरून दोघांचेंहि तर्पण सूत्रकालीन आहे. ज्याअर्थीं सूत्रकालीन तर्पणामध्यें एक वेदांगकर्त्यांचा उल्लेख करीत आहे आणि दुसरा प्रयोग त्यांचा उल्लेख करीत नाहीं, त्याअर्थीं दुसऱ्या प्रयोगाला पूर्वकालीनत्व द्यावेंसें वाटतें. सूत्रकाल हा बराचसा विस्तृत होता; आणि सूत्रकालपर्यंत हिरण्यकेशीयांची परंपरा अधिक विस्तृत दिलेली आहे त्याअर्थीं ब्रह्मयज्ञाचा प्रयोग प्रथमतः हिरण्यकेशीयांनीं मांडला असावा अशी कल्पना होते. तैत्तिरीय संहिता ही तैत्तिरीय हें नांव कसें पावली यासंबंधानें एक अद्भुतकथा पुराणें सांगत आहेत, तर कृष्णयजुर्वेदी वैशंपायनानंतर आपला तिसरा प्रसिद्ध आचार्य तित्तिरि होता हें ज्ञान संरक्षीत आहेत. याशिवाय सत्याषाढ सूत्रापूर्वी पदपाठ करणारा आत्रेय नांवाचा होऊन गेला, आणि एक वृत्तिकार कौंडिन्य नांवाचा होऊन गेला, अशी अभ्यासक परंपरा सत्याषाढसूत्रीय मंडळी आपल्या ब्रह्मयज्ञाच्या प्रयोगांत संरक्षून ठेवीत आहेत.

श्रावणींतील ऋषींच्या यादीकडे आणि ग्रंथांच्या प्रतीकांकडे लक्ष दिलें असतां कांहीं गोष्टी ठळकपणें भासतात. एक गोष्ट म्हटली म्हणजे यांत मनुस्मृतीसारख्या ग्रंथाची आठवण केली जात नाहीं; पण 'योगीश्वरं याज्ञवल्क्यं' अशी याज्ञवल्क्याच्या ग्रंथाची आठवण केली जात आहे, म्हणजे जी स्मृति अधिक उत्तरकालीन आहे तिची आठवण या प्रयोगकारांनीं ठेवावयास सांगितली असा भास होईल; पण तसा भास होण्याचें कारण नाहीं. मनुस्मृति ही भृगूंची स्मृति होय असें त्या ग्रंथांतच स्पष्ट आहे; आणि त्यामुळें मनु याचा आचार्यांच्या यादींत किंवा प्रतीकांत उल्लेख करावयाचें कारण नाहीं. याज्ञवल्क्य हा प्रसिद्ध वैदिक आचार्य होऊन गेला आणि वैशंपायनाप्रमाणें मोठ्या शाखासमूहांचा आद्याचार्य होता. आणि त्यानेंच स्मृतिग्रंथहि लिहावयास सुरवात केली असावी अशी कल्पना करून, प्रयोग करून या योगीश्वराचा उल्लेख केला आहे. तर्पण करणारे ऋग्वेदी, पण ते

तर्पण करीत आहेत, ते शुक्ल यजुर्वेद्यांच्या स्मृतिग्रंथांस. यावरून याज्ञवल्क्यस्मृतीचें महत्व कांहीं अधिक होतें असें भासतें. तें स्मृतीचें महत्त्व आजच्या याज्ञवल्क्यस्मृतीस नसून त्याच्या पूर्वरूपास म्हणजे खुद्द याज्ञवल्क्याच्या काळीं जी आवृत्ति तयार झाली तीस होतें.

प्रस्तुत आचार्यतर्पणाच्या यादींत रामायणाचा उल्लेख कोठेंच येत नाहीं. भारतकार म्हणून पांच ऋषींचा उल्लेख येत आहे; तथापि वाल्मीकीच्या रामायणाचा उल्लेख येऊं नये ही गोष्ट सहजच नजरेस येते आणि त्याचें कारण काय असावें याविषयीं विचार करतां पुढील कल्पना मनांत येतात. एक कल्पना म्हटली म्हणजे रामायण त्यावेळेस आजच्या स्वरूपांत तयार झालें नसावें, किंवा तयार झालें असतांहि त्याचा धार्मिक ग्रंथांत प्रवेश झाला नसावा. तिसरी कल्पना अशी येते कीं ज्या व्यासाच्या शिष्यमंडळानें वेदांच्या निरनिराळ्या शाखा ताब्यांत घेऊन त्यांचें उपबृंहण केलें त्याच शिष्यमंडळानें महाभारत ज्या साहित्यापासून तयार झालें, त्या साहित्याचा ताबा घेऊन महाभारतरचनेची तयारी केली. म्हणून स्वाभाविकपणें भारतकारांचा उल्लेख त्यांत आला आहे. त्यांचा उल्लेख भारतकार म्हणून जरी आला नसता तरी निरनिराळ्या शाखांचे प्रवर्तक किंवा वेदांगांचे प्रवर्तक म्हणून आला असताच. वैशंपायन आणि जैमिनी हे दोघे भारताचे ग्रंथकार आहेत. पण दोघांचेंहि महत्त्व श्रौतविधींच्या वाङ्मयांत आहे. वैशंपायनाचें महत्त्व जर एका वेदाचा रक्षक या नात्यानें आहे तर जैमिनीचें महत्त्व वेदवाक्याची मीमांसा करणारा या नात्यानें आहे; म्हणजे पाणिनीचें महत्त्व वैयाकरण या नात्यानेंच केवल नाहीं, तर एका मोठ्या वेदांगाचा अभ्यासक आणि प्रवर्तक या नात्यानें आहे आणि वररुचीचें नांव जर तर्पणांच्या यादींत नसलें किंवा प्रतीकानें दृष्ट झालेल्या ग्रंथाच्या यादींत नसलें तर त्यांत मोठेंसें नवल नाहीं. वररुचि प्राकृत भाषेच्या व्याकरणाचा कर्ता या नात्यानें त्याची कामगिरी आज आपणांस महत्त्वाची जरी वाटत आहे तरी प्राचीन काळामध्यें त्याच्या कामगिरीचें इतकें महत्त्व नव्हतें. जेथें रामायणासारख्या ग्रंथाचीच डाळ शिजत नव्हती, तेथें प्राकृत वैयाकरण वररुचीस कोण विचारतो ?

चारहि वेदांच्या ब्रह्मयज्ञासंबंधानें विद्यानिधि सिद्धेश्वर शास्त्री चित्राव पुढील प्रमाणें लिहितातः— *

"यजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदी यांच्या ब्रह्मयज्ञांत उद्धृत केलेल्या ग्रंथादि वाक्यांचाच प्रस्तुत ब्रह्मयज्ञांतील वाक्याप्रमाणें बरोबर पत्ता लागूं शकतो. त्या शिवाय एक गोष्ट विशेष उपलब्ध होते ती ही कीं, केवळ आदिवाक्यें ऋग्वेदी लोकांप्रमाणेंच यजुर्वेदी वगैरे लोक उच्चारीत नसून ग्रंथाच्या आरंभींचें व शेवटचें अशीं दोनहि वाक्यें ब्रह्मयज्ञांत म्हणतात. त्यामुळें ग्रंथारंभ व शेवट हे निश्चित समजतात.

ऋग्वेदी ब्रह्मयज्ञांत ऋषितर्पणांत जी एक प्रकारची व्यवस्था व इतिहास दिसतो, तसा यजुर्वेदी वगैरेंच्या ब्रह्मयज्ञांत उपलब्ध होत नाहीं. हीच स्थिति देवता, आचार्य यांच्याहि बाबतींत आहे. तथापि सर्व शाखांच्या ब्रह्मयज्ञांत एक प्रकारचा इतिहास भरलेला आहे. तो इतिहास उकलण्याचे धागे मात्र अदृश्य झाले आहेत, ते अभ्यासानें दिव्य दृष्टि प्राप्त झालेल्यांस फक्त शक्य होईल. सर्व ब्रह्मयज्ञांत सांख्यांचें प्राबल्य विशेष दिसतें."

वररुचीचा आचार्यांमध्यें अनुल्लेख किंवा त्याच्या ग्रंथाचा अनुल्लेख त्याच्या प्राचीनतेविरुद्ध प्रमाण धरतां येणार नाहीं.

---

* चित्रावशास्त्रीकृत 'ब्रह्मयज्ञ', लोकसंग्रह छापखाना, पुणें. पृ. ७ ते ८.

# प्रकरण ३९ वें.

# वररुचीचें प्राचीन महाराष्ट्रभाषारक्षणाचें कार्य.

## ३५१. वररुचि आणि इतर वैयाकरण.

३५१. मागील प्रकरणांत प्रथम वररुचीच्या विद्यार्थिदशेचा वृत्तांत दिला आहे आणि नंतर त्याची राजकीय कारकीर्द दिली आहे. बृहत्कथा त्यास यौगंधरायण व चाणक्य यांप्रमाणें राजकारणी, पण धार्मिक भावनाप्रधान असलेला, आणि नीतिकौशल्यास दुय्यम स्थान देणारा असा दाखवीत आहे, आणि कात्यायन या नांवानें ज्याचें संस्कृत वैयाकरणामध्यें महत्त्वाचें स्थान होतें असा दाखवीत आहे. नंद, मौर्य, पाणिनि, वररुचि, व्याडि, इंद्रदत्त एकाच काळचे पुरुष दाखविले आहेत, आणि गुणाढ्य उत्तरकालीन दाखविला आहे. या सर्व गोष्टी स्वीकारावयाच्या काय, असा प्रश्न आहे.

पाणिनींस आज बुद्धोत्तर म्हणावयास कोणी भारतीय विद्वान तयार नाहीं. पाणिनीनें "निर्वाण" शब्दाचें जें विवेचन केलें आहे त्यावरून त्या शब्दाचा बौद्ध अर्थ त्यास ठाऊक नव्हता असें स्पष्ट आहे. पाणिनिकाल बुद्धपूर्व अनेक वर्षें आहे हें गृहीत धरलें आणि वररुचि हा नंदामात्य होता हेंहि खरें धरलें तर वररुचि आणि पाणिनि यांची बृहत्कथेंत सांगितलेली समकालीनता आपणांस अमान्य करावी लागेल, किंवा वररुचि तरी नंदपूर्वकालीन समजावा लागेल. वररुचि हा जर राजमित्र, राजामात्य, आणि राजसंरक्षक असला, तर तो दुसऱ्या कोणत्या तरी प्राचीनतर राजाचा अमात्य झाला आणि त्या राजाचें नांव विस्मृत झाल्यामुळें तें कथाजाल नंदांच्या खुंटीवर अडकविलें गेलें असें म्हणावें लागेल. वररुचि जर पाणिनीशीं समकालीन असेल तर वार्तिककार कात्यायन आणि वररुचि हे भिन्न असले पाहिजेत. कारण कात्यायन आणि पाणिनि हे यवनानी या शब्दाचे भिन्न अर्थ सांगत आहेत. आणि ते भिन्न अर्थ दोघे वैय्याकरण भिन्नकालीं झाले असें दाखवीत आहेत. पाणिनि यवनानी म्हणजे यवन स्त्री समजत आहे आणि कात्यायन यवनानी याचा अर्थ यवनलिपि असा धरीत आहे, व यवनस्त्रीवाचक यवनी हा शब्द सांगत आहे. पाणिनि आणि वररुचि समकालीन धरले तर वररुचि कांहीं नंदकालीन होत नाहीं. यासाठीं प्रत्येक शक्यता तपासली पाहिजे आणि वररुचीचें वैयाकरणांत स्थान निश्चित केलें पाहिजे, व तसें करण्यासाठीं वैयाकरणांच्या चळवळीचा इतिहास अवलोकिला पाहिजे. संस्कृत वैयाकरणांच्या क्षेत्राकडे आणि त्यांतील मारामारीकडे जाण्यापूर्वी वररुचीच्याच प्रयत्नाचें स्वरूप लक्षांत घेतलें पाहिजे.

## ३५२. वररुचीचें भाषासाहित्य ग्रांथिक कीं लौकिक.

३५२. प्राचीन महाराष्ट्रीय वाङ्मयाच्या इतिहासास प्रारंभ वररुचीच्या कालाच्या पूर्वीच झाला असला पाहिजे. वररुचीनें स्थानिक भाषा न घेतां दीर्घ प्रदेशावर व्याप्ति करणाऱ्या भाषा घेतल्या असें दिसतें. जेव्हां अनेक भाषा एका व्यापक नांवाच्या भाषेच्या क्षेत्राखालीं येतात तेव्हां ती भाषा वाङ्मयाचीच असली पाहिजे व त्या वाङ्मयभाषेच्या व्यापक क्षेत्रांत इतर भाषा लोकभाषा या स्वरूपांत असल्या पाहिजेत. वररुचीच्या कालाच्या अगोदरच विदर्भ, कुंतल, अपरांत, अश्मक, इत्यादि राष्ट्रें महाराष्ट्रांत होतीं; तथापि त्यांचें नांव भाषेस मिळालेलें नाहीं. या विस्तीर्ण प्रदेशांत भाषाभेद नसून ते सर्व एकच भाषा बोलत असतील हेंहि शक्य नाहीं. ग्रंथांच्या प्रसारामुळें अधिक व्यापक क्षेत्रांतील सुशिक्षित वर्ग एक भाषा बोलूं लागतो. हिंदुस्थानांत भाषाभेद पहातां स्वतंत्र एकमेकांपासून भिन्न व्याकरण असलेल्या बोली आजच्या भाषाशास्त्रज्ञांनीं तीनशेंच्यावर काढल्या आहेत. प्राचीन कालीं सर्व लोकांच्या भाषेचें ऐक्य असणें अधिक कठीण होतें. ज्या काळांत प्रवास आणि परस्पर व्यवहार कमी त्या काळांत भाषाभेद उलट अधिकच असतो. आज मुद्रणकलेमुळें भाषेचें ऐक्य होत आहे, तथापि प्राचीन काळीं भाषैक्य घडविणारी शक्ति म्हणजे नाटक मंडळ्याच होत; विस्तीर्णक्षेत्रव्यापक भाषा नाटकांमुळेंच निर्माण होई आणि आपल्या नाट्यपरंपरेचें सातत्य तर वेदकाळापासून आहे. वररुचीनें जें भाषांचें वर्गीकरण केलें तें जर त्यानें प्रांतोप्रांतीं जाऊन मिळविलेल्या अनुभवावर केलें असतें तर त्यास शेंकडों भाषा उल्लेखाव्या लागल्या असत्या. तथापि त्यानें तसें केलेंच नाहीं. शौरसेनी, मागधी, पैशाची आणि महाराष्ट्री या चारच भाषा त्यानें उल्लेखिल्या. विविध भाषांतील सादृश्य जाणण्यास वररुचीची बुद्धि असमर्थ नव्हती. शौरसेनी, पैशाची आणि मागधी या दोन भाषांची मूळ प्रकृति शौरसेनी आहे हें त्यानें शोध करून सांगितलेंच आहे. अनेक भाषाप्रकारांमध्यें प्रकृतिविकृतिशोधक ज्याची

दृष्टि बनली आहे अशा वररुचीस विकृत असलेल्या शेकडों भाषा दिसल्या नसतील असें नाहीं. ज्याअर्थी तो या चारच भाषा उल्लेखितो त्याअर्थी या चारी भाषा वररुचीच्या काळांत ग्रंथभाषा म्हणून प्रसिद्ध असाव्यात. आणि वररुचीनें आपलें व्याकरण महाराष्ट्री व इतर भाषेंत असलेल्या ग्रांथिक साहित्यावरच रचलें असलें पाहिजे.

## ३५३. 'प्राकृतां'च्या आयुष्यक्रमाची व्यापकता.

३५३. खालचा वर्ग दाखविण्यासाठीं आजकाल "प्राकृतजन" हे शब्द वापरले जातात. तथापि प्राकृतभाषेनें दृष्ट होणारी संस्कृति ती हलक्या दर्जाच्या लोकांची ही कल्पना कुरुयुद्धोत्तर कालानंतर, शातवाहन पूर्वकाळांत फार मंदगतीनेंच वाढली असावी.

वररुचीच्या काळांत प्राकृत भाषेंत लिहिणारांचा आयुष्यक्रम अत्यंत मर्यादित असावा असें नाहीं. भाषा वैदिकविधीस उपयोगिली जावयाची ती संस्कृत असणार. तथापि लोकांची नित्य व्यवहाराची भाषा म्हणजे राजभाषा व मनोरंजनभाषा या प्राकृतच होत्या. वररुचीनंतर शेंसवाशें वर्षांत झालेला अशोक आपली व्यवहारभाषा प्राकृत ठेवीत होता, आणि आद्य नाट्यशास्त्रकार भरत हा आपल्या बोधग्रंथांत राजांची भाषा मागधी असावी म्हणून सांगत आहे. संस्कृतचें महत्त्व अगदींच नव्हतें असें नाहीं. बहुतेक राजधान्यांमध्यें विविधदेशीय वर्ग यावयाचा आणि त्यामुळें तेथील सुशिक्षित जन संस्कृत शिकत असे. संस्कृत भाषा केवळ विद्वत्गोष्ठींमध्यें चालू होती एवढेंच नव्हे तर वेश्यामंदीरास देखील अवश्य झाली होती असें भरताच्याच नाट्यशास्त्रावरून दिसून येतें. वेश्येकडे अनेक ठिकाणचे लोक यावयाचे आणि सुप्रसिद्ध वेश्यांचें गृह सर्वप्रकारच्या लालित्याचें स्थान झालेलें असे. इंग्लंडमध्यें गेल्या पिढीपर्यंत शिष्टांच्या क्लबांत 'कलावान्' स्त्रियांची अवश्यकता होती आणि त्या कलावान् स्त्रियांच्या लौकिकावर क्लबांची भरभराट होई. त्या क्लबांशीं प्राचीन भारतीय वेश्यामंदिराची तुलना करतां येईल. इंग्लंडमध्यें ज्या चतुर आणि कलावान् स्त्रिया क्लबाचे प्राण असत, त्या अघळपघळ वर्तनाच्या आणि तसल्या वर्तनावरहि पैसे मिळविणाऱ्या असत. फरक एवढाच कीं त्यांचा शरीरविक्रय जरी लोकांस परिचित असला तरी तो त्यांच्या शरीरविक्रयास आनुषंगिक अशा एकंदर व्यवहाराचा अल्प भाग असे. अनेक श्रीमान् पुरुषांस प्रिय व्हावयाचें, त्यांचें अनेक प्रकारें मनोरंजन करावयाचें, त्यांच्या शिकारींत, खेळांत तर काय पण अन्यस्त्रीवशीकरणांत देखील भाग घ्यावयाचा, त्याजकडून मोठमोठ्या देणग्या मिळवावयाच्या, राजे, राजपुत्र आपल्याकडे येतील असें करावयाचें व राजकारणाच्या मसलतींत देखील त्यांचा भाग असावयाचा. या प्रकारच्या स्त्रिया एक शतकापूर्वी किंबहुना पन्नास वर्षांपूर्वी ज्याप्रमाणें सर्व युरोपभर पसरलेल्या होत्या, त्याचप्रमाणें प्राचीन हिंदुस्थानांतील राजधान्यांतून होत्या. अजून देखील प्रस्तुत प्रकार युरोप व अमेरिका येथें नष्ट झाला आहे असें नाहीं. कांहीं देखण्या नटींस हाताशीं धरणाऱ्या आश्रयदात्यांचें बिल पास करून देणाऱ्या अनेक आर्टिस्ट क्लबांच्या चालिका अमेरिकेंतील अनेक संस्थानाच्या राजधान्यांतून दृष्टीस पडतात. *

एवंच त्या कालामध्यें लोकव्यवहाराची भाषा एक होती काय ? नसल्यास ती उत्तर हिंदुस्थानांत कोणती होती, व महाराष्ट्रांत कोणती होती याप्रकारच्या प्रश्नांस लोकभाषा तरतऱ्हेच्या प्राकृतच भाषा होत्या असें उत्तर द्यावें लागेल.

कोठल्या तरी ठिकाणच्या लोकांची आणि त्या लोकांतील देखील एका विशिष्ट वर्गाची भाषा जी संस्कार पावत गेली ती पुढें संस्कृत बनली. तथापि नित्याची लोकव्यवहारभाषा संस्कृत असणें मुळींच शक्य नाहीं.

## ३५४. राष्ट्रक्षेत्र आणि भाषाक्षेत्र.

३५४. महाराष्ट्री हें नांव वररुचींत भाषानाम म्हणून येतें, तसेंच शौरसेनी व मागधी हीं भाषानामें येतात. ज्याअर्थी शूरसेन आणि मगध हीं प्रादेशिक नामें होतीं, त्या प्रमाणेंच 'महाराष्ट्र' हें देखील प्रादेशिक नांव वररुचिपूर्वकाळांत दोन अडीचशें वर्षें असलें पाहिजे. तथापि शूरसेन आणि मगध हे देश म्हणून ग्रंथांत येतात तितक्या प्रामुख्यानें महाराष्ट्र हा देश ग्रंथांत उल्लेखिला नाहीं एवढेंच. देशभागांस कुंतल, अश्मक, विदर्भ अशीं प्रख्यात पण अल्पक्षेत्रीय नांवें असल्यामुळें महाराष्ट्र हें नांव फारसें प्रचलित झालें नाहीं आणि भाषाशास्त्रज्ञाखेरीज दुसऱ्या कोणासहि त्या नांवाला महत्त्व

* या प्रकारच्या बिलें पास करून देणाऱ्या स्त्रिया व त्याच्या क्लबांत असलेल्या स्त्रिया बरीच ऐसपैस जागा घेऊन राजधानीच्या ठिकाणीं कायदेमंडळ चालू असतांना राहिलेल्या असतात आणि त्या कायदेमंडळ बंद झाल्यानंतर निघून जातात व त्या खोलीचें भाडें एकदम कमी होतें. कायदेमंडळ चालू असतांना ज्या जागेला भाडें दहा डॉलर पडतें, त्याच जागेला कायदेमंडळ बंद झाल्यानंतर तीन डॉलर देखील मिळण्यास पंचाईत पडते. प्रस्तुत लेखकानें आल्बनी येथें असतां आठवड्याचें फक्त तीन डॉलर भाडें भरून असलेल्या जागेंत निवास केला आहे.

देण्याचें कारण वाटलें नाहीं. शूरसेनाचें नांव देखील राष्ट्रनाम म्हणून फारसें उपयोगिलें जात नव्हतें.

कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंतच्या इतिहासांत भाषाविषयक, वाङ्मयविषयक, लोकरंजनविषयक, शिक्षणविषयक, सामाजिक आयुष्यक्रम कशाप्रकारचा होता याची माहिती उपलब्ध साहित्यावरून बरीच मिळवितां येते.

यजुर्वेदाची सर्वांत जुनी संहिता तैत्तिरीय होय. ही दाक्षिणात्य संस्कृतीच्या विकासाची एक पायरी दाखविणारी आहे, आणि ती कुरुयुद्धोत्तरकालीन आहे. त्याअर्थी सर्व यजुर्वेदीय वाङ्मयाची घटना याच कालांत घालतां येईल, व त्यामुळें दक्षिणेकडील सांस्कृतिक विकासांतील कृषिकर्मासारख्या अनेक गोष्टींच्या इतिहासांतील पायऱ्या आपणांस सांगतां येतील. आपस्तंबाचीं सूत्रें तर आंध्रांच्या राज्याचा उल्लेख करीत आहेत. कृष्णयजुर्वेदाच्या शाखा दक्षिणेंतच आहेत. त्याअर्थी कृष्णयजुर्वेदाच्या सूत्रकालापर्यंतचा विकास हा दाक्षिणात्य संस्कृतीचा इतिहासविकास दाखवितो. सूत्रें आणि वेदांगें यांची वाढ बरोबरच होत होती. आणि ज्याअर्थी शुल्बसूत्र दक्षिणेंतील म्हणजे बौधायन आणि आपस्तंब या सूत्रांच्या आश्रयानें वृद्धिंगत झालेलें दिसत आहे. त्याअर्थी भूमित्यात्मक गणिताचा विकास दक्षिणेंतच झाला असावा. वेदी बांधण्यासाठीं हें ज्ञान हवें हें सूत्रांतच आहे त्याअर्थी तो विकास दक्षिणेंतील कारागीर वर्गाकडून झाला असावा अशाच निर्णयास यावें लागतें.

दक्षिणेकडील संस्कृतीच्या विकासाच्या इतिहासासाठीं वैयाकरणांचीहि थोडीबहुत मदत होण्यासारखी आहे. वररुचीच्या व्याकरणाचें अंतरंगशोधन आपणांस या बाबतींत बरेंच उपयुक्त होईल. कोणत्या तरी वाङ्मयाचें सातत्य फार प्राचीन कालापासून वररुचीच्या काळापर्यंत आलें होतें असें त्याच्या प्राकृतप्रकाशावरून स्पष्ट दिसून येतें. प्राकृतप्रकाश हा बुद्धपूर्वकाळींच तयार झाला असावा असें माझें मत आहे. ख्रि. पू. ६०० च्या सुमारास झाला असावा असें राजवाड्यांचें मत होतेंच. प्राकृतप्रकाश महाराष्ट्री भाषा बोलणारे लोक वन्य दाखवीत नाहीं तर ज्यांचें वाङ्मय अनेक शतकें अगोदरचें आहे असे लोक दाखवितो.

पाली व अर्धमागधी या भाषा वाढत असतां वररुचि झाला असता तर त्यास या भाषांस उपेक्षितां आलें नसतें. बौद्धांविषयीं कांहींतरी उल्लेख वररुचींत असते. ते नाहींत त्यावरून बुद्धपूर्व भाषांचें व्याकरण वररुचि तयार करीत होता हाच पूर्वपक्ष करावा लागतो.

### ३५५. वररुचीच्या व्याकरणाचें स्वरूप.

३५५. वररुचीच्या व्याकरणाकडे अवलोकन केलें असतां प्रथम जें दिसतें तें म्हटलें म्हणजे त्याचा सूत्रमय ग्रंथ केवळ व्याकरण नसून भाषेच्या तौलनिक अभ्यासाचा ग्रंथ आहे. संस्कृत शब्दापासून "प्राकृत शब्द" कसे तयार करावे त्याची कृती त्यांचीं सूत्रें सांगत आहेत. तौलनिक व्याकरणाचा संस्थापक वररुचि होय असें म्हटल्यास हरकत नाहीं. आपल्या वैयाकरणांनीं संस्कृत भाषेच्या अभ्यासास भाषाशास्त्र प्रथम लावलें आणि नंतर इतर भाषांचा संस्कृत भाषेशीं संबंध दाखवून संस्कृत पंडितांस त्या भाषांचा अभ्यास सुलभ केला. जर आपण हालाची सप्तशती पाहिली तर असें दिसून येईल कीं तीमध्यें ज्या भाषेस वररुचि 'महाराष्ट्री' म्हणतो तीच केवळ नसून अन्यभाषेचे देखील प्रकार आहेत. सप्तशतींतील क्रियापदांचें अवलोकन केलें असतां आणि त्यांची मराठींतील सदृश रूपांशीं तुलना केली असतां आपणास भाषाशास्त्राचे अत्यंत विविध नियम आढळतील. मराठीचें ऐतिहासिक भाषाशास्त्र समजाविण्याचा हा प्रसंग नव्हे, तर वररुचीच्या अभ्यासापासून त्याच्या काळासंबंधानें आपणास सामाजिक आणि सांस्कृतिक काय माहिती मिळते हें शोधणें हेंच आपलें साध्य साधण्यासाठीं वररुचीचें अवलोकन होत आहे.

### ३५६. वररुचीची पूर्णापूर्णता.

३५६. संस्कृतपासून प्राकृत रूपें कशीं काढावयाचीं याचे वररुचीचे नियम पूर्ण असणें शक्यच नाहीं. कोणत्याहि काळीं प्रचलित भाषेचें आकलन त्या भाषेच्या विद्वानांकडून देखील पूर्णपणें होत नाहीं. उदाहरणार्थ आजच्या बोलण्याच्या मराठींतील सर्व प्रयोग एकत्रित करून व्याकरण अजून तयार झालें नाहीं. पैशाची भाषा तर संस्कृतपासून अत्यंत दूरावलेली पण तीविषयीं नियम तर अगदीं थोडके दिलेले आहेत. "प्राकृतप्रकाश"कारांनीं त्यांस जी ग्रांथिक भाषा सांपडली तेवढीच पाहून नियम केले असावेत असें वाटतें. वररुचीच्या प्राकृतप्रकाशापासून आपणांस लोकभाषा समजते असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. तर ग्रांथिक भाषेवरच प्रकाश पडतो असें म्हणतां येईल. वररुचीच्या काळापूर्वी वाङ्मयाचें उत्पादन पुष्कळच झालें असलें पाहिजे. त्या उत्पादनास पुरावे व्याकरणांतच काय सांपडतात याविषयीं यथाप्रसंग चर्चा आपणांस करावी लागेलच. अगोदर वररुचीचेंच व्याकरण आपणांस पूर्णपणें लाभलें आहे काय असा प्रश्न येतो, व त्याला नाहीं असेंच उत्तर द्यावें लागतें. पाणिनीच्या ग्रंथाप्रमाणें वररुचीचा गणपाठ अस्तित्वांत असावा आणि तो आपणांस उपलब्ध झाला नाहीं याला स्पष्ट पुरावा आहे.

## ३५७. वररुचीचा गणपाठ.

३५७. वररुचीमध्यें पौराणिक नांवें अनेक येत आहेत. कांहीं सामान्य नामें आणि विशेष नामें सूत्रांतच येत आहेत, तर कांहीं नांवें सूत्रांत नाहींत तरी सूत्रें लिहितांना वररुचीसमोर होतीं हें स्पष्टपणें दिसत आहे. तर सूत्रांतील शब्दसंग्रहाचें संरक्षित परंपरेच्या साहाय्यानें विस्तरण करणें अवश्य आहे. हें विस्तरण वररुचिकाल दाखविण्यास मदत करील. विविधवृत्तिकारांनीं जेव्हां तींच उदाहरणें दिलीं आहेत, तेव्हां त्या उदाहरणांवरून वररुचीनें किंवा त्याच्या शिष्यांनीं व्याख्यानरूपानें सांगितलेला भागच टीकाकारांनीं आपल्या समोर आणला आहे असें वाटतें. सूत्रांत जेथें जेथें एखादा शब्द येऊन त्या शब्दाशीं 'आदि' किंवा 'सम' असा शब्द संयुक्त असेल तीं स्थानें आपणांस लक्षांत घेतलीं पाहिजेत. कारण ते शब्द तेथें समुच्चयांचे वाचक आहेत. त्या समुच्चयांतील शब्द म्हणून निरनिराळ्या वृत्तिकारांनीं ज्या याद्या दिल्या आहेत त्यांतील सामान्य शब्द खुद्द वररुचिकालीन गणपाठांत होते असें समजण्यास हरकत नाहीं. नुसत्या पहिल्या परिच्छेदांतील ४४ सूत्रांपैकीं किती सूत्रें गणपाठाचें अस्तित्व गृहित धरणारीं आहेत हें पाहिलें असतांच वररुचीच्या व्याकरणाचें स्वरूप समजून येईल. पहिल्या ४४ सूत्रांत गणदर्शक शब्द पुढील प्रमाणें आहेत.

१. समृद्ध्यादि (२)†; २. शय्यादि (५); ३. यथादि (१०); ४. सदादि (११); ५. पिंडसम (१२); ६. पानीयादि (१८); ७. तुंडरूप (२०); ८. मुकुटादि (२२); ९. ऋष्यादि (२८); १०. ऋत्वादि (२९); ११. दैत्यादि (३६); १२. पौरादि (४२); १३. सौंदर्यादि (४४).

अमुक वर्गांतले शब्द कोणते याविषयीं व्याख्यान किंवा परिशिष्ट असल्याशिवाय वरील प्रकारची भाषा संभवत नाहीं. दैत्यादि, पौरादि इत्यादि शब्दांनीं जे शब्द व्यक्त होतात त्यांचें ज्ञान मिळविणें शक्य झाल्यास तें मिळविलें पाहिजे आणि त्यासाठीं त्या त्या वर्गांतले शब्द कोणते याविषयीं प्रामाणिक परंपरा चालू आहे काय हें आपण पाहूं. परंपरा पहाण्यासाठीं वरील वर्गांत कात्यायनानें कोणते शब्द घातले आहेत आणि भामहानें कोणते शब्द घातले आहेत याची तुलना केली पाहिजे. दोन्ही ग्रंथकारांनीं जे शब्द दिले असतील ते खुद्द वररुचीच्याच व्याख्यानांतील असतील असें समजण्यास हरकत नाहीं.

† [ कंसांतील आंकडे भामह आवृत्तींतील सूत्रांकांचे दर्शक आहेत. ]

[ वर उल्लेखिलेल्या सर्व गणांचीं कात्यायन आणि भामह या दोघांचीं स्पष्टीकरणें पुढें देत आहें. नुसता आंकडा कात्यायनाचें व्याख्यान देतो, आंकडा व त्यानंतर अ अक्षर असलें म्हणजे भामहाची टीका दिली आहे असें समजावें. ]

**१ समृद्धिश्च सदृक्षश्च प्रसुप्तः प्रकटस्तथा ।**
**प्रसिद्धिरभिजातिश्च प्रकृतिश्च मनस्विनी**
**प्रतिस्पर्धीति विज्ञेयः समृद्ध्यादिरयं गणः**

१ अ. समृद्धि, प्रकट, अभिजाति, मनस्विनी, प्रतिपत्, सदृक्ष, प्रतिस्पर्धिन्, प्रसुप्त, प्रसिद्धि, अश्व. [ भामह 'प्रतिपत्' हे दोन शब्द या गणांत अधिक देत आहे. ]

**२. शय्यात्रयोदशाश्चार्यं पर्यंतोत्करवल्लयः**
**सौंदर्यं चेतिशय्यादिगणः शेषस्तु पूर्ववत्**

२ अ. शय्या, सौंदर्य, उत्कर, त्रयोदश, आश्चर्य, पर्यंत, वल्ली. [ दोन्ही ग्रंथकार तेच शब्द देत आहेत. ]

**३. यथाचामरदावाग्निप्रहारोत्खातहालिकाः**
**तालवृंतं तथा चाटु यथादिस्यादयं गणः**

३ अ. यथा, तथा, प्रस्तार, प्राकृत, तालवृंतक, उत्खात, चामर, प्रहार, चाटु, दावाग्नि, खादित, संस्थापित, हालिक. [ प्रस्तार, प्राकृत, संस्थापित हे तीन शब्द भामह वाढवीत आहे. ]

४ अ. सदादि याच गणांतील शब्द कात्यायन देतच नाहीं. भामह, सदा, तदा यदा, असे तीन शब्द देतो.

**५. पिंडंपिष्टंच सिंदूरं धम्मिल्लो विष्णुरीदृशः**

५ अ. पिंड, निद्रा, सिंदूर, धम्मिल्ल, चिह्न, विष्णु, पिष्ट. [ निद्रा, चिह्न हीं नांवें अधिक आहेत. ]

**६. पानीयव्रीडितालीकद्वितृतीयकरीषकाः**
**गभीरंच तदानींच पानीयादिरयं गणः**

६ अ. पानीय, अलीक, व्यलीक, तदानीम्, करीष, द्वितीय, तृतीय, गभीर. [ भामह 'व्रीडित' हा शब्द पानीय गणांत देत नाहीं, पण व्यलीक हा अधिक देत आहे. ]

**७. तुंडलुब्धकमुंडाश्च कुट्टिमश्चापि पुष्करम्**

७ अ. तुंड, मुक्ता, पुष्कर, पुस्तक, लुब्धक, कुट्टिम. [ भामह मुंड ऐवजीं मुक्ता देऊन पुस्तक हा एक शब्द अधिक देत आहे. ]

**८. मुकुटं मुकुलं गुर्वी सुकुमारो युधिष्ठिरः**

८ अ. मुकुट, मुकुल, गुरु, गुर्वी, युधिष्ठिर, सौकुमार्य, उपरि. [ थोडासा असलेला फरक स्पष्टच आहे. ]

९. ऋषिर्दृष्टिः कृशो धृष्टिः कृपा-शृंगार-वृश्चिकाः
मृदंगो हृदयं भृंगः श्रृगाल-कृति-सृष्टयः
विमृष्टश्च मृगस्तद्वद्‌भृत्यश्च कृसरस्तथा
आकृतिः प्रकृतिश्चैव स्याद्दष्यादिरयं गणः

९ अ. ऋषि, वृषि, गृष्टि, दृष्टि, सृष्टि, शृंगार, मृगांक, भृंग, भृंगार, हृदय, वितृष्ण, बृंहित, कृशर, कृत्या, वृश्चिक, शृगाल, कृति, कृषि, कृपा.

[ बहुतेक शब्द तेच आहेत तथापि प्रत्येक टीकेंत दुसरींत नसलेले शब्द आहेतच. ]

१०. ऋतुर्वृंदावनं वृन्तं वृत्तांतोविवृतं वृतम्
म्हणालपृथिवीप्रावृट्तालवृन्तप्रवृत्तयः
वृत्तिः परिवृतश्चेति स्याद्दत्वादिरयं गणः
अत्रस्युः किल केषांचित् भ्रातृ-जामातृ-मातरः

१० अ. ऋतु, म्हणाल, पृथिवी, वृंदावन, प्रावृष्, प्रवृत्ति, विवृत, संवृत, निर्वृत, वृतान्त, परभृत, मातृक, जामातृक.

[ सादृश्य आणि फरक सहज दृष्टीस पडेल. बहुतेक शब्द तेच आहेत असें दिसून येईल. ]

११. दैत्यः स्वैरं चैत्यं कैटभवैदेहकौ च वैशाखः
वैशिक-भैरव-वैशंपायन वैदेशिकाश्च दैत्यादिः

११ अ. दैत्य, चैत्र, भैरव, स्वैर, वैर, वैदेश, वैदेह, कैतब, वैशाख, वैशिक, वैशंपायन.

[ कात्यायनपाठ 'चैत्य' शब्द देत आहे आणि भामह-पाठ चैत्र देत आहे. पण हा केवळ लेखकदोष आहे काय असा प्रश्न उत्पन्न होतो. भामहपाठ महाराष्ट्री रूप 'चइत्तो' देत आहे, कात्यायनपाठ त्या शब्दाचें प्राकृत रूप मुळीं देत नाहीं. ]

१२. पौरश्च पौरवश्चेव पौरषं कौरवस्तथा
रौद्रश्चेति विचेतव्यः पौराकृतिगणो बुधैः

१२. अ. पौर, कौरव, पौरुष, ( कौशले विकल्पः ). [ भामह देखील याला पारगण हें नांव न देतां आकृतिगण हें नांव देतो. या बाबतींत दोघेहि टीकाकार वररुचिदत्त गण-नाम उपेक्षीत आहेत. ]

१३. सौंदर्यशौंडकौक्षेयास्तथा मौंजायनोऽपि च
तथा दौवारिकश्चेति सौंदर्यादिरयं गणः

१३. अ. सौंदर्य, मौंजायन, शौण्ड, कौक्षेयक, दौवारिक.

कात्यायन आणि भामह यांनीं दिलेलीं स्पष्टीकरणें पहातां वररुचीच्या काळांत पाणिनीच्या गणपाठाप्रमाणेंच त्याचाहि गणपाठ अस्तित्वांत असावा आणि त्या गणपाठांतील मूळच्या शब्दांत फरक न होतां कांहीं नवीन भरती त्यांत मधून मधून झाली व कात्यायन व भामह यांच्या गणांत येणाऱ्या शब्दांच्या याद्या तयार झाल्या असल्या पाहिजेत अशा प्रकारच्या निर्ण-यास आपण येऊन पोहोंचतों. पूर्वागतगणपाठ भाष्यकारांनीं काळजीपूर्वक जतन केला आहे, यांत शंका नाहीं आणि दोन्ही टीकाकारांनीं त्या गणांत दिलेले शब्द वररुचिकालीन आहेत असें धरण्यास कोणतीच हरकत नाहीं. तसें धरून वररुचि-कालीन महाराष्ट्राची स्थिति काढली पाहिजे. तथापि बिन-चुकपणा साधण्याच्या दृष्टीनें गणपाठदृष्ट माहिती स्वतंत्रपणें मांडली पाहिजे.

### ३५८. भाष्यांतील उदाहरणाची तुलना.

३५८. पूर्वीचीं उदाहरणेंच नवीन वैयाकरणांनीं घ्याव-याचीं अशा रीतीचें अस्तित्त्व दिसत नाहीं. गणांतर्गत शब्दांच्या विवेचनाखेरीज इतर बाबतींत असें दिसून येईल कीं विवेचनविषय असलेल्या नियमास दोन्ही टीकाकारांची उदाहरणें अगदीं निरनिराळीं आहेत. खात्री पटण्यासाठीं थोडींशींच सूत्रें घेऊं.

**पोवः** 'प'चा 'व' होतो (२. १५).

या सूत्राच्या स्पष्टीकरणार्थ.

**कात्यायनाचीं उदाहरणें**—कपाळं=कवालं; कोपः=कोवो; वपा=ववा.

**भामहाचीं उदाहरणें**—शापः=सावो; शपथ=सवहो; उलप=उलवो.

**टोडः** 'ट'चा 'ड' होतो. (२. २०)

**कात्यायनी उदाहरणें**—खेटः=खेडो; कटु=कडू; कूट=कुडो; कटः=कडो.

**भामही उदाहरणें**—णडो=नट; विडवो=विटपः

**नोणः सर्वत्र** (२. ४२) सर्व ठिकाणीं न चा 'ण' होतो.

**कात्यायनी उदा०**—पानं=पाणं; नदी=णई.

**भामही उदा०**—णई, कणअ, बअण, माणुसो.

**शषोः सः** (२. ४३) श, ष, यांचा स होतो.

**कात्यायनी उदा०**-श'ची शिवं=सिवं; पलाश पलासो. 'ष'चीं शष्ठी=सठ्ठी; मषी=मसी.

**भामही उदा०**–('श'ची) सद्दो, जिसा, अंकुसो 'ष'चीं, वसहो, कसाअं.

या उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं जेव्हां विशेष-गण म्हणून शब्दांचा उल्लेख असेल तेव्हां त्या गणांत कोणते शब्द येतात याविषयीं परंपरा काळजीपूर्वक जतन केली गेली

होती, आणि तसल्या शब्दांखेरीज इतर बाबतींत जुनीं उदाहरणेंच पुढें चालविण्याची वृत्ति वैयाकरणांत नव्हती.

यावरून गणपाठ शोधून काढणें सुसाध्य आहे असें स्पष्ट होतें, तर तो शोधून काढून ते गणपाठांतील शब्द वररुचिकालीन आहेत असें गृहित धरलें आणि त्या शब्दांवरून वररुचिकालीन सामाजिक इतिहाससंबंधानें निगमनें काढलीं तर ती क्रिया चुकीची होणार नाहीं हें स्पष्ट होईल.

### ३५९. वररुचि आणि तत्कालीन महाराष्ट्र.

३५९. वररुचीचा पुरावा वापरून त्यापासून कोणत्या प्रकारची सामाजिक स्थिति स्पष्ट होत आहे याचा विचार स्वतंत्र प्रकरणांत केला आहे.

### ३६०. वररुचिविषयक विचारांतील एक अडचण.

३६०. वररुचीसंबंधानें एक प्रश्न गूढ आहे आणि तो म्हटला म्हणजे आज वररुचीचा प्राकृतप्रकाश आहे तसाच तो त्याच्या वेळेस होता काय? नव्हता असा पक्ष घेतल्यास आपणास आपलें विवेचन किती मर्यादित करावें लागेल हें पाहिलें पाहिजे.

वररुचीनें आपलें व्याकरण प्राकृत भाषेचें म्हणून लिहिलें आणि त्याच्या व्याकरणांत "महाराष्ट्री" हा शब्द येतो तो अगदीं शेवटच्या सूत्रांत येतो. वररुचीवर जी कात्यायनाची टीका आहे तींत अध्याय आठच आहेत व आठांतच इतर आवृत्त्यांतील नऊ अध्यायांचा समावेश केलेला आहे. आणि शौरसेनी, मागधी व पैशाची यांचें व्याकरणच नाहीं. त्या अर्थी या पुरवण्या इतरांनीं जोडल्या काय असा विचार उत्पन्न होतो. वररुचीचें ज्या भाषेचें व्याकरण होतें तिला "प्राकृत" हेंच नांव होतें, आणि जेव्हां इतर प्राकृत भाषांचें ज्ञान वाढलें तेव्हां पुढील तीन प्रकरणें लिहिलीं जाऊन वररुचीचें व्याकरण चारहि भाषांचें पूर्ण झालें. तोंपर्यंत शौरसेनी, मागधी, व पैशाची यांचीं व्याकरणेंच नव्हतीं. हीच शक्यता अधिक आहे असें धरल्यास "महाराष्ट्रीचा" वररुचींतील उल्लेखच नाहींसा होतो. तथापि महाराष्ट्राच्या प्रदेशांतील भाषेचें व्याकरण त्यानें लिहिलें ही गोष्ट नष्ट होत नाहीं. पण आणखी अधिक गुंतागुंतीचे प्रश्न उत्पन्न होतात. महाराष्ट्रांतील प्राकृतावरच त्यानें ग्रंथ कां लिहावा असा प्रश्न उत्पन्न होईल. वररुची जर कौशांबीचा रहाणारा असेल तर त्याचें महाराष्ट्राविषयींच काय अडलें होतें, असा प्रश्न उत्पन्न होईल. शिवाय कात्यायन आणि वररुचि हे एकच असले तर वररुचि कौशांबीचा असणें संभवत नाहीं. कारण कात्यायनास तो दाक्षिणात्य होता म्हणून पतंजलीनें पुष्कळच टोंचण्या मारल्या आहेत.

पाणिनि, कात्यायन आणि पतंजलि यांचा एकमेकांशीं संबंध या प्रश्नावर सविस्तर विचार करण्यासाठीं संस्कृत वैयाकरणांच्या प्रयत्नाकडे स्थूल दृष्टि टाकली पाहिजे. तथापि ती टाकण्यापूर्वी महाराष्ट्रांतील विद्याविकासाविषयीं आणि त्या विद्याविकासाच्या भोंवतालीं असलेल्या सामाजिक स्थितीविषयीं कांहींतरी परिचायक विधान केलें पाहिजे. त्याशिवाय त्या कालांतील वाङ्मयाच्या खांचाखोंची आपणांस समजणार नाहींत.

प्रकरण ४० वें.

# महाराष्ट्र आणि कुरुयुद्धोत्तर संस्कृतिविकास.

### ३६१. संस्कृतिविकासाचा इतिहास देण्याची अनवश्यकता,-तथापि संस्कृतिविकासाबरोबर होणाऱ्या सामाजिक स्थित्यंतराविषयीं जिज्ञासा.

३६१. विशिष्ट शास्त्रांच्या संवर्धनाचा इतिहास देण्याचें काम सर्वसामान्य इतिहासकाराचें नाहीं; पण जेव्हां सामान्य जनतेच्या आयुष्यक्रमाशीं शास्त्रवर्धनाचा संबंध येतो तेव्हां शास्त्रेतिहास देण्याचें कार्य केल्याखेरीज गत्यंतर नाहीं.

शास्त्रीय विकास आणि सामाजिक घटना यांचा निकट संबंध आहे. आपल्या संस्कृतिसर्वस्वाचें रक्षण हें कर्तव्य ज्या समाजांत प्रधान आणि विशिष्ट दैवत किंवा पारमार्थिक मार्ग यांस मानणें हें अप्रधान झालें आहे त्या समाजाच्या संस्कृतिविकासाच्या इतिहासाला थोर महत्त्व आहे आणि त्यामुळें पुराणांतून वैदिक शाखांच्या विद्यासंग्राहकांचा इतिहास दिलेला आहे. त्यांत दृष्ट होणारा इतिहास आणि वैदिक वाङ्मयांत दृष्ट होणारा संप्रदायांचा आणि पांडित्यविकासाचा इतिहास फार मोठा असल्यामुळें येथें देणें शक्य नाहीं. त्या इतिहासांतील महाराष्ट्राविषयींच्या उल्लेखांकडे मात्र लक्ष ओढलें पाहिजे.

### ३६२. महाराष्ट्राच्या इतिहासाचें रक्षण.

३६२. पुराणांतून ज्या वाङ्मयविषयक चळवळी दृष्टीस पडतात त्यांचें मुख्य स्थान उत्तर हिंदुस्थान आहे; तथापि विवेचनाचें क्षेत्र मात्र उत्तर हिंदुस्थान नाहीं; विदर्भ देखील पौराणिकांस महत्त्वाचा आहे. बरीचशीं राजघराणीं विदर्भ वंशांतूनच निघालेलीं दाखविलीं आहेत. विदर्भच जणुंकाय राजमंडळाचें केंद्र आहे अशी एक मांडणी विष्णुपुराणांत आहे.

महाराष्ट्रास वैदिक संस्थांच्या इतिहासांत त्याचप्रमाणें बौद्धिक चळवळींत स्थान नव्हतें असें नाहीं. महाराष्ट्रांतील यजनविषयक संप्रदायाचा आधार उत्तरेकडे ऐतरेय ब्राह्मणाच्या कालीं म्हणजे कुरुयुद्धकालीं घेत असत असें भार्गवेय रामाच्या कथेवरून स्पष्ट दिसत आहे. महाव्रताचें अध्ययन एका दिवसांत आटपावें असें जें 'गालव मत' वैदिक वाङ्मयांत प्रसिद्ध आहे त्याच त्या गालवाचार्यांचे गुरु विदर्भि कौडिन्य असणें संभवनीय आहे.

बृहदारण्यक उपनिषदाच्या पहिल्या दोन वंशांत विदर्भि कौडिन्य हा शांडिल्याचा शिष्य असें सांगितलें आहे आणि त्या कौडिन्याचा शिष्य गालव होता असें दिलें आहे. निरुक्तांत वैयाकरण गालवाचा उल्लेख आहे. या प्रकारच्या एकंदर माहितीवरून आपण पुढील निर्णयास येऊन पोंचतों.

( १ ) धार्मिक विधींच्या ग्राह्याग्राह्यतेच्या बाबतींत विदर्भीयांचें महत्त्व ऐतरेय ब्राह्मणाच्या कालांतच स्थापित झालें होतें.

( २ ) क्षत्रियानें सोमपान करूं नये हें मत विदर्भांतच संवृद्ध झालें.

( ३ ) व्याकरणशास्त्रांत निरुक्ताच्या संवर्धनास विदर्भीयांनीं हातभार लावला होता.

या प्रकारच्या आठवणी कुरुयुद्धोत्तर कालांतील आहेत. आणि त्या वेदांच्या उपबृंहणवाङ्मयानें संरक्षून ठेवल्या आहेत; तथापि कुरुयुद्धापूर्वीच्या देखील कांहीं आठवणी ऋग्वेदानें संरक्षून ठेवल्या आहेत. अशा आठवणींतच अगस्त्यसूत्रांचा अंतर्भाव होतो; पण तो आदिपर्वाचा विषय आहे.

विदर्भामध्यें किंवा विदर्भराज्यास महत्त्व देणारी सूतवाङ्मयांची एक स्वतंत्र परंपरा कुरुयुद्धोत्तरकालीं जोरांत होती; कारण अनेक राजवंश विदर्भवंशांतून उद्भवले असें दाखविणाऱ्या वंशावळी मागें उल्लेखिल्या आहेतच.

दक्षिणेकडे कृष्णयजूंच्या परंपरेंत शुल्वसूत्राचा वेदांगांत अंतर्भाव झाला त्याविषयीं विधान मागें केलेंच आहे.

### ३६३. महाराष्ट्राच्या संस्कृतिविकासाच्या इतिहासाचीं साधनें.

३६३. महाराष्ट्र हा उत्तरेकडील संस्कृतीचा एक भाग या दृष्टीनें त्याचें महत्त्व प्राचीन काळापासून आहे. अगस्त्यकथा पुराणांत आहेत त्याप्रमाणें अगस्त्याच्या नांवावर सूक्तें वेदांत आहेत. अगस्त्याच्या आश्रमांत महाराष्ट्रांतील अत्यंत प्राचीन काळच्या इतिहासाच्या कांहीं कथा प्रचलित असून त्या पुढें रामायणांत प्रविष्ट झाल्या असाव्यात हें मागें रामायणाच्या विचवेनांत दाखविलें आहे. त्यावरून महाराष्ट्र ही अनेक ठिकाणच्या लोकांकडून संस्कार पावणारी एक व्यक्ति होती हें स्पष्ट होतें. पुराणोक्त धर्मामध्यें दक्षिणेकडील स्थानांचा आणि दैवतांचा समावेश झाला त्याचा इति-

ह्रास हा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचा भाग आहे. देशाची अपवित्रता आणि वैदिक शाखांचा प्रसार यांचीहि संगति दिसत नाहीं. बौधायन धर्मसूत्र आर्यावर्त उत्तर हिंदुस्थान करितें पण बौधायनाचे अनुयायी इतर कृष्णयजुर्वेदीयांप्रमाणेंच दक्षिणेंतच आहेत.

धर्मशास्त्रें जेव्हां दक्षिण अपवित्र समजत होतीं त्याच काळांत दक्षिणेंतील स्थानांचें वाङ्मयरूपानें गौरव करून त्यांचें महत्त्व उत्तरेकडील लोकांस पटविणें ही तीर्थोपाध्यायांची खटपट बुद्धपूर्वकालापासून होत होती आणि तीमुळें वाङ्मय निर्माण होत होतें. या संस्कृतिविकासाची साधना करतांना पूर्ववाङ्मयावर संस्कार होत गेले त्याप्रमाणेंच दाक्षिणात्य कथासमुच्चयाचें अगोदरच तयार झालेलें वाङ्मय उत्तरेकडील वाङ्मयास जोडलें गेलें. रामायणांतील उत्तरकांड ही क्रिया दाखवीत आहे.

अधिसीमकृष्णाच्या कालापर्यंत जी पौराणिकांची चळवळ झाली तींत जागोजाग उत्पन्न झालेल्या क्षेत्रांचा महाभारताशीं संबंध जोडण्यांत आला. आणि त्यासाठीं अर्जुनाचा तीर्थयात्राप्रसंग उपयोजिण्यांत आला. त्या कालांत जें काय झालें तें म्हटलें म्हणजे भारतभर पसरलेल्या तीर्थांस मान्यतादान होय. तथापि तीर्थांचें अस्तित्त्व त्याच्या पूर्वींचें असावें आणि तीर्थोत्पत्तिप्रयत्नांत कांहीं सेमेटिक लोकांनीं देखील भाग घेतला असावा. बरींचशीं तीर्थें द्राविडांच्या परंपरेंतील कथांस मान्यता मिळून निर्माण झालीं असावींत. द्राविडांची संस्कृति आणि उत्तरेकडील आर्यन् लोकांची संस्कृती यांच्या एकीकरणाचें स्थान महाराष्ट्र होय. ही एकीकरणाची क्रिया जोंपर्यंत सांगोपांग स्पष्ट झाली नाहीं तोंपर्यंत महाराष्ट्राचा इतिहास समजला नाहीं असें म्हणावें लागेल. या दोन संस्कृतींचें ऐक्य ही भारतीय संस्कृतींतील अत्यंत महत्त्वाची क्रिया होय आणि तिचें स्थान महाराष्ट्र हेंच प्राधान्यानें असल्यामुळें महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास हा भारताचा सांस्कृतिक इतिहासांतील अत्यंत महत्त्वाचा भाग होय.

### ३६४. आपल्या इतिहाससाधनांचें जें स्थित्यंतर होतें त्याविषयीं अभिज्ञतेची वृत्ति विधायक इतिहासकारास अवश्य आहे.

३६४. इतिहासकारास किंवा विधायक इतिहाससंशोधकास प्रत्येक पुढें आलेल्या पुराव्यांतील दोष दाखवून तो पुरावा टाकून द्यावयाचा अशी पळवाट काढतां येत नाहीं. आपल्या देशांतील वाङ्मय अनेक काळीं संस्कारित झालें असल्यामुळें प्रत्येक कालचे संस्कार शोधून काढणें हेंच कार्य महत्त्वाचें आहे. हें कार्य प्रामाणिक इतिहाससंशोधक करूं शकेल. कामचुकव्या इतिहासलेखक करूं शकणार नाहीं.

एखाद्या कालांत एखादा मोठा किल्ला अगर राजवाडा बांधला व त्यांत दर पिढीनें फेरफार केले म्हणून त्या प्रकारचा वाडा देशांत किंवा गांवांत असणें हें ज्याप्रमाणें कमीपणाचें लक्षण नाहीं, त्याप्रमाणेंच जें वाङ्मय दररोज वाचावयाचें त्यांत कालानुसार भरती पडत चालली तर त्यामुळें त्या वाङ्मयाचा उपयोग करणाराची नालायकी होत नाहीं. आज आपण कादंबऱ्या पाहिल्या तर त्यांची दुसरी आवृत्ति निघण्याचा प्रसंग क्वचित् येतो म्हणून त्यांत फेरफार झाल्याचें दिसणार नाहीं. पण क्रमिक पाठग्रंथांत वारंवार फेरफार होत जातात आणि नांवाला परंपरा जुनी राहून पाठग्रंथस्वरूपांतर एकसारखें होत असतें. जे ग्रंथ शिक्षणासाठीं आहेत त्यांत असा फरक होत जावयाचाच. आणि त्यामुळें रामायण, महाभारत, भागवत इत्यादि ग्रंथांत जे फेरफार होत गेले आहेत त्यावरून आपल्या संस्कृतीचें स्वरूप हीन होतें असें कोणी समजूं नये. उलट जुन्या ग्रंथाचें महत्त्व कायम ठेवून त्याच्यायोगानें अर्वाचीन नैतिक, शैक्षणिक, धार्मिक आणि व्यावहारिक अपेक्षा पुरवावयास त्यांचा उपयोग होऊं देणें यांतच समाजाची प्राचीन संस्कृतीच्या रक्षणाची इच्छा आणि अर्वाचीन अपेक्षांची पूर्णता यांचा सुंदर मिलाफ झालेला दृष्टीस पडतो. भारतीय संस्कृतींत एकसारखा बदल होत असतां, आणि सर्व प्रकारच्या नवीन प्रसंगांस उपयुक्त असें समाजस्वरूप होऊं देऊन देखील जुन्या काळाशीं संगति ठेवण्याच्या कामांत भारतीयांसारखे लोक जगांत दुसरे कोणतेहि नाहींत असें म्हणतां येईल. भारतीयांच्या खालोखाल या बाबतींत जगांतलें दुसरें राष्ट्र म्हणजे इंग्रजांचें होय. जुन्या एकसत्ताक राजपद्धतीची भाषा कायद्यांत चालू ठेवून लोकसत्तात्मक राज्याच्या अपेक्षा त्यांत पुऱ्या ओतावयाच्या या तऱ्हेच्या क्रिया करण्यांत अर्वाचीन इंग्रजांनीं नव्या जुन्याचा मिलाफ करण्यांत भारतीयांची जवळजवळ बरोबरी केली आहे असें म्हणतां येईल.

### ३६५. विरुद्ध कथा मतांचें समीकरण.

३६५. देशांतील भिन्न संस्कृति संहितीकरणानें आणि ग्रंथवृद्धीनें एकसूत्री करण्याचा प्रयत्न चालू असतां समीकरणांची क्रिया चालली होती. भिन्नस्थलीय देवता वस्तुतः एकच आहेत हें लोकांस सांगावयाचें; प्रत्येक ठिकाणीं असलेल्या कथा संग्रहित करावयाच्या, त्यांत परस्परसंगति उत्पन्न करावयाची, त्या वाङ्मयांत समाविष्ट करावयाच्या, जेव्हां कथांचें एकीकरण होण्याची शक्यता दिसणार नाहीं तेव्हां

देवतांच्या भिन्न अवतारांतील त्या क्रिया आहेत असें लोकांस दाखववावयाचें, अशा क्रिया चालू होत्या. भिन्न लोकांचे आचार भिन्न दिसत; तर त्यांना देखील "ऐतिहासिक" स्पष्टीकरण द्यावयाचा आणि तत्साधक वाक्यें धर्मशास्त्रांत घालावयाचा प्रयत्न होई. धर्मसूत्रांत याप्रमाणें प्रयत्न झालेला दिसतच आहे. तथापि धर्मसूत्रकारांस सर्व नवीन गोष्टी कोणत्यातरी युक्तीनें पूर्वपरंपरेला जोडण्याची हौस होती.

आपण आज इंग्लंडचे कायदे पाहिले तरी काय दिसेल? त्यांत असें दिसून येईल कीं, अनेक आज वापरले जाणारे शब्द इलिझाबेथच्या कारकीर्दीत लिहिले तसेच कायम राखले गेले आहेत. अनेक वाक्यांचें प्राचीनत्व दुसऱ्या तिसऱ्या एडवर्डच्या कालापर्यंत देखील जाईल. कायद्याचा सांगाडा तोच राखावयाचा. त्यांतील कांहीं शब्द तेवढे बदलावयाचे हीच कृति चालू आहे आणि नवीन कायद्याची भाषा देखील होतां होईतों जुन्या कायद्याच्या भाषेला धरून राखण्यांत येते. स्मृतिग्रंथ व पुराणग्रंथ या दोहोंचा उपयोग लोकनियमनाकडे होत असल्यामुळें या दोहोंमध्यें तीच पद्धति अवलंबिण्यांत आली. आणि जुनें वाक्य अगर तत्त्व सोडावयाचें नाहीं, नवीन तत्त्वाचा देखील समावेश करावयाचा, दोन्ही परस्परविरुद्ध दिसणाऱ्या वचनांपैकीं कोणाची अंमलबजावणी केव्हां करावयाची हें न्यायासनावर सोंपवावयाचें या प्रकारच्या व्यवहाररीतीमुळें जुन्या ग्रंथाचें महत्त्व कायम रहात गेलें. ते ग्रंथ नवीन घातलेल्या मजकुरानें वाढत गेले त्यांत दोन कालचीं आणि त्यामुळें परस्परविरुद्ध तत्त्वें दिसूं लागलीं आणि त्याबरोबर तीं सुसंगत करण्याचा प्रयत्न दिसूं लागला. उदाहरणार्थः—

**न मांसभक्षणे दोषः न मद्ये न च मैथुने**
**प्रवृत्तिरेषाभूतानां निवृत्तिस्तु महाफला**

जुनें मांसाहाराचें तत्त्व आणि नवीन मांसाहारत्यागाचें तत्त्व यांची सांगड वरप्रमाणें घातली. त्याचप्रमाणें "धर्मशास्त्र म्हणजे काय? वेदांना धर्मशास्त्रांत प्रामुख्य किती द्यावयाचें" या संबंधानें चर्चा चालू असतां धर्माच्या बाबतींत वेदप्रामाण्य कबूल करून देखील मनुस्मृतिकार वेदांचें धर्मशास्त्रापासून भिन्नमूलत्त्व दाखविणारें वाक्य म्हणजे **श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः** हें वाक्य कायम ठेवीतच आहेत.

पौराणिक आणि धर्मशास्त्रकार यांच्यांत मतभेद.

विस्तृत प्रदेशाचें सांस्कृतिक एकीकरण झालें असतां मनुस्मृति तें मान्य करीत नाहीं. ती सोंवळ्या लोकांचें निवासस्थान उत्तर हिंदुस्थानच आहे आणि शूद्रांनीं कोठेंहि रहावें असा आग्रह धरीत आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं ऐतिहासिकांचा आणि पौराणिकांचा धर्म अधिक प्रगमनशील होता आणि धर्मशास्त्रकार श्रौतस्मार्तपरंपरेला चिकटून रहाण्याचा प्रयत्न करीत होते.

## ३६६. संस्कृतीच्या विविध अंगांसंबंधानें विधान.

३६६. महाराष्ट्राच्या संस्कृतींत वैदिक संस्कृतीचा अंश होता आणि वैदिक संस्कृतीचा महाराष्ट्रांतील संस्कृति हा एक महत्त्वाचा घटक होता याची माहिती सविस्तरपणें आदिपर्वात विवेचिली आहे आणि कुरुयुद्धोत्तर काळाच्या महाराष्ट्रीय वैदिक संस्कृतीचा येथें न विवेचिलेला भाग दिलाच आहे. पण तेवढ्यानें महाराष्ट्रीय वैदिक संस्कृतीच्या विवेचनाची पूर्णता होणार नाहीं. वैदिक आणि कुरुयुद्धोत्तर काळांत महाराष्ट्रमध्यें जी प्राकृत संस्कृति होती, त्या संस्कृतींत देखील शिष्टसंस्कृति आणि अशिष्टसंस्कृति असे भेद पाडावे लागतील. या स्थूल विधानाच्या सिद्धीमध्यें येथेंच पडतां येत नाहीं. हालाच्या सप्तशतींत दिसून येणाऱ्या भाषेविषयीं आणि सामाजिक स्थितिविषयीं जें विवेचन केलें जाणार आहे त्यांत या विषयासंबंधानें पूर्ण विवेचन करण्यांत येईल. येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं वैदिक उपासनेखेरीज इतर जो त्या काळांतील आयुष्यक्रम होता त्याचीं स्मारकें उत्तरकालीन वाङ्मयांत आहेत आणि त्यांचें एकीकरण महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासावर प्रकाश पाडील. नाट्यशास्त्रांत कैशिकी म्हणजे वऱ्हाडी म्हणून प्रकार प्रचलित झाली आणि भाषापद्धतीमध्यें वैदर्भी आणि गौडी हे जे प्रकार पृथक्पणें पुढें आले त्यांत महाराष्ट्रीय जनता आणि गौडी जनता यांचें भिन्न मनोवैशिष्ट्य पूर्णपणें व्यक्त झालें आहे. महाराष्ट्रास शब्दावडंबर नको व गौडांस तें हवें आहे या दोन भिन्न लोकप्रवृत्तीच्या अस्तित्त्वास आजच्या समाजाकडून ज्याप्रमाणें साक्ष मिळते आहे त्याच प्रमाणें प्राचीन काळ देखील साक्ष देत होता हें स्पष्ट आहे.

## ३६७. महाराष्ट्र आणि नागरिक संस्कृति

३६७. प्राचीनमहाराष्ट्रांत नागरिक संस्कृति कितपत होती याविषयीं आज संशयच आहे. कुंडिन नगर, प्रतिष्ठान आणि कदाचित् नागपूर या तीनच गांवांचें सातत्य आपणांस ठाऊक झालें आहे. प्राचीन काळचें सोपारें आज अगदींच लहान गांव झालें आहे.

कौंतलकांचें मुख्य नगर कोठें होतें हें सांगतां येत नाहीं. तें कुंडल येथें असावें असा अदमास कांहीं लेखकांनीं केला

आहे, त्यांस रा. आबा चांदोरकर यांनीं दुजोरा दिला आहे. नागरिक संस्कृतीचें ज्ञान मिळवितांना आपणास समाजामध्यें श्रमविभाग कसे काय चालू होते यासंबंधानें ज्ञान मिळतें. महाराष्ट्राची नागरिक संस्कृति काय होती यासंबंधानें आज विधान फारसें करतां येत नाहीं. मोठाल्या शहरांचें उत्खनन केलें पाहिजे. या तऱ्हेची क्रिया बरीच मंदावली आहे. पुष्कळ जुन्या शहराच्या जागा निश्चित देखील झाल्या नाहींत. तथापि योग्य उत्खनन झालें म्हणजे अत्यंत मोठा ज्ञानाचा सांठा हातीं लागेल अशी प्रस्तुत लेखकास आशा आहे.

### ३६८. प्राचीन स्थितीचें अवगमन आणि स्थित्यंतरज्ञानाचें शास्त्र.

३६८. कोणत्याहि काळाची सामाजिक स्थिति लक्षांत आणण्यासाठीं तात्कालिक लेखांचा पुरावा आपणांस उपयोगी आहेच, तथापि तो पुरावा शोधण्यासाठीं आणि त्याचा अर्थ लावण्यासाठीं पूर्वकालीन आणि उत्तरकालीन सामाजिक स्थितीची माहिती पहिली करून घेतली पाहिजे. त्याखेरीज संशोधनविषयक असलेल्या कालांतील स्मारकें दृष्टीसच पडणार नाहींत. चालुक्यकालीन स्थितीवरून बुद्धकालीन स्थिति अजमावली पाहिजे आणि बुद्धकालीन स्थितीवरून चालुक्यकालीन स्थितीची कल्पना केली पाहिजे; या प्रकारच्या दीर्घकालदर्शी प्रयत्नास मुख्य सहाय्यक म्हटलें म्हणजे अनेक फेरफारांचें नियमन देणारें समाजविकासशास्त्र होय. दीर्घकालीन स्थित्यंतरांचे नियम जितके उपलब्ध होतील, तितकें शास्त्रीय ऐतिहासिक अनुमान वाढत जाईल आणि परिस्थितीच्या निरनिराळ्या अंगांचीं भिन्नकालीन स्वरूपें जितकीं अधिक दिसतील तितकी अनुमानें काढण्याची विद्यादेखील वाढत जाईल. यासाठीं बराच मोठा काळ घेऊन त्यांत सामाजिक फेरफार काय होत असतात हें शोधण्यासाठीं कांहीं प्रयत्न करूं. समाजांतील फेरफार शोधतांना आपणांस उत्तरकालीन स्थित्यंतरांची किंवा अन्यदेशीय स्थित्यंतरांची माहिती सूचक होईल यांत शंका नाहीं. एका देशांत आणि एका कालखंडांत ज्या प्रमाणांत फेरफार झाले त्याच प्रमाणांत दुसऱ्या देशकालखंडांत फेरफार होतील असें नाहीं. तथापि अन्यदेशकालस्थित्यंतरांचें ज्ञान विचारास सहाय्यक होईल यांत शंका नाहीं.

कुरुयुद्धापासून बुद्धापर्यंत आठशेंहून अधिक वर्षें होतात. कुरुयुद्धकालापेक्षां बुद्धकालाची निश्चित माहिती आपणापाशीं अधिक आहे. त्याचप्रमाणें बुद्धकालानंतरच्या बाराशें वर्षांनीं झालेल्या हर्षवर्धन आणि सत्याश्रय पुलकेशी यांच्या कालाची माहिती बुद्धकालीन माहितीहून अधिक आहे. बुद्धानंतर चंद्रगुप्ताच्या कालाची माहिती आपणांस बरीच आहे. तथापि कुरुयुद्ध आणि हर्षवर्धन या दोन काळांच्या मधल्या अनेक शतकांसंबंधानें आपणांस माहिती तत्कालीन साहित्यावर न रचतां दोन टोंकांच्या कृती पाहूनच तयार करावी लागते. स्थित्यंतरशास्त्राचें ज्ञान इतिहासलेखकास आणि त्याची विचारसरणी समजून घेऊं इच्छिणाऱ्या वाचकास अवश्य होतें. कुरुयुद्धापासून मौर्यांच्या कालापर्यंत बाराशें वर्षांत काय फेरफार होतात याविषयीं अजमास करूं.

### ३६८ अ. जातिस्थित्यंतर फारसें होत नाहीं.

३६८ अ. दीर्घ कालांत जगांत फेरफार कोणत्या स्वरूपाचे होतात, याची स्थूल कल्पना येथें देतां येईल; एका शतकांत तीन पिढ्या होतात या हिशोबानें बाराशें वर्षांत ३६ पिढ्या होतात. एवढ्या काळामध्यें हिंदुस्तानांत आलेल्या कोणत्याहि कुलाचें अगर जातीचें मूळ स्वरूप अजीबात पालटणें, अगदीं स्वाभाविक आहे. भाषा बाराशें वर्षांत कितपत पालटते याविषयीं आपल्या कल्पना निश्चित झाल्या पाहिजेत. स्थूलपणानें विधान करावयाचें म्हटल्यास असें म्हणतां येईल कीं, भाषेंत फरक जरी पुष्कळ होत असले तरी तिचें मूलस्वरूप बऱ्याच अंशीं कायम रहातें. महाराष्ट्री प्राकृत भाषेंतील "तुज्झ" हें चोवीसशें वर्षांपूर्वीचें सर्वनामरूप आजच्या मराठींत "तुझं" अगर "तुझें" या रूपांत कायम राहिलें आहे. अनेक क्रियापदांचीं रूपें कायम राहिलीं आहेत, आणि शब्द किती कायम राहिले आहेत याचा हिशोबच नाहीं. "अग्निमीळे पुरोहितम् । यज्ञस्य देवमृत्विजं । होतारं रत्नधातवम् ॥" या तीनचार हजार वर्षांपूर्वीच्या स्तोत्रवाक्यांतील अग्नि, पुरोहित, यज्ञ, देव, रत्न हे सर्व शब्द आजच्या मराठींत प्रचारांत आहेत. यावरून लोकभाषा तीच किती वर्षें रहाते हें लक्षांत येईल. इतिहाससंशोधकांचें काम या स्थित्यंतराच्या मर्यादा अधिक निश्चितपणें सांगण्याचें आहे.

परक्या लोकांची वसाहत आली तर ती बाराशें वर्षांत पूर्णपणें स्थानिक होऊन जाईल यांत शंका नाहीं. पारशी जर बाराशें वर्षांपूर्वी आले असले तर त्यांचें विदेशीपण अत्यंत थोडकें राहिलें आहे. त्यांची भाषा पूर्णपणें हिंदूंच्या भाषेप्रमाणें झाली नाहीं त्याचें कारण राजकीय आहे. आचारग्रामांच्या दृष्टीनें गुजराती ब्राह्मणेतर वर्ग आणि पारशी जात यांत साम्य पुष्कळच आहे. देशांतील एकंदर जनतेवर जेव्हां परकीय आचारविचाराचें किंवा संस्कृतीचें आवरण पडतें, तेव्हां देशांतील परकीय वर्ग ते विदेशी गोष्टीचा स्वीकार

अधिक लवकर करतो, असें दिसून येतें. त्याप्रमाणें आजचा पारशी यूरोपीयांशीं सादृश्य आणूं पहात आहे.

जर एकादा परकीय मनुष्य या देशांत आला आणि त्याचे विवाह जर देश्यांशीं होऊं लागले तर बाराशें वर्षांत म्हणजे छत्तिसाव्या पिढींतील वंशजांच्या अंगीं मूळ परकीय पूर्वजांचें रक्त एकसहस्रांश देखील रहात नाहीं. तथापि पारशी बेने इस्रायल या मंडळीच्या पूर्वजांनीं प्रथम जरी देशांतल्याच बायका केल्या असल्या तरी पुढें त्यांची प्रजा बरीच झाल्यानंतर लग्नें त्यांच्या त्यांच्यांतच होत असावींत; कांहीं जणांनीं आपल्याबरोबर स्वजातीय बायकाहि आणल्या असतील. तथापि पारशांइस्रायलांत बरेंचसें मूलदेशीय रक्त अजूनहि असावें.

माणसांनीं भरलेल्या प्रदेशांत माणसांचें जात्यात्मक स्थित्यंतर फारसें होत नाहीं. चालुक्यांच्या काळांत नव्व्याण्णव हजार खेडीं महाराष्ट्रांत होतीं. आजहि विशेष अधिक असतील असें नाहीं. जो भूभाग त्या कालांत व्यापिला गेला असेल त्यापेक्षां फारसा अधिक भूभाग आज व्यापला गेला असावा असें दिसत नाहीं. महाराष्ट्राची लोकसंख्या निदान ग्रामसंख्या तीच राहिलेली दिसते. कलिंगाची लोकसंख्या अशोकाच्या कारकीर्दींत आजच्यापेक्षां फारशी कमी नव्हती असें जयस्वाल यांनीं दाखविलें आहे. ग्रामसंख्येमध्यें स्थित्यंतर फारसें झालें नसल्यास आणि लोकांचा आयुष्यक्रम देखील पूर्वीप्रमाणें प्राथमिक स्वरूपाचाच असल्यास लोकसंख्या देखील तीच असणें शक्य आहे.

### ३६८ आ. नागरिक चळवळींच्या व स्थित्यंतरांच्या इतिहासाचें प्राधान्य.

३६८ आ. ग्रामांचें स्वरूप आज पूर्वीप्रमाणेंच प्राथमिक तऱ्हेचें होतें, तर इतिहास लिहावयाचा तो तरी कशाचा असा प्रश्न उत्पन्न होईल. याला उत्तर असें आहे कीं इतिहास हा महाराष्ट्राच्या नागरिकतेचा लिहिला पाहिजे. खेडीं तींच राहिलीं तथापि नवीन राज्यें व त्याबरोबर नवीन राजधान्या उत्पन्न झाल्या. राजधान्या नवीन उत्पन्न झाल्यामुळें राजधानीमध्यें असलेल्या अठरापगड लोकांचें स्थानांतर झालें. प्रतिष्ठानचें महत्त्व गेल्यानंतर व्यापारी जुन्नरला जातील आणि जुन्नरचें महत्त्व गेल्यानंतर वैजयंतीला आणि मालखेडाला गेले असतील. चंपानेरच्या पाडावानंतर तेथील लोहारांचा वर्ग उत्तर कोंकणांत सोपाऱ्यास येऊन राहिला आणि सोपाऱ्याचें महत्त्व आज जरी गेलें तरी हा वर्ग तेथें अजून आहेच. भांदकच्या आसपास जैनधर्मी वसाहत नाहीं; तथापि अनेक जैन देवळें व इतर अवशेष भांदक येथें व त्याच्या आसपास सांपडत आहेत. त्या देवळांवरून भांदकच्या राज्याच्या काळांत जैनधर्माचें प्राबल्य होतें असा निष्कर्ष काढतां येणार नाहीं तर नागरिक वर्गांत म्हणजे शहराच्या वस्तींत जैनांचें प्राबल्य होतें एवढाच काढतां येईल.

### ३६९. राजत्व, नागरिकत्व आणि जनता.

३६९. राजत्व आणि जनता यांचा संबंध लक्षांत घेतला पाहिजे. शहरें परकीयांनीं भरलीं असतात आणि जानपद वर्ग शहरांतील वस्तीपासून भिन्न असतो हा नियम आजच्या महाराष्ट्रांत जसा खरा आहे, तसाच प्राचीन काळीं देखील होता असें दिसतें. राजा म्हणजे भूमीचा मालक आणि राजाचे सामंत हे देखील भूमीचे मालक. हा भूमीच्या मालकांचा वर्ग सामान्य शेतकऱ्यांपासून मुळींच तुटकलेला नसावयाचा. आणि त्यामुळें राजत्व आणि शेतकरी वर्ग यांचा सामाजिक संबंध बराच जवळचा येई. लढाऊ वर्ग आपलासा करून घेण्यासाठीं प्राचीन कालीं त्यांना जमीन देण्याची पद्धति असे. नवीन विजय झाला म्हणजे जेत्या सैन्याला भूमि मिळत असे. जमिनीचा मालकवर्ग हा अर्थात् राजाचा आप्तवर्ग होई. नवीन राजा जरी आला तरी त्याचा जमीनदारवर्गाशीं सहज संबंध व्हावयाचा आणि त्यामुळें प्रतिष्ठित गृहस्थ म्हणजे जमिनीचा मालकच होय. कृषिकर्म म्हणजे प्रतिष्ठित कर्म होतें. कृषि, गोरक्ष आणि वाणिज्य हीं तिन्ही कर्में वैश्यास म्हणजे द्विजास सांगितलेलीं म्हणजे प्रतिष्ठित होतीं. त्या कर्मांमध्येंच प्रतिष्ठितपणा वरील अनुक्रमानेंच होता असें दिसतें. जमीन करणाऱ्या वर्गास त्यामुळें 'गृहस्थ' या अर्थाचें 'कुणबी' (कुटुंबी) हें प्रतिष्ठित नांव प्राप्त झालें आहे. या कुणबी वर्गांतील अधिक प्रतिष्ठित वर्गांत निरनिराळ्या वेळच्या विजयी लोकांचें रक्त खेळत असलें तरी त्यांतील बहुजनसमाजाचें रक्त प्राचीन लोकांचेंच आहे.

### ३७०. सांस्कृतिक इतिहास आणि जातीय इतिहास.

३७०. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाच्या सुव्यवस्थित स्थापनेला वांशिक आणि जातीय इतिहासाची जोड देणें अवश्य आहे. फ्रान्स देशांतील सुमारें वीस हजार वर्षांपूर्वींच्या मस्तकास्थि सांपडल्या आणि त्यांच्या स्वरूपावरून त्या काळच्या लोकवस्तींत आणि आजच्या लोकवस्तींत जातिदृष्टीनें फारसा फरक झालेला नाहीं. आक्रमणें अनेक झालीं तरी जानपदवस्ती ज्या जातीची पूर्वीं होती त्याच जातीची आज आहे असें

तेथील मानववंशशास्त्रवेत्यांनीं मांडलें आहे. जी गोष्ट फ्रान्सची आहे तीच जगांतील अनेक भागांची आहे. अर्वाचीन यूरोपीयांनीं ज्या वसाहती वन्य स्थितींतील लोकांनीं म्हणजे फार अल्प संख्येच्या लोकांनीं वसविलेल्या प्रदेशांत केल्या, त्या वसाहती वगळतां प्राचीन काळांत ज्या जातींनीं जो भूभाग व्यापला होता त्याच जातींनीं आजहि व्यापला आहे आणि फरक झाला असेल तर तो केवळ त्या भूमीवर आक्रमण करणाऱ्या आणि राज्यकारभार घेणाऱ्या थोड्या लोकांपुरताच आहे. स्वारी करणाऱ्या लोकांकडून फक्त समाजांतील उच्च वर्गामध्यें थोडासा रक्ताचा फरक होतो व इतर लोक मात्र जसेचे तसेच रहातात. या बाबतींत महाराष्ट्राचा इतिहास सर्व जगाच्या इतिहासाशीं सदृश आहे. महाराष्ट्राच्या शेतकीचा इतिहास आहे तथापि त्यापेक्षां विशेष स्थित्यंतरात्मक इतिहास म्हटला म्हणजे राजकुलांचा, वाङ्मयाचा, आणि धार्मिक संस्कृतीचा आहे. त्या तऱ्हेच्या इतिहासास सुरवात करण्यासाठीं वांशिक आणि जातीय इतिहासाचीं एक दोन प्रकरणें दिलीं पाहिजेत. ग्रंथकार राजकुलाबद्दल तेवढी फिकीर दाखवितात; तथापि खरा सांस्कृतिक व सामाजिक इतिहास पहावयाचा म्हणजे जातिविषयक इतिहासाकडे लक्ष देणें अवश्य आहे.

## प्रकरण ४१ वें.

# प्राचीन महाराष्ट्राचें जातीय स्वरूप–भोजांविषयीं प्रास्ताविक विवेचन.

### ३७१. राज्याच्या इतिहासाचें सामाजिक इतिहासांत स्थान.

३७१. प्राचीन महाराष्ट्रांत राज्यें अनेक होतीं. दक्षिणापथ, कुंडिनपुर व कुंतल या राज्यांचें अस्तित्व कुरुयुद्धापासून होतें, आणि अश्मकांचें तेंच प्रतिष्ठानचें राज्य होतें. कुरुयुद्ध आणि बुद्ध यामधल्या कालांत तेंच सर्वांत सुप्रसिद्ध असावें. नागपूरचें राज्य तेंच क्रथराज्य असावें, आणि आजचें वऱ्हाड कैशिक असावें; आणि दोन्ही राज्यें ज्यावेळेस एक होत, त्यावेळेस त्यांस क्रथकैशिक हें नांव असावें, याप्रकारचा इतिहास मागें सांगितलाच आहे. त्यानें कुरुयुद्धकालापासून राजकीय इतिहासाची संगति लागल्यासारखें वाटेल; तथापि या प्रकारच्या पांडित्यानें इतिहास समजला असें वाटणार नाहीं. एखादा गांवढळ मनुष्य अनेक बाटल्या असलेल्या डॉक्टरच्या दवाखान्यांत गेला, आणि तेथें अनेक बाटल्यांवर अनेक नांवें पाहिलीं व वाचलीं म्हणजे तो ज्याप्रमाणें स्तंभित होतो, तशीच राजघराण्यांचीं नांवें पाहून आपली स्थिति होते. सर्वांत प्राचीन नांव अश्मकांचें. त्या नांवांशीं सदृश अशी जात किंवा कुल आपणास ठाऊक नाहीं. समजा, "अशमे" यासारखें आडनांव मराठ्यांत, गवळ्यांत, भोयांकोळ्यांत अगर महारांत प्राचुर्यानें असतें तर अश्मक राज्याविषयीं आपलेपणा अधिक वाटला असता. राष्ट्रें, कुलें, संप्रदाय इत्यादींचीं प्राचीन नांवें अगर स्थिति आजच्या जनतेशीं जितकीं संबद्ध होतील तितका प्राचीन भारतीयांविषयीं आजच्या भारतीयांस आपलेपणा वाटेल. राज्यांचा इतिहास म्हणजे कर घेऊन संरक्षण करण्याचा धंदा करणाऱ्या दुकानांचा इतिहास होय; तो सर्वांगीण इतिहास नव्हे. एकंदर लोकव्यवहार पुष्कळच आहेत. व्यक्ति एखादा धंदा करील आणि पुढें तो धंदा सोडून दुसरा करील. व्यक्तीच्या आयुष्यांतील एकंदर कार्यसमूहांत विशिष्ट धंद्याची खटपट हा केवळ एक भाग आहे. तितकेंहि प्राधान्य समाजाच्या आयुष्यक्रमांत साम्राज्यांना नाहीं, आणि सामान्य राज्यांना तर त्याहून नाहीं.

### ३७१ अ. मानववंशशास्त्र, व कौलिक आणि जातीय इतिहास.

३७१ अ. भारतीय कौलिक इतिहास आणि जातीय इतिहास यांना एकंदर भारतीय इतिहासांत मोठें महत्त्व आहे. कधीं कधीं सांप्रदायिक व बौद्धिक इतिहासासहि जातीय इतिहासाचें स्वरूप येतें. वैशंपायन आणि याज्ञवल्क्य यांचें भांडण होऊन शुक्लयजुर्वेदाची उत्पत्ति झाली वगैरे गोष्टी पुराणांत आहेत; त्यामुळें त्या गोष्टी वाचणाऱ्या मंडळींत अध्वर्युपणाबद्दल अर्धी दक्षणा घेणारा याज्ञवल्क्य बरोबर होता कीं द्रव्यलोभांध झाला होता याबद्दल अजूनहि अभिमानपूर्वक वादविवाद होतो; याचें कारण वैशंपायन आपला म्हणविणारे कृष्णयजुर्वेदी ब्राह्मण त्याचप्रमाणें याज्ञवल्क्य आपला म्हणणारे शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण समाजांत आहेत, हें होय. प्राचीन कुलनामें, व्यक्तिनामें आणि संप्रदाय नामें यांचें सातत्य आजच्या महाराष्ट्रांत जितकें अधिकाधिक दिसून येईल तितका प्राचीन इतिहासाविषयीं आपणांस आपलेपणा वाटेल. एकाद्या प्रदेशावर प्राचीन काळीं जो लोकसमूह असेल, त्याचाच आजचा लोकसमूह हा वंश आहे, ही गोष्ट अंशतःच खरी आहे; कारण लोकभ्रमण एक सारखें चालू आहे. त्यामुळें भारतीयांचा जातीय इतिहास आणि कौलिक इतिहास हा लोकभ्रमणेतिहासाबरोबरच अभ्यासला पाहिजे.

एकंदर सामाजिक इतिहासाचीं जातीय इतिहास आणि जातींच्या भ्रमणांचा व मिश्रणांचा इतिहास आणि कौलिक इतिहास हीं विविध अंगें आहेत असें दिसून येईल.

महाराष्ट्रीय वांशिक इतिहासांत आपणांस पुढील प्रश्न विचारास घ्यावे लागतील.

(१) आजच्या एकंदर महाराष्ट्रीय जनतेंत ज्या जाती आहेत त्यांचें महाराष्ट्रीयत्व आणि आजची जातींची घटना हीं कितपत जुनीं आहेत ?

(२) आज जे समुच्चय दिसत आहेत त्यांचे आगमनकाळ भिन्न आहेत काय ? ज्यावेळेस जे लोक आले त्यावेळेचीं त्यांचीं नांवें आणि आजचीं नांवें एकच आहेत काय ?

(३) निरनिराळे लोक महाराष्ट्रांत आले त्यांच्या मूळच्या जातिघटना जाऊन नवीन तत्वावर महाराष्ट्रांत जातिघटना झाल्या आहेत काय ?

(४) आज महाराष्ट्रांत ब्राह्मण जाती आहेत त्या केव्हां आल्या ? त्या येथीलच इतर जनतेपासून पृथक् होऊन बनल्या कीं उत्तरेकडून किंवा दुसऱ्या कोणत्या तरी ठिकाणाहून निराळ्या जाती या स्वरूपानेंच आल्या ?

वर दिलेल्या प्रश्नांविषयीं आपणांस जिज्ञासा आहे त्याच-प्रमाणें मराठे, महार, कायस्थप्रभु, भोई कोळी वगैरे ब्राह्मणेतर जातीच्याहि पूर्वीच्या इतिहासाविषयीं जिज्ञासा आहे. आजच्या जातिभेदाचें स्पष्टीकरण पूर्वेतिहास प्रयत्नपूर्वक शोध करूनच केलें पाहिजे. आज ऐतिहासिक ज्ञान वाढलें असतां केवळ धंद्यावरून जाती झाल्या असें धोपट स्पष्टीकरण मुळींच उपयोगाचें नाहीं.

### ३७२. मत्स्योपजीवी जाती आणि त्यांचें भ्रमण.

३७२. चर्चेसाठीं प्रथम कोणत्यातरी जाती ध्यावयाच्या यासाठीं भोई व कोळी या जातींकडेसच लक्ष देऊं. याच येथील फार जुन्या असाव्यात ही शक्यता वाटत आहे. या जाती समुद्रकांठानें आणि नदीकांठानें मत्स्यघात आणि शेतकी हे दोन धंदे करून आहेत. शेतकीपेक्षां मत्स्यजीवी वृत्ति अधिक सोपी आहे. शेतकींत आज पेरावें आणि चार महिन्यांनीं खावें अशी व्यवहारपद्धती आहे. पण मत्स्योप-जीवींना किंवा गोरक्षकांना इतकें दूरकालपर्यंत थांबण्याची जरुरी नाहीं. आणि त्यामुळें मत्स्योपजीवी आणि गोपाल वर्ग यांची संस्कृति अधिक प्राथमिक समजली जाते आणि त्यांनाच गुरेंचराई किंवा मत्स्योत्पादन यासाठीं अधिक भ्रमणशील बनावें लागतें. एवंच कोळी आणि भोई व गवळी याच जातींची वसती महारांच्या अगोदरची असली पाहिजे.

### ३७३. भोयांची महाराष्ट्रांतील प्राचीनता आणि त्यांच्या अगोदरची वसाहत.

३७३. भोई ज्ञातीचीं भ्रमणें आणि त्यांची प्राचीनता यांकडेच आतां लक्ष देऊं. भोई अगर भोज हे अगदीं पहिले वसाहत करणारे लोक आहेत असें म्हणतां येणार नाहीं. जेव्हां प्राचीन विदर्भामध्यें 'भोजकट' नांवाचा ग्राम रुक्मिणीच्या भावानें राजधानी बनविला, त्या वेळेस त्या स्थलाचें वैशिष्ट्य "भोयांची वसाहत" हें होतें. जेव्हां 'भोजकट' हें नांव त्या स्थलास मिळालें, तेव्हां इतर वसती दुसऱ्या कोणाची तरी असली पाहिजे; ती कोणाची हें नक्की सांगतां येत नाहीं. उत्तरविदर्भांत गवळ्यांची वस्ती एका काळीं होती त्या वस्तीची साक्ष गाविलगड (गवळीगड) हें प्राचीन किल्ल्याचें नांव देत आहे; पण गवळ्यांच्या वसाहतीची प्राचीनता गाविलगडावरून अजमावतां येण्याजोगी नाहीं. दक्षिणेकडे यवतमाळ जिल्ह्यांत आंध नांवाची जात आहे तिच्यावरून पूर्वमहाराष्ट्र आणि तेलंगण याला आंध्र असें नांव मिळालें. आंध आणि गवळी या दोहोंची वसती भोयांच्या वसती इतकी जुनी असावी असें वाटतें. आजच्या वऱ्हाडांतील 'माने' किंवा 'माने कुणबी' म्हणून कुणब्यांची जी पोट-जात आहे, ती एक जुनी वसाहत असावी असें वाटतें. कारण अगस्त्य सूक्तांत "मान्य" आणि "मांदार्य" यांचा उल्लेख आहे.* सध्या एवढेंच सांगतां येईल कीं, कुरुयुद्धाच्या पूर्वींच भोयांची वसाहत वऱ्हाडांत होती, व अगोदरचे लोक निराळे होते, त्या निराळ्या लोकांचे वंशज 'मान्य' उर्फ माने कुणबी आंध्र आणि गवळी असणें संभव-नीय वाटतें. मान्यांपेक्षां भोयांची वस्ती अधिकहि असूं शकेल. कारण विदर्भराज भीष्मक यास महाभारत सभापर्व अ. १४ यांत भोजराज म्हटलें आहे.

### ३७४. प्राचीन भोजांचा उत्तरेकडे त्याप्रमाणेंच दक्षिणेंत प्रसार.

३७४. दक्षिणेंतील उल्लेखांपैकीं अत्यंत प्राचीन उल्लेख ज्या लोकांविषयीं आहेत, असे लोक म्हणजे मान्य, मांदार्य, भोज वगैरे होत. एका ब्राह्मणवाक्यांत भोजांचा उल्लेख ज्या तऱ्हेनें आहे, त्यावरून भोजांनीं अत्यंत मोठा प्रदेश व्यापिला होता असें दिसतें. तें वाक्य म्हणजे (ऐ. ब्रा. ८. १४) "ॐ स्वस्ति साम्राज्यं भोज्यं स्वाराज्यं वैराज्यं" हें होय. ब्राह्मण ग्रंथांतील हा उल्लेख अत्यंत सूचक आहे. लहान राष्ट्रांबरोबर भोजांचा उल्लेख न होतां साम्राज्यासारख्या मोठ्या प्रदेशासंबंधीं उल्लेखाबरोबर झालेला आहे. हा उल्लेख 'भोज' या जातीबद्दल असला तर त्या जातीचें स्थान महाराष्ट्रच होतें काय हा प्रश्न उत्पन्न होतो. यासाठीं भोज या शब्दाचे दुसरे उल्लेख पाहिले पाहिजेत. रमेशचंद्र दत्त हे आपल्या 'सिव्हिलिझेशन ऑफ एन्शंट इंडिया' या पुस्तकांत वरील वाक्यावर भाष्य करतांना भोज हे राजपुतान्यांतील लोक असें सांगितलें आहे, पण आधार दिला नाहीं.

ऐतरेय ब्राह्मणांतील वाक्याचा काळाच्या अगोदरचा उल्लेख ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलांतील होय. तो उल्लेख भोजांचें स्थान पंजाब होतें असें दाखवितो. विश्वामित्राच्या गोत्रमंडळांत त्रेपन्नावें सूक्त सुप्रसिद्ध आहे; त्यांत भोजांचा उल्लेख आहे. त्यांत भोजांस सुदासाचे अनुचर बनविलें आहे. † भोजांचा आणि सुदास व दिवोदास यांचा संबंध होता याला वैदिक उल्लेखाचा त्याप्रमाणेंच पौराणिक उल्लेखाचाहि आधार आहे. सुदासकाल हा जर कुरुयुद्धपूर्व

* या अगस्त्यसूक्तांचें (ऋग्वेद प्रथममंडल अंतिमसूक्तें) सविस्तर विवेचन आदिपर्वांत सांपडेल.

† ३. ५३. ७. हा लोकविषयक उल्लेख आहे, ही गोष्ट बहुतेक भाषांतरकारांच्या लक्षांत आली नाहीं. उदा० चित्रा-वशास्त्री यांचें भाषांतर पहा.

सहासातशें वर्षांचा काळ धरला, तर त्या काळांत भोज जाति पंजाबच्या क्षेत्रांत कोठेंतरी होती असें वर सांगितलेला उल्लेख दाखवील. दिवोदासाशीं समकालीन उशीनर नांवाचा भोजराज होता, त्याच्यापाशीं माधवी नांवाची गालव नांवाच्या ब्रह्मर्षींची बहीण त्यास पुत्र होईपर्यंत राहिली, व तिच्याबद्दल गालवानें २०० घोडे घेतले अशा तऱ्हेची कथा पौराणिकांनीं दिली आहे. ( उद्योगपर्व अ. १६, देवी भागवत अ. १० ).

या भोजांचा दक्षिणेंत येण्याचा मार्ग पुढीलप्रमाणें दिसतो. भोज हे पंजाबांतून राजपुतान्यांत, नंतर माळवा आणि गुजरात येथें, आणि त्यानंतर महाराष्ट्र आणि विदर्भ या प्रदेशांत असा त्यांचा प्रसारक्रम असावा. 'भोज' देश भारताच्या भीष्मपर्व अध्याय ९ यांत येणाऱ्या देशांच्या यादींत उल्लेखिला आहे; पण तेथें स्थलनिश्चयात्मक अगर स्थलसूचक माहिती नाहीं. पांडवदिग्विजयांतर्गत सहदेव दिग्विजयांत भोजकटाचा उल्लेख आहे. 'भोजप्रस्थ' या नांवाचा उल्लेख वायव्येकडील प्रदेश म्हणून वराहमिहिराच्या बृहत्संहितेंत केला आहे. यावरून भारतरचनेच्या अंतिम कालांत भोजांची वसती विविध भागांत होती हें स्पष्ट आहे.

भोजांचा उल्लेख अशोकलेखांत आहे. त्यांत तो पितनिक्य यांबरोबर म्हणजे पैठणकरांबरोबर केला आहे. हा उल्लेख विदर्भस्थांबद्दल असावा.

### ३७५. भोजांचीं सहकारी राष्ट्रें;—महाभोज व कुंतिभोज.

३७५. भोजांच्या स्वतंत्र उल्लेखांबरोबर त्यांचे दुसऱ्या जातींबरोबरचे देखील उल्लेख लक्षांत घेतले पाहिजेत. भोजांच्या महारांबरोबर आणि कुंतींबरोबर संबंध येऊन महाभोज आणि कुंतिभोज हीं राष्ट्रनामें तयार झालेलीं दिसतात. महाभोज आणि कुंतिभोज हीं घराणीं महाभारतकाळीं होतीं. यांनींच कृष्णाच्या वृष्णिकुलास द्वारकेपर्यंत हटविलें, असा उल्लेख आहे. त्यांस हटविणारे भोई महाराष्ट्रांतीलच असावेत, आणि त्यांचे सहकारी महार असावेत. कुंतिराष्ट्राचें अस्तित्व महाराष्ट्रभागांत पार्गिटेरनें दाखविलें आहे ( नकाशा पहा ). कुंतींचे आजचे प्रतिनिधि कोणते हें सांगतां येत नाहीं. भोजकट हें गांव रुक्मीनें वसविलें होतें. भोज वऱ्हाडाकडे त्याप्रमाणेंच द्वारकेकडे देखील होते. कृष्णाच्या काळीं सत्राजितास ज्यानें मारलें, तो राजा शतधन्वा नांवाचा असून त्याला भोजाधिपति म्हणत असत. शतधन्व्याचें स्थान निश्चयानें सांगतां येत नाहीं. भोजाचें राज्य द्वारकेकडे होतें त्याप्रमाणेंच बिहारकडे देखील होतें.

### ३७५. अ. भोजांची संस्कृति.

३७५. अ. भोई यांचा धंदा निश्चित नाहीं व स्थानहि आज निश्चित नाहीं. सर्व देशभर यांचा प्रसार झाला, आणि कांहीं ठिकाणीं स्वतंत्र जात तर कांहीं ठिकाणीं दुसऱ्या जातींतील एखादा विभाग अशा तऱ्हेनें त्यांचा आज हिंदुस्थानभर प्रसार झाला आहे. मच्छीमार जातींशीं त्यांची संलग्नता आहे त्याप्रमाणेंच शेतकी करणाऱ्या जातींशीं देखील आहे. भोजांची वस्ती पश्चिम महाराष्ट्रांत देखील होती; तिचीं स्मारकें आज अनेक आहेत. पुण्याकडे ज्वारी व भांग यापासून केलेल्या पेयास भोज म्हणतात; यावरून हें प्राचीन भोजांचें पेय नसेलना अशी कल्पना मनांत येते.

भोजपुर या नांवाचीं गांवें अनेक आहेत. ( १ ) बेळगांव जिल्ह्यांतील भोजपुर, ( २ ) नाशिक जिल्ह्यांतील भोजपुर, ( ३ ) मध्यहिंदुस्थानांतील भोजपुर. तिन्ही ठिकाणीं कांहींतरी अवशेष सांपडतात. नाशिक जिल्ह्यांतील भोजपुर येथें एक लेणें आहे. बेळगांव जिल्ह्यांतील भोजपुर येथें एक ताम्रपट सांपडला होता. भोपाळांतील भोजपुर येथें एक प्रचंड देवालय, जुन्या विस्तीर्ण तळ्याचा बांध व एकवीस फूट उंचीची महावीराची मूर्ति हीं दृष्टीस पडतात (ज्ञानकोश भ. १११ ).

### ३७६. भोजांचा पूर्वपश्चिम विस्तार–बिहारकडे प्रसार; काठेवाडी मंडळींत यांचें अस्तित्व.

३७६. बिहारओरिसा प्रांतामध्यें तिरहूत विभागांत सारण या नांवाचा जो जिल्हा आहे, त्या जिल्ह्यामधील लोकांच्या भाषेस 'भोजपुरी हिंदी' असें म्हणतात. यावरून येथें एक भोजपुर नांवाचें मोठें शहर होतें यांत शंका नाहीं. वऱ्हाडकडून म्हणजे भोजांकडून चौथाई वसूल करणाऱ्या मगधराज जरासंधावरच पुढें स्वारी करून भोजांनीं आपली वसाहत जरासंधाच्या प्रांतांत स्थापन केली असणें शक्य आहे. भोजपुरी ही एक लिपी असून मिथिल, मगध यांबरोबर ती कैथी लिपीचा प्रकार समजली जाते ( ज्ञानकोश, विज्ञानेतिहास, पृ. ६६ ). यावरून पूर्वहिंदुस्थानांतील भोजपुर हें एक स्वतंत्र संस्कृतिभेद उत्पन्न करणारें स्थान होतें असें स्पष्ट होईल.

अनेक ठिकाणीं भोजाचें मत्स्योत्पादन बंद होऊन भोज ही राज्यकर्ती आणि जमीनदार जात बनली असावी, आणि त्यांचे वंशज अनेक ठिकाणीं कुणब्यांत समाविष्ट झाले असावेत.

काठेवाडी कुणबी जातीचा एक कवि भगत नांवाचा होता. त्याला 'भोजभगत' म्हणतात. यावरून भोज या नांवाची लोकप्रियता काठेवाडी कुणब्यांतहि दिसून येते.

अनेक ब्राह्मणेतर जातींत देवपुजारीपण प्राचीन काळीं चालू होतें आणि अजूनहि आहे. अशा जातींमध्येंच कोळी व भोई आहेत. आणि ज्याप्रमाणें मत्स्योत्पाटनापासून कृषिकर्माकडे ही जात वळली, त्याचप्रमाणें ती आपलें ब्राह्मण्यहि स्थापन करण्याचा प्रयत्न करती झाली.

काश्मीरांत भोजकी पुजारी नांवाचा एक ब्राह्मण म्हणविणारा वर्ग आहे; भोजकी हे पूर्वी ब्राह्मण नसून शेतकरी होते व देवपुजारी झाल्यामुळें ब्राह्मण म्हणवून घेऊं लागले, अशा तऱ्हेचा कांगरा जिल्ह्यांतील वज्रेश्वरीच्या देवस्थानाच्या पुजाऱ्याविषयीं उल्लेख सांपडतो (ज्ञानकोश ज ३९६). यावरून पंजाबमधून ते काश्मीराकडे पसरले असें दिसतें.

ओसवालांचे उपाध्ये श्रीमाली ब्राह्मण भोजकच आहेत. ते इतरांकडून अपांक्त समजले जातात. बहुतकरून ही ज्ञाति 'मग' आणि भोई यांच्या मिश्रणानें बनली असावी अशा तऱ्हेचा एक तर्क मागें व्यक्त केलाच आहे.

### ३७७. भोज आणि गुजराथ.

३७७. ज्या वेळेस 'गोपाळ' कृष्ण द्वारका आणि शूरसेन येथें सत्ता गाजवीत होता तेव्हां तेथील जाती मुख्यत्वेंकरून पुढीलप्रमाणें असाव्यात.

(१) वृष्णी, (२) अंधक, (३) भोज, (४) आभीर, (५) शूर. या सर्व जातींपैकीं आज एकाचा पगडा तर उद्यां दुसऱ्याचा, आज एका जातीचें नांव प्रदेशास लागलें तर उद्यां दुसऱ्याचें असें होत होत मथुरेस शूरसेन, काठेवाडास शूरराष्ट्र अशीं नांवें पडलीं असावींत. कृष्णनिधनामुळें वृष्णी आणि अंधक यांची सत्ता नाहींशी होऊन आभीरांची सत्ता स्थापन झाली व आभीरांनीं कृष्णस्त्रिया पळविल्या वगैरे वृत्तांत पुराणांत आहेच.

### ३७८. भोजांच्या परिभ्रमणासंबंधानें स्थूल विधान.

३७८. या सर्व उल्लेखांवरून भोजांचें गमन सर्वत्र झालें होतें याविषयीं शंका राहत नाहीं. ज्या काळीं त्यांचें गमन सर्वत्र झालें त्याकाळीं त्यांची संस्कृति मुख्यत्वेंकरून मत्स्योपजीवी होती आणि त्यांचें परिभ्रमण नदीकांठानेंच होई आणि नदीकांठाजवळच्या प्रदेशांत ते शेतकीहि करीत असत असें स्पष्ट होतें. त्यांचें प्रयाण पंजाबकडून राजपुतान्याकडे तेथून माळव्याकडे, माळव्याकडून महाराष्ट्रांत, आणि महाराष्ट्रांतून पुढें कर्नाटकांत असें झालेलें दिसतें, आणि तें प्रयाण नदीच्या कांठानेंच होत असावें. त्यांचें भोजकट शहर स्थापन झालें तेव्हां नदीकांठचा जो भाग त्यांनीं व्यापिला असेल तेथीलच भोईवाड्यास तें नांव असावें आणि त्या स्थलीं पुढें शहर वृद्धिंगत झाल्यामुळें तें पुढें राजधानी झालें. ज्याअर्थी भोजकट हें नांव नदीकांठाच्या विशिष्ट भागांत होतें त्याअर्थी इतर भागांत भोज लोक राहत नसून इतर लोक राहत असतील हें उघड आहे. तथापि दुसऱ्या ज्या शेतकरी जाती भोंवतालीं असतील त्या अगोदरच्या कीं भोज अगोदरचे ही गोष्ट आज स्पष्ट नाहीं. जर सर्वच नदीकांठचे लोक भोज असते तर भोजकट शब्द लावण्यांत मतलब नव्हता; यावरून भारती युद्धाच्या पूर्वीच्या काळांतच भोजांचा प्रसार नदीकांठानें जरी होत असला तरी कृष्णाच्या कालाच्या अगोदर विदर्भ राष्ट्र दुसऱ्या कोणत्या तरी जातीनें वसलेलेंच होतें असा निर्णय काढावा लागतो. कृष्णाच्या काळांत भोजांचें पराक्रमी राष्ट्र वऱ्हाडच्या उत्तरेस असून सत्राजिताचा पराभव करतें झालें, त्यावरून असें म्हणतां येईल कीं कृष्णकालीन विदर्भांत किंवा विदर्भाच्या आसपास भोजांचें पुष्कळ महत्त्व असलें तरी भोजांशिवाय दुसरी कोणती तरी जात वऱ्हाडांत महत्त्वाची होती.

### ३७९. असंस्कृत स्थितीची मीमांसा.

३७९. भोजांचीं राज्यें अनेक असतां ते आज हीन संस्कृतींत कां असा प्रश्न केला असतां त्याचें उत्तर सरळ आहे. सर्वच कृषीवल वर्ग कालांतरानें अल्प गरजांचा आणि ओबडधोबड आयुष्यक्रमाचा होई. त्याप्रमाणेंच भोयांची देखील ही स्थिति झाली आहे. त्यांच्यामध्यें आणि इतर जातींमध्यें वस्तुतः कोणत्याहि प्रकारचा फरक नाहीं. त्यांच्यातील जो वर्ग शहरांत येऊन राहतो तो फारच थोड्या काळांत इतर लोकांसारखा दिसूं लागतो आणि त्यांच्यामध्यें स्त्रीसौंदर्यहि वाढूं लागतें ही गोष्ट आजहि लोकांच्या नजरेस सहज येईल.

### ३८०. भोई आणि इतर सदृश ज्ञाती.

३८०. भोजांचा इतर जातींशीं संबंध अनेकप्रकारें आला. अनेक ठिकाणीं भोई व कोळी या सदृश जाती समजल्या जातात; त्या इतक्या कीं एक जात दुसऱ्या जातीला आपली पोटजात म्हणून सांगते. ज्याप्रमाणें भोई कोळ्यांची पोटजात झाले आहेत, त्याप्रमाणेंच कांहीं ठिकाणीं स्वतंत्र जात म्हणून असलेले मांगेले इतरत्र कोळ्यांची पोटजात गणले जातात. त्या सर्वांविषयीं विवेचन पुढील प्रकरणांत सांपडेल. या उल्लेखित ज्ञातींचा ऋग्वेद कालापासून आजपर्यंतच्या दीर्घकालामध्यें एकमेकांशीं संबंध कसा काय आला व त्यांच्या परस्पर संबंधासंबंधानें काय स्थित्यंतरें झालीं या गोष्टीविषयीं कांहीं विधान प्रस्तुत ग्रंथांत सांपडेल; पण मत्स्योपजीवी ज्ञातींच्या सामाजिक इतिहासाचीं मुख्य सूत्रें लक्षांत येण्यासाठीं पुष्कळच अधिक शोधाची आवश्यकता आहे.

---

प्रकरण ४२ वें.

# मत्स्यजीवी जातींचें चलनवलन आणि जातिभ्रमणशास्त्र.

## ३८१. आक्रमणाचे दोन प्रकार.

३८१. महाराष्ट्राचा लोकभ्रमणात्मक इतिहास बराच लिहितां येण्याजोगा आहे. अनेक जाती उत्तरेकडून महाराष्ट्रांत आल्या व महाराष्ट्र ओलांडून पलीकडे गेल्या. अशा जातीच्या महाराष्ट्रांत केलेल्या कार्यपरंपरेचा किंवा जातींच्या महाराष्ट्रीय शाखेचा इतिहास महाराष्ट्राच्या इतिहासांत मोडतो. महाराष्ट्रीय इतिहासाचें अवगमन करण्यासाठीं त्या व्यापक क्षेत्रीय जातींच्या एकंदर भ्रमणांचा इतिहास लक्षांत घ्यावा लागतो.

कुरुयुद्धकालीं महाराष्ट्रांत ज्या जाती होत्या त्याच अगर तेवढ्याच बुद्धकाळीं असणें शक्य नाहीं. तदर्थ विवेचन करितांना जातींच्या भ्रमणांचे इतिहास तयार करून नंतर त्यांच्या भ्रमणांचा काल निश्चित केला पाहिजे. अनेक नवीन जाती महाराष्ट्रांत आल्या असल्या पाहिजेत त्या प्रदेशविजेत्या या नात्यानें आल्या असतीलच असें नाहीं. लोक परिभ्रमण करितांना नवीन प्रदेशावर जेव्हां आक्रमण करितात, तेव्हां त्या आक्रमणांत देखील अनेक प्रकार दिसून येतात, ते प्रकार म्हणजे विजयी आक्रमण व शांततेचें उपजीविकेसाठीं आक्रमण. दोन्ही आक्रमणें दिसतात तितकीं भिन्न नाहींत. अनेक लोकभ्रमणें सशस्त्र होत असत. व्यापारी तांडे हत्यारबंद लोक बरोबर बाळगीत, आणि उपजीविकेसाठीं भ्रमण करणाऱ्या जातीहि हत्यारबंद असत. लुटारूपणा हा केवळ स्वतंत्र धंदा होता असें नाहीं, तर लुटारू देखील व्यापार करीत आणि व्यापारी देखील लुटारू बनत. त्यामुळें अमुक आक्रमण केवळ शांततेनें उपजीविका शोधण्यासाठीं आलें आहे कीं राज्य घेण्यासाठीं हें निश्चित नसे. तथापि परकीय राजा अगर परकीय संस्थानाचें सैन्य घेऊन जें आक्रमण होई तें विजयार्थ आक्रमण होय असें म्हटलें पाहिजे. महाराष्ट्रावर दोन्ही प्रकारचीं आक्रमणें झालीं होतीं. राजकीय आक्रमणांपैकीं कांहीं मागें सांगितलींच आहेत. आपणांस बुद्धपूर्व आगमनांचा इतिहास मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कुरुयुद्धकालीं महाराष्ट्रांत भोयांची म्हणजे भोजांची जात किती महत्त्वाची होती आणि त्या ज्ञातीचे संबंध कसे पसरले होते हें दाखविलेंच आहे. भोयांप्रमाणेंच ज्या दुसऱ्या जाती प्राचीन आहेत त्यांचाहि उल्लेख केलाच आहे. कुरुयुद्धपूर्व एकंदर जनतेचें स्वरूप येथें सांगतां येत नाहीं; तथापि विशिष्ट जाती सर्वांत जुन्या असें वाटण्यास कारण होणारीं प्रमाणें याच प्रकरणीं देण्यांत येतील.

सां स्था नि क इ ति हा सा चें अ ल्प म ह त्त्व.

दक्षिणापथाचें ऊर्फ प्रतिष्ठानचें राज्य, कांहीं काल मगधाचें मांडलिक झालेलें कुंडिनपूरचें विदर्भ राज्य आणि कुंतल व नागपूर या राज्यासंबंधीं गोष्टी मागें सांगितल्याच आहेत. महाराष्ट्रावर कधीं आवन्त्यांचें तर कधीं मागधांचें व शकांचें आक्रमण झालें. मगधाचा महाराष्ट्रानें पराभव केला व मगध राज्यास शह दिला; उलटपक्षीं महाराष्ट्रानें कधीं माळवा घेतला या प्रकारच्या परिस्थितीचें अस्तित्त्व आपणांस कुरुयुद्धकालापासून बुद्धकालापर्यंत दिसत आहे. या प्रकारचीं आक्रमणें खरोखर पहातां तितकीं कायमचीं परिणामकारक होत नाहींत. त्यांच्या योगानें समाजघटकांत बदल होत नाहीं. जें राज्य उदयास यावें तेंच पुढें अनेक मुलांमध्यें वांटलें जाऊन त्याचे तुकडे पडावेत आणि त्या तुकड्यांनीं एकमेकांशीं, विशेषतः मुख्याधिकारी संस्थानांशीं भांडावें अशा तऱ्हेचा इतिहास आपणास दिसत आहे. त्यावरून महाराष्ट्रांतर्गत सांस्थानिक रूपांतरें आपणास अवगत होत आहेत. पण त्या काळाचा जातीय व धार्मिक इतिहास समजल्याशिवाय या कालाचें अवगमन झालें असें आपणास वाटणार नाहीं.

महाराष्ट्रावरील कांहीं आक्रमणें जर राजकीय स्वरूपाचीं असलीं तर कांहीं आक्रमणें शांततेच्या व औद्योगिक स्वरूपाचीं असणार; पण तीं देखील तितकींच महत्त्वाचीं आहेत. वसाहतीसाठीं, नोकरीसाठीं, व्यापारासाठीं जीं परिभ्रमणें होतात त्यांत आणि राजकीय आक्रमणांत दीर्घकालदृष्टीनें पहातां फारसा फरक नाहीं. थोड्याच दिवसांत जनतेच्या पदवीचें स्थित्यंतर होतें; मराठे आणि धनगर उत्तरहिंदुस्थानांत विजेते आणि राज्यकर्ते झाले तरी आज दोन्ही जातीचे लोक गुजराथी व हिंदी प्रजेच्या घरीं घरचे नोकर म्हणून राहिले आहेत. महाराष्ट्रांतील आजचा लोकसमाज दोन्ही प्रकारच्या आक्रमणांचा परिणाम आहे. प्राचीनकाळच्या लोकांचे आजचे वंशज कोण व आज दिसणाऱ्या लोकांचे पूर्वज कोठून आले या तऱ्हेची कांहींतरी चौकशी करणें अवश्य आहे. ती चौकशी झाल्याशिवाय आपणास त्या

काळचा इतिहास समजला असें होत नाहीं. जनतेच्या घटक ज्या ज्या जाती आहेत त्यांच्या प्रथम आगमनांचा आणि आगमनोत्तर वागणुकीचा इतिहास आणि त्याबरोबर त्या जातींची इतर जनतेशीं जी संयुक्तता किंवा अलिप्तता राहील तिचा इतिहास हा खरोखर राष्ट्राच्या इतिहासाचा एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे.

वांशिक इतिहास, जातिभ्रमणें व मार्ग.

इतर राष्ट्रांच्या इतिहासापेक्षां हिंदुस्थानांतील कोणत्याहि भागाचा वांशिक इतिहास आपणांस अधिक स्पष्टतेनें नजरेस आला पाहिजे अशी माझी अपेक्षा आहे. नवीन ठिकाणीं गेलेले लोक मूळच्या लोकांशीं रक्तानें पूर्णपणें संयुक्त होत नसल्याकारणानें पूर्वकालीन स्थितीचीं स्मारकें लोक अधिक संरक्षून ठेवितात. नवीन आलेले लोक कांहीं बाबतींत पूर्वींच्या जनतेसारखे होतात तर कांहीं बाबतींत ते आपला पूर्वाचार कायम ठेवतात. यासाठीं आपणांस निरनिराळ्या लोकांच्या विधिस्वरूपी चालीरीतींकडे लक्ष दिलें पाहिजे. भिन्न पण सदृश अशा जातींतील विधींच्या सादृश्यासादृश्यावरून प्राचीन स्थितीविषयीं अनुमानें काढणें सशास्त्र होईल. जातिभ्रमणाचा इतिहास हें वांशिक इतिहासाचें अंग होय. एका ठिकाणच्या जातीचें व तींतील पोटजातींचें पृथक्करण करणें, त्या जातींत दिसून येणाऱ्या प्राचीन रिवाजाचा आणि पूर्वकालीन स्मारकांचा संबंध भिन्नस्थलीय जातींत आढळून येणाऱ्या स्मारकांशीं कितपत येतो हें पहाणें, व या रीतीनें निरनिराळ्या जाती निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या ठिकाणाहून आल्या त्या जातींचा पूर्वेतिहास आजच्या स्मारकांवरून व इतर साहित्यावरून काढणें, या तऱ्हेच्या क्रिया करीत करीत जी प्राचीन कालाविषयीं जातिभ्रमण व जातिमिश्रण यासंबंधाची व इतर सामाजिक स्थित्यंतराविषयीं सत्यें दिसून येतील त्यांचा संग्रह करून त्या सत्यांचा एकमेकांशीं मेळ बसविणें ही आजच्या जातिवर्णनांवरून प्राचीन वांशिक इतिहास काढण्याची मुख्य कार्यपद्धति आहे.

वांशिक इतिहास तयार करतांना जातींच्या आगमनाचे मार्ग निश्चित करणें महत्त्वाचें आहे. भोई आणि कोळी यांच्याविषयीं स्थूलपणानें एक भेद सांगतां येईल कीं कोळी जात पश्चिम किनाऱ्याकडून पसरली असावी; तथापि भोई जात ही नर्मदा व तापी यांच्या तीरावरून पुढें दक्षिणेकडे आली असावी.

महाराष्ट्रांत येण्याचे मार्ग म्हटले म्हणजे उत्तरेकडून, आग्नेयीकडून आणि पश्चिमेकडून. पश्चिमेकडून येणाऱ्या जाती म्हटल्या म्हणजे (१) सिंधमधील जाती, (२) गुजराथमधील जाती, (३) मलबारकडील जाती. आणि (४) परदेशीय म्हणजे इराण व अरबस्तान येथील जाती. उत्तरेकडून येणाऱ्या जाती म्हटल्या म्हणजे हिंदी बोलणाऱ्यांच्या जाती होत. आग्नेयीकडून येणारे लोक अर्थात् द्राविडवंशीय होत. या सर्व प्रकारच्या लोकांच्या आगमनांचा व्यवस्थितपणें इतिहास काढणें हें वांशिक इतिहासाचें कार्य होय.

**३८२. महाराष्ट्राचा वसाहतकाळ एक नाहीं, आणि आद्य वसाहतकाल कल्पनागोचर नाहीं, भिन्न जातींचे वसाहतकाल भिन्न आहेत. जिंकण्यासाठीं आक्रमण आणि शांततेच्या आयुष्यक्रमासाठीं आगमन हीं फारशीं भिन्न नव्हतीं.**

३८२. महाराष्ट्राचा अत्यंत प्राचीन काळचा इतिहास म्हणजे वसाहत काळचा इतिहास काय होता हें आजच्या परिस्थितीच्या पुराव्यावरून सांगणें ही इतिहासशास्त्रज्ञांची धैर्याची उडी होय. पण ती उडी घेतली पाहिजे, व तें धैर्य महाराष्ट्रांतील अभ्यासकांनीं केलेलं आहे. महाराष्ट्रांतील ग्रामनामें पाणिनीनें सांगितलेल्या धातूंवरून कितपत सिद्ध होऊं शकतात या विषयावर कै. विश्वनाथ राजवाड्यांनीं अभ्यास करून त्याचें फल आपणांस दिलें आहे. त्या प्रकारचा अभ्यास अधिक व्हावयास पाहिजे आणि तो विविध अधिकाराच्या व्यक्तींकडून व्हावयास पाहिजे. राजवाड्यांच्या या संबंधाच्या लेखांतील ग्राह्य भाग प्रस्तुत ग्रंथांत समाविष्ट होणारच आहे.

कुरुयुद्धकालाचा दक्षिणेचा इतिहास पाहूं गेलें असतां दक्षिण व्यापलेलीच दिसत आहे, तथापि नंतरच्या शतकांत लोकवसती नेहमीं एकसारखी वाढत गेली असली पाहिजे आणि लोकांच्या आगमन निर्गमनाची क्रियादेखील चालू असली पाहिजे. हें आगमननिर्गमन होत असतां युद्धेंदेखील होत असावींत. पूर्वकालीन लोकांचें चलनवलन रस्त्यांच्या सुरक्षिततेच्या अभावीं जमावानेंच होत असल्यामुळें नवीन जातीच्या लोकांनीं जमावानें येण्याची क्रिया देखील होत असली पाहिजे. आणि त्यामुळें आगमननिर्गमनास स्वारीचें स्वरूप येणें अपरिहार्य आहे. सशस्त्र आगमन म्हणजे नेहमीं पूर्वराज्यनिर्मूलनाच्या दृष्टीनें होत असेल असें नाहीं, लोकवस्तीनें भरलेल्या प्रदेशांत नवीन लोकांची वसाहत राजाकडून उत्तेजनानें तयार झाली नसल्यास मारामारी करून स्थापन झाल्याखेरीज गत्यंतर नाहीं. सशस्त्र आगमन, त्यानंतर मारामारी, त्यानंतर जमिनीसाठीं तहनामा अगर भाडेकरार या प्रकारच्या अनेक गोष्टी जातीय आगमनांत होत असतात. जेव्हां विशिष्ट प्रदेशांत विशिष्ट जातीचें

प्राबल्य असतें तेव्हां ती जात तेथें वसाहत नसतांना आली असली पाहिजे, किंवा मारामारी करून स्थापन झाली असली पाहिजे. धंदा करण्याच्या हक्कासाठीं मारामारी, मुष्टियुद्ध इत्यादि क्रिया ब्राह्मणांस देखील कराव्या लागतात, आणि महाराष्ट्रीय ब्राह्मणांना आपली तीर्थोपाध्यायांची वृत्ति कायम ठेवण्यासाठीं गंगातीरीं देखील गुद्दागुद्दी करावी लागते ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. तथापि जेव्हां युद्धाचा हेतु राज्यपद घेण्याचा नसून विशिष्ट उद्योग करण्यास परवानगी अगर सवलती मिळविणें हाच असतो, तेव्हां त्या स्वारीस अर्थात् राजकीय स्वरूप नसतें. अनेक सशस्त्र जाती आपलीं जातिविशिष्ट शस्त्रें राखून रहातात व आपल्या लढाऊपणाची स्मृति कायम ठेवतात; तथापि त्यांचा धंदा मुख्यत्त्वें करून शेतकीचा होतो. अशा जातीची मंडळी पुष्कळदां पूर्वराज्याचें निर्मूलन करतात व जमीन काबीज करतात. जमीनदारी ही त्यामुळें राजत्वाचें लक्षण समजलें जाई. यासाठीं जातीची वसाहत कोणत्या जागीं झाली आहे. त्या जातीचीं शस्त्रें कांहीं विशिष्ट प्रकारचीं आहेत काय इत्यादि प्रकारची चौकशी करणें पूर्वकालीन इतिहास समजण्यासाठीं अवश्य होते. व शेतकी व मत्स्यजीवी वृत्ती ज्यांची आहे अशा जातींच्या इतिहासास राजकीय महत्त्व आणि प्राधान्य आल्याखेरीज रहात नाहीं.

### ३८३. जातिपरिभ्रमणाच्या अभ्यासाची फलदायकता.

३८३. जातींचीं परिभ्रमणें हीं अभ्यासतांना आपण मत्स्योपजीवी आणि शेतकरी जातींस प्राधान्य दिलें तरी बराच मनोरंजक इतिहास सांपडण्याजोगा आहे. जातीबरोबर येणाऱ्या भिन्न संस्कृतीचा इतिहास आपणांस जातींत उरलेल्या प्राचीन काळच्या वैशिष्ट्यांवरून त्याचप्रमाणें स्थलावरून अवगत होण्यासारखा आहे; अमुक जात अमूक स्थलींच कां आहे याप्रकारची चौकशी करतांना आगमनमार्ग समजेल आणि एकाच मार्गानें येणाऱ्या जाती कांहीं विशिष्ट अनुक्रमानें भूभाग व्यापतांना दृष्टीस पडल्या म्हणजे निरनिराळ्या जातींचें आगमनपौर्वापर्यही समजून येईल.

लोकांच्या वसाहतीचा म्हणजे आगमन-निर्गमनाचा इतिहास लिहिण्यास इतर देशांत जीं साधनें आहेत, त्यापेक्षां हिंदुस्थानांत अधिक आहेत. याचें कारण हिंदूंमधील जातिभेद आहे, हें मागें सांगितलेंच आहे. निरनिराळ्या काळीं निरनिराळे लोक आले; त्यांचे पूर्वगत लोकांशीं एकजीव झाले नाहींत आणि त्यामुळें ते जातीतिहास रक्षून आहेत. जातिभेद चांगला असो अगर वाईट असो; जातीचें पृथकत्व त्याबरोबर बराचसा सामाजिक इतिहास अधिक रक्षून ठेवणें हा त्याचा एक परिणाम झाला आहे खास. यूरोपांत राज्यांचा इतिहास सांगतां येईल, पण राज्येतर लोकसमुच्चयांचा इतिहास हिंदुस्थानांत अधिक सातत्यानें सांगतां येईल.

नवीन जागेंतील भूमि व्यापण्यासाठीं जातींत युद्धें होतात त्याप्रमाणें व्यापार काबीज करण्यासाठीं राष्ट्रजातींच्या व्यापारी समुच्चयांत युद्धें होतात. आपल्याकडे व्यापार काबीज करण्यासाठीं युद्धें विशेष झालीं नाहींत. राजे लोक परकीय व्यापारी वर्गाचें देखील स्वागत करीत आणि परदेशीय व्यापारी व इतर लोक आपल्या देशांत आले तरी त्यांची संस्कृति कालांतरानें भारतीय होऊन जाई.

### ३८४. महाराष्ट्राचे प्रवेशमार्ग.

३८४. महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासामधील जो वसाहतीचा इतिहास आहे तो आपणांस कितपत व्यवस्थितपणें मांडतां येईल तो पाहूं. महाराष्ट्रांतील वाण्यांचे वर्ग आगमनमार्गाशीं संबद्ध आहेत. महाराष्ट्रामध्यें प्रवेश करण्याचे तीन मार्ग मागें दिलेच आहेत.

( १ ) कांहीं लोकांचा प्रवेश कोंकणाकडून झाला असला पाहिजे. त्यामुळें कुडाळ वाणी वगैरे कोंकणांकडून येणाऱ्या विशिष्ट वाण्याच्या जाती महाराष्ट्रांत सांपडतात.

( २ ) उत्तरेकडील प्रदेशांतून प्रवेश होण्याचे मार्ग अनेक आहेत व निरनिराळ्या उत्तरेकडील आगरवाल वगैरे जाती उत्तरेकडील निरनिराळ्या घाटांतून आल्या आहेत.

( ३ ) आग्नेयीकडून तैलंगी आणि कानडी लोकांचा महाराष्ट्राशीं संबंध आला. त्यांच्यामुळें तैलंगी कोमट्यांच्या आणि कानडी लिंगाईताच्या व्यापारी जाती महाराष्ट्रांत दाखल झाल्या आहेत.

ज्या मार्गानें उत्तरकालीं व्यापारी जाती आल्या, त्याच मार्गानें अगोदर जमीनीची मशागत आणि वसाहत करणाऱ्या जाती आल्या असल्या पाहिजेत.

आज दाक्षिणात्य आगमनांचा अभ्यास काळजीपूर्वक झाला पाहिजे. कानडी पांडित्यानें महाराष्ट्राच्या दक्षिणेकडील वसाहतीचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. द्राविड भाषांचे ज्ञाते महाराष्ट्राच्या इतिहासाच्या स्पष्टीकरणार्थ अजून फारसे पुढें आले नाहींत. त्यांचें पांडित्य जसें अधिकाधिक कार्यकारी होईल तसतसा अनेक गोष्टींवर नवा प्रकाश पडूं लागेल. ब्राह्मणादि जाती अल्पसंख्याक आहेत. व्यापारी वर्ग शहरांतून तेवढा असतो. प्रदेशाची वसाहत म्हणजे खेड्यांतून रहाणाऱ्या लोकांकडून वसाहत. ते

लोक जें उत्पन्न करतात त्यावर क्रयविक्रय करणाऱ्यांचें आणि समाजसंस्करण करणाऱ्यांचें जीवित अवलंबून असतें. दक्षिणेकडील मत्स्यजीवी आणि कृषीवल वर्गांचें सूक्ष्म अवलोकन होऊन महाराष्ट्र आणि कर्नाटक यांचे वांशिक संबंध स्पष्ट झाले पाहिजेत.

## ३८५. मत्स्यजीवी आणि कृषीवल जाती, त्यांचीं आगमनें व स्थित्यंतरें.

३८५. महाराष्ट्रांतील अनेक जाती व कुळें बाहेरून आलीं आहेत आणि बाहेरून येतांना किंवा आल्यानंतर त्यांचें रूपांतर इकडे झालें त्याचप्रमाणें ज्यांतून ते आले त्या मूळ लोकांचें देखील रूपांतर झालें असणार, हें लक्षांत घेऊनच महाराष्ट्राचा इतिहास देतांना त्या जातीच्या मूळदेशीय भाईबंदाच्या स्थितीकडे पाहिलें पाहिजे. भोई, कोळी, माळी, कुणबी या सर्व जातींचे भाईबंद चोहोंकडे पसरले आहेत तर त्या त्या जातीच्या इतरत्र असलेल्या भाईबंदांकडे लक्ष दिल्याशिवाय महाराष्ट्रांतील स्थाईक झालेल्या वसतीचा इतिहास देतां येणार नाहीं.* ' कुटुंबी ' हा शब्द गंगाथडीपासून कर्नाटकाच्या सरहद्दीपर्यंत वापरला जात होता, आणि त्यामुळें कणबी, कुणबी, कुरमी वगैरे त्याचे अपभ्रंश गुजरात, महाराष्ट्र, बुंदेलखंड, छत्तीसगड इत्यादि ठिकाणीं दिसून येत आहेत. कुणबी या नांवांवर ज्या जाती आपला हक्क सांगत आहेत. त्या एकवंशीय आहेत असें नाहीं. त्यांत पोटजाती आहेतच. त्या सर्वच एककालीन आगमन झालेल्या समाजाच्या मूळच्या पोट जाती आहेत कीं निरनिराळे कृषीवल वर्ग एकत्र झाल्यानंतर आणि त्यांनीं आपणांस 'कुणबी' हें प्रतिष्ठित नांव घेतल्यानंतर त्या कुणब्याच्या पोटजाती म्हणून समजल्या गेल्या याविषयीं विचार झाला पाहिजे. तोच विचार म्हणजे आगमनभ्रमणाचा इतिहास होय. कोळी यांचीं कोडी, कोरी अशीं सदृश नामांतरें दिसत आहेत; तथापि कोळी हा शब्द धंद्याचा वाचक नाहीं.

कृषीवल संस्कृतीच्या अगोदरची मत्स्योपजीवी संस्कृति आहे असें कित्येक समजतात. तें खरें असो अगर नसो जेव्हां मत्स्योपजीवी वृत्ति शक्य असेल तेव्हां शेतकी जाणणारे लोक देखील मत्स्योपजीवी बनतात. धीवरवृत्ति परिश्रमाचें फल चटकन देणारी आहे. आणि कृषीवलवृत्ति अनेक दिवसांनीं अगर महिन्यांनीं परिश्रमाचें फल देते. अशा स्थितींत वसाहत जलाशयाच्या आश्रयानेंच होत जाणार. आणि जलाशयाच्या आश्रयानेंच एकादी जात दिसली तर ती अगोदर वसाहत करणारी असली पाहिजे असें गृहित धरण्यास हरकत नाहीं; यासाठीं जातीतिहासांत आपण अग्रपूजेचा मान कोळ्यांस व भोयांस दिला आहे. कोळ्यांचा उल्लेख आपणांस बुद्धचरित्रांत प्रामुख्यानें आला आहे. मागें दिलेल्या उषवदाताच्या लिखाणांतहि आलाच आहे; तर कोळ्यांच्या महाराष्ट्रांतील वसतीचें स्थूल अवलोकन त्या वसतीवरून आगमननिर्याणाच्या इतिहासाचीं अंगें दाखविणाऱ्या स्मारकांकडे लक्ष दिलें पाहिजे. महाराष्ट्रांत कोळ्यांची वस्ती चोहोंकडे आहे. त्याशीं सदृश अशा देशावरील जाती म्हणजे भोई, कहार वगैरे होत. महाराष्ट्राच्या कोंकण विभागांत जर त्यांचा धंदा मासे पकडण्याचा आहे तर इतरत्र शेतकी व तीशीं संलग्न धंदे देखील ते करीत आहेत.

## ३८६. कोळी जातीचें परिभ्रमण.

३८६. कोळीजातीच्या परिभ्रमणाचा इतिहास आपणांस त्यांच्या ज्या वसाहती निरनिराळ्या प्रदेशांत आहेत त्यांवरून स्थूलपणें काढतां येण्याजोगा आहे. कोळ्यांची वस्ती सिंधु तीरापासून म्हैसुरपर्यंत पसरली आहे. आणि प्रत्येक ठिकाणीं त्यांच्यांत अंतर्विवाही पोटजाती, व बहिर्विवाही गोत्रस्वरूपी संघ आहेत. तथापि निरनिराळ्या ठिकाणीं कोळी जातीचें वर्गीकरण एकच आहे असें मात्र नाहीं. प्रत्येक ठिकाणीं त्यांच्या पोटजाती भिन्न आहेत. आणि प्रसिद्ध कुळभेद देखील भिन्न आहेत. बहिर्विवाहाच्या अटी देखील सदृश नाहींत. त्या सर्व गोष्टींचा इतिहाससंगति जुळवितांना विचार करावयास हवा. स्थानिक व्यवहार, ग्रामामध्यें त्यांचें कार्य आणि त्यांचें सामाजिक स्थान हीं देखील भिन्न आहेत. आणि त्यामुळें त्यांचें समाजस्वरूप पालटून गेलें आहे. कांहीं ठिकाणीं त्यांचें स्थानिक जनतेशीं इतकें सादृश्य स्थापन झालें आहे कीं त्यांच्या देवता देखील जातिविशिष्ट राहिल्या नाहींत तर स्थानिक धर्मांचा त्यांच्यावर पुरा पगडा बसला आहे. कोळ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासांत त्यांच्या जातीचें औद्योगिक रूपांतर, सामाजिक एकीकरण अगर भिन्नीकरण या प्रकाररूप गोष्टी विचारणीय आहेत. मांगेले ही उत्तरकोंकणांतील कोळ्यापासून भिन्न समजली जाणारी जात खरोखर भिन्न नाहीं. काठेवाडी कोळ्यांमध्यें मांगेलिया ही पोटजात आहेच. ही जात स्थानविशिष्ट असेल. काठेवाडांत तिला कोळ्याचीच पोट जात समजतात आणि उत्तरकोकणांत समजत नाहींत एवढेंच.

* माळी जात ही अखिल भारतीय जात आहे असें दाखविण्याचा प्रयत्न माळीजातीच्या इतिहासावर एक पुस्तक प्रसिद्ध करून वऱ्हाडांतील डॉ. मालपे नांवाच्या माळी जातीच्या गृहस्थांनीं केला आहे. प्रयत्न अत्यंत प्राथमिक स्वरूपाचा आहे तथापि कांहीं पुरावा उपयोगाचा आहे.

कोळी जातीचा उगम आणि प्रसार सिंधु नदाचा फांटा जो 'कोरी नदी' तेथपासून झाला असें माझें मत झालें आहे. त्यांचे धंदे चांचेगिरी, मासे मारणें, हेच मुख्यतः बनले. त्यांची उपजीविका पद्धति जलाश्रयी बनली आणि त्यांची शेतकी नदीकांठानेंच चोहोंकडे झाली या गोष्टी आज स्पष्ट आहेत. भोई लोकांची औद्योगिक आयुष्यक्रमाची आणि देश-प्रसाराची कथा देखील तशीच आहे..

## ३८७. जातिनाम ज्या प्रदेशावरून पडलें असेल त्या प्रदेशांत त्या नांवाच्या अस्तित्त्वाची अनावश्यकता.

३८७. कोळ्यांची वसती कोरी नदीपाशीं थोडी आहे. आणि गुजरात आणि कोंकण यांत फार आहे. तथापि तेवढ्यावरून कोरीनदीच्या कांठच्या लोकांचे ते वंश आहेत, याविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. दूर गेलेल्या लोकांनाच त्या स्थलाचें नांव चिकटतें, पण खुद्द त्या स्थानीं रहाणाऱ्या लोकांना लागलेलें नसायचें. ब्रह्मदेशामध्यें कोरंगी हें नांव तेलुगु आणि उडिया मजुरांना लावण्यांत येतें; याचें कारण पूर्वी कोरिंग नांवाच्या कारोमांडेल बंदरापासून ब्रह्मदेशांत ते लोक गेले. तथापि खुद्द मद्रास इलाख्यांत तें नांव अश्रुत आहे. आज महाराष्ट्रांत तामिल व तेलुगु यांस मद्रासी म्हणतात; पण मद्रासी या नांवानें ओळखले जाणारे लोक मद्रास इलाख्यांत नाहींत. यामुळें कोळी नांवानें ज्ञात असलेल्या लोकांची संख्या कोरी नदीच्या कांठीं सांपडत नाहीं, ही गोष्ट कोळ्यांच्या कोरी नदीशीं लावलेल्या संबंधाशीं विसंगत नाहीं. तर तो संबंध सिद्ध करण्यास साहाय्यकच होईल.

## ३८८. कोळी जातीचा म्हेर आणि कोरी नदी यांशीं संबंध.

३८८. कोळी जातीचा आढावा घेतांना कच्छ, काठेवाड, गुजराथ, उत्तर कोंकण, दक्षिण कोंकण व घांट या अनुक्रमानें अवलोकन करूं.

कच्छमध्यें कोळ्यांची वस्ती आहेच. त्यांत बाबरिआ कोळ्यांचा भरणा विशेष आहे. हे बाबरिआ कोळीच पूर्वी पुराणांत व सह्याद्रि खंडांत उल्लेखिलेले बर्बर असावेत अशी कल्पना मांडली गेली आहे. ( बांबे ग्याझे. ग्रंथ ५ वा ) बाबरिआ कोळ्यांनीं आपल्या वस्तीनें ज्या प्रदेशास नांव दिलें आहे तो प्रदेश 'बाबरिआवाड' होय. हा काठेवाडांतील दक्षिण भागांतच आहे. कच्छ येथील कोळ्यांतील कांहीं जमाती म्हेड, मेर, अगर मांड नांवाच्या लोकांच्याच वंशज आहेत आणि दक्षिण सिंध जेव्हां अरबांनीं जिंकला तेव्हां (इ. स. ७१२) त्या नांवाचे लोक तेथें रहात होते. कोरी नदीच्या कांठीं म्हेड, मेर वगैरे लोक रहात होते ते इतरत्र पसरले, तेव्हां त्यांस कोळी नांव मिळून त्या त्यांच्या पोटजाती झाल्या असाव्या असा इतिहास कोळ्यांतील पोटजातींत म्हेर व मेर या नांवाच्या अस्तित्वावरून सूचित होत आहे. दक्षिण सिंधमध्यें कोरी नांवाची जात आहे. सिंधु नदाचें तें अत्यंत पूर्वेकडील मुख आहे. कोरी याचेंच कोडी असें रूपांतर होतें. कोरी, कोडी आणि कोळी हीं तिन्ही नांवें या लोकसमूहास अजून चालू आहेत. नदीच्या काठानें जे लोक रहात त्या लोकांना नदीचें नांव मिळतें ही गोष्ट आपणांस अनेक बाबतींत दिसत आहे. नदीच्या नांवाचीं राष्ट्रनामें हिंदुस्थानावरील संस्कृत त्याचप्रमाणें ग्रीक ग्रंथांत सांपडतात. कोरी लोकांना तें नांव नदीवरून पडलें असून तें स्थाननाम जातिनाम झालें. लोक दुसरे कोठें गेले तर तें नांव चालू राहिलें असा इतिहास विरुद्ध पुराव्याच्या अभावीं गृहीत धरतां येईल.

## ३८९. सिंधप्रांतांतून काठेवाड, गुजरात, कोंकण, महाराष्ट्र आणि कर्नाटक येथें प्रसार.

३८९. कोळी लोकांची वसाहत महाराष्ट्राच्या पश्चिम भागांत सर्वत्र होती आणि केवळ मासे मारणें हा त्यांचा धंदा नसून ते सर्व प्रकारचे धंदे करीत असावेत. कोळी लोकांमध्यें आज अनेक पोटजाती आहेत, व त्यांचे धंदे देखील अत्यंत विविध आहेत. ही जात राष्ट्रस्वरूपी होती, विशिष्ट धंद्याची नव्हती हें एकंदर पुरावा पहातां दिसत आहे. ही जात देशभर केव्हां पसरली तें सांगतां येत नाहीं; तथापि अत्यंत प्राचीनकाळीं अपरांत आणि गुजरात यांत याच लोकांची वस्ती असावी. त्या जातीचा मेर लोकांशीं एकवांशिक संबंध आहे ही कल्पना खरी असल्यास पंजाबसरहद्दीपासून तर राजपुतान्यापासून ते थेट कर्नाटकापर्यंत यांचा प्रसार दिसत आहे. दुसऱ्या लोकांनीं येऊन त्यांचें राज्य घेतलें याप्रकारची कथा कोठें संरक्षित झालेली नाहीं. याचें कारण एवढेंच कीं या प्रसाराच्या काळांत राजाचें राजकुल इतर ठिकाणच्या राजकुळाशीं संबद्ध होऊन जनतेपासून थोडेंसें निराळें होई, व त्यांत क्षत्रियभावना उत्पन्न होई. त्यामुळें दुसरी जनता तेथें शांततेच्या मार्गानें येऊन वसाहत करूं शके. वारली वगैरे जाती कोळ्यांच्या राज्यांत आल्या किंवा अगोदरचा राजा कोळी असून नंतर वारली आले हें नक्की सांगतां येत नाहीं. मासे मारणें आणि शेती करणें हे दोन कोळ्यांचे धंदे आहेत आणि वारली लोकांचा धंदा देखील शेतकी हाच आहे. वारली हे कोळ्यांचेच कोणी भाईबंद असावेत अशी कल्पना

होण्यास कारणें अनेक आहेत. दोघांच्या सामाजिक सादृश्यांपैकीं एक सादृश्य म्हटलें म्हणजे लग्नकार्यांत दवलेरीचा उपयोग होय. तो उपयोग त्यांचें सामाजिक ऐक्य फार प्राचीन काळीं झालें असलें पाहिजे असें दाखवितो; कारण कोळी लोकांचें लग्नांतलें उपाध्येपण ब्राह्मणांकडे गेल्यानंतर दवलेरीच्या अधिकाराचा प्रसार होणें शक्य नाहीं.

कोळी शब्दाची व्युत्पत्ति पूर्वी निश्चित झाली नाहीं. कोरी नदीकांठचे लोक ते कोळी अशी माझी सूचना आहे; ही सूचना दुसऱ्या कोणी केल्याचें मला माहीत नाहीं. इंग्रजींतील 'कूली' म्हणजे मजूर हा शब्द कोळी यापासून निघाला आहे व तो सर्व जगभर पसरला आहे. फोर्ब्सच्या रासमालेंत (पृ. १०३) कोळी नांवाच्या पुरुषापासून त्यांची उत्पत्ति देऊन जातीच्या उत्पत्तीचें भाकड स्पष्टीकरण केलेलें आहे. 'कोल' या शब्दाचा अर्थ होडी असा देऊन कोळी ही दर्यावर्दी जात आहे असें स्पष्टीकरण कर्नल वाटसन यांनीं केलें आहे. डॉ. वुइलसन यांनीं 'कुल' या शब्दाचा कोळी या शब्दाशीं संबंध जोडला आहे आणि कोळी शब्दाचा अर्थ 'कुलांतला मनुष्य' असा बनविला आहे.

कोळी लोकांचें अस्तित्त्व महाराष्ट्रांत विशेषेंकरून कोंकणपट्टींत अत्यंत प्राचीनकाळीं होतें, त्याप्रमाणेंच तें गुजराथेंतहि असावें. जुन्या काळाचीं दर्शक अशीं कांहीं भाटांचीं गाणीं अस्तित्त्वांत होतीं कीं त्या गाण्यांत भाटांनीं आपल्या वेळेस गुजराथेंत लोक वस्ती फारशी नव्हती आणि भिल्ल आणि कोळी त्या वेळेस सुखानें रहात होते असें त्यांत दाखविलें आहे.

काठेवाडांत कोळ्यांची वस्ती सुमारें चार लाख आहे. तेथील कोळी आपला पूर्वज सिंधुनदाच्या परिसरांतून आल्याचें सांगतात. पौराणिक राजा यौवनाश्व याच्याशीं संबंध जोडण्यास देखील त्यांना कोणीतरी शिकविलें आहे. तेथील कोळ्यांची हिंगलाज ही देवी आहे. ही देवी हिंगुळजा या नांवानें अनेक महाराष्ट्रीय ब्राह्मणकुलाची कुलदेवता झाली आहे. काठेवाडांतील कोळ्यांना मेर असेंहि म्हणतात.*

काठेवाडच्या कोळ्याचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें करतां येईल.

कोळी

(१)तलबदा (२)चुनीवलिया (३)वलकिया (४)खांत (५)घेंडिया

यांपैकीं तलबदा कोळी हे सर्वांत प्रतिष्ठित व जुने समजले जातात. वरील पांच भेदांमध्यें पुष्कळच पोटभेद आहेत.

तलबदा कोळ्यांचीं आडनांवें अगर कुळें अगर भेद पुढील प्रमाणें आहेतः-जाधव, सुरविया, चूडासम, दाभी, मकवान, राठोड, झाल, गोहिल, कतसरा बरया, चोहान, चावडा, सोळंखी, जेठवा, परमार, मांगलिया, खासीया, कामलिया, वाघेला, भेर शियाला, कच्छेला. वरील कुलांपैकीं जाधव, सुरविया, आणि चूडासमा हीं कुळें अधिक प्रतिष्ठित धरलीं जातात.

वरील कुळें कोळ्यांत आहेत आणि यांपैकीं बरींच नांवें रजपुतांतहि आहेत; त्यावरून रजपूत व कोळी यांचें संमिश्रण होऊन ही जात बनली अशी समजूत व्यक्त झाली आहे.† तथापि तेवढ्यानें पुरेंसें स्पष्टीकरण होत नाहीं. यादी देतांना पोटजाती आणि कुळी यांचा गोंधळ अनेक लेखक करीत आहेत वरील यादींत दोन्ही प्रकारांचा अंतर्भाव झाला आहे. राष्ट्ररूपी जातीची उत्पत्ति जेथें एका पुरुषापासून देतात तेथें प्रादेशिक जातीचा आणि कुलमूलक वंशाचा घोंटाळा व्हावयाचाच. उदाहरणार्थ, मकवान कोळी आपला पूर्वज केसर मकवानी आहे असें सांगतात. अशा वेळेस संशोधकाचें एक कर्तव्य असें होतें कीं स्थानमूलक आणि कुलमूलक नांवाचें पृथक्करण करणें आणि त्यासाठीं मदत म्हणून प्रत्येक नांवानें ओळखला जाणारा समूह गोत्रांसारखा बहिर्विवाही आहे कीं अंतर्विवाही आहे याची चौकशी करून ठेवणें. ती चौकशी होईपर्यंत ऐतिहासिक अनुमान दुर्बलच रहाणार. यांपैकीं जाधवपासून परमारपर्यंत नांवें कुलांचीं आहेत आणि उरलेलीं प्रादेशिक पोटजातींचीं आहेत असें वाटतें. कांहीं कोळ्यांचीं पोटजातींचीं नावें स्थानमूलक आहेत हें स्पष्ट होत आहे. शियाल हें ज्या कोळ्याच्या जमातीचें नांव आहे, ती टोळी एका काळीं चांचेगिरीबद्दल प्रख्यात होती. त्या जातीस तें नांव काठेवाडच्या दक्षिण किनाऱ्यास 'शिधाळ' नांवाचें जें बेट आहे त्यावरून पडलें आहे. खासिया हें नांव धंधुका परगण्यांतील 'खास' या ग्रामनामावरून पडलें आहे. मांगलिया हा देखील एकस्थानमूलक भेद म्हणजे पोटजात असावी. आणि त्या जातीचीच एक वसाहत उत्तरकोंकणांतील मांगेले असावेत.

चुनवालिया हें नांव काठेवाडाच्या पूर्वभागांत 'चुनवाळ' म्हणून चव्वेचाळीस गांवांचा संघ आहे त्यावरून पडलें आहे. चुनवालियामध्यें देखील अनेक पोटभेदांचा उल्लेख सांपडतो (कले. गॅ. पृ. १४१). ते पोटभेद म्हटले म्हणजे अबसनिया, अधगाम, बसुकिया, दाभी, धामेडिया,

* Gaz. of Bombay Presidency, Vol. VIII, 1884, p. 139.

† Bom. Gaz., Vol. III, p. 140.

धंधुकिया, गोहिळ, जंदारिया, झिंझु वाडिया, कनेजा, लिला-पुरा, मकवाना, पालेगिआ, परमार, पिपलिआ, बाबरिआ सादरिया, सोळांकी, बधलखिया, बाघेला.

हे एकवीस विभाग बहिर्विवाही म्हणजे गोत्रस्वरूपी आहेत.

हीं नांवें कांहीं अंशीं रजपुत कुळांवरून तर कांहीं अंशीं स्थानिक नांवावरून पडलीं आहेत.

गुजराथेंतील कोळी लोकांत रजपुतांचीं नावें कशीं आलीं, त्याचप्रमाणें दक्षिणेकडील कोळ्यांत त्याचप्रमाणें वारली, वरप, वगैरे जातींत कुलीन मराठ्यांचीं नांवें कशीं आलीं यासंबंधीं चर्चा, किंवा शंकाकुशंकारूपी विचारव्यंजना बरीच होते. एक असा विचार व्यक्त केला गेला आहे कीं अनेक युद्धप्रिय जातींमध्यें त्याचे पुढारी तेवढे परकीय येतात आणि त्यांच्या हाताखालीं ती जात कार्यकर्ती होते. स्काटलंडच्या हायलंड-मधील जीं कुलें ( clans ) आहेत त्यांनीं देखील परकीय लोकांस आपलें नेतृत्त्व दिलें होतें. केल्टिक लोकांनीं देखील परक्या जातीच्या लोकांना आपले पुढारी केलें आणि पुढे ते ते पुढारी अनुयायी जनतेंत मिसळले तशीच क्रिया आली असावी असें स्पष्टीकरण रासमालाकार करीत आहेत ( २. ९४ )

कोळयांत रजपुतांचीं आड नांवें.

रासमालाकारांचें स्पष्टीकरण अशक्य नाहीं, तथापि दुसरें एक स्पष्टीकरण अधिक शक्य वाटतें. सामान्य जनतेंत लग्न आणि स्त्रीपुरुषांनीं एकत्र राहणें यांत फारसा भेद करीत नाहींत. असें पुष्कळदां होतें कीं वरच्या किंवा अधिक प्रति-ष्ठित जातींतला पुरुष व दुसऱ्या एका जातीची बाई एकत्र राहूं लागलीं, तेव्हां मुलांची जात आईच्या जातीवरून ठरते. पण मुलें आडनांव मात्र बापाचें घेऊं लागतात. कट्टू मराठ्यांत ब्राह्मणांचीं त्याचप्रमाणें प्रभूंचीं आडनांवें याचप्रमाणें समाविष्ट झालीं आहेत. महारांत मराठ्यांचीं 'कांहीं' आडनांवें त्याच रीतीनें शिरलीं असतील, आणि दुबळा कुणबी जातींत 'दावर' वगैरे पारशांचीं आडनांवें शिरलीं आहेत, त्याच प्रकारानें कोळी, ठाकर्डा वगैरे अनेक जातींत रजपुतांचीं कांहीं नांवें शिरलीं असावींत. "कांहीं" शब्दांवर जोर देण्याचें कारण असें कीं मूळ कोळ्यांचींच आडनांवें पुढें रजपुतांत गेलीं असतील. रजपुतांची जातच भिन्नजातीय राजकुलें मिळून बनली आहे.

गुजराथेंतील कोळीवर्ग इकडच्या कोळीवर्गापेक्षां अधिक सुसंस्कृत दिसतो आणि तेथील स्त्रियांत इकडच्या कोळ्यांपेक्षां अधिक सौंदर्य दिसून येतें. याचें कारण कांहीं अंशीं गुजराती कोळ्यांत झालेलें रजपुतांचें मिश्रण असेल किंवा सांपत्तिक सुस्थितीसारखीं दुसरीं कांहीं कारणें असतील.

कोळ्यांचा विस्तार चोहोंकडे झाला. महाराष्ट्र आणि कोंकण हे परिभ्रमणाच्या क्रियेंतील पायरी दाखविणारे देश असा-वेत. महाराष्ट्रांत कोळी म्हणविणारांची वस्ती बुद्धपूर्वकालीं तर काय पण कुरुयुद्धकालीं असणें अशक्य नाहीं, असें वाट-ण्यास अनेक गोष्टी कारणीभूत होतात.

### ३९०. कोळी लोकांचें कन्नडीभवन.

३९०. कोळी लोक जिकडे गेले तिकडची भाषा व देवता घेते झाले. त्यांना नांवें देखील स्थानपरत्त्वें भिन्न पडलीं. कर्नाटकांत त्यांची घरची भाषा कानडी झाली आहे, आणि जिकडे जे धंदे करतात त्याप्रमाणें त्यांना नांवें मिळत आहेत.*

१ कब्बेर, कबुलगेर = मासे पकडणारे.
२ चुनारी = चुना भाजणारे.
३. जलगर अगर झारेकरी = धूळ काढणारे.
४. अंभिगेर = होडीवाले.
५. बुदबुदकी नांवाचा एक वर्ग कोळी लोकांत आहे तो पक्ष्यांची भाषा जाणतो. ( बेळगांव ग्यॅ पृ. १५७ )

त्यांच्या जातींच्या नांवाचे दर्शक शब्द कानडी झाले आहेत. एवढेंच नव्हे तर त्यांचीं कुलनामें देखील कानडी स्वरूपाचीं झालीं आहेत. त्यांचीं मुख्य कुलनामें अडकी, बग्गा, बिलेछत्रगी, घंटी, होन्नामुटा, बिले छत्रंगी, कोरी अशीं आहेत. हीं कुलें गोत्रस्वरूपी झालीं आहेत.

कर्नाटकांत भोई देखील आपलें अस्तित्त्व स्वतंत्रपणें राखून आहेत. तेथील भोई लोकांत तीन भेद आहेत, ते म्हटले म्हणजे

करभोई.
मासंडे भोई = मासे मारणारे.
परतगी भोई = चुना करणारे.

मराठी अगर कोळी भोई, हे पालखीवाले आहेत.

त्याशिवाय महार भोई व मुसलमान भोई आहेतच.

विजापूर जिल्ह्यांत पालखीवाल्या भोयांची वसती आहे कोळ्यांची नाहीं; तथापि कबुलगेर या नांवाचे लोक आहेत ते मराठी कोळ्यांशीं सदृश आहेत.

कोळी जातीचीं भिन्न रूपें कशीं झालीं यावर विवेचन इतर जातींच्या स्वरूपांतराचें स्पष्टीकरण करतांना केलें जाईल.

---

* बेळगांव ग्याझेटीअर. पृ. १५५, १५७.

प्रकरण ४३ वें.

# महाराष्ट्र आणि मौर्यसत्ता.

## ३९१. सांस्कृतिक इतिहासलेखनास अडचणी

३९१. कुरुयुद्धाच्या कालापासून बुद्ध कालापर्यंत आज जी थोडी माहिती आहे तिचा बराच भाग आतांपर्यंत आलाच आहे. राजकीय इतिहासाच्या बाबतींत राजावलींच्या पलीकडे फारशी माहिती नाहीं. सामाजिक माहिती जी वररुचीच्या पृथक्करणानें विशेष मिळणार आहे ती दक्षिणेसंबंधानेंच मिळेल असें धरल्यास वावगें होणार नाहीं. पौराणिक माहिती जुळवाजुळव केली असतां हें स्पष्ट दिसत आहे कीं कांहीं राज्यें कांहीं काळांत प्राधान्य पावत होतीं आणि वाङ्मयावर थोडासा परिणाम करीत होतीं.

सांस्कृतिक इतिहासाच्या बाबतींत मात्र गोष्ट निराळी आहे. त्या इतिहासाचें सातत्य चांगलेंच सांगतां येतें. कारण वेदांच्या अनेक शाखा तयार होणें, प्रत्येक शाखेचे सूत्रग्रंथ तयार होणें, या क्रिया प्रस्तुत दीर्घकाळांत ब्राह्मणवर्गांत चालू होत्या. याचा खरा अर्थ असा आहे कीं अनेक लोकांच्या संस्कृतींचें एकीकरण होऊन एक संस्कृति स्थापन होत होती. शिवाय ब्राह्मणाचें परिभ्रमण चोहोंकडे होत होतें; निरनिराळ्या सूत्रग्रंथांत दिसणारे फरक आणि निरनिराळ्या ठिकाणीं पसरलेल्या ब्राह्मणांचीं गोत्रें, प्रवर आणि वेदशाखा हीं सर्व हें त्या दीर्घकालाचें महत्त्वाचें साहित्य होय. आज हिंदुस्थानच्या प्रत्येक भागांतील ब्राह्मणजातीचें अवलोकन करून व त्या जातींत प्रचलित असलेलीं गोत्रें, प्रवर आणि वेदाध्याय म्हणजे वेदशाखा व सूत्रें हीं गोळा करून ब्राह्मणांच्या सूत्रकालीन चळवळींचा इतिहास तयार करण्याचें काम करतां येण्याजोगें आहे. या इतिहासाचें अंशतः रूप प्रस्तुत ग्रंथांत दृष्ट झालेंच आहे, पण त्यासाठीं नवीन साहित्य गोळा करण्याचा परिश्रम झाला पाहिजे. हा प्रयत्न केव्हां होईल तो होवो. हा इतिहास विस्तृत स्वरूपांत तयार करणें शक्य आहे, एवढंच सांगून त्याच्या पुढील कालाकडे वळलें पाहिजे.

हिंदुस्थानच्या इतिहासांत जे सांस्कृतिक दृष्टीनें कालखंड पडतात, ते महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें देखील महत्त्वाचे आहेत. महाराष्ट्राच्या इतिहासांत वैदिक आणि पौराणिक काल येतो. बौद्ध संप्रदायाचें महत्त्व जसें उत्तरहिंदुस्थानच्या इतिहासास आहे, तसेंच तें दक्षिणच्या इतिहासास देखील आहे. महाराष्ट्राचा ब्राम्ही लिखाणांचा काळ हाच बौद्ध संप्रदायाचा काळ येतो. उत्तरेस व दक्षिणेस लेखरूपी इतिहाससाहित्याचा काल एकाच प्रसंगीं आणि एकाच म्हणजे अशोकशासनप्रसिद्धीच्या निमित्तानें सुरू होतो.

महाराष्ट्रांतील बौद्ध आणि जैन संप्रदायांचा इतिहास स्वतंत्रपणें विवेचन करण्याइतका विस्तृत आणि महत्त्वाचा आहे. राजकीय आणि ब्राह्मणी इतिहासाचें कांहीं विवेचन झाल्यानंतरच बौद्ध चळवळीकडे लक्ष देणें सयुक्तिक होतें.

मौर्यकालापासून नवीन पुरावा उपलब्ध होतो. या काळापासून चालुक्यांच्या काळापर्यंतचें जें आपल्यापुढें इतिहाससाहित्य आहे त्याचें वर्गीकरण भारतीय आणि बाह्य असें करतां येईल; आणि भारतीय साहित्याचें लौकिक आणि धार्मिक असें वर्गीकरण करतां येईल. धार्मिक साहित्याचें पुन्हां ब्राह्मणी, बौद्ध व जैन असें वर्गीकरण करतां येईल. ब्राह्मणी वाङ्मयाचें पुन्हां श्रौत, स्मार्त, पौराणिक आणि शास्त्रीय असें आणखी वर्गीकरण करतां येईल. या कालाला याप्रकारें विविध साहित्य आहे. साहित्य विविध असलें आणि तें अचर्वित स्थितींत असलें म्हणजे साहित्यानुसार विषयविवेचन करणें प्राप्त होतें. साहित्यापासून इष्ट विषयाची माहिती काढण्याची क्रिया करण्यास आपण लागलों, आणि वाचकांस विश्वासांत घ्यावयाचें व त्याला इतिहाससंशोधनविषयक पद्धति पूर्णपणें दाखवावयाची व आपल्या क्रिया सर्व पाहूं द्यावयाच्या म्हटल्या म्हणजे विषयाची संगति थोडीशी तरी तुटते आणि इतिहासाला केवळ कथाकथनाचें स्वरूप रहात नाहीं.

## ३९२. अर्वाचीन इतिहास आणि त्याचे दोन भाग.

३९२. जुने ग्रंथकार कुरुयुद्धपूर्व इतिहास तो प्राचीन आणि नंतरचा तो अर्वाचीन असे विभाग करीत. या अर्वाचीन इतिहासांत देखील पौराणिक आणि ऐतिहासिक असे भाग पाडण्यास हरकत नाहीं.

पुराणग्रंथांतून पौरव, ऐक्ष्वाकु, बार्हद्रथ, प्रद्योत, शैशुनाग, नंद, मौर्य, शुंग, काण्वायन, आंध्र इत्यादि कलियुगांतील राजघराणीं वर्णिलीं आहेत. ह्यांतील आंध्र हेंच दक्षिणेकडील शातवाहन घराणें होय. उत्तर हिंदुस्थानाच्या

ऐतिहासिक कालाप्रमाणें महाराष्ट्राच्या ऐतिहासिक कालाला व त्याच्या इतिहासाला देखील मौर्यराजापासून सुरवात करावयास हरकत नाहीं. मौर्यराजांचा अंमल सोपाऱ्याला होता हें सोपाऱ्यास सांपडलेल्या अशोकलेखावरून स्पष्ट आहे. मुंबई शेजारची घारापुरी ही देखील मौर्यांच्या ताब्यांत होती असा समज कांहीं अभ्यासकांचा झाला आहे. महाराष्ट्राच्या मुख्य भागांत मौर्यांचें लिखाण कोठें सांपडलें नाहीं. आणि अपरांतांत म्हणजे सोपाऱ्यास सांपडलें तें अगदीं अपूर्ण आहे आणि सांपडलेल्या तुकड्यावरून आपणांस अशोकानें महाराष्ट्रांत आदेशविषयक काय फरक केले हें सांगतां येत नाहीं. महाराष्ट्रांतील अशोक-लेख सांपडत नसले तरी महाराष्ट्रविषयक माहिती इतर ठिकाणच्या अशोक-लेखांत नाहीं असें नाहीं.

### ३९३. महाराष्ट्र, मौर्यसत्ता, आणि अशोक-लेख.

३९३. मौर्यांचा महाराष्ट्राच्या इतिहासांतील आद्यकाल आणि शातवाहनांचा प्रारंभकाळ हे एकच आहेत. केवळ महाराष्ट्राकडे पाहिल्यास या कालांत मौर्यांचें बल कमी दिसतें व शातवाहनांचें पुष्कळ आणि वाढत चाललेलें दिसतें. शातवाहनकाळाच्या आरंभींच्या इतिहासास मौर्यलेख उपयोगी पडतात. महाराष्ट्रांत शातवाहनकालीन लेख अनेक आहेत. त्यांत अशोकशासनांस प्राधान्य येतें. त्या शासनावरून मौर्यांविषयीं आणि एकंदर देशस्थितीविषयीं जी माहिती निघते ती देण्यासाठीं मूळ लेखाचेंच अवतरण व स्पष्टीकरण केलें पाहिजे. महाराष्ट्राच्या जवळच्या गिरनार लेखाचेंच अवतरण येथें भाषांतरासह करतों. जेथें गिरनार लेखांतील शब्द पुसटले गेले आहेत तेथें इतर लेखांतील शब्द कंसांत दाखविले आहेत.

### ३९४. गिरनार शिलाशासनें.

शासन १ लें

(क) **इयं धंमलिपी देवानंप्रियेन प्रियदसिना राञा (+) लेखापिता**

(क) ही धर्मलिपी देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा यानें लिहविली आहे.

(ख) **इध न किंचि जीवं आरभित्पा प्रजूहितव्यं**

(ख) येथें कोणत्याहि जीवाचा (वध अगर) यज्ञ होऊं नये.

(ग) **न च समाजो कतव्यो**

(ग) मेळे भरवूं नयेत.

(घ) **बहुकं हि दोसं समाजम्हि पसति देवानंप्रियो प्रियदसि राजा**

(घ) कारण मेळ्यामध्यें देवप्रिय राजा प्रियदर्शीस पुष्कळच दोष दिसतात.

(ङ) **अस्ति पि तु एकचा समाजा साधुमता देवानंप्रियस प्रियदसिनो राञो**

(ङ) तथापि देवप्रिय राजा प्रियदर्शी यास कांहीं मेळे (समाज) चांगलेहि दिसतात.

(च) **पुरा महानसम्हि देवानंप्रियस प्रियदसिनो राञो अनुदिवसं बहूनि प्राणसतसहस्रानि आरभिसु सूपाथाय**

(च) पूर्वी देवप्रिय राजा प्रियदर्शी याच्या पाकशाळेंत पुष्कळ शेंकडों हजारों प्राण पाकासाठीं मारले जात.

(छ) **से अज यदा अयं धंमलिपी लिखिता ती एव प्राणा आरभरे सुपाथाय द्वो मोरा एको मगो सो पि मगो न ध्रुवो**

(छ) पण आतां ही धर्मलिपी लिहिली जात असतां तीनच प्राणी पाकासाठीं मारले जातात. दोन मोर, एक मृग आणि तो मृगदेखील नेहमीं मारला जात नाहीं.

(ज) **एते पि त्री प्राणा पछा न आरभिसरे**

[ज] पुढें हे तिन्ही प्राणी मारले जाणार नाहींत.

शासन २ रें

(क) **सर्वत विजितम्हि देवानंप्रियस पियदसिनो राञो एवमपि प्रचंतेसु यथा चोडा पाडा सतियपुतो केतलपुतो आ तंबपंणी अंतियको योनराजा ये वा पि तस अंतियकस**

(क) राजा देवप्रिय प्रियदर्शी याच्या राज्यांत सर्वत्र त्याचप्रमाणें सीमेवरील, उदाहरणार्थ, चोड, पांड्य, सतीयपुत्र, केतलपुत्र, किंबहुना ताम्रपर्णी यवनराजा अंतियक आणि जे राजे या अंतियकाचे शेजारी आहेत त्यांच्या राज्यांत राजा

---

+ मूळांत उलट्या "त" सारखें जें अक्षर आलें आहे त्याचें मातृकांतर "ञ" असें प्राचीन लिपिवेत्ते करीत आहेत. माझ्या मतें "ञ" च्या ऐवजीं "ज्ञ" असें मातृकांतर केलें तर तें अधिक सयुक्तिक होईल; म्हणून अनेक ठिकाणीं अवतरण करतांना 'ज्ञ' वापरला आहे.

**सामीपं राजानो सर्वत्र देवानंप्रियस प्रियदसिनो राञो द्वे चिकीछ कता मनुसचिकीछा च पसुचिकीछा च**

**( ख ) ओसुढानि च यानि मनुसोपगानि च पसोपगानि च यत यत नास्ति सर्वत्रा हारापितानि च रोपापितानि च**

**( ग ) मूलानि च फलानि च यत यत्र नास्ति सर्वत हारापितानि च रोपापितानि च**

**( घ ) पंथेसू कूपा च खानापिता व्रछा च रोपापिता परिभोगाय पसुमनुसानं**

शासन ३ रें

**( क ) देवानं पियो पियदसि राजा एवं आह**

**( ख ) द्वादस वासाभिसितेन मया इदं आञपितं**

**( ग ) सर्वत विजिते मम युता च राजूके च प्रादेसिके च पंचसु पंचसु वासेसु अनुसंयानं नियातु एतायेव अथाय इमाय धंमानुसस्टिय यथा अञाय पि कंमाय**

**( घ ) साधु मातरि च पितरि च सुस्रूसा मित्रसंस्तुतञातीनं बाम्हणसमणानं साधु दानं प्राणानं साधु अनारंभो अपव्ययता अपभाडता साधु**

**( च ) परिसा पि युते आञपयिसति गणनायं हेतुतो च व्यंजनतो च.**

शासन ४ थें

**( क ) अतिकातं अंतरं बहूनि वाससतानि वढितो एव प्राणारंभो विहिंसा च भूतानं ञातिसु असंप्रतिपती ब्राह्मणस्रमणानं असंप्रतीपती**

**( ख ) त अज देवानंप्रियस प्रियदसिनो राञो धंमचरणेन भेरीघोसो अहो धंमघोसो विमानदर्सणा चं हस्तिदसणा च अगिखंधानि च अञानि च दिव्यानि रूपानि दसयित्पा जनं**

**( ग ) यारिसे बहूहि वाससतेहि न भूतपुवे तारिसे अज वढिते देवानंप्रियस प्रियदसिनो राञो धंमानुसस्टिया अनारंभो प्राणानं अविहीसा भूतानं ञातीनं संपटिपती ब्रम्हणस्रमणानं संपटिपती मातरि पितरि सुस्रुसा थैरसुस्रुसा**

देवप्रिय प्रियदर्शी यानें दोन प्रकारचीं चिकित्सागृहें स्थापिलीं आहेत. एक मनुष्यचिकित्से ( औषधियोजने ) साठीं व दुसरें पशुचिकित्सेसाठीं:

( ख ) जेथें जेथें मनुष्योपयोगी किंवा पशूंच्या उपयोगी वनस्पति नसतील तेथें त्या आणविल्या आहेत आणि लावल्या आहेत.

( ग ) जेव्हां कंदमुळें व फळें नव्हतीं तेव्हां तीं आणविलीं आहेत व लाविलीं आहेत.

( घ ) रस्त्यांवर गुरांसाठीं व माणसांसाठीं विहिरी खोदविल्या आहेत.

( क ) राजा देवप्रिय प्रियदर्शी सांगतो कीं,

( ख ) अभिषेकानंतर बारा वर्षें झालीं तेव्हां मी आज्ञापिलें कीं,

( ग ) माझ्या राज्यांत चोहोंकडे युक्त राजुक आणि प्रादेशिक यांनीं ( आपापल्या प्रदेशांत ) दर पांच वर्षांनीं मुद्दाम खालील धर्मानुशासनासाठीं व इतर कामाकरतां पूर्ण प्रवास करावा.

( घ ) आई आणि बाप यांची शुश्रूषा पुण्यकारक आहे. मित्र, परिचित, आप्त, ब्राह्मण व श्रमण यांस औदार्य दाखविणें पुण्यकारक आहे. वधापासून निवृत्ति पुण्यकारक आहे. व्यय आणि संचय यांच्या बाबतींत परिमितता साधु आहे.

( च ) परिषद देखील युक्तांना हे नियम सकारण आणि अक्षरशः नोंदण्यास आज्ञापील.

( क ) कालांतर झालें. शेंकडों वर्षेंपर्यंत प्राणी मारणें आणि जिवंत प्राण्यांना इजा करणें यास उत्तेजन दिलें जात असे, आणि ज्ञातीस आणि ब्राह्मणांस व श्रमणास देखील अनादर होई.

( ख ) पण आतां देवप्रिय राजा प्रियदर्शी याचा धर्माचरणामुळें धर्मघोष हाच भेरीघोष झाला आहे. लोकांना विमानदर्शन, हस्तिदर्शन, अग्निलोळ आणि दिव्य रूपें यांचें दर्शन घडविलें जात आहे.

( ग ) जें पूर्वी शेंकडों वर्षें नव्हतें तें आतां देवप्रिय प्रियदर्शी राजाच्या धर्मासक्तीमुळें वाढविलें जात आहे. ( तें म्हटलें म्हणजे ) प्राणिहिंसेपासून परावृत्ति, जिवंत प्राण्यांना इजा करण्यापासून निवृत्ति आणि ज्ञाति, ब्राह्मण आणि श्रमण यांशीं सभ्यतापूर्वक वागणूक, मातापितरें आणि वृद्ध यांची शुश्रूषा.

| | |
|---|---|
| (घ) **एस अञे च बहुविधे धंमचरणे वढिते** | (घ) या आणि इतर अनेक बाबतींत धर्माचरण वाढत आहे. |
| (च) **वढयिसति चेव देवानंप्रियो प्रियदसि राजा धंमचरणं इदं** | (च) देवप्रिय प्रियदर्शी राजा हें धर्माचरण वाढवीत आहे. |
| (छ) **पुत्रा च पोत्रा च प्रपोत्रा च देवानंप्रियस प्रियदसिनो राञो प्रवधयिसंति इदं धंमचरणं आव सवटकपा धंमम्हि सीलम्हि तिस्टंतो धंमं अनुसासिसंति** | (छ) आणि देवप्रिय प्रियदर्शी राजाचे पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र हें धर्माचरण वाढवीत जातील आणि लोकांना धर्माप्रमाणें अनुशासन करून धर्म व शील शिकवितील. |
| (ज) **एस हि सेस्टे कंमे य धंमानुसासनं** | (ज) कारण धर्मानुशासन हें श्रेष्ठ कर्म आहे. |
| (झ) **धंमचरणे पि न भवति असीलस** | (झ) जो स्वतः शीलहीन आहे त्याच्याकडून धर्माचरण घडत नाहीं. |
| (ट) **त इमम्हि अथम्हि वधी च अहीनी च साधु** | (ट) यासाठीं धर्मवृत्ति वाढविणें, कमी न करणें, श्रेयस्कर होय. |
| (ठ) **एताय अथाय इदं लेखापितं इमस अथस वधि युजंतु हीनि च मा लोचेतव्या** | (ठ) या हेतुस्तव हें लिहिलें गेलें. वृद्धि व्हावी हीनत्व आणि दुर्लक्षीकृत न व्हावें म्हणून. |
| (ड) **द्वादस वासाभिसितेन देवानंप्रियेन प्रियदसिना राञा इदं लेखापितं** | (ड) हें देवप्रिय प्रियदर्शी राजाच्या बाराव्या वर्षी लिहिलें गेलें. |

## शासन ५ वें

| | |
|---|---|
| (क) **देवानंप्रियो पियदसि राजा एवं आह** | (क) राजा देवप्रिय प्रियदर्शी सांगतों कीं, |
| (ख) **कलाणं दुकरं** | (ख) सत्कर्म दुष्कर आहे. |
| (ग) **यो आदिकरो कलाणस सो दुकरं करोति** | (ग) जो सत्कर्म करीत राहतो तो कांहींतरी दुष्प्राप्य साध्य करतो. |
| (घ) **त मया बहु कलाणं कतं** | (घ) मी पुष्कळ सत्कर्म केलें. |
| (ङ) **त मम पुता च पोता परं च तेन य मे अपचं आव संवटकपा अनुवतिसरे तथा सो सुकतं कासति** | (ङ) म्हणून माझे पुत्र व पौत्र व माझ्यामागून जगाच्या अंतापर्यंत जे वंशज हें कर्तव्य करीत राहतील ते सत्कर्म करतील. |
| (च) **यो तु एत देसं पि हापेसति सो दुकतं कासति** | (च) परंतु जो अंशतः जरी कर्तव्य करण्यास चुकेल तो दुष्कर्म करील. |
| (छ) **सुकरं हि पापं** | (छ) कारण पाप हें सहज घडतें. |
| (ज) **अतिकातं अंतरं न भूतप्रुवं धंममहामाता नाम** | (ज) प्राचीनकाळीं धर्ममहामाता नांवाचे अधिकारी नव्हते. |
| (झ) **त मया त्रैदसवासाभिसितेन धंममहामाता कता** | (झ) परंतु राज्याभिषेक झाल्याच्या तेराव्या वर्षी मी धर्ममहामाता अधिकारी नेमिले. |
| (ञ) **ते सवपासंडेसु व्यापता धामधिस्टानाय .... धंमयुतस च योणकंबोजगंधारानं रिस्टिकपेतेणिकानं ये वा पि अंञे आपराता** | (ञ) हे सर्व भिन्नमतवादीमध्यें धर्मप्रसार करण्याकरतां गुंतले आहेत [आणि धर्मवृद्धीसाठीं आणि हितसुखासाठीं]* |

* चौकटी कंसांत घातलेले शब्द गळालेल्या शब्दांचें भाषांतर आहे. हे गळालेले शब्द काळसी धौलिजौगड शहाबाझ गढी यांशीं तुलना करून कल्पितां येतात. यूरोपीयन अभ्यासक व रा. ओझा यांनीं असे बसविले आहेत. त्यांचा परिश्रम येथें उपयोगिला आहे.

धर्मयुक्ताच्या शिवाय यवन, कांबोज, गांधार यांच्या आणि राष्ट्रिक आणि पैठणकांच्या; याशिवाय जे अपरांतनिवासीच्या ( म्हणजे कोकणस्थांच्या )

( ट ) भतमयेसु व ...... सुखाय धंमयुतानं अपरिगोधाय व्यापता ते

( ट ) भृत्यवर्गामध्यें [ ब्राह्मणवर्गामध्यें, अनाथामध्यें वृद्धामध्यें, हित ] सुखासाठीं तसेंच धर्मयुक्तांना त्रास होऊं नये म्हणून व्याप्त आहेत;

( ठ ) बधनबधस पटिविधानाय ...... प्रजा कताभीकारेसु वा थैरेसु वा व्यापता ते

( ठ ) बंधन आणि वध याच्या विरुद्ध विधानासाठीं [ आणि त्यांस अप्रतिबद्ध मुक्ति व्हावी म्हणून आणि अनुबंधिलें कीं ] प्रजा वृद्धवर्गाशीं वागेल त्याप्रमाणें अधिकारी-वर्गाशीं वागावी ( म्हणून ).

( ड ) पाटलिपुते च बाहिरेसु च ...... ये वा पि मे अञे आतिका सर्वत व्यापता ते

( ड ) पाटलीपुत्रांत आणि बाहेरच्या सर्व नगरांतहि [ अंतःपुरांत व सर्व भ्रातृवर्गाचे आणि माझ्या भगिनींचे ] त्याप्रमाणें इतर सर्व ज्ञातींत सर्वत्र योजिले आहेत.

( ढ ) यो अयं धंमनिस्रितो ति व......ते धंम-महामाता

( ढ ) हे असे धर्माधिकृत [ सर्वत्र माझे धर्मयुक्त पसरले आहेत. ] हे धर्ममहामात्र ( आहेत. )

( ण ) एताय अथाय अयं धंमलिपी लिखिता

( ण ) या हेतूनें ही धर्मलिपि लिहिली गेली आहे.

शासन ६ वें

( क ) देवानंप्रि...सि राजा एवं आह

( क ) राजा देवप्रि [ य प्रियद ] शी सांगतो कीं,

( ख ) अतिक्रातं अंतरं न भूतप्रुव सव...ल अथकंमे व पटिवेदना वा

( ख ) प्राचीनकाळीं कार्य–योजना व प्रतिकथन ( प्रजेतर्फे ) ह्यांची कांहींहि व्यवस्था नव्हती.

( ग ) त मया एवं कतं

( ग ) ती मी अशाप्रकारें केली आहे.

( घ ) सवे काले भुंजमानस मे ओरोधनम्हि गभागारम्हि वचम्हि व विनीतम्हि च उयानेसु च सवत्र पटिवेदका स्टिता अथे मे जनस-पटिवेदेथ इति

( घ ) सर्व ठिकाणीं मला कोणत्याहि वेळीं मी जेवतांना, अंतःगृहांत, जनानखान्यांत, पालखींत व राजवाड्यामध्यें कोठेंहि असतांना मला लोकांच्या कार्याची बातमी देण्याकरतां प्रतिवेदक ठेविले आहेत.

( ङ ) सर्वत्र च जनस अथे करोमि

( ङ ) आणि प्रत्येक ठिकाणीं मी लोककार्यें करीत आहें.

( च ) य च किंचि मुखतो आञपयामि स्वयं दापकं वा स्नावापकं वा य वा पुन महामात्रेसु आचायिके आरोपितं भवति ताय अथाय विवादो निझती व संतो परिसायं आनंतरं पटिवेदेतव्यं मे सर्वत्र सर्वे काले

( च ) आणि मी जी तोंडी आज्ञा करतों किंवा स्वतः दान देतों ती संबंधीं जर धर्ममहामात्रांच्या सभेमध्यें वाद उत्पन्न झाला किंवा धर्ममहामात्रांच्या आज्ञेंत असलेल्या कोणत्याहि महत्त्वाच्या कार्यासंबंधीं ठराव केला तर तो मला तत्क्षणींच व कोणत्याहि स्थलीं विदित झाला पाहिजे.

( छ ) एवं मया आञपितं

( छ ) अशी मी आज्ञा केली आहे.

( ज ) नास्ति हि मे तोसो उस्टानम्हि अथ-संतीरणाय व

( ज ) कारण स्वतःच उद्योग तरून कार्यांची विल्हेवाट लावणें ह्यांत मला पुरेसें होत नाहीं.

( झ ) कतव्य मते हि मे सर्वलोकहितं

( झ ) कारण सर्व लोकांचाच उत्कर्ष साधणें हें मी आपलें कर्तव्य समजतों.

( ञ ) तस च पुन एस मूले उस्टानं च अथ-संतीरणा च

( ञ ) परंतु त्याचेंहि मूल उद्योग व कार्य करणें हेंच आहे.

( ट ) नास्ति हि कंमतरं सर्वलोकहितत्पा

( ट ) कारण सर्व लोकांचें कल्याण करण्यापेक्षां दुसरें कोणतेंहि महत्त्वाचें कर्तव्य नाहीं.

(ठ) य च किंचि पराक्रमामि अहं किंति भूतानं आनंणं गछेयं इध च नानि सुखापयामि परत्रा च स्वगं आराधयंतु त

(ठ) आणि मी जें कार्य करीत आहे तें स्वतः मी प्राणिमात्रांच्या ऋणांतून मुक्त व्हावें व त्यांना ह्या लोकीं सुखी करून, परलोकीं स्वर्गप्राप्ति करून द्यावी एवढ्याकरतांच करीत आहें.

(ड) एताय अथाय अयं धंमलिपी लेखापिता किंति चिरं तिस्टेय इति तथा च मे पुत्रा पोता च प्रपोत्रा च अनुवतरं सवलोकहिताय.

(ड) ही धर्मलिपि चिरकाल टिकावी व माझ्या पुत्रांनीं, पौत्रांनीं व प्रपौत्रांनीं ती वाचून आचरावी व प्राणिमात्राच्या कल्याणाकरतां झटावें म्हणून लिहिली आहे.

(ढ) दुकरं तु इदं अञत्र अगेन पराक्रमेन.

(ढ) परंतु कोणालाहि प्रथम पराक्रम असल्याशिवाय हें साध्य होणार नाहीं.

शासन ७ वें

(क) देवानं पियो पियदसि राजा सर्वत इछति सवे पासंडा वसेयु

(क) राजा देवप्रिय प्रियदर्शी अशी इच्छा करितो कीं सर्व मतांच्या लोकांनीं पाखंडांनीं सर्वत्र स्थळीं वसती करावी.

(ख) सवे ते सयमं च भावसुधिं च इछति

(ख) कारण सर्व (मतें) आत्मसंयमन व मानसिक पावित्र्य यांची इच्छा करतात.

(ग) जनो तु उचावचछंदो उचावचरागो

(ग) परंतु मनुष्यजातीला नानाप्रकारच्या इच्छा व भावना असतात.

(घ) ते सर्वं व कासंति एकदेसं व कासंति

(घ) ते पूर्णपणें सर्व इच्छा व भावना साध्य करतील किंवा त्यांतला कांहीं साध्य करतील.

(ङ) विपुले तु पि दाने यस नास्ति सयमे भावसुधिता व कतंञता व दढभतिता च निचा बाढं.

(ङ) परंतु ज्याला आत्मसंयमन, मानसिक पावित्र्य व पूर्ण भक्ति नाहीं आणि जरी तो असंख्य दानें करतो तरी नीच होय.

शासन ८ वें *

(क) अतिकांत अंतरं राजानो विहारयातां अयासु.

(क) फार प्राचीनकाळीं राजे विहार करण्यास जात असत.

(ख) एत मगव्या अञानि च एतारिसानि अभीरमकानि अहुंसु.

(ख) ह्यामध्यें मृगया व तशाच अनेक रमणीय गोष्टी अनुभवीत.

(ग) सो देवानंपियो पियदसि राजा दसवर्साभिसितो संतो अयाय संबोधि

(ग) परंतु देवप्रिय प्रियदर्शी राजा अभिषेकाच्या दहाव्या वर्षी संबोधिला गेला.

(घ) तेनेसा धंमयाता

(घ) म्हणून मृगयेच्या ऐवजीं धर्मनीतीच राजगमनाच्या वेळीं प्रचलित झाली.

(ङ) एतयं होति ब्राह्मणसमणानं दसणे च दाने च थैरानं दसणे च हिरंणपटिविधानो च जानपदस च जनस दस्पनं धंमानुसस्टी च धमपरिपुछ्छा च तदोपया

(ङ) ह्या राजगमनाच्या वेळीं, ब्राह्मण व श्रमण ह्यांच्या भेटी घेणें व त्यांना दान देणें, वृद्धांचें कुशल विचारून त्यांना द्रव्यांनीं मदत करणें, देशांतील निवासियांना भेटी देणें व त्यांना धर्मनीतीचीं तत्त्वें शिकविणें व समयाला अनुचित असे प्रश्न त्यांत विचारणें इत्यादि कामें केलीं जात.

(च) एसा भुय रति भवति देवानंपियस प्रियदसिनो राञो भागे अंञे.

(च) अशा रीतीनें राजा देवप्रिय प्रियदर्शी ह्याच्या राज्यकालाचा दुसरा भाग फारच (पारमार्थिक) सुखकर होतो.

---

* सोपारें येथील शिलालेखांपैकीं आठव्या लेखाचा तुकडा काय तो उपलब्ध आहे. तो येणेंप्रमाणें :—५ निखमिठ स...६ हेत इयं होति बंभ...७ वुढानं दसने च हिरंनपटिविधाने च....८ धंमानुसथि धंम ९....ये रती होति दे १० ने भागे अं.

शासन ९ वें

**(क) देवानं पियो प्रियदसि राजा एव आह**

(क) राजा देवप्रिय प्रियदर्शी सांगतो कीं,

**(ख) अस्ति जनो उचावचं मंगलं करोते आबाधेसु वा आवाहवीवाहेसु वा पुत्रलाभेसु वा प्रवासंम्हि वा एतम्हीं च अञम्हि च जनो उचावचं मंगल करोते**

(ख) मनुष्यें नानातऱ्हेचे धार्मिक व मंगल विधि आजारीपणांत पुत्र व कन्या ह्यांच्या लग्नप्रसंगीं, पुत्रलाभकालीं, प्रवासाच्या अगोदर वगैरे अनेक प्रसंगीं मनुष्यें अनेक तऱ्हेचे विधि करतात.

**(ग) एत तु महिडायो बहुकं च बहुविधं च छुदं च निरथं च मंगलं करोते**

(ग) परंतु अशा प्रसंगीं स्त्रिया निरर्थक व बाष्कळ विधि करीत असतात.

**(घ) त कतव्यमेव तु मंगलं**

(घ) आतां विधि हे आवश्यकच आहेत.

**(ङ) अपफलं तु खो एतरिसं मंगलं**

(ङ) परंतु अशा तऱ्हेचे विधि निष्फल होत.

**(च) अयं तु महाफले मंगले ये धंममंगले.**

(च) उलट खालीं दिलेले विधि—म्हणजे धर्ममंगलविधि विपुल फल देतात.

**(छ) ततेत दासभतकम्हि सम्यप्रतिपती गुरूनं अपचिति साधु पाणेसु सयमो साधु बम्हणसमणानं साधु दानं एत च अञ च एतारिसं धममंगलं नाम**

(छ) ते म्हणजे हे होत कीं दास्यांत पडलेल्याबद्दल, नोकरचाकराबद्दल योग्य सौजन्य, गुरुजनांबद्दल आदर हीं योग्य, प्राणिमात्राबद्दल संयम योग्य ब्राह्मणश्रमणांना दान हे आणि अनेक चांगले गुण इत्यादिकांना धर्ममंगल म्हणतात.

**(ज) त वतव्यं पिता व पुतेन वा भात्रा वा स्वामिकेन वा इदं साधु इदं कतव्य मंगलं आव तस अथस निस्टानाय**

(ज) म्हणून प्रत्येक पित्यानें, पुत्रानें, भावानें व स्वामी यानें असें म्हटलें पाहिजे कीं हें सत्कर्म आहे व आपलें इष्टकार्य सिद्ध होईपर्यंत हें सत्कर्म पाळलें पाहिजे.

**(झ) अस्ति च पि वुतं साधु दन इति**

(झ) आणि असें सांगितलेंच आहे कीं, दान हें सत्कर्म आहे.

**(ञ) न तु एतारिसं अस्ति दानं व अनगहो व यारिसं धंमदानं व धमनुगहो व**

(ञ) परंतु धर्मदानापेक्षां किंवा धर्मानुग्रहापेक्षां जगांत कोणतेंहि उच्च दान किंवा अनुग्रह नाहीं.

**(ट) त तु खो मित्रेन व सुहदयेन वा ञतिकेन व सहायन व ओवादितव्यं तम्हि तम्हि पकरणे इदं कचं इदं साध इति इमिना सकं स्वगं आराधेतु इति**

(ट) म्हणून मित्र किंवा हितचिंतक अगर आप्त किंवा सहगामी ह्यांनीं दुसऱ्याला वेळोवेळीं उपदेश करावा कीं, हें कर्तव्य आहे, हें सत्कर्म आहे, केवळ ह्यानेंच स्वर्गप्राप्ति होईल.

**(ठ) कि च इमिना कतव्यतरं यथा स्वगारधी**

(ठ) आणि स्वर्गप्राप्तीपेक्षां मनुष्याचें ईप्सित असें दुसरें काय आहे ?

शासन १० वें

**(क) देवानं पियो प्रियदसि राजा यसो व कीति व न महाथावहा मञते अञत तदात्पनो दिघाय च मे जनो धंमसुस्रुंसा सुस्रुसता धंमवुतं च अनुविधियतां**

(क) देवप्रिय राजा प्रियदर्शी वैभव किंवा कीर्ति यांपासून कांहींहि मोठें फल प्राप्त होतें असें मानत नाहीं. [परलोकीं जो यश आणि कीर्ति इच्छितो तो] आज धर्मनीतीप्रमाणें वागो किंवा धर्मनीति हेंच कर्तव्यकर्म असें समजून वागो.

**(ख) एतकाय देवानं पियो पियदसि राजा यसो व किंति व इछति**

(ख) आणि म्हणूनच राजा देवप्रिय प्रियदर्शी वैभव व कीर्ति यांची इच्छा करीत आहे.

**(ग) यं तु किंचि पारेकमते देवानं प्रियदसि राजा त सवं पारत्रिकाय किंति सकले अपपरिस्रवे अस**

(ग) परंतु राजा देवप्रिय प्रियदर्शी जे कांहीं प्रयत्न करतो ते स्वर्गाकरतां, पुण्यसंचय करण्याकरतां व मानवजातीला संकटमुक्त करण्याकरतां करीत आहे.

(घ) एस तु परिसवे य अपुंञं

(घ) परंतु पाप हेंच खरोखर संकट आहे.

(ङ) दुकरं तु खो एतं छुदकेन व जनेन उसटेन व अञत्र अगेन पराकमेन सवं परिचजितपा

(ङ) परंतु एखाद्या नीच किंवा उच्च यांपैकीं कोणाहि मनुष्याला उत्कट इच्छा असल्याखेरीज किंवा दुसरें ध्येय त्याज्य केल्याखेरीज हें साध्य होणें खरोखर कठीण आहे.

(च) एत तु खो उसटेन दुकरं

(च) परंतु नीच आणि उच्च ह्यांपैकीं उच्च मनुष्यालाच हें साध्य होणें खरोखर जास्त कठीण होय.

शासन ११ वें.

(क) देवानं प्रियो पियदसि राजा एवं आह

(क) राजा देवप्रिय प्रियदर्शी असें सांगतो कीं,

(ख) नास्ति एतारिसं दानं यारिसं धंमदानं धंमसंस्तवो वा धंमसंविभागो वा धंमसंबधो व

(ख) धर्मदान, धर्मानें परिचय, धर्मविभाग करणें, आणि धर्मसंबंध ह्यापेक्षां जगांत कोणतेंही दुसरें उच्च दान नाहीं.

(ग) तत इदं भवति दासभतकम्हि सम्यप्रतिपती मातरि पितरा साधु सुस्रूसा मितसस्तुतञातिकानं ब्राह्मणस्रमणानं साधु दानं प्राणानं अनारंभो साधु

(ग) ह्यांत खालीं दिलेल्यांचा समावेश होतो. दास्यांत पडलेल्यांस व चाकरांस सौजन्य, मातापितरांबद्दल दृढ भक्ति, मित्र, आप्तइष्ट, ज्ञाति, ब्राह्मण व श्रमण यांबद्दल औदार्य व प्राणिमात्राबद्दल अहिंसाबुद्धि.

(घ) एत वतव्यं पिता व पुत्रेन व भाता व मितसस्तुतञातिकेन व आव पटीवेसियेहि इद साधु इद कतव्यं

(घ) ह्यांस अनुसरून पिता, पुत्र, भ्राता, आप्तेष्ट व शेजारी यानें सुद्धां असें म्हटलें पाहिजे कीं, हें सत्कर्म आहे. हें कर्तव्य आहे.

(ङ) सो तथा करु इलोक च स आरधो होति परत अंनतं पुञं भवति तेन धंमदानेन

(ङ) जर ह्याप्रमाणें एखादा आचरण करील तर तो ऐहिक सुख खास मिळवील आणि धर्मदानानें परलोकांत अगाध असा पुण्यसंचय करून ठेवील.

शासन १२ वें.

(क) देवानंपिये पियदसि राजा सवपासंडानि च पवजितानि च घरस्तानि च पूजयति दानेन च विवाधाय च पूजाय पूजयति ने

(क) राजा देवप्रिय प्रियदर्शी सर्व संप्रदायांना मान देतो. संन्याशी आणि गृहस्थाश्रमी ह्या दोघांनाही मान देतो. तो राजा दान व नानातऱ्हेनें पूजा व सत्कार करून मान देतो.

(ख) न तु तथा दानं व पूजा व देवानंपियो मंञते यथा किति सारवढी अस सवपासंडानं

(ख) परंतु हा देवप्रिय राजा दान किंवा सत्कार ह्यांना सर्व संप्रदायांची सारवृद्धि (तत्त्वांची जोपासना) इतकें महत्त्व देत नाहीं.

(ग) सारवढी तु बहुविधा

(ग) परंतु सर्व संप्रदायांची सारवृद्धि पुष्कळ मार्गांनीं होऊं शकेल.

(घ) तस तु इदं मूलं य वचिगुती किंति आत्मपासंडपूजा व परपासंडगरहा व नो भवे अप्रकरणम्हि लहुका व अस तम्हि तम्हि प्रकरणे

(घ) परंतु त्याचें मूल म्हणजे आपल्या स्वतःच्या वाचेवर नियंत्रण (वचिगुंति) म्हणजे संप्रदायाची स्तुति न करणें, पर संप्रदायाची अवास्तव निंदा न करणें किंवा ती अप्रासंगिक तरी न करणें किंवा प्रसंगामुळें करावी लागल्यास थोडी करणें हें होय.

(ङ) पूजेतया तु एव परपासंडा तेन तन प्रकरणेन

(ङ) परंतु अन्य संप्रदायाचा सुद्धां वाजवी सत्कार केलाच पाहिजे.

(च) एवं करूं आतपपासंड च वढयति परपासंडस च उपकरोति

(च) जर एखादा ह्याप्रमाणें आचरण करील तर तो स्वपंथाची उन्नति करील व परपंथाला उपकृत करील.

**( छ ) तदंअथा करोतो आत्पपासंडं च छणति परपासंडस च पि अपकरोति**

( छ ) परंतु जर एखादा ह्याविरुद्ध वर्तन करील तर तो स्वपंथ नष्ट करून परपंथावर अपकार करील.

**( ज ) यो हि कोचि आत्पपासंडं पूजयति परपासंडं वा गरहति सवं आत्पपासंडभतिया किंति आत्पापसंडं दीपयेम इति सो च पुन तथ करातो आत्पपासंडं बाढतरं उपहनाति**

( ज ) जो कोणी आपल्या संप्रदायाची पूजा करतो आणि परसंप्रदायाची निंदा करतो तो हें सर्व आपल्या संप्रदायावरील भक्तीनें करतो आणि त्यास वाटतें कीं मी आपला संप्रदाय उद्दीपित केला; तो तर तसें करतांना आपल्या संप्रदायाचाच घात करतो.

**( झ ) त समवायो एव साधु किंति अञमंञस धंमं स्रुणारु च सुसुंसेर च**

( झ ) तर मग समवाय हीच चांगली गोष्ट आहे. [ कांकीं ] एकमेकांचे धर्म एकमेकांनीं ऐकावे व मानावेत.

**( ञ ) एवं हि देवानंपियस इछा किंति सवपासंडा बहुस्रुता च असु कलाणागमा च असु**

( ञ ) देवानांप्रियाची इच्छा अशी आहे कीं सर्वच संप्रदाय बहुश्रुत आणि कल्याणपर ( कलाणागम ) असोत.

**( ट ) ये च तत्र तत प्रसंना तेहि वतव्यं**

( ट ) जे तेथें ( आपल्या मतावर ) प्रसन्न आहेत त्यांना असें सांगावयाचें कीं,

**( ठ ) देवानंपियो नो तथा दानं व पूजां व मंञते यथा किंति सारवढी अस सर्वपासंडानं**

( ठ ) देवानांप्रिय जितका सर्व मतांच्या मूलभूत तत्त्वांच्या पुरस्कारास ( सारवृद्धीस ) मान देतो तितका दान किंवा पूजा यांस मान देत नाहीं.

**( ड ) बहका च एताय अथा व्यापता धंममहामाता च इथीझखमहामाता च वचभूमिका च अञे च निकाया ‡**

( ड ) या कामासाठीं पुष्कळच ( अधिकारी ) आहेत. धर्मासाठीं महामात्र, स्त्रियांवरील महामात्र, व्रजांचे तपासनीस व इतर अधिकारी ( निकाय ).

**( ढ ) अयं च एतस फल य आत्पपासंडवढी च होति धंमस च दीपना.**

( ढ ) आणि याचें फळ असें आहे कीं याच्यायोगानें स्वतःच्या संप्रदायांची वृद्धि होते आणि धर्माचें दीपन होतें.

शासन १३ वें

( क * ) [ अठवशाभिशितस देवानं प्रियस प्रियदसिने राञो ] **ञो कलिंगा** [ विजित ] **वज**

( क ) [ देवानांप्रिय प्रियदर्शी याच्या अभिषेकास आठ वर्षें झालीं असतां ] कलिंग. [ जिंकला गेला. ]

( ख ) [दियधमिते प्राणसतसहस्रे येतत अप वुध्रे] **वढे सतसहस्रमात्रं तत्रा हतं बहुतावतकं मत**

( ख ) लाखापर्यंत तेथें मारले गेले आणि कितीतरी पट मेले.

**( ग ) तता पछा अधुना लधेसु कलिंगेसु तीवो धंमवायो** [ धमकामता धंमानुसच देवानंप्रियस ]

( ग ) त्यानंतर आतां कलिंग लाभल्यावर तीव्र धर्मवाय ( धर्माभ्यास ) [ झाला आणि देवानांप्रियाच्या ठायीं धर्मकामता आणि धर्मानुवृत्ति स्थापित झाली ]

( घ ) [ सोअस्ति अनुसोचन ] **सयो देवानं प्रियस** [ विजिति ] **वज** [ कालिंगानि ]

( घ ) [ कलिंग जिंकल्यावर ] देवानांप्रियास ( पश्चात्ताप झाला. )

---

‡ ' काय ' म्हणजे कार्य किंवा कार्यालय. त्यांत नियुक्त तो निकाय. ' काय ' या प्राकृत शब्दापासूनच ' कायस्थ ' शब्दाची उत्पत्ति असावी, म्हणजे कायस्थ हें प्राकृत शब्दाचें संस्कृतीकरण असावें.

* तेरावे शासनांतील बरेच शब्द पुसटले आहेत त्यामुळें ते अदमासानें बसविले आहेत व चौकटी कंसांत दिले आहेत. कंसांतील अक्षरें दुसऱ्या प्रतीचें अवलोकन करून योजिलीं आहेत, व अर्थ सर्व शब्द आहेत असें धरून दिला आहे. वाटोळ्या कंसांतील अक्षरें गिरनार लेखांतील अपूर्ण शब्द आहेत. हें शासन कलिंग देशाच्या इतिहासांत अत्यंत महत्वाचें आहे.

( ङ ) [ अविंजितम हि विजिनमनो तता ] **वधो व मरणं व अपवाहो व जनस त बाढं वेदनमत च गुरुमत देवानंपि** [ य ] **स**

( च ) [ इदं पिचु ततो गुरुमततरं देवानां प्रियस ]

( छ ) [ येत-त्र वसति ] **ब्राह्मणा व स्रमणा व अञे** [ वा पासंडा गहथा वा येशु विहिता एश अग्रभूति सुश्रषा ] **सा मात्रि पित्ररि गुरुसुसुंसा मितसंस्ततसहायञातिकेसु दासभ** [ टकनं सम्माप्रतिपति दिढभर्तिता तेषां तत्र होति उपघातेवा वधे वा ] **अभिरतानं व विनिखमण**

( ज ) **येसं वाप** [ पि सुविहितनम सिन्मिहे अविपाहिने ए तानं मित्रसंस्तुत स ] **हायञातिका व्यसनं प्रापुणति तत सोपि तेस उपघातो हाति**

( झ ) **पटीभागो चेसा सव** [ मानुसानं गुरुमतं च देवानं प्रियस ]

( ञ ) [ नास्तिच से जनपदे यात्रा ना ] **स्ति इमे निकाया अञत्र योनेसु** [ ब्राह्मणे च समणे च नास्ति च कुवापि जनपद ] **म्हि यत्र नास्ति मानुसानं एकतरंम्हि पासंडम्हि न नाम प्रसादो**

( ट ) **यावतको जनो तदा** [ कलिंगेषु लधेषु हते च मते च अववुढे च ततो शतभगे वा सह ] **स्रभागो व गरुमतो देवानं** [ प्रियस ]

( ठ ) [ यो पिच अपकरेयति क्षमितवियमते व देवानं प्रियस ] **न य सक छमितवे**

( ड ) **या च पि अटवियो देवानंपियस पिजिते पाति** [ त पि अनुनेति ]

( ढ ) [ अनुनिजपेति अनुतपि पिच प्रभवे ] **चते तेसं देवानंपियस** [ किति अवत्रेपुय न च हनयेयसु ]

( ण ) [ इच्छतिहि देवानं प्रियो ] **सवभूतानां अछतिं सयमं च समचैरं च मादव च**

( त ) [ इयंच मुखमत विजये देवानं प्रियस्य यो धम्र विजयो ]

( थ ) [ सेच पुन ] **लधो** [देवा] **नंप्रियस इध सवेसु च** [ अतेशु अ शशु पि यो जनशतेषु यत्र अंतियोको नाम]

( ङ ) लोकांचा अपवाह ( हद्दपारी ) पुष्कळच झाला. हा देवानांप्रियास दुःखद झाला.

( च ) पण पुढील गोष्टींबद्दल देवानांप्रियास अधिकच दुःख होतें.

( छ ) जे तेथें रहात होते अशा ब्राह्मण आणि श्रमण व इतर [ शुश्रूषेस योग्य अशा संप्रदाय यांच्या ठायीं,........ शुश्रूषा. ] आईबाप यांच्या ठायीं शुश्रूषा, गुरुशुश्रूषा, मित्र, संस्तत आणि सहाय्य आणि ज्ञाति यांची आणि दास अथवा अभिरक्तांचे ( प्रेम करणारांचें ) निर्यातन.

( ज ) ज्ञाती [ मित्र, आप्त इ० मंडळी ] व्यसनांत सांपडली त्यांच्यायोगानें ( ज्यांची ज्ञाति ) त्यांना देखील दुःख होतें.

( झ ) हें सर्वांसच भोगावें लागतें. [ आणि देवप्रियास याबद्दल खेद होतो. ]

( ञ ) हे निकाय [ असा देश नाहीं कीं जेथें ब्राह्मण श्रमण हे वर्ग नाहींत. ] यवनांखेरीज इतरत्र तेथें माणसांत एकाहि मताला आसक्ति ( प्रसाद ) नाहीं.

( ट ) म्हणून जे मेले आणि जे हांकलून दिले गेले एक शतांश आणि एक सहस्रांश जनतेचा विभाग आणि देवानांप्रियास दुःख होत आहे.

( ठ ) आणि देवानांप्रियास असें वाटतें कीं ज्यानें त्याला दुःख दिलें आहे त्यासहि क्षमा व्हावी.

( ड ) देवानांप्रियाच्या राज्यांत जीं अरण्यें आहेत तेथील लोकांस देखील तो शांत करतो आणि वळवितो.

( ढ ) देवानांप्रियास जें सामर्थ्य आहे तें त्याला पश्चात्ताप झाला तरी कायम आहे. तें त्यांस शासन करण्याचें सामर्थ्य त्यांना कळविलें जातें. अशाकरतां कीं त्यांना आपल्या अपराधांबद्दल लाज वाटावी आणि त्यांस मृत्यु येऊं नये.

( ण ) कांकीं अपराध झाला असतांहि देवानांप्रिय सर्वाविषयीं अहिंसा, संयम आणि निःपक्षपातीपणा यांचा अवलंब करूं इच्छितो.

( त ) आणि हाच जय तो खरा जय आहे असें देवानांप्रिय मानतो.

( थ ) आणि हा जय देवानांप्रियानें वारंवार मिळविला आहे. हा शेजाऱ्यांवर मिळविला आहे आणि त्याचप्रमाणें जे

**योनराज परं च तेन चत्पारो राजानो तुरमायो च अंतेकिन च मगा च** [ अलिक्यसुंदरो नाम नीचं चोड-पंड्य अव तंबपननीय हेवमेव ]

सहा हजार योजनांवर रहातात–जेथें यवन राजा अंतियोक राज्य करीत आहे–जेथें अंतियोकापलीकडे चार राजे आहेत म्हणजे तुरमाय नांवाचा अंतिकिनि नांवाचा, मग नांवाचा आणि अलिकसुंदर नांवाचा आणि दक्षिणकडे चोड, पांड्य, ताम्रपणीपर्यंत.

( द ) [ हेवमेवा ] **इध राजविसयम्हि योनकंबो** [ जेषु नाभक नाभ पंतिशु भोजपितिनिक्येषु आं ] **ध्रपारिंदेसु सवत देवानंपियस धंमानुसस्टि अनुवतरे**

( द ) त्याचप्रमाणें या राजाच्या राज्यांत योनांमध्यें आणि कांबोजांमध्यें, नभकांमध्यें आणि नभितांमध्यें, भोजांमध्यें, आणि पितनिकांमध्यें, आंध्रांमध्यें आणि पलिदांमध्यें–सर्वत्र लोक देवानांप्रियाचें धर्मशिक्षण घेत आहेत.

( ध ) **यत पि दूति** [ देवानं प्रियस नो यांति तेपि श्रुतु देवानं प्रियस धमवुतं विधा ] **नं धमानुसस्टि च धमं अनुविधियरे** [ अनुविधियिसम च ]

( ध ) जेथें देवानांप्रियाचे दूत जात नाहींत तेथें देखील देवानांप्रियाचीं धर्मकर्तव्यें आणि शासनें ऐकून लोक धर्माचरण करीत आहेत.

( न ) [ यो सलधे एतकेन होति सवत ] **विजयो सवथा पुन विजयो पीतिरसो सा**

( न ) हा जय सर्वत्र मिळविला आहे. हा वारंवार मिळविला आहे आणि तो संतोषाची भावना उत्पन्न करीत आहे.

( प ) **लधा सा पीति होति धंम वीजयम्हि**

( प ) धर्माच्या योगानें जो विजय उत्पन्न होतो त्याच्यायोगानेंच मला समाधान उत्पन्न होतें.

( फ ) [ लहुका तु खो सा प्रिति ]

( फ ) पण या संतोषाचें महत्त्व देखील थोडेंच आहे

( ब ) [ पारत्रिकमेव महाफलमेनाति देवान ] **प्रियो**

( ब ) देवानांप्रियास वाटतें कीं परलोकीं प्राप्त होणारें फळ अधिक मोठें आहे.

( भ ) **एताय अथाय अयं धंम** [ लिपि लिखिता किति पुता पपोता मे असु वं ] **विजयं मा विजेतव्यं मंञा सरसके एव विजये छाति च** [ लहुदंडत च रोचेतु तम् चं यो विजनं मनतु ये धर्मविजये ]

( भ ) आणि ज्या हेतूनें पुढील धर्मलिपि लिहिली जात आहे, तो हा कीं माझे जे पुत्रपौत्र होतील त्यांनीं नवीन विजयांचा विचार करूं नये आणि जर विजयांची इच्छा झालीच तर दया आणि हलक्या शिक्षा त्यांनीं द्याव्या आणि धर्मविजय तोच खरा विजय समजावा.

( म ) [ सोहिदलो ] **किको च पारलोकिको**

(म) हाच विजय इहलोकीं आणि परलोकीं फलदायी होतो.

( य ) [ सवच क निराति होति य धंमराति ]

( य ) सर्व वासनांच्या त्यागामध्यें त्यांनीं आनंद मानावा आणि धर्माचरणांत आनंद मानावा.

( र ) [ सहि ] **इलोकिका च पारलोकिका च**
[ लेखाखालीं उजव्या बाजूस ]

( र ) कारण हें धर्माचरण येथें व इतरत्र फलदायी होई.

**वेस्वेतो हस्ति लोकसुखाहरो नाम**
[ लेखाखालीं डाव्या बाजूस ]

[ पांढरा हत्ती लोकांस सुख आणणारा. ]

**तेष......**
**पिपा**

शासन १४ वें

( क ) **अयं धंमलिपी देवानंप्रियेन प्रियदसिना राञा लेखापिता अस्ति एव संखितेम अस्ति मझमेन अस्ति विस्ततन**

( क ) ही धर्मलिपि देवानांप्रिय प्रियदर्शी यानें लिहविली आहे ती संक्षिप्त मध्यम किंवा पूर्ण आहे.

( ख ) **न च सर्वत घटितं**

( ख ) जी संपूर्ण आहे ती सर्वत्र लागू नाहीं.

( ग ) **महालके हि विजितं बहु च लिखितं लिखापयिसं चेव**

( ग ) कांकीं माझें राज्य (विजित) मोठें आहे. मी पुष्कळ लिहविलें आहे आणि लिहविणार आहे.

( घ ) **अस्ति च एत कं पुन पुन वुतं तस तस अथस माधूरताय किंति जनो तथा पटिपजेथ**

(घ) यांमधील कांहीं पुन्हां पुन्हां सांगितलें आहे तें विषय मधुरतेमुळें आहे आणि लोकांनीं त्याप्रमाणें वागावें म्हणून आहे.

( ङ ) **तत्र एकदा असमातं लिखितं अस देसं व सछाय कारणं व अलोचेत्पा लिपिकरापरधेन व**

(ङ) कांहीं ठिकाणीं लिहिणें अपूर्ण असेल आणि त्याला कारणें स्थानिक असतील किंवा माझा हेतु न आवडल्यामुळें [ कमी लिहिलें गेलें असेल ] किंवा लिपिकाराच्या अपराधामुळें असेल.

## ३९५. अशोकशासनांसंबंधी स्थूल विवेचन.

३९५. अशोकानें आपल्या लेखांच्या संक्षिप्त आणि सविस्तर आवृत्त्यांविषयीं विधान वरील चौदाव्या लेखांत केलेंच आहे.

अशोकाच्या सर्व शासनांकडे आतां वळूं; अशोकाच्या शासनांचे दोन वर्ग पडतात. १. शिलाशासनें आणि २. स्तंभशासनें. पहिला वर्ग म्हटला म्हणजे चौदा प्रकरणांचें शासन होय. यांत सर्वांचें मूळ सारखें नाहीं. शाब्दिक फरक सोडून दिल्यास अकराव्या आणि तेराव्या शिलाशासनाच्या मजकुरांत फरक धौलि आणि जौगड आवृत्त्यांत आहेत. बाकीच्या शासनांत सारखेपणा आहे. हीं शिलाशासनें व स्तंभशासनें प्राचीन अखिल भारतीय इतिहासाचीं अत्यंत महत्त्वाचीं साधनें होत.

## ३९६. शिलाशासनें.

३९६. शिलाशासनांत देखील विविधता आहे. त्यांसंबंधीं थोडीशी माहिती अवश्य आहे.

**१ गिरनार लेख**—जुनागडपासून पूर्वेस १ मैलावर, जुनागड जवळच अशोकाच्या शिलाशासनाखेरीज दोन मौर्य–राजांच्या उल्लेखांचा सुदर्शन तडागावरील रुद्रदाम्याचा लेख आहे तो योग्यप्रसंगीं पुढें दिला आहे [ ब्राह्मीलिपी ] गिरनारचीं शासनें संपूर्ण छापलीं आहेत.

**२ कालसी शिलालेख**—देहराडून जिल्ह्यांत, चक्राता तहसिलींत कालसी गांवापासून दीड मैलावर यमुनेच्या पूर्वकिनाऱ्यावर [ ब्राह्मी ].

**३ शहाबाजगढी शिलालेख**—पेशावर जिल्हा, यूसफझै विभाग, मकाम नदाच्या कांठीं शहाबाझगढीपासून अर्ध्या मैलावर हा लेख प्रथम शोधण्याचा मान पंजाबच्या रणजितसिंगाच्या पदरीं असलेल्या कोर्ट नांवाच्या गृहस्थास आहे. [ खरोष्ठी ].

**४ मानसेहरा शिलालेख**—[ खरोष्ठी ] मानसेहरा तहसिल, हजारा जिल्हा, वायव्यसरहद्द प्रांत

**५ धौलि शिलालेख**—[ ब्राह्मी ] खुर्दा पोटविभाग, जिल्हा ( जगन्नाथ ) पुरी. भुवनेश्वरापासून सात मैलांवर.

**६ जौगड शिलालेख**—[ ब्राह्मी ] ऋषिकुल्या नदीच्या उत्तरतीरास जौगड या भग्नगडावर. बरहामपूर तालुका, जिल्हा गंजम.

[ धौलि आणि जौगड येथील शिलालेखांत ११ व १३ हीं दोन शिलाशासनें भिन्न आहेत. ]

**८ सोपारें येथील शिलालेख**—हा दगड भाटेला येथील तळ्याशेजारीं सांपडला. यांत आठव्या शिलाशासनांतील कांहीं भाग आहे, त्यावरून तेथेंहि चौदा शासनें असावीं अशी कल्पना आहे. याचें मूळ एका टीपेंत दिलेंच आहे.

## ३९७. स्तंभशासनें.

३९७. **१ दिल्ली टोपरा स्तंभ**—[ ब्राह्मी ] हा स्तंभ सध्यां त्याचें मूळस्थान जें टोपरा तेथें नाहीं. हा सध्यांच्या दिल्लीच्या आग्नेयीस दिल्लीदरवाज्याबाहेर आहे. यावर सात शासनें आहेत. यांतील पहिलीं सहा शासनें अन्यत्र आलीं आहेत. **सातवें शासन मात्र विशेष आहे.** या स्तंभावर अशोकलेखाशिवाय उत्तरकालीनांनीं देखील लेख कोरले आहेत.

**२ दिल्ली**–[ ब्राह्मी ] **मीरत स्तंभलेख.** हा स्तंभ मीरतहून फेरोझशहानें दिल्लीस आणला. हा आतां आधुनिक दिल्लीच्या वायव्यद्वारावर आहे. टोपरास्तंभावरील पहिलीं पांच शासनें यांत आलीं आहेत. [ ब्राह्मी].

**३–४ लौरिय स्तंभ.** या दोन स्तंभांना लौरिय–अराराज स्तंभ आणि लौरिय नंदनगडस्तंभ हीं नांवें सध्यां दिलीं गेलीं आहेत. जिल्हे चंपारण, उत्तर बिहार. अलीकडे हीं शिवलिंगें समजलीं जातात आणि त्यामुळें त्याला जें अशिष्ट नांव प्राप्त झालें आहे त्याचेंच "लौरिय" हें ॲंग्लो-इंडियन रूपांतर आहे. एकावर अशोकलेखाशिवाय औरंगझेबाचाहि आहे. दोन्ही स्तंभावर पहिले सहा आज्ञालेखच आहेत.

**५ रामपूर्व स्तंभलेख.**—हा देखील चंपारण्यांत असून यावर पहिले सहा लेखच आहेत.

**६ अलाहाबाद किल्ल्यांतील स्तंभलेख.**—हा कौशांबीहून आणला. हा फारच महत्त्वाचा स्तंभ आहे. यावर अशोकाचा लेख आहे व त्याशिवाय पुढील लेख अंतर्भूत होतात.

[ १ ] **अशोकाचे लेख.**—( अ ) पहिले सहा लेख. ( आ ) राणीचा म्हणून समजला जाणारा लेख. ( इ ) कौशांबी लेख. [ २] समुद्रगुप्ताचा लेख. [३] मध्यें कांहीं नागरी लिपींतील ओळी. ] ४] जहांगीरचा लेख.

## ३९८. किरकोळ स्तंभलेखन.

३९८. **१ सांची स्तंभलेख**—सांची स्टेशनापासून पाऊण मैलावर. सात ओळी फक्त उपलब्ध आहेत.

**२ सारनाथ स्तंभ**—बनारसहून साडेतीन मैलांवर. यावरील लेखसमाप्तीनंतर अश्वघोषराजाचा लेख आला आहे, आणि शिवाय एक गुप्तकालीन अक्षरांतील बौद्धलिखाणहि आलें आहे. हा लेख म्हणजे फक्त अकरा ओळी होय.

**३ रुम्मिनदै स्तंभ**—बुद्धजन्मस्थानीं, नेपाळांतील तराई येथें. नेपाळी तहसिलीचें गांव भगवानपूरपासून दोन मैलांवर. बुद्धजन्मस्थान हेंच म्हणून सांगणारा आणि लुम्मिनि गांवाला करापासून मुक्तता देणारा पांच ओळीचा लेख.

**४ निगालीसागर स्तंभलेख**—नेपाळी तहसिल, तौलिवामध्यें निगालीसागरतलावांच्या कांठीं आपल्या राज्याचीं वीस वर्षें झाल्यानंतर "कनक मूनि" बुद्धाच्या सन्मानार्थ हा स्तंभ उभारला असें अशोक या लेखांत सांगत आहे.

**३९९. किरकोळ शिलालेख.**

३९९. १ **रूपनाथ शिलालेख**—मध्यप्रांत, जबलपूर-कटणी रस्त्यावर; स्लीमनाबाद स्टेशनपासून १४ मैलांवर. आपण शाक्य झाल्याला अडीच वर्षें झालीं. पण आपण "बाढि पकते" म्हणजे "अगदीं पक्के" झालों नव्हतों व आतां झालों म्हणून जाहीर करणारा हा सहा ओळींचा आपला त्या स्थानीं प्रवास दाखविणारा लेख आहे.

**२ सहस्रं शिलालेख**—सहस्रं हें शहर दक्षिण बिहारमधील शहाबाद जिल्ह्यांतील एका सब्डिव्हिजनचें मुख्य शहर आहे. हें एका शहरापासून सुमारें अडीच मैलांवर एका डोंगरी गुहेंत आहे. यांतील बहुतेक मजकूर रूपनाथ येथील शिलालेखासारखाच आहे.

**३ बैरत शिलालेख**—जयपूर संस्थानांत बैरत नांवाच्या तहसिलीच्या गांवीं गांवापासून ईशान्येकडे एक मैलावर. हा अत्यंत भग्नस्थितींत असल्यामुळें याचा पूर्ण अर्थ लागला नाहीं. तथापि याचें स्वरूप रूपनाथ व सहस्रं लेखासारखेंच आहे.

**४ बैरत—कलकत्ता शिलालेख**—हा लेख वर उल्लेखिलेल्या बैरत येथेंच सांपडला; पण हा सध्यां कलकत्त्याला एशियाटिक सोसायटीच्या ताब्यांत आहे. या लेखांत "मगधराज" संघास अभिवंदन करून धर्मग्रंथांपैकीं सात पुस्तकांचा उल्लेख करून त्यांचें वाचन व पठण आज्ञापितो. या लेखाचा पुन्हां उल्लेख येणार आहे. कारण या लेखाच्या सहाय्यानें बौद्ध ग्रंथांच्या विकासाचा क्रम निश्चित करण्यास मदत होते. †

**५ मस्की शिलालेख**—मस्की, लिंगुसूर तालुका, रायचूर जिल्हा. हा लेख रूपनाथ बैरत व सहस्र यांचीच आवृत्ति आहे. परंतु अशोकाचें नांव अशोक या शब्दांतच आलें आहे हा या लेखाचा विशेष आहे. हा लेख महाराष्ट्राच्या सरहद्दीवर असल्यामुळें याचेंहि अवतरण पुढें केलेंच आहे. याचें वाचन डॉ. सुखठणकर यांनीं केलें आहे.

† Winternitz, Vol. II, P. 16.

**६-८ म्हैसुर संस्थानांतील लेख**—६, ७, ८ हे तिन्ही सिद्धपूरच्या जवळ आहेत. हे हुल्श यांनीं शोधले. हे तिन्ही एका (चपडेन लिखिते लिपिकरेण) चपड नांवाच्या लिपिकारानें लिहिले आहेत. यांचेंहि स्वरूप रूपनाथ लेखासारखेंच आहे.

**९ बराबर शिलालेख**—गयेपासून १५ मैलांवर. त्या छोट्या लेखांमध्यें विशेषेंकरून आजीवकांना ज्या गुहा दिल्या त्यांचे दानलेख आहेत.

**४००. अशोक लेखांच्या उपलब्धीसंबंधीं स्थूल विधान.**

४००. हे सर्व किरकोळ लेख ब्राम्ही लिपींतच लिहिले आहेत. फक्त म्हैसुरी लेखांत जेव्हां लिपिकार चपड आपण लेख लिहिले आहेत, असें सांगतो तेव्हां तेवढीं अक्षरें तो खरोष्ट्रींत लिहितो. या एका गोष्टीवरून लेखनकलेच्या इतिहासाविषयीं काय निर्णय निघतात याचें विवेचन पुढें केलें आहे.

अशोककालीन लेख अजून सांपडत आहेत आणि अशोक शासनांच्या अधिकाधिक प्रती सांपडत आहे. अनेक शासनें एकाच अर्थाचीं असलीं तरी त्यांचा उपयोग होतो. त्यांमुळें स्थानिक भाषाविषयक भेद उघडकीस येतात व मजकुरांत देखील फरक सांपडतो; यासाठीं अशोकशासनाची प्रत्येक प्रत पहाणें महत्त्वाचें होतें. अशोकशासनविषयक पूर्ण पुरावा आपल्या हातीं लागला आहे असें म्हणतां येणार नाहीं.

**४०० अ. लेखविषयक विधानाची अपूर्णता.**

४०० अ. अशोकाचे लेख सांपडले तेवढे सर्व येथें उल्लेखिले गेले असें समजूं नये. नवीन नवीन लेख सांपडत आहेत, पण त्यांच्या प्रतिकृति, मातृकांतर व भाषांतर प्रसिद्ध करण्यांत पुराणवस्तु संशोधनखात्यांत बरीच दिरंगाई होते. गुंटूरजवळ नवीन सांपडलेल्या लेखाची प्रतिकृति माझ्या हातांत आली नाहीं. नवीन साहित्य सांपडूं लागलें आहे त्यावरून कांहीं दिवसांनंतर अशोककालीन दक्षिणेकडील इतिहासांतील कोरीं पानें बरींच कमी होतील अशी आशा उत्पन्न होते.

चितलदुर्गच्या शेजारीं जें चंद्रावली खोरें आहे त्यांत १९२९ सालीं एका प्राचीन शहराचे अवशेष सांपडले. अवशेषावरून दक्षिणेचा मौर्यकालीन इतिहास इतःपर बराच लिहितां येईल. दिवसानुदिवस दक्षिणेकडे अधिकाधिक साहित्य सांपडत आहे. निजामाच्या राज्यांत व गुंटूर येथें अशोककालीन नवीन लेख सांपडले आहेत व त्यापेक्षां देखील अधिक महत्त्वाचे अवशेष म्हैसूर संस्थानांत सांपडत आहेत. या सर्वांच्या तपासणीनें कांहीं तरी माहिती वाढत जाईल

यात शंका नाहीं. म्हैसूरकडच्या प्राचीन अशोकलेखांत प्राचीन काळची नगरी इशिला उल्लेखिली आहे ती सांपडली आहे अशी समजूत आहे, आणि त्या इशिला नगरींतील आयुष्यक्रमाची चौकशी अधिकाधिक व्हावी यासाठीं म्हैसूरच्या पुराणवस्तुसंशोधनखात्यानें जी खणती व इतर परिश्रम चालविले आहेत, त्याचीं फलें बरींच दिसतील अशी अपेक्षा आहे. त्या प्रयत्नाचें एक फल असें प्राप्त झालें आहे कीं तेथें एक प्राचीनतर संस्कृतीचें भूमिगत शहर सांपडलें आहे. तें शहर इतकें प्राचीन आहे कीं तें "इतिहासपूर्वकालीन आयसयुग असावें असें तेथील संशोधनांत गुंतलेल्या व्यक्तींचें म्हणणें आहे. इतिहासपूर्व आयसयुगाचे जे अवशेष सांपडले आहेत, त्यांच्या शेजारींच पाषाणयुगांतील संस्कृतीचे अवशेष सांपडले (एप्रिल १९३१ चा टाईम्सचा अंक) असून त्यांच्यायोगानें दक्षिणेचा इतिहास कित्येक शतकें मागें जाणार आहे.

मोलाकलमरु तालुक्यांतील सिद्धपुरजवळ जो अशोकलेख आहे त्याच्या शेजारीं देखील खनित्रकार्य चालू आहे. त्या प्रयत्नांमुळें प्राचीनतर कालाच्या इतिहासाची आशा उत्पन्न झाली आहे. चंद्रावल्ली शेजारचें जें प्राचीन नगर १९२९ मध्यें सांपडलें होतें, त्यापेक्षांहि प्राचीनतर कालचें आणखी एक गांव सांपडलें आहे. मौर्यकालीं किंबहुना त्याच्याहि पूर्वी दक्षिणेमध्यें जी स्थिति होती तिचे अवशेष सांपडून इतिहाससंशोधकांस तिचें स्वरूप अधिकाधिक अवगत होत जाईल असा अदमास दिसत आहे.

---

प्रकरण ४४ वें.

# अशोकलेखाचा पुरावा

## ४०१. ऐतिहासिक अर्थाचें निष्कर्षण.

४०१. आतां दिलेल्या लेखाचा थोडासा ऐतिहासिक अर्थ काढण्याकडे लागूं, आणि प्राचीन इतिहासावर प्रकाश पाडणारे अशोकाचे इतर लेखहि विचारास घेऊं.

अशोकाचीं शिलाशासनें त्याचें अत्युच्चत्व आणि साम्राज्याधिकार सांगणारीं आहेत त्याअर्थी तसलीं शासनें त्याच्या राज्याच्याबाहेर असतील अशी कल्पना करवत नाहीं. अशोकाचें एक शिलाशासन सोपाऱ्याला होतें यावरून मौर्यसत्तादेखील उत्तरकोंकणांत असली पाहिजे. सोपाऱ्याच्या शिलाशासनाची प्रत आपल्यापाशीं संपूर्ण नाहीं, आणि त्यामुळें अशोकानें आपल्या तेथील आज्ञापनेंत कांहीं स्थानिक फरक केले होते कीं काय हें समजत नाहीं. ज्याअर्थी कालसी, गिरनार, धौली, जौगड, शहाबाझगढी, मानसेरा येथील लेख परस्परसदृश आहेत व ज्याअर्थी अपरांतांतील लेखांचा कांहीं भाग तत्सदृश आहे, हें आपणांस ठाऊक आहे त्याअर्थी सबंध लेखहि तत्सदृश असेल अशा कल्पनेस जागा आहे. हा लेख जरी सदृश आहे तरी गिरनारभाषेंत आणि त्या लेखांतील भाषेंत कांहीं फरक होते हें मात्र स्पष्ट होतें.

गिरनार इत्यादि ठिकाणच्या लेखांवरून महाराष्ट्रविषयक माहिती काय निघेल तें पाहिलें पाहिजे. आणि नंतर सोपाऱ्याचा लेख सदृश होता अशी कल्पना करून त्यापासून आपण इच्छितों त्या क्षेत्रांतली काय माहिती मिळेल तें आपण पाहूं. गिरनार सारख्या ठिकाणच्या लेखांकडे वळण्यापूर्वी सोपाऱ्याच्या लेखाचा जो तुकडा उपलब्ध आहे त्यांत काय वैशिष्ट्यें दिसतात याची नोंद केलेली बरी.

## ४०२. अशोककालीन कोंकणची भाषा.

४०२. सोपाऱ्याच्या शिलालेखावरून त्या काळच्या उत्तर कोंकणांतील भाषेविषयीं कांहीं माहिती मांडण्याजोगी आहे. सोपाऱ्याच्या लेखांतील तुकडा जरी लहान आहे तरी त्यांत भाषेचीं कांहीं वैशिष्ट्यें स्पष्ट होत आहेत. सोपाऱ्याच्या लेखांतील शब्दांची तुलना त्यांच्याऐवजीं त्या ठिकाणीं गिरनारच्या शिलालेखांत जे शब्द येतात त्यांशीं केली असतां कांहीं फरक दिसतात त्यावरून कोंकणच्या अशोककालीन भाषेविषयीं काय सत्य सांपडतें तें पाहूं.

गिरनार व सोपारें यांतील लेखांचें तौलनिक कोष्टक पुढीलप्रमाणें मांडतां येईल. तौलनिक कोष्टकांत प्रथम सोपाऱ्याच्या लेखांतील शब्द देऊन नंतर गिरनार लेखांतील तत्स्थानीय शब्द दिले आहेत.

१. निखमिठं स = अयायं स.
२. हेत इयं होति = एतयं होति.
३. बंभ = ब्राह्म.
४. बुढानं = थैरानं.
५. दसने = दसणे.
६. हिरंन = हिरंण.
७. पटिविधानें = पटिविधानो.
८. धंमानुसथि = धंमानसस्टी.
९. रती होति = रति भवति.

हीं वर दिलेलीं नऊ समीकरणें कायतीं तत्कालीन कोंकणच्या भाषेवर प्रकाश पाडण्यास उपयुक्त आहेत. हीं अर्थात् अगदीं थोडीं आहेत. पण तीं उपेक्षणीय नाहींत. या कोष्टकांतील दसने, हिरंन, धंमानुसथि इत्यादि शब्दांवरून अशोककालीन कोंकणच्या भाषेंत "ट" वर्गाचा बराच कमी उपयोग होत असावा व टवर्गाच्या ठायीं तवर्गांतील अक्षरांचा उपयोग होत असावा. टवर्गाचा उपयोग अजीबाद होत नव्हता असें म्हणतां येणार नाहीं. कारण उपयोग होत होता हें सिद्ध करणारें अक्षर "ढ" सोपाऱ्याच्या लेखांतील "बुढानं" या शब्दांत आलेंच आहे. कांहीं फरक शब्दाचे भिन्न रूप दाखविणारे नाहींत. "होति" हा शब्द जेथें आला आहे (नववें समीकरण) त्या ठिकाणीं गिरनारच्या लेखांत भवति हा शब्द आला आहे, पण यावरून त्या बाबतींत गिरनारच्या आणि सोपाऱ्याच्या भाषेंत फरक होता असें म्हणतां येणार नाहीं. कारण दुसऱ्याच समीकरणांत गिरनार व सोपारें या दोन्ही ठिकाणीं "होति" हा शब्द आला आहे. त्या वेळच्या भाषेंत प्राकृत क्रियापदें व संस्कृत क्रियापदें एकाच लेखांत वापरण्याचा प्रघात होता.

वरील समीकरणांतील एक समीकरण कोणते शब्द कोंकणांत अधिक परिचित होते तें दाखविणारें आहे. "स्थविर" शब्दाचें प्राकृतरूप गुजरातच्या लेखांत आहे तर "वृद्ध" या शब्दाचें प्राकृतरूप कोंकणच्या लेखांत आहे. "बुड्ढा" हा शब्द आज मराठींत आहे; पण "थेर" हा शब्द मराठींत नाहीं. "थेरडा" हें मात्र रूप मराठींत आहे. यावरून स्थविर शब्दाची लोकप्रियता प्राचीनकाळापासून कोंकणांत

नव्हती असें दिसून येतें. "थैरानं" च्या ऐवजीं "वृद्धानां"-चींच रूपें इतर ठिकाणच्या लेखांत वापरलीं गेलीं आहेत.

गिरनार लेखांत निखमिठ याच्याऐवजीं अयाय शब्द आणला आहे. इतर ठिकाणच्या लेखांत "निक्रमित" या शब्दाचींच प्राकृत रूपें आलीं आहेत.

"हिरंण" चा णकार फक्त गिरनारमध्यें आला आहे इतर ठिकाणीं आला नाहीं.

"भवति" च्या ऐवजीं (होति) हा शब्दच कलसी, मानसेहरा, धौलि, जौगड, इत्यादि ठिकाणीं आला आहे.

वरील सादृश्यें व विसादृश्यें पाहातां सोपाऱ्याचा लेख गिरनारच्या लेखावरून तयार केला नसून मानसेहरा वगैरे इतर ठिकाणच्या लेखांवरून तयार केला असावा असें दिसतें.

मराठींत एतत् याला "हा" हा शब्द आहे. हा शब्द गुजरातींत नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत हकाराचे शब्द येत नाहींत असें नाहीं. "यह" हा शब्द "हा" अर्थानें हिंदींत येतो. पण तो भाषा कायम केलेल्या हिंदींतच येतो असें म्हटलं तर अधिक बरोबर होईल. उत्तर हिंदुस्थानच्या अनेक स्थानिक भाषांतून म्हणजे हिंदीच्या स्थानिक रूपांतरांतून तो चालू नाहीं. अशोकलेखांची भाषा आणि वररुचीची भाषा आणि हालाच्या सप्तशतीची भाषा यांची संगत लावल्यास भाषाविषयक कोणतीं सत्यें हातीं लागतात आणि त्यांवरून सामाजिक आणि लोकस्थितिविषयक आणि वंशविषयक काय निर्णय काढतां येतात यांची चर्चा वररुचि व हाल यांचें संपूर्ण साहित्य वाचकांच्या हवालीं केल्यानंतरच करण्यांत शोभा आहे.

### ४०३. महाराष्ट्राविषयीं माहिती–"सतीयपुतो".

४०३. गिरनार, कालसी इत्यादि लेखांत दक्षिणविषयींची काय माहिती सांपडते तीसंबंधानें थोडीशी चर्चाच केली पाहिजे. दक्षिणविषयींचे जे उल्लेख आहेत त्या सर्वांपासून निःसंशय बोध होत नाहीं. प्रत्येक उल्लेख आपण अनुक्रमानें घेऊं. पहिला चर्चा मागणारा उल्लेख सतीयपुतांसंबंधाचा होय. हा उल्लेख शातवाहनांचा आहे अशी कांहीं जणांनीं आपली समजूत करून घेतल्यामुळें 'सतीयपुत' शब्दास महत्त्व येतें.

हा शब्द दुसऱ्या शासनांत प्रारंभींच दक्षिणेकडील राजांच्या उल्लेखाचें वाक्य आहे त्यांत येतो. अशोक प्रथम म्हणतो कीं देवांचा प्रिय राजा प्रियदर्शी यानें म्हणजे आपण जरी सर्वत्र विजय मिळविले आहेत तरी देखील राज्याच्या सीमेवर जे आहेत त्यांच्या राज्यांत मनुष्य व पशु यांच्यासाठीं रुग्णालयें उघडलीं वगैरे गोष्टी केल्या. त्या राज्याचा उल्लेख चोड, पांड्य 'सतियपुत' केरलपुत (केतलपुत) ताम्रपर्णी, अंतियोक नामक योन राजा व इतर त्या अंतियोकाचे सामंत ऊर्फ शेजारीं असलेले अशा तऱ्हेनें करतो.

या उल्लेखावरून सतीयपुत्र कोण होते याचा बोध होत नाहीं. या उल्लेखाचा भांडारकरांनीं शातवाहनांशीं संबंध जोडला आहे व त्याचा स्वीकार रा. बखल्यांनीं देखील केला आहे. पण हा संबंध निःसंशय मुळींच वाटत नाहीं. सातवाहन आणि सतीयपुत्र या शब्दांचा एकमेकांशीं भाषाशास्त्रदृष्टीनें संबंध नाहीं व उल्लेख ज्या शब्दाशेजारीं केला आहे त्यांच्याकडे अवलोकन केलें असतां सतीयपुतांचा शातवाहनांशीं जोडलेला संबंध किंबहुना ऐक्य मुळींच पटत नाहीं. सतीयपुत्त याचा शातवाहनाशीं संबंध जोडून पुनः सातपुते या आडनांवाशीं संबंध भांडारकर जोडतात. या प्रकाराला जुने साहित्यशास्त्री संबंधातिशयोक्तीच्या उदाहरणांत घालतील. सतीयपुत्त हे शातवाहन नव्हते असें म्हणणारी मंडळी आहेतच. सतीयपुतो या प्राकृत शब्दाचें संस्कृतीकरण गौरीशंकर ओझा "सत्यपुत्र" असें करतात. (अशोककी धर्मलिपियां पहला खंड, नागरीप्रचारिणीसभा, संवत १९८० बनारस).

"सतीयपुत" हा शब्द ज्या अनुक्रमानें आला आहे त्या अनुक्रमाकडे लक्ष दिलं असतां अधिकच घोंटाळा होत आहे असें दिसून येईल. चोड, पांड्य आणि केरळ आणि ताम्रपर्णी हीं अत्यंत दक्षिणेकडील राष्ट्रें व स्थानें होत, व यांच्या यादींत मध्येंच सतीयपुतांचा उल्लेख होत आहे. केवळ अनुक्रमाकडेसच पहातां "सतीयपुत" हें अत्यंत दक्षिणेकडचें राष्ट्र असलें पाहिजे.

उल्लेखानुक्रम जर भौगोलिक अनुक्रमाचा दर्शक नसेल तर सतीयपुत याचें सातपुड्याकडचे लोक असें स्पष्टीकरण झालं असतें. कारण सातपुडा या शब्दाचें "ऐतिहासिक नैरुक्त" ऊर्फ इतिहासानें अगर दंतकथेनें स्पष्टीकरण त्यास सहाय्यक होईल. सातपुत्र येथें रहात होते व त्यावरून हें नांव देण्यांत आलें अशी कथा आहे (इंपीरियल गॅझेटी.). ज्याअर्थीं "सतीयपुत" या शब्दाचा अर्थ शातवाहन असा करतां येत नाहीं आणि ज्याअर्थीं शातवाहनांचें निवासस्थान निश्चितपणें ठाऊक नाहीं, त्याअर्थीं या उल्लेखावरून महाराष्ट्रविषयक कांहींएक बोध होत नाहीं असें म्हणणें भाग पडतें.

उल्लेखक्रमावरून सतीयपुत्राचें स्थान काढायचें तर तें अंतिम दक्षिणेकडे शोधावें लागेल. पण त्या दृष्टीनें दक्षिणेकडील स्थलनामांचा व जातिनामांचा कोणी शोध केला नाहीं व सतीयपुत्राचीं अशोकलेखीय रूपांतरें देखील फारशीं सहाय्यक होत नाहींत. अनेक प्रसंगीं विशिष्ट राष्ट्राचें नांव

काय होतें याचा खुलासा त्याच राष्ट्राच्या उल्लेखाचें जें रूप अशोकाच्या लेखाच्या अन्य प्रतींत सांपडतें त्यावरून होतो. उदाहरणार्थ, गिरनारच्या लेखांत "सतीयपुतो" शब्दानंतर 'केतनपुतो' हा शब्द आहे. हा शब्द त्याच अनुक्रमांत अन्य ठिकाणीं केरलपुत्र, केरलपुत्रे, केललपुतो इत्यादि रूपांत आला आहे. ती रीति वापरूनदेखील "सतीयपुतो" वर प्रकाश पडत नाहीं. कालसी, जौगढ, शहाबाझगढी व मानासेहरा या ठिकाणीं "सातियपुतो" "सतिय पुते", "सतिय पुत्र" "सतिय पुत्र" हीं रूपांतरें आलीं आहेत. चौदा शासनांत सतीयपुत्तांचा उल्लेख दुसऱ्या शासनांतील वर उल्लेखिलेल्या स्थानाखेरीज अन्यत्र नाहीं. सतीयपुत्तांचे दुसऱ्या शासनांतील शेजारी जे चोड, पांड्य, ताम्रपर्णीकर यांचा उल्लेख पुढें तेराव्या शासनांत आला आहे. हा भाग गिरनारच्या लेखांत पुसटला गेला आहे. या लेखांत चोड-पांड्याबरोबर किंवा दुसऱ्या कोणाहि बरोबर सतीयपुत्तांचा उल्लेख केला नाहीं. सतीयपुत्तांच्या उल्लेखाच्या अस्पष्टतेमुळें महाराष्ट्राचा अशोकाशीं संबंध काय आला होता हें समजावयाचें रहातें अशांतला भाग नाहीं. मौर्यकालीं शालिवाहन-सत्ता दक्षिणेंत कशी काय होती यावर प्रकाश पडावयाचा रहातो. सतीयपुत्त जरी महाराष्ट्रांत नसले तरी अशोकानें मोठ्या अट्टाहासानें जाहीर केलेलीं दानें म्हणजे मनुष्य व पशु यांच्यासाठीं औषधालयें, औषधी बागा व रस्त्यावर छायेसाठीं वृक्ष व पाण्यासाठीं विहिरी या गोष्टी सम्राट अशोकाकडून महाराष्ट्राला लाभल्या नव्हत्या असें म्हणतां येणार नाहीं. ज्याअर्थी अशोकाचा लेख कोंकणांत आहे त्याअर्थी यांपैकीं कांहीं गोष्टींचा लाभ कोंकणाला झाला नसेल हें अशक्य नाहीं. इतर महाराष्ट्राला अंकित म्हणून नव्हे तर शेजारीं म्हणून अशोकसाम्राज्याचे फायदे काय मिळाले हे इतर उल्लेखांवरून स्पष्ट होत आहे तर त्यांच्याकडे वळूं.

### ४०४. राष्ट्रिक, पैठणकर आणि कोंकणस्थ.

४०४. "सतीयपुत्त" याशिवाय दुसरा महत्त्वाचा राष्ट्रोल्लेख म्हटला म्हणजे "रिस्टिकपेतनिकानं" हा होय. या उताऱ्यांत रिस्टिक व पेतणिक यांच्यामध्यें अशोकानें धर्ममहामात्र पाठविले त्याप्रमाणेंच त्यानें ते "अपरातां"त म्हणजे कोंकणांत पाठविले. अपरात म्हणजे अपरांत म्हणजे कोंकणच होतें हें त्या शब्दाच्या अन्य रूपांवरून स्पष्ट होतें. यांत कमी पडणारा अनुस्वार कालसी (अपलंता) धौलि [आपलंता] व शहाबाझगढी [अपरंत] या तीन ठिकाणीं आला आहे. त्यावरून गिरनार लेखांतील अपरात अपरांतच होता यांत शंका नाहीं. रिस्टिक आणि पेतेणिक यांचीं अन्य सदृश रूपें धौलि, शहाबाज गढी व मानसेहरा येथें आलीं आहेत. यावरून [महाराष्ट्रांतील कोंकणभाग खेरीज इतर भाग जरी अशोकाला पादाक्रांत करतां आला नाहीं तरी त्यानें रिस्टिक, पेतणिकांत म्हणजे पैठणच्या सत्तेखालील प्रदेशांत व राष्ट्रीकांच्या सत्तेखालील प्रदेशांत आपले प्रचारक पाठविले होते यांत शंका नाहीं. प्रश्न असा उपस्थित होईल कीं पेतेणिक अथवा पितेनिक [धौलि] हे पैठणकरच कशावरून ? पेतेनिकांचें "पैठणकर" हें अवगमन इतर संशोधकांस मान्य आहे. त्यांनीं यांच्या ऐक्यासंबंधानें प्रश्नहि उपस्थित केला नाहीं तरी थोडीशी आपण खात्री करून घेतली पाहिजे. त्याला पुरावा अशोकलेखांतच आहे. येथें ज्याप्रमाणें पैठणकरांचा उल्लेख राष्ट्रिक आणि कोंकणवाले यांच्या संगतींत केला आहे त्याप्रमाणेंच पुढें एके ठिकाणीं पैठणकरांचा उल्लेख भोजांच्या म्हणजे वऱ्हाडी मंडळीच्याबरोबर केला आहे. आपल्या राज्याच्या सीमांतावर अंतियोकादि यवन राजे आहेत, त्याप्रमाणेंच चोड, पांड्य आणि ताम्रपर्णीचे लोक, त्याप्रमाणेंच यवन, कंबोज यांच्याप्रमाणेंच भोज व पितिनिक्य व आंध्र–पुलिंद आहेत. या सर्वांमध्यें देवानांप्रियाचे दूत जात आहेत आणि धर्मप्रचार करीत आहेत, असें तेराव्या शासनांत लिहिलें आहे. हे शब्द गिरनारच्या प्रसिद्ध झालेल्या लेखांत नाहींत; तथापि कालसी, शहाबाझगढी व मानसेहरा येथील शासनांत आहेत. येणेंप्रमाणें पेतणिकांचा उल्लेख एका बाजूनें भोजांच्या म्हणजे वैदर्भांच्या संगतींत केला आहे तर दुसरीकडे तो राष्ट्रिक व अपरांत यांच्या संगतींत केला आहे. म्हणजे कोंकण आणि वऱ्हाड यांच्यामध्येंच पेतनिक होते हें उघड आहे.

असें शक्य वाटतें कीं अश्मकांपासून शातवाहनांकडे राज्य आलें, त्या कालांत शालिवाहन हें नांव पूर्णपणें लोकविश्रुत झालें नसेल. शेवटचा अश्मक राजा दीपमणी यांच्या उत्तराधिकाऱ्यांना कांहीं दिवस अश्मक न म्हणतां वेतनिक याच नांवानें ओळखत असतील. शातवाहनांच्या प्रारंभकाळांत त्या वंशाची राज्याधिकारस्थापना बऱ्याच लटपटींतून झालेली दिसत आहे; त्यांविषयींचें विवेचन सूक्ष्मावलोकन करूनच करावें लागणार आहे.

या सर्व ठिकाणीं अशोकानें धर्मोपदेशक पाठविले होते व यांपैकीं बऱ्याच भागांवर मनुष्यचिकित्सा व पशुचिकित्सा करण्याकरतां आलयें स्थापिलीं होतीं, व जागोजाग वृक्ष लावले होते. या सर्व महाराष्ट्रापैकीं फक्त कोंकण कायतें त्याच्या ताब्यांत आलें असावें व तें देखील उत्तरकाळीं

आलें असावें. गिरनार व इतर ठिकाणच्या शिलालेखांत अपरांत आपल्या राज्याच्या बाहेरच आहे अशी जाणीव दाखविणारी भाषा अशोक वापरतो व पुढें त्यामुळें जेव्हां अपरांत हातीं लागला तेव्हां अपरांतांतील लेखांत कांहींतरी थोडासा मिरची मसाला किंवा सद्धेतुप्रदर्शन किंवा स्वसमर्थनाचा प्रयत्न, निदान थोडासा निराळेपणा असणें शक्य आहे, व त्यामुळें सोपाऱ्याचा लेख पुरा हातीं लागला नाहीं हें दुर्भाग्य आहे.

महाराष्ट्र जरी मौर्यांच्या सत्तेखालीं आला नाहीं तरी मौर्यांच्या धार्मिक प्रभावाखालीं आला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेव्हां अपरांत ताब्यांत नव्हता तेव्हां तेथें प्रथम आपलें साधुत्त्व व आपली धार्मिक भावना यांचा प्रचार अशोकानें केला व पुढें अपरांत ताब्यांतहि घेतला. यावरून या कल्याण करूं इच्छिणाऱ्या अशोकाला नवीन देश काबीज करणें देखील गैर वाटत नसावें; व ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे अशोकाच्या सर्व धार्मिक व्याख्यानांच्या मागें राजकारण होतें कीं केवळ धर्मकारण होतें याविषयीं थोडासा संशय उपस्थित होतो. कदाचित् धर्मप्रचारांत धार्मिक व राजकीय या दोन्ही भावना असतील.

अशोकाच्या लेखांवरून महाराष्ट्रासंबंधीं माहिती मिळते ती वर आलीच आहे. आतां सोपाऱ्याच्या लेखावरून अशोकाची सत्ता कोंकणांत स्थापित झाली होती असें धरून चालूं व कोंकणास अशोकसत्तेचा काय फायदा मिळाला किंवा कोंकणावर काय परिणाम झाला तें पाहूं.

### ४०५. अशोक कोंकणांत आला होता काय ?

४०५. ज्याअर्थी अशोकसत्ता उत्तरकोंकणांत होती त्याअर्थी मौर्यसत्तेमध्यें जी अधिकारव्यवस्था उत्पन्न झाली ती उत्तरकोंकणांत देखील आली असली पाहिजे. व्यवस्थेचें स्वरूप या शासनांवरून कितपत स्पष्ट होतें तें पाहूं.

तिसऱ्या शासनांत सांगितलें आहे कीं अशोकानें चोहोंकडे राजुक नेमले आणि प्रादेशिक नेमले. "दर पांच वर्षांनीं आपण दौरा करतों आणि धर्मशासन करतों. ब्राह्मण-श्रमण-शुश्रूषा व्हावी. मित्र, जाति इत्यादिकांना औदार्य दाखविणें योग्य आहे. या प्रकारच्या उपदेशाचें अनुशासन करतों" म्हणून अशोक सांगत आहे. यावरून असें वाटतें कीं आपण दर पांच वर्षांनीं धर्मशासनार्थ दौरा करतों असें लोकांस सांगणारा अशोक प्रत्यक्ष स्वतः कोंकणांत आला असला पाहिजे किंवा त्याचा येण्याचा इरादा असला पाहिजे.

अशोकाचें चौथें शासन केवळ धर्माचरणावर व्याख्यान आहे. त्यावरून स्थानिक इतिहासाचा कांहीं बोध होत नाहीं.

पांचव्या शासनांत कल्याण करणें कठीण आहे इत्यादि प्रकारचें व्याख्यान देतां देतां अशोकानें जी विशेष गोष्ट सांगितली आहे ती म्हटली म्हणजे त्यानें धर्माधिकारी नेमले होते. त्यांना "धर्ममहामात" (धर्ममहामात्र) असें नांव त्यानें आपल्या शासनांत दिलें त्यासंबंधीं होय. तर हे धर्ममहामात्र देखील कोंकणाला लाभले असावेत, व आपलें कर्तव्य करूं लागले असावेत. त्यांचें कर्तव्य कोणत्या प्रकारचें होतें हें शासनांत दिलेंच आहे. त्यांस आंखून दिलेल्या कर्तव्यांवरून धर्ममहामात्रांचें कर्तव्य साम्राज्याच्या सुखाच्या दृष्टीनें महत्त्वाचें होतें. हिंदुस्थानासारख्या अत्यंत भिन्न भिन्न मतांचा व संप्रदायांचा समावेश करणाऱ्या देशाला एकसत्ताधारी सम्राट लाभला तर त्याची भिन्नधर्ममतविषयक वृत्ति काय होते आणि देश परकीय नोकरशाहीच्या तावडींत सांपडला म्हणजे त्या नोकरशाहीची वृत्ति काय होते यांतील तीव्र फरक दिसून येण्यासारखा आहे. हे धर्ममहामात्र सर्व प्रकारच्या पाखंडांत ऊर्फ मतवाल्यांत पसरले. हे पसरले ते धर्मवृद्धीसाठीं पसरले. धर्मानुयायांच्या हितसुखासाठीं पसरले असें अशोक आग्रहानें सांगतो.

अशोकानें "धर्म" आणि "पाखंड" असा भेद केला आहे व तो प्रत्येक मताला पाखंड म्हणतो व तो ज्याचा स्वतः प्रचार करूं इच्छितो त्याला धर्म म्हणतो. यावरून तो अनुदार होता काय याचा विचार केला पाहिजे.

प्रथम हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं त्यानें पाखंड हा शब्द वाईट अर्थानें वापरला नाहीं. केवळ मत या अर्थानें वापरला आहे असें थोडक्याच अवलोकनानें दिसून येईल. अशोकाचें पाखंडांविषयीं एकंदर विधान पुढीलप्रमाणें आहे.

(१) त्यानें आपल्या धर्ममहामात्रांना सर्व पाखंडांमध्यें जावयास सांगितलें होतें. (शा. ५.)

(२) आणि सर्व पासंडांनीं राज्यांत बसावें असेंहि सांगितलें आहे [सवे पासंडा वसेयु (शा. ७)] सर्वच पाखंडे संयम व भावशुद्धि इच्छितात अशी तो आपली अपेक्षा दाखवितो [सवे ते सयमं भाव सुधिचा इछंति (शा. ७)]

(३) देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा सर्वच पाखंडांचा, प्रव्रजितांचा व गृहस्थांचा सत्कार करतो [सव पासंडानिच पवजितानिच घरस्तानि च पूजयति (शा. १२)].

(४) सर्वच पासंडाची सारवृद्धि होवो [सारवढी अस सव पासंडानं] ही सारवृद्धि वचनावर नियंत्रण ठेवल्यानें [वचिगुति] होणार आहे. आपल्या पासंडाची पूजा व पर-

पासंडाची निंदा न होवो [ आतपपासंडपूजा व परपासंड गरहा व नो भवे ( शा. १२ ) ].

( ५ ) तर अशा प्रसंगीं परपासंड वाढ पावेल व परपासंडावर उपकार होईल. यापेक्षां अन्य आचरण जो करील, तो आपल्या पासंडाचा क्षय करील, व परपासंडाला देखील अपकार करील. जो कोणी आपलें पासंड सत्कारितो व परपासंडाची आपल्या पासंडाच्या भक्तीनें व आपलें पासंड आपण उद्दीपित करूं अशा भावनेनें निंदा करतो तो आपल्या पासंडालाच हानि पोंचवितो. ( शा. १२ )

( ६ ) समवाय चांगला आहे, कां तर एकमेकांचे धर्म ऐकावे व एकमेकांची शुश्रूषा करावी अशीच देवप्रियाची इच्छा आहे; कारण सर्वच पाषंडें बहुश्रुत आणि कल्याणकारक आहेत. ( शा. १२ )

( ७ ) देवप्रिय इच्छितो कीं सर्वच पाषंडाची सारवृद्धि व्हावी आणि यासाठींच धर्ममहामात्र नेमले आहेत. [ शा. १२ ]

( ८ ) स्त्रियांमधील अध्यक्ष महामात्र, व्रजभूमिक आणि अन्य अधिकारी ( निकाय ) याच कामासाठीं नेमले आहेत कीं आत्मपाषंडवृद्धि व्हावी आणि धर्माचें दीपन व्हावें. ( शा. १२ )

( ९ ) ब्राम्हण, श्रमण वा इतर पाषंड गृहस्थ [ ब्राह्मण व समणा व.......शा. १३ ]

( १० ) जेथें कोणत्या तरी पासंडावर मनुष्याची प्रीति नाहीं असा प्रदेश नाहीं. ( शा. १३ )

या सर्व उल्लेखांवरून पासंड हा शब्द संप्रदायांविषयीं अनादराच्या भावनेनें अशोकानें वापरला नाहीं हें स्पष्ट दिसत आहे. ब्राह्मण व श्रमण यांचा सत्कार अशोक बोधितो, पण त्यांनाहि त्यानें पाषंड शब्दच लावला आहे. संप्रदायांस तो धर्म म्हणत नाहीं. धर्म आणि मतें यांत भेद करतो. मतांचें सार निघालें म्हणजे तो धर्म होतो. सारवृद्धि हें प्रत्येक संप्रदायाचें ध्येय आहे. प्रत्येक संप्रदायामार्फत सामान्यधर्माकडे मनुष्यानें वळावें असें अशोकाला वाटत होतें.

अशोकाचें या प्रकारें धार्मिक बाबतींत धोरण उदार होतें. तो केवळ एकनिष्ठ बौद्ध नव्हता. तर बौद्ध संप्रदायामार्फत सामान्य हिंदू संस्कृतींत अंतर्भूत झालेला सम्राट होता. प्रत्येक उपास्य आणि मार्ग हे त्याच अंताकडे पोंचण्याचीं साधनें आहेत असें धार्मिक हिंदू प्रमाणें त्यासहि वाटत होतें. परधर्माविषयीं व परजातीविषयीं असूया खुद्द गौतमबुद्धाच्या ठायीं होती. अशोकास बौद्धधर्मी म्हणण्यापेक्षां साम्राज्यधर्मी म्हटलें तर शोभेल. त्यानें हिंसा कमी कमी करीत आणली होती व मांसाचा पूर्ण त्याग करण्याच्या प्रयत्नांत तो होता हेंहि दिसून येतें. तो प्रत्येक मतास आपल्याहि संप्रदायास तो पासंड म्हणतो, धर्म म्हणत नाहीं. प्रत्येक पासंडांतून सार काढलें म्हणजे धर्मनिष्पादन होतें. यासाठीं समवाय अशोक उपदेशितो.

आतां त्याची धर्माची कल्पना ऊर्फ " धमानुसस्टिय " ( धर्मानुशिश्यैष्ट ) धर्मानुशासन काय होतें तें पाहूं.

आई व बाप यांची शुश्रूषा योग्य आहे, इष्ट, मित्र व ज्ञाति यांची देखील शुश्रूषा योग्य आहे. हिंसाहीनता योग्य आहे; काटकसर योग्य आहे; आग्रहीपणांत नियमितता ( अल्प भांडता ) योग्य आहे; वृद्धशुश्रूषा देखील मातापितरांच्या शुश्रूषेप्रमाणेंच करावी असें राजाचें धर्मानुशासित आहे. धर्माचरण चांगल्या शीलाशिवाय होत नाहीं, यासाठीं शीलरूपी संपत्तीची हानि करूं नये. कल्याण करणें कठीण आहे. जो कल्याण करतो तो एक कठिण गोष्ट करतो. हीच गोष्ट अशोकानें अनेक तऱ्हांनीं सांगितली आहे. याशिवाय अनेक मतांच्या लोकांनीं एकमेकांशीं कसें रहावें यासंबंधानें त्याचें विवेचन त्याच्या धर्माचा भाग होईल.

### ४०६ अशोकाचे अधिकारी.

४०६ अशोकाच्या धर्ममहामात्रांस आज्ञा काय होत्या. धर्मविषयक त्याचे अधिकारी कोण होते यांविषयीं थोडेंसें विवेचन अवश्य आहे. त्यानें आपल्या या शासनांत पुढील धर्मविषयक अधिकाऱ्यांचा उल्लेख केला आहे.

( १ ) दूत—याविषयींचा उल्लेख १३ व्या शासनांत आहे. पण यांच्यासंबंधाचें वाक्य गिरनारमध्यें खोडलें गेलें आहे. पण दूति एवढेच शब्द राहिले आहेत. गळालेले शब्द शासनाच्या इतर प्रतींतून घेतां त्या वाक्याचें स्वरूप पुढीलप्रमाणें होईल. "यत पि दूति देवानं पियस नो यति ते अपि सुतु देवानं पियस धमवुतं विधनं च धंमानुसस्टिं च धमं अनुविधियंति च अनुविधियिसंति च " म्हणजे " जेथें देवानांप्रियाचे धर्मप्रसारक दूत जात नाहींत तेथें देखील धर्मवृत्ताचें विधान आणि धर्मशासन ऐकून लोक धर्माचरण करीत आहेत." हें वाक्य यवनकांबोजादि अनेक देशांचा उल्लेख करून तेथें धर्मानुशिष्टीचें लोक अनुसरण करीत आहेत असा उल्लेख करून त्याच्यापुढें लिहिलें आहे. भावार्थ असा कीं यवनकांबोजादि देशांत त्याचे दूत जात असत.

( २ ) स्त्रियांमधील अध्यक्ष महामात्र यांचा उल्लेख १२ व्या शासनांत आला आहे तो मागें दिलाच आहे. महामात्रांना अंतःपुरापर्यंत प्रचारकार्य होतें.

( ३ ) व्रजभूमिक ( गोव्यावरील अधिकारी ? ) यांचें कार्य स्पष्ट समजत नाहीं.

( ४ ) निकाय हा अधिकारीवर्गाचा वाचक सर्वसामान्य शब्द होता. "काय" म्हणजे काम अगर कचेरी त्यांत नियुक्त तो निकाय. येथें दिसणारा शब्द "काय" त्यावरूनच पुढें कायस्थ शब्द झाला असावा असें वाटतें, हें मागें सुचविलेंच आहे.

( ५ ) प्रतिवेदक–यांचा उपयोग हेरांसारखा होत असावा. हे सामान्य राज्यव्यवस्थेवरील आणि धर्मव्यवस्थेवरील निरीक्षक असले पाहिजेत.

( ६ ) कुमार; राजघराण्यांतील एक पुरुष. हा गव्हर्नरांच्या वरचा असावा. हा उज्जयिनीस असे.

( ७ ) तक्षशिलेहून येणारा अधिकारी–याची पदवी काय होती हें निश्चित होत नाहीं.

( ८ ) आतां सर्वांत सामान्य आणि ज्याचा उल्लेख या शिलाशासनांत चोहोंकडे येतो त्या "महामात्र" शब्दाकडे वळूं. महामात्र आणि दूत यांत फरक काय होता हें त्याविषयीं कांहीं उल्लेखांवरून गूढ पडतें, तर धौलीच्या लेखावरून राजपुत्राच्या खालोखाल हा अधिकारी होता असा भास होतो. एकंदर विधानांवरून असें वाटतें कीं "महामात्र" नांवानें होणारा अधिकार प्रथम फार मोठा असावा, तथापि नंतर तो अधिकार बराच पातळ झाला असावा. त्या गोंडस नांवावर बरेच लोक फिदा झाले असतील व पुढें अशोकानें तो अधिकार बराच पातळ करून राजकृपेची प्राप्ति करून घेणाऱ्यांना खुष केलें असावें. यासाठीं महामात्रांचें अधिक स्पष्टीकरण अवश्य आहे. महामात्रांचें एक महत्त्वाचें कार्य प्रचाराचें होतें यांत शंका नाहीं; तथापि त्यांचे अधिकार निश्चितपणें काय होते, त्यांचा दर्जा काय होता, त्यांच्यांत अधिकारभोगाची सोपानपरंपरा काय होती याविषयीं देखील निश्चयात्मक माहिती या शिलाशासनांवरून स्पष्ट होत नाहीं. आणि त्यामुळें ती केवळ विधान स्वरूपांत मांडतां येत नाहीं; तर यासाठीं याविषयींच्या विवेचनांत अधिक शिरलें पाहिजे.

## ४०७. धर्मप्रसाराचा हेतु कीं जिंकण्याचा हेतु ?

४०७. धर्ममहामात्रांविषयीं त्याच्या आज्ञापना काय होत्या हें पाहूं.

( १ ) त्यानें आपल्या धर्ममहामात्रांना सर्व पाखंडांमध्यें जाण्यास सांगितलें होतें [ ते सव पासंडेसु व्यापता ( शासन ५ ]

( २ ) धर्ममहामात्रांनीं सर्व प्रकारच्या पासंडांकडे जावयाचें त्याचा हेतु धर्माधिष्ठान व धर्मवृद्धि व धर्माचरण करणाऱ्यांचें हितसुख हा होय म्हणून सांगितलें होतें.

( ३ ) त्यांना अन्य राष्ट्रांत विशेषेंकरून जाण्यास सांगितलें होतें. आपल्या राज्यांत कोठें कोठें धर्ममहामात्र पाठविले होते याचा उल्लेख येथें नाहीं. ज्यांच्याकडे पाठविलें तीं राष्ट्रें म्हणजे यवन, कांबोज ( काबुल ), राष्ट्रिक, पैठनक आणि अपरांत हीं होतीं. या सर्व उल्लेखांवरून अजून अशोकाचा हेतु स्पष्ट होत नाहीं. परक्या देशांत सत्कर्म करण्यासाठीं पाठविणें याचा हेतु केवळ धार्मिक असूं शकत नाहीं, तर परक्या देशाच्या जनतेला आपल्याकडे आकर्षण करून घेऊन देश घशांत घालण्याचा हेतु नसेलच असें नाहीं. धौलीच्या शासनांत त्यानें आपल्या महाराष्ट्रीय शेजाऱ्यांस त्याच्या देश जिंकण्याच्या हेतूविषयीं बेफिकीर राहण्यास सांगितलें होतें, पण तेथेंही त्याच्या खऱ्या हेतूविषयीं संशयच उत्पन्न होतो. गिरनारच्या लेखांत "अपरांत" याचा उल्लेख इतर परक्या राष्ट्रांच्या बरोबर केला आहे व त्यावरून जेव्हां गिरनारचें लिखाण लिहिलें गेलें तेव्हां कोंकणप्रांत आपल्या साम्राज्याच्या घशांत अशोकानें कोंबला नव्हता तर अशोक तेथें केवळ "सत्कर्म" करीत होता हें दिसतें.

( ४ ) महामात्रांना ज्यांत जावयास सांगितलें होतें असे मनुष्यवर्ग म्हणून भृत्यवर्ग [ भतमयेसु ( शा. ५ ) ] ब्राम्हण, अनाथ आणि वृद्ध हे उल्लेखिले आहेत.

( ५ ) धर्मयुक्तांना बाधा पोंहोचूं नये म्हणून ते योजिले गेले होते.

( ६ ) या धर्ममहामात्रांनीं पाटलिपुत्रांत व बाहेरच्या नगरांत देखील रहावयाचें होतें.

( ७ ) त्यांना अंतःपुरांत देखील रहावयाचें होतें.

( ८ ) त्यांना आपल्या बंधु-भगिनींमध्यें किंबहुना सर्वच आप्तेष्टांमध्यें नियोजिलें होतें.

( ९ ) जिंकलेल्या सर्व पृथ्वीवर त्यांस पाठविलें होतें.

या तऱ्हेचे अधिकारी अर्थात् जगांत इतरत्र कोठेंच नाहींत. ते सत्कर्माचे अधिकारी होते. लोकांचीं मतें तपासणारे भयंकर धार्मिक अधिकारी हे मुळींच दिसत नाहींत.

## ४०८. अशोकाच्या साम्राज्यधर्मांतील पांथिकपणा.

४०८. अशोकानें केवळ नैतिक विचारांचा प्रचार केला आणि वैयक्तिक, सांप्रदायिक मतांचा प्रचार केला नाहीं असें नाहीं. इतरांच्या विचारांना पाखंड ऊर्फ सेक्टेरिअन म्हणावयाचें आणि आपल्या विचारांना मात्र सार्वलौकिक धर्म

म्हणावयाचें या प्रकारच्या वृत्तीच्या तावडींत अशोकहि थोडाबहुत होता. कारण तो धर्माचरणानें "भेरीघोष" म्हणजे "धर्मघोष" 'विमानदर्शन' 'हस्तिदर्शन' आणि 'अग्निस्कंध' (अगिखंदानि) व इतर दिव्य रूपें लोकांना दाखवितो" असें आपल्या चौथ्या अनुशासनांत सांगितलेंच आहे. यावरून अशोकाच्या धर्मांत पंथविशिष्टता होती यांत शंका नाहीं. परंतु आपल्या वैशिष्ट्याविषयीं आसक्ति दाखवितांना यानें प्रजेवर कांहीं जुलूम केला अशांतला भाग नाहीं. धर्माच्या नांवानें नगारा वाजविणें, लोकांना विमानदर्शन व हस्तिदर्शन करविणें म्हणजे रामलीलेसारखे बौद्धकथांचे खेळ करून दाखविणें व अग्निस्कंद म्हणजे होळ्या करणें इत्यादि गोष्टी केल्याचें अशोक सांगतो. या गोष्टी राजानेंच करावयाच्या आहेत. यांत लोकांवर मतग्रहणविषयक सक्ती होत नाहीं.*

### ४०९ मौर्यसत्तेची महाराष्ट्रांत वाढ कां झाली नाहीं ?

४०९ अशोकलेख महाराष्ट्रांत नाहींत आणि अशोकसत्ता महाराष्ट्रांत पसरली नाहीं यावरून महाराष्ट्रासंबंधानें अनुमान काय काढावयाचें ? महाराष्ट्रांतील लोक इतर ठिकाणच्या लोकांपेक्षां अधिक शूर होते त्यामुळें ते मौर्यसाम्राज्याखालीं आले नाहींत अशा तऱ्हेचें अनुमान महाराष्ट्रीयांस तरी अधिक रुचकर होईल यांत शंका नाहीं. तथापि त्या तऱ्हेचें विधान करण्यास देखील अनेक कारणांनीं संकोच उत्पन्न होतो. उदयनाच्या स्वारीच्या आणि अशोकाच्या विजयाच्या वर्णनांत बरेंच साम्य आहे. या काळांत महाराष्ट्राला जी दुर्जयता प्राप्त झाली ती आर्थिक व भूस्वरूपविषयक कारणामुळें प्राप्त झाली असावी. विजयाचे हेतु मुख्यतः आर्थिक असतात. जर आर्थिक दृष्टीनें महाराष्ट्रप्रांत घेऊन विशेष फायदा नसला तर सर्व सत्ताधारी सम्राटाला तशा प्रदेशाकडे दुर्लक्षावें लागतें.

महाराष्ट्राचा बराचसा भाग वसला नसला आणि जो वसला असेल तेथें देखील कलाकौशल्य वाढलें नसलें तर तो प्रदेश जिंकण्याकडे त्याची फारशी प्रवृत्ति होणार नाहीं. तथापि हें स्पष्टीकरण लागू पडत नाहीं. कुरुयुद्धकाळींच महाराष्ट्रांत अनेक राज्यें होतीं व संस्कृत विद्येचें स्थान हा प्रदेश झाला होता हें दाखविलेंच आहे. जर जेत्याच्या मुलुखांत लोकसंख्या फार झाली आणि त्याला आपल्या वाढत्या प्रजेसाठीं निवासक्षेत्र शोधावेंसें वाटलें तरच कमी सुप्रगत असा देश जिंकण्याकडे प्रवृत्ति होईल. महाराष्ट्राचा भाग सुपीक नव्हता असें म्हणतां येणार नाहीं. वऱ्हाडची सुपीकता प्रसिद्धच आहे. त्याचें महाराष्ट्रांतील चारहि भागांशीं म्हणजे वऱ्हाड (भोज), पेतनिक (निजामहद्दींतील महाराष्ट्र), राष्ट्रिक व अपरांत या चारहि भागांशीं संबंध जडले होते, पण त्यांस अपरांत तेवढा घशाखालीं घालतां आला. त्याला महाराष्ट्र घशाखालीं घालतां आला नाहीं याचें कारण मुख्यतः भौगोलिक आहे. उत्तरेकडच्या राजाला महाराष्ट्र जिंकण्यास अनेक अडचणी आहेत. प्रवेश करण्याला घाट थोडके आहेत. असें असतां जेव्हां अरण्यें अधिक निबिड असतील तेव्हां विंध्य, सातपुडा हे दोन पर्वत व तापी व नर्मदा या दोन नद्या हीं ओलांडतां ओलांडतां नाकीं नव यावयाचे.

प्राचीन काळापासून राजे लोकांचें ध्येय विजय हें होतें. राजानें इतर राजास जिंकावें ही योग्य महत्त्वाकांक्षा धरली जाई आणि दुसऱ्याच्या देशावर धाड घालणें हें कमीपणाचें समजत नसत. लढाईच्या प्रसंगीं दाखवावयास कांहीं कारण ते दाखवीत नसतील असें नाहीं, तथापि आमचें सार्वभौमत्त्व तुम्ही मान्य करावें असेंही सांगून लढाया होत असतील. अशा राजधर्माच्या व्यावहारिक कल्पनेमुळें प्रत्येक मोठ्या राजाचा संबंध इतर देशाच्या इतिहासाशीं येई. दक्षिणेकडील शातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट हे उत्तरेकडे जेते म्हणून ठाऊक आहेत व उत्तरेच्या राजांनीं दक्षिणेकडील राजांना जिंकलें आहे. मौर्य हे मोठे जेते झाले आणि त्यांच्या सत्तेचा कळस अशोकाच्या कारकीर्दींत झाला. अशोकाच्या कारकीर्दींत मौर्यांची सत्ता चोहोंकडे पसरली होती तरी महाराष्ट्र त्यांच्या सत्ताक्षेत्रांतून वगळला गेला होता असें दिसतें. या परिस्थितीस दुसरीं कांहीं कारणें असतील, पण भौगोलिक कारणें महत्त्वाचीं होतीं. महाराष्ट्रांत उत्तरेकडून येणाऱ्या लोकप्रवाहामुळें लोकवस्ति झालेली नाहीं. लोकवस्ती झाली ती कोंकणांत झाली आणि तशीच उत्तरेकडून विदर्भांत झाली. विदर्भमार्गानें दक्षिणेकडे आणि दक्षिणेकडून गोदावरीच्या कांठानें यावें असा एकंदर वसतीचा अनुक्रम दिसतो. वसतीचा जो अनुक्रम तोच विजयाचा अनुक्रम असें म्हणतां येईल. अशोकाचे विजय देखील दोन बाजूंनीं होत होते. उत्तर व पश्चिम यांच्या विजयांचें पर्यवसान वल्लभीपुरांत एक मौर्य गादीची किंवा राजुकसत्तेची स्थापना होण्यांत झालें आणि नंतर त्यांचें सैन्य समुद्रकांठानेंच शूर्पारकविजयार्थ आलेलें असलें पाहिजे. अशोकाच्या उत्तरेकडील मार्गांत त्यानें गुजरातवर स्वारी केली असावी, व नंतर तेथून अशो-

*भेरीघोष, धर्मघोष, हस्तिदर्शन, अग्निस्कंद यांचा जो अर्थ धरला आहे तो तद्विषयक भगवानलाल इंद्रजी, बूलर, गौरीशंकर ओझा इत्यादिकांचीं मतें पाहून जो मनाला पटला तो दिला आहे.

कानें दक्षिणेकडे देखील मोर्चा फिरविला असावा. त्या सैन्यानें सह्याद्रि ओलांडल्याचें दिसत नाहीं. कलिंगांवर अशोकानें जय मिळविल्यानंतर तो दक्षिणेकडे वळला होता, पण त्यावेळेस त्याचें सैन्य महाराष्ट्राच्या सरहद्दीवर येऊन पुढें तें म्हैसूरकडे वळलें असें दिसतें. त्याचा लेख मस्की येथें आहे, तसेंच म्हैसुरांतहि आहेत. त्याचीं शासनें महाराष्ट्रांत सांपडत नाहींत व त्याच्या शासनांत त्यानें महाराष्ट्र जिंकल्याचा उल्लेख तो करीत नाहीं. दक्षिणेंतील राष्ट्रांमध्यें सतपुत्तीय, केरलपुत्तीय, पांड्य, चोड यांचा उल्लेख करतो. त्याचप्रमाणें रिस्टिक व पेतेनिक यांचा उल्लेख करतो. विदर्भराष्ट्र जरी प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे तरी कोणत्याहि लेखांत त्याचा विदर्भाविषयीं उल्लेख नाहीं. भोजांचा उल्लेख आला आहे व तो पैठणकरांबरोबर आला आहे; तर त्यासंबंधानें चर्चा करावी लागलेच. या सर्व गोष्टींवरून मौर्यांचा संपर्क फक्त कोंकणासच झाला होता, इतर महाराष्ट्रास झाला नव्हता असें म्हणावें लागेल.

## ४१०. मौर्यविजयाचें एकंदर स्वरूप.

४१०. अशोक लेखांचा एकंदर अर्थ पहातां महाराष्ट्रामध्यें मौर्यांची सत्ता कोंकणाबाहेर फारशी नव्हती. मौर्यसत्तेचे उत्तर हिंदुस्थानांत जे सांस्कृतिक परिणाम झाले तेच महाराष्ट्रांत देखील कांहीं अंशीं झाले असले पाहिजेत. अशोकाच्या लेखांत औषधींचें रोपण वगैरे गोष्टी सांगितल्याच आहेत.

गुजरातपासून मुंबईपर्यंत उत्तर कोंकणाची जी एक पट्टी आहे ती मौर्यांनीं जिंकली असावी असें वाटतें. महाराष्ट्राच्या मुख्य भागाला मौर्य शिवलेच नव्हते. ते महाराष्ट्राच्या दक्षिण भागाला म्हणजे उत्तरकर्नाटकाला स्पर्श करिते झाले; एवढेंच नव्हे तर म्हैसूर संस्थानांत उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून कर्नाटक मौर्यांकित झाला असावा असें वाटतें.

प्रकरण ४५ वें.

# अधिक लेखांचें अवलोकन.

## ४११. अशोकाचें शासनशास्त्र.

४११. गिरनार आणि सोपारें येथील अवलोकनाची महाराष्ट्रविषयक फलश्रुति काय आहे ती मागच्या प्रकरणांत दिली आहे. अशोकाचें शासनशास्त्र समजण्यास धौलि लेखांचें अवलोकन अवश्य आहे. आपल्या नोकरांस ज्या आज्ञा आपण करतों त्या प्रजेसहि कळाव्यात याबद्दल घेतलेली खबरदारी यांत दिसत आहे.

इतर लेखांपेक्षां या ठिकाणच्या लेखांत बराच निराळा मजकूर आहे. भाषाविषयक विवेचन करण्याचा जेव्हां प्रसंग येईल तेव्हां या लेखांतील भाषेकडे लक्ष द्यावें लागेलच.

### धौली येथील पहिला निराळा लेख

**( क ) देवानंपियस वचनेन तोसलियं महामात नगलवियोहालका वतविय**

( क ) देवप्रियाच्या वचनानें तोसलि येथील महामात्र जे नगराचे न्यायाधिश आहेत त्यास कळविलें जात आहे कीं

**( ख ) अं किछि दखामि हकं तं इछामि किंति कंमन पटिपादयेहं दुवालते च आलभेहं**

( ख ) जें मी योग्य म्हणून मानतों तें मी अनेक उपायांनीं घडवून आणतों.

**( ग ) एस च मे मोख्यमत दुवाल एतसि अठसि अं तुफेसु अनुसथि**

( ग ) आणि हें ( लिखित ) तुम्हाला सूचना करण्यासाठीं योजलेल्या उपायांतील मुख्य आहे.

**( घ ) तुफे हि बहूसु पानसहसेसुं आयत पनयं गछेम सु मुनिसानं**

( घ ) कांकीं तुम्ही हजारों मनुष्यांशीं त्यांचें प्रेम संपादन करून घेण्यासाठीं गुंतले आहांत.

**( ङ ) सवे मुनिसे पजा ममा**

( ङ ) सर्व लोक मला अपत्यासमान आहेत.

**( च ) अथा पजाये इछामि हकं किंति सवेन हितसुखेन हिदलोकिक-पाललोकिकेन यूजेवू ति ...तथा मुनिसेसु पि इछामि हकं**

( च ) आणि मी आपल्या अपत्यांसाठीं हें इच्छितों कीं त्यांच्या इहलोकींच्या आणि पारलौकिकच्या कल्याणांची तरतूद व्हावी; इतर मनुष्यांविषयीं देखील मी तेंच इच्छितों.

**( छ ) नो च पापुनाथ आवगमुके इयं अठे**

( छ ) माझे हे हेतु किती दूरवर पसरले आहेत हें आपणांस ठाऊक नाहीं काय ?

**( ज ) केछ व एकपुलिसे...नाति एतं से पि देसं नो सवं**

( ज ) कोणा विशिष्ट व्यक्तीला हें समजतें आणि त्याला देखील हें अंशेंकरून समजतें, पुरें समजत नाहीं.

**( झ ) देखतहि तुफे एतं सुविहिता पि**

( झ ) तुमची जरी तरतूद करून ठेवली आहे तरीहि ऐका,

**( ञ ) नितियं एकपुलिसे पि अथि ये बंधनं वा पलिकिलेसं वा पापुनाति**

( ञ ) असें होतें कीं राजव्यवहारांत कोणातरी एकाला बंदिवास अगर कठोर वागणूक प्राप्त होते.

**( ट ) तत होति अकस्मा तेन बधनंतिक अंने च.........हु जने दवियं दुखीयति**

( ट ) जर कोणी दंड चुकविण्याचा हुकूमनामा मिळविला आणि इतरांची शिक्षा चालू राहिली.

**( ठ ) तत इछितविये तुफेहि किंति मझं पटिपादयेमा ति**

( ठ ) अशा प्रसंगीं तुम्ही या सर्वांशीं समतेनें ( म्हणजे पक्षपात न करतां ) वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**( ड ) इमेहि चु जातेहि नो संपटिपजति इसाय आसुलोपेन निठूलियेन तूलनाय अनावूतिय आलसियेन किलमथेन**

( ड ) परंतु पुढील स्वभावामुळें मनुष्याकडून योग्य वागणूक होत नाहीं. ते स्वभाव म्हटले म्हणजे असूया, राग, क्रूरता, घाई, आळस आणि थकवा हीं होत.

(ढ) से इछितविये किंति एते जाता नो हुवेवु ममा ति

(ढ) तर तुम्ही हे स्वभाव आपल्या ठायीं उत्पन्न होऊं नये म्हणून प्रयत्न केला पाहिजे.

(ण) एतस च सवस मूले अनासुलोपे अतूलना च

(ण) या सर्व गोष्टींच्या मागें क्रोधाचा आणि घाईचा अभाव हीं पाहिजेत.

(त) नितियं ए किलंते सिया न ते उगछ संचलितविये तु वटितविये एतविये वा

(त) जो थकला आहे तो चढूं शकणार नाहीं; परंतु प्रत्येकानें हालले पाहिजे, चाललें पाहिजे आणि पुढें गेलें पाहिजे.

(थ) हेवंमेव ए दखेय तुफाक तेन वतविये आनंने देखत हेवं च हेवं च देवानंपियस अनुसथि

(थ) जो इकडे लक्ष देईल त्यानें तुम्हास सांगितलें पाहिजे कीं तुम्ही आनृण्य जोडा, आणि देवप्रियाची आज्ञा अशी अशी आहे.

(द) से महाफले ए तस संपाटिपाद महाअपाये असंपटिपति

(द) याचें अवलंबन अत्यंत फलदायी आहे आणि अनवलंबन हें मोठें अनिष्ट आहे.

(ध) विपटिपादयमीने हि एतं नाथि स्वगस आलधि नो लाजालधि

(ध) कांकीं जर कोणी याचें अवलंबन चुकवील तर स्वर्गप्राप्ती होणार नाहीं व राज(प्रीति)लाभ देखील होणार नाहीं.

(न) दुआहले हि इमस कंमस मे कुते मनो अतिलेके

(न) कांकीं जर कोणी आपलें कर्तव्य चुकवील तर माझें मन प्रसन्न कसें होईल ?

(प) संपटिपजमीने चु एतं स्वगं आलाधयिसथ मम च आननियं एहथ

(प) पण जर तुम्ही याचें अवलंबन कराल तर स्वर्ग मिळवाल आणि तुम्ही माझ्या ऋणापासून मुक्त व्हाल.

(फ) इयं च लिपि तिसनखतेन सोतविया

(फ) हें शासन (लिपि) सर्वांनीं तिष्य नक्षत्राच्या प्रसंगीं ऐकावें.

(ब) अंतला पि च तिसेन खनसि खनसि एकेन पि सोतविय

(ब) आणि तिष्य नक्षत्र असतां हें प्रत्येकानें आणि अनेकदां ऐकत जावें.

(भ) हेवं च कलंतं तुफे चघथ संपटिपादयितवे

(भ) आणि जर तुम्ही असें वागाल तर तुम्ही आपलें कर्तव्य करूं शकाल.

(म) एताये अठाये इयं लिपि लिखित हिद एन नगलवियोहालका सस्वतं समयं यूजेवू ति.........नस अकस्मा पलिबोधे व अकस्मा पलिकिलेसे व नो सिया ति

(म) पुढील हेतूसाठीं ही लिपि येथें लिहिली आहे, (कीं) नगराच्या न्यायाधिशांनीं यासाठीं नेहमीं प्रयत्न करावा म्हणून आणि गैरवाजवी बंधनें उत्पन्न होऊं नयेत आणि लोकांना कठोर रीतीनें वागविलें जाऊं नये म्हणून.

(य) एताये च अठाये हकं.......मते पंचसु पंचसु वसेसु निखामयिसामि ए अखखसे अचंडे सखिनालंभे होसति एतं अठं जानितु........तथा कलंति अय मम अनुसथी ति

(य) आणि या हेतूच्या सिद्धीसाठीं मी दर पांच वर्षांनीं असा (एक महामात्र) पाठवीन कीं जो फार कठोर नसेल किंवा भीषण नसेल तर सौम्य असेल. तो हें पाहील कीं न्यायाचे अधिकारी मी जें शासन घालून दिलें आहे त्याप्रमाणें वागत आहेत कीं नाहींत.

(र) उजेनिते पि चु कुमाले एताये व अठाये निखामयिस...हेदिसमेव वगं नो च अतिकामयिसति तिंनि वसानि

(र) तसेंच उज्जयिनीहून त्याच हेतूसाठीं दर कुमार त्याच प्रकारचा एक अधिकारी पाठवील. असा हेतु कीं निरीक्षणाशिवाय तीन वर्षे देखील जाऊं नयेत.

(ल) हेमेव तखसिलाते पि

(ल) त्याच्याप्रमाणें तक्षशिलेहून देखील एक अधिकारी पाठविला जाईल.

**( व ) अदा अ ...... ते महामाता तिखमिसंति अनुसयानं तदा अहापयितु अतने कंमं एतं पि तं पि तथा कलंति अथ लाजिने अनुसथी ति**

( व ) जेव्हां हे महामात्र दौऱ्यावर निघतील तेव्हां ते स्वतःचें कर्तव्य न दुर्लक्षितां न्यायाधिश राजाज्ञेप्रमाणें काम करीत आहेत किंवा नाहीं हें पहातील.

## ४०२ अशोकाच्या राजनीतींतील दुसरें अंग.

४१२ शासनशास्त्रामध्यें दोन भाग असतात. आंतील व्यवस्था आणि परदेशाशीं राजकारण. वाढती साम्राज्यसत्ता. परदेशास आपल्याविषयीं विश्वास वाटावा म्हणून काय धडपडी सम्राट अशोक करीत होता हें धौलीच्या दुसऱ्या लेखावरून स्पष्ट होईल. यांत दिलेल्या आश्वासनासारखीं आश्वासनें एकीकडे द्यावयाचीं आणि आपला प्रदेश वाढवावयाचा ही अशोकनीति अपरांतक उदाहरणावरून स्पष्टच आहे. असेंहि असेल कीं अशोकाची इच्छा नसतांना कुलंगडीं उपस्थित होऊन त्याच्या शासनाखालीं प्रवेश घेत असतील.

### धौली येथील दुसरा निराळा लेख

**( क ) देवानंपियस वचनेन तोसलियं कुमाले महामाता च वतविय**

( क ) देवानांप्रियाच्या आज्ञेप्रमाणें तोसलि येथील कुमार आणि महामात्र सांगितले जात आहेत कीं

**( ख ) अं किछि दखामि हकं तं इ...दुवालते च आलभेहं**

( ख ) जें मी ( योग्य ) समजतों तें...अनेक उपायांनीं घडवितों.

**( ग ) एस च मे मोख्यमत दुवाला एतसि अठसि अं तुफेसु...मम**

( ग ) आणि हें इष्ट हेतूच्या साधनेसाठीं मुख्य साधन मला वाटतें...तुम्हाला

**( घ ) अथ पजाये इछामि हकं किंति सवेन हितसुखेन हिदलोकिक पाललोकिकाये युजेवू ति हेवं...**

( घ ) माझ्या मुलाच्या तर्फेनें मी इच्छितों कीं या जगांतील सर्व सुख आणि कल्याण आणि परलोकींचें कल्याण त्यांस प्राप्त व्हावें आणि....

**( ङ ) सिया अंतानं अविजितानं किं छदे सु लाज अफेसु...**

( ङ ) सरहद्दीवरील जे प्रदेश मी जिंकले नाहींत तेथीलोकांना असा विचार येत असेल कीं "आपल्यासंबंधानें या राजाचा विचार काय आहे."

**( च )...मम इछ मम अंतेसु....ि पापुनेवु ते इति देवानंपिय....अनुविगिन ममाये हुवेवू ति अस्वसेवु च सुखंमेव लहेवु ममते नो दुखं हेवं...., नेवू इति खमिसति ने देवानंपिये अफाका ति ए चकिये खामतवे मम निमितं व च धंमं चलेवू हिदलोक पललोकं च आलाधयेवू**

( च ) माझी सरहद्दीकरांसंबंधीं एवढीच इच्छा आहे कीं त्यांनीं माझ्यासंबंधानें भीति बाळगूं नये. माझ्यासंबंधानें विश्वास ठेवावा कीं माझ्यापासून त्यांना दुःख होणार नाहीं सुखच होईल. देवानांप्रिय जें क्षम्य आहे त्याची क्षमा करील. त्यांनीं धर्मानें चालावें आणि इहलोकीं सौख्याची प्राप्ति करून घ्यावी

**( छ ) एतसि अठसि हकं अनुसासामि तुफे अनने एतकन हकं अनुसासितु छंदं च वेदितु आ हि धिति पटिञा च ममा अजला.**

( छ ) पुढील हेतूसाठीं मी तुम्हांस सांगत आहें [ तो हेतु म्हटला म्हणजे ] मी आनृण्य जोडावें आणि माझे अचल नियम आणि व्रतें हीं तुम्हांस कळावींत

**( ज ) से हेवं कटु कंमे चलितविये अस्वास.... ि च तानि एन पापुनेवू इति अथ पिता तथ देवानंपिये अफाक अथा च अतानं हेवं देवानंपिये अनुकंपति अफे अथा च पजा हेवं मये देवानंपियस**

( ज ) यासाठीं तुम्ही आपलें कर्तव्य तसें करावें. त्यांना असें वाटावें कीं देवानांप्रिय त्यांना पितृतुल्य आहे. ते देवानांप्रियास मुलांसारखे आणि तो त्यांवर मुलासारखें प्रेम करतो.

**( झ ) से हकं अनुसासितु छंद च वेदितु तुफाक देवावुतिक होसामि एताये अठाये**

( झ ) माझी इच्छा येणेंप्रमाणें तुम्हास कळविली जात आहे आणि माझ्या अधिकाऱ्यांस त्याप्रमाणें समजाविलें जात आहे.

(ञ) **पटिबला हि तुफे अस्वासनाये हितसुखाये च तेस हिद्लोकिक पाललोकिकाये**

(ञ) कांकीं तुम्ही त्या शेजाऱ्यांमध्यें विश्वास उत्पन्न करूं शकाल आणि त्यांचें इहलोकीं आणि परलोकीं कल्याण साधूं शकाल.

(ट) **हेवं च कलंतं तुफे स्वगं आलाधयिसथ मम च आननियं एहथ**

(ट) आणि तुम्ही जर असें वागाल तरच माझें ऋण फेडाल.

(ठ) **एताये च अठाये इयं लिपि लिखिता हिद् एन महामाता स्वसतं सम युजिसंति अस्वासनाये धंम चलनाये च तेस अंतानं**

(ठ) आणि पुढील हेतूसाठीं ही लिपि लिहिली जात आहे. महामात्रांनीं सर्व काळ शेजाऱ्यांमध्यें विश्वास उत्पन्न करून त्यांजकडून धर्माचरण करवावें.

(ड) **इयं च लिपि अनुचातुंमास तिसेन नखतेन सोतविया**

(ड) दर चार महिन्यांनीं तिष्य नक्षत्रीं ही लिपि ऐकावी.

(ढ) **कामं चु खणसि खनसि अंतला पि तिसेन एकेन पि सोतविय**

(ढ) पण इच्छा असल्यास तिष्याच्या मधल्या काळांत देखील वारंवार ऐकवावी.

(ण) **हेवं कलंतं तुफे चघथ संपटिपादयितवे**

(ण) जर असे वागत जाल तर तुम्ही माझा हुकूम अंमलांत आणाल.

## ४१३. अशोकलेखांत अशोकाचें नांव आणि जंबुद्वीपाचा उल्लेख.

४१३. या दृष्टीनें महत्त्वाचा लेख म्हटला म्हणजे **मस्की येथील शिलालेख** होय. तो पुढीलप्रमाणें आहे. कंसांतील अक्षरें सेनार्ट आणि कृष्णस्वामी यांच्या सूचनांचा विचार करून घातलीं आहेत.

### मस्की येथील लेख.

(क) **देवानं पियस असोकस** [वचनेन अधिकानि]

(क) देवप्रिय अशोकाचें शासन.

(ख) **अढति** [या] **नि वषानि । अं सूमि बुधशके** [सा]

(ख) मी बुद्ध शाक्याचा उपासक झाल्यास अडीच वर्षांवर काळ झाला.

(ग) **तिरे** [के अंसु] **मि संघं उपनते उठ** [नाच सु] **मि उपगते**

(ग) आणि मी संघाला भेट दिल्याला त्याहूनहि अधिक काळ लोटला, आणि—(?)

(घ) **पुरेऽजंबु** [दीप] **सि ये अमिसा देवा हुसू ते दानि मिसिभूता**

(घ) जंबुद्वीपामध्यें जे देव मनुष्यांशीं मिसळत नव्हते ते आतां मिसळूं लागले आहेत.

(ङ) **इय अठे खुदकेन पि धमयुतेन सके अधिगतवे**

(ङ) आणि हीन स्थितींतला मनुष्यदेखील धर्मयुक्त असेल तर तो साध्य साधील.

(च) **न हेवं दखितविये उडालके व इम अधि गछेया ति**

(च) केवळ उच्च मनुष्य तें साध्य साधील असें समजूं नये.

(छ) **खुदके च उडालके च वतविया हवं वे कलंतं भदके से अ** [थेति] **तिकेच वढिसिति चा दिढ दियं हेवं ति**

(छ) क्षुद्रस्थानीय व उच्चस्थानीय या दोघांना समजवावें कीं तुम्ही जर असें (धर्मयुक्त) वागाल तर चिरकाल वृद्धि पावाल आणि कल्याणदेखील दीडपट होईल.

मस्की येथील शिलालेखाचें भाषांतर हुल्शनें केलेल्या भाषांतराच्या सहाय्यानें मांडलें आहे पण तें भाषांतर, विशेषतः शेवटच्या परिच्छेदाचें भाषांतर, बरोबर आहे अशी खात्री देतां येत नाहीं. मूळांतील अक्षरांची कल्पना करतांना व अर्थ लावतांना सेनार्ट व कृष्णशास्त्री या दोघांनींहि रूपनाथ, सहस्र, व बैरत या तिन्ही ठिकाणच्या लेखांची मदत घेतली आहे.

मस्कीचा शिलालेख हा लहानसा आहे पण आपणांस तो दोन दृष्टींनीं महत्त्वाचा आहे एक तर हा महाराष्ट्राच्या सरहद्दीवर म्हणजे रायचूर जिल्ह्यांतला आहे म्हणून याचें महत्त्व आपणास आहे तथापि प्राचीन लेखशास्त्राच्याच दृष्टीनें याचें ऐतिहासिक महत्त्व म्हटलें म्हणजे देवानांप्रिय म्हणविणारा राजा अशोकच होता हें या लेखावरून निःसंशय ठरतें. या लेखाचें दुसरें महत्त्व म्हटलें म्हणजे अशोक हा

आपल्या उत्तरवयांत बौद्ध झाला होता याला जे लेख पुराव्यादाखल आहेत त्यांतील हा एक आहे. अशोकाचीं जीं १४ शासनें आहेत त्यांवरून अशोक हा बौद्धच होता असें खात्रीनें म्हणतां येणार नाहीं. चौदा शासनांत तो बौद्धधर्माचा अभिमानी मुळींच दिसत नसून तो साम्राज्यधर्मप्रवक्ता दिसत आहे.

### ४१४. मौर्य साम्राज्याचें अचिरत्व.

४१४. मौर्यसाम्राज्यसत्तेखालीं उत्तर कोंकणदेखील अत्यंत थोडका वेळ असला पाहिजे. कारण मौर्यसत्ता खुद्द मगधांतच नष्ट होऊन तेथें शुंग आले व त्यामुळें दक्षिणेकडे मौर्य खंडितमूल झाल्यामुळें त्यांचें लहानसें स्वतंत्र राज्य बनलें. या कालानंतर जें मौर्यांचें राज्य होतें तें स्वतंत्र महाराष्ट्रीयांचें राज्य होतें. दक्षिणेकडे शातवाहनांस उर्जित दशा येऊन त्यांनीं सर्व हिंदुस्थान हळूहळू पादाक्रांत केला. ज्याअर्थी मौर्य साम्राज्यसत्ता दक्षिणेंत थोडकाच वेळ टिकली त्याअर्थी दक्षिणेच्या सामाजिक स्थितीचें विवेचन मौर्यांच्या प्रकरणांत समाविष्ट करण्याची आवश्यकता नाहीं. ज्या शातवाहनाचें राज्य बराच वेळ टिकलें आणि ज्यांच्यायोगानें महाराष्ट्रास अखिलभारतीय महत्त्व आलें त्या शातवाहनाविषयीं विवेचन करतांना महाराष्ट्रांतील व दक्षिणच्या इतर देशांतील सामाजिक स्थितीचें विवेचन स्वाभाविक होईल. प्राचीन पौराणिक उल्लेख आणि शिलालेख यांची तुलना करून दोहोंमधल्या काळाच्या समाजाचें अनुमान चित्र काढलें पाहिजे व हा परिश्रम करतांना वाङ्मयसाहित्य देखील उपयोगिलें पाहिजे. हा सर्व अभ्यास अधिक व्यापक जें शातवाहनविषयसाहित्य त्याचा उपयोग करतांना येईल; यासाठीं केवळ अशोकलेखापासूनच जे प्रत्यक्ष निर्णय निघतात तेवढेच येथें घेऊन ते माहितीचे अंश एकंदर शातवाहनीय सामाजिक परिस्थितीच्या विवेचनांत समाविष्ट करूं.

### ४१५. मौर्यसत्तेचे सामाजिक परिणाम.

४१५. मौर्यांचें साम्राज्य महाराष्ट्रांत अल्पकाळ होतें तरी त्याचे सामाजिक परिणाम काय झाले असतील हें शोधणें आवश्यक आहे. केवळ स्वारी करणें यामुळें व कांहीं काळ जिंकण्यामुळें कांहींतरी सामाजिक आणि सांस्कृतिक फेरफार होणारच. थोडा वेळ टिकणाऱ्या राजाचे मुलुख वसविणें, शेतकी वाढविणें, व्यापार वाढणें इत्यादि परिणाम फारसे चिरकाल नसतील आणि कौटुंबिक आयुष्यक्रमावर तर मुळींच नसतील. राज्याचे जे सामाजिक परिणाम होतात त्यांत विशिष्ट जातीच्या लोकांना प्रामुख्य प्राप्त होतें हा एक आहे. विल्यम दि कॉकररच्याबरोबर नार्मन लोक उच्चस्थानीय झाले तसें मौर्यांच्या योगानें काय झालें असावें हा प्रश्न आहे. याविषयीं असें सांगतां येईल कीं जे सामाजिकदृष्ट्या वृषल होते ते सम्राट झाले. त्याचा परिणाम सामाजिकस्थाननिर्णायक विचारावर झाल्याशिवाय कसा राहील? त्याचा परिणाम मोठा झालाच पण तो दक्षिणेंत फारसा न होतां उत्तरेस झाला. कारण चातुर्वर्ण्याची कल्पना उत्तरेकडील होती. दक्षिणेकडे दोनच वर्णांची कल्पना प्रचलित होती. त्याविषयीं सविस्तर विवेचन प्रसंगानुरूप येईलच.

### ४१६. लेखनकलेचें दक्षिणेकडे आगमन.

४१६. मौर्यांच्या स्वारीचे दक्षिणेवर जे परिणाम झाले त्या परिणामामध्यें एक महत्त्वाचा परिणाम म्हटला म्हणजे दक्षिणेकडे लेखनकला आली हा होय. सोपाऱ्याच्या शिलेवर अशोककालीन ब्राह्मी लिपीच आढळते. ही लिपि अशोककालींच निर्माण झाली असणें शक्य नाहीं. कांकीं अशोकाचीं लिखाणें ब्राह्मींत त्याप्रमाणेंच खरोष्ट्रींतहि आहेत. या सुमारास जर प्रथमच लिपिकला अगर लेखनकला अस्तित्वांत असती तर अशोकशासनें एकच लिपींत लिहिलीं गेलीं असतीं. पण तसें झालें नाहीं. पंजाब हा खरोष्ट्री लिपीचा मुलूख आहे आणि पंजाबेतर हिंदुस्थानांत ब्राह्मी लिपींत अशोकशासनें कोरलीं गेलीं आहेत. यावरून अशोकाच्या पूर्वीच्या काळीं दोन्ही लिपींचा प्रसार असला पाहिजे हें उघड आहे. लेखनप्रचार जुना नसता आणि नवीनच सुरू करावयाचा असता तर अशोकसाम्राज्यभर एकच लिपि अस्तित्वांत आली असती. साम्राज्यासारखी मोठी राज्यघटना दोन निरनिराळ्या लिपि उत्पादीत नाहीं, तर उलट अनेक लिपि प्रचलित असल्या तर त्यांतील थोड्या लिपींस प्राधान्य देऊन त्यांचें क्षेत्र वाढविते असा चोहोंकडे अनुभव आहे. यावरून असें दिसतें कीं ज्याअर्थी दोन लिपींत अशोकशासनें आहेत त्याअर्थी दोन्हीं लिपी अगोदरच्या काळापासून समाजांत रूढ असल्या पाहिजेत. अशोकाची ब्राह्मी लिपि पाटणा येथून निघून चोहोंकडे पसरली असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं. कारण साम्राज्याच्या एका भागांत एखादी गोष्ट उपलब्ध झाली म्हणजे तिचा प्रसार साम्राज्यसंस्थेमार्फत चोहोंकडे होऊं शकतो.

मौर्यांच्या लिपीच्या अवलोकनापासून एक कल्पना येते ती येणेंप्रमाणें. अशोक पंजाबांत उपराजा असतां तक्षशिलेंत कारभार पहात होता व तेथें त्याचा खरोष्ट्री लिपीशीं परिचय होऊन लिपीची उपयुक्तता भासली असावी व पुढें त्यानें खरोष्ट्रीच्या आधारावर तयार केलेली स्वतः

नवीन लिपि सुरू केली असणें शक्य आहे. अशोक लिपीचीं अक्षरें आपण घेतलीं तर तीं अगदीं प्राथमिक स्वरूपाचीं आहेत व पूर्वीच्या लिपी पाहून मुद्दाम निर्माण केलीं असण्याच्या संभव आहे. आजची देवनागरी ब्राह्मी लिपीचें एक उत्तरकालीन स्वरूप आहे व तें चोहोंकडे पसरलें पण स्थानिक लिपी त्याच उगमापासून निघाल्या. महाराष्ट्राची खरी स्थानिक लिपी मोडी होय. मोडी लिपि मौर्यांपासून उत्पन्न झाली असें दाखविण्याचा प्रयत्न चांदोरकरांनीं मागें केला आहे. त्या प्रयत्नाचा धागा घेऊन त्यावर पुन्हां विचार फारसा झाला नाहीं. चांदोरकरांचें म्हणणें दुर्लक्ष करण्याजोगें नाहीं. कारण जरी महाराष्ट्रांतील शिलालेखांत अशोकलिपीपासून चालू झालेली परंपरा दाखवितां येते तरी ती पुढें टिकली नाहीं. महाराष्ट्रांतील अशोककालीन ब्राह्मीपासून जी परंपरा सुरू झाली तिचें सातत्य बरेच दिवस चालू होतें असें दिसतें. पण आजची देवनागरी त्या परंपरेचा परिणाम नव्हे. ब्राह्मीचें उत्तरेकडे जें एक रूपांतर झालें त्या रूपांतरानें संस्कृत भाषेचा आश्रय केला आणि संस्कृत भाषेमार्फत अखिल भारतीयत्व मिळविलें असा नागरीप्रसाराचा इतिहास आहे. मोडी लिपीस सामान्य लोक मराठी म्हणतात. मराठी व बालबोध असा विरुद्धतान्यास करतात. गुजरात, बंगाल इत्यादि ठिकाणीं ज्याप्रमाणें भिन्न लिपिविकास झाला त्याप्रमाणें तो महाराष्ट्रांतहि झाला. पण त्या लिपीचें सातत्य मौर्यकालापासून अजून मांडलें गेलें नाहीं.

सोपाऱ्याजवळ म्हणजे उत्तर कोंकणांत कायस्थ प्रभूंची वस्ती आहे आणि तेथील लेखकवर्गात प्रभूंचेंच प्राधान्य आहे. त्या अर्थी हा लेखकवर्ग मौर्यकालींच कोंकणांत येऊन स्थाईक झाला असणें शक्य आहे.

दक्षिणेकडील एका ब्राम्ही लेखांत "चपडेन लिखितं लिपिकरेण" अशी सही खरोष्टींत केली आहे त्यावरून लेखकाच्या घरची लिपि खरोष्ठी होती असें दिसतें. खरोष्ठीचा मूळ प्रदेश पंजाब. तर खरोष्ठी सहीवरून दक्षिणेकडील मूळ लेखकवर्ग पजाबांतून आला असावा असे अनुमान होतें.

### ४१७. उत्तरकालीन लेखांत मौर्यांच्या उल्लेखाचा अभाव.

४१७. मौर्यांचे महाराष्ट्रांत अवशेष कोठेंच सांपडत नाहींत आणि रुद्रदाम्यानें ज्याप्रमाणें आपल्या लेखांत पूर्वकालीन मौर्यांचा उल्लेख केला आहे तसा उल्लेख महाराष्ट्रांत उत्तरकालीं कोणताच शिलालेख अगर ताम्रपट करीत नाहीं ही गोष्ट विचारांत घेण्याजोगी आहे. त्यावरून मौर्यसत्तेची आठवण देखील लोकांस राहिली नाहीं इतकी ती अल्पकाल होती असें दिसतें.

डॉ. भांडारकर व रा. बखले यांनीं मौर्यांच्या सत्तेखालीं महाराष्ट्र असावा अशी जी कल्पना केली आहे ती माझ्या मतें चुकीची आहे. दक्षिणेंत मौर्यांच्या लेखांच्या काळापासून नानाघाट व जुन्नर येथील शातवाहनांच्या लेखांचा काळ फारसा दूर नाहीं असें लिपिवेत्यांस वाटतें व शातवाहनांचा उत्कर्षारंभाकाल ख्रि. पू. २५० असाच जयस्वाल इत्यादि मंडळी ठरवितात. तें त्यांचें म्हणणें स्वीकारण्यास हरकत दिसत नाहीं त्या म्हणण्याची सविस्तर मांडणी परीक्षणासह पुढें येईलच. शातवाहनांचा उत्कर्ष जरी ख्रि पू. २५० सालीं दिसतो तरी त्यांच्या सत्तेला अगोदरच बळकटी आली असल्यामुळें मौर्यांना आपली सत्ता दक्षिणेकडे वाढवितां आली नसावी.

### ४१८. विदर्भावर मौर्यसत्ता; ती संबंधानें कालिदासाची साक्ष; ही निरुपयोगी आहे.

४१८. महाराष्ट्रांतील मौर्यकालाच्या स्पष्टीकरणार्थ कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकाचा उपयोग मुळींच करतां येणार नाहीं. कालिदासानें प्रस्तुत नाटकांत जी परिस्थिति दाखविली आहे ती येणेंप्रमाणें. शुंगांनीं जेव्हां मौर्यराज्य विश्वासघात करून घेतलें तेव्हां विदर्भ देशाचा राजा मौर्यांचा पक्षपाती होता व विदर्भराजाचा मेहुणा मौर्यसचिव होता. शुंगांनीं त्याला तुरुंगांत घातलें त्यामुळें विदर्भराजानें शुंगांना अप्रिय असें वर्तन केलें. शुंगांच्या ताब्यांत त्या वेळेस माळवा किंवा निदान माळव्याचा भाग विदिशा हा होता. आणि विदिशा देशावर पुष्यमित्राचा मुलगा अग्निमित्र हा राज्य करीत होता. अग्निमित्र हा विदर्भ देशाच्या राजाच्या दायादाचा पक्षपाती होता. अग्निमित्राचा एकंदर डाव असा होता कीं विदर्भाच्या राजाच्या दायादाची बहीण मालविका हिच्याशीं लग्न करावें, मेहुण्याचा पक्ष घ्यावा आणि त्या निमित्तानें विदर्भाच्या राज्यांत ढवळाढवळ करावी. मालवाधिपतीचा हा हेतु यशस्वी झाला आहे, आणि आपल्या मेहुण्याचा पक्ष घ्यावयाचा या निमित्तानें मालवराजानें विदर्भाचे दोन तुकडे केले असें कालिदासानें नाटकांत दाखविलें आहे.

या प्रकारचें जें कथासूत्र मालविकाग्निमित्र नाटकांत आलें आहे तें बेसावधपणें स्वीकारून सर डॉ. भांडारकर आणि रा. बखले यांनीं या नाटकाला ऐतिहासिक महत्त्व दिलें आहे. माझ्या मतें असें महत्त्व बिलकुल देतां येणार नाहीं आणि मौर्यकालाच्या अंतिम भागावर प्रकाश पाडण्यासाठीं कालिदा-

साचें नाटक मुळींच उपयोगितां येणार नाहीं. हें नाटक मौर्यकालीन परिस्थितीचें स्पष्टीकरण करीत नसलें तरी कालिदासकालीन परिस्थितीचें स्पष्टीकरण करीत आहे. या नाटकावरून कालिदासाच्या काळचा विदर्भविषयक इतिहास कसा काय व्यक्त होतो याचें सविस्तर विवेचन पुढें येईलच.

### ४१९. मौर्यकाळीं महाराष्ट्राची राजकीय स्थिति.

४१९. शालिवाहन शक सुरू होण्यापूर्वीच्या शतकांत महाराष्ट्राचें एकंदर स्वरूप तरी काय असावें याचें संघटित चित्र आतांपर्यंतच्या विवेचनावरून जुळवितां येण्याजोगें आहे. महाराष्ट्राचे कोंकण, देश व वऱ्हाड असे तीन भाग कल्पिले तर प्रत्येक भागासंबंधानें आपणास माहिती मिळत आहे.

कोंकणांतील उत्तर भाग मौर्यसत्तेखालीं असावा आणि कोकणांत दक्षिण भाग मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र व विदर्भ यास मौर्यसत्तेचा संपर्कहि लागला नसावा. नानाघाट कृत्रिम खणलेला घाट आहे व तो खणण्यास संघटित सत्ता पाठीमागें असल्याशिवाय हा खर्च झालेला नाहीं. व हा घाट तयार करण्याची क्रिया शातवाहनांकडून झाली असली पाहिजे. नानाघाट व त्यांतील लेख यांविषयीं सविस्तर विवेचन पुढें येणारच आहे.

दक्षिणेंत स्वतंत्र राज्यें होतीं व दक्षिणेकडची अशोकाच्या काळांत जमीन चांगली सुपीक असल्यामुळें तिथें संपत्ति देखील चांगली असली पाहिजे असें गुहांवरून वाटतें. मोठमोठ्या गुहा उत्तरकाळीं तयार झाल्या त्या एका पिढींत तयार झाल्या नाहींत तथापि गुहांचें खोदन व्हावयास सुरवात अशोककाळींच किंबहुना त्याच्या अगोदरच झाली असणें शक्य आहे. उदयगिरीची सर्वांत जुनी गुहा धरतात. पण ही तरी केवळ कल्पनाच आहे; त्या कल्पनेची सत्यता सहज सिद्ध होणार नाहीं.

मगधाकडील गुहांना जर अशोकपूर्व काल देण्यांत येत नाहीं तर महाराष्ट्रांत त्या गुहा अशोकाच्या अनुयायांच्या दृष्टीस पडून तिकडे गेल्या नाहींत कशावरून ? गुहांचें प्राचुर्य जसें महाराष्ट्रांत आहे तसें ओरिसांत नाहीं; त्यावरून गुहा ही महाराष्ट्रीय संस्थाच अगोदर असून नंतर ती ओरिसांत गेली असणें अशक्य नाहीं. साध्या व कोरींव कामाच्या अशा दोन्ही प्रकारच्या गुहा महाराष्ट्रांत आहेत, व त्या निरनिराळ्या काळाच्या दानानीं वाढत गेल्या आहेत. या गुहांच्या प्राचीनतेसंबंधानें आणि भिन्न काळांत विकासासंबंधानें सविस्तर विवेचन पुढें येईल. येथें एवढंच सांगतों कीं गुहांचें अस्तित्त्व निदान अशोक काळीं होतें व अशोक पूर्व काळीं देखील असेल आणि गुहांचें अस्तित्व जी परिस्थिति शक्य करते ती परिस्थिति अशोकपूर्व काळींच महाराष्ट्रांत होती. गुहांचे अस्तित्त्वावरून असें म्हणणें प्राप्त आहे कीं, आसपास कांहीं अंतरावर लोकवस्ती असली पाहिजे, व योग्याचा योगक्षेम आपण चालवावा या तऱ्हेची मनस्थिति जनतेमध्यें असला पाहिजे. बौद्धधर्म महाराष्ट्रांत सुरू होण्यापूर्वी शैवधर्म आणि त्याबरोबर संवृद्ध झालेली यतिवृत्ति यांचें अस्तित्त्व महाराष्ट्रांत बुद्धपूर्वकाळीं असलें पाहिजे अशीच कल्पना पौराणिक वाङ्मय आणि बृहत्कथा यांवरून होते.

### ४२०. मौर्य सत्तेसंबंधानें स्थूल विधान.

४२०. महाराष्ट्रांतील मौर्यकालासंबंधानें आपणास विधान पुढील प्रमाणें करतां येईल.

अपरांतांत म्हणजे कोकणांत मौर्यांचा अंमल होता. आणि अशोकाच्या वेळेस जी मौर्यसत्ता स्थापन झाली असेल तिचें पर्यवसान एखादें मौर्य घराणें महाराष्ट्रांत कायम होण्यांत झालें असलें पाहिजे. नल, मौर्य आणि कदंब यांच्या पराभवाचें श्रेय ते होळी येथील जैन देवालयांतील लेखांत रविकीर्ति चालुक्यांत आहे तरी त्यांच्या त्या विधानावरून मौर्यांची सत्ता साहाव्या शतकापर्यंत टिकून राहिली होती यांत शंका नाहीं. ही मौर्यांची सत्ता म्हणजे मागध मौर्यांची नव्हे तर दाक्षिणात्य मौर्यांची असली पाहिजे; जेव्हां मूळ घराण्याच्या अस्तित्त्वावर शुंगांकडून घाव घातला गेला तेव्हां जे मौर्यांचे सेवक किंवा अंकित पूर्वी होते त्यांना स्वाभाविकपणें स्वातंत्र्य प्राप्त झालें. रविकीर्ति मौर्यांचा जो उल्लेख करीत आहे त्यावरून असें दिसतें कीं, पहिल्या कीर्तिवर्म्याच्या काळीं नल, मौर्य आणि कदंब ही त्रयी चालुक्यांनीं पराभूत केली व दुसऱ्या पुलकेशीच्या काळांत गंग अलूप अलूप आणि मौर्य ही त्रयी पराभूत केली. या दुसऱ्या त्रयींतील राष्ट्रें कोंकणांत होतीं हेंहि रविकीर्ति सांगत आहे.

मौर्यांची राजधानी "पुरी" होती असें ऐहोळीच्या लेखांत सांगितलें आहे. ही पुरी कोणती असावी यांविषयीं कल्पना करण्यांत आल्या आहेत. ही मौर्यांची पुरी आणि शिलाहारांची राजधानी पुरी या दोन्ही एकच होत्या काय हाहि एक प्रश्न सुटावयाचा आहे. शिलाहारांची पुरी "रत्नाकराच्या दैवाची देवता" अशा पदवीनें उल्लेखिली आहे.

पुरी कित्येकांच्या मतें ठाणें असावें, कित्येकांच्या मतें घारापुरी असावी तर कित्येकांच्या मतें दंडाराजपुरी (कुलाबा) असावी. या संबंधानें निश्चयात्मक आज कांहींच सांगतां येत नाहीं. संशोधकांपैकीं अधिकांची प्रवृत्ति घारापुरी हीच मौर्यांची पुरी असें मानण्याकडे आहे. मालविकाग्निमित्रामध्यें कालिदास

विदर्भावर मगधाचा अधिकार स्थापन झाला होता असें सांगत आहे तें जरी विश्वसनीय नसलें तरी अशक्यहि नाहीं. भोज आणि पितनिक्य यांचा उल्लेख अशोकलेखांत आहे, तो मागें आलाच आहे; आणि त्यावरून भोजांवर म्हणजे वऱ्हाडवर अशोकाची सत्ता स्थापन झाली होती असें दिसत नाहीं.

कालिदासाचें हें नाटक महत्त्वाच्या ऐतिहासिक काळावर आहे, तथापि प्राचीन इतिहासावर प्रकाश पाडावा या हेतूनें त्यांत रचना नाहीं. नाटकाचे हेतु केवळ प्रचलित समाजावर टीका करून आणि शेजारचा देश जो विदर्भ त्याच्यावर टीका करून मालवीय जनतेस खुष करावें हा होता, आणि नाटकाला इतिहासस्वरूप केवळ निमित्तादाखल द्यावयाचें होतें; कारण त्या नाटकाच्या योगानें जर टीकाविषय झालेल्या स्थानिक व्यक्ति प्रक्षुब्ध झाल्या तर नाटकाचें स्वरूप ऐतिहासिक आहे असें सांगून ऐतिहासिकतेच्या मागें लपावें असा कवीचा हेतु दिसतो, आणि यासाठीं ऐतिहासिक उल्लेख केवळ श्रोत्यांना चुकवण्यापुरते आहेत, इतिहासाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं नाहींत. ऐतिहासिक कालाचें समाजचित्र काढावें अशी कालिदासास फिकीरच नव्हती. नाटकांत ऐतिहासिक उल्लेख आहेत, परंतु त्या काळच्या वातावरणाचा पूर्ण अभाव आहे. जर कालिदासाला खरोखरच ऐतिहासिक चित्र दाखवावयाचें असतें किंवा निदान ऐतिहासिक वातावरण उत्पन्न करावयाचें असतें, तर क्रांतीच्या काळाच्या भावना थोड्या तरी दाखविल्या असत्या. तो कालच असा होता कीं क्रांतीच्या काळास अनुरूप अशा राजकीय, सामाजिक व त्याप्रमाणेंच धार्मिक भावना दाखविण्यास क्षेत्र हवें तेवढें होतें.

मौर्यवध करून पुष्पमित्र राज्यारूढ झाला ही गोष्ट सामाजिक क्रांतीच्या दृष्टीनें उपेक्षा करण्याजोगी नव्हती. अशोक यज्ञधर्मी नव्हता, तो पुढें पूर्णपणें बौद्ध झाला. नव्हता त्याच्या वंशजांच्या कारकीर्दींत श्रौतधर्म आणि स्मार्तधर्म सारखेच चिरडले जाऊन बौद्ध यति चोहोंकडे प्रस्तृत झाले असले पाहिजेत. बौद्धांचें वाङ्मय चांगलेंच वाढलें होतें आणि त्याचा आभास खुद्द अशोक नैरत लेखांत आदेशीत आहे त्यावरून ब्राह्मण त्यांचे अनुयायी यांना अप्रिय होण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली होती यांत शंका नाहीं. पुष्पमित्र वैदिकधर्मी होता हें त्यानें जे यज्ञ केले त्यावरून स्पष्ट होईल. पुष्पमित्र वैदिकधर्मी असल्यामुळें त्याचें आगमन ही सामाजिक महत्त्वाची गोष्ट लोकांच्या दृष्टीनें झाली असली पाहिजे, आणि त्यामुळें ती नाट्यविषय होऊन त्या कथेचें सूत्र कालिदासाच्या काळापर्यंत ओढलें गेलें असावें.

मौर्यांकडून शुंगांच्या ताब्यांत सत्ता गेली तिचे महाराष्ट्रावर परिणाम काय झाले हा विचार आपणांस प्रधान आहे. तथापि तो विचार करतांना एकंदर राजकीय स्थित्यंतराकडे लक्ष असलेंच पाहिजे. अशोकाच्या कारकीर्दींत इराणच्या सरहद्दीपर्यंत जी मौर्यसत्ता स्थापन झाली तिच्या जागीं सर्वत्र शुंगसत्ता पसरली कीं दुसरें कांहीं झालें हें आपणांस पाहिलें पाहिजे. आणि त्या अवलोकनाच्या आवश्यकतेमुळें ग्रीकांच्या इतिहासाचाहि थोडासा परिचय करून घेण्याची आवश्यकता उत्पन्न होते.

---

प्रकरण ४६ वें.

# अशोकाच्या मृत्यूनंतर.

## ४२१. कर्त्या पुरुषाच्या कालानंतरच्या घडामोडी.

४२१. मौर्यपूर्वकालीन अलेक्झांडरच्या स्वारीशीं आपणांस विशेष कर्तव्य नाहीं; कारण अलेक्झांडरची स्वारी यवनांचा चंचुप्रवेश या नात्यानें जरी महत्वाची होती तरी त्या स्वारीचा महाराष्ट्राशीं संबंध येत नाहीं आणि त्या स्वारीस महत्व तरी त्या वेळेपासून यवनसत्तेस सुरवात झाली, तीमुळेंच आहे. आपणांस एवढेंच पुरे कीं मौर्यराज्य सुरू होण्यापूर्वी म्हणजे नंदराज्य चालू असतांच अलेक्झांडरची स्वारी हिंदुस्थानांत झाली होती आणि त्यांनीं पंजाबवर आपली सत्ता थोडा वेळ बसविली होती; तथापि मौर्यांच्या कारकीर्दीत बाल्हीकापर्यंत म्हणजे बॅक्ट्रियापर्यंत मौर्यांनीं आपली सत्ता वाढविली.

मौर्योत्तर कालाचा हिंदुस्थानचा इतिहास आणि हिंदुस्थानच्या बाहेरचा विशेषेंकरून ग्रीक साम्राज्याचा इतिहास यांत सादृश्य आहे. दोन्हीं ठिकाणीं मोठ्या विजेत्यांच्या मृत्यूचे जे परिणाम झाले त्यांनीं हिंदुस्थानांतील घडामोडींना निश्चित स्वरूप आलें.

मोठा सम्राट नाहींसा झाला म्हणजे त्याच्या हाताखालचे अधिकारी स्वतंत्र होऊं पहातात आणि त्याचें स्वामित्व कबूल करणारे मांडलीक राजे त्याच्या वंशजांच्या पकडींतून सुटूं पहातात, ही गोष्ट अशोकाच्या मृत्यूनंतर आणि आद्यमौर्यांचा प्रतिस्पर्धी जो अलेक्झांडर त्याच्या मृत्यूनंतर घडून आलेली आहे. शिकंदराच्या म्हणजे अलेक्झांडराच्या मृत्यूनंतर त्याच्या साम्राज्याचे तुकडे पडले आणि सरदार स्वतंत्र झाले, त्यामुळें चार ग्रीक राज्यें तयार झालीं. त्या राज्यांना देखील साम्राज्येंच म्हटलें तरी शोभेल. कारण प्रत्येक राज्य कांहीं लहान सहान नव्हतें. हिंदुस्थानच्या निकट सेल्यूकस निकेटारचें राज्य होतें. हाहि एक मोठा नियंता होता आणि तो अलेक्झांडरच्या तालमींत वाढला होता. नंतरच्या धालमेलींत तो आपला प्रदेश बराचसा संभाळूं शकला तथापि त्याच्या वंशजांच्या कारकीर्दीत त्याच्या साम्राज्याचें एकत्व राहिलें नाहीं. त्याच्या साम्राज्याचे सरदार लहान लहान राज्यें स्थापिते झाले. वरचा नियंता दूर झाल्यामुळें मोकाट सुटलेल्या शक्तींना स्वतःच्या विजयाचा उपक्रम हातीं घेऊन ऐतिहासिक महत्त्वाच्या घडामोडी उत्पन्न करतां येतात त्याचप्रमाणें प्रकार झाला आहे. ख्रि. पू. २५० यापुढचा हिंदुस्थानचा इतिहास म्हटला म्हणजे अशोक आणि मलक्षम यांच्या मृत्यूमुळें मोकाट सुटलेल्या शक्तींचा इतिहास आहे.

## ४२२. अशोकोत्तर यवन.

४२२. अशोकाच्या लेखांत यूनानी (ग्रीक) राजाला "योनराज" असें म्हटलें आहे. योन हें 'संस्कृत' यवन शब्दाचें प्राकृत रूप आहे. यवनांची आणि भारतीयांची ओळख अलेक्झांडरच्या कारकीर्दीत प्रथम झाली असें नाहीं तर त्याच्या अगोदर अनेक शतकें भारतीयांचा व त्यांचा संबंध आला असला पाहिजे. पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्यें "यवनानी" शब्द सांपडतो. त्याचा अर्थ "यवनस्त्री" असा असून उत्तरकाळांत यवनानी म्हणजे यवनांची लिपि असा अर्थ झाला असें राजवाड्यांनीं दाखवून यवनलिपिपूर्व काळांत पाणिनीस घालविलें आहे. उत्तरकालीं यवन शब्द भारत वर्षाच्या बाहेरच्या इराणी, मुसलमान इत्यादि सर्व जातींना लावला गेला याला ऐतिहासिक कारण काय असलें पाहिजे, याचा सविस्तर विचार पुढें येणार आहे. थोडक्यांत एवढें सांगतां येईल कीं, शेजारचे सर्वच परके लोक यवनांचे अंकित झाले असल्यामुळें आज हिंदुस्थानचे लोक ज्याप्रमाणें ब्रिटिश झाले त्याप्रमाणेंच परके लोक यवन झाले.

यूनचा किंवा यवनांचा बादशहा शिकंदर यानें पंजाब व सिंध यांतील जो मुलूख आपल्या सत्तेखालीं आणला होता तो पांच वर्षें देखील यवनांच्या ताब्यांत राहिला नाहीं, असें गौरीशंकर ओझा राजपुतान्याच्या इतिहासांत आश्वासन देतात; पण त्यांत अर्थ बेताचाच आहे. त्या काळच्या घडामोडींची एकंदर हकीकत लक्षांत घेण्यासाठीं अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याचें ग्रीक साम्राज्यावर आणि त्याच्या सत्तेखालीं असलेल्या शक पह्लवावर झालेले परिणाम लक्षांत घेतले पाहिजेत. यवनसत्तेचें व संस्कृतीचें एशियामध्यें कायम ठाणें स्थापन होऊन तिचा परिणाम हिंदुस्थानावर पुढें आणखी तीन चारशें वर्षें चालू होता.

बॅक्ट्रियामध्यें शिकंदराच्या मरणानंतर तेथील ग्रीक व शक यांच्या संकरानें ग्रीक संस्कृतीची जी एक नवीन जात बनली होती त्या जातीचे लहान लहान राजे बॅक्ट्रियामध्यें

राज्य करूं लागले आणि त्यांच्यामार्फत हिंदुस्थानावर ग्रीक संस्कृतीचा परिणाम चालू राहिला होता.

## ४२३. चंद्रगुप्ताच्या दिलेल्या मुलुखाचा ग्रीकांकडून हिसकाव.

४२३. रॉलिन्सन आपल्या बॅक्ट्रियावरील पुस्तकांत म्हणतो कीं चंद्रगुप्त मौर्याच्या स्वाधीन सिल्यूकस निकेटारनें जो भाग केला होता तो अशोकोत्तर कालांत यूथीडिमसच्याच अमदानीत हिंदूंपासून हिसकावून घेण्याचा उपक्रम होऊं लागला. अशोक होता तोंपर्यंत यवनांची गडबड बंद होती, तथापि अशोकच्या मृत्यूनंतर त्यांच्या विजयी उपक्रमास पुन्हा सुरवात झाली. ग्रीकांच्या विजयी उपक्रमाचें खरें स्वरूप लक्षांत येण्यासाठीं हिंदुकूशच्या किंबहुना सिंधुनदाच्या पश्चिमेकडील प्रदेशाकडीक इतिहास दिला पाहिजे. त्यावेळच्या एकंदर गोष्टी लक्षांत येण्यासाठीं पुढील वृत्तानुक्रम लक्षांत घेतला पाहिजे. *

ख्रि. पू. २८१ चंद्रगुप्ताचा सासरा सिल्युकस मारला गेला. त्याचा मुलगा अँटिओकस राज्यावर आला. त्याचें राज्य एजिअन समुद्रापासून सिंधुनदापर्यंत पसरलें होतें.

ख्रि. पू. २६४ ते २४७ दुसरा अॅन्टीओकस.

[ याच राजाचा उल्लेख अशोकानें केला असला पाहिजे. ]

ख्रि. पू. २४८ पार्थिअन साम्राज्याची स्थापना.

ख्रि. पू. २२३ ते १८७ तिसरा अॅन्टीओकस.

ख्रि. पू. १७५ ते १६४ चवथा अॅन्टीओकस.

पार्थिअन साम्राज्याची स्थापना झाल्यामुळें ग्रीक साम्राज्य दुभंगलें. दुसऱ्या अॅन्टीओकसचे वारस पश्चिमेकडे राज्य करूं लागले तर बॅक्ट्रिया ( बाल्हीक ) च्या ग्रीकांनीं डायोडोटस नांवाच्या आपल्या सुभेदाराच्या नेतृत्वाखालीं बंड करून स्वतंत्र राज्य स्थापिलें. आणि हिंदुस्थानांत ज्या ग्रीकांशीं संबंध आला तो या बॅक्ट्रिअन ग्रीकांशींच होय. जें कैकेयांचें केंद्रस्थान होतें तेथेंच ग्रीकांच्या राज्याचें ठाणें संस्थापित झालें.

सुमारें ख्रि. पू. १९० च्या सुमारास बॅक्ट्रियांतील यवन डिमेट्रीअस ( अंतियोकाचा जांवई ) च्या नेतृत्वाखालीं काबूल, पंजाब आणि सिंध हा भाग घेते झाले. या बॅक्ट्रिअन यवनांच्या विजयाचा परिणाम असा झाला कीं डिमेट्रीअसचें त्याच्या बॅक्ट्रियावरील बल कमी झालें. ख्रि. पू. १७० च्या सुमारास युक्रिटिडिस नांवाचा एक बॅक्ट्रिअन सरदार बंड करून बॅक्ट्रिया डेमिट्रिअसच्या हातांतून घेता झाला, एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानांतील कांहीं मुलूख देखील त्यानें बळकावला. या दोन बॅक्ट्रियन यवनांचीं भिन्न राजघराणीं स्थापन झालीं, आणि त्यांची एकमेकांविरुद्ध झटापट बराच कालपर्यंत चालली.

जेव्हां शुंगाच्या ताब्यांत मगधसिंहासन आलें, तेव्हां साम्राज्य दुर्बल होऊन ज्या अनेकांना आपलें महत्त्व वाढविण्यास सांपडलें, त्यांमध्यें यवनांचा समावेश केला पाहिजे. हिंदुस्थानच्या सार्वभौमत्वासाठीं धडपडणाऱ्या सत्तांत यवनसत्तेचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला पाहिजे आणि त्यांना कशी काय धडपड करावी लागली याचा इतिहास पहातां यांचा मोठा निकराचा आणि दीर्घकाल प्रयत्न झाला असें दिसतें.

हिंदुकूश पर्वताच्या उत्तरेकडील बॅक्ट्रिया ( बलख ) चें राज्य यवनांचें होतें. तेथील हे यवन बॅक्ट्रियन लोकांशीं रक्तानें मिसळले असावेत असें व्हिन्सेंट स्मिथ समजतो. या बॅक्ट्रियन ग्रीकांचा राजा डेमिट्रियस हा युथीडिमस् याचा पुत्र होता.

बॅक्ट्रिअन यवन.

या बॅक्ट्रियन यवनांच्या सत्तेखालील प्रदेशांत यवनांची एकापेक्षां अधिक स्वतंत्र राज्यें स्थापित झालीं व त्यांच्यावर पंचवीसपेक्षां अधिक राजांनीं राज्य केलें वगैरे इतिहास सांगतां येईल; पण तो आपणांस आपल्या विषयाच्या स्पष्टीकरणार्थ विशेष महत्वाचा नाहीं.

या यवन राजांचा संगतवार इतिहास मिळत नाहीं. त्यांचे बरेचसे लेख सांपडले आहेत. त्यांतील एक प्राचीन ग्रीक लिपि किंवा ग्रीक भाषा यांमध्यें लिहिलेला आहे तर दुसरा खरोष्ठी लिपि आणि प्राकृत भाषा यांत लिहिलेला आहे, व त्यांच्यांत राजाचें नांव किंवा किताब मात्र दिलेला आहे. परंतु त्यांच्यावरून त्यांचा क्रम, त्यांचा परस्पर संबंध किंवा त्यांचा काल कांहींहि निश्चितपणें ठरवितां येत नाहींत. त्यांच्यांत मिनेंडर नांवाचा अधिक प्रतापी राजा झाला आणि त्यानें बऱ्याच दूरवर आपला अंमल बसविला.

बॅक्ट्रिअन ग्रीक राजांच्या लेखांपैकीं खरोष्ठींत लेख पुढीलप्रमाणें आहेत.

### ( १ ) थेऊदोरेन मेरिदर्खेन प्रतिठविद्र इमे शरीर शकमुनिस भग(र)वतो बहुजणस्तितिये

बहुजनांच्या रक्षणासाठीं ही भगवान् शाक्याचे हे शरीरावशेष मेरिदर्ख † थेउदोरस यानें स्थापिले आहेत.

* रॉलिन्सन बॅक्ट्रिया पान ६५.

† मेरिदर्ख ही ग्रीक लोकांत एक पदवी होती.

[ स्वात येथील फुलपात्रावरील लेख ]

**( २ )....मेरि[द]खन सभयकेण थूवो प्र(ति) स्तवितो मतपितु पूयए अघदक्षो (इ) णयए.**

मेरिदखें यानें आपल्या बायकोसह हा स्तूप आपल्या आईबापांच्या सन्मानासाठीं आणि भावयुक्त दान म्हणून संस्थापिला

[ तक्षशिला ताम्रपट ]

**३ सु थेउदम.**

राजा थिओडमस यांचें.

[ वजऊरमध्यें सांपडलेल्या मुद्रेवरील लेख ]

**४ पुणमतस.**

पुण्यमताचें.

[ पारीस येथील कार्नेलियनवर सांपडलेला लेख. हा कार्नेलियन कोठून आला हें ठाऊक नाहीं. ]

**५ बोधस शकमुनिस पदानि.**

शाक्यमुनि बुद्ध याचीं पावलें.

६ आणि ७ या लेखांचे अर्थ लावलेले नाहींत. *

**४२४. यवनांची रजपुतान्यावर स्वारी; मिनेंडर.**

४२४ राजपुतान्याचा इतिहास शोधतांना पं. गौरीशंकर ओझा या बॅक्ट्रिअन ग्रीकांच्या चळवळींचा राजपुतान्याशीं कितपत संबंध येतो त्याविषयीं आपल्या हिंदींत लिहिलेल्या राजपुतान्याच्या इतिहासावरील ग्रंथांत पुढील प्रमाणें विचार प्रगट करतात, ते म्हणतात—

"मिनेंडर ( किंवा एपोलोडॉटस ) याच्या शिवाय कोणत्याहि यवन राजाचा संबंध रजपुतान्याशीं पोंचत नाहीं. "पंतजलीनें आपल्या महाभाष्यांत त्यावेळच्या प्राचीन भूतकाळच्या विशिष्ट रूपांचीं उदाहरणें दिलीं आहेत.† त्यांत यवनांचें ( यवन राजाचें ) मध्यमिकेपर्यंत आक्रमण झालें होतें असें लिहिलें आहे. मध्यमिका नांवाचें प्राचीन नगर मेवाडमध्यें प्रसिद्ध चितोड किल्लयाच्या ७ मैल उत्तरेस होतें. त्याला हल्लीं "नगरी" म्हणतात आणि त्याचे उल्लेख पुष्कळ ठिकाणीं सांपडतात. महाकवी कालिदासाच्या "मालविकाग्निमित्र" नाटकांत असा उल्लेख आहे कीं, 'सुंगवंशा'चा संस्थापक पुष्यमित्र याच्या अश्वमेधाचा घोडा सिंधूनदाच्या दक्षिण तीरावर यवनांच्या रिसाल्यानें पकडला होता. आणि वसुमित्रानें त्यांच्यापासून लढून तो सोडविला. अशा प्रकारचा उल्लेख आहे."

या नाटकी उल्लेखाला ओझांनीं दिलें तसें ऐतिहासिक महत्त्व देतां येत नाहीं. कारण पतंजलींत सांपडलेली माहितीच कालिदासानें एकत्र जुळविली असणें शक्य आहे. पुष्पमित्राच्या यज्ञाचा उल्लेख यवनांशीं जोडला म्हणजे नाटकाला ऐतिहासिक सत्याचा आभास उत्पन्न करतां येतो आणि नाटककारास ऐतिहासिक सत्य आवश्यक नसून ऐतिहासिक सत्याचा आभास पुरे असतो. कालिदासीय विधान ऐतिहासिक दृष्टया डॉ. भांडारकर आणि व्हिन्सेंट स्मिथ यांनींहि महत्त्वाचें धरलें आहे. पण ही सर्वांचीच चूक झाली आहे. कालिदासाचें वचन विश्वसनीय धरून तें शक्य कोटींतील करण्याचा प्रयत्न पं. गौरीशंकर ओझा पुढील प्रमाणें करतातः— "यांतील सिंधु नदी राजपुतान्यांतील सिंधु ( कालीसिंध ) असली पाहिजे. वर लिहिलेल्या राजपुतान्याच्या दोन्ही घटनांच्या वेळीं कोणत्या यवनराजाचा काल होता ह्याचें लिखित प्रमाण आजपर्यंत कोठेंहि सांपडलें नाहीं. परंतु तो मिनेंडरचाच काल असावा असा संभव आहे. मिनेंडरचे दोन रौप्यलेख मध्यमिका नगरीमध्यें सांपडले आहेत या तेहि अनुमानास पुष्टीच देतात. ह्याप्रमाणेंच काठेवाड आणि गुजराथ येथें सांपडलेले लेख ह्या मतालाच पाठिंबा देतात."

मिनेंडरची माहिती देतांना स्ट्रेबोनें असें लिहिलें आहे कीं "त्यानें पातालम् ( सिंध ), सुराष्ट्रस् ( सोरठ, दक्षिणी काठियावाड ) याचप्रमाणें सागरडिस् ( सागरडीप, ज्यांत कच्छ आहे ) यांच्यावर विजय मिळविलेला आहे.

मिनेंडरची सत्ता दक्षिणेपर्यंत पोंचली असें मुळींच दिसत नाहीं.

**४२५. मिनेंडरकडून बौद्धधर्माचा स्वीकार.**

४२५. राजा मिनेंडर (Menandros) विद्वान् नागसेनाच्या उपदेशानें बौद्ध झाला होता असें दिसतें. मिलिंदपन्हो (मिलिंदप्रश्न) नांवाच्या पाली भाषेंत लिहिलेल्या ग्रंथांत मिनेंडर आणि नागसेन यांचीं निर्वाणसंबंधी प्रश्नोत्तरें दिलीं आहेत. या ग्रंथावरून असें सिद्ध होतें कीं, मिलिंद ( मिनेंडर ) यवन ( युनानी ) होता. त्याचा जन्म अलसंद ( हिंदुकूशच्या जवळील अलेक्झांड्रिया ) येथें झाला. त्याची राजधानी सागल ( पंजाब ) मध्यें एक मोठें समृद्धिमान नगर होतें. सागल शहर मिलिंदाची राजधानी होती. तिच्या भव्यवर्णनानें मिलिंदपन्ह या काव्यास सुरवात होत आहे. मिलिंद राजा आपणास वादांत कोणी जिंकील काय अशी पृच्छा करतो आणि हिंदुस्थानचें मोठें नांव आहे तें व्यर्थ आहे असें म्हणतो; तेव्हां दरबारी मंड-

* Inscriptions of the Greek chief and unclassed North Indian Records. *Cor. Ins. Ind.* Vol. ii.

† अरुणद् यवनः साकेतम्। अरुणद् यवनो मध्यमिकाम्॥

ळीनीं त्याला नागसेन भिक्षूकडे नेलें आणि नागसेनानें त्याची शंकानिवृत्ति केली असें हा ग्रंथ सांगत आहे *

चिनीभाषेंत मिलिंदप्रश्न या ग्रंथाच्या दोन आवृत्त्या फार प्राचीनकालीं झालेल्या आहेत. †

प्लुटार्क लिहितो कीं, तो इतका न्यायी आणि लोकप्रिय राजा होता कीं, त्याच्या मृत्यूनंतर अनेक शहरांतील लोकांनीं त्याची राख घेऊन, ती आपापल्या ठिकाणीं नेली आणि त्याचे स्तूप बनविले. ‡

ह्यावरूनहि तो बौद्ध झाला होता हें सिद्ध होतें असें पं. ओझा समजतात, मिनेंडरचें नांव त्या लेखावर "मेनंद्र" असें लिहिलेलें मिळतें व तें मिनेंडर त्या नांवाशीं बरेंच जुळतें आहे. त्याचा काल इ. स. पूर्वी १५५ च्या सुमारासच असावा असें व्हिन्सेंट स्मिथ यांस वाटतें. ग्रीक राजांचें राजपुतान्यापर्यंत आगमन सिद्ध होत आहे. पेरिप्लसचा कर्ता येथेंहि लिहितो कीं, एपोलोडॉटस् किंवा मिनेंडरचें नाणें अजूनपर्यंत बरुगज (भृगुकच्छ भडोच) मध्यें चालत आहे. ह्यावरून असा संभव दिसतो कीं, मिनेंडरच्यानंतर एपोलोडॉटसूचा संबंध गुजराथ, राजपुताना इत्यादि देशांशीं होता. परंतु हें मानण्याला आज कोणतेंहि निश्चित प्रमाण मिळत नाहीं.

### ४२६. मिनेंडरचा बौद्धधर्मस्वीकार हा भारतीय संस्कृतीचा विजय होता काय ?

४२६. आज बौद्ध वाङ्मयामध्यें मिलिंदप्रश्नांस महत्वाचें स्थान असल्यामुळें आणि मिलिंद हा यवन असल्यामुळें तो आपणांस भारतीय संस्कृतीचा विजय वाटतो. § तथापि प्राचीन काळांत मिलिंदाचें धर्मविषयक धोरण आणि संस्कृतिविषयक धोरण त्या काळच्या भारतीयांस प्रिय असेलच असें म्हणतां येत नाहीं. मौर्यांनीं बौद्ध संप्रदायास आश्रय दिला आणि मौर्यांची समाप्ति करणाऱ्या पुष्यमित्रानें जुन्या श्रौतस्मार्त धर्माचें पुनरुज्जीवन केलें असें दिसतें. यावेळेस पुराणोक्त धर्म उदयास आला नसून जुन्या संस्कृतीकडे वळावयाचें म्हणजे श्रौतस्मार्त धर्माकडेसच वळणें लोकांपुढें असलें पाहिजे. पुष्यमित्रानें तेंच केलें. त्यानें जरी हरामखोरी केली, तरी संस्कृत विद्येचे जे पतंजलीसारखे अभिमानी होते त्यांनीं आपल्या व्याकरणांत पुष्यमित्रास शाबासकी देऊन त्याचें नांव चिरस्मरणीय करण्याचा प्रयत्न केला. आम्ही पुष्यमित्राकडून यज्ञ करवितों हें (इह पुष्यमित्रं याजयामः) केवळ व्याकरणाचें रूप सांगण्याच्या निमित्तानें बोलून ठेविलें. पुष्यमित्रास संस्कृत विद्येचा आणि श्रौत धर्माचा उद्धारक बनावें लागलें तर मगध साम्राज्याचे लचके तोडीत साकेतापर्यंत म्हणजे अयोध्येपर्यंत येणाऱ्या यवनाला अर्थात् बौद्ध धर्माचा पुरस्कार करणें भाग पडलें, त्या वेळेस संस्कृत विद्येला पुढें सारावयाचें कीं प्राकृत विद्येला पुढें सारावयाचें हा केवळ विद्येच्या दृष्टीनें सोडविण्याचा प्रश्न नसून राजकीय स्वरूपाचा प्रश्न होता आणि त्यांत यवन आणि पुष्यमित्र हे निरनिराळ्या पक्षाचे आधारस्तंभ होते पुष्यमित्रास ब्राह्मण्याचा पुरस्कार करावयाचा होता तर यवनांस विरुद्ध बाजू घेणें अवश्य होतें. शातवाहन देखील प्राकृत भाषा आणि वाङ्मय यांना उत्तेजन देत होते, पण त्या दोहोंची वृत्ति सदृश होती असें मानण्याचें कारण नाहीं. शातवाहन हे पैशाचीस उत्तरेस प्रामुख्य आहे तसें दक्षिणेंत महाराष्ट्रीस यावें यासाठीं प्रयत्न करीत असले पाहिजेत.

यवन आणि पुष्यमित्र या दोहोंचा उल्लेख जरी पतंजलीनें केला आहे तरी दोघेहि समकालीन असतीलच असें नाहीं. गुटश्मिड यांनीं मिनेंडरचा राज्यकाल खि. पू. १२५–९५ असा धरला आहे. (विंटरनिट्झ) गार्डनर खि. पू. ११० हा काल देतात. राय चौधरी† आणि डॉ. बार्नेट * हे खि. पू. पहिलें शतक हा काल देतात.

### ४२६. अ. बौद्धसंप्रदायाची परकीयता, किंवा विदेशीजनसमुखता. आद्य बौद्धवाङ्मयाची भाषा पैशाची असण्याची शक्यता.

४२६. अ. नवीन आलेले राज्यकर्ते हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या पाखंडमतास नेहमीं चिकटतात आणि हिंदुस्थानांत असलेल्या परकीय जनतेस जवळ करतात. बौद्धसंप्रदायाचा उत्तरकालीन परकीय जनतेशीं निकट संबंध वारंवार उत्पन्न होई तथापि त्यांचें परकीयजनसांमुख्य प्रारंभापासूनच असावें.

* सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट व्हा. ३५–३६.

† Ed. Specht. et. S. Levi Deux traductions Chinoises du Milindapañho OC ix London 1892.

‡ न्युमिस्मैटिक क्रॉनिकल इ. स. १८६९, पृ. २२९. ओझांच्या ग्रंथावरून अवतरण.

§ मिनेंडरची आठवण शतक दोन शतकेंपर्यंत ताजी असतांच मिलिंदपन्ह हा ग्रंथ झाला असला पाहिजे असें विंटरनिट्झ समजतात (व्ही. २. पृ. १७५) बुद्धघोष मिलिंदपन्हास जवळजवळ आद्यधर्मग्रंथाइतका मान देत आहे त्यावरून देखील मिलिंदपन्हाची प्राचीनता व्यक्त होते असें त्या ग्रंथास प्राचीन मानण्यास कारण देतात.

† Political History of Ancient India. Calcutta 1923.

* Calcutta Review, February 1924, p. 250.

बौद्धग्रंथापैकीं ज्या पंथाचें वाङ्मय आतांपर्यंत उरलें आहे तो पंथ म्हटला म्हणजे थेरवादींचा होय. 'थेर' म्हणजे स्थविर अथवा 'वृद्ध', म्हणजेच बुद्धाचे अत्यंत निकटवर्ती शिष्य. यांच्याच संग्रहाचें सातत्य चालू राहिलें आहे.

थेरवादींचा ग्रंथ तोच पाली तिपिटिक ग्रंथ होय. या ग्रंथाची भाषा आज पाली आहे तरी बुद्धाची भाषा जशीच्या तशीच त्यांनीं संरक्षिली असावी असें वाटत नाहीं. बुद्ध स्वतः पैशाची बोलत असून पुढें कांहीं दिवस त्याचे उपदेश पैशाची मध्येंच राहिले असावेत असें एका भाषाविषयक संरक्षित उल्लेखावरून वाटतें.

विनीतदेव (आठवें शतक ख्रिस्ती) असें सांगत आहे कीं या स्थविरामध्यें पैशाची भाषेचाच प्रचार होता. सर्वा-स्तिवादी संस्कृत वापरीत, महासांघिक प्राकृत वापरीत, संम्मि-तीय अपभ्रंश वापरीत आणि स्थविरवादी पैशाची वापरीत.*

असें शक्य आहे कीं वररुचीच्या कालांत पैशाची ही एक प्रमुख भाषा होती आणि बुद्ध त्या भाषेंतच उपदेश करिता झाला असावा. कदाचित् अनेक राजे लोक पैशाची भाषा बोलत असावेत, आणि प्राकृत जनामध्यें प्रतिष्ठित भाषा तीच असावी, आणि पैशाचीवर संस्कार होऊन पालीभाषा तयार झाली असावी.

पैशाची आणि पाली यांचा संबंध आजपर्यंत अनेकांनीं सांगितला आहे. संशोधनाच्या आद्य कालांत मगधांत बौद्ध-धर्म उत्पन्न झाला तर बौद्धांची भाषा मागधीचेंच संस्करण असलें पाहिजे असेंच मत प्रथम होणें स्वाभाविक आहे आणि असेंच मत ई. मुल्लर (पाली व्याकरण लंडन १८८४) यांनीं व्यक्त केलें होतें. त्याच मताचा अनुवाद पिशेल आणि विंडिश यांनीं केला होता.†

मागधी किंवा अर्धमागधी यांच्याशींच पालीचा संबंध जोडण्यामध्यें सिल्व्हाँ लेव्ही ‡ व ल्यूडर्स यांसारखे विद्वान् आहेत, तथापि तें मत सोडून देऊन पालीचा संबंध पैशाची-कडे लावणारे संशोधक पुढें येत आहेत. ल्यूडर्स पालीला अर्धमागधीचें प्राचीन रूप करीत आहे तर डॉ. बापट§ हे अर्धमागधीपासून पाली निघणें शक्य नाहीं आणि उलट अर्धमागधी हेंच उत्तरकालीन स्वरूप आहे असें दाखवीत आहेत.

* Winternitz, Vol. ii, p. 226.

† Winternitz, Vol. ii, p. 604.

‡ J. A. 1912 s. 10 t xx p. 465.

§ Ind. His. Qu. 1928.



पालीमध्यें पैशाची भाषेचे अंश आहेत ही गोष्ट कोनो,[1] ग्रीअरसन[2] आणि नलिनाक्षदत्त[3] यांनीं दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.[4]

थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं सरस्वतीच्या पूर्वेकडे ब्राह्मणी धर्माची पुन्हा स्थापना होत होती आणि पश्चिमेकडे बौद्ध धर्म विजयी होत होता आणि तो संबंध पश्चिम एशियाला भारतमद्दश स्वरूप आणूं पहात होता. जुन्या दैवतांचा धर्म राखून देखील बौद्ध संप्रदाय पसरला होता. गौतम हा शाक्य होता आणि शकांचा भारतनिवास वेदपूर्वकालापासून आहे तरी देखील शाक्यांचें संस्कृतिभिन्नत्व थोडेंबहुत राहिलें असलें पाहिजे. एरव्हीं शाक्यांकडे पैशाची बोलणारे लोक ओढले गेले नसते. गौतमबुद्धाचे निकट अनुयायी केकेयांतील मिळाले असले पाहिजेत आणि त्यामुळेंच मागें दिलेल्या तक्षशिलेच्या विद्या-पीठांच्या गोष्टी जातकांत प्राचुर्यानें आल्या असाव्यात.

मौर्योत्तरकालीं उत्तर हिंदुस्थान यवन व शुंग यांत वाटला गेला होता, तर दक्षिण हिंदुस्थानाची स्थिति काय होती इकडे आपण लक्ष देऊं. ऐतिहासिक सत्याकडे लक्ष देण्यापूर्वी सत्याभास दूरीकरणाकडे लक्ष दिलें पाहिजे. सत्याभास कालि-दासानें उत्पन्न केला आहे आणि त्यानें संशोधकांस देखील चकविलें आहे.

### ४२७. मौर्यसत्तेचा अंतिमकाल आणि साम्रा-ज्याच्या राजकारणांत विदर्भाचा संबंध.

४२७. कालिदास आपल्या मालविकाग्निमित्र या नाटकांत असें सांगूं इच्छित आहे कीं मौर्य सत्तेचा शेवट ज्या वेळेस झाला त्या वेळेस विदर्भाचा राजा मौर्यांशीं स्वामिनिष्ठ राहिला; तथापि शुंग राजपुत्र अग्निमित्र यानें विदर्भाच्या राजघरा-ण्यांतील एका दायादाचा पक्ष घेऊन विदर्भाधिपतीचा पराभव केला, आणि वऱ्हाड दुभंग केलें. आणि या कालिदासीय विधानाचा आपणास विशेष विचार केला पाहिजे.

पहिला प्रश्न हा आहे कीं मौर्यांची सत्ता महाराष्ट्रांत स्थापन झाली होती काय ?

मौर्यांची सत्ता महाराष्ट्रांत स्थापित झाली होती असें रा.

1 ZDMG. 64. 1910. 114.

2 Bhandarkar Comm. Vol. Poona. p. 117 pp.

3 Early History of the Spread of Buddhism.

4 वरील विधानें मुख्यतः विंटरनिट्झच्या आधारावर केलीं आहेत. यांपैकीं ल्यूडर्स व स्टेन कोनो यांचीं विधानें तपासून पाहिलीं नाहींत.

बखले समजतात.* ते त्यास प्रमाण देतात तें असें कीं, ज्याअर्थी त्यांची सत्ता दक्षिणेंत स्थापित झाली होती व ज्याअर्थी अपरांतांत म्हणजे उत्तर कोकणांत सोपारें येथें अशोकाचा शिलालेख आढळतो त्याअर्थी अशोकाची सत्ता महाराष्ट्रांत स्थापित झाली असावी. पण हें समजणें बरोबर नाहीं. गुजराथ जिंकली म्हणजे कोंकण जिंकणें अगदींच स्वाभाविक आहे, आणि जो राजा गिरनार येथें आपला शिलालेख खोदूं शकतो त्यास अपरांतांत शिलालेख खोदण्यास महाराष्ट्र जिंकलें पाहिजे असें नाहीं.

प्राचीन विदर्भाच्या इतिहासाला कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्र' या ऐतिहासिक नाटकाचा उपयोग कितपत आहे. याविषयीं व्यवस्थित विवेचन झालेलें नाहीं. तें होणें अवश्य आहे. काव्यनाटकापासून इतिहास कसा काढावयाचा याविषयींचीं तत्त्वें समजून घेऊन डॉ० भांडारकरांनीं या कथेचें परीक्षण मुळींच केलेलें नाहीं. मालविकाग्निमित्रांतील कथा ऐतिहासिक समजली पाहिजे असें सांगून, त्यांनीं त्यांतील राजकारणाची कथा दिली आहे. (अर्ली हिस्टरी ऑफ डेक्कन, बॉम्बे गॅ., व्हा. १, भा. १, पृ. १४६) हा वृत्तांत ऐतिहासिक समजण्यास हरकत नाहीं असें जें त्यांनीं आपलें मत दिलें आहे, तें माझ्या मतें इतिहाससंशोधकाची सावधगिरी दाखविणारें नाहीं. त्या नाटकांतील राजकारणी भाग देतांना विदर्भ हें एक राज्य होतें आणि भोज नांवाचें राजघराणें तेथें होतें ह्या गोष्टी त्यावरून सिद्ध होतात असें भांडारकर सांगतात. पण मालविकाग्निमित्रावरून जर मौर्यकालीन कांहीं तरी सिद्ध झालेंच तर विदर्भ नांवाचें राज्य मौर्यकालीं होतें एवढेंच सिद्ध होईल. त्या विदर्भराजघराण्यास भोज म्हणत होते असा उल्लेख नाटकांत नाहीं. विदर्भाशिवाय "क्रथकैशिक" हें नांव नाटकांत आलें आहे. रघुवंशांत रघूचे विजय देतांना क्रथकैशिकांचाच उल्लेख कालिदासानें केला आहे. भांडारकरांचें 'भोज' नामक घराण्याविषयींचें मत साधार नाहीं. तथापि विदर्भाच्या राजघराण्यास भोज नांव असणें अशक्य नाहीं. भोज ही प्रथम जात असून त्या जातीचें नाम तेंच पुढें कुलनाम होणें या क्रिया शक्य आहेत; तथापि भोज हें कुलनाम होतें असें पुरावा पहातां वाटत नाहीं.

भोज आणि क्रथकैशिक हीं नांवें विदर्भाशीं संबंध म्हणून पौराणिक कालापासून दाखविलीं गेलीं आहेत. अग्निमित्राच्या कालांत कोणतें नांव होतें व कालिदासाच्या कालांत कोणतें राजघराणें होतें याविषयीं या नाटकावरून मुळींच बोध होत नाहीं.

* JBBRAS. May 1928.

मालविकाग्निमित्रांतील कालिदासाचें कथानिरूपण विदर्भाचा प्राचीन इतिहास म्हणून कितपत ग्राह्य धरतां येईल हा मुख्य मुद्याचा प्रश्न आहे.

### ४२८. ऐतिहासिक काव्यनाटकांतील कथांगांचें इतिहासासाठीं पृथक्करण.

४२८ ऐतिहासिक काव्य, नाटक अगर कादंबरी यांतील कथेचीं "**वृत्तकालीन अंगें**" आणि "**रचनाकालीन अंगें**" याचें पृथक्करण करणें हें इतिहासजिज्ञासूंचें पहिलें कर्तव्य होतें. या प्रकारचें पृथक्करण केल्याशिवाय कथास्वरूपी वाङ्मयांतून इतिहास काढण्याची क्रिया अत्यंत धोक्याची होय. जेव्हां मनुष्य ऐतिहासिक नाटक किंवा कादंबरी लिहितो तेव्हां त्यांत त्याच्या कालच्या स्थितीचीं अनेक अंगें सहज मिसळून जातात. कोणीहि मनुष्य ऐतिहासिक काल जसाच्या तसाच दाखविण्याची सावधगिरी बाळगीत नाहीं. यासाठीं ऐतिहासिक कथावाङ्मयाचा इतिहासनिष्कर्षणार्थ उपयोग जपूनच केला पाहिजे. ज्याप्रमाणें आजचा गैरसावध लेखक कांहीं अर्वाचीन गोष्टी प्राचीन काळची कथा लिहितांना चुकून घालील, त्याप्रमाणें जुन्या काळचा कथालेखक आपल्या काळच्या कांहीं गोष्टी घालील हें अगदीं स्वाभाविक आहे. प्राचीन लेखकाचा काळ आणि कथेंत वर्णिलेल्या वृत्ताचा काल हे दोन्ही आपणांस ऐतिहासिक काल असल्यामुळें दोन्ही काळांतील लोकस्थितीचें ज्ञान आपणांस हवें आहे. पण तें प्राप्त होण्यास साहित्य म्हणून वापरल्या जाणाऱ्या काव्यांतील कविकालीन आणि काव्यविषयकालीन स्थितीचें पृथक्करण पाहिजे. रचनाकालीन आणि वृत्तकालीन इतिहासाच्या निदर्शक ज्या गोष्टी असतील त्यांचें पृथक्करण करण्यासाठीं वर्णन केलेल्या काळाची माहिती कितपत होती, त्याची माहिती मिळविण्याचीं साधनें कोणतीं होतीं, ही चौकशी करणें अवश्य होतें. त्याचप्रमाणें कवीच्या हेतूचें परीक्षण करतांना कवीचा हेतु इतिहास सांगावयाचा होता कीं प्रचलित जनसमाजास आवडेल असें दृश्य दाखविण्याचा होता हें पाहिलें पाहिजे. ऐतिहासिक नाटकाचा उपयोग इतिहास दाखविण्याचा मुळींच नसून प्रचलित समाजाला सुधारण्यासाठीं किंवा खुलविण्यासाठीं नाटक किंवा काव्य लिहावयाचें हा असतो आणि त्यांत थोडेसे ऐतिहासिक उल्लेख घालून त्या कृतीस ऐतिहासिक स्वरूप देण्याचा प्रयत्न कवी करतात. असले प्रकार प्रत्येक देशांत झालेच आहेत. तर ही लेखकाची वृत्ति काव्यापासून इतिहासनिष्कर्षण करूं इच्छिणारानें लक्षांत घेतली पाहिजे. त्यामुळें कांहीं स्वकालीन लोकांस खुलविण्यासाठीं कवीनें कोणत्या गोष्टी काव्यांत घातल्या हें शोधलें

पाहिजे. कवीचा हेतु इतिहास किंवा प्राचीन काळाचें चित्र दाखविण्याचा असला तर कवीचें लिखाण दुसऱ्या एका कारणानें संशयास्पद होऊं लागतें. कवि हा कांहीं इतिहासकार नव्हे. आणि त्यावर ऐतिहासिक सत्य सांगण्याची जबाबदारी देखील नसते. त्यास पुष्कळदां दुसरे अनेक हेतु साधावयाचे असतात. कवीस देशाभिमान प्रज्वलित करण्यासाठीं किंवा त्यास ईर्षा वाटणारा दुसरा कोणता तरी परिणाम उत्पन्न करण्यासाठीं प्राचीन काळचें चित्र तो खोटें रंगवील. बंगालकडे कित्येक कायस्थ कादंबरीकार आपले पूर्वज रजपुतांचे वंशज आहेत असा समज उत्पन्न करण्यासाठीं प्राचीन रजपुतांचे रिवाज प्राचीन कायस्थांमध्यें होते असेहि आपल्या कथांतून दाखवीत आहेत.

कथावाङ्मय कवीस इष्ट असे समज उत्पन्न करण्यासाठीं वापरलें जातें ही गोष्ट विसरून चालावयाची नाहीं. काव्य आणि नाटक यांचा विषय झालेल्या वृत्तासंबंधाच्या कवीच्या चित्रांत ज्या मानानें ऐतिहासिक सत्य मुद्दाम बिघडवलेलें असेल, त्या मानानें कवीच्या वर्णनाचें कवीच्या काळाच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्व वाढेल. मालविकाग्निमित्रांत कालिदासानें जो मजकूर मुद्दाम खोटा लिहिला असें दिसून येईल तो मजकूर आपणास कालिदासकालविषयक विशेषतः कालिदासाच्या हेतूविषयीं ऐतिहासिक सत्य सांगेल यांत शंका नाहीं. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र या नाटकाची भांडारकर समजतात त्याप्रमाणें ऐतिहासिकता स्थापन करावयाची झाल्यास कालिदासाला इतिहासज्ञान चांगलें होतें, आणि त्याला ऐतिहासिक सत्य जसेंच्या तसेंच देण्याची इच्छा होती, या दोन गोष्टी सिद्ध झाल्या पाहिजेत. माझ्या मतें या दोहोंपैकीं एकहि गोष्ट सिद्ध होत नाहीं.

### ४२९. ऐतिहासिक सत्यशोधनाचें काव्यरसज्ञांस महत्त्व.

४२९. प्राचीन इतिहास शोधणें हीच गोष्ट ज्यांस महत्त्वाची आहे त्यांस कवीच्या माहितीचें आणि काव्य करण्याच्या हेतूचें परीक्षण करणें महत्वाचें आहेच. पण काव्याची मजा ओळखण्याचा बाणा बाळगणारा जो रसिकवर्ग आहे त्यांसहि हें ऐतिहासिक संशोधन महत्वाचें आहे. कालिदासानें नाटकांत सांगितलेली गोष्ट ऐतिहासिक सत्य म्हणून भोळवटांसारखी स्वीकारणें हा इतिहाससंशोधनाविरुद्ध जसा गुन्हा आहे तसाच काव्यरसज्ञतेविरुद्ध देखील गुन्हा आहे. जर इतिहाससामुग्री अत्यंत थोडकी असतां नाटक लिहून कवि इतिहासाचा आभास उत्पन्न करूं शकला तर त्यांत कवीचें नाट्यकौशल्य दिसून येतें. दिलेल्या वृत्तास इतिहास समजणें म्हणजे नाट्यकौशल्य न ओळखणें आहे. मालविकाग्निमित्राच्या नाटकाचें परीक्षण करतांना जर आपणांस असें दिसून आलें, कीं कालिदासानें फारच थोडक्या माहितीवर इतिहाससंशोधकांना देखील चकविण्याइतका इतिहासाभास उत्पन्न केला आहे तर आपणांस कालिदासाच्या कौशल्यासंबंधानें अधिक अनुकूल कल्पना येईल. यासाठीं कालिदासानें सांगितलेल्या कथेचें सत्यशोधनाच्या दृष्टीनें पृथक्करण काव्याभिज्ञता आणि इतिहासाभिज्ञता या दोन्ही दृष्टींनीं महत्वाचें आहे.

### ४३०. ऐतिहासिक कथेच्या लेखकाचें इतिहासज्ञान आणि त्याची इतिहासविस्मृति.

४३०. कालिदासानें मालविकाग्निमित्र नाटकांत ऐतिहासिक लिहिण्याचा प्रयत्न केला आहे हें खरें. पण यावरून इतिहासाचें ज्ञान कवीस चांगलें होतें असें मुळींच नाहीं. 'मालविकाग्निमित्र' नाटकांत विदर्भदेशविषयक कालिदासाच्या कल्पना आणि वृत्ति हीं आलीं आहेत. इतिहास कितपत आला आहे हें कालिदासाची माहिती व इच्छा हीं तपासूनच ठरविलें पाहिजे. यांत येणाऱ्या गोष्टी कितपत कालिदासकालीन आहेत आणि कितपत शुंगकालीन आहेत याविषयीं करावयाच्या चौकशीच्या प्रारंभीं संशोधकानें बहुतेक गोष्टी कालिदासकालीनच आहेत असें गृहीत धरून चाललें पाहिजे. आणि ज्या गोष्टी निश्चितपणें शुंगकालीन म्हणून वर्णिल्या आहेत, त्या गोष्टींची माहिती कालिदासास कशी झाली हें पाहिलें पाहिजे. अग्निमित्रावरील नाटक लिहितांना कालिदासानें आजच्या ऐतिहासिक नाटककारांपेक्षां निराळी वृत्ति दाखविली असें समजण्याचें कारण नाहीं.

पुष्पमित्रानें मौर्यसम्राटाचा खून ख्रिस्तपूर्व १८४ च्या सुमारास केला असें धरल्यास आणि कालिदासाचा काल ख्रिस्तोत्तर साडेतीनशें ते साडेचारशें यांच्या दरम्यान केव्हां तरी असा धरल्यास कालिदास ज्या कालाचें चित्र वर्णन करतो, तो कालिदासाच्या निदान ५०० वर्षांपूर्वींचा होता. म्हणजे आजच्या लोकांना विजयानगरच्या राज्याचा काल जितका जुना वाटतो, तितका जुना होता. आजच्या एका प्रसिद्ध नाटककारानें विजयानगरच्या राजकारणाची हकीगत लिहिली तर तिच्यावर चोकशी केल्याशिवाय विश्वास ठेवावा असें कोणता संशोधक म्हणेल बरें ? आजच्या कालांतल्या लेखकाच्या विजयानगरवरील नाटकावरून इतिहास काढणें जर गैर होईल तर कालिदासाच्या नाटकावरून इतिहास काढूं पहाणें तितकेंच गैर होणार नाहीं काय ?

कालिदास वर्णन करतो तो काल त्याच्या कालापासून अनेक शतकें दूर होता, ही गोष्ट लक्षांत ठेवून कालिदासाच्या नाटकाचा ऐतिहासिक अर्थ लावला पाहिजे. साडेपांचशें वर्षापूर्वीच्या व्यक्तीचे सूक्ष्म ऐतिहासिक संबंध इतिहास ही वाङ्मयशाखा ज्या देशांत वाढली नाहीं त्या देशांत कितपत ठाऊक असणार? कालिदासाला त्या काळचें चित्र परिचित असेल अशी कल्पना करतां येत नाहीं. शुंगकालीन ज्या गोष्टींचें ज्ञान कालिदास दाखवितो, त्या गोष्टी अगदीं थोड्या आहेत. त्यानें शुंग घराण्यांतील तीन पुरुषांचीं नांवें, मौर्य हें नांव, यवनांचा उल्लेख आणि पुष्पमित्राचा यज्ञ यांचा उल्लेख केला आहे. पण त्यावरून कालिदासाला त्या कालचें ज्ञान आपणांस आहे त्यापेक्षां अधिक होतें असें म्हणतां येत नाहीं. त्यास शुंगमौर्यांचीं नांवें ठाऊक होतीं. तीं नांवें त्यास पुराणावरून ठाऊक झालीं असतील किंवा दंतकथांवरून कळलीं असतील. किंवा आज नष्ट झालेलीं कांहीं नाटकें किंवा काव्यें त्यानें पाहिलीं असलीं तर त्यांवरून त्यास ठाऊक असतील. त्याचें भौगोलिक व ऐतिहासिक ज्ञान नाट्यकाव्यादि कथावाङ्मयावरूनच तयार झालें असावेंसें दिसतें. त्याचें भांडवल म्हणजे बृहत्कथा असावें. उदयनाच्या दिग्विजयाच्या हकीकतीवरून रघूच्या दिग्विजयाची हकीगत बनविल्याचें स्पष्ट दिसत आहे. त्यास कांहीं इतिहास परिचित असेल असें वाटत नाहीं. त्यास बौद्धजैनांचें वाङ्मय देखील ठाऊक असेलसें वाटत नाहीं. विदर्भ देशाची विदिशा देशाशीं वैरवृत्ति त्यानें दाखविली आहे. तशी वृत्ति शुंगाच्या काळांत होती असेंहि या नाटकाच्या साक्षीवरून गृहित धरतां येत नाहीं. तशी स्पर्धा असणें शक्य आहे, अशी कालिदासाची समजूत होती हें मात्र गृहीत धरतां येतें. कालिदासाच्या काळांत विदर्भदेश हा अत्यंत सुप्रगत देशांत गणला जात होता. आणि सम्राट म्हणविणाऱ्या राजकुलाच्या बरोबरीचे आपण आहोंत असें म्हणण्याचा उद्दामपणा विदर्भदेशचा राजा करीत आहे आणि त्याबद्दल त्याला मार बसत आहे असें कालिदास दाखवीत आहे. हा इतिहास आहे असें न म्हणतां विदर्भ राजघराण्याचा उद्दामपणा आणि गर्वहरण हीं उज्जयनीच्या प्रेक्षकवर्गापुढें दाखविण्याच्या इच्छेनें तयार केलेलें काल्पनिक चित्र आहे, असें म्हटलें तर अधिक बरोबर होईल. या प्रश्नाचा अधिक विचार करण्यासाठीं नाटकांत दाखविलेल्या राजकारणाचें पृथक्करण केलें पाहिजे.

[ मिलिंदप्रश्न या पुस्तकावर अर्वाचीन अभ्यास बराच झाला आहे. बर्लिन ॲकेडमीच्या ग्रंथांत ( १८९० ) वेबर यांनीं असा प्रश्न उपस्थित केला कीं "मिलिंदप्रश्न हा ग्रंथ प्लेटोच्या संभाषणावरून मुद्दाम अनुकरण म्हणून तयार केला होता काय?" याविषयीं विंटरनिझ ( व्हा. २. पृ. १७६ ) म्हणतात कीं असला ग्रंथ उत्पन्न होण्यास प्लेटोच्या ग्रंथाचें ज्ञान किंवा अनुकरणेच्छा अनवश्यक आहे; कारण प्रश्नोत्तरस्वरूपी किंवा विवादस्वरूपी ग्रंथाचें अस्तित्व भारतांत उपनिषदांच्या कालापासून आहे. शिवाय ग्रीक वाङ्मयाचें ज्ञान त्या वेळच्या भारतीयांस असेल कीं नाहीं हाहि प्रश्नच आहे. मिलिंदप्रश्नांत ग्रीक भाषा किंवा विचारपद्धति यांचा मागमूस आढळत नाहीं असें गार्बे म्हणतात; तथापि फिनो आपल्या फ्रेंच अनुवादाच्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं मिलिंदप्रश्नांत ग्रीकसंस्कार थोडाबहुत दिसून येतो. मिनेंडर हा बौद्ध होता किंवा नव्हता याविषयीं वाद आहे. मिनेंडर हा बौद्ध संप्रदायाचा केवळ आश्रयदाता असावा अनुयायी नसावा हें एक मत आहे. तथापि तो तसाच असता तर त्याच्या नाण्यावर बौद्धांचें चक्रचिन्ह कसें असा प्रश्न सिल्व्हॉं लेव्ही यांनीं विचारला आहे ( Revue de l histoire des Religions Paris. 1891. p. 43 ) 'मिलिंदप्रश्न' हा उत्तरहिंदुस्थानांतील ग्रंथ सिंहलद्वीपांत प्रसृत पावला. तो महाराष्ट्रामार्फत प्रसार पावला असला पाहिजे. महाराष्ट्रांत या ग्रंथाचा प्रसार कितपत झाला किंबहुना या ग्रंथाच्या घटनेंतच महाराष्ट्रीय बौद्धांचा कांहीं हात होता काय हे प्रश्न देखील विचार करण्याजोगे आहेत. यूरोपांत ज्या बौद्धांशीं संबंध आला ते बौद्ध महाराष्ट्रांतलेच होते. त्यांनीं यूरोपीयांस आपले अनुयायी करण्यासाठीं एकादा ग्रीक राजा वर्ण्यविषय करून ग्रंथ लिहिला असेल काय अशी कल्पना मनांत आल्यावांचून रहात नाहीं. ]

# शुंगकालीन विदर्भविषयक कालिदासाचें विधान.

## ४३१. विदर्भ राजाचें अग्निमित्रास पत्र.

४३१. मालविकाग्निमित्र नाटकांत विदर्भविषयक काय भाग आहे, तो आतां पाहूं.

पहिल्याच अंकांत राजा आणि अमात्य यांचें पुढील-प्रमाणें संभाषण येतें:—

राजा—वाहतका, वैदर्भ ( विदर्भराजा ) काय प्रतिपादितो ?

अमात्य—आत्मविनाश, महाराज.

राजा—आतां मी संदेश ऐकूं इच्छितों.

अमात्य—त्यानें प्रत्युत्तरादाखल येथें असें लिहिलें आहे.

" पूज्यानें मी आदिष्ट झालों आहें तो येणेंप्रमाणें:—

" तुझा चुलत भाऊ कुमार माधवसेन हा संबंधविषयक योजनेसाठीं माझ्याकडे येत असतां तुझ्या सरहद्दीच्या अधिकाऱ्यानें त्याजवर हल्ला करून त्यास पकडून ठेवलें आहे. त्यास तूं माझ्या अपेक्षेप्रमाणें त्याची बायको व बहीण यांसह मोकळा करावें.

" यास ( विदर्भ राजाचें ) उत्तर:—तुल्य अभिजनांविषयीं राजे लोकांची वृत्ति कशी काय असावी हें तुम्हांस ठाऊक नाहीं असें नाहीं. म्हणून येथें पूज्यानें मध्यस्थ व्हावें. बहीण तर त्या ( माधवसेनाला ) पकडण्याच्या गडबडींत नाहींशी झाली. तिच्या शोधासाठीं प्रयत्न करीन. माझ्याकडून पूज्यानें माधवसेनाचें विमोचन अवश्य करावें, आणि त्यासाठीं अटी ऐकाव्यात. माझा मेहुणा मौर्यसचिव पूज्यानें बंदिवासांत ठेवला आहे. त्याला जर सोडून द्याल तर मीहि माधवसेनास ताबडतोब बंधनांतून सोडून देईन " इति.

राजा—( सरोष ) आपण कोण आहों हें न जाणतां हा माझ्याशीं मोबदल्याच्या गोष्टी बोलत आहे. वाहतका, वैदर्भ हा माझा स्वभावतःच शत्रु आणि प्रतिकूल वागणारा आहे. तर विरुद्ध पक्षास असलेल्या या वैदर्भाचें पूर्वी ठरल्याप्रमाणें समुन्मूलन करावें म्हणून वीरसेनप्रमुख सैन्यास आज्ञा दे."

अमात्य—महाराज सांगतील त्याप्रमाणें.

वरील उताऱ्यांत वृत्तांत दिला आहे तो येणेंप्रमाणें:—

जेव्हां पुष्पमित्रानें मौर्यांचें राज्य घेतलें तेव्हां मौर्यसचिव हा विदर्भ राजाचा मेहुणा होता आणि त्यामुळें तो मौर्यांचा पक्षपाती किंबहुना मौर्यांची स्थापना पुन्हा करूं पहाणारा असणार, त्यासाठीं पुष्पमित्रानें त्यास बंदिवासांत टाकलें होतें. विदर्भ मौर्यांचा पक्षपाती होता म्हणून त्याला शासन करावें, म्हणून अग्निमित्राची खटपट होती. विदर्भातील राजाचा दायाद माधवसेन हा त्या अग्निमित्राच्या इच्छेचा फायदा घेऊं पहात होता. आणि आपली बहीण मालविका ही अग्निमित्रास देऊन त्याचें साहाय्य घेण्याच्या हेतूनें माधवसेन माळव्याकडे जात असतां विदर्भाच्या सरहद्दीच्या अधिकाऱ्यांनीं त्याला पकडलें; पण मालविका त्याच्या हातून निसटली. तर माधवसेनास सोडावें म्हणून अग्निमित्र विदर्भराजास सांगत आहे आणि विदर्भराज उलट पाळण्यास अशक्य अशी अट घालीत आहे.

विदर्भाचें उन्मूलन करण्याचा प्रयत्न करावा किंवा नाहीं याविषयीं मंत्र्यांचें मत भिन्न असेल अशी शंका येऊन अग्निमित्र पुढें अमात्यास विचारतो.

राजा—अथवा तुमच्या मनांत काय आहे ?

अमात्य—महाराज बोलले तें शास्त्रदृष्ट वचनच बोलले. पहा शास्त्र काय सांगतें तें.

" राज्यावर जो फार दिवस बसला नाहीं असा शत्रु प्रजेमध्यें बद्धमूल झाला नसल्यामुळें ज्याला नवीनच प्ररोह फुटला आहे अशा झाडाप्रमाणें उपटण्यास सुलभ असतो. "

राजा—तंत्रकाराचें वचन बरोबर आहे. तर सांगितलें हेंच निमित्त सांगून सेनापतीची प्रेरणा करावी.

## ४३२. विदिशा आणि विदर्भ यांच्या संबंधासंबंधीं कालिदास प्रेक्षकांचें काय मत बनवूं पाहतो व त्यांत ऐतिहासिक सत्य कितीसें असण्याचा संभव आहे.

४३२. वरील संभाषणावरून शुंगकालाच्या आरंभीं विदिशा आणि विदर्भ या दोन राज्यांचे एकमेकांशीं संबंध कशाप्रकारचे होते तें मुळींच काढतां येणार नाहीं. तर कालिदास त्यासंबंधानें प्रेक्षकांचे ग्रह काय बनवूं पहातो हें मात्र दिसून येतें. कालिदास जें प्रेक्षकांस समजावूं इच्छितो तें आणि सत्य यांच्यामध्यें

अंतर पुष्कळच असण्याचा संभव आहे. कालिदासास सत्य ठाऊक असण्याचा संभव कितपत होता, कालिदासाच्या मनांत ऐतिहासिक सत्य सांगावयाची इच्छा होती कीं केवळ करमणूक करण्याची इच्छा होती, करमणूक करण्यासाठीं त्यास विपर्यास करण्यास कारणें होतीं काय इत्यादि प्रश्न विचारांत घेऊनच त्याच्या विधानास ऐतिहासिक महत्त्व देतां येईल. एरव्हीं देतां येणार नाहीं. कालिदासास अविश्वसनीय धरण्यांत त्याची थोरवी आड येत नाहीं. कालिदासाची कविता सुंदर असेल, त्याच्या उपमा चांगल्या असतील आणि त्यानें "प्रांशुलभ्ये फले मोहादुद्वाहुरिव वामनः" इत्यादि सुंदर वाक्यें लिहिल्यामुळें त्याची विनयशीलता देखील स्पष्ट होत असेल. हें सर्व आपण मान्य केलें तरी त्याला इतिहासकार समजणें चुकीचें होईल. त्यानें जें पत्र दिलें आहे तें देखील राज्यव्यवहाराच्या एकंदर पद्धतीला विरुद्ध आहे. जें पत्र विदर्भ राजाकडून आलें म्हणून नाटकांत दिलें आहे, त्यांत विदर्भराज अग्निमित्रास "पूज्य" म्हणतो. तो अग्निमित्रास उद्देशून बहुवचनानें बोलतो, तर अग्निमित्र त्यास एकेरी वाणीनेंच बोलत आहे अशीच विदिशाराजगौरवाची भाषा विदर्भराज कायम राखतो आणि विदर्भराज अग्निमित्राकडून आलेला संदेश आपल्याला आदेश आहे म्हणून मान्य करितो. हें विदर्भराजाचें दाखविलेलें हीनत्व वस्तुस्थितिदर्शक असावें असें मुळींच वाटत नाहीं. तर माळव्यांच्या दरबारांतल्या खुल्या मंडळीला खूष करणारीं हीं वाक्यें आहेत यांत शंका नाहीं. विदर्भराज विदिशा देशाच्या राजाचें स्वामित्व कबूल करतो; पण, तो उद्दामपणानें वागतो. म्हणजे तो विदिशा देशाच्या राजाचा उद्दाम नोकर आहे, असा विदर्भ आणि विदिशा यांच्यासंबंधानें प्रेक्षकांचा ग्रह उत्पन्न करण्यासाठीं कालिदास खटपट करीत होता असे दिसतें. पण त्याबरोबर हेंहि दिसतें, कीं हें काम देखील त्यास सफाईनें करतां आलें नाहीं. विदिशाधिपति विदर्भराजापेक्षां उच्च दर्जाचा मुळींच नव्हता असें दाखविणारें दोघांच्या दर्जासंबंधानें पूर्वीच्या मांडणीविरुद्ध विधान पुढें आलें आहे. विदर्भराज हा माझा स्वाभाविक शत्रु आणि प्रतिकूल वागणारा आहे असें उद्गार अग्निमित्रानेंच काढले आहेत. जो 'स्वाभाविक शत्रु' आणि 'विरुद्ध वागणारा' असेल तो राजा आपल्याला शत्रु अरेतुरे करीत असतां शत्रूस तो "पूज्य" कसे म्हणेल? यावरून स्वाभाविकपणें अशी कल्पना उत्पन्न होते कीं या दोन राज्यांमध्यें शुंगकाळीं नव्हे तर कालिदासाच्या काळीं वैर होतें, आणि विदर्भराजाचा दाखविलेला हलकेपणा वैर बाळगणाऱ्या राजाला आणि त्याच्या अभिमानी प्रजेला खुष करण्यासाठींच असावा. आणि दोन राजे एकमेककांस लिहितांना भाषा कशी वापरतील याचा विचार न करतां आपल्या प्रेक्षकवर्गास खुष करण्यासाठीं आपल्या राजाची उद्दाम भाषा आणि शत्रु राजाची नम्र भाषा कालिदासानें आपल्या पहिल्याच नाटकांत असमंजसपणानें योजलेली दिसते.

वरील पत्रामध्यें ज्या माधवसेनाच्या बहिणीसंबंधानें उल्लेख आहे ती विदर्भकन्या दुसरा कोणी नसून कालिदासाची पहिली नायिका मालविका हीच होय. स्त्रीप्रेमाचें हेंच पहिलें चित्र कालिदासानें रंगविलें त्या अर्थी एका विदर्भकन्येच्या सौंदर्याचें आणि प्रेमाचें गाणें गात गात कालिदास कवित्व शिकला असें म्हणावें लागेल.

मालविकाग्निमित्र नाटकांतील कथाभाग सर्व सांगण्याचें कारण नाहीं. एवढेंच सांगितलें असतां पुरें होईल कीं, मालविका ही राजाची थोरली बायको धारिणी इच्या तैनातींत दासी म्हणून असतां आणि नृत्यगायनांत तयार होत असतां तिचें आणि राजा अग्निमित्र यांचें एकमेकांवर प्रेम जडलें. त्या दोघांच्या प्रेमांत विघ्नें आलीं व तीं दूरहि झालीं.

## ४३३. विदर्भावर शुंगांनीं विजय मिळविला.

४३३. कालिदास पुन्हां पांचव्या अंकांत राजकारण आणि इतिहास यांचे धागे आणितो.

पांचव्या अंकाच्या प्रारंभीं एक माळीण आणि एक कुब्ज यांचा संवाद आला आहे तो असा—

मधुकरिकाः–सारसका चाललास कोठें?

कुब्ज सारसकः—मधुकरिके, वेदपारायणाचें अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणांना मासिक नित्य दक्षिणा द्यावयाची आहे, तर पुरोहिताकडे दक्षिणा नेऊन द्यायला मी चाललों!

मधु०:—दक्षिणा कशाकरितां?

सारसकः—ऐकलें आहे कीं सेनापतीनें यज्ञाच्या घोड्याचें रक्षण करण्यासाठीं महाराजांचा मुलगा वसुमित्र यास नेमलें. तेव्हांपासून देवी त्याच्या आयुष्यासाठीं अठरा सुवर्ण दक्षिणा दक्षिणा म्हणून देवविते.

मधुकरिकाः—योग्य आहे. सध्यां देवी कोठें आहे? आणि तिनें अनुष्ठान तरी कसलें आरंभलें आहे?

सारसक–देवी मंगलगृहांत आसनस्थ होऊन विदर्भदेशाहून तिचा भाऊ वीरसेन यानें पाठविलेला लेख लिपिकरींकडून वाचवून घेऊन ऐकत आहे.

मधुकरिकाः–तर मग विदर्भराजाकडील वृत्तांत काय आहे?

सारसकः—महाराजांच्या विजयदंडाच्या योगानें वीरसेनप्रमुखांनीं विदर्भनाथाला जिंकलें आहे; त्याचा दायाद

माधवसेन यास सोडविलें आहे. त्यानें ( माधवसेनानें ) मोठीं मौल्यवान् रत्नें पसरलेल्या गाड्या पाठविल्या आहेत. त्या गाड्यांतून देणगी म्हणून गाणेंबजावणें जाणणाऱ्या पोरी ( शिल्पकारिका ) देखील पाठविल्या आहेत. हें सर्व घेऊन येणारा इसम उद्यां महाराजांना भेटणार आहे.

यानंतर विदर्भावर मिळविलेल्या विजयाविषयीं वैतालिकांकडून पुढील अर्थानें दोन श्लोक म्हणविले आहेत.

कोकिलांच्या कलशब्दानें भरलेल्या विदिशा नदीच्या तीरोद्यानांत तू अनंगाप्रमाणें प्राप्तरति होत्साता वसंत घालवितोस. पण तुझे शत्रु विजयी हत्तींना बांधल्याच्या खुण ज्यांच्यावर आहेत, अशा वर्धा [ वरदा ] नदीच्या कांठीं असलेल्या वृक्षांप्रमाणें नम्र झाले आहेत.

तूं सुरोपम आहेस. ( कृष्ण आणि तूं सारखेच आहांत. ) तुम्हां दोघांचे कथकैशिकांच्या मध्यें केलेले पराक्रम कवींनीं केवळ वीररसाच्या गोडीमुळेंच वर्णन केले आहेत. तूं दंड करणारें सैन्य पाठवून विदर्भपतीच्या लक्ष्मीस हरण केलें आहेस, आणि कृष्णानें ज्याचा परिघ मोठा आहे अशा बाहूंनीं रुक्मिणीस हरण केलें.

## ४३४. विदर्भातील गृहकलह व त्याचा शुंगांनीं घेतलेला फायदा.

४३४. हे श्लोक झाल्यानंतर शब्दांच्या शेवटीं विदर्भ विषयक कथेचा धागा पुन्हा सुरू करून अंक संपविला आहे. त्यांत आलेलें कथासूत्र येणेंप्रमाणेः—विदर्भराज माधवसेन याच्याकडून ज्या दोन "शिल्पकारिका" देणगी म्हणून आल्या होत्या, त्यांस राजासमोर येण्यास अनुज्ञा मिळते. त्यांचीं नांवें "ज्योत्स्निका" आणि "रजनिका" अशीं आहेत, असें त्यांच्या संभाषणावरून समजतें. 'आम्ही संगीतांत "अभिविनीत" आहोंत" म्हणून त्या अग्निमित्रास सांगतात तेव्हां राजा राणीस म्हणतो कीं "या शिवाय दुसरी जी आहे, तिला आण." तेव्हां मालविकेस राणी धारिणी घेऊन येते. आणि राणी मालविकेस विचारते कीं, या दोहोंपैकीं "संगीत सहचारिणी" म्हणून तुला कोण आवडते ? या प्रसंगीं मालविकेला त्या दोघी शिल्पकारिका पहातात व ओळखतात; आणि "अहो ही तर भर्तृदारिका (राजकन्या)" असें म्हणून तिला प्रणाम करतात आणि अश्रु गाळतात. तें पाहून इतर लोक विस्मित होतात, आणि तुम्ही दोघी कोण आणि ही कोण असें राजा अग्निमित्र त्या दोघां शिल्पकारिकांस विचारतो. शिल्पकारिका उत्तर करतात, "देव, ही आमची भर्तृदारिका आहे" राजा विचारतो "कशी काय ?" तेव्हां त्या सांगतात कीं "ही माधवसेनाची बहीण आहे," आणि पुढें खुलासा असा करतात कीं, आमचा राजपुत्र माधवसेन हा दायादांच्या तावडींत सांपडला असतां त्याचा अमात्य आर्य सुमति नांवाचा होता, त्यानें आमच्या सारख्या परिजनांस टाकून देऊन हिला लपवून नेलें, एवढेंच आम्हांस ठाऊक आहे. पुढें काय झालें तें ठाऊक नाहीं.

या प्रसंगीं तेथें हजर असलेली कौशिकी नांवाची परिव्राजिका माहिती सांगत आहे. कौशिकी ही मालविका आली त्यानंतर थोड्याच दिवसांनीं राजाश्रयाला येऊन राहिली होती. ती विद्वान होती असें दाखविलें आहे आणि तिला "पडितां कौशिकी" असें लोक म्हणत आहेत; व राजा अनेक प्रसंगीं योग्यायोग्यतेच्या प्रश्नावर तिचें मत घेतो आणि तिला अत्यंत सन्मानपूर्वक वागवितो असें दाखविलें आहे.

जेव्हां ही परिव्राजिका कौशिकी पुढील वृत्तांत मीं सांगतें म्हणून म्हणाली, तेव्हां त्या दोघी शिल्पकारिकांनीं ही तर आर्या कौशिकी म्हणून ओळखून तिला प्रणाम केला आणि आर्या कौशिकीनें पुढील वृत्तांत येणेंप्रमाणें सांगितला आहेः—

"माधवसेनाचा सचिव सुमति तो माझा भाऊ होता. हिचा भाऊ पकडला गेला तेव्हां हिचा आपल्याशीं संबंध होणार ही अपेक्षा असल्यामुळें मी हिला बरोबर घेऊन विदिशेस जाणाऱ्या एका व्यापाऱ्यांच्या संघाबरोबर निघालें. तो प्रवाशांचा तांडा प्रवास करीत असतां रान आलें; आणि रानांत आम्हांस लुटारूंच्या धनुष्यबाणयुक्त सैन्यानें गांठलें. व्यापाऱ्यांच्या तांड्याबरोबर जे रक्षक होते त्यांचा त्या लुटारूंनीं पराभव केला. त्या प्रसंगीं या स्त्रीचें रक्षण करण्यांत माझ्या भावाचा प्राण गेला. त्या वेळीं मी बेशुद्ध झाल्यें होत्यें. मी शुद्धीवर येऊन पहातें तो मालविका कोठें दिसत नाहीं. तेव्हां मी भावाच्या शवास अग्नि देऊन तुमच्या देशास आल्यें आणि परिव्राजिकेचा पोशाख धारण केला. नंतर राजवाड्यांत माझा प्रवेश झाल्यानंतर मी मालविकेला पाहिलें. मालविकेला त्या वेळेस लुटारू वनचरांच्या तावडींतून सोडवून वीरसेनानें राणीसाहेबांपाशीं आणूनच ठेवलें होतें. मी तावडतोब तुम्हांस कळविलें नाहीं. याचें कारण एवढेंच कीं, तिचें एक वर्ष दास्यांत गेल्यानंतर तिला उत्तम वराची प्राप्ति होईल असें पूर्वीच भाकीत झालें होतें. तर तें दास्य पुरें करविणें म्हणजे तिचा विवाहकाल जवळ आणणेंच आहे म्हणून मी मौन धरिलें होतें."

कौशिकीचें हें कथन झाल्यावर पुढें कांहीं औपचारिक भाषणें होतात व विदर्भराज्यविषयक कथासूत्रास पुन्हा प्रारंभ होतो.

कंचुकीः—विदर्भासंबंधानें काय करावें या संबंधानें आपण विचार केलाच आहे. आतां आम्ही आपला संकल्प जाणूं इच्छितों, अशी विज्ञापना अमात्य करीत आहेत.

राजा—मौद्गल्या, तेथें असणारे भाऊ यज्ञसेन आणि माधवसेन या दोघांचें मी द्वैराज्य स्थापूं इच्छितों. रात्र आणि दिवस घेऊन सूर्य आणि चंद्र हे राज्य करतात त्याप्रमाणें वरदा नदीच्या उत्तर दक्षिण बाजूंनीं दोघांनीं पृथक् राज्य करावें.

कंचुकी—महाराज, येणेंप्रमाणें मी अमात्यपरिषदेंत कळवितों.

( राजा बरें आहे म्हणून खुणावतो आणि कंचुकी जातो. )

पहिली शिल्पकारिका—( मालविकेस ) भर्तृदारके, सुदेवानें राजपुत्रास अर्धराज्यांत प्रतिष्ठा मिळाली आहे.

मालविका—मोठें भाग्य हें कीं, त्याचें जीवित आतां संशयांत राहिलें नाहीं.

कंचुकी पुन्हां येऊन—महाराजांचा विजय असो. अमात्य विज्ञापनापूर्वक कळवीत आहेत कीं, महाराजांची बुद्धि कल्याणावर आहे. मंत्रिपरिषदेचें देखील हेंच मत आहे.

क थें ती ल रा ज की य च ळ व ळी चें प र्य व सा न.

विदर्भाधिपतींचें प्रकरण येणेंप्रमाणें संपल्यावर पुढें अग्निमित्राचा बाप पुष्यमित्र याच्याकडून आनंदाचा संदेश आणला आहे. तो असा कीं, अग्निमित्राचा मुलगा वसुमित्र यास अश्वमेधयज्ञाच्या घोड्याचा संरक्षक नेमलें होतें. तो घोडा सिंधूच्या दक्षिण तीराला (?) असतां यवनांनीं तो धरला आणि त्यामुळें दोन सेनांची मोठी लढाई झाली आणि त्यांत वसुमित्राचा जय झाला. हें आनंदाचें वृत्त ऐकून अग्निमित्रानें यज्ञसेनाचा मेहुणा सोडून दिला आहे.

शुंगांनीं विदर्भाचे दोन तुकडे केले हें महत्त्वाचें राजकीय वृत्त या नाटकांत सांगितलें आहे. तथापि हें खरें धरतां येत नाहीं. कारण आमच्या मतें सर्वच कथा काल्पनिक आहे.

नाट्यकथेचें पर्यवसान मालविका आणि अग्निमित्र यांचें ऐक्य तें धारिणीनें मालविका राजाला समर्पण केल्यामुळें घडून आलें आहे.

ही कथा सांगतांना देखील कालिदासानें चूकच केली आहे. वर्धा नदीच्या दोन्ही बाजूंना जो मुलुख आहे तो विदर्भ होय. हें कालिदासाचें भौगोलिक ज्ञान तद्देशीय स्थिति दाखविणारें आहे. तथापि कालिदासानें चुकी केली ती ही कीं, विदर्भ वर्धा नदीच्या पूर्वेस व पश्चिमेला आहे, असें न सांगतां तो दक्षिणेस व उत्तरेस आहे म्हणून सांगता झाला आहे. अगदीं बरोबर बोलायचें म्हणजे वर्धा नदीचा प्रवाह कालिदास समजतो त्याप्रमाणें पूर्वपश्चिमहि नाहीं व अगदीं दक्षिणोत्तरहि नाहीं. वायव्येकडून आग्नेय दिशेस आहे, असें म्हटलें तर चालेल. असें असतां कालिदासानें हा प्रवाह पूर्वपश्चिम केलेला असून विदर्भाचे दक्षिण व उत्तर असे विभाग केले आहेत. ही चूक होणें अस्वाभाविक नाहीं. आज नकाशा समोर असल्यामुळें आपणांस दिशांचा घोटाळा पडत नाहीं. तथापि ज्या काळांत नकाशे नव्हते त्या काळांत कालिदास जर वरदातटाकीं आला असला तर त्याला ही नदी पश्चिमेकडून पूर्वेकडे वहात आहे आणि त्यामुळें या नदीमुळें वऱ्हाडचे नदीच्या दक्षिणेकडील आणि उत्तरेकडील असे दोन भाग आहेत, असा आभासही झाला असेल. दक्षिण व उत्तर यांचा अर्थहि पूर्वपश्चिम असा होतो, त्याअर्थी कालिदासाचा दिशांविषयीं गैरसमज झाला नव्हता असा वाद उत्पन्न करतां येईल. तथापि पूर्वपश्चिम हे शब्द वगळून कालिदास मुद्दाम वांकड्यांत कां शिरेल हा एक प्रश्नच आहे.

## ४३५. कथेंतील आवश्यक भाग आणि आगंतुक भाग यांच्या ऐतिहासिकतेविषयीं विचार.

४३५. मालविकाग्निमित्राची ऐतिहासिकता तपासण्यासाठीं अनेक प्रकारचा विचार करावा लागणार आहे. ऐतिहासिकता कालिदासाच्या कालावर बरीचशी अवलंबून आहे, असा कित्येकांचा समज आहे. कालिदास जर मौर्यकालापासून दूर नाहीं, अशा काळांतला तर त्याच्या ग्रंथांत ऐतिहासिकता अधिक येईल किंवा निदान ऐतिहासिक पुरुषांविषयीं एखाद्या वर्गाचे समज तरी स्पष्ट होतील. पण जर कालिदास त्या कालापासून दूरचा धरला तर त्यानें कथानकांतील पात्रांविषयीं ऐतिहासिक चौकशी न करतां केवळ कल्पनाच वापरली असली पाहिजे. संविधानकांतील कथांच्या अंगांचे आवश्यक आणि आगंतुक असे दोन भाग केले तर ऐतिहासिक प्रकरण सोपें जाईल. कथेंतील जो भाग अन्योन्याश्रयानें बद्ध असतो तो "आवश्यक," आणि नसतो तो "आगंतुक" असें वर्गीकरण केलें पाहिजे. आगंतुक भाग अगदीं निराळा काढला पाहिजे. जो भाग आगंतुक असेल त्याचेंच ऐतिहासिक महत्त्व अधिक आहे. कथानकांत पोषक नसलेल्या ज्या विशेष गोष्टी वर्णन केल्या असतील, त्यांची सयुक्तिकता विचारांत घेतली पाहिजे. कथानकांत आगंतुक भाग आहेत. प्रो. शिवराम महादेव

परांजपे यांनीं मालविकाग्निमित्राच्या शालोपयोगी आवृत्तीच्या प्रस्तावनेंत आगंतुक भागाचा मुद्दा आणला आहे. त्यांनीं दाखविलें आहे कीं, वीरसेन नांवाचा देवीचा भाऊ आहे, तो "वर्णावर" आहे, आणि त्याला नर्मदातीराच्या अंतपाल-दुर्गाच्या संरक्षणासाठीं तेथें ठेविलं आहे वगैरे. या गोष्टी पहिल्या अंकांत दासी सांगत आहे. येथें धारणीच्या भावाचें जें "वर्णावरत्व" सांगितलें आहे त्यामुळें कथेचा परिपोष होत नाहीं म्हणून तें सांगण्यांत ऐतिहासिकता असावी असें परांजप्यांचें मत होतें. कालिदास अग्निमित्राच्या अगदीं जवळच्या काळांत होऊन गेला अशी त्यांची कल्पना असल्यामुळें वीरसेन नांवाचा हलक्या जातीचा धारिणीचा भाऊ ही ऐतिहासिक व्यक्ति असली पाहिजे, असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे, पण हें त्यांचें म्हणणें ग्राह्य वाटत नाहीं. जनतेस व्यक्तीची ओळख चांगली करून द्यावी, ऐतिहासिक सत्य समजावें, असा हेतू असेल तर कथेशीं असंबद्ध अशा अनेक गोष्टी कवि घालील हें खरें, पण एखादें ऐतिहासिक सत्य सांगण्यासाठींच ही आगंतुक गोष्ट उल्लेखिली आहे अशी कल्पना करण्यास सांगावयाचें सत्य महत्त्वाचें आणि महत्वाच्या व्यक्तीविषयीं असावें लागतें; तसें तें येथें दिसत नाहीं.

"वर्णावर" भावाचा उल्लेख निराळ्याच नाटकांतील आगंतुक कारणानें आलेला दिसतो. कथासूत्राच्या परिपोषास अनवश्यक अशा ज्या गोष्टी कथानकामध्यें दडपून दिलेल्या असतात, त्यांत कवीचा कांहीं तात्कालिक हेतू असतो म्हणून दडपून दिलेल्या असतात, ही दुसरी शक्यता आहे. या शक्यतेचा रा. परांजपे यांनीं विचारच केलेला नाहीं. राणीचा भाऊ " वर्णावर " म्हणजे हलक्या जातीचा होता, हें सांगण्यांत कांहीं कथासाधकता नाहीं, किंवा स्वभावचित्राचा परिपोष करितां येत नाहीं. हेतु इतिहासलेखनाचा असेल, असें म्हणावें तर तेंहि शक्य दिसत नाहीं. राजस्त्रियांचीं कुलें देखील नाटकांत दिलेलीं नाहींत, त्याअर्थी राणीच्या भावाचें " वर्णावरत्व " देण्यापुरतें ऐतिहासिक सत्य कालिदासास कोठून समजलें; व तें रक्षण करण्याची इच्छा कालिदासास कशी झाली ? आमच्या मतें हें "वर्णावरत्व" देण्यांत कालिदासाचा हेतू गतव्यक्तीसंबंधानें ऐतिहासिक सत्य देण्याचा नसून जिवंत व्यक्तीवर टीका करून लोकांची करमणूक करतां आली तर करावी, हाच असला पाहिजे. त्यांत हेतू एवढाच असला पाहिजे कीं, राजशालकावर एखादा शिन्तोडा टाकतां आला तर तो टाकतां यावा. राजशालक हे पुष्कळदां अप्रिय लोक असतात. " धारिणीचें " कुल कशा प्रकारचें होतें याचा नाटकांत निर्देश नाहीं. कालिदासकालीन राणीच कदाचित् हलक्या कुळांतली असावी. केवळ सौंदर्याच्या जोरावरच ती राणी झाली असावी, आणि तिचा भाऊ दुसऱ्या कारणामुळें म्हणजे धारिणीच्या बापाचा ठेवलेलीचा मुलगा असल्यामुळें हलक्या वर्णाचा असणें शक्य आहे. पण हा उल्लेख शुंग राज्ञीसंबंधानें नसून कालिदासाशीं समकालीन असलेल्या राणीसंबंधानें असणें अधिक शक्य आहे. आपल्या बापानें ठेवलेल्या दासीच्या मुलांना भावंड मानण्याइतकी उदारबुद्धि किंवा त्याविषयीं जुगुप्सेचा अभाव कालिदासाच्या नंतरच्या काळांत होता, हें बाण आपल्या पारशव भ्रात्याचा उल्लेख करून दाखवित आहेच, तसा जुगुप्सेचा अभाव कालिदासकालींहि असावा.

"ऐतिहासिक" या शब्दाचें अधिक पृथक्करण पाहिजे. ऐतिहासिक म्हणजे कथेंतील व्यक्तीच्या काळचा असा जर अर्थ केला तर आगंतुक गोष्टींचें ऐतिहासिकत्व सिद्ध करणें कठीणच जाईल. आवश्यक भाग कोणता आणि आगंतुक भाग कोणता यासंबंधानें देखील मतभेद आहे. प्रो. परांजपे ' राजाची दुसरी राणी इरावती हिचें पात्र कां आणलें आहे ? ' अशी पृच्छा करतात. मत्सरयुक्त राणीचें जें कार्य दाखवावयाचें तें करण्यास पहिली राणी धारिणी ही पुरेशी होती. असें असतांहि इरावती कालिदासानें आणली आहे ती खरी व्यक्ति असावी म्हणून आणली आहे अशी ते कल्पना करतात. तथापि इरावती ही कथेस अनवश्यक अशी दिसून येत नाहीं. पहिली राणी, राजा अगोदरच आपल्या हातांत नाहीं, आपल्या उरावर राजानें दुसरी केलीच कीं नाहीं, अशा भावनांची आणि विचाराची असल्यामुळें आणि दुसरी राणी मात्र आपण विजयी व्यक्ति आहोंत अशा प्रकारच्या भावनांची असल्यामुळें दोघींची वृत्ति निरनिराळ्या प्रकारची असते, असें चित्र कालिदासास दाखवावयाचें होतें. थोरली आपणांस राजाची सहचरी समजते आणि तिच्यांत कामवासना तीव्र नसते, तर धाकटी आपण कामी आयुष्यक्रमांतील भागीदार आहोंत अशा भावनेची असते. ती रंगभूमीवर येते, ती देखील मद्य पिऊन येते. अशी स्त्री दाखविण्यांत राजस्त्रियांपैकीं पहिली व दुसरी यांत असलेला भेद दाखविण्याची कालिदासास इच्छा होती व तें चित्र कथानकास पोषकच होतें असें म्हणतां येणार नाहीं काय ? नाटक विशिष्ट रंगभूमीवर येणार आहे हें नाटककाराच्या मनांत ज्या मानानें असेल त्या मानानें आपला प्रेक्षकवर्ग ओळखून त्याला खूष करण्यासाठीं नाटकांत मजकूर आणण्याची क्रिया नाटककार करतो. स्थानिक महत्वाचे उल्लेख अशाचमुळें नाटकांत शिरतात आणि ते उत्तरकालीन लोकांस महत्वाचे वाटत नाहींत, किंवा त्यांची

खुमारी त्यांस कळत नाहीं. जे उल्लेख नाटकांतील संविधानकाच्या परिपोषासाठीं अवश्य नाहींत ते प्रथम बाजूला काढणें अवश्य आहे. मग ते उल्लेख घालण्यांतला हेतु पूर्वेतिहास स्पष्ट करण्याचा होता, कीं त्या सूचक उल्लेखांनीं स्वकालीन प्रेक्षकवर्ग खूष करण्याचा होता, याविषयीं विचार केला पाहिजे.

नाटकांतील प्रकृत भाग आणि अप्रकृत भाग.

अवश्य भागाचें पुन्हां केंद्रवर्ती कथाभाग आणि त्याची संबंधपरंपरा असें पृथक्करण अवश्य आहे. प्रेमकथा हा केंद्रवर्ती भाग आहे, हें सहज दृष्टीस पडतें. हें नाटक तरुण राजकन्या आणि मध्यमवयी राजा यांच्या विवाहाचें प्रेमोत्तरत्व दाखविण्यासाठीं आहे. कवीनें लावलेले विवाह प्रेमोत्तरच असावयाचे ! लग्न जरी राजकारणांतील डाव म्हणून योजिलें होतें, तरी तें खरोखर प्रेममूलकच झालें होतें असें दाखविण्याचा प्रयत्न यांत आहे. राजकारणासाठीं योजिलेलें लग्न प्रेमासाठीं होऊं शकतें हें तात्पर्य राण्यांच्या मनावर ठसविणें हा कालिदासाचा हेतू दिसतो. हा प्रयत्न केवळ राजकारणाच्या सोईसाठीं केलेल्या राजाच्या एखाद्या तिसऱ्या राणीची समजूत करण्यासाठीं केला नसेल कशावरून ? जर कालिदास राजाश्रय असलेला कवि असला तर आपल्या यजमानास खूष करण्याची क्रिया यांत त्यानें साधली असली पाहिजे.

कवि अंतःकरण मोकळें करून केवळ सुंदर नाटक किंवा काव्य लिहूं लागला तर कर्त्यासवरत्या मुलाचा जो बाप आहे आणि जो तिजवर आहे असा पुरुष विनाकारण नायक कशासाठीं करील ? त्यांत कांहीं तरी राजकीय प्रयोजन असलें पाहिजे; आणि कवीचा हेतु, राजकृपेचें अगर प्रेमास राजकारणामध्यें दुय्यम स्थान असावें असें मत असलेल्या दरबारी पोक्त मंडळीच्या प्रशंसेचें संपादन करण्याचा असला पाहिजे असें वाटल्याखेरीज रहात नाहीं.

नाटकाचा प्रधान भाग हाच जर कांहीं स्वकालीन हेतु साध्य करण्यासाठीं असेल तर ऐतिहासिक काल घेणें फार सोईचें होतें; ही गोष्ट केवळ नाटक आहे, खरी नाहीं. आम्हीं खरोखर असलेले आरोप दूर करण्याकरतां मुळींच नाटक लिहीत नसून केवळ ऐतिहासिक सत्य दाखविण्यासाठीं नाटक लिहित आहोंत अशी बतावणी करणें कवीस अवश्य होतें. तिसरी बायको आणावयाची आणि तिचें लग्न जर प्रेमाकरतां झालें असें तिला दाखवावयाचें तर ठरलेल्या नवीन बायकोची आणि राजाची दृष्टादृष्ट आणि प्रेमाकर्षण हीं ती अज्ञात असतांच झालीं असें दाखविलें पाहिजे. आणि अज्ञातत्व उत्पन्न करण्यासाठीं राजकन्येवर विघ्न आणणें आणि त्यासाठीं तिला व तिच्याशीं लग्न करूं इच्छिणाऱ्या राजाला कोणी तरी शत्रु दाखविणें अवश्य होतें. राजकन्येची योग्यप्रसंगीं ओळख पटविण्यास तिच्या देशच्या कांहीं स्त्रिया आणणें आणि एका स्त्रीचें तिच्यावर एकसारखें लक्ष असणें हें ओघानें आलेंच. मालविकेच्या खऱ्या स्थितीविषयीं गुप्तता राखणें या गोष्टीचें समर्थन राखण्यासाठीं मालविकेचें एक वर्ष दास्य झाल्यानंतर तिचें पुढें लग्न होणार हें पूर्वींच भाकीत ठरलें होतें, असें सांगणें प्राप्त झालें. या सर्व गोष्टी राजकन्येस अज्ञातवासांत दाखविण्यास अवश्यच झाल्या. राजा आणि नवीन बायको यांची लग्नापूर्वीच आणि राजकन्येच्या अज्ञातवासांत भेट आणि प्रेम हीं दाखविण्यासाठीं ज्या दुसऱ्या कांहीं गोष्टी आल्या त्या म्हटल्या म्हणजे दोन वस्तादांची स्पर्धा, अशोकाला मालविकेनें पादाघात करणें इत्यादि होत.

## ४३६. प्रकृतत्वनिगूहन आणि त्याचें प्रयोजन.

४३६. कालिदासाचा हेतू सामाजिक नाटक लिहिण्याचा होता, कीं इतिहास सांगण्याचा होता. असा प्रश्न विचारतां सामाजिक नाटक लिहून स्वकालीन लोकांचें मनोरंजक करणें हा होता, असेंच म्हणावें लागेल. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकांत तत्कालीन समाजावर टीका करून टाळ्या मिळविण्याचा हेतु मुळींच लपत नाहीं. एखाद्या राणीला दारू पिऊन झिंगलेली अशी रंगभूमीवर आणणें, राणीच्या भावाचा अक्करमासेपणा चव्हाट्यावर आणणें, इत्यादि गोष्टी नाटकांत आणण्यास कवीस बरेंच धारिष्ट पाहिजे, हें उघड आहे. या गोष्टी धट्टपणें बोलावयास त्या प्रकृत समाजांतील व्यक्तींना उद्देशून आमचें लिहिणें नाहीं, आमचें लिहिणें प्राचीन व्यक्तींच्याविषयीं आहे, असेंच कवीला मिष करावें लागणेंहि स्वाभाविक आहे.

दुसऱ्या राणीचें दारू पिणें हें देखील कथेशीं संबद्ध नाहीं. खालील संवाद टाळला असता तरी चाललें असतें.

( त्यावर "युक्तमदा" इरावती आणि चेटी प्रवेश करतात. )

इरावती—हंजे निपुणिके, मी पुष्कळदां ऐकलें आहे, कीं मद्य अंगावर चढणें हें स्त्रीजनांचें विशेष मंडण आहे. हें सत्य आहे कीं केवळ लोकप्रवाद आहे.

निपुणिका—प्रथमतः हा केवळ लोकप्रवाद होता पण आज हें सत्य झालें आहे.

इरावती—ही खुशामत पुरे.

येणेंप्रमाणें एका राणीचें चित्र काढणाऱ्या कवीला आपलें नाटक प्राचीन काळ दाखविणारें आहे, म्हणून ढोंग करणें अत्यंत उपयुक्त होतें. गांवांतल्या लोकांमध्यें राणीची चेष्टा चांगली केली म्हणून हंशा पिकवावयास सांपडतो व राणीची देखील तिला दारू पिण्यास ऐतिहासिक आधार आहे, अशी समजूत करून देऊन दोन्ही बाजूची शाबासकी मिळविणें कवीस शक्य होतें. तथापि हेंच जर नाटक काल्पनिक किंवा प्रचलित समाजाचें दर्शक म्हणून दाखविलें असतें, तर तें राजदरबारास खूष करूं पाहणाऱ्या कवीस धोक्याचें होतें. असल्या तऱ्हेच्या खोंचा जुन्या काळच्या नाटकांत राजाच्या इच्छेनें देखील घालतां येतात, अशा प्रकारचा अनुभव आजच्या देखील महाराष्ट्रीय नाटककारांना आहेच. एवंच दोन राण्या असतां राजकारणासाठीं तिसरी राणी करूं पहाणाऱ्या राजाला प्रिय होऊं पहाणाऱ्या आणि राजदरबारी मंडळीवर टीका करणाऱ्या कवीला आपल्या नाटकास ऐतिहासिक स्वरूप देण्याची आवश्यकता होती, आणि हें ऐतिहासिकत्व कालिदासानें अगदीं थोडक्या उल्लेखांनीं आणलें. ते उल्लेख म्हटले म्हणजे मौर्य, पुष्पमित्राचा यज्ञ, वसुमित्र आणि अग्निमित्र हीं नांवें आणि यवनांच्या उपसर्गाचा उल्लेख एवढेच होत. या अगदीं थोडक्यांत उल्लेखांनीं सर्व नाटकास ऐतिहासिक स्वरूप आलें. हें ऐतिहासिक स्वरूप आणण्याची कल्पना देखील कालिदासास पांचवा अंक लिहीत असतांना सुचली असावी. पांचवा अंक तयार होईपर्यंत या नाट्यचित्रावर दोन तीन छिटकाव टाकून हें नाटक एकदम ऐतिहासिक करण्याची युक्ति कालिदासाच्या डोक्यांत देखील आली नसावी, आणि पांचवा अंक लिहीत असतां त्यास ऐतिहासिक नाटकाचें स्वरूप देतां येतें असें कालिदासाच्या लक्षांत आल्यानंतर पहिल्या अंकांत तदनुसार फेरफार केले असावेत, आणि राजाचें नांव अग्निमित्र केलें असावें; अशी कल्पना येते.

शुंगकालीन वातावरण कितपत चित्रित झालें आहे.

या नाटकाच्या कथासूत्रांत व्यक्त झालेला राजकीय इतिहास विश्वसनीय नाहीं, हें सांगण्यास झालेलें विवेचन पुरें आहे, पण कालिदास शुंगाच्या काळचें वातावरण तरी कितपत आणतो हा दुसरा प्रश्न उत्पन्न होईल. कारण ऐतिहासिक कादंबऱ्या किंवा नाटकें यांचें वैशिष्ट्य किंवा महत्त्व त्यांतील कहाणीवर अवलंबून नसून त्या कथेंत प्राचीन वातावरण मांडलें असेल तर त्यावर बरेंच असतें. कथेंतील वातावरण ऐतिहासिक असेल पण बहुतेक व्यक्ती काल्पनिक असतील, तरी कादंबरी महत्त्वाची होईल, यासाठीं या कथेंतील वातावरणाचें परीक्षण अवश्य आहे. राजकारणविषयक वातावरण कालिदासास बेताचेंच साधलें आहे. राजेलोकांची एकमेकांशीं पत्रव्यवहाराची भाषा जी दाखविली आहे. ती शक्य कोटींतली मुळींच नाहीं. त्या भाषेची अप्रयोजकता मागें दाखविलीच आहे. राजकीय कार्यपरंपरेची सयुक्तिकता त्यानें विचारास घेतली नाहीं. जर विदिशापति आपल्या बापाचा म्हणजे सेनापति पुष्पमित्र याचा अंकित होता, तर साम्राज्यसंस्थेचें चित्र दाखविण्यासाठीं त्याचें मंत्रिमंडळ पुष्पमित्राच्या मंत्र्याच्या विचाराची वाट पहात आहे किंवा त्यांच्याकडे आपले विचार कळवीत आहे, इत्यादि गोष्टी कालिदासानें दाखवावयास पाहिजे होत्या, पण त्यादेखील दाखविल्या नाहींत. तेव्हां पुष्पमित्र हरामखोरी करून मौर्यसिंहासन घेत आहे, तेव्हां मौर्यसचिवास अग्निमित्र पुष्पमित्राच्या आदेशाशिवाय मुक्त करीत आहे असें दाखविण्यांत कालिदासानें चूकच केली आहे. एवंच कालिदासाच्या मनांत ऐतिहासिक नाटक लिहिण्याचा हेतु नव्हता व त्यासाठीं ऐतिहासिक वातावरण उत्पन्न करण्याच्या भानगडींत तो पडलाच नाहीं. नाटकाचें ऐतिहासिकत्व त्याला प्रकृतत्त्वनिगूहन करण्यापुरतेंच हवें होतें. येणेंप्रमाणें राजकारणाचें चित्र बाष्कळ तऱ्हेनें कालिदासानें काढलें असतां कै. शिवराम महादेव परांजपे हे त्या चित्रावरून त्या वेळच्या शासनसंस्था सुप्रगत झाल्या होत्या असें सांगतात! शासनसंस्था फार सुप्रगत होत्या याला चाणक्यादींच्या ग्रंथासारखे आधार आहेत. कालिदासाच्या मालविकाग्निचित्रावरून मात्र तें सिद्ध होत नाहीं. उलट कालिदासाला प्रचलित राजकारणाचें अज्ञान होतें असें मात्र सिद्ध होईल.

## ४३७. राजकीय, नैतिक वातावरणाची सत्यता.

४३७. राजव्यवहाराचें ज्ञान जरी कालिदासास नव्हतें तरी असें दिसून येईल कीं तत्कालीन राजकारणाच्या स्वरूपामुळें त्यावेळच्या नैतिक वातावरणावर जो परिणाम झाला, तो मात्र कालिदासाच्या नाटकावर पूर्णपणें आलेला आहे. कालिदास स्वतः स्वकालीन नीतिकल्पनांत गुरफटल्यामुळें तो स्वकालीन नीतिकल्पना स्पष्ट दाखवीत आहे. कालिदासाच्या नैतिक भावना चांगल्या प्रकारच्या नव्हत्या असाहि आरोप गैरसमजुतीमुळें त्याच्यावर आजच्या कारकूनवजा मध्यम वर्गाकडून येण्याचा संभव आहे. जो चाळिशी उलटलेला तिजवर राजा

नवीन बायको व्यवहारासाठीं करतो, त्याच्या नवीन बायकोला तुझ्याशीं झालेलं लग्न प्रेमामुळेंच झालें आहे, अशी समजूत कालिदास करून देतांना दिसतो. तेवढ्यावरून कालिदास हा खुषमस्कऱ्या कवी आहे अशी समजूत करून घेण्याचें कारण नाहीं. कालिदासाची देखील सोडवणूक करणारी बाजू आहे. राजकारणास प्राधान्य आणि प्रेमादिभावनांस दुय्यमता देणें या गोष्टी चांगुलपणाचें लक्षण आणि राजाचें कर्तव्य म्हणून समजल्या जात होत्या. राजकारणाकरितां नवीं नवीं लग्नें करणें, हें कर्तव्य आहे, तर आपल्या जुन्या बायकांची समजूत काढण्यांत हुशारी दाखविणें हेंही चांगल्या राजाचें लक्षण आहे. एवंच, कालिदासाच्या व त्याच्या काळच्या लोकांच्या दृष्टीनें नाटकांतील अग्निमित्रासारखी व्यक्ति आदर्शभूत राजत्वाची उदाहरण होती. त्यावेळचें वाङ्मय आपण पाहिलें तर चांगल्या राजानें आपले लग्नसंबंध देखील प्रेमाकरितां न करतां राज्याच्या हितासाठीं करावेत हें धोरण श्लाघ्य म्हणून मांडलें आहे आणि जो मुत्सद्दी आपल्या कळसूत्रीपणानें राजाला खेळवून त्यापासून खरें लपवून ठेवून व विशिष्ट स्त्रिया योग्य प्रसंगीं त्याच्या नजरेस आणून राज्याला हितावह अशीं लग्नें घडवून आणील तो मुत्सद्दी गौरविला गेला आहे. बृहत्कथेंतील यौगंधरायण याच प्रकारचा दाखविला आहे जो राजा राज्यास हितावह असें लग्न करतो, तो राजा चांगला, अशा तऱ्हेचें राजत्वाचें ध्येयदेखील त्या काळीं असल्यास तें अस्वाभाविक नाहीं. अशा परिस्थितींत तिसरी बायको राज्यहितासाठीं करणारा राजा कालिदासाला ध्येयभूतच वाटत असला पाहिजे. आणि ज्या राजाला राजकारणासाठीं अनेक बायका कराव्या लागतात, तो जुन्या बायकांची समजूत काढण्यांत ज्या मानानें कौशल्य दाखवील त्या मानानें तो कवींना कौतुकास्पदच वाटत असला पाहिजे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे कालिदासाचें अंतःकरण दूषित झालेलें दिसत नाहीं. राजकारण हें लाखों लोकांच्या कल्याणासाठीं असतें, आणि गृहसौख्य हें व्यक्तीच्या सुखासाठीं असतें; त्याअर्थी राज्याकरतां लागतील तीं लग्नें करणें आणि त्या लग्नांमुळें उत्पन्न होणारा त्रास सहन करणें इत्यादि गोष्टी चांगल्या राजाचें लक्षण म्हणून समजल्या जात असत.

**स्नेहं दयां तदा सौख्यं यदि वा जानकीमपि**
**आराधनाय लोकस्य मुंचतो नास्ति मे व्यथा !**

म्हणणारा भवभूतिदेखील निराळें ध्येय सांगत नाहीं. जेव्हां आपल्या उपपत्नीशीं गडबड करणाऱ्या मंत्र्यास काय शिक्षा करावी, असा एका राजानें बुद्धास प्रश्न विचारला असतां तो मनुष्य फार उपयुक्त असेल तर त्यास सोडून द्यावें असा सल्ला जेव्हां बुद्ध देतो तेव्हां स्त्रीविषयक नीतीस राजनीतीपेक्षां दुय्यमता राजेलोकांनीं दिली पाहिजे, अशी आणि दुय्यमता देतो तो चांगला राजा होय, हेंच तत्त्व समाजांत प्रसृत असावें असें दिसतें. राजकारणासाठीं नवी बायको करण्यांत राजाची वैषयिक वृत्ति व्यक्त होत नसून सोशिकपणा व्यक्त होत आहे अशी तत्कालीन नीतिवेत्त्यांची समजूत असावी. या प्रकारच्या नैतिक भावना कालिदासानें दाखविल्या. त्या कालिदासाच्या काळच्या निदर्शक आहेतच, पण त्या शुंगकालीन देखील आहेत.

कालिदासाचें ऐतिहासिक ज्ञान काय असेल यावर विचार करतां त्या काळाचें आज आपणास जें ज्ञान आहे तितकें देखील कालिदासास असावेंसें वाटत नाहीं. मगध आणि विदर्भ यांच्या इतिहासाचें ज्ञान कालिदासास ताम्रपट किंवा स्तंभलेख यावरून असेलसें वाटत नाहीं; कारण शुंगकालीन स्मारकें फारशीं शिल्लकच नाहींत. कालिदासाचें ऐतिहासिक ज्ञान केवळ कर्णोपकर्णींच्या कथांवरून आणि पूर्वकालीन नाटकांवरूनच असलें पाहिजे. शुंगाची पदवी उच्च आणि विदर्भाची पदवी हलकी अशी जी कल्पना कालिदासानें या नाटकांत मांडली आहे, ती कांहीं ऐतिहासिक वस्तुस्थिति मांडण्याच्या हेतूनें केली असणें शक्य नाहीं. विदर्भराजाची सहानुभूति जुन्या घराण्याशीं कालिदासानें दाखविली आहे. जुन्या घराण्याचा मंत्री नवीन उपटसुंभ राजानें कैदेंत टाकला, त्याच्या मुक्ततेसाठीं प्रयत्न करणारा राजा आपणांस अरे तुरे करणाऱ्या राजाला उलट मोठ्या सन्मानानें वागवितो हें चित्र मनुष्यस्वभावास सोडून आहे. तर अशाप्रकारचें चित्र इतिहासाचें खरें स्वरूप दाखविण्याच्या हेतूनें कालिदासानें मुळींच काढलें नाहीं. जुन्या राजघराण्याचा अभिमानी राजा एका विश्वासघातकी सेनापतीच्या मुलाशीं अदबीनें वागतो आणि तो सेनापतिपुत्र त्या राजाशीं उद्धटपणानें वागतो हें चित्र व्यवहारास सोडून आहे त्याचप्रमाणें रसासहि अपकर्षक आहे. असें असतां कालिदासासारखा कवि तें चित्र कां काढतो याविषयीं विचार केला असतां, त्या कालामध्यें विदर्भ आणि कालिदास ज्या राज्यांत होता त्या राज्यांतील लोक यांच्यामध्यें स्पर्धा असावी आणि आपल्या राजधानीच्या लोकांकडून टाळ्या मिळविण्याची कालिदासास अपेक्षा होती हें होय. विदर्भराजकन्येस देखील "मालविका" नांव देण्यांत हेतु हाच असावा. विदर्भाची राजकन्या जाणार कोठें ? ती माळव्याच्याच राजाच्या मालकीची आहे असें 'मालविका' नांव देऊन कालिदासास सुचवावयाचें होतें.

## ४३८. अन्यदेशीय पंडितवर्गांत विदर्भ असूया-स्थान होण्याइतकी विदर्भाची प्रगति.

४३८. जें राज्य आपणांस साहित्यसंगीतादि बाबतींत श्रेष्ठ म्हणवीत असेल अशा राज्यांत वऱ्हाडविषयीं स्पर्धा किंवा मत्सर असण्यास कारणेंहि होतीं. संस्कृत नाट्यवाङ्मयाच्या कालीं त्याचें मुख्यस्थान गंगा आणि गोदावरी या दोन नद्यांतील मुलूख होता, असें स्पष्ट दिसून येतें. या प्रदेशामध्यें कान्यकुब्ज, मगध, विदिशा, मालवदेश, विदर्भ इतका प्रदेश येत होता. आणि या प्रदेशामध्यें सर्वांत मोठा प्रदेश विदर्भाचे राजे ले वाकाटक यांचा असावा. वाकाटकांच्या उत्कर्षाचा काल इ. स. १५० च्या नंतर चारशें वर्षें इतका आहे. या काळांत वाकाटकांची सत्ता पूर्वेकडे वाईनगंगेपर्यंत, दक्षिणेकडे अजिंठ्यापयत आणि गोदावरीमुखापर्यंत, उत्तरेकडे बुंदेलखंडपर्यंत पसरली होती. भवभूति वाकाटकांच्या महत्त्वाच्या लोपानंतर झाला. त्यास वऱ्हाडांत आश्रय मिळाला नाहीं. त्याला आश्रयासाठीं चोहोंकडे हिंडावें लागलें आणि शेवटीं कान्यकुब्ज राजाच्या पदरीं रहावें लागलें. वाकाटकांच्यापूर्वी केव्हांतरी भोजराजे विदर्भावर राज्य करीत होते, असें दंडीच्या लेखावरून स्पष्ट दिसून येतें. सातव्या शतकांतील कवि काव्यविवेचक ग्रंथांत रीतींचें वर्णन करितांना गौडी पद्धति आणि वैदर्भी पद्धति म्हणून काव्यरीतीचें वर्णन करतात. सातव्या शतकांत याप्रमाणें काव्यरीतींचें वर्गीकरण होण्यापूर्वी बरेंचसें विदर्भवाङ्मय अस्तित्वांत असलें पाहिजे. वैदर्भी पद्धतींत लडिवाळपणा, संथपणा, स्पष्टपणा, मोहकता, नाजुकपणा इत्यादि गुण आढळून येतात, तर गौडी पद्धतींत शब्दावडंबर, लांबलचक समास इत्यादि गोष्टी आढळून येतात, असें सांगणाऱ्या दंडीच्या पूर्वीच काव्योत्पादनाच्या दृष्टीनें विदर्भ हा अत्यंत महत्त्वाचा देश झाला होता हें उघड आहे. कालिदासाच्या मालवदेशास असें महत्त्वाचें स्थान नव्हतें. वैदर्भी रीतीमुळें तेथील लोकांची चव इतकी निश्चित झाली होती कीं, भवभूतीसारख्या श्रेष्ठ कवीस देखील तेथें आश्रय मिळाला नाहीं! मोठमोठे समास घालणारी त्यांची कविता वऱ्हाडी कवितासंप्रदायास बिलकूल पटली नाहीं. त्यास वऱ्हाड सोडून जावें लागलें. त्याचें मालतीमाधव तयार झालें त्यावेळेस तें वऱ्हाडच्या रंगभूमीवर दाखविण्यासाठींच तयार झालें होतें, हें उघड आहे. त्याचें कथानक वऱ्हाडांतलेंच कुंडिनपुर येथील आहे. पण तें नाटक त्याला शेवटीं भगवान कालप्रियनाथाच्या कक्षेंतच दाखवावें लागलें. वऱ्हाडची स्पर्धा करणारा देश जो मालव त्याच्याकडे वऱ्हाडांत आश्रय न मिळालेला कवि गेला, आणि नंतर गौड कवितेचें आश्रयस्थान कान्यकुब्ज तेथें त्यास राजाश्रय मिळाला.

## ४३९. मालविकाग्निमित्र नाटकाच्या उपयुक्तेविषयीं समारोप.

४३९. पूर्वोक्त विवेचनाचा सारांश असा सांगतां येईल कीं, मौर्य शुंगकालीन कोणत्याही गोष्टीबद्दल कालिदासाच्या मालविकाग्निमित्रापासून माहिती मिळत नाहीं. शुंगघराण्यांतील राजांचीं नावें, यवनांशीं झालेली लढाई, पुष्पमित्रानें यज्ञ करणें या सर्व गोष्टी पुराणें व पतंजलीचें भाष्य यावरून कालिदासानें घेतल्या आहेत. विदिशेचें राजघराणें व विदर्भ राजा यांच्याविषयीं जे उल्लेख कालिदासानें केले आहेत ते मालव राजधानींतील लोकांस खूष करण्यासाठीं आहेत. दुसऱ्या राणीचें दारू पिऊन रंगभूमीवर येणें, पहिल्या राणीचा भाऊ हलक्या वर्णाचा असणें इत्यादि गोष्टी प्रचलित समाजावरच्या टीकेच्या स्वरूपाच्या आहेत. आणि त्या उल्लेखांमुळें कालिदासकालीन प्रेक्षकांस मौज वाटली असेल, यांत शंका नाहीं. शिल्पकारिकां ऊर्फ नाचगाणीं करणाऱ्या पोरींकडून विदिशेचा राजवाडा विदर्भाच्या राजवाड्यापेक्षां मोठा आणि भव्य आहे म्हणून जे उद्गार काढले आहेत, ते देखील स्थानिक प्रेक्षकवर्गास खूष करण्यासाठींच काढले आहेत. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकावरून कालिदासकालीन जीं महत्त्वाचीं सत्यें निघतात, तीं म्हटलीं म्हणजे विदर्भाविषयीं आणि तेथील वैभव व सत्ता आणि साहित्य ग्रंथ या बाबतींत कालिदासाच्या कक्षेंतील वर्गास मत्सर वाटावा, इतकी विदर्भाची प्रगति झाली होती. हा मत्सर कालिदासाच्या मनांत असावा. निदान ज्या वर्गास कालिदास खूष करू पहात होता त्या वर्गात तो असावा. एरवीं कालिदासानें विदिशा येथें शुंग राजघराणें राज्य करीत आहे असें दाखविण्याचें आणि त्या घराण्याची निमकहरामी लपविण्याचे परिश्रम केले नसते.

शुंगाचा अधिकार विदिशा देशावर होता किंबहुना विदिशा हें शुंगाचें गृह होतें याला प्रमाण उपलब्ध नाहीं. ‡

---

‡ कालिदासानें **विदिशेस अग्निमित्र राजा** सेनापति पुष्पमित्र याच्या हयातींत राज्य करीत होता असें दाखविलें तें सिद्ध करण्यासाठीं जयस्वाल एका नाण्याच्या साहाय्यानें खटपट करीत आहेत. त्या नाण्यावरील अक्षरें येणेंप्रमाणें.

एक बाजू. **सेनापतिस पितु पा[द]स**

दुसरी बाजू. **अग्निचें चित्र+मितस.** ( नाणें सहावें )

हें नाणें अग्निमित्रानें आपल्या बापाच्या हयातींत पाडलें असा जयस्वालांचा तर्क आहे. या नाण्यावर फुली आणि गोळे यांचें चित्र आहे. भांडारकरांना विदिशेंत सांपडलेल्या मौर्य नाण्यांवर हें चित्र आढळलें त्यावरून हें विदिशेचें

कालिदास हा गुप्तकालीन होता हें म्हणणें मान्य केलें तर मात्र साम्राज्याधिकारी मगधराज गुप्त यांच्या वंशाची एक शाखा माळव्यांत असल्यामुळें त्या म्हणजे कालिदासाच्या काळांत माळव्याचा राजा साम्राज्याचा निकट संबंधी असणें शक्य होतें.

### ४४०. कालिदासाचा ऐतिहासिक नाटक लिहिण्याचा हेतु नव्हता आणि नाटकावरून ऐतिहासिक घडामोडींचें विधान करतां येत नाहीं.

४४०. नाटक महत्वाच्या ऐतिहासिक विषयावर असून तदनुरूप नाट्यरचना नाहीं, आणि तीवरून कालिदासाचा हेतु गतकालाचें ऐतिहासिक चित्र काढावें अशी कालिदासास फिकीरच नव्हती. नाटकांत ऐतिहासिक वातावरणाचा पूर्ण अभाव आहे. त्याचा हेतु इतिहासचित्रणाचा नव्हता.

कालिदासाच्या नाटकांत ज्या एका महत्वाच्या गोष्टीचा अभाव दिसून येतो आणि जीमुळें नाटकाच्या ऐतिहासिक वातावरणाचा अभाव वाटतो ती गोष्ट म्हटली म्हणजे समाजांतील भिन्न वर्गांच्या धार्मिक भावनांचीं दृश्यें होत. नाटक राज्यक्रांतीच्या व त्याबरोबरच धार्मिक क्रांतीच्या कालावर होतें तरी समाजांत होत असलेल्या क्रांतीच्या भावना नाटकांत दृग्गोचर होत नाहींत. ऐतिहासिक दृष्टीच्या कवीस ऐतिहासिक वातावरण स्वाभाविकपणें आणतां येऊन कविकृतीस मनोवेधकता आणतां आली असती. अशोकाच्या नंतर बौद्धांचें वर्चस्व चोंहोंकडे झालें असलें आणि राज्यक्रांतीबरोबर "इह पुष्यमित्रं याजयामः" म्हणून ज्याच्याविषयीं घोष झाला तें घराणें आलें, तर त्याबरोबर जुन्या संस्कृतीचा पुनरुद्भव झाल्याबद्दल ब्राह्मणांचा किंवा तदनुयायांचा आनंद, किंवा बौद्ध संप्रदायास आश्रय देणारें घराणें नाहींसें झालें याबद्दल बौद्धांचें दुःख यांत दिसत नाहीं. विदर्भ मौर्यांना चिकटून राहिला ही गोष्ट देखील धार्मिक प्रेरणेमुळें झाली असें दाखविलें नाहीं. [ परिच्छेद २९४ पहा. ]

या धार्मिक भावनांच्या अभावामुळें एक विचार स्पष्ट होतो. तो म्हटला म्हणजे राजकारणांत धार्मिक क्रांतीचें महत्व नसावें. राज्यक्रांति व्हावयाची ती केवळ लष्करी अधिकाऱ्यांच्या कृतीनें व्हावयाची आणि जे धर्मसंप्रदाय समाजांत असतील त्या सर्व संप्रदायांचा नवीन आलेल्या राजानें आपल्या शक्त्यनुरूप सत्कार करावयाचा आणि सामान्य जनतेनें "राजा कालस्य कारणं" असें समजून स्वस्थ रहावयाचें असेंच वातावरण होतें. धार्मिक संप्रदायांचा परिणाम वैवाहिक प्रश्नावर मुसलमानी अमदानीपर्यंत देखील कांहींच होत नव्हता; धार्मिक प्रश्नावर लोक गरम होत नव्हते तरी देखील पुष्यमित्राच्या आगमनानें ब्राह्मणांस बराच आनंद झाला हें स्पष्ट आहे. पुष्यमित्र हाच कलंकी अवतार होय अशा तऱ्हेची वृत्ति ब्राह्मणांत उत्पन्न झाली होती. यासंबंधानें अधिक विवेचन पुढें येईलच.

कालिदासाच्या नाटकाचा मौर्यकालीन इतिहास समजण्यास जरी फारसा उपयोग नाहीं, तरी नाटकावरून मौर्यकालाचा कांहींच बोध होत नाहीं असें नाहीं. मौर्यसाम्राज्य जरी अस्तित्वांत नव्हतें तरी तें कवींच्या आणि सुशिक्षित वर्गाच्या आठवणींत जिवंत राहिलें होतें, आणि मौर्यांचें एक साम्राज्य होतें आणि तें साम्राज्य नष्ट झाल्यानंतर शुंगांचें साम्राज्य चालू झालें ही गोष्ट उत्तरकालीन कवींस नाट्यविषय होण्याइतकी लोकांच्या मनांत जागृत राहिली असेल. कदाचित् कालिदासाच्या पूर्वी देखील अनेक नाटकें होऊन याप्रकारची कथा जिवंत राहिली असणें शक्य आहे.

---

असावें असा जयस्वालांचा तर्क आहे. ( Jayaswal-**Silver coins of S'ungas.** J.B.O. 1934. )

जयस्वाल तीच गोष्ट पुष्यमित्रासंबंधाच्या अयोध्या येथील लेखावरूनहि सिद्ध करूं पहात आहेत.

जयस्वालानीं पुष्यमित्राच्या अयोध्या येथील लेखाचें वाचन आणि अर्थ पुढील प्रमाणें करीत आहेत.

ओळ-१ **कोसलाधिपेन द्विरश्वमेधयाजिनः सेनापतेः पुष्यमित्रस्य षष्ठेन कौशिकीपुत्रण धन ...**

ओळ २-.................**धर्मराज्ञपितुः फल्गुदेवस्य केतनं कारितं.**

[ पिते धर्मराज फल्गुदेव यांसाठीं हें केतन 'धन' यानें केलें आहे. धर्मराज ( जो ) कौशिकीचा पुत्र आणि दोन अश्वमेध करणाऱ्या सेनापति पुष्यमित्राचा सहावा ( भाउ ? ) (होता तो). (An Inscription of the S'unga Dynasty J.B.O. 1924. pp. 202-208. (या लेखावरून पुढील निर्णय काढतां येतील. ( १ ) पुष्यमित्रानें आपल्या मुलामध्यें सुभेदाऱ्या वांटून दिल्या होत्या ( पुष्यमित्रसुतश्चाष्टौ भविष्यंति समा नृपाः ) ( २ ) पुष्यमित्रानें अश्वमेध केले ( ३ ) संस्कृत भाषेचें पुनरुज्जीवन केलें. तथापि अग्निमित्रानें विदिशेस राज्य केले असें जयस्वाल "एव्हीडंटली" समजतात तसें यांतून निघत नाहीं. यांत उल्लेखिलेल्या धनदेवाचीं नाणीं उपलब्ध आहेत. J.B.O. 1934.)

मालविकाग्निमित्रावरून गुप्तकालाविषयीं म्हणजे वाकाटक कालाविषयीं काय निगमनें काढतां येतील याची चर्चा योग्य प्रसंगीं येईलच.

पतंजली कोणत्या यवनाचा उल्लेख करीत असावा यासंबंधानें भिन्न मतें देखील पुढें दिलीं जातील.

[ कालिदासकृतीचें येथें जें परीक्षण केलें आहे तें पूर्वी १९२८ मध्यें नागपूर येथें प्रस्तुत लेखकाचा नागपूरच्या शारदामंडळानें जो सत्कार केला त्या प्रसंगीं वाचून दाखविलें होतें. त्यावेळेचे अध्यक्ष प्रो. मिराशी यांनीं त्यांतील अनेक विधानांस आक्षेप घेतला. पुढें हा लेख महाराष्ट्रांत प्रसिद्ध झाला त्यावर प्रो. मिराशी यांनीं टीकात्मक सहा लेखांक लिहिले व त्यावर मी प्रत्युत्तरात्मक तीन लेख लिहिले. विदर्भराज वाकाटक यांच्या घराण्यांत सम्राट गुप्तांच्या घराण्यांतील एक राजकन्या प्रभावती ही दिली होती. तेव्हां विदर्भ घराण्याविषयीं कालिदासाच्या किंवा त्याच्या श्रोत्यांच्या मनांत असूया असणें शक्य नाहीं. अशा तऱ्हेचें एक विधान प्रो. मिराशी यांनीं वादविवादांत केलें होतें. यावर उत्तर असें आहे कीं लग्नें ज्या दोन घराण्यांत होतात त्या घराण्यांतच एकमेकांवर कडी करणारे विनोद चालू असतात आणि त्यामुळें असल्या लग्नानंतर विदर्भाची मुलगी आमच्याकडे आली असें दाखविणारें नाटक गुप्तांनीं उत्तेजिणें अधिक स्वाभाविक आहे. शिवाय हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं प्रभावतीचें लग्न वाकाटकांशीं होण्यापूर्वी वाकाटकांचें आणि गुप्तांचें वैर होतें आणि जो रुद्रदेव गुप्ताविरुद्ध लढाईंत पडल्याचें प्रयागस्तंभ सांगत आहे, तो रुद्रदेव वाकाटक असावा हीहि शक्यता आहे. [ होता असें जयस्वाल म्हणत आहेत ]. माझ्या मूळ लेखामध्यें बदल न करतां तो जवळ जवळ जसाचे तसाच येथें छापला आहे याचें कारण प्रो. मिराशी यांच्याकडून माझ्या कोणत्याही मुद्याचें खंडन झालें असें वाटत नाहीं हें होय. माझ्या लेखावर रागावणारे प्रो. मिराशी समजतात त्याप्रमाणें माझ्या लेखांत कालिदासाची अवहेलना मुळींच नसून उलट त्याच्या कौशल्याची अभिज्ञता आहे. ]

## प्रकरण ४८ वें.

# शातवाहनांची वंशावलि आणि इतर शातवाहनविषयक अभ्याससाहित्य.

### ४४१. शातवाहनविषयक अभ्यासाची क्लिष्टता.

४४१. शातवाहनासंबंधानें बृहत्कथेंतील कथा अत्यंत प्राचीन होत. त्या मागें येऊन गेल्याच आहेत. बृहत्कथेंतील कथा आणि इतर साहित्य यांची संगति लावणें हें आतां पुढलें काम आहे. दंतकथांमध्यें बृहत्कथेंतील कथितास जरी प्राधान्य असलें तरी एकंदर इतिहाससाधनांत त्या कथांस प्राधान्य नाहीं. खुद्द शातवाहनांचेच लेख हें अधिक निश्चयात्मक माहिती देणारें साधन आहे. लेख आणि पौराणिक मजकूर हीं अधिक व्यापक कालावर अनुक्रमयुक्त माहिती देणारीं साधनें आहेत.

शातवाहनासंबंधानें अभ्यास अलीकडे पुष्कळच वाढला आहे तरी तो अनेक बाजूंनीं अपूर्ण आहे. आजच्या संशोधनस्थितींत इतरांकडून झालेल्या आणि आम्ही स्वीकारलेल्या संशोधनांत कांहीं थोडोशी स्वतःची भर घालून तें भावी अभ्यासकांपुढें मांडणें याखेरीज अधिक क्रिया करतां येणार नाहीं. शातवाहनविषयक प्रश्न किती गुंतागुंतीचे आहेत हें मागें दुसऱ्याच प्रकरणांत ( १८ व्या परिच्छेदांत ) मांडलें आहे. आतां त्यांत उत्पन्न केलेल्या प्रश्नांवर प्रकाश पाडणारें साहित्य व चर्चा देतां येईल.

शातवाहनविषयक अनेक प्रश्नांवर परस्परविरुद्ध विधानें अनेक येतात आणि कोणताच पुरावा अधिक निश्चयानें स्वीकारण्यास साधन नाहीं अशा परिस्थितींत आजचा संशोधक सांपडतो, आणि आपण जें मांडीत आहोंत तें चुकीचें तर नाहींना, असा संदेह त्याच्या मनांत वारंवार उत्पन्न होतो. जेव्हां पुरावे परस्परविरुद्ध असतात आणि प्रत्येक पुराव्यांत कांहीं तरी भेसळ झालेली दिसते तेव्हां मनास अधिकच संभ्रम उत्पन्न होतो. बृहत्कथेचा उपयोग करतांना असा संभ्रम वारंवार होई तथापि तेव्हां एक शक्यता मनास अधिक पटली ती शक्यता पूर्वलेखकनिर्मित कल्पनांच्या विरुद्ध असली तरी ती धैर्यानें मांडली आहे.

उत्तरेकडे मौर्य आणि दक्षिणेकडे शातवाहन यांच्या इतिहासाच्या बाबतींत पौराणिक मजकुरास अवशिष्ट राजलेखांची त्याचप्रमाणें पाश्चात्य लेखकांच्या विधानांची जोड मिळत आहे, आणि त्या सर्वांची संगति लावणें हें कार्य संशोधकांस करावें लागत आहे.

### ४४२. महाराष्ट्रांतील अंकित लेखांचा अभ्यास.

४४२. या अभ्यासास प्रारंभ बराच जुन्या काळांत म्हणजे मराठी राज्य समाप्त होण्यापूर्वींच सुरू झाला आहे. १७९९ सालीं विलफोर्ड नांवाच्या एका गृहस्थानें आपले एशिआटिक रिसेर्चेस प्रसिद्ध केले त्यांत कार्ले येथील बौद्धस्तंभावरील दोन लेख प्रसिद्ध केले आहेत.

त्याच्यानंतर सन १८३४ पर्यंत अंकित लेखांत कोणी अभ्यासक लाभला नाहीं. या सालांत स्टीव्हन्सननें कार्ले येथील आणखीं एक दोन लेख जगापुढें आणले. त्यावेळेस बंगालची रायल एशिआटिक सोसायटी स्थापन झाली होती; त्यामुळें त्या संस्थेच्या जर्नलमध्यें ते लेख प्रसिद्ध झाले. त्याच सुमारास ( १८३७ ) साईक्स ( Sykes ) नांवाचा एक संशोधक पुढें आला त्यानें लंडनच्या रॉयल एशिआटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें नानाघाटांतील लेख प्रसिद्ध केलें व ते लेख शातवाहनांच्या इतिहासाच्या दृष्टीनें बरेच महत्वाचे आहेत आणि त्या लेखांवर नंतरच्या लेखकांनीं भाष्यहि बरेंच केलें आहे. १८३८ सालीं साईक्सनें शोधलेल्या नानाघाटांतील लेखांवर प्रिन्सेपनेंहि भाष्य केलें आहे. जुन्नरचे कांहीं लेख स्टीव्हन्सननें १८३७ सालीं तर प्रिन्सेपनें १८३८ सालीं अभ्यासले आहेत.

१८४४ पासून बरेच लेख पुढें आणण्याचें काम मि. बर्ड नांवाच्या गृहस्थानें केलें. या कामामध्यें बर्डनें ज्या कांहीं गृहस्थांची मदत घेतली अशामध्यें स्टीव्हन्सन रीव्हज, ओरलेबार, वेस्टरगार्ड, विलसन, ड'ओचोआ, इत्यादि गृहस्थांचीं नांवें आढळतात. स्टीव्हनसनचें बरेंचसें काम जरी १८५२–३ सालांतलें आहे तरी त्याच्या अभ्यासास १८३४ मध्येंच सुरुवात झाली होती. स्टीव्हन्सननें पुढें अनेक लिखाणें ब्रेट नांवाच्या गृहस्थाचें सहकार्य घेऊन प्रसिद्ध केलीं आहेत. या दोघांच्या सहकार्यानें १८५२–५३ सालांत अनेक लिखाणें प्रसिद्ध झालीं.

मि. वेस्ट यांनीं देखील अंकित लेखांचा बराच अभ्यास केलेला आहे. यांचे बरेच लेख १८६१ च्या सुमारास प्रसिद्ध झाले आहेत.

१८६५ सालच्या सुमारास पहिल्या हिंदु अभ्यासकाचें नांव पुढें आलेलें दिसतें. हे अभ्यासक म्हटले म्हणजे कै. भाऊ दाजी लाड हे होत. भाऊदाजींनीं अजंठा लेण्यांतील लिखाणांकडे लक्ष दिलें. याच्यानंतर दुसरे दोन हिंदु अभ्यासक पुढें आले ते म्हणजे डॉ. भगवानलाल इंद्रजी व डॉ. रामकृष्ण भांडारकर होत.

१८७६ सालापासून डॉ. भांडारकर यांनीं अंकित लेखाकडे आपलें लक्ष दिल्याचें दिसून येतें. याच कालांतले दुसरे अभ्यासक म्हटले म्हणजे कीलहार्न, बुहलर, बर्जेस वगैरे होत. यांपैकीं बुहलर व बर्जेस या दोघांचें काम पुष्कळच झालें आहे.

डॉ. फ्रांके यांनीं अंकित लेखांचा अभ्यास पुष्कळच केला. पण त्यांचा अभ्यास नवीन लेख शोधून काढणें किंवा त्यांचा अर्थ लावणें यांपेक्षां जुनें काम तपासणें या दृष्टीनेंच पुष्कळ झाला आहे. या प्रकारचेंच काम करणाऱ्यांमध्यें प्राकृत भाषेचे थोर अभ्यासक पिशेल यांचेंहि नांव घेतां येईल.

लेखांचें पुन्हां पुन्हां वाचन व त्यांवर पुन्हां पुन्हां विचार या दृष्टीनें अनेकांनीं कार्य केलें आहे. अशामध्यें मा. सेनार्ट यांचा उल्लेख करणें अवश्य आहे.

आतां भारतीय विद्वान मंडळी या कार्याकडे पुष्कळच लागली आहेत आणि प्राचीन लिपिवेत्त्यांमध्यें भारतीयांनांच पुढारीपणा येईल असा काळ डोकावत आहे.

### ४४३ शातवाहनविषयक वाङ्मयवैपुल्य आणि त्यामुळें शास्त्रीय अभ्यासाचें स्वरूप.

४४३. शातवाहनांवर वाङ्मय पुष्कळच आहे पण त्यामुळें कोणतेंहि विधान निश्चितपणें करण्यास भय उत्पन्न होतें. नांवापासून भांडणाला जागा आहे. शातवाहन हें नांव खरें कीं शालिवाहन हें खरें यासंबंधानें घोंटाळाच आहे. त्यांच्या जन्मासंबंधानें अद्भुत कथा आहेत. सात नांवाचा एक यक्ष त्यांचें वाहन झाला म्हणून त्यांचें नांव शातवाहन असें पडलें असें कथासरित्सागर म्हणत आहे, तर त्यांस कुमारीपुत्र आणि नागपुत्र दुसरे लेखक करीत आहेत. त्याच्या शातवाहन आणि शातकर्णी नांवाचा अर्थ एकच आहे आणि तो म्हटला म्हणजे "शंभर हत्ती ज्याच्यापाशीं आहेत असा" असें तामिळ ग्रंथांच्या आधारावर एक ग्रंथकार ( कनकसभे Tamil Country 1800 years ago या पुस्तकांत ) भाष्य करीत आहे. त्यांस शककर्ते करून त्यांनीं उत्तरेकडील शककर्ता विक्रमाचा पराभव केल्याचें श्रेय लोककथा देत आहेत, जयस्वलांसारख्या थोर संशोधक आज विक्रमादित्य देखील त्यांच्याच कुळांतला होता असें आग्रहानें सांगत आहेत. शातवाहन हेच शकांचे संहारभैरव होते अशा तऱ्हेच्या आठवणी जुने मुसलमान ग्रंथकार देखील संरक्षीत आहेत. जेव्हां कामशास्त्रकार त्यांचा उल्लेख करीत आहेत तेव्हां त्यांचें अधिकारस्थान पैठण, किंवा जुन्नर करीत नसून कुंतल देश म्हणजे दक्षिण महाराष्ट्र करीत आहेत. त्यांचें निवासस्थान पैठण कायम ठेवून त्यांचा लग्नव्यवहार सिंहलद्वीपच्या राजकन्येशीं जुळविणारें काव्य भूषणभट्टाचा पुत्र कवि कुतुहल तेराव्या शतकांत लिहीत आहे. एवंच कथांच्या विविधतेमुळें आणि त्यांत असलेल्या असंबद्धतेमुळें आणि विकासक्रमाच्या इतिहासाच्या अभावामुळें, शातवाहनविषयक इतिहासलेखकास सरळ इतिवृत्त निवेदनाऐवजीं शातवाहनविषयक वादविवादांतच अधिक अवगाहन करावें लागत आहे, आणि यासाठीं शातवाहनांच्या विषयावर उपलब्ध साहित्य आणि त्यावर झालेला अभ्यास येथें संकलित करावा लागत आहे.

शातवाहनांच्या वृत्तांतांत कथात्मक भाग नाहीं असें नाहीं. पण जो कथामय भाग आज आपल्या कालापर्यंत आला आहे त्याची सत्यता तपासण्याचें काम, उगम पहाण्याचें काम, मूळापासून त्यांत कांहीं विकृति झाली आहे काय, झाली असल्यास कशी झाली इत्यादि विचार त्याच्याबरोबर कर्तव्य असल्यामुळें, कथित-कथा-कथन देखील केवळ कथानिवेदनाचें स्वरूप न पावतां, सत्यशोधक विवेचनांतील एक प्रकरण होत आहे. यासाठीं शातवाहनांच्या इतिहासांत प्रवेश करून देतांना साहित्याची मांडणी, साहित्याचें परीक्षण, त्यावरून निघणारीं अनुमानें, पुन्हां दुसऱ्या साहित्याकडे अवलोकन इत्यादि प्रकारांनीं आपणांस एकेक गोष्ट समजून घेत घेत पुढें जावें लागणार आहे, आणि इतिहास वाचतां वाचतां इतिहाससंशोधनशास्त्राची तालीम घ्यावी लागणार आहे.

वाचकांस सर्व प्रकारचें साहित्य अवगत आहे असें संशोधक गृहीत धरतो. ती भूमिका येथें घेतां येत नाहीं, आणि यासाठीं शातवाहनीय साधनांची सविस्तर मांडणी अगोदर करून निर्णायक वादविवाद अगदीं शेवटीं करावा अशीच रीत अंगिकारणें अवश्य होतें.

### ४४४. सामाजिक इतिहासाच्या साधनांचें वैपुल्य.

४४४. शातवाहनांचा इतिहास जरी येणेंप्रमाणें अनेक रहस्यांनीं भरला आहे आणि जरी प्रत्यक्ष त्यांच्या कुलाविषयक इतिहासाविषयीं आज अज्ञान आहे तरी त्यांच्या काळांचा

सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक इतिहास लिहिण्यास मात्र साहित्य अत्यंत विपुल आणि विविध आहे. किंबहुना ज्यांच्या कालाविषयीं सामाजिक इतिहासाचें इतकें विपुल साहित्य सांपडत असतां अनेक विकासास आश्रयीभूत असणारा राजकीय इतिवृत्ताचा सांगाडा अस्पष्ट आहे असे थोडकेच राजवंश सांपडतील. संस्कृतभाषेचा विकास यांच्याच काळांत झाला. प्राकृत विद्येचा आणि काव्याचाहि विकास यांच्याच काळांत होऊन त्यांचा संस्कृत विद्येवर परिणाम झाला. बौद्धांच्या धर्माचा विस्तार यांच्या कालांत प्रामुख्यानें झाला आहे; एवढेंच नव्हे तर महाराष्ट्र बौद्ध संप्रदायाचें एक अत्यंत महत्त्वाचें क्षेत्र होण्यास सुरवात याच्याच काळांत झाली. महाराष्ट्रांत बौद्धधर्माच्या वाढीचा इतिहास बऱ्याच अंशीं अगदीं सानुक्रम देतां येईल इतकें साहित्य आज उपलब्ध आहे. पश्चिमेकडील देशाशीं समुद्रमार्गानें व्यवहार या काळांत वाढला आणि भारतीय विद्येचा अनेक बाबतींत विकास याच काळांत झाला असल्यामुळें संस्कृतिविकासाचें चित्र अत्यंत विविध बाजूंनीं देतां येण्याजोगें आहे. राज्याच्या अनुषंगानें व्यापारास आणि नागरसंस्कृतीस गति मिळत असल्यामुळें राजकीय घडामोडींच्या लोखंडी सांगाड्यावर एकंदर सामाजिक आणि सांस्कृतिक साहित्य लिंपून सांस्कृतिक इतिहासाचा वास्तुविषय तयार करण्याची क्रिया अवश्य होत असल्यामुळें राजकीय घडामोडींचा सांगाडा आपल्या हातीं कितपत लागतो तिकडे लक्ष देणें आद्य कर्तव्य होतें.

राजकीय घडामोडीचा सांगाडा देण्याचें श्रेय पुराणानांच आहे. वास्तुनिर्मितीसाठीं पुढील प्रश्नांची चर्चा अवश्य आहे.

( १ ) पुराणकारांनीं जो इतिहास वर्णिला आहे तो चिरजीवि लिखितें, राजशासनें आणि नाणीं यांवरून कितपत सिद्ध होतो.

( २ ) पुराणकारांनीं वर्णन केलेल्या इतिहासांत राजावलिविधान आणि कालानुक्रमविधान हें जें पुराणकारांनींच केलें आहे त्याचा अर्थ लावण्याच्या बाबतींत कितपत भिन्नता उत्पन्न झाली आहे.

( ३ ) अवांतर साहित्यापासून सांपडणाऱ्या इतिहासापैकीं कोणता भाग पुराणकार उल्लेखित नाहींत.

वरील मुद्याविषयीं स्पष्ट विधान झाल्यानंतर आपणास इतिहासप्रगतीविषयीं निश्चित विधान करतां येईल. यासाठीं प्रथम पुराणांतील राजावली व इतर विधानें मांडणें अवश्य आहे.

### ४४५. विवेचनाची पद्धति—प्रथमतः राजवंश निवेदन.

४४५. आपणांपुढें जे इतिहासविषयक प्रश्न आहेत ते प्रथम मांडून प्रत्येक प्रश्न सोडविण्यास काय पुरावा आहे याचा आढावा घेऊन नंतर शेवटीं सिद्धांत मांडण्याची क्रिया केल्यास इतिहासाचें अवगमन सोपें होईल, प्रथम राजांची पुराणोक्त यादी स्पष्टपणें मांडून नंतर पुढीलप्रमाणें प्रश्न विचारास घ्यावे लागतील.

मागें प्रकरण १५, परिच्छेद ११५ यांत कुरुयुद्धापासून नंद घराण्याच्या अंतापर्यंत परंपरा देणारे श्लोक अर्थांसह दिलेच आहेत आणि त्यानंतर परिच्छेद २९२ येथें मौर्य घराण्याचे श्लोक दिले आहेत. मौर्य घराण्याचा महाराष्ट्रांत शिरकाव होऊन त्यांनीं कोंकणांत राज्यस्थापना केली हें सांगितलें आहे, व मौर्यकालीन इतिहास इतर साधनांवरून जितका देतां येईल तेवढा दिला आहे. मौर्यांनंतर शुंग आले [ परिच्छेद २९६ ]. शुंगराजा पुष्यमित्र याच्या कारकीर्दीत महाराष्ट्रांतर्गत विदर्भराज्य मौर्यानुयायी होतें तें जिंकून शुंगांनीं शुंगानुयायी केलें आणि वर्धा नदीच्या तटाच्या दोन्ही बाजूचे दोन असे वऱ्हाडचे भाग केले इत्यादि हकीगत मालविकाग्निमित्र नाटकांत आलेली आहे आणि ती कांहीं लेखकांनीं खरी धरली आहे. तथापि मी कां खरी समजत नाहीं तें सविस्तर विवेचिलेंच आहे. या शुंगकुलासंबंधानें आणि काण्वासंबंधानें श्लोक व त्यांचें भाषांतर पाठांतरासहित मागें दिलेंच आहे [ परि० २९७ ]. पूर्वी दिलेल्या पौराणिक माहितीचें अवतरण पुन्हां थोडक्यांत करतों.

### ४४६. शुंग घराणें.

४४६. शुंगघराण्यांत मौर्यांच्या पाडावानंतर दहा राजे ११२ वर्षें राज्य करिते झाले असें सांगितलें आहे. शुंग घराण्याचा शातवाहनांशीं संबंध प्रत्यक्ष दाखविणारे उल्लेख अजून उपलब्ध नाहींत; पण शातवाहन हें वाढतें घराणें होतें व शुंग हें तात्पुरतें महत्त्व पावलेलें आणि अन्यायानें राज्यावर आलेलें घराणें होतें; तेव्हां त्यांच्या काळांत शुंगांची व शातवाहनांची झटापट शुंगांनाच अपकर्षक झाली असावी असें वाटतें. शुंगांसंबंधाची पुराणांतील माहिती पुढीलप्रमाणें आहे :—

सेनानी पुष्यमित्र बृहद्रथाला उपटून ३६ वर्षें राज्य करील. त्याच्यानंतर त्याचा मुलगा अग्निमित्र हा आठ वर्षें राजा होईल. त्याच्यानंतर त्याचा मुलगा वसुज्येष्ठ सात वर्षें राजा होईल. त्याचा मुलगा वसुमित्र १० वर्षें राजा होईल.

नंतर त्याचा मुलगा अंध्रक हा दोन वर्षें राजा होईल. नंतर पुलिंदक तीन वर्षें राज्य करील. नंतर त्याचा मुलगा योमेध अगर घोष हा तीन वर्षें राज्य करील. नंतर वज्रमित्र नऊ वर्षें राज्य करील. भागवत (मत्स्यपुराणाप्रमाणें समाभाग) हा बत्तीस वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा देवभूमि हा दहा वर्षें राज्य करील.

हे १० शुंग राजे पृथ्वीचा ११२ वर्षें उपभोग घेतील. त्यानंतर ती कण्वाप्रत जाईल.

### ४४७. काण्व घराणें.

४४७. आतां कण्वांकडे आपण लक्ष देऊं. त्यांसंबंधानें पुराणें पुढील माहिती देत आहे.

अमात्य वासुदेव तारुण्यामुळें दुर्वर्तनी झालेला राजा देवभूमि यास गादीवरून काढून टाकून शुंगांचा राजा होईल. हा काण्वायन ९ वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा भूमिमित्र हा चौदा वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा नारायण हा १२ वर्षें राज्यावर राहील. त्याचा मुलगा सुशर्मन हा दहा वर्षें राज्य करील. हे काण्वायन राजे शुंगभृत्य म्हणून स्मृत आहेत. चार कण्व द्विज असून पृथ्वीचा उपभोग घेतील आणि ४५ वर्षें पृथ्वी उपभोगतील. भोंवतालचे राजे त्याच्या आधीन रहातील आणि हे धार्मिक असतील. त्यांच्यानंतर पृथ्वी आंध्रांच्याकडे जाईल.

काण्वराजांनीं शुंगांचें पूर्णपणें उच्चाटन न करतां त्यांची पेशवाई आपल्याकडे घेतली असावी अशी कल्पना होते.

### ४४८. आंध्र अथवा शातवाहन घराण्यांतील राजे.

४४८. आंध्रांचा वंशच विस्तृत दिलेला आहे, तथापि त्याच्या संबंधाच्या विधानांत बरीच संदिग्धता आहेच.

पुराणांतील आंध्रांसंबंधाच्या मजकुरावर इतिहासनिष्कर्षिणी टीका पुष्कळच झाली आहे. अनेक मुद्दे आतांपर्यंत चर्चिले गेले आहेत. शातवाहनविषयक अधिकाधिक माहिती उपलब्ध होईल तसतसे अधिकाधिक प्रश्न उपस्थित होतील.

झालेल्या चर्चांचें वर्गीकरण केलें असतां ती चर्चा समजणें सुलभ होईल. बरीचशी चर्चा पुढील प्रश्नांखालीं मांडतां येण्याजोगी आहे. तथापि त्या चर्चेपैकीं थोडाच भाग या विभागांत लक्षितां येईल.

वि वे च ना चे प्र श्न.

(१) शातवाहन ऊर्फ आंध्रराजे यांनीं नाश केला तो काण्वांचा कीं शुंगांचा कीं दोघांचा ?

(२) शातवाहन राजे २९ झाले, तीस झाले किंवा त्याहून कमी झाले. राजांची यादी निश्चितपणें करतां येते काय ? एकोणतीस किंवा तीस राजे यांच्या नावांविषयीं किंवा अनुक्रमाविषयीं भिन्न मतें आहेत काय ?

(३) ज्या शातवाहनानें कण्वांपासून राज्य घेतलें तो शिमुक हा होता कीं दुसरा कोणीं त्या वंशांतला पुढला राजा होता. पुढला राजा असला तर कोणता असावा ?

(४) शालिवाहन शक ख्रिस्तोत्तर ७८ सालीं सुरू होतो तो याच शातवाहन घराण्यांतील पुरुषानें स्थापन केला काय ? याविषयीं भिन्नमतें काय आहेत.

(५) ज्या शातकर्णींचे उल्लेख खारवेल रुद्रदामा इत्यादि भिन्नराष्ट्रीय राजांच्या अंकित लेखांतून सांपडतात, ते शातकर्णी कोण कोणते होते ?

(६) शातवाहनांच्या या यादींतील राजे व त्या घराण्यांतील राजासंबंधीं म्हणून जी इतरत्र माहिती उपलब्ध आहे, त्यांची संगति लावण्यांत भिन्नमतें कशीं उपस्थित झालीं आहेत.

(७) पुराणांतील प्रत्येक राजवंशाचे दिलेले आंकडे एकामागून एक घेतले पाहिजेत काय ?

(८) शिमुक शातवाहनानें कण्वराज्य घेतलें हें विधान स्वीकारावयास काय अडचणी उपस्थित होतात. निरनिराळे राज्यकालांचे आंकडे स्वीकारण्यामुळें असंगति कोठें उत्पन्न होते ? ती असंगति काढून टाकून विधानांची संगति उत्पन्न करण्यासाठीं काय प्रयत्न झाले आहेत आणि त्यांना काय यश आलें आहे ?

(९) पुराणांतील राजावलि व अंकित लेखांतील व्यक्ती यांची संगति लावण्याचा प्रयत्न शास्त्रशुद्ध आहे काय ? नसल्यास त्यांत चुका कोठें कोठें आलेल्या दिसतात.

वरील प्रकारच्या या यादीचा ऐतिहासिक उपयोग करून घेतांना अनेक प्रश्नांचा मारा करावा लागेल.

काण्वायनां ततो भृत्याः सुशर्माणः प्रसह्य तम्† ।
शुंगानां चैव यच्चैशम् क्षपित्वा तु बलीयसः ॥

शिशुकोऽध्रः सजातीयः प्राप्सतीमां वसुंधराम् ।
त्रयोविंशत् समाराजा शिमुकस्तु भविष्यति ॥ ‡

कृष्णो भ्राता यवीयांस्तु अष्टादश भविष्यति ।
श्रीशातकर्णिर्भविता तस्य पुत्रास्तु वै दश ॥

पुर्णोत्संगस्ततो राजा वर्षाण्यष्टादशैवतु ।
स्कंधास्तंभिस्तथा राजा वर्षाण्यष्टादशैवतु ॥

पंचाशतं समाः षट्च शातकर्णिर्भविष्यति ।
दशचाष्टौच वर्षाणि तस्य लंबोदराः सुतः ॥

अपीलको दश द्वेच तस्य पुत्रो भविष्यति ।
दशचाष्टौच वर्षाणि मेघस्वातिर्भविष्यति ॥

स्वातिश्च भविता राजा समास्त्वष्टादशैव तु । *
स्कंदस्वातिस्तथा राजा सप्तैव तु भविष्यति ॥

मृगेंद्रः स्वातिकर्णस्तु भविष्यति समास्त्रयः ।
कुंतलः स्वातिकर्णस्तु भविताष्टौ समानृपः ॥

एक संवत्सरं राजा स्वातिवर्णो भविष्यति ।
षट्त्रिंशदेव वर्षाणि पुलोमाविर्भविष्यति ॥

भवितारिष्टकर्णास्तु वर्षाणाम् पंचविंशतिः ।
ततः सवत्सरं पंच हालो राजा भविष्यति ॥ *

पंच मंतलको राजा भविष्यति समा नृपः ।
पुरींद्रसेनो भविता तस्मात्सौम्यो भविष्यति ॥

सुंदरः शातकर्णिस्तु अब्दमेकं भविष्यति ।
चकोरः शातकर्णिस्तु षण्मासान् वै भविष्यति ॥

अष्टाविंशति वर्षाणि शिवस्वातिर्भविष्यति ।
राजा च गौतमीपुत्र एक विंशत्ततो नृपः ॥

अष्टाविंशस्सुतस्तस्य पुलोमा वै भविष्यति ।
एकोन त्रिंशतीं भाव्यः शातकर्णिस्तथो नृपः ॥

शिवश्रीर्वै पुलोमास्तु सप्तैव भविता नृपः ।
शिवस्कंधः शातकर्णिर्भवितास्यात्मजाः समा ॥

नवविंशति वर्षाणि यज्ञश्रीः शातकर्णिकः ।†
षडेव भविता तस्माद् विजयस्तु समा नृपः ॥

चंडश्रीः शातकर्णिस्तु तस्यपुत्रसमा दश ‡ ।
पुलोमाविः समाः सप्त अन्यस्तेषां भविष्यति ॥

एकोनविंशतिर्ह्येते आंध्राः भोक्ष्यंति वै महीम् ।
तेषां वर्षशतानि स्युश्चत्वारि षष्टिरेव च § ॥

---

† कण्वायनं अथोद्धृत्य सुशर्माणं प्रसह्य तम्
शुंगानां चापि यच्छिष्टम् क्षपयित्वा बलं तदा
सिंधुको ह्यांध्रजातीयः प्राप्स्यतीमां वसुंधराम्

‡ कृष्णो भ्रात्रस्य वर्षाणि सोऽस्माद्दश भविष्याति

* आतिर्भविष्यति नृपो वर्षाणि द्वादशैवतु
स्कंदस्वातिः समस्तस्मात् सप्त राज्यं करिष्यति
चतुर्विंशत्तु वर्षाणि पुलोमाविर्भविष्यति

* पंचपत्तलकोराजा भविष्यति महाबलः
भाव्यः पुरीकसेनस्तु समास्सोप्येकविंशतिं
शातकर्णिर्वर्षमेकं भविष्यति नराधिपः

† एकोनविंशतिं राजा यज्ञश्रीः शातकर्ण्यथ

‡ दंडश्रीः शातकर्णिश्च तस्य पुत्रा समास्त्रयाः

§ इत्येते वै नृपा त्रिंशद् आंध्राः भोक्ष्यंति ये महीम्
समाः शतानि चत्वारि पंचषड् वै तथैव च

**आंध्र सिमुक +** सुशर्म्याच्या सेवेंत असलेल्या आपल्या स्वजातीयांसह काण्वायनांवर व त्यांवर हल्ला करून शुंगांचें राज्य नाहींसें करून वसुंधरा प्राप्त करून घेईल. सिमुक तेवीस वर्षें राज्य करील. त्याचा धाकटा भाऊ

**कृष्ण** हा पुत्रांसह अठरा वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा

**श्री. शातकर्णी** हा दहा वर्षें राज्य करील. नंतर

**पूर्णोत्संग** १८ वर्षें राजेल.

**स्कंधास्तंभी** १८ वर्षें राज्य करील. नंतर

**शातकर्णी** ५६ वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा

**लंबोदर** हा फक्त १८ वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा

**अपीलक** १२ वर्षें;

**मेघस्वाति** १८ वर्षें.

**स्वातिराजा** १८ वर्षें.

**स्कंदस्वाति** ७ वर्षें राजा असेल. *

**मृगेंद्र स्वातिवर्ण** फक्त तीन वर्षें. त्यानंतर

**कुंतल स्वातिकर्ण** ८ वर्षें राजा होईल.

**स्वातिवर्ण** एक वर्ष राज्य करील.

**पुलोमावि** छत्तीस वर्षें राजेल.

**अरिष्टकर्ण** २५ वर्षें राज्य केल्यानंतर

**हाल** येईल. तो ५ वर्षें राज्य करील. †

**मंतलकाचें** ‡ राज्य ५ वर्षें असेल. तो बलाढ्य असेल.

**पुरिकषेण** § वर्षें राज्य करील.

[ **सौम्य** त्यानंतर येईल. ]

**सुंदर शातकर्णि** एक वर्ष असेल.

**चकोर शातकर्णि** फक्त सहा महिने राज्य करील.

**शिवस्वाति** २८ वर्षें; त्यानंतर

**राजा गौतमीपुत्र** २१ वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा

**पुलोमा** हा २८ वर्षें राज्य करील.

**शातकर्णी** २९ वर्षें राज्य करील. ×

**शिवश्री पुलोमा** सात वर्षें राज्य करील. त्याचा मुलगा

**शिवस्कंद शातकर्णी** तीन वर्षें राजा होईल.

**यज्ञश्री शातकर्णिक** २९ वर्षें गादीवर असेल; त्यानंतर

**विजय** नामक राजा ६ वर्षें राहील. त्याचा मुलगा

**चंडश्री शातकर्णि** दहा वर्षें राहील त्यांच्यापैकींच एक

**पुलोमावि** सात वर्षें राहील.

त्याच्यानंतर निराळेंच होईल.

हे एकोणतीस आंध्र मही भोगतील त्यांचीं चारशें साठ वर्षें होतील. +

---

+ मत्स्यांत शिशुक वायु आणि ब्रह्मांड यांत सिधुक, आणि विष्णुपुराणांत शिप्रक असे पाठभेद आहेत.

* हें वाक्य वायु आणि ब्रह्मांड यांच्या प्रतींत बहुधा सांपडत नाहीं.

† वायु आणि ब्रह्मांड हालास एकच वर्ष राज्य देत आहे.

‡ मत्स्यांच्या दुसऱ्या प्रतींत पत्तलक भागवतांत तलक, वायूंत सप्तक, अशीं पाठांतरें आहेत.

§ मत्स्यांत पुरीद्रसेन नांव दिलें आहे; पण राज्यकाल दिला नाहीं.

× वायूच्या एका प्रतींत सांपडलेलें वाक्य.

+ तीस आंध्र राजे पृथ्वीचा उपभोग ४६० वर्षें घेतील.

वरील श्लोकांचें वाचन जोंपर्यंत तार्जे आहे तोंपर्यंत कांहीं निवडक शब्दांकडे लक्ष ओढणें अवश्य आहे. शुंगांना काण्वांनीं मारून त्यांचें राज्य घेतलें हें जर खरें आहे तर यावेळेस शिमुकानें काण्व आणि शुंग या दोघांपासून राज्य घेतलें (शुंगांनां चैव यच्चैशं क्षपित्वा) असा उल्लेख कां? शातवाहनांनीं काण्वांपासून मगध घेतला त्यावेळेस शुंग होते काय याला उत्तर असें द्यावें लागतें कीं काण्वांनीं ज्यावेळेस शुंगराज्य घेतलें असावें त्या वेळेस फक्त मध्यवर्ती सत्ता घेतली असेल आणि भोंवतालीं शुंग संस्थानिक असतीलच. राज्यक्रांति झाली तरी एकाएकीं संपूर्ण होत नसे. मुलांना सुभेदार नेमावयाचे. एक मुलगा मध्यवर्ती संस्थानाचा अधिपति तर दुसरा इतर संस्थानांचा अधिपति अशी व्यवस्था शुंगांनीं केली होती हें मागें (पृ. ३८९-९०) मध्यें दाखविण्यांत आलेंच आहे. शिवाय कण्व स्वतः राजे न होता त्यांनीं फक्त पेशवाई अगर सैनापत्य आपल्या ताब्यांत ठेवलें असेल व तात्त्विकदृष्ट्या शुंग राजेच चालत असून काण्व केवळ कारभार चालवीत असतील ही शक्यता आहे. आणि यासाठीं त्यांनीं शुंगभृत्य हें नांव चालू ठेवलें असावें.

या श्लोकांमध्यें सांगितलें आहे कीं, सिमुक शातवाहनानें राज्य घेतलें. सिमुकशातवाहनचा काल ख्रि. पू. २०० च्या मागें जातो आणि कण्वांपासून शातवाहनांनीं केलेला हिसकाव ख्रिस्तपूर्व २८ च्या सुमारास असावा असें गणित करण्यांत आलें आहे. या संबंधानें आणि इतर वादग्रस्त प्रश्नांसंबंधानें आमचें अंतिम वाक्य देणारी चर्चा शातवाहनांसंबंधाचें संपूर्ण साहित्य परिचित करून दिल्यानंतर दिली जाईल.

शातवाहनाच्या कालानुक्रमासंबंधानें आणि घराण्याच्या यादीसंबंधानें परिश्रम पुष्कळच झाले आहेत. डॉ. भांडारकरांनीं अनेक पुराणांतील याद्यांचें कोष्टक आपल्या पुस्तकांत दिलें व त्यांत दिसणारी असंबद्धता दाखवून दिली होती. शातवाहनांची योग्य व्यवस्था लागण्यासाठीं प्रथम कार्य पुराणांतील याद्यांच्या अनेक आवृत्त्या एकत्र जुळवावयाच्या, त्यासाठीं अनेक हस्तलिखितें एकत्र जुळवून अधिक विश्वसनीय यादी तयार करावयाची हें काम पार्गिटेरनीं केलें आहे. §

§ पुराणांतील याद्यांत सदोषता किती आहे हें पुढील गोष्टींवरून दिसून येईल. वायु, ब्रह्मांड, भागवत आणि विष्णु हीं सर्व पुराणें तीस राजे झाले म्हणतात. पण तितकीं नांवें देत नाहींत. वायूचीं हस्तलिखितें १७, १८, १९ इतकीं नांवें देतात व वायू २५ पर्यंत नांवें देतो. ब्रह्मांडांत १७ आणि भागवतांत २३ नांवें आलीं आहेत. मत्स्यामध्यें राजे १९ झाले असें सांगितलें आहे. तरी ३ लिखितांत मात्र नांवें तीस आलीं आहेत.

शातवाहनांचीं नाणीं पाहून त्या नाण्यांची संगति लावण्याचें काम मुख्यतः प्रो. रापसन यांनीं आपल्या Andhra coins या पुस्तकांत केलें आहे. पुराणांवरच भिस्त ठेवून ज्या लेखकांनीं पूर्वीं राजमालिका दिली त्याचें लिहिणें पार्गिटेरच्या पाठशोधक प्रयत्नानंतर महत्त्वहीन झालें आहे.

पार्गिटेरची यादी शुद्ध धरून तींत राजांचे राज्यकालदर्शक आंकडे घालून रा. बखले ती यादी स्वीकारीत आहेत. रा. जयस्वाल ती स्वीकारीत नाहींत. पार्गिटेरपक्ष आणि जयस्वाल या दोहोंच्या विधानांकडे लक्ष पुढें प्रसंगानुसार द्यावें लागेल.

याप्रकारें लक्ष देण्यापूर्वीं दोघांचें राजावलिनिर्णायक साहित्य काय आहे त्याचा साकल्यानें अवलोक झाला पाहिजे.

## ४४९. शातवाहनकालीन अंकित लेख व इतर साहित्य.

४४९. शातवाहनकालीन लिखाणें कोठें कोठें आहेत, कितीं आहेत याचें थोडेंसें विहंगावलोकन अवश्य आहे. ब्राह्मी लिपि शातवाहनकाळांत प्रचलित होती आणि ब्राह्मींतील सर्व लिखाणाची (अशोकलेखांखेरीज) यादी प्रो. लूडर्स यांनीं केली व एपिग्राफिका इंडिकामध्यें प्रसिद्ध केली. लूडर्सच्या यादीमध्यें साधारणपणें ९८४ पासून ११९९ पर्यंत जे लेख आले आहेत ते सर्व म्हणजे सुमारें २१५ लेख शातवाहनकालीन असून महाराष्ट्रांतले आहेत. त्या लेखांची स्थूल मोजदाद पुढील प्रमाणें आहे:—

९८४ — १०३४ कान्हेरी येथील.
१०३५ महाकाल लेण्यांतील लेख.
१०३६ जोगेश्वरी लेण्यांतील लेख.
१०३७ ते १०६० कुडे येथील लेख.
१०६७ ते १०६८ नाडसूर येथील लेख.
१०६९ आणि १०७० आंबिवलें लेख.
१०७१ कोंडाणे लेख.
१०७२ आणि १०७४ महाड येथील लेख.
१०७५ ते १०७७ कोल येथील लेख.
१०७८ ते १०८५ भाजें येथील लेख.
१०८६ ते ११०८ कार्लें येथील लेख.

[ लूडर्सची यादी प्रसिद्ध झाल्यानंतर जे कार्लें येथें लेख सांपडले आहेत त्यांची माहिती पुढें दिली आहे. ]

| | | | |
|---|---|---|---|
| ११०९ | ते | ११११ | बेडसा लेख. |
| १११२ | ते | ११२० | नानाघाट. |
| ११२१ | | | शेलारवाडी. |
| ११२२ | ते | ११४९ | नाशिक येथील लेख. |
| ११५० | ते | ११८३ | जुन्नर येथील लेख. |
| ११८४ | | | कऱ्हाड येथील लेख. |
| ११८५ | | | कोल्हापूर येथील बौद्ध जंगम अवशेषावरील लेख. |
| ११८६ | | | बनवासी लेख. |
| ११८७ | — | ११९३ | पितळखोरें येथील लेख. |
| ११९४ | | | एलोरा (वेरुळ) येथील लेख. |
| ११९५ | — | ११९६ | मळवली येथील लेख. |
| ११९७ | — | १२०० | अजंठा लेख. |

येणेंप्रमाणें लूडर्सनें अंकन केलें आहे. याशिवाय दक्षिणेकडे जे शातवाहनकालीन ब्राह्मींतील लेख आहेत ते यांत घेतले नाहींत, नवीन नवीन लेख एकसारखे सांपडत आहेत. त्यांचा परामर्ष प्रसंगानुसार घेतला जाईलच. तथापि आढावा घेतांना आणखी कांहीं लेखांच्या समूहाचा उल्लेख केलाच पाहिजे. ते म्हटले म्हणजे कार्ले येथील १९२३ मध्यें सांपडलेले लेख, हे एकंदर तेरा आहेत. याशिवाय कोरेगांव जवळच्या पदम टेकडीवर सांपडलेले लेख ११ आहेत; याशिवाय इक्ष्वाकु कुलासंबंधाचे लेख आहेत ते निराळेच.

याशिवाय अलाहबादजवळच्या गांवाजवळ जें खनित्र शोधन झालें त्या खनित्रशोधनांत शातवाहनांच्या व त्यांच्या अधिकारी वर्गाच्या मुद्रा म्हणजे शिक्के सांपडले आहेत ते शातवाहनांचे नसून वाकाटकांचे आहेत असें जयस्वाल समजत आहेत. आंध्रभृत्यांचीं व शातवाहनांचीं नाणीं व तत्कालीन इतर घराण्यांचीं नाणीं हीं बरींच जमा झालीं आहेत व तीं नाणीं इतिहासाचें मोठें साधन झालें आहे. यावर प्रो. रापसन यांचें एक पुस्तक आहे.

शातवाहनकालीं कानडी किनाऱ्याचा व ग्रीकांचा संबंध येऊन उडुपी नजीकच्या कोंकणच्या परिस्थितीवर ग्रीकमध्यें एक नाटक लिहिलें गेलें. त्या नाटकांमध्यें जंगली हिंदुस्थानी राजाच्या तावडींत सांपडलेली देखणी ग्रीक मुलगी, ग्रीक खलाशांनीं कशी पळवून सोडविली याचें हास्यरसात्मक वर्णन केलें आहे. त्यावरून ग्रीकांच्या पश्चिम किनाऱ्याशीं संबंधाच्या इतिहासाला जें साहित्य उपलब्ध आहे त्याला महत्वाची पुरवणी मिळते. त्या नाटकांमध्यें शब्दांचा कानडी अर्थ एक व ग्रीक अर्थ दुसरा अशा प्रकारचे शब्द शोधून घातले आहेत. प्रस्तुत नाटकाचा गोषवारा म्हैसूरच्या आर्किऑलोजी खात्याच्या अहवालांत दिला आहे. तें नाटक देखील पुढें देण्यांत येणार आहे.

### ४४९ अ. शातवाहनीय इतर लेखांचें स्थूल अवलोकन.

४४९ अ. महाराष्ट्राबाहेरचीं कांहीं महत्त्वाचीं लिखाणें शातवाहन कालावर प्रकाश पाडणारीं आहेत. त्यांतील महत्त्वाचे लेख म्हटले म्हणजे रुद्रदामा, खारवेल यांचे लेख होत. त्या लेखांविषयीं स्वतंत्र प्रकरणें पुढें येणार आहेत. भिलसा येथीय एक शातकर्णीच्या कारागीराचा लेख आहे. याशिवाय अलहाबादजवळ भिटें ( Bhita ) येथें सांपडलेले शातवाहनाच्या अधिकाऱ्यांचे शिक्के वर उल्लेखिले आहेत. हे महाराष्ट्रांबाहेरील लेख वगळतां शातवाहनकालावर महत्त्वाचा प्रकाश पाडणारे सर्व लेख महाराष्ट्रांतच आहेत. मागें उल्लेखिलेली ब्राह्मीलिपींतील लेखांची जी यादी लूडर्सनें केली आहे त्या यादीपैकीं नंबर ९८४ पासून ११९९ पर्यंत म्हणजे २१५ लेख महाराष्ट्रांत आहेत. अनेक लेखांचा उल्लेख करतांना लूडर्सचा नंबर देण्यांत येईल.

उपलब्ध ब्राह्मी लेखांतील कांहीं निवडक लेख अगोदर घेऊन त्यापासून इतिहासार्थाची सिद्धि कशी होते हें प्रथम मांडून नंतर उरलेले सर्व लेख अर्थासह मांडून त्यांच्यापासून आपल्या माहितीस काय पुरवण्या जोडल्या जातात ही पद्धति अंगिकारली पाहिजे.

जे लेख घेतले जातील ते कालानुक्रमानेंच घेतले जातील असें नाहीं. कारण लेखांचा कालानुक्रम देखील निश्चित नाहीं, व त्यामुळें त्याविषयीं आप्तवाक्य सांगून उपयोगी नाहीं. कालानुक्रम ठरविणें आणि इतिहास सांगणें या क्रिया बरोबरच कराव्या लागतात. तर कालानुक्रमविवेचनांत देखील क्रमानेंच गेलें पाहिजे.

### ४५०. राजांचा उल्लेख असलेले लेख.

४५०. शातवाहनांचा किंवा शातकर्णीचा प्रत्यक्ष उल्लेख करणारीं लिखाणें पुढील होत. दिलेले नंबर ल्यूडर्सचे आहेतः —

३४६ राजा श्री शातकर्णि याच्या कारागीराच्या मुख्य ( आवेसनिन् ) वासिष्ठीपुत्र आनंद याची देणगी भिलसा येथील १९० नंबरचा लेख.

९६५ जुनागड येथील रुद्रदाम्याचा लेख. यांत रुद्रदामा आपल्या विजयांचें वर्णन करितो, आणि दक्षिण पंथाचा राजा श्री शातकर्णि याचा दोनदां पराभव केला, परंतु जवळच्या नात्यामुळें त्याचा पूर्ण नाश केला नाहीं म्हणून सांगतो.

का न्हे री ले ख.

९८७–८८ कान्हेरी लेणें नं. ३ मधील लेख शातकर्णींच्या शकाचा उल्लेख करणारा.

९९४ कान्हेरी येथील पानीयभाजनावरील उल्लेख. [वासिष्ठीपुत्राच्या राणीचा, ती कर्दमक राजाची वंशज आणि महाक्षत्रप रुद्रदाम्याची मुलगी असा उल्लेख असलेला, राजामात्य सतेरक याची पाण्याच्या टाकीची देणगी देणारा.]

१००१, १००२, कान्हेरी येथील माढरीपुत्र स्वामी सकसेन याचे संवत्सरांतील लेख कल्याणकरांच्या देणग्या नोंदणारा.

१०२४. गोतमीपुत्र स्वामी सिरि सातकर्णि याच्या कारकीर्दीतील कल्याणकरांची देणगी नोंदणारा.

का र्लें ले ख.

११०५. कार्लें येथील लेख [अनिश्चित]

११०६. वासिष्ठीपुत्र पुलुमायिकालीन एक देणगी नोंदणार.

ना ना घा ट ले ख.

१११२ नानाघाट लेण्यांतील लेख. कुमारवर वेदिश्रीच्या आईचा यज्ञोल्लेख असलेला व संकर्षण, वासुदेव, यम, वरुण, कुबेर, वासव यांचा उल्लेख करणारा अत्यंत महत्त्वाचा.

१११३ सिमुक शातवाहन याची मूर्ति.

१११४ नायनिका आणि श्री शातकर्णि यांच्या मूर्ति.

१११५ कुमार भाय याची मूर्ति.

१११६ महारथि त्रणकयिर याची मूर्ति.

१११७ कुमार हकुश्री याची मूर्ति.

१११८ कुमार शातवाहन याची मूर्ति.

११२० वासिष्ठीपुत्राचें दहावें वर्ष एक देणगी.

ना सि क ले ख.

११२२ वासिष्ठीपुत्र पुलुमायी याच्या सहा वर्षाचा उल्लेख.

११२३ वासिष्ठीपुत्र श्रीपुलुमायी याच्या एकोणिसाव्या वर्षांतील.

यांत शातकर्णि आपले विजय सांगतो आणि शातवाहनाचें वैभव पुन्हा स्थापिलें असें सांगतो.

११२४ एकोणिसाव्या वर्षांतील दुसरा लेख.

११२५ अठराव्या वर्षांतील लेख.

११२६ वैजयंतीचा विजय. त्याच्या पुढचाच भाग

शातवाहनांच्या वरील लेखांवरून हें दिसून येईल कीं त्यांचे लेख बरेच आहेत. अनेक लेखांत नांवें पुष्कळ आलीं आहेत, आणि त्यामुळें पुराणांतील नांवें आणि लेखांतील नांवें यांच्या तौलनिक अभ्यासाची शक्यता उत्पन्न झाली आहे; शिवाय असेंहि दिसत आहे कीं अत्यंत प्राचीन लेख बराच मोठा आहे त्यामुळें अत्यंत प्राचीनकाळच्या सामाजिक स्थितीच्या अभ्यासाला त्याच्या योगानें एक महत्त्वाचें साधन उत्पन्न झालें आहे.

या सर्व लेखांपैकीं बहुतेकलेखांचें अवतरण होणार आहेच आणि सर्वांवर विवेचन होणार आहे. या सर्व लेखांत आद्यकालीन समजले जाणारे जे नानाघाटांतील लेख त्यांकडे प्रथम लक्ष देऊं. आमच्या मतें या लेखांचें स्पष्टीकरण अजून बरोबर झालेलें नाहीं. शिवाय शातवाहनांचा प्रतिष्ठानकाल कोणता याचेंहि स्पष्टीकरण चांगलें झालें नाहीं. नानाघाटांतील लेख जरी फार जुना असला तरी त्याच्यामागें शातवाहन किती काल दिसत आहेत यावर आमचें मत प्रचलित मतापासून बरेंच भिन्न आहे.

प्रकरण ४९ वें.

# शातवाहनांचा आद्यकाल; नानाघाटांतील लेख.

## ४५१. शातवाहनांची सिमुकपूर्वता.

४५१. शातवाहनांच्या घराण्यास सुरवात कोठून धरावी हा एक प्रश्न आहे. शातवाहनांस 'आंध्र' म्हणून त्यांची संभावना पुराणकारांनीं केली आहे त्याअर्थी पुराणकारांस ते आंध्राचे राजे म्हणूनच ठाऊक होते, तथापि त्यांचा महाराष्ट्रीय काल त्यांच्या आंध्रत्वाच्या अगोदरचा आहे ही गोष्ट त्यांचीं आद्यकालीन लिखाणें नानाघाटांत आहेत, यावरून सिद्ध होते असें बऱ्याच जणांचें मत आहे.

प्रश्न असा आहे कीं नानाघाटाच्या लेखांत जो सिमुकशातवाहन येतो तेव्हांपासूनच त्यांच्या वंशास प्रारंभ झाला काय ? त्याला 'होय' असें उत्तर देणें कठीणच जाईल. सिमुकशातवाहनाच्या कारकीर्दींत शातवाहनांची सत्ता चांगलीच विस्तारलेली दिसत आहे. या सिमुकशातवाहनाच्या अगोदरच्या काळीं काय इतिहास होऊन गेला हा प्रश्न आहे.

अक्षरांच्या ठेवणीवरून नानाघाटांतील लेख खि. पू. २०० ते २५० च्या सुमारास कोरले गेले असावेत असें बहुतेक संशोधकांचें मत आहे. बृहत्कथेचें सांगणें असें दिसतें कीं शातवाहनाचें घराणें मौर्यसत्तेच्या आरंभीं स्थापन झालें असावें; नंदकालीं असलेल्या वररुचीनें काणभूतीस आणि काणभूतीनें गुणाढ्यास नरवाहनदत्ताची विद्याधरकथा सांगितली आणि तो गुणाढ्य शातवाहनकालीं होता असें समजण्यास बृहत्कथेचा कथापीठलंबक आग्रह करीत आहे. तथापि वररुचीचेंच नंदकालीनत्व आम्हांस मान्य नाहीं व दुसऱ्या कोणत्या तरी प्राचीनतरकालीन राजाच्या नोकरींत हा वररुचि असावा आणि त्या राजाचें नांव लुप्त झाल्यामुळें अधिक परिचित अशा नंद राजाशीं वररुचीचें नांव जोडलें गेलें असलें पाहिजे अशी कल्पना मागें मांडली आहे. त्या कल्पनेप्रमाणें गुणाढ्यकाल आणि गुणाढ्य ज्याच्या पदरीं होता तो शातवाहनकाल अधिकच मागें धरण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. शातवाहन हे नंदकालीन व आद्यमौर्यकालीन असावेत अशी कल्पना कथापीठलंबकाच्या कथनाची असेल आणि म्हणून त्यानें वररुचि आणि नंदराजा यांचा संबंध जोडला असेल. बृहत्कथा शातवाहनांस आंध्रत्व देत नाहीं आणि त्यामुळें आंध्रविजयापूर्वीचा शातवाहनेतिहास व त्याचा काल हाच बृहत्कथेस परिचित आहे. नंतरचा नाहीं.

नानाघाटांत उभें राहून जरी शातवाहनांसंबंधीचा विचार केला तरी खिस्तपूर्व २५० च्या पाठीमागें निदान शेंदीडशें वर्षें शातवाहनसत्ताच दिसूं लागते. तथापि बृहत्कथेच्या अर्थीकरणावरून जें निश्चित होतें तें कमी निश्चित अशा पुराव्यावरून विधान होतें; यासाठीं अधिक निश्चित असा जो लेखाचा पुरावा त्यावरूनच काय निघतें याकडे लक्ष गेलें पाहिजे. नानाघाटांतील लेख विचारास घेऊं.

आपणांस असें दिसून येईल कीं नानाघाटांतील लेखांच्या अर्थीकरणाकडे व्हावेत तसे परिश्रम झालेले नाहींत.

## ४५२. अशोकानंतर शातवाहनांचें राज्य स्थापन झालेलें नाहीं.

४५२. रा. बखले यांनीं अशी कल्पना केली आहे कीं अशोकाच्या काळीं महाराष्ट्र अशोकाच्या ताब्यांत आला होता, तथापि त्यावेळेस 'सतीयपुत्र' नांवाचा अशोक लेखांत उल्लेखिलेला जो संघ असेल त्या संघानें अशोकानंतर झालेल्या अव्यवस्थेचा फायदा घेऊन स्वतंत्र राज्यस्थापना केली असावी आणि त्यांच्या राज्याची राजधानी पैठण येथें असावी. सिमुक शातवाहनाच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्र आणि अपरांत यांनीं आपलें मौर्यसाम्राज्यापासून स्वातंत्र्य स्थापन केलें.*

राजश्री बखले यांची कल्पना पुढील कारणांस्तव मान्य नाहीं.

( १ ) महाराष्ट्र अशोकानें जिंकला असावा याला पुरावा मुळींच नाहीं. अशोक महाराष्ट्राच्या आग्नेय सरहद्दीवर ठाणें देता झाला व त्यानें उत्तर कोंकणांतील कांहीं भाग जिंकला एवढ्यालाच पुरावा आहे.

( २ ) सतीयपुत्र तेच शातवाहन या संबंधानें खात्री नाहीं.

( ३ ) पैठण येथें अश्मकांचें राज्य चालू होतें तें थोडा वेळ नंदांनीं घेतलें असेल, तथापि तें पुढच्या काळांतहि चालू होतेंच. शातवाहनांस पैठणच्या कोणत्यातरी राजाकडून त्याचा पुत्रवत् स्वीकार होऊन राज्य मिळालें असें बृहत्कथा सांगत आहे. ऐतिहासिक सत्याचें दंतकथांनीं निगूहन केलें असलें तरी कथालेखकाच्या मनांत पैठणच्या राज्याच्या सातत्याला

* J. B. B. 1928, May p. 45-47.

आक्षेप नव्हता यांत शंका नाहीं. शातवाहनांकडे पैठण राज्य आलें तें अश्मकांकडूनच आलें असलें पाहिजे हें अधिक शक्य वाटतें. तें पुत्रीकरणामुळें आलेलें असो किंवा विजयामुळें आलेलें असो किंवा विवाहसंबंधामुळें आलेलें असो. तें अशोकराज्यांतून कापून घेतलेला तुकडा नव्हतें हें खास.

(४) अपरांत मौर्यांनीं ताब्यांत घेतला होता तरी अपरांताकडून स्वातंत्र्यस्थापनेची क्रिया झाली नसावी. फार फार तर असें झालें असेल कीं मौर्यांचा दक्षिणेकडील सुभेदार मूल राज्यापासून वियुक्त झाल्यानंतर वाढत्या शातवाहनांच्या सत्तेनें त्यास आपलें मांडलिक केलें असावें.

## ४५३. नानाघाटांतील लेख. *

४५३. हे लेख संख्येनें थोडे असले तरी महत्त्वाचे आहेत. या लेखांच्या बरोबर मूर्ति होत्या त्या आज भग्न झाल्या आहेत.

**लेख पहिला—लूडर्स नं. १११२.**

| | |
|---|---|
| (१) | १ |
| [ओम् नमो प्रजापति] | ॐ प्रजापतीला नमस्कार असो. |
| नो धंमस नमो ईदस संकंसन-वासुदेवानं चंदसूतानं † | नमस्कार धर्माला, इंद्राला, संकर्षण वासुदेव यांना आणि चंद्रसूर्यांना. |
| [महि]मा[व्] अतानं | महिमावतांना. |
| चतुंनं चं लोकपालानं यमवरुन-कुबेर-वासवानं नमो | चारहि लोकपालांना (म्हणजे) यम, वरुण, कुबेर, वासव यांना नमस्कार. |
| कुमार-वरस वेदिसिरिस र[ण्]ओ | कुमारवर राजा वेदिश्री याची. |
| (२) | २ |
| ......[व्] ईरस सूरस अप्रतिहतचकस दखि [नाप] ठ पतिनो...... | वीराची, शूराची, अप्रतिहतचक्राची आणि दक्षिणापथाच्या पतीची. |
| (३) | ३ |
| मा...[बा] लाय | आईचा बालेचा. |
| महारठिनो अंगिय-कुलवधनस सगरगिरिवर वल [या] य पथविय पथमवीरस... | महारठीचा अंगियकुलवर्धनाचा सागर आणि गिरिश्रेष्ठ यांनीं वेढा घातलेल्या पृथ्वीच्या प्रथमवीराचा. |
| य व अलह(?).......सलसु-य महतो मह... | —? |
| (४) | ४ |
| ......सिरिस भारिया देवस पुत्रदस वरदस कामदस धनदस | .......श्रीची भार्या देवाची पुत्रदाची, वरदाची, कामदाची व धनदाची. |
| वेदिसिरि-मातु सतिनो सिरिमतस च मातुय सीम... | वेदिसिरी आई श्रीमान् शक्तीची आई सीम.... |
| पथमय... | (?) |

* The Nanaghat Inscri. Arch. Sur. of Werstern India, Vol. 5, p. 59.

† बुहलरचें वाचन चंदसूतानं होतें. दिनेशचंद्र सरकार (I.H.Q. June 1931 मध्यें) 'चंदसुरानं' (चंद्रसूर्ययोः) असें वाचन सुचवितात तें स्वीकारलें आहे. बुहलरनें आपल्या वाचनाप्रमाणें अर्थ चंद्रवंशी यांना असा केला आहे.

(५)

वरिय...आ

[ न् ] आगवरदयिनिय मासोपवासिनिय गहतापसाय चरित ब्रह्मचरियाय दिखव्रतयंण सुंडाय यणा हुता धूपनसुगंधायनिय...

५

?

नागश्रेष्ठाच्या ( दयिनि=दयिता ) स्त्रीचें, महिनाभर उपवास करणारीचें, गृहतापसीचे ब्रह्मचर्याचें आचरण ज्यानें केलें अशीचें, दीक्षा, व्रत, यज्ञ यांत कुशल आहे तिचें, यज्ञांत धूप आणि सुगंध जिनें हुत केले आहेत तिचें,

(६)

रायस.. [ य ] णेहि यिठं वनो।

अगाधेय यंणो दखिना दिना गावो बारस १२ असो च १

अनारभनियो यंणो दखिना धेनु...

६

राजाचे....यज्ञानें येथ.

अगाधेय यज्ञ; दक्षिणा दिली गाई बारा, अश्व १.

अन्वारंभणीय यज्ञ दक्षिणा धेनु.

(७)

......दखिनायोदिना गावो १७०० हथी १०...

७

दक्षिणेसाठीं दिल्या गाई १७०० हत्ती १०...

(८)

.........स...ससतरय [ वू ] आसलठि २८९ कुबू हियो रुपामयियो १७ भि......

८

? ......२८९; १७ रुप्याचीं भांडीं...

......

(९)

...रिको यंणो दखिनायो दिना गावो ११००० असा १००० पस [ पको ]...

९

( पुंड ) रिक यज्ञ दक्षिणेसाठीं दिल्या ११००० अश्व १००० प्रसर्पक....

(१०)

...१२ गमवरो १ दखिना काहापना २४४०० पसपको काहापना ६००१ राज [ सूय यंणो ] ......सकटं

१०

....१२ गमवर १ दक्षिणा कार्षापण ( रुपये ) २४४०० प्रसर्पकांस कार्षापण ६००१ राजसूय यज्ञ....शकट. (गाडी)

लेख दुसरा—पहिल्या लेखाचा उत्तर भाग.

(११)

धंणगिरीतंसपयुतं सपटो १ असो १ असरथो १ गावीनं १००.

असमेधोःबितियो [ यि ] ठो दखिनायो [ दि ] ना असो रुपाल [ मृक ] रो १ सुवंन....नि १२ दखिना दिना काहापना [ १ ] ४००० गामो १ ह [ ठि ]....[ दखि ] ना दिना.

११

धान्यगिरी...युक्त, वस्त्रांसहित, १ अश्व, १ अश्वरथ, गाई १००.

दुसरा अश्वमेध येथें दक्षिणेसाठीं दिले अश्व रुप्याच्या अलंकार १ सुवर्ण...नि १२ दक्षिणा दिली कार्षापण.... ४०००गाई, हत्ती...दक्षिणा दिली.

(१२)

गावो...सकटं धणगिरित[ मू ]समयुतं...

ओवायो यंणो......१७ धू [ प्नु ] ?....वाय... सतरस.

१२

गाई....शकट धान्यगिरी...युक्त.

ओवाय (?) यज्ञ....१७...धेनु १....वाय...सत्राचे.

(१३)

......१७ अच....न...लय...

पसपको दिन् [ ओ ]...[ दखि ना दिना] सु... पीनि १२ तेस.

रुप् [ आलं ] करो १ दखिना काहाप [ ना ] १००००...२

१३

...१७....अच...न....

प्रसर्पकांस दिली दक्षिणा सु...१२.

त्यांस रुप्याचे दागिने आणि दक्षिणा रुपये १००००...२.

(१४)

...गावो २०००० [भग] ल.

दसरतो यंणो यू [इठो दखिना दि]ना [गावो] १०,००१.

गर्गतिरतो यंणो यिठो दखिना .. पसपको पटा ३०१.

गवामयनं यंणो यिठो [दखिना दिना] गावो ११०१...

गावो ११०० (?) पसपको काहापना पटा १०० अतुयामो यंणो....

१४

गाई २०००० भगल.

दशरात्र यज्ञ जेथें दक्षिणा दिली गाई १०००१;

गर्गातिरात्र यज्ञ जेथें दक्षिणा....प्रसर्पकांस दिलेलीं वस्त्रें ३०१.

गवामयन यज्ञ जेथें दक्षिणा दिली गाई ११०१.

गाई ११००, प्रसर्पक, रुपये आणि वस्त्रें १०० आप्तोर्याम यज्ञ.

(१५)

...[ग] वामयन यण् [ओ] दखिना दिना ग् आ वो ११०१.

अंगिरस [आ] मयनं यंणो यिठो दखिनो गावो १,१०१.

त....[दखिना ह्] इना गावो ११०१ (?)

सतातिरतं यंणो....१००.

...[य] णो दखिना ग् [आ] नो ११०० अंगिरस [ति] रतो.

यंणो यिठो [दखि] नागा [वो...

१५

गवामययन यज्ञ दक्षिणा दिली गाई ११०१.

आंगिरसामयन यज्ञ जेथें दक्षिणा गाई ११०१.

दक्षिणायन (यज्ञ) गाई ११०१.

सत्रातिरात्र यज्ञ...१००....

यज्ञ दक्षिणा गाई ११०० अंगीरसातिरात्र.

....यज्ञ जेथें दक्षिणा गाई...

(१६

...गवो १००२.

छंदोमप [व] मा [नतिरतो] दखिना गावो १,००१.

अंग् [इ] र [सतिर] तो यं [णो यि] ठो द [खिना]

....रतो यिठो यणो दखिना दिना....

तो यंणो यिठो दखिना...

यंणो यिठो दखिना दिना गावो १००१.......

१६

...गाई १००२.

छंदोमपवमानतिरात्र दक्षिणा गाई १००१.

अंगिरसातिरात्र यज्ञ जेथें दक्षिणा.....

...रात्र जेथें यज्ञ दक्षिणा दिली...

...त्र यज्ञ जेथें दक्षिणा.

...यज्ञ जेथें दक्षिणा दिली गाई १००१.

(१७)

....न....सयं....

दखिना दिनो गावो...त...

[अं] गि [रसा] मयनं छवस...[दखि] ना दिनो गावो १,०००...

....दखिना दिनः गावो १००१ तेरस....अ.

१७

?

दक्षिणा दिल्या गाई.

अंगीरसामयन उत्सवाच्या दक्षिणा दिल्या गाई १०००;

......दक्षिणा दिल्या गाई १००१ तेराशे...अ

(१८)

.......तेरसतो स...आग दिखना दिना गावो... दसरतो म...[दि] ना गावो १००१ उ.........
......१००१ द......

१८

तेराशें स...आग दक्षिणा दिली गाई.....

दशरात्र म(रव) दिल्या गाई १००१३....१००१ द....

| | |
|---|---|
| (१९) | १९ |
| ......[य] णो दखिना दि [ना]......... | ....यज्ञ दक्षिणा दिली.... |
| (२०) | २० |
| .........[द खिना दिना...... | दक्षिणा दिली..... † |
| लेख नं. ३ लु. १११३. | |
| राया सिमुक-सात वाहनो सिरिमातो. | राजा सिमुक शातवाहन श्रीमान् याचा. |
| ले. नं. ४ लु. नं. १११४. | |
| देवि नायनिकाय रणो च सिर सातकनिनो. | देवी नायनिका राजा श्री शातकर्णी याची इचा. |
| ले. नं. ५ लु. नं. १११५. | |
| कुमारो भाय... | कुमार भाय... |
| ले. नं. ६ लु. नं. १११६. | |
| महारठि त्रणकयिरो· ‡ | महारठि त्र्यणकयिर. |
| ले. नं. ७ लु. नं. १११७. | |
| कुमरो हकुसिरि. | कुमार हकुसिरि. |
| ले. नं. ८ लु. नं. १११८. | |
| कुमरो सातवाहनो. | कुमार सातवाहन ०—० |

शा त वा ह नां चा न स ले ला ले ख.

| | |
|---|---|
| ले. नं. ९ लु. नं. १११९. | सोपारकर गोविंददास याचा दानधर्म असलेली ही पाण- |
| सोपारयकस गोविंददासस देयधम पोढि. | योपी. ०—०. |

† संशोधक साइक्स यानें नानाघाटाच्या लेखाचा अर्थ लावण्यास सुरवात केली तेव्हांपासून सुमारें एक शतक झालें तरी देखील लेखाच्या कांहीं भागाचा अर्थ अजून लागत नाहीं हें आमच्या प्रश्नचिन्हांवरून कळून येईल. या लेखाचें वाचन करण्याचे व त्यांत शुद्धि सुचविणारे अनेक प्रयत्न झाले. अशा मंडळींत स्टीव्हनसन, भगवानलाल इंद्रजी, डॉ. फ्रांके हीं नांवें देतां येतील. डॉ. फ्रांके यांनीं ZDMG ग्रंथ ५० पृ. ५९७ मध्यें "असमेधो...बितीयो" ( ओळ ११ ) येथें गाळलेला शब्द 'यंणो' असा आहे एवढेंच सांगितलें आहे, आणि ब्राह्मण आणि ब्रह्म या शब्दांत 'म्ह' असेंच लिहिणें बरोबर आहे आणि अशोकाच्या काळीं तसाच उच्चार होता वगैरे दाखविलें आहे. स्टीव्हनसननें Parting Visit to Sahyadri Caves या ( JBB ग्रंथ ५ पृ. ४२८ ) लेखांत चौथ्या ओळींतील चौथें अक्षर 'भा' आहे हें ओळखल्याचें दाखविलें आहे. या नानाघाटच्या लेखांत अशोकाचें नांव सांपडेल अशी स्टीव्हनसनची अपेक्षा होती पण ती पुरी झाली नाहीं असें दाखविलें आहे. डॉ. भ ग वा न ला ल इं द्र जी यांनीं अंकलेखनाच्या अभ्यासासाठीं या नानाघाट लेखाचा उपयोग केला. [An ancient Nagari numeration JBB Vol. xii, p. 404] शातवाहनाचे लेख आणि नाणीं यांची संगति जुळवितांना या लेखाचा उपयोग भगवानलालांनीं केला. [J B B Vol. xiii, p. 310] त्याप्रमाणेंच प्रो. रा प स न् यांनीं केला. [ Cotalogue of the Coins of Andhras p. xiv. ] या दोन्ही प्रयत्नांत नानाघाट लेखांवर चर्चा करावी लागली आहे. प्रस्तुत लेखकानें नानाघाट लेखाचें वाचन तपासलें नाहीं.

नानाघाटांतील वासिष्ठीपुत्रकालीन लेख [ रणो व ( ा ि ) सठिपुतस चतरपन सतकनिस सवछर तर १० ३ हेमतमख पचमे दिवसे १० ] ल्यूडर्स नं. ११२० यावर पुढें चर्चा होणार आहे.

‡ कित्येकांचें वाचन त्रणक या ऐवजीं गणक असें आहे.

### ४५३. अ. लेखाचें कर्तृत्व. शातवाहनकालीन राजेलोकांच्या धर्मावर सूर्यप्रकाश.

४५३. नानाघाटांवरील एकंदर ९ लेखांपैकीं नववा लेख आपणांस सध्यां महत्त्वाचा नाहीं. सोपाऱ्याच्या एका गोविंददास नांवाच्या एका व्यक्तीचें दान तेथें उल्लेखिलें आहे. नानाघाट लेख १० ल्यू. नं. ११२० येथें दिला नाहीं तो पुढें येईल. लेख ३-८ हे शातवाहनाच्या कुलविषयक चर्चेच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत तर लेख १ व २ मिळून जो एक संपूर्ण लेख होत आहे तो सामाजिक त्याचप्रमाणें राजकीय आणि त्याचप्रमाणें धार्मिक इतिहासाच्या दृष्टीनीं महत्त्वाचा आहे. तो लेख जो सामाजिक इतिहास देत आहे तो इतिहास दुसऱ्या कोठेंहि उपलब्ध होणार नाहीं.

या लेखाचें पूर्णपणें स्पष्टीकरण झालें नसल्यानें याची खुमारी कळली नसावी असें वाटतें.

या लेखामध्यें शातवाहनांनीं किती यज्ञ केले याचा हिशेब आहे, आणि तो पहातां दोनदां अश्वमेध करणारा पुष्यमित्र किंवा खारवेल हे दोघेहि अगदीं फिके पडतात.

शातकर्णीनीं इतके यज्ञ केले कीं त्यांत जे यज्ञप्रकार दिसून येतात ते ठराविक पद्धतीचे नाहींत. उदाहरणार्थ वेदग्रंथांत गर्गत्रिरात्र आहे, अतिरात्रहि आहे पण आंगिरसातिरात्र नाहीं.

या नानाघाटच्या लेखांत कमींतकमी १८ प्रकारचे यज्ञ दिले आहेत ते येणेंप्रमाणें:—

दिखव्रत यंण=दीक्षाव्रत यज्ञ.
अगाधेय यंण=(?).
अनारभनिय यंण=अनारंभणीय यज्ञ.
पुंडरीक यज्ञ.
मि...रिक यंण=(?).
राजसूय यंण=राजसूय यज्ञ.
असमेध=अश्वमेध.
ओवायो यंण=?.
दसरतो यंण=दशरात्र यज्ञ.
गर्गतिरतो यंण=गर्गत्रिरात्र.
गवामयन यंण=गवामयन.
अतुयाम यंण=आप्तोर्याम.
अंगिरसामयण=आंगिरसामयनम्.
सतातिरतं यंण=सदतिरात्र किंवा सप्तातिरात्र (?) अथवा सत्रातिरात्र.
छंदोमपवमानतिरात्र.
अंगिरसातिरतो यंण=आंगिरसातिरात्र.
दखिना...यणो=दक्षिणायन(?).
दखिनातिरात्र=दक्षिणातिरात्र.

शातवाहनाच्या या लेखांत जी माहिती दिली आहे तीवरून अनेक वेड्या वांकड्या कल्पना मनांत येतात. प्रत्येक यज्ञांत प्रसर्पक किती होते हेंच दिलें आहे आणि यज्ञांतील कोणाच ऋत्विजांचीं नावें दिलीं नाहींत. या प्रकारची जाहिरात थोडीबहुत हेतुयुक्त वाटते. अश्वमेधादि यज्ञ कलियुगांत योग्य नाहींत असें मत असतां आणि शातवाहनांस जुन्या लोकांच्या दृष्टीनें शूद्रत्व असतां ज्या मंडळीनीं त्यांच्याकडून यज्ञ करविले त्यांना आपलीं नावें जाहीर व्हावींत याबद्दल उत्सुकता नसावी.

नानाघाटांतील लेखांबरोबर ज्या प्रश्नाची चर्चा करावी लागते तो प्रश्न म्हटला म्हणजे "शातवाहनांच्या आद्य काळांतच जावा आणि बलि येथें भारतीयांची वसाहत किंवा विजय हीं झालीं काय?" आपले पूर्वज हिंदुस्थानांतून आदिशकाबरोबर आले ही भावना जावानीज लोकांनीं ठेवली आहे. [ज्ञानकोश हिंदुस्थान आणि जग पृ. २०९-१०] तेथें शालिवाहन शक चालू आहे. असें शक्य आहे कीं शातवाहनांच्या नेतृत्वाखालीं शालिवाहन शक सुरू होण्यापूर्वीच जाव्हांत आणि बलिद्वीपांत वसाहत झाली असावी आणि त्या वेळेस जे ब्राह्मण गेले असतील त्यांनीं हिंदुस्थानांत शालिवाहन शक सुरू झाला तेव्हां तिकडेहि ती शकपरंपरा चालविली असावी. हिंदुस्थानांतील संस्कृतीपासून जाव्हा बली येथील हिंदुसंस्कृतीस जो निराळेपणा आला त्यांतील अनेक वैशिष्ट्यें आद्य शातवाहन कालांतच भारतीयांचा यवद्वीपाशीं संपर्क उत्पन्न झाला असें दाखवितात. तेथें (पृ. २१०) दिलेल्या वैशिष्ट्यापेक्षां आणखी एक वैशिष्ट्य नानाघाटांतील लेखावरून सुचतें. यम वरुण कुबेर आणि वासव ह्या चार लोकपालांनां नानाघाटांतील लेखांत विशेष अभिवादिलें आहे. यांचें उपासनाविषय या दृष्टीनें महत्त्व आज जरी महाराष्ट्रांत नाहीं तरी बालीद्वीपांतील उपासनाधर्मांत स्थान अजून राहिलें आहे. डॉ. लेव्ही यांनीं दाखविलें आहे कीं [बालिद्वीपग्रंथाः संपादक डॉ. सिल्व्हांलेव्ही. गायक. ओरि. सीरीज ग्रंथांक ६२ बडोदें १९३३.] बालिद्वीपांत प्रवेश करतांना बंदरांतच उतरण्यापूर्वीच किनाऱ्यावर वरुणाचें देवालय दिसतें. इंद्राणीस्तव नांवाचा एक पूजाविधि या ग्रंथांत दिलाच आहे (पृ. ३६). तसेच यमस्तव (पृ. ५०-५१) वरुणस्तव (पृ. ५४). वरुणस्तवांत "कावेरी गिरिमूर्तींना" या शब्दांत कावेरी या नदीचा उल्लेख आहे; आणि त्या उल्लेखामुळें दाक्षिणात्यांच्या संस्कृतीचा परिणाम बलिद्वीपावर झाला असें विधान डॉ. लेव्ही यांनीं केलें आहे [प्रस्तावना पृ. १७] त्याला दुजोरा मिळतो. असो.

हा लेख कोणी कोरविला ?

हा पहिला प्रश्न उत्पन्न होतो. लेखांत कोरविणारी स्त्री स्वतःसंबंधी माहिती.

(१) कुमारवर वेदिश्रीची मा—

(२)—सिरिची भार्या एवढीच माहिती सांगत आहे.

(३) आपल्या नवऱ्याविषयीं उल्लेख करतांना ती देव, राय, अशीं विशेषणें लावीत आहे, तथापि वेदिश्रीविषयीं उल्लेख कुमारवर या नांवानेंच करीत आहे.

या लेखावरून तिचा नवरा कोण होता हें स्पष्ट होत नाहीं. मुलगा दक्षिणापथाचा "पति" म्हणजे सुभेदार होता आणि त्याला ह्यामुळें कुमारवर ही पदवी ती लावीत आहे.

ही शातकर्णीची बायको होती असें दाखविणारा उल्लेख या लेखांत नाहीं. हिच्या नवऱ्याच्या नांवाच्या शेवटीं सिरि हीं अक्षरें "अंगिय" कुल दिलें आहे तें हिच्या नवऱ्याचें किंवा बापाचें कीं मुलाचें हें स्पष्ट होत नाहीं.

नानाघाटांतील लिखाणांचा परस्परसंबंध जोडण्यास पुष्कळच विचार केला पाहिजे. वेदिश्री या कुमारवराचें नांव पहिल्या (म्हणजे पहिल्या व दुसऱ्या) लेखांत येतें, तथापि त्या लेखांत नंबर ३ पासून ८ पर्यंत जे छोटे प्रतिमांच्या खालीं लेख आहेत त्या लेखांतील व्यक्तींचीं नांवें कोठेंच येत नाहींत.

हे सर्व लेख एकाच काळचे आहेत असें धरलें आणि व्यक्तींच्या मृत्यूनंतर पुतळे केले होते असें धरलें तर ज्या काळांत नायनिका, सातवाहन, हकुसिरी भाय, महारठि ष्यणकयिर हे सर्व दिवंगत झाले होते पण लेखयित्री आणि तिचा मुलगा कुमारवर वेदिश्री हे जिवंत होते त्यावेळचा लेख आहे. म्हणजे राजा सिमुक शातवाहनाच्या नंतर सुमारें ५० वर्षांनीं हे लेख तयार झाले असावे अशा कल्पनेस यावें लागतें.

वेदिश्री हाच शातवाहन असला पाहिजे; कारण वेदिश्रीचें नांव या लेखांत नाहीं आणि दोन लेखांचा संबंध तर जोडला पाहिजे अशा वृत्तीनें वेदिश्री आणि शातवाहन यांचें ऐक्य बुहलरनीं कल्पिलें आहे. तथापि पुराव्याचा अनवश्यक कल्पना न मिसळतां अर्थ लावावयाचा झाल्यास वेदिश्री हा सुभेदार असतां हकुश्री, शातवाहन, नायनिका इत्यादि व्यक्ती दिवंगत झाल्या होत्या याच निर्णयास यावें लागेल. लेख भिन्नकालीन आहेत असें समजालें तरी निराळा म्हणजे पुतळे व नांवें ज्या व्यक्तींचीं आहेत ते राजे होते असा निर्णय काढतां येत नाहीं. सातवाहन आणि हकुश्री यांपैकीं कोणीहि राजा झाला नव्हता; कारण एकाद्या पुरुषास राजत्त्वानंतर जर मृत्यु आला असला तर त्याचा कुमार शब्दानें उल्लेख झाला नसता.

## ४५४. सिमुक शातवाहनाचा काल ख्रि. पू. २२० कीं त्याच्या अगोदर सुमारें ५० वर्षें.

४५४. नानाघाट येथें जो लेख आहे तो शातकर्णीच्या राणीचा आहे आणि हा शातकर्णी ब्युलरच्या मताप्रमाणें शिमुकच्या मुलाचा मुलगा होता. शिमुक अर्थात पुराणांत उल्लेखिलेला शिमुक हाच होय ही गोष्ट सर्वमान्य आहे, पण तीविषयींहि आमची खात्री नाहीं.

संशोधकवर्गांत प्रचलित असलेल्या समजुती आणि त्यांस उपलब्ध झालेलीं प्रमाणें या दोहोंचें पृथक्करण नेहमीं आठवणींत ठेवलें पाहिजे. नानाघाट येथील जी लिपी आहे ती हाथीगुंफा लिपीशीं मिळती आहे अशी एक समजूत आहे. त्या लिपींच्या सादृश्यांवरून व दोन्ही ठिकाणीं शातकर्णी हा शब्द वापरला आहे त्यावरून ते दोन्ही राजे एकच असावेत. म्हणजे यादींतील तिसरा राजा असावा अशी जयस्वालांनीं समजूत करून घेतली आहे. हाथीगुंफा येथील लेख पुढें सविस्तर दिला जाणारच आहे तो लेख मुरीय कालाच्या १६५ व्या वर्षी कोरला आहे आणि या मुरीय कालाचा आरंभ जयस्वाल ख्रि. पू. ३२६ ते ३२५ च्या सुमारास झाला असें समजत होते. इतर लोक चारपांच वर्षे नंतर धरीत. रा. जयस्वालांचें म्हणणें जर खरें धरलें तर ज्या वर्षी शातकर्णीवर खारवेलानें स्वारी केली तें वर्ष ख्रि. पू. १६० येतें. पुराणांच्या यादीप्रमाणें आणि त्या यादीबरोबर येणाऱ्या उल्लेखांचा जो पार्गिटर† यांनीं अर्थ लावला आहे त्याप्रमाणें शातकर्णीचा राज्यारोहणकाल शिमुकाच्या राज्यारोहणानंतर तेहतीस वर्षांनीं येतो. हे तेहतीस १६० त मिळविले आणि शातकर्णीवर स्वारी होण्याच्या अगोदर कांहीं वर्षें तो राज्यावर आला असेल असें गृहीत धरलें तर शिमुकाच्या राज्यप्राप्तीचा काल ख्रि. पू. दोनशेंवीसच्या सुमारास येतो, म्हणजे शिमुकाचा उदयकाल मौर्यांच्या उत्कर्षकालापासून फारसा दूर नाहीं.

मुरियकालाचें गमक निरुपयोगी झालें.

मुरीयकाल हा ख्रि. पू. ३२६–३२५ असा रा. जयस्वालांनीं धरला होता तथापि हें रा. जयस्वालांचें एका काळचें म्हणणें पुष्कळांसच मान्य झालें नाहीं. अलीकडे जयस्वलांनीं तें सोडलें आहे.

जयस्वालांच्या म्हणण्यावर आक्षेप रा. रामप्रसाद चंदा यांनीं (इंडियन अँटिक्वरी १९१९ मध्यें) घेतले आहेत, तर रा. जयस्वालांच्या कालगणनेचें आपणांस अधिक काळजीपूर्वक परीक्षण केलें पाहिजे व तें होईलच.

एवढें मात्र आहे कीं रा. रामप्रसाद चंदा यांच्या आक्षेपानें विशेष गैरसोय होते असें नाहीं. कारण ते नानाघाटांत उल्लेखिलेल्या शातकर्णीस यादींतला सहावा पुरुष घालीत आहेत आणि त्यामुळें मि. चंदा यांनीं हाथिगुंफेचा काल

† Pargiter-Dynasties of Kaliyuga. page 38.

जरी अलिकडे ओढला असला तरी त्याच्यायोगानें शातवाहनांच्या उदयाच्या प्राचीनत्वास अपाय पोंचत नाहीं.

लि पि शा स्त्री य ग म क.

मुरियकालासंबंधानें रा. जयस्वालांचें म्हणणें कांहीं बाजूंनीं पूर्णपणें खातरी करणारें वाटलें नाहीं तरी देखील आपणांस तेवढ्यावरूनच शिमुकाच्या कालाविषयीं फार घोटाळ्यांत पडण्याचें कारण नाहीं. नानाघाटांतील लिपी दक्षिणेकडील सर्व लेखांतील लिपीपेक्षां अधिक जुनी आहे आणि ती अशोकाच्या ब्राह्मी लिपीपासून थोडीशीच दुरावली आहे. अशोककाळची ब्राह्मी लिपी वाचतां आली तर नानाघाटांतील लिपी वाचण्यास अडचण पडत नाहीं. नानाघाटांतील लिपी आणि लिखाण हीं लिपिविज्ञानशास्त्रीय कारणामुळेंच ब्यूलरनें ख्रि. पू. २००–२५० या काळांत घातली आहे आणि खारवेलच्या लिखाणापेक्षां अधिक जुनीं आहेत, असें मत प्रदर्शित केलें आहे.

खा र वे ला शीं स म का ली न शा त क र्णी को ण ता.

ब्यूलरचें लिपिशास्त्रीय म्हणणें स्वीकारलें तर शिमुकाच्या प्राचीनत्वाला अडचण उपस्थित होत नाहीं. खारवेलचा प्रतिस्पर्धी शातकर्णी हा त्या घराण्यांतील एक पुढचा पुरुष घ्यावा लागतो एवढेंच.

भां डा र क रां ची स म जू त ब ख ल्यां ना अ मा न्य.

सर रामकृष्ण भांडारकर आणि देवदत्त भांडारकर या विद्वान पितापुत्रांनीं ख्रि. पू. ७५ हा शातवाहनांच्या उदयाचा काल धरला आहे. पुराणांतील कथा म्हणजे नोकरानें राजास मारून राज्य घेतलें ही कथा खरी धरण्यासाठीं त्यांना कण्व आणि शुंग ह्या दोघांना समकालीन बनवावें लागलें. † शातवाहनांचा उदय १००–१२५ वर्षें अलिकडे ओढण्यासाठीं जी भांडारकर पितापुत्रांनीं खटपट केली आहे ती कदाचित् शालिवाहन शक ७८ मध्यें सुरू झाला तर शातवाहनांचा उदयकाल शकारंभापूर्वी १५० वर्षांपेक्षां अधिक जुना नसावा अशा मनोगतभावनेमुळें झाला असेल.

भांडारकरांच्या या विधानांवर विश्वास टाकण्याबद्दल आक्षेप घेतांना रा. बखले असें म्हणतात कीं, जर आपण पुराणांतील यादीवर विश्वास ठेवला आणि शिमुकाचा काळ मात्र भांडारकर धरतात तितका उत्तरकालीन धरला तर पुलुमयी यास चष्टणाच्या नातवाशीं समकालीन करावें लागेल. पण पुलुमायी आणि चष्टण हे समकालीन होते हें आपणांस ठाऊकच आहे. एवंच शिमुकाचा काळ ख्रि. पू. २२० च्या आसपास धरणें प्राप्त होतें असें बखले दाखवीत आहेत. तथापि लिपिशास्त्रज्ञाचें मत ख्रिस्तपूर्व २५० इतका प्राचीन आहे तें खरें धरलें तर त्याच्याहि अगोदर तेहेतीस वर्षें म्हणजे २८३ इतक्या प्राचीनकाळापर्यंत न्यावा लागेल.

† Indian Anti. 1920; आणि रामकृष्ण भांडारकरांची Early History of Dekhan.

## ४५५. काण्वांचा नाश कोणी केला.

४५५. शिमुकाचा काल येणेंप्रमाणें ख्रि. पू. २००-२२५ पर्यंत गेला म्हणजे शिमुक हा काण्ववंशाचा नाशकर्ता होता हें चुकीचें ठरतें. काण्वांचा लोप केव्हां झाला याविषयीं व्हिन्सेंट स्मिथ ख्रि. पू. २८ च्या सुमारास तो लोप झाला असावा असें अनुमान करतात. अनुमान म्हणण्याचें कारण कीं नक्की काल काढणें कठीणच आहे. कारण शुंग आणि काण्व यांच्या कारकीर्दींचा काल देखील अदमासानेंच काढला आहे. शातवाहनांपैकीं शिमुकाखेरीज दुसऱ्या कोणच्या तरी पुरुषानें काण्वांचा मोड केला असावा आणि कोणी केला हें शोधण्यास आपणांस पुराणें साहाय्य करतात असें वाटून रा. बखले असें म्हणतात कीं, पुलुमा अथवा पुलुमायी यांच्यापैकीं कोणीतरी तें साध्य केलें असलें पाहिजे. हा पुलुमा कोण असावा त्याविषयीं मतभेद झालेला आहे. रा. जयस्वाल समजतात कीं पार्गिटेरच्या यादींतील आठवा पुरुष तोच तो हा पुलुमा असावा. पुलुमावी हें नांव मात्र पंधरावें येतें आणि आठवें नांव आपिलक असें येतें. आपिलक तोच पुलुमा असें रा. बखले यांना अत्यंत दूरान्वयाचें वाटतें आणि पुलोमावीपासून पंधरा पिढ्या पाठीमागें जातां पहिल्या पिढीचा काल ख्रि. पू. तिसऱ्या शतकाचा चवथा पाद येतो; आणि तोच काल शातवाहनांच्या उदयाचा येतो. त्याअर्थीं शातवाहनांच्या घराण्यांतील पंधराव्या पुरुषानें मगध राज्याचा पाडाव केला असें रा. बखले धरतात; असो.

## ४५६. शातवाहन शब्दाच्या मूळ अर्थाचा अगर व्युत्पत्तीचा अनिश्चय.

४५६. शातवाहन शब्द सप्तशतींत आहे व अंकित लेखांत आहे. हें नांव कसें आलें असावें याविषयीं जास्त चांगलें स्पष्टीकरण आज उपलब्ध नाहीं. सतीयपुत्र हा शब्द जो अशोकाच्या लिखाणांत येऊन गेला आहे त्या शब्दाशीं रा. बखले व त्यांच्यापूर्वी सर भांडारकर संबंध जोडतात. तो आम्हांस समाधानकारक वाटत नाहीं. आणि सतीयपुत्र आणि शातवाहन यांचा संबंध जोडण्यास भाषाशास्त्राचा त्याग करून कल्पनेनें कल्पना भरकटूं दिल्याशिवाय संबंध जोडतां येणार नाहीं. त्यांस शूद्र म्हटलें आहे त्याविषयीं विवेचन पुढें येणारच आहे; तथापि शातवाहनांच्या स्पष्टीकरणासाठीं ज्या ज्या कल्पना निर्माण झाल्या त्या कल्पनांच्या उल्लेखामध्यें या कल्पनेचा उल्लेख न करणें अयोग्य होईल.

शातवाहन हा शात नांवाच्या एका यक्षाचा मुलगा होता, आणि त्या यक्षानें त्याला वाहून म्हणजे पळवून नेलें म्हणून शातवाहन नांव पडलें अशी कथा सरित्सागरांत आहे.

अभिधानचिंतामणि अधिक मनोरंजक शब्दोत्पत्ति देतो सातं दत्तसुखं वाहनं यस्य इति ' असा शातवाहन शब्दाचा, विग्रह सांगतो. अभिधान चिंतामणि किंवा कल्पप्रदीप यांच्या पंडिती अर्थीकरणाकडे लक्ष देण्यांत अर्थ नाहीं.

सप्तशतीमध्यें शालिवाहन आणि शातवाहन असे दोन्ही शब्द आलेले आहेत. आणि एका हस्तलिखितामध्यें "शातकर्णोपनामकः" असे शब्द आहेत. हे अनेक आधार जरी सांगितले तरी शब्दाचा मूळ अर्थ काय असावा आणि मूळ शब्द कोणता असावा, शातवाहन ही पदवी होती कीं कुलनाम होतें व व्यक्ति नाम नव्हतेंच काय ? या अनेक प्रश्नांपैकीं कोणताही प्रश्न सुटला आहे असें वाटत नाहीं. प्रस्तुत लेखकास तार्किक शुद्धतेकडे पाहून काय निर्णय काढतां येतील याविषयीं फार तर कांहीं विचार व्यक्त करतां येतील.

## ४५६ अ. पुराणकारांनीं शिमुकास मगधपराभवाचें श्रेय कां दिलें.

४५६ अ. पुराणांमध्यें ज्या राजांचीं नांवें आलीं आहेत त्यांमध्यें शिमुक हा पुराणें म्हणतात त्याप्रमाणें मौर्यांचा पाडाव करणारा नव्हताच. तथापि शातवाहनांच्या किंवा आंध्रभृत्यांच्या घराण्याचा संस्थापक होता ही गोष्ट जतन करून ठेवण्यांत पुराणकारांनीं आपली साहित्यसंरक्षणप्रियता दाखविली आहे. नानाघाटाच्या लेखामध्यें शिमुकाचें नांव आलें आहे, त्यावरून एवढें मात्र सिद्ध होतें कीं, त्या पुराणाच्या पुरवणीकारांना नक्की कोणत्या शातवाहनानें कण्वांचा पाडाव केला हें ठाऊक नसल्यामुळें त्यांच्या हातीं जेव्हां यादी आली तेव्हां त्यांनीं स्वाभाविकपणें पाडावाचें श्रेय त्यांस उपलब्ध यादींतील पहिल्या पुरुषास दिलें. पुराणांचे पुरवणीकार शातवाहनांस सेवकवर्गांतील समजते झाले आणि राजकारणांत असलेली हरामखोरीची परंपरा त्यांस ठाऊक असल्यामुळें सेवकानें शेवटच्या काण्वास मारून त्याचें राज्य घेतलें इतक्या गोष्टी इतिहासकारापाशीं असलेल्या संयोजक कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें पुराणकारांनीं पुरविल्या. आपण येथें हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं ही पुरवणी जोडण्याची क्रिया तिसऱ्या चवथ्या शतकांत झाली असावी; कारण आंध्रांच्या राज्याच्या शेवटाचा व त्याच्या नंतरच्या राजांच्या कुलांचा उल्लेख पुराणकारांनीं केला आहे.

या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे पुराणकारांच्या कृतीबद्दल किंवा चुकीबद्दल आश्चर्यही वाटत नाहीं आणि त्यामुळें त्यांनीं दिलेलें काण्वांच्या जेत्याचें नांव दुर्लक्षिण्याबद्दल आक्षेपहि उत्पन्न होण्याचें कारण नाहीं.

## ४५७. 'कृष्ण' याची कारकीर्द.

४५७. शिमुकाच्यानंतर त्याचा धाकटा भाऊ कृष्ण हा गादीवर आला आणि त्यानें राज्य अठरा वर्षें केलें असें पुराणें सांगतात. नाशिक येथील एक लेख असें दाखवितो कीं ज्या गुहेंत तो लेख आहे ती गुहा त्याच्या राज्यांत पोखरली गेली. त्या लेखांतील लिपी नानाघाटच्या लेखांतील लिपीशीं अगदीं मिळती आहे असें आश्वासन ब्यूलर देतो. आणि तें आश्वासन रा. बखले यांनीं स्वीकारलें आहे. आणि रा. बखले त्यावरून असा निर्णय काढतात कीं, ज्याअर्थी या दोन लिपींत इतकें सादृश्य आहे त्याअर्थी त्या दोहोंचा काल फारसा दूर नसावा. रा. बखले यांस आश्चर्य एवढेंच वाटतें कीं नानाघाटच्या लेखामध्यें कृष्णाचें नांव नसावें, आणि त्याचा पुतळाही नसावा. त्याच्या अगोदरचा राजा जो शिमुक त्याचा मात्र पुतळा असावा. यान्त्यावरून असा निर्णय काढतात कीं कन्ह (कृष्ण) हा शिमुकच्या नंतर राज्याचा जबरीनें उपभोग घेणारा असावा. नानाघाटचा लेख ज्याअर्थी शिमुकाच्या सुनेच्या हातचा आहे. आणि ज्याअर्थी तिच्या नवऱ्याच्या हक्काला बुडवून कन्ह (कृष्ण) हा राज्य उपभोगिता झाला त्याअर्थीं त्याचें नांव नागनिकेनें वगळणें हें अगदीं स्वाभाविक होय असें रा. बखले यांस वाटतें. रा. बखले यांचें स्पष्टीकरण जर मान्य केलें तर नागनिकेचा लेख कृष्णाच्या नाशिक येथील लेखाच्या नंतर कोरला गेला असें मान्य करावें लागेल. तथापि तसें मानणें बरोबर होणार नाहीं असेंच बहुतेक विद्वानांचें मत होईल असें वाटतें. नानाघाट येथील नागनिकेचा लेख हा नाशिक लेखाच्या अगोदरचा हेंच जर ऐतिहासिक सत्य असलें, तर त्या लेखांतील कृष्णाची सोय निराळी लावावी लागेल आणि यादींतील क्रमामध्यें थोडीशी उलटापालट करावी लागेल. किंवा नाशिकचा कृष्ण ही कोणची तरी आणखी निराळी व्यक्ती होती असे म्हणावें लागेल. आम्ही नाशिकच्या लेखाला नानाघाटच्या लेखाहून अधिक पूर्वकालीन समजावयास भक्कम पुराव्याशिवाय तयार नाहीं. शिवाय नानाघाटांतील देवकुल राज्यारूढ व्यक्तींचेंच होतें असें आम्हीं समजत नाहीं. आणि त्यामुळें रा. बखले यांनीं उत्पन्न केलेले प्रश्न उत्पन्नच होत नाहींत.

## ४५८. शातकर्णी, पुष्पमित्र आणि खारवेल !

४५८. पुराणें सांगतात कीं कन्हाच्यानंतर शातकर्णी आला. बुह्लर समजतात कीं हा राजा शिमुकाचा मुलगा होता असें

नानाघाट लेख सांगतात. शातकर्णी आणि पुष्यमित्र हे एकमेकांशीं समकालीन असावेत. नानाघाटच्या लेखांत अश्वमेधाचा उल्लेख आणि पुष्यमित्राच्या लेखांत अश्वमेधाचा उल्लेख आहे त्यावरून बौद्धसंप्रदायानें उत्पन्न केलेली यज्ञजुगुप्सा त्या वेळेस दक्षिण व उत्तर या दोन्ही भागांत मावळली होती असें दिसतें. शातकर्णीनीं उज्जयिनी जिंकली होती असें नानाघाटांतल्या लेखांपासून निष्पन्न होतें असाच अर्थ केंब्रिज येथील संस्कृतचे अध्यापक व मुद्राविज्ञानाचे पंडित प्रो. रॅप्सन यांनीं काढला आहे. पुष्यमित्रानें जो अश्वमेध केला, तो आपल्या सार्वभौमत्वाचा डांगोरा पिटण्यासाठींच केला, तसाच शातकर्णीनीं दक्षिणेस केलेला हा यज्ञ तोच यज्ञ याच हेतूस्तव असावा. याच शातकर्णीचा पराभव खारवेलानें केला असावा असें रा. बखले समजतात.

## ४५९. शातकर्णीचा उत्तराधिकारी कोण होता?

४५९. शातकर्णीच्या उल्लेखानंतर येणारे पौराणिक उल्लेख आणि शिलालेखांतील उल्लेख जरा काळजीपूर्वक वाचले पाहिजेत आणि त्यांचा अर्थ लावावयाचा तोही सावधगिरीनेंच लावला पाहिजे. शातकर्णीचे दोन मुलगे होते त्यांचीं नांवें कुमार वेदिसिरी आणि कुमार हकुसिरी. यांपैकीं वेदिसिराला कुमारवर असेंही विशेषण दिलेलें आढळतें. पुराणामध्यें मात्र शातकर्णीच्या नंतरचा राजा पूर्णोत्संग असा दिला आहे. त्यावरून ब्यूलर असा तर्क करतात कीं पूर्णात्संग हें वेदिसिरीचें बिरुद असावें. वेदिसिरी हा प्रस्तुत लिखाणाच्या प्रसंगीं अज्ञान असावा परंतु युवराज असतांना किंवा अज्ञानपणीं गादीवर आलेला असावा. आणि त्याच्या करतां त्याची आई कारभार पहात असावी हाकुसिरी हा राज्यावर आला होता किंवा नव्हता याविषयीं मतभेद आहे. जैनांनीं तीर्थकल्प नामक ग्रंथांत व इतरत्र कांहीं शातवाहनविषयक कथा संरक्षिल्या आहेत. त्यांपैकीं एका जैन (JBBRAS Vol. 10, Page 134) दंतकथेप्रमाणें शक्तिकुमार हा राजा होता परंतु अत्यंत विषयी होता अशा स्वरूपाची आहे. या कथेची अविश्वसनीयता सिद्ध करण्यासाठीं हकुसिरी हा राजा नव्हता असें दाखविणारा पुरावा बखले आणतात तो असा कीं हाकुसिरीच्या नातीनें नाशिक येथें जें लिखाण कोरविलें आहे त्यामध्यें हाकुसिलीचा महा हाकुसिरी असा उल्लेख आहे. आणि त्या 'महा' एवढ्याच पदवीवरून हाकुसिरी हा कधींच राजा झाला नव्हता असा अर्थ काढण्यांत आला आहे. तथापि शक्तिकुमार तोच हकुसिरी असें समजावयास महत्त्वाचें प्रमाण मात्र नाहीं. शक्तिकुमाराची कथा पुढें सविस्तर येणारच आहे. असो.

वेदिसिरीचें देवदत्त भांडारकर आपीलक अथवा आपीटक यांशीं ऐक्य आहे असें म्हणतात.* तथापि तें त्यांचें म्हणणें रा. बखल्यांस समाधानकारक वाटत नाहीं. रा. बखले ब्यूलरला अनुसरतात आणि त्याचें पूर्णात्संगाशीं ऐक्य दाखविण्यास आपली पसंती व्यक्त करतात.

यावरून शातकर्णीचा उत्तराधिकारी कोण होता याविषयीं वाद आहे हें दिसून येईल. या वादांतील सर्व मुद्दे लक्षांत घेणें अवश्य आहे. तथापि तें करण्यापूर्वीं या शातकर्णीविषयीं आणि त्याच्या कालाविषयीं सविस्तर विचार अवश्यक होते. तो विचार करण्यासाठीं खारवेलाच्या लेखाचें सूक्ष्म परिक्षण अवश्य आहे. नानाघाटांतील लेखांत जीं नांवें आलीं आहेत त्यांसंबंधानें हें प्रास्ताविक विधान पुरे झालें.

वरील एकंदर विवेचनावरून संशोधनग्रामांतील मतभेद लक्षांत येतील. आमच्या मतें नानाघाटातील लेखाचा ऐतिहासिक अर्थ चुकीचा करण्यामुळें त्यांतील नावें पौराणिक नांवांशीं जुळविण्याचा प्रयत्न होऊन भलत्या भानगडी उपस्थित झाल्या आहेत. सध्याचे मतभेद येणेंप्रमाणें आहेत.

(१) मुरीय कालासंबंधानें संशय.

(२) खारवेल आणि नानाघाटाचा शातकर्णी समकालीन होते कीं नव्हते. पुराणांतील तिसरा कीं सहावा शातकर्णी खारवेलानें पराभूत केला?

(३) काण्वाचा नाश कोणी केला? शिशुक, शूद्रक, शिमुक वगैरे नांवांनीं ज्ञात असलेल्या पुरुषानें कीं नंतरच्या पुरुषानें नंतरच्या असल्यास पुलोमानें कीं आपीलकानें?

(४) नाशीकच्या लिखाणांत उल्लेखिलेला कृष्ण राजा होता काय?

(५) पुराणें आणि अंकित लेख यांतील नांवांची संगति जोडण्यांत ओढाताण जी सर्वांनींच केली आहे, ती कितपत आक्षेपार्ह आहे? येणेंप्रमाणें संशोधनक्षेत्रांतील वादग्रस्त स्थिति लक्षांत येते. जेव्हां अधिक साहित्य आपण नजरेखालून घालूं तेव्हां या प्रश्नांवर पुन्हां विचार करूं. शातकर्णीच्या कारकीर्दीसंबंधानें निश्चय केल्यानंतर मग शिमुककालनिश्चय व्हावयाचा तर शातकर्णीकालविषयक प्रश्नाकडे अगोदर वळूं आणि त्यासाठीं खारवेलाचा लेख आणि त्यावर झालेलें जयस्वालांचें भाष्य याचा सविस्तर विचार करूं. जयस्वालांनीं खारवेलाच्या लेखावर जेवढे परिश्रम केले

* Indian Anti. 1918 p. 72.

आहेत तेवढे परिश्रम दुसरे कोणींहि कोणत्याहि लेखावर केले नाहींत असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. खारवेलाच्या लेखासंबंधानें विचार आणि शातकर्णीच्या सत्ताविस्ताराचा विचार एकत्रच करावा लागतो.

## ४६०. नानाघाटांतील लेखांचें महत्त्व.

४६०. प्रस्तुत नानाघाटाचें लिखाण अनेक तऱ्हांनीं अत्यंत महत्त्वाचें आहे. हें यांतील अनेक शब्द ज्यांवर स्वतंत्र भाष्य करतां येईल असे आहेत. त्यांच्यावर केलेलें भाष्य पुढें भाषाशास्त्राच्या अनुषंगानें किंवा सामाजिक स्थितिवर्णन करतांना किंवा शातवाहनांचा कुलविषयक इतिहास तपासतांना केलेलें सांपडेल. त्यावर विशेष विवेचन येथें करीत नाहीं. बरेचसे वादग्रस्त प्रश्न देखील या निवेदनांत वगळले आहेत आणि परंपरानिवेदन अप्रतिहत चालू ठेवण्याकरतां वादग्रस्त प्रश्नांचें तात्पुरतें दूरीकरण अत्यंत अवश्य होतें. असो.

नानाघाटाची जागा मोठी महत्त्वाची आहे, कारण आज कोंकणांतून पुणें जिल्ह्यांत उतरावयास किंवा नाशिकाकडे जावयास हा घाट महत्त्वाचा आहे. मुरबाडहून नानाघाटांत जावयाचें आणि तेथून जुन्नरला जावयाचें हा क्रम अजून इतका चालू आहे कीं, अजून जुन्नरच्या बाजारांत ठाणें जिल्ह्यांतला माल नानाघाटांतून येतो. जुन्नर हें त्यावेळचें एक मोठें शहर होतें. शातवाहनाच्या आद्यकाळांत जुन्नर ( यवन नगरी ) प्रसिद्ध नसली तरी शिवनेर ( शिवनगरी ) प्रसिद्ध असावी.

नानाघाटांतून मुरबाडकडे जें जावयाचें तें सोपाऱ्याचें बंदर गांठण्याकरतां जावयाचें. हा प्राचीन काळचा व्यापाराचा रस्ता होता. नानाघाट शातवाहनांच्या ताब्यांत होता. एवढेंच नव्हे तर ती त्यांची महत्त्वाची जागा होती, तर या प्रसंगीं मौर्यांचा ताबा सोपाऱ्यावर होता कीं काय असा प्रश्न स्वाभाविक उत्पन्न होतो. सहज कल्पना येते ती अशी कीं ज्यावेळेस शातवाहनांनीं हा नानाघाट घेतला असावा, किंवा तेथें लेख कोरविला असावा, तेव्हां त्यांनीं अगोदरच सोपाऱ्याहून मौर्यांना हुसकावून लावलें असावें, आणि मौर्यांचें तेथून उच्चाटन करून त्यांना आपली राजधानी धारापुरीला नेणें भाग पाडलें असावें. तसें झालें असल्यास मौर्य साम्राज्यसत्ता सोपाऱ्यास फार तर दहापांच वर्षेंच असावी.

दक्षिणेंत देखील शुंगांचें राज्य आलें होतें अशा तऱ्हेची कल्पना व्यक्त करणारा एक लेख रे. स्टीव्हनसन यांनीं लिहिला आहे ! * कान्हेरी लेखांत अग्निमित्राचें नांव आलें एवढ्यावरच तो संशोधनाच्या प्राथमिक काळांत संबंध जोडला गेला होता असें दिसतें.

* Historical names and facts in the Kanheri Inscriptions J B.B. 1853.

प्रकरण ५० वें.

# शातवाहनांच्या सत्तेचा विस्तार आणि चैत्र खारवेलाचा काल

## ४६१. शातवाहनांच्या उदयाच्या पायऱ्या.

४६१. शातवाहनांच्या कुलचरित्रास प्रारंभ करतांना त्या कुलाच्या महत्त्वास सुरवात केव्हां झाली हें आपणांस पाहिलें पाहिजे. शातवाहनांस महत्त्व शिमुकाच्या कालापूर्वीच आलें होतें. त्याखेरीज त्यांची सत्ता कोंकणापासून ओरिसापयत खारवेलाच्या कालांत नसती. कुलमहत्त्व प्राप्त होतें. त्यांची स्वतःची जहागीर किंवा मांडलिक राज्य अगोदरच अस्तित्वांत असेल आणि तें मांडलिक राज्य विशिष्ट पुरुषांच्या कारकीर्दीत महत्व पावलें अशा तऱ्हेनें तरी राज्यस्थापना व्हावयाची किंवा सेनापतींनीं किंवा दिवाणजींनीं मालकाला मारून त्याच्या राज्यावर बसावयाचें. या दोनच प्रकारांनीं आपणांस क्रांत्या व नवीन घराण्याचे उदय दिसून येतात. नवीन साम्राज्याचा संस्थापक मांडलिक तरी असला पाहिजे किंवा पूर्वी साम्राज्यांत मोठा अधिकारी तरी असला पाहिजे असा नियम देतां येईल.

अत्यंत प्राचीन काळचा म्हणजे ज्या काळांत सामान्य व्यक्तीपासून मांडलिकपणापर्यंत विशिष्ट कुलाचा उत्कर्ष होत गेला, त्या काळापर्यंतचा इतिहास आपणांस बहुधा उपलब्ध नसतो. चालुक्य, राष्ट्रकूट, देवगिरीचे यादव या सर्वांना अगोदर सामंतत्व होतें आणि पुढें स्वतंत्रता आणि अधिराज्य हीं प्राप्त झालीं. शातवाहनांना जें राज्यपद मिळालें तें देखील सेवकानें राजाला मारून त्याचें राज्य बळकवावें याच क्रियेनें आलें आहे असें स्पष्टीकरण पुराणकारांनीं केलें आहे. पण वस्तुस्थिति तशी दिसत नाहीं. तर शातवाहनांची सत्ता फार हलुहळू वाढत जाऊन ती अखिलभारतव्यापी बनली. पौराणिक पुरवणी जोडणारानें भृत्यानें काण्वराजास मारून त्याचें राज्य घेतलें असा इतिहास ठोकून दिला असावा. खरोखर पहातां काण्वांच्या शेवटापूर्वीच एकदोन शतकें शातवाहनांची सत्ता वाढतच होती. मौर्यांच्या ऐन-उमेदीच्या काळांत शातवाहन स्पष्टपणें नजरेस येतात, आणि त्यावेळचा शातवाहन शिमुक असावा असें मानण्यास कारणें दिलींच आहेत. शातवाहनांचा उदय मौर्यसाम्राज्याच्या समाप्तीनंतरच नाहीं; तर अशोकाच्या मृत्यूपूर्वी म्हणजे सुमारें ख्रि. पू. २५० च्या सुमाराला शातवाहन सम्राटाच्या पदावर आले होते या विधानास हाथिगुंफा आणि नानाघाट या दोन ठिकाणच्या लेखांचा पुरावा आहे.

या शातकर्णीचा आपण पराभव केला अशी आपली ख्याति खारवेल आपल्या हाथीगुंफेंतील लिखितांत सांगतो. हा पराभव त्यानें आपल्या राज्यारोहणाच्या दुसऱ्या वर्षी केला होता आणि असें तेथें उल्लेखिलें आहे. त्यावरून या खारवेलाच्या बापाच्या कारकीर्दीतच शातकर्णीचा शह कलिंगराज्यापर्यंत पोहोंचला होता हें उघड आहे. ही आपली ख्याति सांगतांना खारवेल शातकर्णीचा उल्लेख दक्षिणापथाचा राजा स्वामी करीत आहे. म्हणजे खारवेलाच्या पूर्वीच अनेक लहान लहान राजांना जिंकून शातकर्णी हा दक्षिणापथाचा त्याचप्रमाणें बऱ्याच पूर्वेकडील प्रदेशाचा अधिराज झाला होता. ही गोष्ट स्पष्ट आहे. या वेळची पूर्णस्थिति लक्षांत येण्यासाठीं खारवेलाचे संबंध लेख भाषांतरासहित आम्ही येथें देतों. *

## ४६२. खारवेलाचा हाथिगुंफा लेख.

ओळ पहिली.

**नमो अराहंतानं [।] नमो सवसिधानं [।] ऐरेन † माहाराजेन महामेघवाहनेन 'चेतिराज' वस-वधनेन पसथसुभलखनेन चतुरंतलुठित-गुनोपहितेन कलिंगाधिपतिना सिरि 'खारवेलेन'**

**नमोऽर्हद्भ्यः [।] नमः सर्व सिद्धेभ्यः [।] ऐलेन महाराजेन महामेघवाहनेन चेदिराजवंशवर्धनेन प्रशस्त-शुभलक्षणेन चतुरंतरलुठितगुणोपहितेन कलिङ्गाधिपतिना श्रीक्षारवेलेन.**

---

* हें वाचन आणि भाषांतर जयस्वालानुसारी आहे. त्यांनीं J. B. O. च्या तिसऱ्या (इ. स. १९१७) ग्रंथांत भाषांतर दिलें व त्यांतच पुढें दुरुस्त्या करून चौथ्या वर्षग्रंथांत पुन्हां दिलें येथें दिलेलें संस्कृतीकरणदेखील जयस्वालांचेंच आहे. यानंतर पुढें जयस्वालांनीं १९२७ सालीं केलेल्या दुरुस्त्या यांत समाविष्ट केल्या आहेत.

† आर्येण असाहि अर्थ कित्येक करतात.

## ओळ दुसरी.

पंदरसवसानि सिरि-कडार-सरीर-वता कीडिता कुमारकीडिका [।] ततो लेखरूपगणना-ववहार-विधि-विसारदेन सवविजावदातेन नव-वसानि योवरजं पसासितं [।] संपुण-चतुवीसति-वसो तदानि वधमानसेसायो वेनाभि विजयो ततिये.

पञ्चदशवर्षाणि श्री-कडार-शरीर-वता क्रीडिताः कुमार-क्रीडाः [।] ततो लेखरूपगणनाव्यवहारविधिविशार-देन सर्वविद्यावदातेन नववर्षाणि यौवराज्यं प्रशासितम् [।] सम्पूर्णचतुर्विंशति वर्षस्तदानीं वर्धमानवे शैशवः नाभि-विजयस्तृतीये.

## ओळ तिसरी.

कलिंगराजवंसपुरिसयुगे 'माहारजा' भिषेचनं पापुनाति [।] अभिसितमतो च पधमे वसे वातविहत गोपुर-पाकार-निवेसनं पटिसंखारयति [।] कलिंगनगरि [ि] ख-बीर-इसि-तालं तडाग-पाडियो च वंधापयति [।] सघुयान-पतिसंठ्पनं च

कलिङ्गराजवंशे पुरुष-युगाय महाराज्याभिषेचनं प्राप्नोति [।] अभिषिक्तमानश्च प्रथमे वर्षे वातविहतं गोपुर-प्राकारनिवेशनं प्रतिसंस्कारयति [।] कलिङ्गनगर्याम् उक्षिकाविलं इषितलंतडागपालीश्च वन्धयति [।] सर्वो-द्यानप्रतिसंस्थापनञ्च.

## ओळ चवथी.

कारयति [।] पनतीसाहि सतसहसेहि पकतियो च रंजयति [।] दुतिये च वसे अचितयिता सातकंणिं पछिमदिसं हयगज-नर-रध-बहुलं दण्डं पठापयति [।] कण्हवेम्नां गताय च सेनाय वितासितं मुसिकनगरं [।] ततिये पुन वसे-

कारयति [।] पञ्चत्रिंशच्छतसहस्रैः प्रकृतीश्च रञ्जयति [।] द्वितीये च वर्षे अचिन्तयित्वा सातकर्णिं पश्चिमदेशं हय-गज-नर-रथ-बहुलं दण्डं प्रस्थापयति [।] कृष्णवेणां गतया च सेनया वित्रासितं मूषिकनगरम् [।] तृतीये पुनर्वर्षे—

## ओळ पांचवी.

गंधव-वेद बुधो दंप नत-गीत-वादितसंदंसनाहि उसव-समाज-कारमनाहि च कीडापयति नगरिं [।] तथा चवुते वसे विजाधराधिवासं अहत-पुवं कालिंगपुरराज निवेसितं...वितध-मकुटे सविलम ढिते च निखितछत-

गन्धर्ववेदबुधो दम्प-नृत्त-गीत-वादित्रसंदर्शनैरुत्सव-समाज-कारणैश्च क्रीडयति नगरीम् [।] तथा चतुर्थे वर्षे विद्याधराधिवासम् अहतपूर्वं कलिङ्गपूर्व राजनिवेशितं... विनय-मकुटान् सार्धितविल्मांश्च निक्षिप्तछत्र-

## ओळ सहावी.

भिंगारे हित-रतन-सापतेये सवरठिक "भोजके" पादे वंदापयति [।] पंचमे च दानि वसे 'नंदराज' तिवस-सत-ओघाटितं तनसुलिय-वाटा पनाडिं नगरं पवेस [य]ति [।] सो [पि च वसे] छडम, भिसितो च राजसुय [.] संदसयंतो सव-कर-वणं.

भृङ्गारान् हत-रत्न-स्वापतेयान् सर्वराष्ट्रिकभोजकान् पादावभिवादयेत [।] पञ्चमेचेदानीं वर्षेनन्दराजेन त्रिशत-वर्षायाम् अवघट्टितां तनसुलियवाटात् प्रणालीं नगरं प्रवेशयति [।] सो [ऽपिच वर्षे] षष्ठेऽभिषिक्तश्च राजसूयं सन्दर्शयन् सर्वकर-पणम्.

## ओळ सातवी. †

अनुगह-अनेकानि सत-सहसानि विसजति पोरं जानपदं [।] सतमं च वसं पसासतो वजिरघरवंति 'घुसि' त घरिनी स-मतुक-पद-पुंना सकुमार [।] ...[।] अष्टमे च वसे महतिसेनाय मह [ त-भिती ] गोर-धगेरिं.

अनुग्रहाननेकान् शतसहस्रं विसृजति पौराय जानपदाय [।] सप्तमं च वर्षं प्रशासतो वज्रगृहवतीघुसितेती गृहिणी सन्-मातृकपद-पूर्णा सकुमार [।]......[।] अष्टमे च वर्षे महत्या सेनया महा [ भित्तिं ] गोरथगिरिं.

## ओळ आठवी.

घातापयिता 'राजगहं' उपपीडापयति [।] एतिना च कंमापदान-संनादेन संवित-सेन-वाहनो विपमुंचितुं मधुरां अपयातो यवन राज डिमि ...[ त, अथवा ति ] यछ [ति]...वि....पलवभरे.

घातयित्वा राजगृहमुपपीडयति [।] एतेन च कर्मावदान-संदेन संवीतां सैन्यवाहिनीं विप्रमोक्तु मथुराम-पयात यवन राज दिमत ]............यच्छति.......
...पल्लवभृतानि.

## ओळ नववी.

कपरुखे हय-गज-रध सह-यंते सव-घरावास-परिवसने स-अगिणठिय [।] सवगहनं च कारयितुं वम्हणानं जाति-पंति परिहारं ददाति [।] अरहत........व........न.......गिय.

कल्पवृक्षान् हयगजरथान् सयन्तृ सर्वगृहावासपरिवसनानि साग्निष्ठिकानि [।] सर्वग्रहणं च कारयितुं ब्राह्मणानां जातिपङ्क्त्यै परिहारं ददाति [।] अर्हत्......व...
....न......गिया (?)

## ओळ दहावी.

...[ क ] [ ि] मा न [ ति ] रा [ ज ] संनिवासं महाविजयं पासादं कारयति अठतिसाय सत-सहसेहि [।] दसमे च वसे दंड संधिसम मयो-भरध-वसपठानं महि-जयनं...ति कारापयति... [ निरितय ] उयातानं च मनिरतना [ नि ] उपलभते [।]

...[ क ] [ ि] मानैः (?) राजसन्निवासं महाविजयं प्रासादं कारयति अष्टात्रिंशता शतसहस्रैः [।] दशमे च वर्षे दंड संधिसम समयो भारतवर्ष प्रस्थानं मही-जयनं....
....ति कारयति.........[ गिनिरिया ? ] उद्यातानां च मणिरत्नानि उपलभते [।]

---

† सातव्या ओळींत "वजिर घरवंति" (वज्र गृहवती) असा शब्द आला आहे त्याचा अर्थ वज्र कुलवती असा केला आहे. वज्र हा ओरिसांतील एक विभाग होता असें प्रो. के. अय्यंगार यांनीं दाखविलें आहे. (Prof. K. Aiyangar's Contributions of South India to Indian Culture, Calcutta 1923.

ओळ अकरावी.†

मण्डे च पुव राजनिवे-सित-पीथुडगद् [ल] भनंगले नेकासयाति जनपद्-भावनं च तेरस-वस-सत केतुभद्-तित' मर-देह संघातं [।] वारसमे च वस...सेहि वितासयति उतरापथ राजानो.

मण्डे च पूर्वराजनिवेशिते पृथूदग्न-दर्भ-लाङ्गले-निष्कासयति जनपद-भावनञ्च त्रयोदश-शत-वर्षीयस्य केतुभद्रस्य तिक्तामर-देह संघातम् [।] द्वादशे च वर्षे......भिः वित्रासयति उत्तरापथराजान्.

ओळ बारावी.

...मगधानं च विपुलं भयं जनेतो हथीसुगंगीय पायया‌ति [।] मागधं च राजानं 'वहमतिमितं' पादे वंदापयति [।] नंदराज-नीतं च कालिंग-जिनं संनिवेसं...गहरतनान पडिहारेहि अंगमागध-वसुं च नेयाति [।]

...मगधानाञ्च विपुलम्भयं जनयन् हस्ती सुगंगायां प्राययति [।] मागधञ्च राजानं बृहस्पतिमित्रं पादावभिवादयते [।] नन्दराजनीतञ्च कालिंगजिनं-संन्निवेशं .......गृहरत्नानां प्रतिहारैरङ्ग-मागध-वसूनि च नाययति [।]

ओळ तेरावी.

...तुं जठर-लिखित-बरानि सिहिरानि नीवेसयति सत-वेसिकनं परिहारेन [।] अभुतमछरियं च हथी-नावनपारीपुरं [सव] देन हय हथि-रतना- [मा] निकं 'पंडराजा' चेदानि अनेकानि मुतमणिरतनानि अहरापयति इध सत् [ओ]

.......त जठरोल्लिखितानि वराणि शिखराणि निवेशयति शतवैशिकानां परिहारेण [।] अद्भुतमाश्चर्यञ्च हस्ति-नावां पारिपूरं उपदेयं हयहस्तिरत्न-माणिक्यं पाण्ड्य-राजात् इदानीमनेकानि मुक्तामणिरत्नानि आहारयति इह शत [शः] [।]

ओळ चवदावी.

...सिनो वसीकरोति [।] तेरसमे च वसे सुपवत विजय-चक कुमारीपवते अरहिते य [।] प-खिणसंसितेहि कायनिसीदीयाय याप-जावकेहि राजभितिनि चिनवतानि वसासितानि [।] पूजाय रत-उवासा खारवेल-सिरिना जीवदेह सिरि-कपरिखिता [।]

...सिनो वशीकरोति [।] त्रयोदशे च वर्षे सुप्रवृत्त-विजयिचक्रे कुमारी-पर्वतेऽर्हिते यपक्षीणसंशितः कायिकनिषीद्यां यापज्ञापकेभ्यः राजभृतीश्चीर्णव्रताः ऽयवशासिताः [।] पूजाः कृतोपासाः क्षारवेलेन श्रीमता श्री जीवदेव-कल्प रक्षिताः

---

† ओळ अकरावी हिचें नवीन वाचन पुढीलप्रमाणें आहे.

मंडंच अवराजनिवेसित पीथुड गड भ
भनंगलेन कासयति जिनसडंभावनं
च तेरसवससति कंतुभिदाति मरदेह संघातं
वारसमे च वसे हसकेज स [व] से हि वितासयतो उतरापथराजानो,

या अकराव्या ओळींतील नवीन फरक जो "अवराज" याविषयीं उल्लेख करीत आहे त्याविषयीं जयस्वाल हे पुढें "हाथीगुंफानोटस" जे.बी.ओ. १९२८ मध्यें सांगत आहेत कीं तामील नाडूमध्यें अया नांवाची जात आहे, आणि आवमुक्त नांवाचें एक राज्य कांचीपुराच्या उत्तरेस होतें त्याविषयीं हा उल्लेख असावा (!!)

### ओळ पंधरावी.

......[ता] सु-कतं-समण सुविहितानं [नुं?] च सातदिसानं [नुं?] जातानं तपस-इसिनं संघायनं [नुं?] [;] अरहत-निसीदिया समीपे पभारे वराकर-समुथ पिताहि अनेक-योजना-हिताहि......सिलाहि सिंहपथ-राजिय धुसिय निसयानि.

......[ता] सु कृतं श्रमणेभ्यः सुविहितेभ्यः शास्त्र-दृग्भ्यः ज्ञातृभ्यः तपऋषिभ्यः संघायतनम् [।] अर्हन्निषीद्याः समीपे प्राग्भारे वराकरसमुत्थापिताभिरनेकयोजनाहृताभिः......शिलाभिः सिंहप्रस्थीयायै राज्ञै धृष्ट्यै निःश्रयाणि.

### ओळ सोळावी.

.......पटालिको † चतरे च वेडूरियगभे थंभे पतिठापयति [,] पानतरिया सतसहसेहि [।] 'मुरिय' कालं वोच्छिनं (ने?) च चोयठि-अंगसतिकं*तुरियं उपादायति [।] खेमराजास वढराजा सभिखुराजा धमराजा पसंतो सुनंतो अनुभवंतो कलाणानि.

........पाटालिकावचत्वरे च वैदूर्य्यगर्भान् स्तम्भान् प्रतिष्ठापयति [,] पञ्चसप्तत्या शतसहस्त्रैः [।] मुरियकालं व्यवच्छिन्नञ्च चतुःषष्ठ्यंगातिकान्तरीयमुपादापयति [।] क्षेमराजः स वर्द्धराजः स भिक्षुराजो धर्मराजः पश्यन् शृण्वन्ननुभवन् कल्याणानि [।]

### ओळ सतरावी.

......गुण-विसेस-कुसलो सव-पासंड-पूजको सव-देवायतन-संकारकारको [अ] पति-हत-चकिवाहिनिबलो चकधुर-गुतचको पवत-चको राजसिवस-कुल-विनिश्रितो महा-विजयो राजा 'खारवेल-सिरि.'

.......गुण-विशेष-कुशलः स[र्व]-पाषण्डपूजकः सर्व-देवायतन-संस्कारकारकः [अ] प्रतिहत-चक्रिवाहिनी-बलः चक्रधुर-गुप्तचक्रः प्रवृत्तचक्रो राजर्षि-वंश-कुल-विनिः सृतो महाविजयो राजा क्षारवेलश्रीः

## ४६३. खारवेलाच्या लेखाचें भाषांतर.

ओळ पहिली

४६३. अर्हतांना नमस्कार असो. सर्व सिद्धांना नमस्कार असो. ज्यावर प्रशस्त अशीं शुभ लक्षणें आहेत, जो चाऱ्ही दिशांकडे पसरलेल्या आपल्या राज्याचा जणूं काय आधारदाता स्थाणूच आहे, जो चैत्रराजाच्या वंशाची वृद्धि करणारा आहे अशा ह्या आर्य (ऐल) महाराज कलिंगाधिपति श्रीक्षारवेल महामेघवाहनानें.

ओळ दुसरी

पंधरा वर्षें सुंदर आणि गवताप्रमाणें कोंवळ्या अशा यानें कुमारक्रीडा केल्या; आणि नंतर लेखनशास्त्र, रूप (?),‡ गणनाशास्त्र, व्यवहारशास्त्र, विधिशास्त्र इत्यादि शास्त्रांत विशारद होऊन सर्व विद्यांनीं भूषित होत्साता नऊ वर्षें युवराजपद भोगिता झाला; आणि चोवीस वर्षें पूर्ण होतांच ज्यानें आपल्या वाढत्या तारुण्यांत वेनराजा सारखें जयसंपादन चालविलें होतें अशा त्यास

† घटालक्तो=घंटा लावलेलें.

* अंगसटिकम्=(चौसष्ट) अंगें सटीक. हा नवीन फरक या सर्व नवीन वाचनांत रा. जयस्वाल महत्त्वाचा समजतात.

‡ जयस्वाल नाण्याचें शास्त्र असा अर्थ करतात. डॉ. भगवानलाल वगैरे मंडळीनीं चित्रकला असा केला आहे.

ओ ळ ति स री

तिसऱ्या कलिंग राजवंशांतील एकपुरुषयुगपर्यंत महाराज्याभिषेक झाला.

हा अभिषेक झाल्याबरोबर पहिल्याच वर्षी झंझावातानें नाश पावलेले आपल्या गोपुराचे आणि राजवाड्याचे तट त्यानें दुरुस्त केले. आणि कलिंगनगरीमधील ताल आणि तडाग नादुरुस्त होते ते बांधले. सर्व उद्यानांचें पुनर्जीवन केलें.

ओ ळ च व थी

त्यानें पस्तीस लक्ष प्रजाजनांना आनंदित केलें.

दुसऱ्याच वर्षी शातकर्णीला न जुमानतां त्यानें पश्चिम दिशेकडे हय, गज, नर, रथ इत्यादी बरेंच सैन्य पाठविलें. आणि कृष्णवेण्णेकडे गेलेल्या सेनेनें * मूषिक नगरीचा नाश केला.

ओ ळ पां च वी

आणि पुनः तिसऱ्याच वर्षी गंधर्वविद्येमध्यें निष्णात झाल्यावर दम्प (?) नृत्य, गीत, वादन इत्यादींच्या उत्सवांनीं व जलशांनीं आपली नगरी क्रीडास्थानच बनविली.

त्यानंतर चवथ्या वर्षी विद्याधराचें वसतीस्थान जें पूर्वी नष्ट झालें नव्हतें आणि जें कलिंगराजांनीं अत्यंत पवित्र मानलें होतें असें तें.........

ओ ळ स हा वी

राजमुकुटांना निःमहत्त्व करून आणि त्यांच्या छत्रचामर आणि भृंगारांना खालीं पाडून आणि त्यांना नाश करून राष्ट्रिक आणि भोजकांपासून त्यांचीं रत्नें हरण केल्यावर त्यानें त्यांजकडून आपलें पादवंदन करविलें.

पांचव्या वर्षी नंदानें तीनशें वर्षांपूर्वी खणलेला कालवा तनसुलियवाटेपासून त्यानें राजधानींत आणला.

सहाव्या वर्षी राजसूयानें अभिषिक्त झाल्यावर—

ओ ळ सा त वी

सर्व दुःखितांना आपलें सहाय्य देऊन शतावधि, सहस्रावधि अशा पौरांवर आणि जानपदावर त्यानें अनेक अनुग्रह केले. * सातव्या वर्षी राज्य करीत असतांना † वज्रगृहीची घुसिता ही गृहिणी मातृकपदपूर्ण असून सुकुमार अशी......

आणि आठव्या वर्षी आपल्या मोठ्या सेनेनें जिचे मोठे तट आहेत अशा गोरथगिरीचा.......††

ओ ळ आ ठ वी

नाश करून राजगृहराजाला पीडा करता झाला कीं जो खारवेलाच्या आगमनाची वार्ता ऐकतांच आपलें सर्व सैन्य आणि सैन्यवाहिनी सोडून यवनराज दिमत...मथुरेला चालता झाला.

ओ ळ न व वी

आणि नवव्या वर्षी पल्लवांनीं गजबजलेले असे कल्पवृक्ष, हय, रथ, गज इत्यादि त्यांच्या सारथ्यासह आणि घरें आणि कपडे अणि अग्नीष्ठिकासह तो देता झाला आणि ब्राह्मणांना

* जयस्वालानीं प्रथम वाचन केलें तें J.B.O. च्या तिसऱ्या वर्षग्रंथांत दिलें आहे तें "कासमानं खाटियं च सहाये वितोपति मूसिका नगरम्" काश्यप क्षत्रियांच्या मदतीकरतां मूषिका नगरीच नाश करतो असें आहे.

* J. B. O. च्या तिसऱ्या वर्ष ग्रंथांत (१९१७ सालीं) जयस्वालाचें वाचन भिन्न म्हणजे "ज र घ र ख त घरिणी सवितु उपादपम् [न ? ]स..." असें होतें; आणि सातव्या वर्षी राज्य करून सावित्रीस गृहिणी करून घेतली असा अर्थ लावला होता.

† पौर आणि जानपद हीं शहराचीं आणि गांवाचीं अधिकारी मंडलें होतीं; त्यांना "अधिकार देऊन"(?) अनुगृहीत केलें असा अर्थ जयस्वाल करतात. त्यांच्या "पौर" ही शासन संज्ञा होती या कल्पनेस आक्षेप उत्पन्न झाले त्यांस A Seal of a Janapada ( Ind. Ant.1932) या लेखांत पुरिका नगरीचा शिक्का उपलब्ध झाला तो दाखवून उत्तर देतात.

† † 'गोरथगिरो' अशा अक्षरांचा एक शिलालेख सांपडला आहे त्यावरून "गोरथगिरि" बराबर टेकड्यांतच होता याविषयीं शंका रहात नाहीं हें सिद्ध करूं पहाणारा एक निबंध रा. व्ही. ए. जाकसन यांनीं लिहिला आहे. ( New Inscriptions from the Barabar Hills. J.B.O. 1915-) त्यांत त्यांनीं दाखविलें आहे कीं "तथागत येथेंच उभा राहून क्षणभर सर्व मगध देश लक्षित झाला" असें जें विधान आहे तेंहि याच डोंगराविषयीं आहे. महाभारताच्या सभापर्वांत गोरथगिरीचा उल्लेख आहे. कृष्ण, भीम आणि अर्जुन हे जरासंधापाशीं युद्ध करण्यासाठीं जेव्हां राजगृहाच्या म्हणजे गिरिव्रजाच्या पूर्वेस जात होते तेव्हां त्यांनीं गोरथगिरीवरूनच मगधपुरीचें अवलोकन केलें. ( गोरथगिरिमासाद्य दद्दशुर्मागधं पुरम् ) आज ज्या टेंकडीस बर्धन टेंकडी असें म्हणतात, तीच गोरथ असली पाहिजे असें बेगलर म्हणते झाले. (Arch. Survey. Reports Vol. viii., pp. 46-47) तें विधान जाकसनच्या लेखानें खोडलें गेलें आहे.

सर्व ग्रहण करावयास लावण्याकरतां पारितोषकें देतो. अर्हत....व....न....गिया (?)

ओ ळ द हा वी

त्यानें अडतीस शत हजार इतकीं नाणीं खर्च करून महाविजय नांवाचा ‡ राजवाडा बांधिला. दहाव्या वर्षी ज्याला समयोचित धैर्य होतें अशा त्यानें भारतवर्षापर्यंत पृथ्वी जिंकली § आणि उद्यातांचीं मणिरत्नें प्राप्त केली. †

ओ ळ अ क रा वी

[अकराव्या वर्षी]

जें सिंहासन वाईट राजांनीं स्थापिलें होतें तें मोठे गाढव लावून नांगरून टाकलें आणि जो केतुभद्र तेरा शतकाचा होता आणि ज्याचा उत्सव सर्व देशाला प्रिय केला, त्या अमर झालेल्या केतुभद्राची मिरवणूक त्यानें काढली. आणि बाराव्या वर्षी उत्तरापथाच्या राजांचा राग न मानून.

ओ ळ बा रा वी

आणि मगधाच्या राजांमध्यें भय उत्पन्न करून त्यानें त्याचे हत्ती गंगेंत* धाडले आणि मगधाचा राजा बृहस्पतिमित्र याला पदवंदन करावयास लाविलें. त्यानें कलिंगामधले नंदराजानें नेलेले जिनाचे देव्हारे हरण केलें, आणि अंगाची आणि मगधांची घर व रत्नें प्रतिहार म्हणून आणलीं.

ओ ळ ते रा वी

तो आपल्या प्रासादावर आंतून कोरलेलीं आणि शेकडों मूल्यवान् रत्नांनिशीं आणि लुटीनिशीं असलेलीं अशीं शिखरें स्थापित करता झाला, आणि अद्भुत आणि आश्चर्यकारक असे सर्व हत्ती आणि नांवा तो हरण करता झाला आणि पाण्ड्य राजांपासून घोडे, हत्ती, रत्न आणि माणिकें इत्यादि शेकडों मुक्तामणि रत्नें त्यानें हरण केलीं.

ओ ळ च व दा वी

त्यानें (कलिंग राजधानी) तीलां (लोकां)चीं मनें वश केलीं. तेराव्या वर्षी यपाजपांनीं शरीर दुर्बल केल्यावर अर्हतांच्या प्रदेशांत कुमारी पर्वतावर बांधलेले, त्यांच्या उपासकांनीं अर्पण केलेले आणि राजानें रक्षण केलेले नव्वशें बैल निषिदियाची भक्ति करणाऱ्या ह्या श्रीमान् क्षारवेलानें जीवदेवकालापासून पूजन करून उपासना करून रक्षण केलें.

ओ ळ पं ध रा वी

सर्व सुकृत श्रमणांच्याकरतां सुविहित असलेले शास्त्रदृष्टीचे ज्ञाते आणि तपऋषि अशांकरतां संघायतन निर्माण केलें. अर्हत् निषिदियजवळील टेंकडीवर सिंहप्रस्थाची राणी धृष्टि तिच्यासाठीं उत्तम प्रकारच्या खाणींतून काढलेल्या आणि अनेक योजनें वाहून आणलेल्या शिलांनीं राज्याच्या धारणेकरतां तो आश्रयस्थान बांधता झाला.

ओळ सो ळा वी

आणि चार पाटलिकांच्या वर वैदूर्यगर्भ असें स्तंभ उभारता झाला. ७५ शतसहस्रांनीं...... ...

आणि मुरीय काल उलटल्यावर तो सटीक ६४ अंगें करविता झाला.

हा क्षेमराजा, वर्धराजा, भिक्षुराजा, धर्मराजा पाहून ऐकून आणि कल्याणांना अनुभवून....

ओळ स त रा वी

विशेष गुणामध्यें पारंगत होत्साता सर्व पंथांना मान देणारा, सर्व देवायतानांना सुशोभित करणारा, ज्याचें रथचक्र अप्रतिहत आहे असा, आपल्या प्रवृत्तचक्र (वाढलेल्या) राज्याचा पुढारी (चक्रधुरु) आणि राज्याचें संरक्षण करणारा (गुप्तचक्र) जो राजर्षिवंशकुलामधून उत्पन्न झाला आहे असा महाविजय श्रीखारवेल (होय.)

### ४६४. खारवेलाच्या लेखासंबंधानें विचार.

४६४. खारवेलाचा हा लेख भारतीय इतिहासांतील अत्यंत महत्त्वाच्या लेखांपैकीं समजला जातो. जैन संप्रदायाच्या इतिहासांत याला महत्त्व आहे. शातकर्णीच्या इतिहासांत हा महत्त्वाचा आहे. नंदकालीन वृत्तें आपणांस फारच थोडीं माहीत आहेत. नंदकालीन गोष्टींच्या उत्तरकालीन आठवणी गोळा करतांना खारवेलाचा पुरावा अत्यंत महत्त्वाचा समजला जातो.

### ४६५. खारवेल आणि जैनसंप्रदाय.

४६५. खारवेलाचें नांव जैनांच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचें धरलें जातें. जिनपूजा नंदकालीं होती, आणि

‡ "उभय प्राची तटे" म्हणजे 'प्राचीच्या दोन्ही कांठावर असा अर्थ असलेले शब्द प्रथम रा. जयस्वाल यांनीं वाचले पण पुढें नवीन आवृत्तींत तसा अर्थ करणें सोडून दिलें.

§ पहिलें वाचन व अर्थ करणें भिन्न आहे. (Vol. III 1917.) दंडश नदश 'He causes departure of the army. असा अर्थ केला आहे.

† (पुनश्च मनोरधानि उपलभता असें प्रथम वाचन जयस्वालांनीं केलें होतें.

* किंवा सुगांग प्रासादाकडे

जिन देवता नंदकालीं हरण केल्या असा येथें उल्लेख आहे. तथापि यांतील जैन उल्लेखांत तीर्थंकर नाहीं आणि जैनांच्या देव्हाऱ्यांत तीर्थंकरांचा प्रवेश झाला होता असा पुरावा नाहीं. तर यावेळीं कुबेर, मणिभद्र उत्यादि देवांची पूजा करणारा एक संप्रदाय असावा असें अधिक शक्य दिसतें.

या लेखांत महावीराचा उल्लेख कोठेंच नाहीं ही गोष्ट दुर्लक्षितां येणार नाहीं. जैन संघ हा आचार्यांना महत्त्व देणारा संप्रदाय त्या वेळेस नसावा. तर विशिष्ट देवतांचा उपासक असाच संघ असावा. जैन संप्रदायासाठीं जी काय कामगिरी खारवेलानें केली ती या लेखांत सांगितलीच आहे. तथापि त्या लेखाच्या अर्थीकरणासंबंधानें मतभेद आहे.

स्टेन कोनोचें (Acta. Or. I, 1922 p. 20 ff. येथें व्यक्त झालेलें ) मत प्रो. विंटरनिझ्झ यानीं उल्लेखिलें आहे. ( Winternitz Vol. ii p. 421 ) आणि त्याविषयीं प्रो. विंटरनिझ्झ म्हणतात कीं जर खारवेलाच्या हाथीगुंफालेखाचा कोनोनीं लावलेला अर्थ ग्राह्य धरला तर पाटलीपुत्र येथें झालेल्या समीतीविषयीं दिठ्ठिवाय ऊर्फ दृष्टिवाद या ग्रंथाविषयीं जैन परंपरागत दंतकथेस खारवेलाचा लेख साक्षीभूत होईल. आणि चौसष्ट अंगांचें कर्तृत्त्व खुद्द खारवेलाकडे जाईल।

प्रस्तुत कल्पनेविषयीं कोनोचें स्पष्टीकरण हुशारीचें आहे पण ग्राह्यतेच्या दृष्टोनें अत्यंत संशयास्पद आहे असा शेरा प्रो. विंटरनिझ्झ मारतात तथापि जयस्वाल तिकडेच झुकत आहेत. *

जेव्हां मुख्य उपदेशकास देवत्व देऊन त्याचे गौरव करण्याचा प्रघात वाढला असेल तेव्हां जैन तीर्थंकरांच्या कथा उत्पन्न होऊं लागल्या व त्या होतां होईतों बौद्ध कथांशीं सादृश्य ठेऊन निर्माण करण्यांत आल्या असाव्यात, अशा तऱ्हेचा विचार खारवेलाचा जैन धर्म पाहून उत्पन्न होतो.

खारवेलानें शातकर्णीचा पराभव केला त्याप्रमाणें मगध राजाचा पराभव केला ही गोष्ट विदर्भावर शुंगांनीं सत्ता स्थापिली या कल्पनेस आक्षेप घेणारी आहे.

ज य स्वा लां चें भा ष्य

खारावेलाच्या हाथिगुंफा लेखावर भाष्य करतांना शातकर्णीविषयीं जो मजकूर रा. जयस्वाल लिहितात त्यांतील भावार्थ लक्षांत घेण्याजोगा आहे, त्यांतील कांहीं मुद्दे येथें विवेचनासाठीं घेतों. ( J. B. O. Vol. iil. h. 411 )

* कोनोनीं दिलेले पुरावे विंटरनिझ्झ यांनीं अवतरित केले नाहींत. आणि कोनोचा मूळ लेख प्रस्तुत लेखकानें पाहिला नाहीं.

खारवेल आपल्या राज्याच्या दुसऱ्या वर्षी शातकर्णीवर * चाल करून गेला.

हा शातकर्णी तिसरा राजा समजतात आणि हा राजा नानाघाटाच्या लेखांत उल्लेखिलेला आणि ज्याची मूर्ती नानाघाटांत आहे तोच असावा असें त्यांचें मत आहे. शातकर्णी दोन होऊन गेले व दुसरा शातकर्णी पहिल्यानंतर ४६ वर्षांनीं आला. त्याअर्थी ही शातकर्णीवरील स्वारी पहिल्या शातकर्णीवरच असावी असें जयस्वाल समजतात.

गर्गसंहितेंत युगपुराण नांवाचा अध्याय आहे. त्यांत यवनाची साकेत, पांचाल, मथुरा आणि कुसुमध्वज यांवर स्वारी वर्णिली आहे त्यांत "धर्ममीततम वृद्धांचा" उल्लेख आहे तो डिमिट्रिअसविषयीं आहे असें जयस्वाल सांगत आहेत.†

### ४६६. महाराष्ट्रास खारवेलाचा उपद्रव पोंचला होता असें जयस्वालांचें मत.

४६६. या लेखांत मूषिक नांवाच्या राज्याचा व त्यांच्या राजधानीचा उल्लेख आलेला आहे, त्याविषयीं विचार करतांना ते शातकर्णीचे अंकित लोक असावेत असें रा. जयस्वाल समजतात तें बरोबर आहे. तथापि या मूषिकांचा देश खारवेलानें घेतला असा भावार्थ रा. जयस्वाल जो काढतात त्यास आधार नाहीं. त्यास आधार ते कोणता सांगतात तर नाट्यशास्त्रामध्यें तोसल, कोसल आणि मोसल हे तीन देश मिळून कलिंगदेश होतो असें सांगितलें आहे; तर मोसल तेच मूषिक अशी कल्पना करून मूषिक आपल्या कबजाखालीं आणला होता अशी खारवेलचे म्हणजे ओरिसाच्या राजाला जगज्जेता बनवूं पहाणारे रा. जयस्वाल समजूत करून घेतात. अर्थात् ती केवळ कल्पनेची भरारी आहे असेंच आम्हास वाटतें. मूषिक देश कोठें असावा या संबंधीं हा देश पैठण आणि गोंडवन यांमध्यें असावा अशी मांडणी विष्णुपुराणाच्या आधारावर त्यांनीं केलेली आहे. विष्णुपुराणाच्या चवथ्या खंडांत विंध्यवासी देशांच्या वर्णनानंतर स्त्रीराज्य आणि मूषिक देश यांचा उल्लेख केलेला आहे. आणि कामसूत्रामध्यें स्त्रीराज्य हें विंध्याच्या पश्चिमक्षेत्रांत होतें असें सांगितलें आहे. त्यावरून त्यांनीं हा

* या शातकर्णीविषयीं लिहितांना ते ब्राह्मण असून त्यांनीं आपली गादी पैठणला स्थापिली. या आपल्या समजुतीचा उल्लेख त्यांनीं केला आहे. त्या जयस्वाली विधानाचा विचार अन्यत्र यथाप्रसंग केला जाईलच.

† ( Demetrios Kharavela and the Garga samhita, by Jayaswal J. B. O. 1920. )

निर्णय काढला आहे. मूषिक देश महाराष्ट्रांतच समाविष्ट होत असेल हें शक्य आहे व खारवेलाच्या वाढत्या शक्तीचा परिणाम महाराष्ट्रापर्यंत पोहोंचला असेल हेंहीं शक्य आहे. मूषक महाराष्ट्रांत असो कीं नसो राष्ट्रिक आणि भोजक यांच्याविषयीं जो उल्लेख खारवेलाच्या लिखाणांत आहे त्यावरून या कलिंग राजाची सत्ता जरी नाहीं तरी पीडा महाराष्ट्राच्या मध्यभागापर्यंत भोंवली होती असें दिसतें. त्यांचें छत्र आणि भृंगरस हीं आपण मोडून टाकलीं असा उल्लेख खारवेलानें आपल्या चवथ्या ओळींत केला आहे.

## ४६७. मौर्यशककल्पनेचा त्याग आणि जैनधर्मेतिहासास नवें स्वरूप.

४६७. सोळाव्या ओळीचा अर्थ जयस्वालांनीं आपल्या तिसऱ्या वाचनांत अगदीं बदलून टाकला आहे. मुरीयकालानंतर अमुक वर्षांनीं असा जो अर्थ ते समजत होते तो त्यांनीं सोडून देऊन मुरीयकाल म्हणजे मौर्यशक नव्हताच असें धरलें आहे आणि चौसष्ट असा अर्थ देणारे शब्द जैनांच्या चौसष्ट अंगांना लाविले आहेत त्यामुळें जैन इतिहासांत अनेक प्रश्न उत्पन्न होतील. पहिल्या त्यांच्या वाचनाचा अर्थ मुरीयकालांचीं १६४ वर्षें उलटल्यानंतर हा सहा खांबांची गुहा करविता झाला असा होता. एका कालीं मुरीयकाल हा मौर्यशक आहे असें आग्रहानें मांडणारांमध्यें जयस्वाल होते. खारवेलाच्या लेखामध्यें मुरीय कालाचा जो उल्लेख केला आहे तो मौर्यांचा शक आहे या कल्पनेस रामप्रसादचंदा हे आक्षेप घेतात तथापि व्हिन्सेंट स्मिथ हे तें म्हणणें मान्य करतात अशी एका कालीं स्थिति होती. पुढें कोनोंच्या लेखामुळेंच जयस्वालांची बुद्धि पालटली असें दिसतें. *

जयस्वालांचा नवीन अर्थ स्वीकाण्यास पुष्कळ अडचणी आहेत. त्या अडचणींपैकीं एक अडचण म्हटली म्हणजे ज्या कालांत महावीराचें नांव देखील लेखांवरून सिद्ध होत नाहीं, त्या कालांत चौसष्ट अंगांचा उल्लेख अंकित लेखांत आहे असें मत स्वीकारण्यास मनुष्याचा विश्वास टाकण्याच्या वृत्तीला बराच ताण दिल्यासारखें होईल.

महावीराचा ‡ अत्यंत प्राचीन कालीन निश्चित उल्लेख म्हटला म्हणजे अजमीर जिल्ह्यांतील बार्ली येथें सांपडलेला शिलालेख होय. शालिमालिनी नांवाच्या एका मध्यमिका येथील स्त्रीनें महावीराच्या नांवानें दान केलें असें विधान असावें. पण त्या संबंधानें देखील आज खात्री देतां येत नाहीं. जैनसंप्रदायाच्या अत्यंत प्राचीन काळाचे धागे उलगडल्या खेरीज महाराष्ट्रांतील जिनधर्माचा खरा इतिहास समजणार नाहीं.

## ४६८. खारवेलाच्या लेखाचें महाराष्ट्रास महत्त्व.

४६८. खारवेलाच्या लेखावरून एकंदर राजकीय स्थितीच्या स्पष्टीकरणास मदत होते. शेवटच्या मौर्य राजाच्या अंतानंतर सेनापति पुष्यमित्र यानें राज्य घेतलें तथापि त्यावेळेस एकंदर स्पर्ध्यमान शक्त्या कोणत्या होत्या हें पुराणावरून कळत नाहीं. तें कळण्यास खारवेलाच्या लेखाची मदत होते. खारवेलानें कोणत्या मागध राजाचा पराभव केला यासंबंधानें थोडासा मतभेद होण्यास जागा राहिली आहे तशीच कोणत्या शातकर्णीचा पराभव केला यासंबंधानेंहि मतभेद आहे. आपणांस जयस्वालांच्या कालनिश्चयाविषयीं शंका येत आहे; लेखकालविषयक जें गमक मुरीयकालाचें तें जयस्वाल सोडून देत आहेत. हाथीगुंफेच्या लेखांतील लिपी नानाघाटांतील लेखापेक्षां बरीच उत्तरकालीन आहे असें इतरांचें मत आहे.

## ४६९. जयस्वालांच्या शेवटच्या वाचनाची विश्वासार्हता.

४६९. खारवेलानें यवन राजाचा पराभव केला हें सिद्ध करूं पहाणारें जयस्वालाचें वाचन अलीकडचें आहे आणि तें वाचन त्यांना दुसरा जो पुरावा मिळाला त्यानंतर उत्पन्न झालेलें आहे.

जयस्वालांच्या शिलालेखाच्या वाचनांत कल्पनेचा जोर बराच आहे अशी शंका येत असल्यामुळें त्यांचे निरनिराळ्या कालीं झालेल्या अर्थावर विश्वास बसत नाहीं. त्याचें खारवेल लेखांचें वाचन दुसऱ्या कोणी काळजीपूर्वक तपासलें पाहिजे असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. आम्ही स्वतः वाचन बरोबर आहे काय हें तपासून पाहिलें नाहीं.

खारवेलाचा लेख शुंगकालीन आहे असें धरलें तर शातकर्णींच्या विजयासंबंधानें पुढील विधानें करतां येतील. नानाघाटांतील लेखाच्या कालांतच शातकर्णीची सत्ता उत्तरेस गेली होती आणि त्यानें मगध ताब्यांत घेण्याची वेळ आणली होती. तथापि त्यावेळेस खारवेल ही एक पराक्रमी व्यक्ति कलिंगांत उत्पन्न झाल्यामुळें शातकर्णींच्या

*Kharvela. JRAS. 1919. p. 397-399. and Vincent Smith New light on Ancient India JRAS. 1918 p. 543. पहा ]

‡ An important Brahmi Inscription J. B. O. 1930 p. 68.

महत्त्वाकांक्षेची पूर्ती थोडा वेळ दुरावली एवढेंच. शातवाहन शातकर्णी हे खारवेलाच्या कालीं अत्यंत बलाढ्य झाले होते याला मात्र पुरावा हा लेख देत आहे आणि ज्यावरून शातकर्णी आंध्र समजले गेले तो काल खारवेलकालीन शातकर्णींच्या वेळेस आला होता हें स्पष्ट आहे.

### ४६०. खारवेल आणि शातकर्णी यांच्या संग्रामाचा काल कोणता हें ठरविण्याच्या अडचणी.

४७०. खारवेल शातकर्णी संग्रामकाल हा ठरविणें ही भारतीय इतिहासाच्या अवगमनास फार उपयोगाची गोष्ट आहे तरी तो काल निश्चित करणें सोपें नाहीं. लेखामध्यें कालदर्शक गमकें नाहींत असें नाहीं. तीं विविध आहेत. जी अडचण आहे ती त्यांची संगति लावण्याचीच आहे. त्यांत उल्लेखिलेल्या बृहस्पतीचा पत्ता लागत नाहीं. "दिमित', हें वाचन जयस्वालांना नवीनच सुचलें आहे. आणि तें गर्गसंहितेंत दिमिताचा उल्लेख मिळाल्यानंतर सुचलें आहे. मुरीय काळाचा उल्लेख काल ठरविण्यास गमक म्हणून एक वेळ त्यांना वाटला होता पण त्यांनीं त्या उल्लेखांचें अस्तित्त्वच नाकारलें आहे. मुरीय काळाचा उल्लेख काढून टाकून तेथें जैन ग्रंथांच्या अंगांचा उल्लेख आहे, असें जें स्टेनकोनो आणि जयस्वाल या द्वयानें मांडलें आहे तें मुळींच स्वीकारतां येत नाहीं. कारण अंगरचना करण्याइतकी जैन संप्रदायाची प्रगति इतक्या जुन्या काळांत झालेली दिसत नाहीं. अशा स्थितींत मुरीय काल आणि नंदोल्लेख यांची परस्पर संगति जुळते काय हें पाहूं. आणि त्या दोहोंच्या साहाय्यानें आपणांस कालनिश्चय कितपत करतां येईल तो पाहूं.

जर नंदांनीं बांधलेला कालवा खारवेलानें त्रिशत ( १०३ वर्षांनीं किंवा तीनशें ) वर्षांनीं दुरुस्त केला असें एक जें विधान खारवेल लेखांत आहे, त्यावरून शातकर्णीखारवेल-संग्रामकाल कितपत काढतां येईल तें पाहूं. कालवा करणारा नंद कोणता हा प्रश्न प्रथम उत्पन्न होईल. दुसरें गमक मुरीयकाळाचें. मुरीय काळानंतर १६५ वर्षांनीं केव्हांतरी हाथीगुंफा लेख तयार झाला असें धरलें तर काळ ३२५—१६५ म्हणजे ख्रि. पू. १७० मध्यें हा लेख कोरविला गेला असें सिद्ध होईल. या दोन्ही विधानांची संगति कितपत जुळते हें पाहण्यासाठीं नंदकालोल्लेख अधिक स्पष्टपणें समजून घेतला पाहिजे.

प्रथम मुरीय काल दुर्लक्षून नंदकालविषयक विधानांचेंच स्पष्टीकरण करूं. नंदकाळ अर्थात् ३२५च्या पूर्वी केव्हांतरी असला पाहिजे; नंदांच्या राज्याभिषेकाचा काल निश्चित नाहीं. पुराणांतील मजकूर असंबद्ध दिसतो. नंदाचें राज्य एकंदर शंभर वर्षें. त्यांपैकीं आठ पुत्रांचें राज्य १२ वर्षें आणि एका व्यक्तीचें महापद्मनंदीचें राज्य ८८ वर्षें. म्हणजे तो अठ्यायशीं वर्षें जगला असा अर्थ जरी शब्दांपासून निघतो ( पृष्ठ ९४ पहा, तरी संदर्भ लक्षांत घेतां त्यानें ८८ वर्षें राज्य केलें असाच अर्थ तद्विषयक श्लोकार्धा ( अष्टाशीति तु वर्षाणि पृथिव्यांश्च भविष्यति ) चा काढावा लागतो. म्हणजे राजा १०८ किंवा ११० वर्षें जगला असें धरलें पाहिजे. आपणांस नंदराज्य शंभरवर्षें होतें; या नंदराज्यकालासंबंधानें पौराणिक विधानावर विश्वास टाकून चालण्याखेरीज आज गत्यंतर नाहीं. त्या विधानाचें निराळ्या तऱ्हेनें समर्थन होऊं शकेल. नंदराज्याभिषेकगणनेच्या वर्षाचें गणित केलें तर महापद्मनंदीचा राज्याभिषेककाल किंबहुना राज्यप्राप्तिकाल ख्रिस्त पूर्व ४२५ च्या सुमारास येईल. नंदांनीं कालवा आपल्या राज्याच्या कोणत्या वर्षी दुरुस्त केला, पहिल्या नंदानें केला कीं पुढच्या एका नंदानें केला याविषयीं आपणांस गमक नसल्यामुळें नंदकालापासून गणना केल्यास नंदाचा शेवट ख्रिस्त पूर्व ३२२ च्या सुमारास असल्यामुळें त्यानंतर केव्हांतरी असाच खारवेलाचा काळ काढावा लागेल. 'त्रिशत' शब्दाचा अर्थ एकशेंतीनच्या ऐवजीं तीनशें केला तर कालवा दुरुस्त करण्याचा काल ख्रि. पू. ३२५ पासून ख्रिस्तपूर्व २५ पर्यंत जाईल. एवंच या लेखाचा काल केवळ नंदोल्लेखावरून ख्रि. पू. ३२२ पासून ख्रि. पू. २५ पर्यंत केव्हांतरी हा लेख तयार झाला असें स्थूलपणानें मानावें लागेल म्हणजे तीन शतकांत केव्हांतरी या दोन राजांचें युद्ध झालें एवढेंच सांगतां येईल आणि या लेखाचा शातकर्णीखारवेल-संग्रामाच्या स्पष्टीकरणास उपयोग मुळींच होणार नाहीं.

मुरीयकालविषयक जयस्वालांचें जुनें वाचन आज गृहीत धरलें तर मात्र हाथीगुंफा अंकित लेखाचा काल मागें दिला त्याप्रमाणें ख्रिस्त पूर्व १७०—१ येतो. या अनुमानाशीं नंदकालव्याच्या दुरुस्तीचें विधान जुळवून घेतां येईल किंवा नाहीं हें पहातां जुळवून घेण्यास कोणतीच अडचण नाहीं असें म्हणावें लागेल. या काळांत १०३ मिळवून आपण नंदकालापर्यंत पोहोंचूं शकत नाहीं. मुरीयकालाचींच वर्षें जर १६५ झालीं आहेत तर नंदकालाचीं १०३ वर्षेंच कशीं होतील ? अर्थात अधिक संख्यावाचक अर्थ घेतला पाहिजे.

तीनशें वर्षें असा जर अर्थ केला तर मौर्यकालापूर्वी १३५ वर्षें हा कालवा तयार झाला असें गणित होईल. म्हणजे नवनंदाचें राज्य १०० वर्षेंच झालें असल्यामुळें ३५ वर्षें अगोदर या कालव्याची निर्मिति झाली असें गणित होईल.

तथापि तेवढ्यावरून नंदांनीं कालवा बांधला हें विधान चूक होणार नाहीं. हेंहि शक्य आहे कीं शैशुनाग घराण्यांतील शेवटचा राजा महानंदी यानें तो कालवा दुरुस्त केला असावा आणि त्याचा नंद या नांवानेंच ज्ञात असावा आणि त्यामुळें नंदांच्या कालाचा उल्लेख आला असावा; एवंच खारवेल लेख-काल ख्रि. पू. १७० सालीं धरण्यास अडचण दिसत नाहीं. शिशुनागांच्या राज्यकालासंबंधानें जयस्वालाचें विधान मागें आम्ही स्वीकारलेल्या विधानाहून (पृ. ९३ पहा.) जरी भिन्न असलें तरी तें या कल्पनेस मारक होत नाहीं. शेवटच्या शैशुनाग राजास महानंद हें नांव होतें असें ते धरीतच आहेत आणि त्यांनीं राजांची संख्या दहा ही नाकारली आहे. शिशुनागराजे १२ झाले, दहा नाहींत, त्यांचा संयुक्त राज्यकाल ३६२ आहे ३६० नव्हे, असें सांगून प्रत्येक राजाचा काल पुढीलप्रमाणें देतात.

| | |
|---|---|
| शिशुनाग | ४० |
| काकवर्ण | २५ |
| क्षेमधर्मा | २० |
| क्षेमवित् | ४० |
| बिंबिसार | ५१ |
| अजातशत्रु | ३५ |
| दर्शक | ३५ |
| उदायी | ३३ |
| नंदिवर्धन | ४० |
| महानंद | ४३ |
| | ३६३ † |

[येणेंप्रमाणें हिशोबाकरतां जरी ३६३ वर्षे येतात तरी मधलें अपूर्ण वर्ष पूर्ण धरीत गेल्यामुळें एखादें वर्ष वाढलें तर त्यामुळें असंबद्धता येत नाहीं. असें ते सांगत आहेत.]

आम्ही दिलेलें स्पष्टीकरण स्वीकारलें म्हणजे सर्व गोष्टींची संगति लागते. तें स्पष्टीकरण थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे.

(१) कालवा खणला गेला तो महानंदाच्या कालांत म्हणजे सुमारें ४७० सालीं खणला गेला असला पाहिजे आणि त्याच्यानंतर तीनशें वर्षांनीं खारवेलशातकर्णी संग्राम झाला असला पाहिजे.

---

† Jayaswal-The Śaisunak and Maurya Chronology J.B.O. 1915 Sept. p.67.

प्रकरण ५१ वें

# भारतीय सांस्कृतिक घटना–त्या घटनेंतील प्राकृतांचें अंग–अभ्यासाची दिशा.

## ४७१. महाराष्ट्रीयांचें गृहमंडनशास्त्र, स्वतंत्र सांगण्याजोगें आहे.

४७१. सांस्कृतिक इतिहासाचें क्षेत्र अत्यंत व्यापक आहे. या प्रकरणांत जो विषय विवेचिला जात आहे त्याचीं कांहीं अंगें मागें ३४ व ३९ या प्रकरणांत विवेचिलीं आहेतच. येथें थोडासा तात्त्विक विचार प्रगट करावयाचा आहे. प्रत्येक संस्कृतीमध्यें लालित्याचीं आणि गांभीर्याचीं अंगें असतात. समाजांतील संरक्षणपद्धति, न्यायपद्धति, तत्त्वज्ञान, शास्त्रीयज्ञान हीं त्या समाजाच्या संस्कृतीचीं गंभीर अंगें असलीं तर कविता, संगीत, पाकशास्त्र हीं ललित अंगें असतात. महाराष्ट्रांतील संस्कृतींत कांहींतरी वैशिष्ट्य प्राचीन कालापासून आहे. कारण यजुर्वेदांत जीं धान्यें उल्लेखित केली आहेत तीं ऋग्वेदांत नाहींत. धान्यांची विविधता ज्या समाजांत अधिक होती अशा समाजांत यजूंचे याग निघाले हें स्पष्ट आहे. इतिहासाचें गंभीर अंग आहे त्याचा कांहीं भाग मागें दिला गेला आहे. तर ललितांगाकडे आणि ललितांग ज्या गृहमंडनाच्या सान्निध्यांत वृद्धिंगत झालें त्या गृहमंडनाकडे देखील थोडेंसें लक्ष दिलें पाहिजे.

गृहमंडनशास्त्रीय इतिहासास सांस्कृतिक इतिहासांत स्थान महत्त्वाचें आहे. सर्व भौतिक संस्कृतीचा उपयोग उपभोग वाढविण्याकडेच होत असतो.

महाराष्ट्राचा बराच इतिहास वेदकाळापासून ज्ञात आहे. वैदिक संस्कृतीच्या घटनेस महाराष्ट्रीय संस्कृतीचा अंश कारणीभूत झाला आहे इत्यादि गोष्टी वैदिक धर्माचा इतिहास देतांना स्वतंत्रपणें मांडलेल्या आढळतील. जें साहित्य धार्मिक इतिहासासाठीं वापरतों तें साहित्य गृहमंडनशास्त्रीय सिद्धांत देखील काढण्यासहि वापरलें जाणार आहे. तर प्रस्तुत प्रसंगीं तें वापरणें युक्त होणार नाहीं. आपणांस आपलें लक्ष विशेषें करून आद्य शातवाहनीय कालाकडे देणें अधिक युक्त होईल.

## ४७२. गृहमंडनाच्या इतिहासास साधनांचें वैपुल्य.

आपल्या गृहमंडनीय संस्कृतीचा इतिहास बराच महत्त्वाचा आहे आणि तो सविस्तर लिहिल्याखेरीज आपल्या आजच्या आयुष्याचें स्पष्टीकरण होणार नाहीं. हा इतिहास लिहिण्यास साधनें नाहींत असें नाहीं. निरनिराळ्या कालाच्या ग्रंथांत निरनिराळीं भोज्यें उल्लेखित आहेत, आणि पूर्वकालीन अनेक भोज्यांच्या आणि पेयांच्या कृती देखील अस्तित्वांत आहेत. राजवाडे जरी पडले असले तरी राजवाडे कसे असावेत याविषयीचीं वर्णनें आहेत आणि अनेक काळच्या राजवाड्यांचा भूमिगत भाग अजून सांपडतो. सिंधमधील मोहेंजेदारो व पंजाबमधील हराप्पा या दोन स्थळीं अत्यंत प्राचीन काळच्या म्हणजे सुमारें ३०००–४००० वर्षांपूर्वींच्या गृह्यवस्तू भूमिसंरक्षित होत्या त्या आतां संशोधकाच्या कुदळीनें सर्व जनांस अवलोकनविषय झाल्या आहेत. अनेक शिलागुंफांत घरांतील लाकडी सामान, कडिपाट इत्यादिकांच्या प्रास्तरप्रतिमा आहेत त्यांनीं तत्कालीन गृह्यशिल्पांचा इतिहास संरक्षून ठेविला आहे. स्त्रीपुरुषांचे अलंकार, केशबंधनपद्धति आणि वस्त्राच्छादनपद्धति या सर्वांच्या कल्पना आपणास चित्ररूपानें अजून लभ्य आहेत. इतक्या प्रकारच्या विविध गोष्टी असतां प्राचीनांच्या गृहमंडनशास्त्रांचा आणि त्यांत दिसून येणाऱ्या वासलालित्याचा इतिहास शोधण्यासंबंधानें निराशा कां बाळगावी ? शब्दांच्या यौगिक अर्थापासून रूढ अर्थ जेव्हां भिन्न होतात तेव्हां ती अर्थभिन्नता इतिहासदायी होऊं लागते आणि ती अर्थभिन्नता राजकीय इतिहास देण्यापेक्षां सामाजिक इतिहासच पुष्कळ देईल. उदा० कलावतीण, बाजारवसवी हे शब्द उघड उघड इतिहाससूचक आहेत. कलावतींचा वर्ग जनसमाजापासून निराळाच होता आणि त्याचा व्यवसाय वेश्याव्यवसायाशीं संबद्ध आज अनेक शतकें झाला होता या गोष्टींची साक्ष 'कलावंतीण' शब्दाचा आजचा अर्थ देत नाहीं काय ? तसेंच आपल्याकडे जशा मुरळ्या होत्या त्याप्रमाणेंच कर्नाटकांत बसवी ( बसवास वाहिलेल्या स्त्रिया ) होत्या आणि त्या महाराष्ट्रांत येऊन वेश्येचा धंदा करूं लागल्या इत्यादि गोष्टींची आठवण बाजारबसवी वगैरे शब्दच देत नाहींत काय ? ' अंडगुलं मडगुलं सोन्याचें कडगुलं ' या सारखीं मूळचीं कानडी गाणीं महाराष्ट्रीयांचीं बालगीतें व्हावींत यांत देखील गृह्य इतिहास भरला आहे. ' वखट, लेंड, मुंड, नाल, हे विटीदांडूच्या खेळांतील एक, दोन, तीन, चार या अर्थाचे तेलुगू शब्द सामाजिक इतिहासाचे दर्शक आहेत. हीं स्मारकें किती जुन्या कालाचीं आहेत हें सांगतां येत नाहीं.

प्राकृत वाङ्मयांत सासू याला शब्द 'अत्ता' म्हणजे 'आते' वापरला असतो. या प्रकारें शब्दांच्या अर्थांतराचा इतिहास ज्याप्रमाणें सामाजिक इतिहास व्यक्त करील त्याप्रमाणेंच त्या सामाजिक इतिहासाचें एक अंग जें गृहमंडनशास्त्र त्याचा इतिहास देखील व्यक्त करील. तर प्राचीन गृहमंडनाचा व इतर लालित्याचा इतिहास लिहिण्यास आपल्यापाशीं वस्तूंच्या अवशेषांचें त्याप्रमाणें प्रतिमांच्या अवशेषांचे, चित्रांचे, शब्दांच्या आलेल्या अर्थांतरांचें असें अनेक प्रकारचें साहित्य उपलब्ध आहे. अवशिष्ट लोकगीतांचें महत्त्व इतिहासाला आहे पण त्यांतील शब्दांच्या स्वरूपावरून त्यांत उल्लेखिलेल्या क्रियांचा काल काढतां येणार नाहीं. उदाहरणार्थ "आंबा पिकतो रस गळतो, कोंकणचा राजा बाई झिम्मा खेळतो." या लोकगीतांतील मराठी भाषा आजच्या स्वरूपांत आहे पण ज्या काळाच्या गोष्टींचीं तीं गीतें स्मारक आहेत, तो काल फारच जुना आहे.

## ४७३. दक्षिणेंतील प्राचीन संस्कृतीच्या प्रगल्भतेविषयीं उत्तरेकडील ग्रंथकारांच्या वृत्तीचा पुरावा.

४७३. प्राचीन काळचें बरेंचसें वाङ्मय उत्तरेकडील लोकांनीं लिहिलें असल्यामुळें त्यांची दक्षिणेतील संस्कृतीविषयीं वृत्ति संरक्षित झाली आहे व त्या दृष्टीनें तें लिहिणें इतिहासदायक आहे.

दाक्षिणात्याची संस्कृति औदिच्यास कशी भासली याचा विचार केला असतां प्राचीन दाक्षिणात्य संस्कृतीविषयीं अनेक गोष्टी स्पष्ट होतील. दाक्षिणात्य लोक त्यास गृह्य आणि भोग्य वस्तूविषयीं असंस्कृत वाटले नाहींत. ज्या कवींनीं रामायणामध्यें प्राचीन परंपरा जतन करून ठेविली त्या कवींना दाक्षिणात्यांविषयीं जी माहिती मिळाली ती अशी असावी कीं, यांच्यामध्यें भौतिक संस्कृति उत्तम तऱ्हेनें विकासली आहे. सोनें विपुल आहे. रत्नें विपुल आहेत, यांच्यामध्यें यज्ञविद्या व वेदविद्या नाहीं असें नाहीं, तथापि याच्यामध्यें आध्यात्मिक भावना नाहींत वगैरे वगैरे. त्यांचे देव अघोर, त्यांचे देवयजनाचे उपाय अघोर आणि त्यांच्यामध्यें गर्व, नरमांसभक्षण, आणि दुष्टता हीं मात्र आहेत. म्हणजे औदीच्य कवींना दक्षिणात्यांच्या आध्यात्मिक भावनांच्या अभावाशिवाय दुसरें त्यांच्या विरुद्ध असें कांहीं लिहितां आलें नाहीं. औदीच्यांस दाक्षिणात्य भीषण स्वरूपाचे दिसले असेंहि म्हणतां येणार नाहीं. कारण पुरुषांना वाईट म्हणावयाचे आणि बायकांना सुंदर म्हणावयाचे असले प्रकार औदीच्य कवींनीं केलेलें आहेत. रावण आणि कुंभकर्ण विरूप, पण मंदोदरी आणि सुलोचना या मात्र देखण्या. 'अहिरावण महिरावण हे दुष्ट आणि विक्राळस्वरूपीं पण एकाची बायको चंद्रसेना ही मात्र सुंदर आणि केवळ रामाच्या एकपत्नीव्रतामुळेंच रामाला अग्राह्य. यावरून असें दिसतें कीं, औदीच्य कवींना दक्षिणेकडील पुरुषांना जरी भयंकर विक्राळ नरमांसभोजी, मद्यपी ठरवावयाचे होते तरी त्यांच्या बायकांविषयीं मात्र त्यांच्या मनांत फार आक्षेप नव्हता. असुर बाण याची मुलगी उषा ही अनिरुद्धाला बायको व्हावयास पूर्णपणें योग्य होती, एवढेंच नव्हे तर त्यांच्या प्रेमाच्या गोष्टीमध्यें त्यांनीं अद्भुतता मिसळून दिली आहे. नागांच्या नागकन्या यांची सौंदर्याबद्दल तर मोठीच ख्याति होती. पुरुष मात्र दुष्ट, चावरे आणि घातकी. तर यावरून एवढें मात्र निश्चित होतें कीं दाक्षिणात्यांची भौतिक आणि ललित संस्कृति औदीच्य कवींना कमीपणाची वाटली नाहीं. त्यांचा जो आक्षेप होता तो पुरुषांच्या विक्राळपणाबद्दलच होता. कदाचित् यज्ञासंबंधानें असेल.

## ४७४. दाक्षिणात्य ललितसंस्कृतीचा आरंभ दृष्टिक्षेत्रापलीकडील आहे.

४७४. थोडक्यांत अर्थ सांगावयाचा म्हणजे असा कीं दाक्षिणात्य संस्कृतीच्या लालित्याचा इतिहास देतांना आपणांस जो आरंभ करावयाचा तो संस्कृतीच्या प्राथमिक स्वरूपापासून प्रारंभ करतां येणार नाहीं. अत्यंत प्राचीनकाळीं देखील दाक्षिणात्य संस्कृतीला प्रौढ स्वरूप आलें होते तर ही गोष्ट लक्षांत घेऊनच आपणांस इतिहासकथनाला आरंभ केला पाहिजे.

पौराणिक काल हा जर दाशरथींरामाच्या पूर्वींच्या काळापासून म्हणजे परशुरामावतारापासून बुद्धावतारापर्यंत धरला तर या विस्तीर्ण कालामधील दक्षिणेच्या स्थितीविषयीं रामायणांतील व महाभारतांत व स्कंद, गणेशसारख्या पुराणांतून उतारे सांपडतात तेवढ्या तुटक उताऱ्यावरून जें काय सिद्ध होतें तें हें कीं, दक्षिणेकडे कृषिकर्म वाढले होते, रत्नांचा व्यापार चालत असे आणि मोठमोठालीं शहरें होतीं; अगदीं स्वतंत्र पौराणधर्म विकास पावत होता. आसुर व सेमेटिक संस्कृतींशीं दक्षिणेचा निकट संबंध होता. याप्रमाणें स्थूल रेषांनीं संस्कृतिविकासाचें चित्र जरी स्पष्ट करतां येईल तरी उपरेषालेखन आणि रंगभरणी करतां येत नाहीं. पुराणांची दाक्षिणात्य दृष्टीनें अजून चिकित्सा झालेली नाहीं.

## ४७५. पुराणांचा उपयोग करावयास अडचणी.

४७५. पुराणांची वाढ कशी होत गेली या संबंधानें अत्यंत स्थूल अभ्यास देखील झाला नाहीं. तो अभ्यास

भिन्न समाजांचें एकीकरण व त्यांची झालेली संघटना या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. अनेक दाक्षिणात्य कथा प्रथम दक्षिणेंतच संकलित होऊन पुढें त्या पुराणप्रविष्ट झाल्या आहेत. उदा० स्कंदाची गोष्ट घ्या. तामिळ लोकांतील स्कंद हा आणि आपल्याकडील दोन बायकांचा नवरा खंडोबा हे एकच होत. आणि त्यामुळें दक्षिणेकडील स्कंद ऊर्फ सुब्रह्मण्य हा दोन बायकांचा नवरा आहे, आणि आपल्याकडे खंडोबा ही निराळीच देवता होऊन आपला कार्तिकस्वामी लग्नाशिवाय राहिला आहे. त्यावरून असें दिसतें कीं स्कंददेवता ऊर्फ खंडोबा ही अत्यंत प्राचीन देवता होती. तिची आराधना होती आणि त्या देवतेचीं रूपांतरें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं झालीं. बृहत्कथेंत दक्षिणेंत कार्तिक स्वामीच्या दर्शनासाठीं किंवा उपासनेसाठीं जावयाचें याचे उल्लेख पुष्कळ आहेत, तथापि त्या वेळेस कार्तिक स्वामीचीं दोन्ही भिन्न रूपें प्रचारांत होतीं काय हें समजत नाहीं. जर आपणांस पुराणांचा जो अभ्यास करावयाचा तो अनेक ठिकाणचें स्थानिक वाङ्मय, संस्कृत वाङ्मय आणि प्रचलित असलेलीं देवतें आणि पवित्रस्थानें यांचें समष्टिरूपानें अवलोकन करून लिहिला पाहिजे. अगोदर संस्कृत आणि मागाहून त्यांचें प्राकृत भाषांतर या तऱ्हेची वाङ्मय विकासाची काल्पनिक मांडणी सोडून देऊन स्थानिक भाषांतील ग्रंथ अधिक श्रद्धाबुद्धीनें पाहिलें पाहिजेत. तामिळमध्यें ग्रंथपरंपरा आज ख्रि. पू. तिसऱ्या शतकापासून चालू आहे. असें आतां लोकमत होऊं लागलें आहे आणि वस्तुस्थिति अशी आहे कीं, अत्यंत प्राचीन काळीं जे ग्रंथ झाले ते ग्रंथ दुर्बोध झाल्यामुळें त्यावर भाष्यें पांचव्या व सहाव्या शतकांत लिहिलीं गेलीं आणि आज तीं भाष्येंही समजत नाहींत इतकीं जुनाट वाटतात. तामिळ वाङ्मयाची परंपरा जर इतकी जुनाट असेल आणि द्राविडांच्या एकंदर संस्कृतीच्या इतकी जुनाट असेल तर तितकें निश्चयपूर्वक प्राचीन पौराणिक वाङ्मय संस्कृतमध्यें सुद्धां नाहीं. रामायण महाभारत हे ग्रंथ बहुतांशीं बुद्धपूर्व असले तरी, त्यांत नवीन पौराणिक मजकूर शिरून ते ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकापर्यंत किंबहुना पांचव्या शतकापर्यंत संवर्धित होत होते. आणि त्यांत नवीन मालमसाला प्रविष्ट होता अशा परिस्थितींत भिन्न उपासनांची आणि वाङ्मयाची परंपरा इतिहास-पुराणकारांच्या दृष्टीस पडून ती त्यांनीं आपल्या ग्रंथांत समाविष्ट केली असेल.

प्रत्येक लोकांमध्यें युद्धदेव असावयाचा. आणि त्याच्या आनुषंगिक कथा भिन्न असावयाच्या. युद्धदेव तो कार्तिकस्वामी असें समीकरण झाल्यानंतरचा जो पश्चिम एशियांतील संयुक्त दैवतेतिहास झाला त्याचा अभ्यास बराच मनोरंजक होणार आहे.

## ४७६. द्राविड विद्येचें संस्कृतीकरण.

४७६. द्राविडांच्यापाशीं त्यांचे तुटक स्तोत्रग्रंथांचे वाङ्मय असेल तर औदीच्यांच्यापाशीं ज्याच्या जबड्यांत अनेक स्तोत्रें महात्म्यें सहज उतरतील असें इतिहासपुराणवाङ्मय होतें. आणि त्यांच्या जबड्यांत तें उतरल्यानंतर अप्रतिष्ठित देशी भाषांतील वाङ्मय नष्ट होऊन संस्कृत वाङ्मयच टिकून राहणें ही क्रिया झाली असावी असें दिसतें. ज्याप्रमाणें इंग्रज सरकार गॅझेटिअरें तयार करतांना देशी भाषांतून अनेक टांचणें तयार करवितें किंवा पत्रव्यवहार मागवितें आणि पुढें त्यांतील ग्राह्यांश आपल्या इंग्रजी ग्रंथांत समाविष्ट केला म्हणजे देशी लिखितांना फाटा देतें तसाच इतिहास प्राचीनकाळीं झाला असावा. संस्कृत वाङ्मय प्रतिष्ठितांनीं लिहावें आणि तें जतन केलें जावें आणि प्रतिष्ठित वर्गानें संस्कृत ग्रंथासाठीं जमविलेलें पूर्व साहित्य नष्ट व्हावें ही क्रिया झाली म्हणजे तें प्रतिष्ठित वाङ्मय भिन्नजातिसंयोजक, भिन्नप्रदेशसंयोजक असें होऊं लागतें. पण तें सर्व वाङ्मय स्थानिक साहित्यावरच रचलेलें असतें. हीं वाङ्मयेतिहासांतर्गत विशिष्ट क्रिया लक्षांत घेऊन भारतीय संस्कृतीच्या एकत्वाचा इतिहास अवगमिला पाहिजे आणि तो अवगमिण्यासाठीं अगोदर संस्कृत आणि नंतर प्राकृत ही कल्पना सोडून दिली पाहिजे. ही देशातील द्राविड विद्यांस व प्राकृत साहित्यास मुलामा लावून त्यांचा स्वीकार करण्याची क्रिया वाङ्मयाच्या त्याचप्रमाणें सर्व प्रकारच्या गृहमंडनात्मक क्रियांच्या आणि साधनांच्या विकासांत झाली आहे.

## ४७७. वस्तुसंग्रहणाची आवश्यकता.

४७७. आजच्या उपलब्ध गृह्यवस्तूंचें व्यवस्थित संग्रहण आणि अभ्यास झाला पाहिजे. प्राकृतापासून संस्कृत आणि संस्कृतापासून प्राकृत त्याप्रमाणेंच ग्राम्य वस्तूंपासून नागर वस्तु आणि नागर वस्तूंपासून पुन्हा त्यांच्या ग्राम्य प्रतिकृति या सर्व क्रिया वेश, भांडीं, उपकरणीं, गृहरचना या सर्वांमध्यें पहावयास सांपडतील. जें मूळ प्राकृत आहे त्याच्या संस्कृत रूपांतरावरून प्राकृत ग्रंथ पुन्हा तयार होण्याची क्रिया झालेली आहे. मूलाधार होत असलेलें प्राकृत वाङ्मय नष्ट झालें म्हणजे पुढील लेखक तें संस्कृत लिखाण आधाराशीं घेऊनच उत्तरकालीन प्राकृत लेखकहि आपला ग्रंथ सजविणार. आजदेखील एखाद्या जातीचा इतिहास अगर वर्णन लिहावयाचें झालें म्हणजे जातीच्या मुख्याकडून प्रश्न करून लिहून घेतलेलीं उत्तरें नष्ट झाल्यामुळें आज इंग्रजी वाङ्मयावरूनच

त्या जातीची माहिती घ्यावी लागते. त्याप्रमाणेंच प्राचीन काळींही क्रिया होत होती. ज्या देशी वाङ्मयावर किंवा तोंडी माहितीवर संस्कृत ग्रंथ रचले जात ती देशी भाषेंतील माहिती किंवा तोंडी माहिती नष्ट झाल्यानंतर पुढच्या काळचे लोक संस्कृतवरूनच त्या प्रश्नासंबंधानें माहिती देणार. इंग्रजी पुस्तकावरूनच आपणांस आपल्या देशाची पुष्कळच माहिती घ्यावी लागत आहे. प्राकृतापासून मिळालेल्या माहितीची विकृति संस्कृत ग्रंथांत आढळून येते तशी आज इंग्रजी ग्रंथांतहि आढळते आणि ज्याप्रमाणें आजचा यूरोपिअन अभ्यासक हिंदुस्थानविषयक हिंदुस्थानांत झालेल्या साहित्यावरून आपलें लिखाण करतो आणि त्यांत आपल्या कल्पना मिसळतो त्याप्रमाणेंच संस्कृत लेखक आपल्या कल्पना देश्य, लोकोत्पन्न अथवा कथित वाङ्मयांत घालते झाले. त्यांत नवल नाहीं. संस्कृत प्राकृत वाङ्मयांचा संयुक्त अभ्यास झाला पाहिजे त्याप्रमाणेंच नागर आणि ग्राम्य गृह्य वस्तु आणि चित्रकला यांचा अभ्यास झाला पाहिजे आणि तो अभ्यास होण्यासाठीं वस्तु संग्रहणास सुरवात झाली पाहिजे.

### ४७८. प्राकृतांच्या संस्कृतींचा विकास, संस्कृत वाङ्मय आणि प्राकृतवाङ्मयाची त्याहून भिन्नता.

४७८. वाङ्मयाचें संस्कृतीकारण ज्या काळांत होत असतें त्या काळांतच प्राकृतांच्या संस्कृतीचा विकास होत असतो असें नाहीं. तर प्राकृतसंस्कृतिविकास हा अगोदरच्या काळांत झालेला असतो आणि यासाठीं जेव्हां संस्कृत वाङ्मयास निराळी दिशा लागलेली दृष्टीस पडेल तेव्हां प्राकृतांच्या संस्कृतीचा कांहीं तरी त्यावर परिणाम झाला होता काय, झाला असल्यास कोणत्या प्राकृतांचा झाला याचा शोध केला पाहिजे.

हे सर्व वाङ्मयविकासांतर्गत होणारे प्रकार लक्षांत घेऊनच पौराणिक वाङ्मयाचा अभ्यास केला पाहिजे आणि निराळ्या देशी भाषांत उत्पन्न झालेल्या पौराणिक वाङ्मयाची, संस्कृत वाङ्मयाशी तुलना करून पाहिली पाहिजे. आणि देशी वाङ्मयांत संस्कृत वाङ्मयापेक्षां कोठें भिन्नता दिसत असेल किंवा विस्तृतता दिसेल तर देशी भाषेंत जें असेल तें सर्व नवीन प्रक्षेप आहेत असें धरून चालावयाचें नाहीं. जरी मूळ देशी साहित्य नष्ट झालें, आणि लेखकाला साहित्य संस्कृतमधूनच घेण्याची आवश्यकता भासली तरी देशी साहित्य पूर्णपणें नष्ट झालें नसतें, व नष्ट जरी झालें असलें तरी अनेक प्रचार, आठवणी, परंपरा या तरी चालू असतातच; आणि चालू असलेल्या परंपराशीं ग्रांथिक म्हणजे संस्कृत ग्रंथोपलब्ध माहितीचा संबंध जोडणें हें देशी वाङ्मयामध्यें अवश्य होतें. श्रीधरानें शिवलीलामृत ग्रंथ लिहिला तो स्कंदपुराणांतर्गत ब्रह्मोत्तरखंड आधाराला घेऊन श्रोत्यांच्याअ खंड श्रवणासाठीं रचला तथापि ब्रह्मोत्तरखंडांत नसलेल्या अनेक गोष्टी यांत श्रीधरानें घातल्या आहेत. उदा० पंचाक्षर मंत्र "नमः शिवाय" किंवा षडक्षरमंत्र "ओं नमः शिवाय" हा घ्यावयाचा तो गुरूपासूनच घेतला पाहिजे वगैरे गोष्टी श्रीधरानें त्यांत घातल्या. तर हें गुरूचें महात्म्य श्रीधरानें जें घातलें तें स्वतःच वाढविलें काय? असा प्रश्न उत्पन्न होईल. त्याला होकारार्थी उत्तर देतां येत नाहीं. भागवत धर्मांत गुरू करण्याचें महत्त्व होतेंच. तें शैवधर्मांतही होतें; आणि शैवधर्मांत गुरूंची परंपरा बऱ्याच प्राचीन काळापासून अव्याहतपणें चालली होती असें दिसतें. तेव्हां श्रीधरानें त्यांत जुनी परंपराच पुढें चालविली असें दिसून येईल. प्राकृत वाङ्मयांत देखील प्राचीन काळच्या भावना किंवा स्थिति प्रतिबिंबित झाली असते हें विसरून चालावयाचें नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेऊन द्राविड व प्राकृतवाङ्मयाचा अभ्यास झाला पाहिजे.

परंपरागत पण ग्रंथांत नसलेल्या प्राचीन गोष्टींचें रक्षण ही क्रिया ज्याप्रमाणें प्राकृत वाङ्मयांत होते त्या प्रमाणेंच गृह्यवस्तूंच्या किंवा रीतींच्या रूपांतरांत दृष्टीस पडते. नागर वर्गाच्या वस्तूपासून अनागर वर्ग जेव्हां आपली प्रतिकृति तयार करतो तेव्हां त्यांत जें कांहीं अनागर रूप चालू ठेवतो त्याची प्राचीनता पुष्कळच असते. लग्नांचे ब्राह्मणी विधि आरण्य आणि ग्राम्य ज्ञाती स्वीकारतात तेव्हां त्या आपले जुनें रिवाज फार थोडे बदलतात. ते जुन्यास चिकटून रहातात आणि ब्राह्मणी रिवाज भरतीला मात्र घेतात. आजचे आगरी आणि कोळी जरी लग्नांत ब्राह्मणांना बोलावतात तरी दवलेरीचें महत्त्व कायम ठेवीत आहेत आणि लग्नांतील कांहीं क्रिया ब्राह्मणांकडून तर कांहीं दवलेरीकडून करवीत आहेत.

देशांतलें ज्ञान ग्रंथसमाविष्ट करावें आणि ग्रंथाचें महत्त्व वाढवावें पण देशांतील गुरूंच्या परंपरांचें महत्त्व कमी करावें अशा इच्छेनें प्रेरित होऊन गुरूच्या महत्त्वाशिवाय इतर शैवधर्मीय गोष्टी आपण समाविष्ट कराव्या असें धोरण संस्कृत ग्रंथकारांनीं मधूनमधून ठेवलें असल्यास त्यांत नवल नाहीं. सांगावयाचें एवढेंच कीं जेव्हां उत्तरकालीन प्राकृतग्रंथामध्यें संस्कृत ग्रंथापेक्षां भिन्नता दिसेल तेव्हां प्राकृतांनीं भिन्न गोष्टी आपल्या पदरच्या घातल्या अशा निर्णयास एकाएकीं येऊं नये. असो. दिसणारी भिन्नता प्राचीन काळाची दर्शक आहे काय हा प्रश्न विचारास घेतला पाहिजे.

थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें तर पुराणोक्त धर्माचा इतिहास आपणांस तयार करावयाचा झाला तर प्रत्येक ठिकाणचें स्थानिक वाङ्मय, पुराणांतील स्थानिक उल्लेख आणि पुराणांतील विशिष्ट दैवतांविषयीं कथा व त्या दैवताच्या उपासकांत चालू असलेली रीति हीं सर्व एकत्र करूनच लिहिला पाहिजे; वेदग्रंथीय उल्लेखांपासून प्रत्येक स्थानिक देवता कल्पनांतरें होत होत कशा निर्माण झाल्या अशा प्रकारचा विचार न करतां प्रत्येक ठिकाणीं प्रचलित असलेल्या देवता, त्यांचे विधि, त्यांच्या उपासना, त्यांचा पूजकवर्ग, त्यांचा आचार्यवर्ग या सर्वांचें स्वतंत्रपणें अवलोकन करून त्यांचा श्रुतिस्मृतिपुराणोक्त परंपरेशीं संबंध कसा मांडला गेला आहे हें पाहिलें पाहिजे.

## ४७९. श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माची घटना कशी झाली.

४७९ सर्व पौराण वाङ्मय या दृष्टीनें तपासल्यानंतर दक्षिणेंतील प्राचीनतम धार्मिक स्थिति आपल्या लक्षांत येईल आणि त्या धार्मिक परिस्थितीचा उत्तरेकडील धर्माशीं मिलाफ होऊन एक धर्म कसा बनला याचें स्पष्टीकरण होईल.

अर्वाचीन काळीं पूजा होत असलेलीं दैवतें सर्व अर्वाचीन आहेत या प्रकारच्या पूर्वग्रहानें जो प्रथमतः पाश्चात्य पंडितांनीं आणि नंतर त्याच्या हिंदुस्थानी शिष्यांनीं इतिहासविपर्यास केला तो इतिहासविपर्यास आतां नाहींसा होणार आहे. प्राचीन काळापासून चालत आलेली जुन्या लोकांची जी समजूत कीं श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्म हे सर्व सारखेच प्राचीन होते त्या मताकडे आतां आपण सत्य शोधतां ओढले जात आहोंत.

तीन चार पिढ्यांपूर्वीच्या मतांत आणि आजच्या संशोधनप्राप्त होणाऱ्या मतांत फरक एवढाच कीं, जुन्या काळचे लोक श्रौतधर्म, स्मार्तधर्म आणि पौराणधर्म हे तिन्हीं आपणास लागू आहेत असें समजत व ही परिस्थिती अत्यंत प्राचीन कालांपासून होती असें समजतात. आज आमचें मत झालें आहे हें असें कीं श्रौतधर्म हाच अगोदर अनेक लोकांच्या धर्मांचे एकीकरण होऊन तयार झाला. स्मार्तधर्महि तशाच प्रकारें तयार झाला आणि पुराणधर्मही अनेक ठिकाणाच्या कथा एकत्रित होऊन तयार झाला. हे तिन्ही धर्म एकत्रित झाले आणि ते सर्व जनतेस लागू झाले. या सर्व लोकांचें वाङ्मय एकत्रित करण्याची क्रिया ही सर्व लोकांचें धर्मैक्य घडवून आणण्याच्या क्रियेंतील एक भाग होता. धर्मैक्य जें झालें आहे तें हळूहळू झालें. एकमेकांचे देव एकमेकांनीं घ्यावयाचे व अडल्या प्रसंगीं अवश्य पडेल तर परकीय देवतेचें आराधन करावयाचें अशा तऱ्हेनें अनेक देवता एकमेकांना सारख्याच मान्य झाल्या व या क्रियेमुळें लोकांमध्यें सादृश्य आपोआप वाढलें. ग्रामदेवता ही सर्वांसच मान्य असावयाची त्यामुळें ग्रामदेवतेच्या बाबतींत तरी लोकांचें धर्मैक्य सहज होई. सामान्य मनुष्य जर विशिष्ट संप्रदायाच्या भिक्षुकाच्या तावडींत नसला तर तो देवतांच्या बाबतींत अत्यंत निःपक्षपाती असतो. त्याच्या दृष्टीनें जो देव नवसाला पावेल तो खरा. तो वेदांत आहे कीं महाभारतांत आहे कीं परक्यांचा आहे हें त्यांस पहावयास नको. जो देव विशिष्ट कामगिरी करील, नवसास पावेल त्या देवास सामान्यजन मान्य करील व खिरापत देईल. त्याप्रमाणें जो साधू किंवा फकीर त्याचें इष्ट घडवून आणील त्या साधूकडे किंवा फकिराकडे तो स्वतःचें इष्ट साधण्यासाठीं जाऊं लागेल. या दृष्टीनें देवाविषयीं निःपक्षपाती असलेला सामान्य मनुष्य पैतृक धर्म न सोडतां आणि पैतृक आचार न सोडतां स्वकीयेतर देवता व साधुवर्ग यांस मानावयास तयार असतो. धर्माच्या ऐक्याला अर्थात तो अनुकूल असतोच. ऐक्याला विघातक म्हटले म्हणजे विशिष्ट धर्माचे किंवा संप्रदायाचे प्रतिनिधि असलेले भिक्षुक आणि त्यांचे अभिमानी असलेले गृहस्थ होत.

## ४८०. धर्मांचे प्रचारक व त्यांतील स्पर्धा.

४८०. खरी स्पर्धा असते ती सामान्य जनतारूपी गिऱ्हाइकांत नसून त्यांचें पुढारीपण करूं इच्छिणाऱ्या किंवा त्यांचें पौरोहित्य करूं इच्छिणाऱ्या लोकांत असते. आणि यासाठीं बलवान संप्रदायाचे लोक कमी बलवान अशा जातिधर्मास किंवा असंस्कृत राष्ट्राच्या पुरोहित वर्गास दूर करून आपल्याच भोंवतीं त्या राष्ट्राची जनता गुंडाळू पहातात. त्या लोकांची जी जुनी देवता असेल तिचें प्रचारकधर्माचा प्रतिनिधि आपल्या देवतेशीं एकत्व सांगतो आणि अशा तऱ्हेनें देश्य दैवतांचा स्वीकार करतो. बौद्ध संप्रदायाचा जो विलक्षण प्रसार झाला तो होतांना मुख्य क्रिया एकच झाली आहे आणि ती म्हटली म्हणजे प्रत्येक ठिकाणच्या स्थानिक देवतांचें बुद्धाशीं ऐक्य स्थापन होय. जपानांतील पूर्वीच्या सर्व देवता बुद्धाचे पूर्वीचे अवतार म्हणून बौद्ध संप्रदायानें स्वात्मीकृत करून टाकल्याच होत्या. परंतु संप्रदायास जुना [ शिंतो उर्फ "शेन (सद्) ताओ (धर्म)" चा] विधिपारंगत भिक्षुक वर्ग नष्ट करतां आला नाहीं. जपानांतील जुन्या दैवतांचा जो उपासकवर्ग स्वतंत्र राहिल्यामुळें त्यांनीं आपलें वैशिष्ट्य विधींवर स्वामित्व ठेवून राखिलें आणि राजवाड्यांत होणाऱ्या विधीपासून खेड्यांत

होणाऱ्या विधींपर्यंत अनेक सार्वजनिक विधींवर आपली सत्ता कायम राखली, आणि केवळ पारमार्थिक क्षेत्र बौद्ध किंवा ख्रिस्ती उपाध्यायास परस्परस्पर्धेसाठीं मोकळे ठेविलें.

एवंच जनता अगोदरच सर्व प्रकारच्या देवतांचा उपयोग करून घ्यावयास अनुकूल असते आणि खरी स्पर्धा भिक्षुक लोकांतच होते, आणि ती स्पर्धा होत होत जेव्हां मनुष्य दोन्ही धर्म स्वीकारूं लागतो तेव्हां दोन्ही प्रकारच्या भिक्षुकांस मान देतो. पारमार्थिक कर्मांतसुद्धां अंगें पुष्कळ आहेतच. विधींचें (संस्कारांचें) अंग आहे. उपासनासाहाय्यकत्वाचें अंग आहेच. त्याप्रमाणेंच अडचणींच्या प्रसंगीं दवी शक्तीचा उपयोग करून घेण्याचें अंग आहेच. जेव्हां जुना उपाध्याय वर्ग दूर करून जनतेचा ताबा दुसरे लोक घेतात तेव्हां ती क्रिया इतकी मंद तऱ्हेनें होत असते कीं, ती एकाएकीं लक्षांत येत नाहीं. आज भविष्यकाळाच्या ज्ञानाकरतां किंवा आपलें बरें केव्हां होईल हें पहाण्याकरितां अडचणींतील मनुष्य ज्योतिषाकडे जातो तेव्हां तो ज्योतिषी आपल्या धर्माचा आहे किंवा नाहीं याचा विचार मुळींच करीत नाहीं. यूरोपिअन, मुसलमान, पारशी हे सर्व लोक हिंदु ज्योतिषाकडे जातात हें आपण पहातच आहोंत. ब्रह्मदेशभर ब्राह्मण (तेथें अनेक शतकें वसाहत केलेले ब्राह्मण ज्यांना पवना असें म्हणतात ते) ज्योतिषी या नात्यानें देशभर पसरले आहेत. आणि हेच ब्राह्मण सर्व प्रतिष्ठित लोकांचीं लग्नें लावतात पण त्यास आध्यात्मिक उपदेशमात्र करीत नाहींत. आध्यात्मिक उपदेश करण्याची क्रिया किंवा धार्मिक प्रार्थनेंत मदत करण्याची क्रिया बुद्ध भिक्षु करतो. बुद्ध भिक्षूंनीं संस्कारांचा मक्ता आपल्याकडे घेतला नाहीं एवढेंच नव्हे तर खुद्द भिक्षूला भिक्षु करण्यास ब्राह्मणाची जरूरी पडते. तुम्ही आतां भिक्षु झालांत असें ब्राह्मणानें म्हणावें लागतें.

### ४८० अ. स्पर्धाकालानंतरची कर्तव्यविभागणी.

४८० अ. बौद्ध प्रदेशांत भिक्षु आणि ब्राह्मण यांच्यामध्यें कर्माचो विभागणी झालेली आहे. परंतु दैवी शक्तीचा उपयोग मनुष्यहितासाठीं करून देण्याचें काम करणारे दुसरेलोक आहेतच व पूजनार्ह अशा गोष्टी बुद्धमूर्तीशिवाय पुष्कळच आहेत. बंगाल व ब्रह्मदेश यांत प्रत्येक गांवांमध्यें नाट नांवाच्या उपदेवता असतात व त्यांचेंही पूजन चालू आहे. या नाटांची पूजा करण्यास भिक्षू लागतो असें नाहीं. उलट भिक्षू या नाटांची पूजा क्षुद्र आहे असेंच लोकांना शिकवीत असतात. या नाटांची पूजा करण्याचा ज्यांना अधिकार आहे असे लोक दरगांवांत असतात. त्यांची स्वतंत्र जात आहे असें नाहीं. परंतु नाटांच्या पुजाऱ्यांत देखील संप्रदायपरंपरेचे अगर वंशपरंपरेचे अंश राहिले आहेत. हे लोक बाजूस सरलेला उपाध्याय वर्ग असें म्हणण्यास हरकत नाहीं. याशिवाय भुताखेतांचा त्रास दूर करणारे असे मांत्रिकही असतातच.

एवंच ज्यांचें कर्म धार्मिक आहे किंवा ईश्वराची आराधना करण्याचे आहे किंवा ज्यांस दैवी सत्तेचा मनुष्याकरतां उपयोग करून द्यावयाचा आहे अशाप्रकारचे लोक चोहोंकडे असतात. आणि मनुष्य प्राणी हा ह्या सर्वांचाच यथाशक्ति उपयोग करून घेतो, आणि ह्या कारणानें भिन्नभिन्न धर्मांचा प्रचार एकसमयावच्छेदेंकरून चालू होतो. पिशाच्चापासून होणारा त्रास घालवून देण्याकरतां आज यूरोपिअन लोक देखील हिंदु किंवा मुसलमान मांत्रिकाकडे जातात त्याप्रमाणेंच क्रिया आपल्या देशांत प्राचीन काळींही होत होती. वैदिक देवतांचे कट्टे अभिमानी देशी दैवतांच्या उपासनांचा उपयोग करूं लागले असें आपणांस वेदकाळांतच म्हणजे संहितीकरणाच्या काळापूर्वीच दिसून येऊं लागलें होतें. ऋग्वेदांत जीं खैलिक सूक्तें आहेत त्या सूक्तांमधून सर्वभयापासून मुक्त होण्यासाठीं जरत्कारूचा मुलगा आस्तिक याची प्रार्थना आहेच. त्याप्रमाणेंच गंगा-यमुना-सरस्वती यांच्या संगमावर धर्मकृत्यें करण्याचें महत्त्व वर्णिलें आहेच. त्या सूक्तांत विष्णूचीं अनेक नांवें येतात. शिवनामें येतात. विष्णूच्या गरुडाचा उल्लेख येतो आणि लक्ष्मीदेवतेची आराधना द्रव्यलाभासाठीं अगदीं मोकळ्या मनानें केलेली दिसते. हीं सूक्तें वैदिक भाषेंतच आहेत त्याअर्थी चोहोंकडे पसरलेल्या आर्यन् लोकांतील मंत्रकर्त्या वर्गानें नवीन आराधनाविषय झालेल्या दैवतावर लिहिलीं हें उघड आहे. आणि या सूक्तांमध्यें ज्या अर्थी नर्मदेचा उल्लेख आहे त्याअर्थी नर्मदेपर्यंत ज्या काळांत मंत्रकर्त्या वर्गाचा प्रसार झाला होता त्या काळांतच हीं सर्व दैवतें स्थापन झालीं होतीं एवढेंच नव्हे तर मंत्रकर्त्या वर्गास मान्य झालीं होतीं हें स्पष्ट आहे.

ख्रिस्ती संप्रदायांतील चालू वहिवाट अशी आहे कीं ख्रिस्ती मंडळींना पारमार्थिक उपदेश जो करतो तोच त्यांचा संस्कार करणारा उपाध्याय असतो. या परिस्थितीमुळें दोन धर्मांचें अवलंबन मनुष्य एकसमयावच्छेदें करणें अशक्य अगर अयोग्य आहे. अशी कल्पना त्यांच्या डोक्यांत शिरते आणि अन्यपरिस्थिति त्यांना कल्पनातीत असते. भुतें काढणें वगैरे क्रिया कॅथलिक धर्मांत आहेत आणि ती क्रिया देखील उपाध्याय वर्गाकडूनच करविली जाई. ती क्रिया करण्याचे मंत्रदेखील त्यांच्या ग्रंथांत

आहेतच. या तऱ्हेनें त्यांनीं अन्यधर्मीयांचा संसर्ग आपल्या जनतेला कमी होईल असें केलें. हस्तसामुद्रिक पाहणें आणि भविष्य सांगणें त्या दोन क्रियांमार्फत परकीयांचा पगडा आपल्या लोकांवर पडूं नये म्हणून आमचा हस्तसामुद्रिकावर विश्वास नाहीं वगैरे तऱ्हेचीं विधानें आपल्या कळपांतील मेंढरांकडून करवून घेण्याची त्यांची पद्धत आहे. पण मनुष्य स्वभाव निराळाच आहे. अडचणीच्या प्रसंगीं मनुष्य वैद्याकडे जाईल किंवा वैदूकडेही जाईल त्या प्रमाणेंच प्रार्थना करण्याकरितां पाद्र्याकडे जाईल त्याप्रमाणेंच मांत्रिकाकडेही जाईल. अशी मानसिक स्थिति असल्यामुळें प्रत्येक देशांत अनेक धर्मांचीं विविध अंग अंशेंकरून प्रचलित असतात. बौद्ध संप्रदायानें जरी आपला फैलाव हिंदुस्थानभर केला तरी त्याच्या योगानें देशांतील नित्य रहाणीनें फारसा फरक झालाच नाहीं. लोकांमध्यें श्रौतधर्म, स्मार्तधर्म आणि पौराणधर्म हे प्रचलित झाले होते आणि या प्रत्येक धर्मांतर्गत संप्रदाय चालूच होते. अनेक वैदिक संप्रदाय संहितीकरणामुळें जोडले गेले त्याप्रमाणेंच रामायण, महाभारत व पुराणें यांच्या संहितीकरणामुळें अनेक सांप्रदायांचें ऐक्य स्थापन झालें. त्या वाङ्मयाच्या बाहेर जें वाङ्मय होतें त्यापासून पृथक् असणारें जें बौद्धजैनांचें वाङ्मय तें अगदीं उत्तरकालीन असल्यामुळें त्याचा प्रवेश ब्राह्मणी संहिताग्रंथांत झाला नाहीं.

ख्रिस्ती संप्रदायांत संस्कार करणें आणि उपदेश करणें या दोन्ही क्रिया एकाच व्यक्तीच्या ठायीं केंद्रीभूत झाल्या आहेत, तथापि ही केवळ वहिवाट आहे. याला संप्रदायसंस्थापकाच्या वचनाचा आधार नाहीं. ख्रिस्त हा लग्नें, मुंजी लावणारा भिक्षुक नव्हता. बापतिस्मादेखील 'ख्रिस्ती' विधि नाहीं, तो ख्रिस्ताच्या अगोदरचा आहे. आणि तो मुख्यतः पाण्यांत शरीर बुडवून पवित्र आत्म्याच्या प्रवेशासाठीं भूतें काढून टाकण्याचा मार्ग आहे. भुतें काढण्याची ही पद्धत आज नरसोबाच्या वाडींत देखील सांपडेल. सर्व प्रकारची भिक्षुकी ख्रिस्ती संप्रदायानें तावडींत घेतल्यामुळें त्या संप्रदायांतील मंडळीमध्यें दोन प्रकारच्या आचार्यांचें अस्तित्व नाहीं. नाहींतर प्राचीन ड्रुईडांची परंपरा ब्रिटनमध्यें अजून चालू असती. असो.

शातवाहनांच्या प्राचीनतम अशा नानाघाटांतील लेखांत पौराणिक आणि वैदिक धर्मांचा पूर्णपणें मिलाफ झाला ही गोष्ट अगदीं स्पष्टपणें दिसत आहे. तथापि अनेक ग्रामदेवता आणि विकराल देवता यांचा वैदिक धर्माचें अवलंबन करणाराकडून झालेला स्वीकार बृहत्कथेंत स्पष्ट दिला आहे. त्यावरून शातवाहनाच्या काळापूर्वीच किंबहुना बुद्धापूर्वींच तंत्रधर्म देखील भारतीयांच्या सामान्य धर्मांत अंतर्भूत झाला होता हें स्पष्ट होतें. बुद्धाचा संप्रदाय भारतीय सामान्य संस्कृतींत पूर्णपणें समाविष्ट झाला असें लोकांस वाटत नाहीं याचें कारण त्या संप्रदायाची उत्तरकालीनता आणि संप्रदायांतील संघटना होय.

बौद्ध संप्रदायाचें संपूर्ण स्वात्मीकरण श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माकडून झालें नाहीं. तथापि बौद्ध धर्माचार्य आणि संस्कर्ते ब्राह्मण यांच्यामध्यें कर्माची विभागणी मात्र झाली, आणि बुद्धास विष्णूचा अवतार बनविलें एवढीच बौद्ध संप्रदाय पचनीं पाडण्याची क्रिया झाली.

प्रकरण ५२ वें.

# सांस्कृतिकघटना, भाषाविकास आणि महाराष्ट्र

## ४८१. संस्कृत भाषाविकास आणि राजसत्ता.

४८१. भारतीय संस्कृतीच्या छत्राखालीं अत्यंत भिन्न-प्रकारच्या उपासनांचा, आयुष्यक्रमांचा आणि धर्मांचा समावेश झाला. तथापि सामाजिक आयुष्यास एकरूपता संस्कृत वाङ्मयानें आणली. संस्कृत भाषेमुळें जी व्यापक संस्कृति उत्पन्न झाली ती कोणत्याही राजसत्तेचें फल नव्हतें. तर कांहीं ग्रंथकारवर्गाच्या परिश्रमामुळेंच विशिष्ट ठिकाणची भाषा प्रतिष्ठित होऊन गेली व त्या भाषेला सार्वलौकिक स्वरूप हळुहळू क्रमानें आलें. तसें स्वरूप येऊं लागल्यानंतरच ती राजव्यवहारांत वापरली गेली आहे. दाशरथी राम, कौरव-पांडव वगैरे मंडळी संस्कृत बोलत नसून आपापल्या स्थानिक प्राकृत बोलत असले पाहिजेत.

## ४८२. भाषाघटनेंत वैयाकरणाचें कार्य.

४८२. संस्कृत भाषा कोणत्यातरी ठिकाणच्या प्राकृता-पासून तयार झाली आणि ती हळूहळू तयार झाली. पाणि-नीय बंधनें खरोखर पाहतां पाणिनीनंतर सातआठशें वर्षांनीं कविस्वीकृत झालीं. पाणिनीचे नियम महाभारतांत किंवा गीतेंत पाळले गेले नाहींत म्हणून अनेक लोकांनीं दाखवून दिलें आहे. † पाणिनीच्या काळांत जी काय क्रिया झाली असेल ती येणेंप्रमाणें:—

पाणिनीनें जी भाषा नियमनासाठीं घेतली ती भाषा वैदि-कांत म्हणजे यज्ञविषयक आणि तत्त्वज्ञान विषयक चर्चा कर-णारांत प्रचलित होती ती होय. तक्षशिलेच्या आसपासच्या पंडित वर्गांत ती भाषा असावी. उद्दालक, आरुणि वगैरे मंडळी तक्षशिलेस होती हें दाखविणारा उल्लेख मागें दिलाच आहे. विदर्भि कौडिन्य, वैदर्भ भीम (ऐ. ब्रा.) यांचे उल्लेख याज्ञिकांचें क्षेत्र वऱ्हाडपर्यंत होतें असें दाखवितात त्यावरून असें दिसतें कीं ऐतरेय ब्राह्मणाची भाषा आहे तसली भाषा वापरणाऱ्या याज्ञिकांचा वर्ग विदर्भापासून तक्षशिले-पर्यंत पसरला होता. प्रचलित भाषेस नियमबद्धता आणि स्थिरता क्रमानेंच आली. पाणिनीनें जेथें स्वभाषेशीं किंवा प्रांथिक भाषेशीं सदृश भाषा आहे अशा एका बऱ्याचशा विस्तृत प्रदेशांतील याज्ञिक वर्गांच्या बोलण्यांत प्रचलित असलेलीं रूपें त्यानें मान्य करून टाकलीं. पाणिनीच्या व्याकरणांत स्थानिक फरकास किंवा उपभाषांस फारशी जागा नाहीं. त्यामुळें जितकीं रूपें त्यास दिसलीं असतील तितकीं सर्व वैकल्पिक रूपें म्हणून मान्य करून टाकण्याखेरीज त्यास गत्यंतर नव्हतें, आणि असें त्यानें केल्यामुळें संस्कृत व्याकरण फार अवजड होऊन बसलें. शुद्धलेखनास इतकें व्याकरणज्ञान मुळींच आवश्यक नव्हतें. आणि पाणिनीनें सांगितलेलीं सर्व रूपें वापरणारे ग्रंथ मात्र अस्तित्वांत नाहींत असें म्हटलें तरी चालेल. त्या काळचे प्रत्येक ठिकाणचे लोक व्यक्तिशः अनेक ऐच्छिक रूपें वापरणारे होते हें शक्य नाहीं. लेखकांचें किंवा लोकांचें काम फार थोडक्या व्याक-रणावर भागत असे.

लेखक वर्ग तिन्ही भूतकाळ टाकून एका धातुसाधित विशेषणावर कार्य भागवून नेई. जेव्हां प्रत्यक्ष लेखनास फार-थोडक्या व्याकरणाची गरज लागावयाची तर हें गुंतागुंतीचें व्याकरण आलें तरी कसें? त्याचें स्पष्टीकरण एवढेंच कीं प्रचलित भाषेचे प्रांतिक भेद वैयाकरणांनीं प्रांतवार न मांड-तांना समष्टिरूपानें मांडले आणि वैयाकरणानें तें स्वीकारलें. म्हणजे नंतरच्या ग्रंथकारांना तसलीं रूपें घालावयास मोकळीक मिळाली. तथापि अत्यंत विपुल अशीं वैकल्पिक रूपें मान्य करून सर्व भाषा नियमबद्ध करण्याची कल्पना पूर्णपणें फळास आली असें मात्र नाहीं. अनेक नवीन रूपें तयार व्हावयाची क्रिया चालूच होती. आर्ष कवींनीं पाणिनीचें व्याकरण बाजूसच सारलें होतें. ज्याला जें रूप सोपें वाटे तो तें वापरी, आणि ज्याला जसा प्रयोग रुचत असे तसा तो प्रयोग करी. कदाचित् प्राकृत रूपांशीं जुळणारीं संस्कृत रूपें संस्कृत कवीकडून तयार होत असावींत. अशा तऱ्हेनें पहिलें वाङ्मय वाढलें. तथापि तयार झालेल्या नियमांचा परिणाम झाल्या-शिवाय राहिला नाहीं. पुढचे लोक व्याकरण शिकले आणि ते व्याकरण शिकल्यानंतर स्वीकृत ग्रंथाची भाषा व्याकरण-शुद्ध करूं लागले. जितकें अर्वाचीन हस्तलिखित तितकें अधिक व्याकरणशुद्ध असा नियम सांगितल्यास चुकीचा होणार नाहीं. जुने ग्रंथ घेऊन ते व्याकरणानुरूप शुद्ध करण्याची परंपरा सुरू झाली. श्लोकामध्यें मध्येंच स्वर आला तर त्याच्या पाठीमागें एक पादपूरणार्थक शब्द घालून त्याचें

† उदाहरणार्थ भांडारकर मेमोरियल व्हाल्यूममधील प्रो. वैजनाथ राजवाड्यांचा लेख.

स्वरमुखत्व काढून टाकावयाचें. " क्रियते अस्मामिः " असलें म्हणजे प्रत तयार करणाऱ्या लेखकाच्या किंवा संपादकाच्या तडाक्यांत " ह्यस्मामिः " ( हि+अस्माभिः ) झालेंच. अशा तऱ्हेनें संस्कृत ग्रंथकारांमध्यें वैयाकरणांस मानणारी जी परंपरा स्थापित झाली त्या परंपरेंत हळुहळू इतर मंडळी क्रमानें येऊं लागली. ती परंपरा एकाएकीं संवृद्ध झाली नाहीं. संस्कृत भाषेचें शिष्टीकरण ऐतरेय ब्राह्मणाच्या कालापासून कालिदासाच्या कालापर्यंत चालू होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. संस्कृत भाषेचें पंडिती स्वरूप निश्चित होईपर्यंत प्राकृत भाषेचें शिष्टीकरण करण्याचे अनेक प्रयोग चालू होतेच. प्राकृत भाषांच्या उपयोगित्यांमध्यें पंडितवर्ग वारंवार उत्पन्न होई; आणि संस्कृत वाङ्मयास प्रतिस्पर्धी वाङ्मय उत्पन्न होई, तथापि त्या स्पर्धेमध्यें संस्कृत भाषा आणि वाङ्मय हीं टिकलीं आणि इतर त्या मानानें मागसलीं किंवा मृतकल्प झालीं. ही क्रिया चालू असतां अनेक साम्राज्यें उत्पन्न झालीं व मृत झालीं. त्यांचा संस्कृत भाषा आणि विकास यांशीं संबंध आलाच नाहीं.

### ४८३. प्राकृतांतील पांडित्य.

४८३. ऋग्वेदसूक्तांच्या रचनेच्याकालींच आर्यन् भाषा बोलणारांची वसाहत आर्यावर्तांत आणि महाराष्ट्रांत हजारों वर्षें जुनीं असली पाहिजे आणि प्रत्येक ठिकाणच्या लोकांत कांहीं तरी वाङ्मयसेवक वर्ग असलाच पाहिजे. बौद्धकाळांतली प्रचलित भाषा संस्कृत भाषेपेक्षां भिन्न होती ही गोष्ट आपणांस ठाऊक आहेच. तथापि बौद्धकालाच्या किती अगोदर भिन्नस्थानीय प्राकृत भाषा आणि जवळ जवळ एकच होत्या हें सांगतां येत नाहीं. महाराष्ट्री ही मुख्य प्राकृत धरून इतर प्राकृतांची तीपासून भिन्नता थोडक्या सूत्रांत सांगतां येतील इतक्या त्या जवळ जवळ आहेत असें वररुचीचा ' प्राकृतप्रकाश ' दाखवीत आहे आणि प्राकृतप्रकाश बुद्धपूर्व स्थिति दाखवीत आहे. बुद्धाच्या अवतारानंतर जर प्राकृतप्रकाश तयार झाला असता तर पाली हें भाषानाम तरी त्यास लक्षांत घेऊन विवरण करावें लागलें असतें किंवा ' पाली ' हें नांव जर बरेंच उत्तरकालीन असलें तरी मागधींस अधिक महत्त्व द्यावें लागलें असतें. बुद्धपूर्व काळीं चांगल्या तऱ्हेचा भाषाविकास महाराष्ट्राचाच झाला असला पाहिजे. त्या भाषाविकासाचीं कारणें काय असतील हें जरी आज निश्चयानें सांगतां आलें नाहीं तरी त्यांविषयीं कांहीं तरी कल्पना देतां येईल.

### ४८४. संस्कृत भाषेची मूलप्रकृति.

४८४. संस्कृत भाषा जी तयार झाली ती कोठील स्थानिक भाषेवर संस्कार होऊन तयार झाली हेंही आज सांगतां येत नाहीं. कोणच्या स्थानिक भाषेवर संस्कार होऊन आजची हिंदुस्थानी भाषा झाली हें सुद्धां अजून बरेंचसें गूढ आहे. तर संस्कृत भाषा कोणच्या ठिकाणच्या भाषेला संस्कार होऊन तयार झाली हें सांगणें जवळ जवळ दुरापास्तच आहे असें म्हणावें लागेल. पाणिनीनें जी भाषा संस्कारार्थ घेतली ती भाषा त्यावेळच्या प्रतिष्ठित नागरवर्गाची होती कीं, सर्वसामान्य जातीची होती यांविषयीं विचार केल्यास त्यानें नागरवर्गाचीच किंबहुना साक्षरवर्गाचीच भाषा घेतली असली पाहिजे हें उघड आहे. साक्षरवर्ग आणि सामान्यवर्ग हे भेद प्रत्येक काळीं आणि प्रत्येक स्थळीं असावयाचेच आणि जी भाषा लिहिली जात नाहीं पण बोलण्यापुरती नागरवर्गाची म्हणून ठरली असते अशी भाषा देखील असूं शकते. उदा० कोंकणी घ्या. गोव्यांतील सारस्वतांची कोंकणी आणि कुणब्याची कोंकणी यामध्यें अंतर सांपडतेंच. हें अगदीं लहान क्षेत्राचें उदाहरण झालें. मोठ्या क्षेत्रांतील उदाहरण पाहावयाचें म्हटलें म्हणजे बंगालमधील घ्यावें. बंगालमधील प्रांथिक भाषा आणि प्रतिष्ठितवर्गाची बोलण्याची भाषा या दोन भिन्न आहेत असें ३०–४० वर्षांपूर्वीं बंगालीचें वैयाकरण म्हणत होतेंच. चीनमध्यें चित्रलिपी असल्यामुळें शुद्ध किंवा अशुद्ध हा प्रश्न लिहिण्यापुरताच होतो आणि प्रत्येकाची भाषा ही उपभाषाच झाली. तथापि मांदारीनवर्गाची भाषा ही सामान्य लोकांच्या भाषेपेक्षां निराळी असते व ही कृत्रिम भाषा आहे असेंही लोक म्हणतात आणि अधिकारी लोक एकत्र जमले म्हणजे ते या भाषेंत बोलतात. अमेरिकन किंवा इतर युनिव्हर्सिट्यांतील चिनी विद्यार्थी याच भाषेंत बोलतात, त्याप्रमाणें क्रिया पाणिनीच्या काळीं झाली असली पाहिजे. प्रत्येक ठिकाणीं स्थानिक भाषा भिन्न असणार तरी देखील सामान्य सुशिक्षित भाषेची चाड बाळगणारा असा एक वर्ग होताच. तो वर्ग म्हटला म्हणजे सूक्तें ज्यांनीं तयार केलीं व बाळगलीं त्यांच्या ऋषिवर्गांतल्या वंशजांचा होय. या वर्गांतूनच पुढें अनेक आचार्य निघाले आणि ब्राह्मण निघाले. हे ब्राह्मण सर्व हिंदुस्थानभर पाणिनीच्या पूर्वींच्या काळांतच पसरले होते. संहितेच्या काळांतच म्हणजे ब्राह्मणग्रंथरचना ज्या काळांत झाली त्या काळांतच या सुशिक्षित वर्गाची भाषा तयार होत होती आणि तीच भाषा आपणास ब्राह्मणांतून आणि आरण्यकांतून दृष्टीस पडत आहे. या काळांत जुन्या सूक्तांचें संहितीकरण झालें आणि मंत्रांची विशिष्ट पद्धतीनें प्रयोगानुसार मांडणी झाली. त्यावेळच्या सामान्य लोकांना वेदांतील भाषा कळेनाशी झाली

होती ही गोष्ट केवळ उच्चारसादृश्यावरून मंत्र विशिष्ट विधी-करतां योजीत असत त्यावरून सिद्ध होते. आजच्या पूजेमध्यें 'दधिक्राव्णोऽकारिषम् जिष्णोरश्वस्यवाजिनः' ॥ हा मंत्र दधिस्नानाकरतां वापरला जातो. पण दधिक्रावा आणि दधि याचा संबंध कांहींच नाहीं. ही जशी आजची गोष्ट आहे तशाच मौजेच्या अनेक गोष्टी वेदांतून सांपडतील; म्हणजे यावरून असें स्पष्ट दिसतें कीं ज्यावेळेस मोठे यज्ञ करण्याची सुरवात झाली आणि त्या यज्ञाच्या कृतीसाठीं ब्राह्मणें तयार झालीं त्यावेळेस ही चळवळ ज्या शिष्टवर्गानें केली तो शिष्टवर्ग भिन्न-स्थानीय सामान्य जनतेपासून दूरावलेला आणि ती भाषा आपल्या कृत्यापुरती वापरणारा असा झाला होता. त्यांचीच भाषा घेऊन पाणिनीनें त्याचें व्याकरण तयार केलें-अर्थात तें तयार करण्यास त्याच्या पूर्वी श्रम बरेच झाले होते ते उपयोगी झाले यांत शंका नाहीं.

## ४८५. संस्कृतभाषापांडित्य आणि त्याचा यज्ञ-विषयक वादांत विकास.

४८५. पाणिनिपूर्व वैयाकरणांची आपणांस माहिती आहेच. या व्याकरणाचा उद्भव यज्ञसंबंधींच्या वादविवादांत उत्पन्न झाला. कर्तव्य किंवा अकर्तव्य हें ठरविण्यासाठीं व्याकरणाची चर्चा होऊं लागली होती आणि येणेंप्रमाणें वेदमूलक भाषा तयार होऊन आणि ती याजकवर्गामार्फत चोहोंकडे पसरून तिच्यांत जे अनेक भेद झाले होते त्याचें पुन्हा मान्य एकीकरण होऊन अनेक गुंतागुंतीचें व्याकरण उत्पन्न झालें. ही संस्कृत भाषा तयार झाली त्याच वेळेस प्राकृतही असली पाहिजे असें वाटतें. संस्कृत ही याज्ञिकांची वेदमूलक भाषा होती. प्राकृत ही इतरेजनांची भाषा भिन्न संस्कृतिमूलक होती म्हणजे प्राचीनतर संस्कृति-मूलक होती. ज्या भाषेमध्यें रामायणमहाभारतादि वीर-काव्यांचें मूळ तयार झालें, ती भाषा आजच्या भाषेशीं बरीच सदृश पण वेदांहूनहि प्राचीनतर असली पाहिजे. तर "तव" च्या ऐवजीं "तुज्झ" बोलणारी भाषा ख्रिस्तकालीं होती याबद्दल आपणांस ग्रांथिक पुरावा आहेच. वेदपूर्व कालीं तीच भाषा ख्रिस्तकालीन भाषेशीं अत्यंत सादृश्य धारण करणारी असली पाहिजे, असें निर्भयपणें अनुमान करतां येईल. वेदपूर्वकालापासून देशांत आर्यन् महावंशाची भाषा बोलली जात आहे व आजहि बोलली जात होती. या पांच हजार वर्षांमध्यें निरनिराळ्या कालांत अनेक वाङ्मयी भाषा उत्पन्न झाल्या आणि त्यांचा विलय झाला त्या सर्वांची स्थूल कल्पना तरी आल्याशिवाय निरनिराळ्या कालांतील संस्कृतिविकास, संस्कृतिविनाश आणि संस्कृतीची पुनर्घटना यांचा इतिहास समजणार नाहीं. राजकीय इतिहास या भाषात्मक इतिहासां-तील एक उपप्रकरण आहे.

## ४८६. वेदपूर्व काळापासून भाषाविषयक स्थित्यंतराचीं कारकें व काळ.

### विशिष्ट राज्य आणि राजधानी यांचे परिणाम.

४८६. भाषेचा विकास आणि रूपांतर यांच्या इतिहासांत राज्यांचे व तत्संबद्ध नगराचे उदय हे महत्त्वाचे आहेत. कारण हिंदुस्थानच्या सांस्कृतिक इतिहासांत जें भाषाविषयक स्थित्यंतर होत गेलें तें कसें काय होत गेलें याच्या स्वाभाविक क्रिया लक्षांत घेतल्या पाहिजेत.

नागरिक भाषा आणि ग्रामभाषा यांचें दीर्घकालीन इति-हासांत महत्त्व काय आहे आणि अल्पकाळ त्यांना महत्त्व कसें कसें प्राप्त होतें हें लक्षांत घेतलें पाहिजे. हिंदुस्थान हा कृषि-प्रधान देश आहे, आणि मधून मधून प्रचंड लोकवस्तींचीं शहरें उत्पन्न होतात आणि विलय पावतात असा हा देश आहे. हीं शहरें मुख्यतः राजकीय कारणानेंच वाढावयाचीं. राजधानी झाल्यामुळें शहर वाढणार, किंवा तें सुभेदारांचें किंवा मांडलिकाचें गांव म्हणून वाढणार. सुभेदाराचें गांव असल्या-मुळें अनेक मोठ्या शहरांची स्थापना झाली आहे. अशांतच पैठणचा उल्लेख करतां येईल.†

जेव्हां राजकीय कारणामुळें एखाद्या गांवाला महत्त्व येई, तेव्हां त्या गांवांत अनेक प्रकारचे लोक येत, परके लोक येत, विद्वानांचा वर्गहि येई आणि त्या भाषेस महत्त्वाचें स्थान येई. नगराची भाषा ती नागर होय; आणि खेड्यांतली ती ग्राम्य होय. ग्राम्य भाषा संस्काराशिवाय असे आणि शहरां-तल्या भाषेला उच्च व्यवहारमूलक संस्कार प्राप्त होई हें स्वाभाविकच होतें. पुढें खेड्यांतील भाषेपर्यंत नागर भाषेचा संस्कार पोहोंचू शके पण तीवर कायमचा परिणाम नागर भाषा करीत नसावी असें वाटतें.

ख्रिस्तपूर्व काळींच बहुतकरून शुंगांच्या कालांत म्हणजे शातवाहनांच्या आद्यकाळांत भाषाविषयक निराळी परिस्थिति उत्पन्न झाली.

---

† पैठण या शहराचें प्रतिष्ठान हें संस्कृतीकरण शास्त्र-शुद्ध नाहीं. पतिस्थान हें संस्कृतीकरण बरोबर होईल. पति म्हणजे सुभेदार. कोणच्या तरी सम्राटाचा सुभेदार प्रथम पैठ-णला रहात असावा आणि तेंच पुढें राजधानीचें शहर झालें. नागपूर आणि पुणें हीं देखील विषयस्थानें म्हणून प्रसिद्ध होतीं.

जी नागरभाषा उत्पन्न होई ती देशांतील संस्कृत भाषेचा पगडा पावे आणि संस्कृताश्रयी होई. तथापि स्थानिक शिष्टवर्ग किंवा शिष्टजाती यांचाहि पगडा त्या भाषेवर पडल्याशिवाय रहात नसे. जे शब्द प्रचलित होतात ते संस्कृतमधलेच प्रचलित होतात असें नाहीं. उदाहरणार्थ आजच्या नेहेमीच्या लिहिण्याच्या मराठींत "सर्पण" हा शब्द येतो. "इंधन" हा येत नाहीं. तथापि वऱ्हाडांतल्या कुणब्याच्या भाषेंत इंधन हा शब्द प्रचलित आहे. पण तो जर वापरला तर तो संस्कृतअसूनहि पुष्कळ लोक तो अशिष्ट शब्दच मानतील. एवंच नागरभाषेस जें विशिष्टस्वरूप येतें तें संस्कृत भाषेच्या आश्रयामुळेंच केवळ न येतां शिष्ट झालेल्या वर्गामुळें येत असतें.

कालांतरानें जें स्वरूप शिष्ट झालें असेल तें त्या राजधानीच्या बरोबरच नष्ट होतें. आणि दुसऱ्या ठिकाणीं भाषेची जोपासना सुरू होते आणि एक नवीन शिष्टस्वरूप तयार होऊं लागतें. पण ग्रामभाषा विशेष परिणाम पावत नाहीं. शहरांतील संस्कृतीच्या अनेक लाटा ग्रामभाषेच्या डोक्यावरून जातात, लाट जवळची असेल तर परिणाम अधिक करील; दूरची असेल तर परिणाम थोडा करील. पण एकंदर परिणाम किती काल राहील याचा संशयच. पुण्याच्या आसपासच्या लोकांना 'छप्परमैना' शब्द ठाऊक आहे. पण तो शब्द छप्परमैना पुण्यांतून निघून गेला म्हणजे एकदोन पिढ्यांनीं भाषेंत तो शब्द राहील किंवा नाहीं याची वानवाच आहे. खेड्यांत ज्या लावण्या पसरतात, त्यांचा उगम खेड्यांतच होतो असें नाहीं. तर ग्राम्यांना आकर्षण करूं इच्छिणारा जो नगरवासी वर्ग असतो त्यांतहि अनेक लावण्यांचा उगम होतो.

ग्राम्य आणि नागर यांची स्पर्धा थोडीबहुत असते; नागर भाषा अधिक प्रतिष्ठित गणिली गेली तथापि प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या भाषांतहि स्पर्धा असतेच.

"स्थानिक प्रतिष्ठित" आणि "व्यापकक्षेत्रीय प्रतिष्ठित" ऊर्फ "भारतीय प्रतिष्ठित" अशा संस्कृतीची स्पर्धा अधिक असते आणि अशा प्रसंगीं स्थानिक प्रतिष्ठित भाषा फार दिवस जीव धरून राहूं शकत नाहीं असें दिसतें. स्थानिक प्रतिष्ठित वर्ग दुय्यम दर्जाचा होतो, आणि त्याला अखिल भारतीय महत्त्व नसल्यामुळें त्याचें महत्त्व फार दिवस टिकून रहात नाहीं. त्याच्या राजधानीच्या नाशाबरोबर त्या वर्गाचाहि नाश होतो.

कुरुयुद्धकालीं महाराष्ट्रांत कुंडिनपुर, भोजकट, या राजधान्या म्हणून प्रसिद्ध होत्याच. शूर्पारक क्षेत्र देखील प्रसिद्ध शहर असावें, आणि कुरुयुद्धाच्या पूर्वीच्या कालांतहि कुंडिनपूर हें तर असावेंच पण निषध या सुप्रसिद्ध राज्याची राजधानी कोठेंतरी असावी. अश्मक आणि कुंतल यांच्या राजधान्या कुरुयुद्धकालीं महत्त्वाच्या होत्याच. या सर्व ठिकाणीं जी महाराष्ट्री भाषा संवृद्ध झाली असावी तिचें स्वरूप आज उपलब्ध नाहीं.



## ४८७. अन्यजातिप्रामुख्य आणि त्याचे परिणाम.

४८७. राज्य व राजधानी भाषास्थित्यंतरास कारण होतात; पण त्यांचा परिणाम अल्प असतो, पण जेव्हां अन्यजातीय लोक प्रदेश जिंकतात किंवा त्यांचें संख्याबळ पुष्कळ होतें तेव्हां भाषेवर अधिक महत्त्वाचे फेरफार होतात. महाराष्ट्रीय भाषा वैदिक भाषेइतकीच जुनी आहे. तथापि तिचें वेदकालीन स्वरूप आज आपणांस उपलब्ध नाहीं या भाषेंतील कोणता काव्यसंग्रह संस्कृतीकरण होऊन महाभारतांत समाविष्ट झाला असेल असें विचारतां नल-दमयंती आख्यानाकडे बोट दाखवावेंसे वाटतें.

शेतकरी जाती व वाङ्मयोत्पादक जाती यांचे भाषेवर झालेले परिणाम शोधतां येतील, तथापि महार, कुणबी, माने, कोळी, भोई अगर भोज यांच्यामुळें भाषेवर परिणाम काय झाले ते जाणण्याइतका मराठी भाषेचा अभ्यास अजून वृद्धिंगत झाला नाहीं.

अखिल भारतीय संस्कृतीचें ऐक्य घडून आलें त्याच्या इतिहासांत उच्च संस्कृतीच्या वाहक जातींचा प्रसार, भिन्नलोकसंनिकर्ष आणि भिन्न लोकांच्या पूर्वार्जित संस्कृतीचें एकीकरण यांचा इतिहास हा एक महत्त्वाचा भाग होय.

जे लोक मूळचे एक पण पुढें दूर पसरतात त्यांत भिन्नता उत्पन्न होते व जे भिन्न पण जवळ येतात त्यांत सादृश्य उत्पन्न होऊं लागतें.

मूळचें ऐक्य असल्यास उत्तरकालीन ऐक्य अधिक सुलभ होतें. तरी मूळचें ऐक्य कायम रहाण्यासाठीं कांहीं तरी ऐक्यवर्धक क्रिया अवश्य होतातच.

दोन लोक मूळचे सदृश असले तरी उत्तर काळीं सदृश रहातीलच असें नाहीं. हंगेरीचे लोक मूळचे आर्यन वंशांतील नाहींत, तरी आज त्यांच्या एकंदर संस्कृतीचें स्वरूप इतर यूरोपीयन लोकांप्रमाणें झालें आहे. द्राविडांची भाषा आर्यन् लोकांच्या भाषेपेक्षां अगदीं भिन्न आहे तीवरून त्यांचें वंशभिन्नत्व स्पष्ट आहे, पण ते लोक आणि उत्तरेकडील हिंदू हे एकमेकांकीं सदृश असे समाज बनले आहेत. पूर्व बंगालमधील बराच मोठा लोकसमूह आर्यन् महावंशाचा नाहीं. तो मंगोल आणि द्राविड महावंश यांच्या मिश्रणानें बनलेला

आहे हें रिस्ले वगैरे सेन्सस अधिकाऱ्यांचें मत आहे. तें बरोबर धरलें तर या भिन्न महावंशांच्या लोकांमध्यें एकमेकांशीं सादृश्य इतकें उत्पन्न झालें आहे कीं, ते सर्व एक जनता आहेत असें म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं. भिन्न लोकांत सादृश्योद्भव आणि सदृशांचें भिन्नीकरण हेच परिणाम राजकीय विजय, संप्रदायप्रसार इत्यादि कारणांनीं उत्पन्न होतात. सामाजिक दृष्टीनें राजकीय आणि धार्मिक स्थित्यंतरांचा इतिहास म्हणजे एकाच जनतेच्या सादृश्य-भिन्नतांचा इतिहास आहे.

दोन जनतांतील किंवा जातींतील सामीप्य, दूरता, राजकीय विजय, धार्मिक प्रसार या सर्व गोष्टींचा परिणाम महाराष्ट्रांवर झालेला आहे आणि प्रत्येक गोष्ट समाजावर स्मारक राहिल असा आपला परिणाम करती झाली आहे. तर या सर्व गोष्टींचीं स्मारकें शोधीत जुना इतिहास उकलीत जाणें हें एक मोठें कार्य आहे. तें कार्य करीत असतां भाषांचा सूक्ष्म अभ्यास बराच उपयोगी पडणार आहे.

सादृश्य आणि भिन्नता यांचीं स्वाभाविक कारणें सामीप्य आणि दूरता हीं आहेत; तर कृत्रिम कारणें राजकीय विजय आणि संप्रदायप्रसार हीं आहेत. तर स्वाभाविक आणि कृत्रिम कारणांची एकमेकांविरुद्ध क्रिया कशी काय होत असते हें जाणणें हा सामाजिक इतिहासांतील एक मनोरंजक भाग आहे.

## ४८८. जातिवैशिष्ट्याचें भाषेवर परिणामांच्या दृष्टीनें महत्त्वमापन.

४८८. जेव्हां दोन भिन्न जाती किंवा राष्ट्रें जवळजवळ येतात तेव्हां त्यांच्या मध्यें अंतर्भूत असलेल्या व्यक्तींची परस्परांस अनुकूल अशी पुनर्घटना होत असते. त्या पुनर्घटनेचें स्वरूप अत्यंत व्यापक असतें. धार्मिक आणि उपासनाविषयक पुनर्घटना होते, त्याप्रमाणेंच औद्योगिक क्रियाग्रामामध्यें देखील पुनर्घटना होते. कांहीं अंशीं उद्योगांस जातिविशिष्टता येते. ज्या क्रिया एका समाजांतीलच मंडळी करीत असतील त्या मंडळीऐवजीं नवीन संबंध आलेल्या मंडळीच्या हातीं कांहीं क्रिया जातात. व त्या नवीन आलेल्या मंडळीच्या कांहीं गरजा मूळची मंडळी भागवितात. जेव्हां एक देश दुसऱ्या लोकांकडून जिंकला जातो तेव्हां मुख्यतः या श्रमविभागांत फरक होतो. शासनकर्म तेवढें जेता घेतो, पण कृषिकर्म, व्यापार हे जवळजवळ जसेच्या तसेच रहातात. प्राचीन काळचा सामाजिक इतिहास समजावयाचा म्हणजे कोण कोणते भिन्न लोक एकत्र आले आणि त्यांच्या एकत्र आगमनानें सामाजिक क्रियाग्रामामध्यें काय भिन्नता आली हें समजून घ्यावयाचें.

## ४८९. जातिमूलक अगर धर्मसंप्रदायमूलक स्थित्यंतरांचा आढावा

४८९. भारती युद्धाच्या पूर्वी दक्षिणेकडे कोणते लोक होते आणि नंतर कोणते लोक आले या प्रकारचा इतिहास शोधूं पहाणें म्हणजे अंधारांत चांचपडणें तर खरेंच, पण जातिभेदसंरक्षक हिंदुस्थानांतील कोणत्याहि भागाच्या बाबतींत हा इतिहास देणें जगाच्या इतर भागापेक्षां अधिक सुलभ आहे. नवीन येणाऱ्या जाती जुन्याशीं मिसळत नाहींत असें नाहीं. त्या मिसळतात पण जुन्या व नव्या आलेल्या अशा दोन्ही जाती आपलीं कांहींतरी वैशिष्ट्यें राखून ठेवतात.

## ४९०. द्राविडी प्रदेशांतलि अशोकोत्तर भाषाविषयक परिस्थिति.

४९०. अशोकाच्या कालापासून चालुक्यपूर्व जो विस्तृत काल होऊन गेला त्या कालामध्यें द्राविड चतुष्टयांच्या प्रदेशांत सांस्कृतिक परिस्थिति कशी काय होती तिचें आकलन करण्यासाठीं संस्कृतीचें एक अंग जी भाषाविषयक परिस्थिति तिचें आकलन झालें पाहिजे.

द्राविड चतुष्टयांपैकीं पांड्यचोलांचा प्रदेश अशोक साम्राज्याखालीं आला नाहीं असें दिसतें आणि त्यामुळें बौद्धांच्या परिणामापासून तो प्रदेश सामान्यतः अलिप्तच असावा; तथापि कर्नाटक आणि आंध्रांचा प्रदेश प्रथम मौर्यांच्या आणि नंतर शातवाहनांच्या स्वामित्वाखालीं आला आणि त्यांच्या कारकीर्दींत या दोन्ही भाषांवर प्रथम प्राकृत आणि नंतर संस्कृत भाषांचे कायम परिणाम झाल्याशिवाय राहिले नाहींत. चालुक्यांची राजधानी कानडी मुलखांत होती आणि त्यांनीं कानडी भाषेंत दरबारी लिखाण करण्यास सुरवात केली. त्याच्या अगोदर राज्यकारभाराची भाषा प्राकृत आणि बौद्धग्रंथांची भाषाहि एक तऱ्हेची प्राकृतच. या दोन कारणांमुळें आर्यन् भाषांचा परिणाम या दोन द्राविड भाषांवर झाला. तामिळ आणि मल्यालम् यांचें भिन्नीकरण दहाव्या शतकापूर्वी झालें नव्हतें असें एकमत आहे. तें खरें असल्यास तामिल, तेलगू आणि कानडी या तीन भाषांतीलच सादृश्यांचा आणि विसादृश्यांचा आपणास विचार करावा लागतो. या तीन भाषांपैकीं तेलुगू आणि कानडी यांत सादृश्य अधिक आहे व त्या दोहोंचें तामिलपासून विसादृश्य आहे. कानडी व तेलुगू यांचें एकमेकांशीं सादृश्य हें आर्यन भाषांचा परिणाम दोहोंवर तामिलपेक्षां अधिक झाला त्यामुळें उत्पन्न झालें आहे; तथापि

अत्यंत प्राचीनकाळीं द्राविड भाषा एकच असणें शक्य आहे आणि तामिल, तेलुगू, कानडी, हे सर्व भेद प्रांतिक फरकांच्या स्वरूपाचे आहेत. या तिन्ही भाषांत सर्वनामें आणि मूलधातु हीं सर्व एकच आहेत आणि त्या सादृश्यावरून किंवहुना ऐक्यावरून आणि प्राचीनकाळच्या द्राविडी संस्कृतीचा अजमास करण्याचे प्रयत्न झाले आहेत. त्या अभ्यासाचें फल काल्डवेल यांनीं आपल्या द्राविडांच्या तौलनिक व्याकरणांत दिलेंच आहे.

तामिळ भाषेवर आर्यन भाषांचा परिणाम सर्वांत कमी झाला आहे तरी देखील आर्य भाषेचा द्रवीडावर परिणाम अत्यंत प्राचीनकालीं झाला असला पाहिजे.

एकपक्षीं तामिल आणि दुसऱ्यापक्षीं कन्नड आणि तेलुगू यांमध्यें भाषाभिन्नत्त्व उत्पन्न कसें झालें, याचें कारण औदिच्यांच्या शासनाचा परिणामच होय असें म्हैसूरच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याचे डॉ कृष्ण अय्यंगार यांनीं व्यक्त केलें आहे. डॉ. कृष्ण अय्यंगार यांनीं असें दाखविलें आहे कीं † संस्कृत भाषेचा परिणाम कानडीवर नंतर झाला आणि त्याच्या अगोदर प्राकृतचा परिणाम झाला होता आणि त्याचें कारण मौर्य, शातवाहन, चुटु आणि कदंब या आर्यन् भाषा बोलणारांची सत्ता देशावर होती हें होय. कानडी वैयाकरणांनीं ज्यांस तद्भव म्हटलें ते शब्द त्या वैयाकरणाच्या समजुतीप्रमाणें संस्कृतमधून जसेच्या तसेच येऊन कानडी मुखांत अपभ्रंश पावलेले नसून ते प्राकृत मधून आले आणि अपभ्रंश न पावतां जसेच्या तसेच राहिले असें आहे. ते तद्भव नसून केवळ प्राकृत शब्द आहेत. कारण प्राकृत शिलालेखांत आणि वैयाकरणांस सांपडलेल्या स्थितींत त्या शब्दांचें रूप एकच आहे. अशा प्राकृतमधूनच आलेल्या शब्दांचीं उदाहरणें म्हणून पुत ( पुत्र ), सिरि ( श्री ) संवछर ( संवत्सर ), बितिय ( द्वितीय ), सासन ( शासन ), देसकाल ( देशकाल ), यस अगर जस ( यशस् ), वन्न अगर बन्न ( वर्ण ), पुरिस ( पुरुष ), बम्हन ( ब्राह्मण ), तेज ( तेजस् ), तप ( तपस् ), सच्च ( सत्य ), हे शब्द दिले आहेत.

नृपतुंगाचा कविराजमार्ग हा जो कानडींतील आज उपलब्ध असलेला अत्यंत प्राचीन ग्रंथ आहे तो दंडीच्या काव्यादर्शाचें रूपांतर असल्यामुळें हा ग्रंथ संस्कृत भाषेचा प्राकृत भाषेवर वरचष्मा स्थापित झाल्यानंतरचा आहे, आणि त्यामुळें सर्व भाषा संस्कृतपासून झाल्या वगैरे समजुतींचा प्रारंभ झाल्यानंतरचा आहे असें डॉ. अय्यंगर समजतात. त्या काळांत प्राकृत शब्द तद्भव आहेत अशी कल्पना संस्कृत पंडितांची झाली होती आणि त्याच कल्पना पुढें कानडी वैयाकरणांत शिरल्या.

आम्ही वरील कृष्णस्वामींचें मत कांहीं अंशीं स्वीकारपूर्वक देत आहों. तरी त्या बरोबर असें म्हणत आहों कीं, प्राकृत भाषांचा द्राविड भाषांवर झालेला परिणाम केवळ मौर्यकालीन नसून त्याच्या पूर्वीच्या अनेक शतकांचा असला पाहिजे. ख्रि. पू. २००० या कालीं किंवा त्याच्याहि अगोदर आर्यद्राविड संबंध उत्पन्न झाला असणें शक्य आहे आणि या दोन संस्कृतींच्या घर्षणाचा इतिहास आम्ही त्याचसाठीं आदिपर्वांत देत आहोंत.

तामील प्रदेशांत प्राकृत भाषा आणि ब्राह्मीलिपी यांचा परिणाम झाला नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. सर्व दाक्षिणात्य लिपींत जर ब्राह्मीच्याच उत्तरावस्था आहेत तर ब्राह्मीलिपींत लिखाणें सांपडावयाचींच. तशीं सांपडतहि आहेत. त्रिचनापल्ली जिल्ह्यांतील कारुर तालुक्यांत मुगाळूर खेड्याजवळ अशा प्रकारचे लेख आहेत. लिपी ब्राह्मी आहे. भाषेचा प्रश्न या लेखांत महत्त्वाचा नाहीं; कारण या लेखांत फक्त दात्यांचीं अगर प्रोत्त्यांचीं नांवें आहेत.

ब्राह्मीलिपीच्या काळाहून देखील प्राचीन काळीं आर्यद्राविड संबंध असलाच पाहिजे असें इतर पुराव्यावरून वाटतें. त्या काळचीं स्मारकें आज जरी सांपडत नसलीं तरी उद्यां सांपडतील अशी प्रस्तुत लेखकास दृढ आशा आहे. नवीन साहित्य उपलब्ध झालें म्हणजे सिंधुसंस्कृतीच्या काळच्या लिपीनंतर ब्राह्मीलिपीचीं उत्तर स्वरूपें कशीं संस्थापित झालीं असा प्रश्न उत्पन्न होईल आणि तो सोडवण्याचें कार्य भावी संशोधकांवर पडेल. आणि लिपिशास्त्राचा त्याचप्रमाणें भाषांचा नवीन इतिहास आपणांस उपलब्ध होईल.

---

† RMA 1929

## प्रकरण ५३ वें.

# प्राचीनांची समाजभावना.

### ४९१. प्राचीन जगाची दैवताविषयक वृत्ति.

४९१. कुरुयुद्धापासून ख्रिस्ती संप्रदायाच्या आरंभापर्यंत जगभर पसरलेल्या मानवजातीमध्यें परस्पर सामाजिक व्यवहार कसा होत होता हें सहज लक्षांत येण्याजोगें नाहीं. त्या काळची समाजभावना लक्षांत घेतल्याशिवाय त्या कालाचें यथार्थ स्वरूप समजणार नाहीं. ख्रिस्तपूर्व कालाचा ग्रीस देशापासून किंबहुना इंग्लंडपासून कांबोजपर्यंत आपण सर्व समाज घेतला तर त्या सर्व समाजामध्यें अत्यंत सादृश्य होतें. लोक आपले देव ते खरे दुसऱ्यांचे देव ते खोटे असें मुळींच समजत नसत. तर सर्वांचेच देव खरे असें ते समजत. ज्याप्रमाणें आज हिंदुस्थानांतला सामान्य मनुष्य आपली कुलदेवता खरी मानतो व दुसऱ्याचीही खरी मानतो, निदान मान्य समजतो, त्याप्रमाणेंच गोष्टी त्याकाळीं घडून येत; ग्रीक लोक तर ज्या ठिकाणीं जातील त्या ठिकाणच्याच देवतांना भजण्यांत तत्पर होते. ही गोष्ट आतां आजच्या संशोधकांस जरी समजूं लागली आहे तरी या परिस्थितीबद्दल तर त्यांना नवल वाटत आहे. परंतु भारतीयांना तींत कोणत्याहि प्रकारची नवलाई वाटण्याचें कारण नाहीं. दुसऱ्या ग्रामदेवतेचा आपण त्या गांवाला गेलों म्हणजे आदर करावा; बायकोनें नवऱ्याची कुलदेवता स्वीकारावी, नवऱ्यास देखील आपली कुलदेवता स्वीकारावयास लावावें या गोष्टी आपणांस अत्यंत परिचयाच्या आहेत. कोंकणस्थ ब्राह्मणांसारख्या जातीमध्यें बायको नवऱ्याच्या घरीं येते तेव्हां तिनें आपलें दैवत बरोबर घेऊन यावें असा विधि आहे. प्राचीन काळामध्यें सर्व लोकांमध्यें एकमेकांच्या देवतांना सन्मान देण्याची जी बुद्धि होती ती यहुद्यांतहि होती, आणि यहुदी लोकांच्या प्रॉफेटांनीं या लोकप्रवृत्तीबद्दल मोठी शिरा ताणून त्यांची निंदा केली आहे. इस्राएलांचा देव जो याहवे किंवा जुहोवा त्यास सोडून तुम्ही इतरांस कां भजतां? अशा त्यांच्या आक्रोशांनीं जुन्या कारागिरांतील प्रवक्त्यांचें म्हणजे प्रॉफेटांचें वाङ्मय तुडुंब भरलें आहे. या प्रॉफेटांच्या प्रस्तुत तडफडीशिवाय प्राचीन जगांत अन्यजनदेवतावैरुद्धयाची चळवळ फारशी दिसत नाहीं. यहुद्यांची ती संकुचित वृत्ति जगाला पुढें उपद्रवकारी झाली. आपलाच देव खरा ही वृत्ति, आणि सर्वांचेच देव खरे ही वृत्ति या एकमेकांपासून भिन्न आहेत. पहिल्या वृत्तीची जोपासना सेमेटिक जगांत झाली तर दुसऱ्या वृत्तीची जोपासना हिंदू जगांत झाली.

### ४९२. दैवतविषयक आणि मतविषयक प्रश्नाविषयीं भारतीय राजे लोकांची भावना.

४९२. हिंदुस्थानामध्यें "आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासदः" म्हणजे इच्छापूरक सार्वभौमाच्या सभेंत सर्व देवतांचा सन्मान व्हावा हेंच ध्येय वागविलें जात होतें. आणि तें सदैव जागृत ठेवण्यासाठीं मंत्रपुष्पासारख्या समारंभीं सूक्तांत तें वाक्य समाविष्ट केलें होतें† आणि अशोकाच्या साम्राज्यांत परपाषण्डपूजन म्हणजे इतर धर्मास किंवा मतास मान देणें हा साम्राज्यास साजेसा सद्गुण समजला जाई. जैन मताचा अभिमानी खारवेल आपण सर्व प्रकारच्या धर्मांचीं देवळें दुरुस्त केलीं अशांतच अभिमान मानी. अर्थात् राजे लोकांना भिक्षुकी वाटणींत हिस्सा नसल्यामुळें इतर जनांच्या देवतांची किंवा भिन्न मतांची प्रतिष्ठा झाल्यास त्याबद्दल राजांना असूया असणें शक्य नाहीं. यहुद्यांच्या भिक्षुकांनीं आपल्या राजे लोकांना धर्माच्या बाबतींत औदार्याबद्दलच दोष दिला आहे.

### ४९३. भिक्षुकाची धर्मभावना आणि राजे लोकांची धर्मभावना यांत वैरुद्धय.

४९३. भिक्षुकांची धर्माच्या बाबतींत उदार वृत्ति स्वाभाविकपणें नसणार. भिक्षुकांमध्यें आपली दक्षिणा दुसरा घेऊन जाईल याबद्दल जी तडफड सुरू होते तीच तडफड प्रथम एकदेवपूजनाच्या आग्रहामध्यें दृष्टीस पडली. यहूद्यांचा देव तोच खरा. इतर देव खोटे निदान अपूज्य अशी जी दुराग्रहाची वृत्ती यहुद्यांत निघाली ती खरोखर एकेश्वरी होती असें म्हणतां येणार नाहीं. ते दुसऱ्यांचे देव सैतानांचे अंश असें बोलत असले तर त्याचा अर्थ एवढाच कीं ते देव त्यांच्यामतें कमी प्रबल आहेत. त्या दुराग्रही वृत्तीचाच विकास

† मंत्रपुष्प या नांवानें जें सूक्त पूजेंत म्हटलें जातें तें वेदांत एका ठिकाणीं आढळत नाहीं. अनेक ठिकाणचीं वाक्यें गोळा करून तें बनविलें आहे. समारंभाच्या शेवटीं घालावें या हेतूनें त्याची घटना झालेली दिसते.

म्हटला म्हणजे ख्रिस्ती व मुसलमान हे ज्या धर्मास एकेश्वरी धर्म म्हणतात तो धर्म होय.

## ४९४. हिंदुस्थानांत धार्मिक असूयेचा अभाव.

४९४. हिंदुस्थानांतील धर्मविषयक व्यवहार करणारा वर्ग या धार्मिक असूयेपासून बराचसा अलिप्त होता. हिंदुस्थान व पश्चिम आशिया यांच्यामध्यें धर्मविकासाच्या आणि त्याबरोबर समाजाच्या एकीकरणाच्या भिन्न भिन्न क्रिया झाल्या. हिंदुस्थानामध्यें जी क्रिया झाली ती क्रिया म्हटली म्हणजे भिन्नमार्गसमुच्चयीकरणाची होय. या क्रियेंतच भारतीय संस्कृतीचें वैशिष्टय आहे. देवतांचें ऐक्य स्थापून वाङ्मयाचें संहितीकरण आणि बृहद्यागपद्धतीनें सर्व प्रकारच्या उपाध्यायवर्गांचें एकत्रीकरण ऊर्फ सहकार्यसाधन, या गोष्टी या क्रियेंत अंतर्भूत होतात. पश्चिमेकडे विकास निराळ्या पद्धतीनें झाला. पाश्चात्यांची पद्धत म्हटली म्हणजे "माझा धर्म तो खरा, माझा देव तो खरा, तो एकच आहे आणि त्यापासून जें भिन्नत्व दिसेल तें जांगलधर्म आहे ऊर्फ मूर्तिपूजा आहे, ऊर्फ ईश्वराचा अपमान आहे" या प्रकारच्या वृत्तीची जोपासना होय. या दोन क्रियांचें भिन्नत्व भिन्न ठिकाणीं भिन्नेतिहास उत्पन्न करतें झालें. यासाठीं माझ्यापासून दिसणारें भिन्नत्व मी मारून टाकलें पाहिजे अशी असहिष्णु वृत्ति पाश्चात्यांत उत्पन्न झाली. उलटपक्षीं हिंदुस्थानानें प्रत्येक जातीचें स्वतंत्र अस्तित्त्व, स्वतंत्र संस्कृति ऊर्फ धर्म यांचें संरक्षण केलें आणि सर्व जग ब्रह्मानें भरलें आहे अशा तऱ्हेचें व्यापक आणि सर्व लोकसंयोजक तत्त्वज्ञान उत्पन्न केलें. असो.

## ४९५. बौद्ध आणि जैन संप्रदायांची थोडीशी भिन्न वृत्ति.

४९५. हिंदुस्थानामध्यें जैन आणि बौद्ध संप्रदाय उत्पन्न झाले त्यांच्या पाठीमागें विशिष्ट देवतेचा पगडा नव्हता आणि विशिष्ट देवाला इतर लोकांवर स्थापन करण्याची चळवळ सुरू झाली नव्हती. कारण जैन व बौद्ध यांचे देव मूळचे परकीय अगर निराळे असले तरी ते सर्वजनदेवतासंघांत केव्हांच समाविष्ट होऊन गेले. त्यामुळें दुसऱ्यांच्या देवता व धर्म खोटे म्हणण्याचीहि आवश्यकता नव्हती. तत्त्वज्ञानाचा प्रसार प्रचलित देवतांच्या उन्मूलनाचा अपेक्षी नव्हता. त्यामुळें तत्त्वज्ञान आणि मनुष्याचा आध्यात्मिक आणि स्वभावविषयक विकास यासंबंधानें जे विविध विचार उत्पन्न झाले त्यांचें कधींकधीं एकीकरण तर कधींकधीं स्वतंत्र संप्रदाय होऊं लागले. उपनिषदांत हें एकीकरण झालेलें दृष्टीस पडतें; पण त्याच्यांतच अनेक विचारसंप्रदाय पूर्वी होते याचीं जागोजाग स्मारकें आहेत. जैनांचें आणि बौद्धांचें हें तत्त्वज्ञानवाङ्मय निराळें राहिलें; तें औपनिषद संग्रहांत समाविष्ट होऊं शकलें नाहीं. त्यामुळें बौद्ध आणि जैन हे स्वतंत्र देवताविषयक संप्रदाय म्हणून न पसरतां आचारविचारविषयक संप्रदाय म्हणून पसरले. देवतावैशिष्ट्य जैनांत न राहिल्यामुळें त्या संप्रदायांत देवताविषयक एकंदर औदासिन्यच होतें. स्वतःची उन्नति व्हावयाची ती स्वतःच्या आचारविचारविषयक उच्चतेनेंच होणार. देवाच्या प्रसादानें नव्हे. या तऱ्हेची भावना जी प्रचलित होती तिचाच या दोन संप्रदायांत अनुवाद करण्यांत आला. पश्चिमेकडे जें भांडण झालें तें इस्राएलांच्या खऱ्या देवाच्या स्थापनेकरतां झालें आणि तो एक आहे आणि अनन्य आहे या कल्पना उद्भूत झाल्या. अर्थात् तो एक देव सर्व शक्तिमान आहे हें त्याबरोबर आलेंच. तर त्या एका देवाच्या तुष्टीसाठीं जो प्रयत्न करावयाचा त्याला महत्त्व आहे. मनुष्याला जें थोरपण येतें तें त्याच्या आचारविचारोत्पन्न कृतीपेक्षां ईश्वराच्या प्रसादानें येतें, ही भावना अधिक प्राधान्य पावली. ईश्वर जो दयाळू आहे, तो पापी जनांच्या मोक्षासाठीं आहे आणि त्याची अनन्यसेवा करणें महत्त्वाचें आहे, वगैरे मतें या एकेश्वरी धर्मांतून स्वाभाविकपणेंच निघूं लागलीं. तथापि या एकेश्वरी मताचा पगडा एकाएकीं यूरोप व पूर्व आशिया यावर पडला नाहीं. कारण ज्यू जरी एकेश्वरी मताचे होते आणि आग्रहानें आपला जातिधर्म आणि जातिदैवत यांचे अभिमानी होते, तरी त्यांना आपल्यामध्यें अन्य रक्त यावयास नको होतें. आणि आपला धर्म दुसऱ्यावर लादावयाची देखील त्यांची इच्छा नव्हती. त्यांचें लक्ष आपल्या जातीपुरतें होतें आणि त्या जातीमध्यें धर्माचें शुद्ध स्वरूप आपण राखावें या प्रकारची त्यांची भावना होती. त्यांना प्रश्न जो वारंवार पडे तो एवढाच कीं आपलाच देव जो अनन्य आणि खरा आहे आणि आपण त्याची लाडकी जात आहोंत तर आपण पारतंत्र्यांत कसें? या प्रश्नावर उत्तर अर्थात् त्यांचें अशा प्रकारचें होतें कीं आपण इस्राएलांच्या खऱ्या देवाला विसरून परक्या लोकांच्या देवाचें पूजन करीत आहों. हेंच आपल्या दुर्दैवाचें आणि पारतंत्र्याचें कारण आहे. त्यांच्या मनांत देखील दुसऱ्यांचे देव खोटे आहेत अशी खात्री नव्हती.

यहुदी लोकांची मूळची वृत्ति इतर लोकांहून निराळी नव्हती; लग्नामुळें दोन्ही कुळांचे देव एक व्हावयाचे त्याप्रमाणें त्यांच्यातहि होत असावेत; दुसऱ्या घराण्यांत मुलगी जातांना आपल्या घरचे देव नेते, ते कधीं कधीं चोरून नेते आणि देवता-

चौर्याच्या कामांत नवरामुलगा देखील भाग घेतो असा रिवाज महाराष्ट्रांत विशेषेंकरून देशस्थ ब्राह्मणांत चालू आहे. यहुदी लोकांत तोच रिवाज होता. मुलगी देव चोरून नेते अशी कथा " प्रारंभ " ग्रंथाच्या ३१ व्या अध्यायांत आली आहे. लाबानची कन्या राहेल हिचा नवरा जेकब हा सासऱ्याचें घर सोडून गेला तेव्हां राहेलनें बापाच्या घरचे देव चोरून नेले. बाप ते शोधावयास आला असतां आपण "बाहेरची" म्हणून उठली नाहीं आणि आपल्या आसनाखालीं ते तिनें लपविले होते. तिच्या नवऱ्यानें आपला झाडा विनाकारण घेतला म्हणून ओरड केली तेव्हां सासऱ्यानें जांवयाशीं मैत्रीचा तह केला त्यावेळेस दोन्ही घराच्या कुलदेवतांची साक्ष आणि शपथ वापरण्यांत आली. त्यावेळचा एक कुल-देवता लिंगरूपीहि असावी.

एवंच यहुदी लोकांमध्यें देखील एकमेकांच्या कुलदेवांना मानणें चालू होतें. त्यांच्या धर्माचें एकदेवयजन धर्मात जें रूपांतर झालें तें मोशेच्या कालांत झालें; त्यावेळेस " सैन्यांचा येहोवा " खेरीज सर्व देव त्या पळापळींत नाहींसे झाले असावेत, किंवा नाईल नदींत बुडाले असावेत, आणि फक्त "सैन्यांचा येहोवा" ऊर्फ कार्तिकस्वामी तेवढा शिल्लक राहिला असावा.

## ४९६. भिन्नजनसंनिकर्ष; देवताविषयक आणि धार्मिक स्थित्यंतर.

४९६. जेव्हां दोन लोकांचा संबंध उत्पन्न होई तेव्हां दोन प्रकारच्या क्रिया होत. आपल्या देवाचें किंवा देवांचें दुसऱ्यांच्या देवांशीं ऐक्य स्थापन करणें आणि किंवा ज्या-प्रकारची दुसऱ्यांची देवता आपल्या दैवतग्रामांत नसेल ती दुसऱ्याची देवता देखील स्वीकारणें. या क्रिया जोरानें चालण्यास कांहीं महत्त्वाचीं कारणें होतीं. तीं म्हटलीं म्हणजे प्रत्येक देशामध्यें आर्यन लोकांच्या मूलगृहकालीन देवता होत्या व त्यामुळें अनेक लोकांचें दैवतसादृश्य मूळचेंच होतें तें संबंध येतांच वाढूं लागलें. हिंदुस्थानांतील श्रीकृष्ण देवाचें ग्रीक लोकांनीं आपल्या हेराक्लिस देवतेशीं ऐक्य स्थापन केलें व त्यामुळें महाराष्ट्रांतील अभिनवसंशोधक हेराक्लीस हे कृष्णाशीं सरूप देवता कशी याचा विचार करीत 'हरिकुल' या शब्दाशीं हेराक्लिसचा संबंध जोडूं लागले. रोमन लोकांच्या आणि ग्रीक लोकांच्या कोणकोणत्या देवता एकच आहेत त्यांचें कोष्टक अजूनपर्यंत यूरोपांतील अनेक शाळांतून विद्यार्थ्यांस घोकावें लागतच आहे. विविधजनसादृश्य केवळ देवतासादृश्यामुळेंच उत्पन्न झालें होतें असें नाहीं तर प्रत्येक ठिकाणीं जो आचार्यवर्ग होता त्या वर्गाचें सादृश्य दिसून येत आहे. आयर्लंडमध्यें ब्रेहॉन होते. इंग्लंडमध्यें ड्रुइड होते. असाच प्रत्येक लोकांत परंपरागत भिक्षुकी करणारा वर्ग होता, आणि अनेक ठिकाणीं हा वर्ग साग्निक असे. ब्रिटन-मधील ड्रुइडांचा वर्ग हा अग्नीस आहुति देणाराच वर्ग होता. इराणांतील मगांचा वर्ग त्यांच्या अग्निपूजेबद्दल आणि मित्र-पूजेबद्दल सुप्रसिद्धच आहे. हिंदुस्थानांत आलेल्या लोकांमध्यें हा मगांचा वर्ग तर होताच पण दुसरेही अनेक अग्न्यु, पासक लोक होतेच. ईश्वरांश अनेक दृश्य वस्तूंत आहे या तऱ्हेची भावना देखील इंग्लंडपासून कांबोजपर्यंत प्रत्येक लोकांमध्यें जागृत होती आणि त्यामुळें ताऱ्यांच्या देवता, ऋतूंच्या देवता, फलपुष्पांच्या देवता त्याप्रमाणेंच ज्यांच्या अवकृपेमुळें अनिष्ट होतें त्या देवता या सर्वांवर लोकांचा विश्वास असे, व त्यामुळें विश्वबंधुत्वसाधक परिणाम होई. आणि एका लोकांना दुसऱ्या लोकांत मिसळून जाणें अत्यंत सोपें होऊन जाई. प्राचीन-कालीं अनेक देवता मानणाऱ्या लोकांमध्यें विवाहसंबंध जितक्या मोकळ्या मनानें होत असत, तितके आज एकेश्वरी पण भिन्न संप्रदायी लोकांमध्यें होणें शक्य नाहीं. ख्रिस्ती लोक व मुसलमान लोक यांमध्यें उघड उघड एकमेकांशीं लग्नें होण्याचा काल अजून आला नाहीं. ईश्वर जरी एक तरी आचार्य निरनिराळे. यामुळें ऐक्य स्थापन झालें नाहीं. ख्रिस्ती व मुसलमान या दोन्ही संप्रदायास दुसऱ्यांचे देव खोटे म्हणून ते फोडून टाकावयाची संवय लागली आणि आपल्याच संप्रदायाच्या क्षेत्रांत दुसऱ्यानें आलें पाहिजे अशा तऱ्हेच्या आग्रहीपणाच्या प्रवृत्तींत दोन्ही संप्रदायांचा विकास होऊन त्यांनीं प्रत्येक ठिकाणची स्थानिक संस्कृति किंवा उपासना दोहोंपैकीं प्रत्येक संप्रदायानें नष्टप्राय करून सोडली. नष्ट 'प्राय' असे शब्द वापरण्याचें कारण एवढेंच कीं कांहीं ठिकाणीं मात्र त्यांनीं स्थानिक देवतांना राखलें आहे. ख्रिस्त्यांनीं जुन्या देवतांना आपले सेंटस् बनविलें आहे. तुर्कस्थानांत त्यांच्या मूळच्या स्थानिक देवता अजून पूजिल्या जात आहेत. असो.

## ४९६ अ. भारतीय धर्म आणि असुर धम.

४९६ अ. केवळ आर्यन देवतांचें ऐक्य शोधल्यानें भारतीय इतिहासाचें स्पष्टीकरण होणार नाहीं. मित्र आणि अग्नि यांचें इराणी लोकांत आणि भारतीयांत अस्तित्त्व दाखविलें आणि इराणी अश्मदेव आणि ग्रीकांचा अस्मोडिअस या देवता मूळच्या एकच होत्या हें दाखविलें म्हणजे भिन्न देशासंबंधाचा इतिहास पुरा होत नाहीं. आर्यन आणि इतर लोक यांत होणारी देवताविषक देवघेव लक्षांत घेतली पाहिजे.

देवतांचें ऐक्य दृष्टीस पडेल तेव्हां त्या देवतांस भजणारे लोक एकवंशीय होते, याप्रकारचें निगमन देखील योग्य होणार नाहीं. युद्धदेवता आणि विद्यादेवता प्राचीन भारतीयांत होती तशीच असुरियन लोकांतहि होती. भारतीय आणि असुर लोकांतील देवतासादृश्य लक्षांत घेण्याजोगें आहे.

वैदिक देवतांशीं सदृश अशा सुमेरी बाबिलोनी आणि असुर लोकांतील देवता.

१. अप्सु=स्वाड जलदेवता;

२. अनशर=वरुणाप्रमाणें सर्व मुख्य देवतांचा जनक त्याचीं आपत्यें.

(१) अनु=आकाश देवता; इआ=जलदेवता;

३. शमश्=सूर्य.

४. सिन्=चंद्र.

५. अदाद्=मरुद्देव.

६. नुस्कु=अग्नि.

७. इर्श=निरृति (विनाशदेवता)

८. इश्तर=उषा. *

पौराणिक

असुर लोकांच्या पौराणिकस्वरूपी देवता पुढील प्रमाणें होत्याः—

नेरगल=नरकदेवता.

नबू=विद्याधिपति.

एकर्त=युद्धदेव.

बेलमार्डुक=देवांचें अगोदरच्या देवांशीं युद्ध चाललें असतां देवांचा (उत्तरकालीन देवांचा) पुढारी.

लख्मु=मोठा सर्परूपी देव ["लक्ष्मण" हा शेषाचा अवतार होता अशी कल्पना होण्यास लख्मुदेव कारण झाला असेल काय?]

स्थानदेवता.

एनलिल्=निप्पुरचा देव.

अशुर=असुरांची राष्ट्रदेवता म्हणजे जातिदेवता.

भारतांत आलेल्या असुरांनीं देश्य देवतांचा एकाएकीं स्वीकार केला असे दिसत नाहीं. देश्य देवतेस विरोध करणाऱ्या असुराची (हिरण्यकशिपूची) कथा आज संरक्षित आहे. त्या कथेंत जें नांव आहे तें देखील मोठें सूचक आहे. "कशिपू" हा प्रत्यय भारतीय संस्कृतींतील नाहीं, हें सांगावयास नकोच. "अशिपू" हा शब्द असुर भाषेंतील देवपूजक अशा अर्थाचा शब्द आहे. अशिपु हा देवपूजक असे त्याप्रमाणें वैद्यहि असे. असें शक्य आहे कीं "हिरनक" नांवाचा असुर आपल्या देवाचा पुजारी असल्यामुळें अभिमानी असेल. त्याला आपला मुलगा हा अन्य देवाचा उपासक असल्यामुळें राग येऊन त्याला शिक्षा करण्यास प्रवृत्त झाला असेल. त्याची अतिशयोक्तीची कथा तयार होऊन नरसिंहावताराचा वृत्तांत तयार झाला असेल. हिरण्यकशिपूची† कथा तयार झाली ती परकीयांस देश्यसंस्कृतींत आणावयाच्या प्राचीनांच्या खटपटीचा एक भाग होता असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

### ४९७. खिस्त्य आणि इस्लाम यांच्या लोंढ्यापुढें फक्त भारतीय संस्कृतीनें टिकाव कां धरला?

४९७. खिस्ती व मुसलमान संप्रदायांच्या उद्भवापूर्वी जो मानवीसमाज होता त्या समाजांतील प्रत्येक राष्ट्रामध्यें किंवा जातीमध्यें आपापल्या पूर्वपरंपरेशीं अन्यजातिसमागमोत्तर जुळवाजुळव करण्यास अनुकूल अशाच प्रकारची परिस्थिति होती. तथापि प्राचीन संस्कृतीचें उन्मूलन करण्याचेंच काम खिस्ती आणि मुसलमान संप्रदायांनीं घेतलें. हे दोन संप्रदाय जगाचें एकीकरण ज्या पद्धतीनें करीत होते त्यापेक्षां निराळी पद्धत हिंदुस्थानांत जोरानें प्रचलित झाल्यामुळें केवळ हिंदुसमाजच त्यांच्या आघाताविरुद्ध टिकाव धरूं शकला, आणि आपलें समाजविस्तारणाचें कार्य चालू ठेऊं शकला. एवंच प्रत्येक राष्ट्राचा भिन्न जातिदेव किंवा स्थानदेव यांच्या स्वीकाराविषयीं प्राचीनांचा अनाक्षेप लक्षांत घेऊन प्राचीन काळच्या राजकीय विकासाची आणि त्याबरोबर एकमेकांशीं चालू असलेल्या सामाजिक संबंधाची कल्पना केली पाहिजे.

### ४९८. अन्यजातिविजय आणि त्याच्या सामाजिक परिणामांचें अल्पत्व.

४९८. जेव्हां एक लोक दुसऱ्या लोकांवर जय मिळवीत

* उषा ही मूळची आर्यन देवता नसून बाहेरची आणली असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे.
A guide to Babylonian and Assyrian antiquities (of British Museum) 1922. p. 28.

† हिरण्यक हें नांव देखील कृत्रिम असावें किंवा जातिवाचक असावें. "हिरण्यकेशी" हा शब्द देखील जातिवाचक होता तो पुढें स्थलवाचक होऊन वेदशाखावाचक झाला असावा. ही एक शक्यताच आहे. तीविषयीं विवेचन प्रसंगानुरूप करावें लागेलच.

तेव्हां राजकुल तेवढें भिन्न होई आणि कांहीं सरदारवर्ग आणि सैनिकवर्ग विजयी राष्ट्रांतून घेतला जाई. पुष्कळदां विजयी राष्ट्र स्थानिक दैवतांस किंवा आचार्यांस नाकारीत नव्हतें. नवीन विजेत्या राष्ट्राचा धुरीण पुष्कळदां स्थानिक राजकुलाशीं विवाहसंबंध करी. त्यामुळें तें ऐक्य अधिकच वृद्धिंगत होई आणि परकीयांचें परकेपण रहात नव्हतें.

आजच्या लोकांत चंद्रगुप्तानें नंदांचा पाडाव करण्याकरितां ग्रीकांचें सहाय्य घ्यावें किंवा नंदांचा अभिमानी अमात्य राक्षस यानें मौर्यांचा पाडाव करण्याकरितां ग्रीकांची मदत घ्यावी या तऱ्हेच्या गोष्टी फारच अयोग्य वाटतात आणि या परक्यांचा शिरकाव आपल्या घरांत होऊं देण्याविषयीं त्या काळच्या मुत्सद्यांस जुगुप्सा कशी वाटली नाहीं याचें आश्चर्य वाटतें. तथापि प्राचीन काळीं मुत्सद्यास विशेष आक्षेप वाटत नव्हता एवढें मात्र खरें. कारण महाराष्ट्रीयांस पल्हवाविषयीं तरी दूरता कां वाटावी ? त्यांचा राजा जरी झाला तरी तो यज्ञ करणारा गोप्रदान करणारा. तो ब्राह्मण जेवायला घालणार, आणि शातकर्णीशीं संबंध जोडणार.

### ४९९. स्वधर्मत्यागाशिवाय अन्यधर्मस्वीकार.

४९९. प्राचीनांच्या धार्मिक विकासांतील एक गोष्ट आजच्या लोकांस समजत नाहीं. ती म्हटली म्हणजे ते परकीयांच्या धर्मांतील गोष्टींचा स्वीकार करीत, तो स्वकीय धर्म न सोडतां करीत. हेलीओडोरनें वासुदेवाविषयीं आपला आदर दाखविला हा हिंदूंचा मोठा जय झाला असें मानण्याची जी प्रवृत्ति आहे ती चुकीची आहे. प्रत्येक ठिकाणच्या स्थानदेवतेस पूजिलें पाहिजे असें ग्रीकांच्या राष्ट्रधर्मांतील मत होतें आणि जी भारतीय मंडळी दारियसच्या सैन्यामध्यें किंवा सायरस ऊर्फ कुरुसच्या सैन्यामध्यें जाई तीदेखील तेथील स्थानिक देवतांस मान देत असली पाहिजे यांत शंका नाहीं. कृष्णपूजा ग्रीक मंत्र्यानें केली किंवा उमेहनाकट येथील ग्रीक भडव्यांनीं कारली येथील गुहेमध्यें बुद्धाच्या नांवानें स्तंभदान केलें तरी त्यांत तो हिंदुधर्माचा अगर बौद्ध धर्माचा विजय समजण्याचें कारण नाहीं. एकमेकांच्या देवतांचें पूजन करावें हा प्राचीन काळच्या सर्व देशांतील लोकांचा प्रघात होता व तो हिंदूंनीं अजूनही चालू ठेवला आहे.

### ५००. प्राचीनांच्या समाजभावनेचें एकंदर स्वरूप.

५००. प्राचीनांच्या समाजभावनेविषयीं मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे तींतील स्वाभाविकता होय. जे जवळ असतील आणि सदृश असतील त्यांच्यामध्यें संपूर्ण एकत्वाची समाजभावना असणार. जे लोक विसदृश असतील त्यांजविषयीं आपलेपणा कमी वाटणार. प्रत्येक स्थलीं थोर विभूती असूं शकतात ही गोष्ट सर्वमान्य होती आणि त्यामुळें एक मनुष्य अन्यस्थलीय विभूतीस अगर देवतारूप बनलेल्या व्यक्तीस मान द्यावयाच्या विरुद्ध नव्हते.

लग्नव्यवहाराला दैवतभिन्नत्व आडवें येत नसे. कारण दुसऱ्यांच्या देवांचा स्वीकार जरी नसला तरी त्यांच्या देवाविषयीं आक्षेप नव्हता व त्या देवाशीं सामीप्य आलें तर त्याचा स्वीकारही होई. या गोष्टीमुळें लग्नव्यवहार अगदीं सोपा होता. नवऱ्यानें बायकोचें दैवत घ्यावयाचें किंवा बायकोनें नवऱ्याचें दैवत घ्यावयाचें, यांत कमीपणा कोणालाच वाटत नसे. याशिवाय चातुर्वर्ण्याच्या कल्पनेमुळें राजेलोकांनीं राजेलोकांशीं लग्न करावें, आणि सामान्यानीं सामान्याशीं करावें हीच भावना लोकांत जागृत होई. ग्रीक आणि हिंदु यांच्या लग्नव्यवहाराला अडचणी कोणत्याच नव्हत्या आणि ब्राह्मण हे उपाध्येपणाचें सर्व डबोलें आपल्याच हातीं यावें या वृत्तीचे बिलकूल नव्हते. वैदिकधर्म आणि पौराणिक धर्म यांची त्यांनीं अशी संगति लावून दिली होती कीं आम्ही वैदिक संस्कार करूं. पौराणिक संस्कार आणि पौराणिक देवतार्चन दुसऱ्यांनीं करणेंहि आम्हास मान्य आहे. अर्थात त्यांना शिवपूजनास ज्यांप्रमाणें गुरव मान्य होते, त्याप्रमाणेंच सूर्यपूजेसाठीं मग मान्य होते. ग्रीकांच्या बरोबर जर ॲपोलो किंवा झूस यांचे उपासक आले असते तर त्यांचीं देवळें ग्रीकांनीं बांधावींत व त्या देवापुढें येणारा नैवेद्य त्यांनीं खावा याविषयीं ब्राह्मणांचा आक्षेप कधींच नसता. येणेंप्रमाणें प्राचीन कालीं जी धार्मिक उदारता उत्पन्न झाली होती ती यहुदी लोकांच्या व त्यानंतर उत्पन्न झालेल्या ख्रिस्ती आणि मुसलमानी सांप्रदायांकडून विध्वंसिली गेली. ब्राह्मणांनीं आपली विद्या आणि वृत्ति त्यांच्या जगभर प्रसारास साधक अशी केली आणि त्यामुळें त्यांच्या महत्त्वाचा विस्तार कांबोजापर्यंत झाला आणि पश्चिमेकडे अलेक्झांड्रियापर्यंत होऊं पाहात होता. पण त्यास सेमेटिक संस्कृतींतील धार्मिक वृत्तीनें जोराचा विरोध केला गेला. त्या विरोधावर प्रत्युपाय ब्राह्मणांकडून अजूनहि झाला नाहीं.

" आचारः प्रथमो धर्मः " हिंदूंचें महत्त्वाचें वाक्य झालें; तुमचें मत भिन्न असो, तुमचें दैवत आमच्यापेक्षां निराळें असो, जर तुमचे आचार आमच्यासारखे असले तर तुमचा-आमचा सामाजिक संबंध वाढेल. अशा तऱ्हेची वृत्ति हिंदूंनीं आजहि ठेवली आहे. ती ठेवण्यांत तें प्राचीन जागतिक वृत्तीचें सातत्य राखीत आहेत.

जागतिक संस्कृतीचें ऐक्य असावें अशी भावना बाळगणाऱ्या प्राचीन ब्राह्मणांना संस्कृति संघटनेमध्यें दोन क्रिया करावयाच्या होत्या. त्यांपैकीं एक क्रिया म्हटली म्हणजे देशांतील एकंदर जनतेचें विदेशी किंवा अन्य जनतेशीं संबंध सुलभ करणें म्हणजे विदेशी जन जर आपल्या प्रदेशांत आले तर त्यांच्या संस्कृतीचा नाश न करतां आपल्या समाजाशीं सादृश्य वाढविणें; त्याच प्रमाणें देशांत जी संस्कृति अगोदरच स्थापन झाली तिचें अधिक दृढमूल करणें. दैवतविषयक वेदांत स्वरूपी व्यापक तत्त्वज्ञानामुळें पहिली क्रिया साध्य झाली तर दुसरी क्रिया सर्व संस्कृतिवाहकता एका भाषेच्या ठायीं स्थापित करण्यानें साध्य झाली.

संस्कृतभाषेच्या प्रगतीच व संस्कृतवाङ्मयाच्या व्यापकतेचा इतिहास म्हणजे जगत्संस्कृतीच्या एकीकरणाचा इतिहास आहे. जगदैक्याची समाजभावना प्राचीन ब्राह्मणांच्या ठायीं असल्यामुळें त्यांनीं जें दैवतविषयक कार्य केलें तें आणि त्यांचें वाङ्मयविषयक आणि भाषाविषयक कार्य हीं एकाच भावनेनें प्रेरित झालीं होतीं. ब्राह्मणांस केवळ हिंदुस्थानचीच फिकीर नव्हती तर जगाची फिकीर होती, आणि त्यांनीं भारतीय देवविज्ञानास आणि धर्मशास्त्रास जें स्वरूप दिलें तें जगदैक्याच्या दृष्टीनें दिलें होतें.

## प्रकरण ५४ वें.

# दाक्षिणात्यांचें संस्कृतपांडित्य आणि प्राकृतपांडित्य.

### ५०१. दक्षिणेकडील कुरुयुद्धकालीन यागविद्या.

५११. दाक्षिणात्यांच्या संस्कृत पांडित्याचा त्याचप्रमाणें प्राकृत पांडित्याचा इतिहास मोठा आहे. धार्मिक इतिहासामध्यें दाक्षिणात्यांस ज्या कारणामुळें महत्त्वाचें स्थान आहे तें म्हटलें म्हणजे यजुर्वेदीय धर्माची घटना होय. यजुर्वेद हा दक्षिणेकडून उत्तरेकडे गेला. ही क्रिया मुख्यतः कुरुयुद्ध-कालापूर्वीच झाली होती तथापि त्या क्रियेचीं कांहीं अंगें कुरुयुद्धोत्तर कालीं झालीं. युद्धोत्तर कालीं उत्तरेस याज्ञवल्क्याचें महत्त्व स्थापित झालें व वैशंपायनाच्या म्हणजे जुन्या कृष्णयजुर्वेदाचे किंवा वेदशाखेचे अनुयायी दक्षिणेकडेच राहिले. यजुर्वेदाचें मुख्य अंग म्हटलें म्हणजे पशुयाग होय. अश्वमेध, राजसूय हे पूर्वी क्षत्रियांचे यज्ञ होते. अश्वमेधाचे उल्लेख ऋग्वेदांत क्वचितच देतात. पहिल्या मंडळांतील दीर्घतम्याच्या सूक्तांत अश्वमेधाचा उल्लेख आहे, तथापि तें मडळच ऋग्वेदाची उत्तरकालीन म्हणजे याजुषधर्म ऋग्वेदाशीं संयुक्त झाल्यानंतरच्या कालांतली पुरवणी आहे आणि त्यामुळें पशुयाग हा ऋग्वेदांत नव्हता या कल्पनेस दीर्घतम्याचीं सूत्रें आक्षेप उत्पन्न करूं शकत नाहींत.

पशुयागाचें वैशिष्ट्य दक्षिणेकडे होतें आणि पशुयागाचेंच सप्तहविःसंस्था हें विस्तरण होय. पशुयागाचा हा प्रकार मूळचा आर्यन् नसून सेमेटिक लोकांमुळें तर आला नसेलना अशी कल्पना उत्पन्न होते. जें अमंत्रक व्हावयाचें तें समंत्रक झालें, त्यांत विधींची ठाकठिकी आली आणि वैदिक मंत्रांशीं निगडित झालें म्हणजे त्या विधीची मूळची भिन्नता लोकांच्या लक्षांत येत नाहीं. तथापि जेव्हां वैदिक संस्कृतीचें एकीकरण झालें तेव्हां नित्य पशुयाग जवळ जवळ नाहींसाच झाला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. यजुर्वेदी अग्निहोत्र्याचें महत्त्वाचें पाक्षिक कर्म जें इष्टि तिच्यांतून पशुयाग जाऊन त्याच्याजागीं त्याचा प्रतिनिधीभूत ( पशोर्वैप्रतिमा पुरोडाशः ) पुरोडाशयाग स्थापन झाला होता.

### ५०२. दाक्षिणात्यांच्या यागविद्येंत ऊर्फ यजुर्वेदांत सेमेटिक व शक यांचा संस्कृत्यंश.

५०२. दाक्षिणात्यांचा पशुयाग हा सेमेटिक लोकांचा असावा किंवा शकांचाही असूं शकेल. शकांचें आणि सेमेटिक लोकांचें कांहीं धार्मिक बाबतींत ऐक्य स्थापिलें जाऊन जो संयुक्त धर्म झाला असेल त्या धर्माचीच अनुयायी प्रजा वेदपूर्वकालीं दक्षिणेंत असावी ही शक्यता आहे. पशुयागाचे उल्लेख जुन्या करारांत चोहोंकडे पसरले आहेत आणि आदामाचा जो मुलगा धान्याऐवजीं पशू समर्पण करता झाला तो ईश्वरास अधिक प्रिय झाला असें आश्वासन जुन्या कराराचे कर्ते देत आहेत. उलटपक्षीं अश्वमेधाचा उल्लेख जुन्या करारांत कोठें दिसत नाहीं आणि त्याची प्रवृत्ति शकामध्यें होती. यावरून अत्यंत प्राचीन कालच्या शकांच्या आगमनाचा परिणाम अश्वमेधाचें गौरव हा असावा; आणि वैदिक हविःसंस्थांच्या घटनेस शकधर्म कांहीं बाबतींत कारणीभूत झाला असावा.

हिंदुस्थानांत अत्यंत प्राचीन कालीं शकांचें येणें, त्यानंतर वैदिक आर्यांचें आगमन होणें आणि या दोहोंचेंहि दक्षिणेंत अस्तित्व असणें या शक्यता लक्षांत घेतल्या पाहिजेत. शकांच्या अगोदरही असलेले लोक, शक, वैदिक जनता या सर्वांचें एकीकरण होऊन एक संस्कृतिफलक तयार होणें, नवीन आलेल्या शकांकडून त्यांस उपद्रव होणें व पुन्हा त्या नवीन आलेल्या लोकांचा विदेशीपणा जाऊन त्यांचाहि देश्यसंस्कृतीशीं एकजीव होणें, पुन्हा एखाद्या आलेल्या परकीय लोंढ्यानें पुन्हा संघटित झालेली संस्कृति उपद्रवित होणें व पुन्हां दोहोंचा मिलाफ होणें या सर्व क्रिया कार्य करीत असतां त्या क्रिया वाङ्मयांत किंवा वस्तुरूपी अवशेषांत शोधून त्यांचो संगति जुळविणें हें सांस्कृतिक इतिहासांत एक महत्त्वाचें कार्य आहे, आणि, आपणांस वाङ्मयांत दिसून येणाऱ्या दैवताकडे आणि साधनांकडे वरील क्रियांच्या सूचक अशा गोष्टी शोधण्याच्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे.

दक्षिणेकडील प्राचीन धर्मांचें सातत्य लोकांत आजपर्यंत चालू राहिलें आहे असें वाटतें. वेद किंवा पुराणें या सर्वांच्या पासून भिन्न जो प्रचलित देवताधर्म आहे त्याचें पद्धतशीर विवेचन कोणाही ग्रंथकारानें केलें नाहीं आणि त्यामुळें महाराष्ट्रापुरत्या प्राचीन वेदेतर आणि पुराणास अपरिचित अशा देवताधर्माचें विवेचन याच ग्रंथांत देणें अवश्य आहे व तें योग्यप्रसंगीं केलेलें सांपडेल. तथापि तो प्राचीन पांडित्याचा विषय नसल्यानें त्याविषयीं विवेचन येथें केलें जात नाहीं.

## ५०३. संस्कृत भाषेच्या महत्त्वाच्या मर्यादा.

५०३. वेदकाळीं पशुयाग दक्षिणेकडे प्रचलित असून जर तो संस्था सेमेटिक व शक यांची असली तर आपणांस दक्षिणेकडील भाषेचा विचार अधिक लक्षपूर्वक करणें प्राप्त होतें. आद्य शातवाहनांच्या काळांत भाषा बरीच संस्कृत-संबद्ध होती. तथापि तिच्या अगोदरच्या भाषांची स्थिति काय होती याविषयीं खात्रीपूर्वक विधान आजच करतां येत नाहीं महाराष्ट्री भाषा अस्तित्त्वांत असावी व तिच्यावर दोहोंकडून परिणाम होत असावे. पश्चिमेकडील सेमेटिक लोकांचे आणि उत्तरेकडील वैदिक आर्यन लोकांचे. वैदिकांच्यामुळें संस्कृत भाषेचा प्रचार महाराष्ट्रांत सुरू झाला असावा. तथापि सर्व जनांची तशीच उच्च व्यवहाराची भाषा बराच काळ म्हणजे कुरुयुद्धोत्तर सुमारें एक हजार वर्षेपर्यंत महाराष्ट्री प्राकृतच असावी असें वाटतें.

बुद्धकालाच्या प्रारंभाला संस्कृत वाङ्मय जरी मोठें होतें, तरी ललित वाङ्मय विकसलें नव्हतें असें म्हटलें तरी चालेल. ब्राह्मण ग्रंथ तयार झाले असावेत आणि सूत्रग्रंथ देखील तयार झाले असावेत आणि इतर वेदांगें हळू हळू तयार होऊ लागलीं होतीं. कदाचित् अथर्ववेदाचें गोपथब्राह्मण तेवढें तयार झालें नसेल व आजची संहिता देखील तयार झाली नसेल. पाणिनीचें व्याकरण जरी तयार होऊन पडलें असलें तरी त्यास सर्वमान्यता मिळाली नव्हतीच. या काळचे जे काव्य-ग्रंथ रामायण आणि महाभारत यांनीं पाणिनीचें स्वामित्व मुळींच मान्य केलें नाहीं. आणि त्यामुळें महाभारतांत अपाणिनीय रूपांची रेलचेल आहे. पाणिनी स्वतः कवि होता असें अलीकडे कांहीं लेखक दाखवीत आहेत (कलकत्ता ओरिएंटल जरनल १ ला अंक) तरी पाणिनीचे म्हणून उल्लेखिलेले श्लोक वैय्याकरण पाणिनीचेच असतील अशी खात्री नाहीं. संस्कृत भाषा ललित काव्याची वाहक बुद्धपूर्वकालीन झाली नव्हती. संस्कृताची ललितसंस्कृति शातवाहन काळांत राजाश्रय पावली नव्हती आणि तिचा त्यामुळें बहुजन-समाजावर पगडा देखील वाढला नव्हता. गौतम आणि महावीर यांच्या भाषा भिन्न होत्या काय हा प्रश्न विचारला जातो आणि बुद्ध आणि महावीर हे जर जवळ जवळ समकालीन तर दोघांची भाषा भिन्न कशी अशी पृच्छा होते. गौतमानें आपले उपदेश पालींत केले आणि महावीराच्या अनुयायांनीं आपले अर्धमागधींत केले याचा अर्थ एवढाच कीं दोघांनीं त्याच्या ठिकाणीं प्रचलित असलेल्या भाषेंत केले. तथापि ते उपदेश ग्रंथीं समाविष्ट करण्यांत आले. त्यावेळच्या भाषा भिन्न होत्या. संस्कृतला जर अखिल भारतीयत्व आलें असतें तर अशोकासारख्या सम्राटानें तिचा खरोखरच स्वीकार केला असता. प्रत्येक जागेवर विशिष्ट भाषा जाणणारा आणि तो समजावून सांगणारा वर्ग अस्तित्वांत असता तर अखिलभारतव्यापी सम्राटांना त्याच भाषेचा स्वीकार करणें अधिक सोपें झालें असतें. निदान त्यांनीं प्राकृतबरोबर त्याचें संस्कृत रूपांतरहि दिलें असतें.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बुद्धोत्तर आणि चालुक्य-पूर्व अशा या दीर्घकालांत संस्कृत भाषेचें महत्त्व वाढत होतें तरी तें फार हळूहळू वाढत असलें पाहिजे. संस्कृत जर या वेळेस राष्ट्रभाषा असती तर तिची उपेक्षा मौर्य, खारवेल, शातवाहन आणि क्षत्रप या राजे लोकांनीं कां केली असती ? हे राजे ब्राह्मणांचा द्वेष करीत नव्हते. या राजे लोकांपैकीं अशोक बौद्ध असेल, खारवेल जैन असेल, क्षत्रप आणि शातकर्णि हे वासुदेव कृष्णाचे अनुयायी असून देखील बौद्धांस दान देणारे असतील, तरी ते ब्राह्मणांविरुद्ध होते अशांतला भाग मुळींच नाहीं. हे सर्वमतपूजक अगर अशोकाच्या भाषेंत सांगावयाचें झाल्यास सर्वपासंडपूजक होते. त्यांचा संस्कृत भाषेशीं विरोध नव्हता. संस्कृत भाषा वेदाश्रयामुळें वाढत असावी आणि वैदिक धर्माश्रयामुळें संरक्षिली जात होती. लोकांवर वैदिक धर्माकर्माचा ज्या मानानें पगडा वाढे, त्या मानानें आणि कांहीं अंशीं पौराणिक आणि स्मार्त धर्माच्या आश्रयामुळें संस्कृत भाषेस उत्तेजन मिळे हें उघड आहे, तर संस्कृत भाषेस उत्तेजन देणारे त्या वेळचे धर्म कोणत्या स्वरूपांत होते हें पहाणें अवश्य आहे.

## ५०४. संस्कृतभाषेचा महाराष्ट्रांत प्रसार.

५०४. संस्कृत भाषेचा बौद्धांनीं आश्रय केला नाहीं याचें कारण बुद्धाचा पंडितवर्गाशीं विरोध असून प्रत्यक्ष सामान्य वर्ग आपल्याकडे ओढून घ्यावा असें बुद्धाचें धोरण होतें हें होय. त्यास पूर्वसंस्थापित संस्कृतीस वळण लावावयाचें नसून तिला उपेक्षून पूर्वपांडित्यनिरपेक्ष अशी नवीन वाङ्मय-परंपरा निर्मावयाची होती. पौराणिकधर्म, वैदिकधर्म आणि स्मार्तधर्म या सर्वांचें एकीकरण झालें आणि बौद्ध आणि जैन संप्रदाय हे वेगळे पडले याचें कारण भाषाविषयकहि असणें शक्य आहे. जें प्रचलित असेल तें लेखनिविष्ट करावयाचें आणि तें पुराण असल्यामुळें पुराणग्रंथांत समाविष्ट करावयाचें या क्रियेला कोणी आक्षेप घेणें शक्य नव्हतें. श्रुति, स्मृति, पुराण हे शब्द जरी भिन्न आहेत आणि त्या शब्दांनीं दाखविलें जाणारें

वाङ्मय जरी निरनिराळ्या प्रकारचें आहे तरी त्या सर्वांची उद्दिष्ट क्रिया एकच होती. ती म्हटली म्हणजे जें जुनें असेल तेंच पुढें चालविणें ही होय. बौद्ध आणि जैन यांची क्रिया भिन्न होती. जुनें आहे तें चालविणें नसून विशेष व्यक्तीनें आपल्या मताचा व स्वतःचा गौरव साधणें हें यांत विशेष होतें आणि त्यामुळें त्यांचे संप्रदाय जरी तात्पुरते यशस्वी झाले तरी इतरांमध्यें जुनें असेल तें गोळा करावें आणि आपल्या पैतृक वाङ्मयाला आणि धर्माला जोडून घ्यावें या क्रियेपुढें तें टिकलें नाहीं.

संस्कृतभाषेचा उत्कर्ष केव्हां कसा झाला याविषयीं साधारणपणें पुढील विधानें करतां येतील.

वैदिक ग्रंथरचना ज्या काळांत होती त्या काळांत सामान्य जनांची भाषा वैदिक भाषेपासून निराळी होती.

वैदिक भाषा बोलणारे लोक निस्वरच भाषा बोलत होते. हौत्रमंत्र यज्ञांत निस्वरच म्हणावे लागतात. ते निस्वर आहेत. हे मंत्र ज्या लोकांचे होते त्यांची भाषा संस्कृत भाषेची मूल प्रकृति होय. त्या काळींच सर्व देशभर जी प्राकृत भाषा असावी तिचें महाराष्ट्री हें विशिष्ट प्रांतमूलक पण अधिक शिष्टरूप झालें असावें.

संस्कृतभाषा ज्या वैदिक प्रकृतीपासून निघाली ती प्रकृति भाषा इराणी भाषेपासून फारशी भिन्न नव्हती.

ज्या वेळेस वैदिक मंत्रवाले लोक देशांत प्रविष्ट झाले त्या काळीं म्हणजे दाशराज्ञ युद्धाच्या नंतरच्या काळीं नवीन येणाऱ्या लोकांची आणि अगोदर असलेल्या लोकांची भाषा व धर्म हीं बरींचशीं अभिन्न होतीं; तथापि त्याच कालामध्यें सर्व देशभर वेदभाषेपासून भिन्न अशा ज्या प्राकृत भाषा होतात त्यामध्यें शौरसेनी, मागधी आणि महाराष्ट्री असे भेद असले पाहिजेत. मागधाची संस्कृति भिन्न म्हणजे मगधर्मी होती, तेथें इंद्रास दैत्य समजत.

इंद्रास अमान्य करणारा वर्ग महाराष्ट्रांत देखील होता, आणि तेथें वादळाची देवता मरुत होती, ही गोष्ट आपणास ठाऊक आहे. भिन्नधर्मीय लोकांमध्यें अगस्त्याचें आगमन, अगस्त्याचा लोपामुद्रेशीं विवाह, मरुत् देव आणि इंद्र यांचें अगस्त्याकडून ऐक्यसंस्थापन इत्यादि गोष्टी ऋग्वेदांतील अगस्त्यसूक्तांत चांगल्या तऱ्हेनें प्रतिबिंबित झालेल्या आहेत.

अगरूप कथा हा कुरुयुद्धपूर्व इतिहास होय. असुरांच्या दक्षिणेस उपद्रवाचा किंवा त्यांच्या दक्षिणेंतील राज्याचा इतिहास हा देखील कुरुयुद्धपूर्वकालीन इतिहास होय. कुरुयुद्धकालीं जी यज्ञधर्मांची घडी बसली तींत असुरविद्या समाविष्ट झाली असली पाहिजे. असुरांच्या यज्ञाच्या पद्धति, त्यांचे उच्चार हे आपल्यापासून भिन्न आहेत या तऱ्हेची वृत्ति ब्राह्मण-ग्रंथांतर्गत अर्थवाद कथांत दृष्ट होतेच.

वैदिक धर्म आणि असुर धर्म यांची संगति जुळविण्याची क्रिया दक्षिणेंत झाली. दक्षिणेस याज्ञिकाची परंपरा कुरुयुद्ध-पूर्वीच स्वतंत्र होती. जशी श्रौतविधींची परंपरा स्वतंत्र होती तशीच वेदांगाची परंपरा स्वतंत्र होती. त्याशिवाय कृष्णयजुर्वेदाला मिळालें तें महत्त्व मिळालें नसतें. अध्वर्युपद म्हणजे मुख्याचें पद यजुर्वेदाकडे म्हणजे दाक्षिणात्याकडे राहिलें त्याअर्थी दाक्षिणात्यांचा वर्ग विद्येनें इतरांपेक्षां अधिक शिष्ट असला पाहिजे. ज्याअर्थी दक्षिणेकडील शिक्षासूत्रांची व कल्पसूत्रांची वाढ स्वतंत्र झाली त्याअर्थी निरुक्ति आणि व्याकरण यांची वाढ देखील स्वतंत्रपणें झाली असली पाहिजे.

यास्काच्या पूर्वीचे व्याकरणकार कोण होते यासंबंधाची माहिती जवळजवळ अगदींच नाहीं. आज प्रातिशाख्यें म्हणून जे पाणिनीय काळानंतरचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत त्यांहून वेगळ्या स्वरूपाचीं प्रातिशाख्यें यास्कापूर्वी अस्तित्वांत असलीं पाहिजेत, मग त्यांचीं नांवें कोणतींहि असोत. हल्लींच्या प्रातिशाख्यांना बीजभूत अशा तऱ्हेनें जीं हीं प्रातिशाख्यें, त्यांनीं व्याकरण-शास्त्रास कोणत्या तऱ्हेनें मदत केली हें कल्पनेनेंच जाणावें लागतें; कारण त्या जातीचा एकहि ग्रंथ आज उपलब्ध नाहीं.

या स्का चें नि रु क्त व त्या चा का ल :—

यास्काचा काल कोणत्याच प्रकारानें अद्याप निश्चित झालेला नाहीं. त्याचा काळ पाणिनीच्या कालावर बराचसा अवलंबून आहे. पाणिनि व यास्क यांच्यामध्यें फार जरी अंतर नाहीं, तरी निदान एक शतकाचें अंतर असावयास पाहिजे. पाणिनीच्या अष्टाध्यायींत ज्या गोष्टी दिसतात, तेथपर्यंत भाषेची वाढ व उन्नति होण्यास एवढा काळ अवश्य आहे. पाणिनीच्या काला-संबंधानें तो बुद्धपूर्वकालीन होता असें जें मत आहे तें बरोबर धरून चाललें तर यास्काचा काल निदान ख्रि. पू. ७०० किंवा ८०० वर्षें ठरवावा लागेल. डॉ. बेलवलकर यांनीं असेंच मत व्यक्त केलें आहे. *

'सूर्या' 'अपर्णा' वगैरे शब्दांची व्युत्पत्ति पाणिनीच्या व्याकरणांत नाहीं. शिवाय 'सूर्य' शब्दाची यास्काची व्युत्पत्ति पाणिनीला माहीत होती असें दिसत नाहीं. तेव्हां, यास्क पाणिनीच्या पूर्वीचा नसून पाणिनीच यास्काच्या पूर्वीचा होता असा

*Systems of Sanskrit Grammar, Poona 4.

एक यावर आक्षेप आहे. परंतु या युक्तिवादानें परस्परविरुद्ध अनुमानें निघत असल्यानें हा युक्तिवाद विश्वसनीय पुरावा म्हणून मानला जाणें शक्य नाहीं.

यास्क आणि पाणिनि हे भिन्नस्थानीय होते काय, तसे होते असें गृहित धरल्यानें असंगतीचा आरोप अनवश्य होत नाहीं काय या संबंधानें विचार झाला पाहिजे.

यास्काच्या निरुक्तांत निरनिराळ्या व्याकरणकारांचे व व्याकरणसंप्रदायांचे जे उल्लेख आहेत, त्यांवरून व्याकरणशास्त्राची प्रगति त्या काळांत बरीच झालेली होती असें दिसतें. नाम, आख्यान, उपसर्ग आणि निपात या शब्दांच्या चार जाती शोधून काढण्यास यूरोपांत ॲरिस्टॉटल जन्मास यावा लागला; परंतु आमच्या इकडे यास्कास ही गोष्ट पूर्वींच माहित होती. कालवाचक प्रत्यय, पुरुषवाचक प्रत्यय आणि कृदन्त-प्रत्यय यांच्यांतला भेदहि यास्काच्या वेळीं माहीत होता. इतकेंच नव्हे, तर प्रत्येक नाम धातुसाधित आहे ही उपपत्तीहि त्यानेंच बसविली होती. सध्यांच्या व्युत्पत्तिशास्त्राचा हाच मूळ पाया होय. आजच्या ऐतिहासिक दृष्टीनें ही उपपत्ति बरोबर आहे असें म्हणतां येणार नाहीं; तथापि भाषेच्या उपयोगाच्या दृष्टीनें आणि भाषेंतील शब्दांची फिरवाफिरव करून उपयोग करण्याच्या दृष्टीनें ही गृहीत कल्पना उपयुक्त आहे हें खास.

यास्काच्या निरुक्ताचें स्वरूप.

हा ग्रंथ निघण्टु नांवाच्या पांच अध्यायांच्या शब्दकोशावरची टीका होय. निघण्टूच्या पहिल्या तीन अध्यायांत एकच अर्थाचे अनेक शब्द असे अनेक शब्दसमूह दिलेले आहेत. निघण्टूचा चवथा अध्याय वेदांतील अवघड शब्दांचा संग्रह करण्यांत खर्चीं पडला असून शेवटच्या अध्यायांत देवतांच्या नांवांची यादी आहे. यास्कानें निघण्टूच्या पहिल्या तीन अध्यायांतील अधिक महत्त्वाचें, व शेवटच्या दोन अध्यायांतील प्रत्येक शब्द घेऊन त्यावर आपलें विवरण दिलें आहे. यास्कानें आधारासाठीं वेदग्रंथांतील मूळ ऋचाच घेतल्या आहेत. वेदांच्या अभ्यासाचा सामान्य उपयोग व विश्वरचनेसंबंधीं वैदिक देवतांची कामगिरी यांचींहि विवेचनें त्यांत योग्य ठिकाणीं आलीं आहेत.

पाणिनी पूर्वींचे व्याकरणसंप्रदाय दक्षिणेंत रूढ होते यावरून संस्कृत व्याकरणाचा अभ्यास दक्षिणेंत पाणिनीच्या पूर्वींचा आहे.

### ५०५. पाणिनीपूर्वींचे व्याकरणसंप्रदाय.

५०५. 'अष्टाध्यायी' या ग्रंथाचें अतिशय नीटनेटकें व संक्षिप्त स्वरूप पाहतां अशा तऱ्हेचे ग्रंथ लिहिण्यास पाणिनीनेंच सुरवात केली हें म्हणणें अप्रयोजक होईल; कां कीं कोणत्याहि पूर्णत्त्वाच्या किंवा गुंतागुंतीच्या पद्धतीचा विकास एकदम होत नाहीं. यास्क व पाणिनि यांच्यामधील काळांत असले कांहींतरी ग्रंथ झाले असले पाहिजेत याबद्दल पाणिनीच्या सूत्रांतच पुरावा आहे. आपिशलि व काशकृत्स्न हे पाणिनीच्या पूर्वींचे व्याकरणकार होत ( पाणिनि ६. १. ९२ ). काशकृत्स्नाचा ग्रंथ तीन अध्यायांत असून तो सूत्रात्मक आहे अशी माहिती काशिकावृत्तींत आहे ( काशिका; पा. ७. इ. ९५ वरची ). शिवाय, ( पा. ७. इ. ९५ ) येथें काशिकावृत्तीनें आपिशलीचा म्हणून एक नियम दिलेला आहे. कैयटानें तर या दोघांच्या ग्रंथांतले म्हणून दोन उतारे दिले आहेत. [ कैयट; ५-१-२१ वर ] बोपदेवानें आपल्या मुग्धबोध नांवाच्या ग्रंथांत

'इन्द्रश्चन्द्रः काशकृत्स्नापिशली शाकटायनः ।
पाणिन्यमरजैनेंद्रा जयंत्यष्टादिशाब्दिकाः ॥ '

अशी एक आदिशाब्दिकांची म्हणजे जुन्या वैयाकरणांची याद दिली आहे. दक्षिणेकडे वैयाकरणांना "शाब्दिक" असें नांव असावें आणि उत्तरेकडील "वैयाकरण" या नांवाचा प्रचार झाल्यानंतर शाब्दिक शब्द मागें पडला असावा; आणि तो शब्द संरक्षून ठेवण्याचा प्रयत्न दाक्षिणात्य बोपदेवानें केला असावा इत्यादि कल्पना हा श्लोक वाचतां मनांत येतात.

ऐन्द्र संप्रदाय.

आपिशलि व काशकृत्स्न यांच्याहून ऐन्द्र नांवाच्या व्याकरणग्रंथसमूहाची गोष्ट थोडीशी निराळी आहे. 'प्राच्या-या सामान्य उल्लेखाशिवाय यांचा उल्लेख पाणिनीनें कोठेंहि केलेला नाहीं. कथासरित्सागराच्या कथापीठलंबकांत पाणिनीच्या पूर्वींचा व पाणिनीमुळें लुप्त झालेला संप्रदाय म्हणजे ऐन्द्र व्याकरणकारांचा होय. व्याडि, वररुचि किंवा कात्यायन व इन्द्रदत्त हे व्याकरणकार या परंपरेंतील होत असें म्हटलें आहे. त्याविषयीं माहिती मागें आलीच आहे. डॉ. बर्नेल यानीं तामिळ भाषेचें अतिपुरातन व्याकरण म्हणजे, 'तोल्काप्पियं नामक सर्वसंग्रहांतील कांहीं भाग होत; व यांतील व्याकरणपद्धति ऐन्द्र संप्रदायाचा भाग असून पांड्य राजाच्या दरबारांत हें व्याकरण वाचलें जाई व तेथें तें पसंत पडे' असें लिहिलें आहे. कात्यायनाचा कातंत्र व प्रातिशाख्यें याशीं निकट संबंध असून हींहि ऐन्द्र संप्रदायाचींच व्याकरणें होत. याच्याबरोबर पाणिनीच्या पूर्वींचे म्हणून

समजले जाणारे दोन व्याकरणसंप्रदाय अस्तित्वांत आहेत. सध्यांच्या आपल्या माहितीप्रमाणें ज्याअर्थी यांचा उल्लेख काशिका महाभाष्य किंवा पाणिनीचीं व्याकरणसूत्रें यांत आढळत नाहीं, त्याअर्थी ऐन्द्रसंप्रदाय पाणिनीनंतरचा असें कांहीं जणांनीं म्हटलें आहे. पण तें पंडितवर्गसंमत झालेलें दिसत नाहीं.

## ५०६. पाणिनीची अष्टाध्यायी, तिचा काल, तींतील प्रक्षिप्त भागः—

५०६. डॉ. पीटरसन्, वेबर, मॅक्समुल्लर, गोल्डस्टकर, सत्यव्रत, सामाश्रमी इत्यादिकांच्या मतांच्या रा. राजवाडे यांनीं केलेल्या परीक्षणाचा पुनरुच्चार करून डॉ. बेलवलकर यांनीं राजवाडे यांचें मत भीत भीत स्वीकारीत पाणिनीचा काल ख्रि. पू. सातवें शतक हा ठरविलेला आहे. राजवाडे मात्र पाणिनीस ख्रि. पू. ७५० च्या पाठीमागें नेऊं पहात. राजवाडे यांनीं दिलेल्या आधारांपैकीं कांहीं डॉ. भांडारकरांनीं इंडियन अँटिक्वरीमध्यें पूर्वीच प्रसिद्ध केलें होतें. पाणिनींत सुमारें ४००० सूत्रें आहेत. त्यांचे आठ अध्याय केले आहेत; म्हणून त्यास अष्टाध्यायी म्हणतात. प्रत्येक अध्यायांत चार पाद आहेत. हीं सूत्रें जशींच्या तशींच पाणिनीकालापासून आजपर्यंत चालत आलेलीं आहेत. फक्त पांच सूत्रांविषयीं तीं सूत्रें महाभाष्यकारांनीं वार्त्तिकांत घातलीं असल्यामुळें मतभेद आहे. हीं सूत्रें म्हणजे धातुपाठ, गणपाठ, उणादि सूत्रें, इत्यादि परिशिष्टें होत. यांपैकीं धातुपाठ व गणपाठ हे भाग पाणिनीचेच आहेत असें बऱ्याच निश्चितपणानें म्हणतां येतें. उणादिसूत्रांची गोष्ट मात्र तशी नाहीं. हीं सूत्रें शाकटायन ऋषीचीं होत असें साधारणतः समजलें जातें; व यास निरुक्त व महाभाष्य यांचा आधार आहे. [ नामान्याख्यातजानीति शाकटायनो नैरुक्तसमयश्च ( निरुक्त १. १२. २. ) 'नामच धातुजमाह निरुक्ते व्याकरणे शकटस्य तोकम्' (महाभाष्य)] परंतु शाकटायनाचा असा कोणताहि ग्रंथ शुद्ध परंपरेनें आतांपर्यंत आलेला नाहीं, आणि शाकटायनाचा एखादा ग्रंथ असूं शकेल कीं नाहीं याचाच अनेकांस संशय वाटतो. उलटपक्षीं पाणिनीच्या संप्रदायाची छाप उणादिसूत्रांवर पडलेली स्पष्टपणें दृग्गोचर होते. प्रो. पाठक यांनीं या विषयावर एक निबंध भांडारकर इन्स्टिट्यूटमध्यें वाचला ( जुलै १९२२ ), त्यांत हाच अभिप्राय व्यक्त केला होता. ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत, उपधा, लोप, संप्रसारण, अभ्यास इत्यादि पारिभाषिक संज्ञांचा उपयोग पाणिनीच्या अर्थानें उणादिसूत्रांतहि केलेला आहे. परंतु अष्टाध्यायींतील मताविरुद्ध कांहीं गोष्टी उणादिसूत्रांत सांपडतात. तेव्हां सर्वच उणादिसूत्रें पाणिनीचीं असेंहि म्हणतां येत नाहीं. या बाबतींत गोल्डस्टकरचें असें म्हणणें आहे कीं, पाणिनीनें उणादिसूत्रांची एक यादी तयार केली होती व मागाहून कात्यायनानें तींत भर घातली व शोध घातले हें मत ग्राह्य धरण्यास आक्षेप दिसत नाहीं. फिट्सूत्रें हीं एकमतानें शांतनवाचार्याचीं म्हणून ठरलीं आहेत. शिक्षा व लिंगानुशासन हीं परिशिष्टें तर उघड उघड अर्वाचीन आहेत. आतां आपण कात्यायनाकडेच वळूं.

## ५०७. कात्यायन—त्याची पाणिनीच्या सूत्रांवरील टीकाः—

५०७. आजच्या आपल्या माहितीप्रमाणें कात्यायनाचा काल ख्रि. पू. ५००—३५० असाच कांहींतरी ठरविला पाहिजे. यापेक्षां जास्त निश्चितपणानें या गोष्टी ठरवितां येत नाहींत, ही दुर्दैवाची गोष्ट होय. कात्यायनाच्या वार्त्तिकांनीं केलेलें कार्य म्हणजे भाषेच्या वाढीमुळें ज्या ज्या ठिकाणीं पाणिनीचे नियम लागू पडत नव्हते, त्या त्या ठिकाणीं ते सुधारणें, वाढविणें किंवा त्यांना पुरवण्या जोडणें हें होय. यवनानी याचा यवनाची बायको असा अर्थ पाणिनी करतो तर कात्यायन यवनलिपि असा करतो, आणि यवनपत्नी हा अर्थ व्यक्त करण्याकरितां यवनी असा शब्द देतो. यावरून रा. राजवाडे दोन कालांमधील अंतर मोठें होतें, आणि दोन काल यवनांच्या संस्कृतींत स्थित्यंतर होण्याइतके दूर आहेत असें सुचवितात.

आमच्यामतें अर्थभेदाचें कारण केवळ कालांतर नसून स्थलभेद हें असावें, आणि कदाचित् अधिक महत्त्वाचें असावें.

या विषयावर त्याचे दोन ग्रंथ आहेत. या दोहोंपैकीं एक वाजसनेयिप्रातिशाख्य म्हणून आहे. हा ग्रंथ वाजसनेयि संहितेचें व्याकरण म्हटलें तरी चालेल. पाणिनीचीं जीं जीं सूत्रें येथें त्याच्या कक्षेंत येऊं शकलीं, तेवढ्यांचीच कात्यायनानें यांत चर्चा केलेली आहे. कारण, या ग्रंथाचा संबंध वैदिक भाषेपुरताच आहे. यानंतर दुसऱ्या ग्रंथांत ( वार्त्तिकांत ) कात्यायनानें पाणिनीच्या अष्टाध्यायीचीच चर्चा आरंभिली आहे. दोष दाखविण्याकडेच पहिल्यापासून दृष्टि असल्यामुळें पाणिनीचीं जीं सूत्रें कात्यायनाला बरोबर वाटलीं, त्यांवर कात्यायनाची टीका नाहीं. पाणिनीच्या ४००० सूत्रांपैकीं कात्यायनानें सुमारें १५०० घेऊन त्यांवर ४००० वार्त्तिकांत चर्चा केली आहे. सूत्रांसंबंधानें आपणांस आलेल्या शंका

ग्रथित करूनच कात्यायन थांबला नाहीं, तर त्यांचें निरसनहि त्यानें आपल्या परीनें केलें आहे.

कात्यायनाला पाणिनीच्या ग्रंथावर टीका करावयाची होती तेव्हां प्रतिपादनाच्या सुलभतेसाठीं त्यानें पाणिनीचीच परिभाषा योजिली असल्यास नवल नाहीं. पण, तरी देखील त्यानें 'हल' बद्दल व्यंजन, 'अच' बद्दल स्वर, 'अक्' बद्दल समानाक्षर 'लट्,' भवन्ती 'लुङ्' बद्दल अद्यतनी असला फेरफार परिभाषेंत केला आहे. ही गोष्ट जमेस धरून कथासरित्सागराच्या चौथ्या तरंगांतील 'प्रणष्टमैन्द्रं तदस्मद्व्याकरणं भुवि' हा उल्लेख पाहिला, तर कात्यायन हा पाणिनीहून भिन्न संप्रदायांतील वैयाकरण असावा असें म्हणावेंसें वाटतें. पतंजलीनें तर याला दाक्षिणात्य असें स्पष्टच म्हटलें आहे [प्रियतद्धिता दाक्षिणात्याः—महाभाष्य भा. १ पृ. ८ ओळ २]. कात्यायनाच्या पूर्वी अनेक वार्त्तिककार होऊन गेले असें कात्यायनाच्याच उल्लेखावरून दिसतें. शाकटायन व शाकल्य ह्यांचा उल्लेख कात्यायनानें केलेला आहे [प्रत्ययसवर्णमुदिशाकटायनः। (इ. ८) अविकारं शाकल्याशषसेषु (इ. ९)]. कात्यायनाचा संप्रदाय पुढें पुष्कळ लेखकांनीं चालविला.

## ५०८. पतंजलीचें महाभाष्य व त्याचें वैयाकरणांत स्थान.

५०८. कात्यायनानंतरचा मोठा वैयाकरण म्हणजे पतंजलि. याचा काल ख्रि. पू. १५० हा असावा. याला मुख्य प्रमाणें अशीं:—(१) 'इह पुष्पमित्रं याजयामः' हें वाक्य पतंजलीनें अशा कांहीं संदर्भानुसार घेतलें आहे कीं, तो प्रसंग पतंजलीच्या हयातींतच घडला असला पाहिजे. (२) 'अरुणद्यवनः साकेतम्' व 'अरुणद्यवनो मध्यमिका' यांत मीनांडरनें किंवा दुसऱ्या कोणीतरी यवनानें मध्यमिका नगरीस दिलेल्या वेढ्याचा उल्लेख आहे. (३) याशिवाय मौर्यांच्या संबंधाचा एक उल्लेख यांत आहे. पतंजलि पुष्पमित्राशीं समकालीन होता. महाभाष्यांत आलेलीं गोनर्दीय व गोणिकापुत्र हीं नांवें पतंजलिचींच खुद्द पर्यायनावें आहेत असें मानण्याचा प्रघात आहे. परंतु राजेंद्रलाल मित्र [ज. ए. सो. बंगाल; पु. ८, पृ. २६९] व डॉ. कीलहॉर्न [इंडियन अँटिक्वरि पु. १४, पृ. ४०] यांनीं हे निराळे ग्रंथकार आहेत असें मानलें आहे; व वात्स्यायनानें आपल्या कामसूत्र ग्रंथांत या ग्रंथकारांचा उल्लेख केलेला आहे. पतंजलीच्या काळाच्या संबंधाची हकीकत महाभाष्यांतच सांपडण्यासारखी आहे.

महाभाष्यांत कात्यायनावर टीका आहे. पाणिनीच्या सूत्रांवर कात्यायनानें केलेली टीका जेथें जेथें पतंजलीस अयोग्य वाटली तेथें तेथें त्यानें पाणिनीला उचलून धरण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु या उचलून धरण्याच्या प्रयत्नांत पतंजलीसुद्धां कात्यायनावर निष्कारण घसरला आहे; कात्यायनानें केलेलें कार्यच पुनः एकदा करून त्यानें केलेल्या परीक्षणाचेंच पुनः परीक्षण करून शिवाय पतंजलीनें त्याला स्वतःला टीकार्ह वाटणाऱ्या पाणिनीच्या मूळ सूत्रांवरहि टीका लिहिलेली आहे.

पाणिनि, कात्यायन व पतंजलि या तिघांना व्याकरण शास्त्राचे मुनित्रय असें मानण्याचा प्रघात आहे. पतंजलीच्या महाभाष्यांत व्याकरणशास्त्राच्या विकासाचा निदान त्या काळापुरता तरी कळस झालेला दिसतो. पुढील तीनचार शतकें प्राकृत भाषांच्या वाढींतच गेल्यानें तीं संस्कृत व्याकरणाच्या विकासाच्या दृष्टीनें जवळ जवळ टाकाऊच ठरतात. तेव्हां पतंजलीनंतर व्याकरणाचे इतिहासकार बऱ्याच उत्तरकालीन चंद्रगोमिन् या वैय्यावरणाकडे वळतात. आपणांस त्याविषयीं सध्या कांहीं कर्तव्य नाहीं.

## ५०९. पाणिनि, कात्यायन आणि पतंजली यांच्या मतभेदाचीं स्थानमूलक कारणें.

५०९ पाणिनि आणि कात्यायन यांतील मतभेद आणि पतंजलीची कात्यायनावर कठोर टीका आणि पाणिनीचें समर्थन यावर जसा व्हावा तसा विचार झाला नाहीं असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. असें दिसतें कीं संस्कृत भाषेमध्यें स्थानिक भेद उत्पन्न झाले होते आणि उत्तरेकडील संस्कृत आणि दक्षिणेकडील संस्कृत भिन्न झालें होतें. यवनानी या शब्दाचे अर्थ पाणिनि आणि कात्यायन भिन्न सांगत आहे त्यावरून दोघांच्या काळांमध्यें महदंतर होतें असा एकच निर्णय काढतां येणार नाहीं; तर दाक्षिणात्यांत आणि औदीच्यांत एकाच शब्दाच्या अर्थासंबंधानें भेद होता असा त्या भेदांपासून ऐतिहासिक अर्थ निष्कर्षावा लागेल.

## ५१०. दक्षिणेच्या संस्कृतप्राकृतपांडित्यासंबंधानें निष्कर्ष.

५१०. दक्षिणेकडे प्राकृतवाङ्मय पूर्वी पुष्कळ असून तें पुढें संस्कृत वाङ्मयाच्या वाढीनंतर कसें नष्ट होत गेलें असलें पाहिजे याविषयीं विवेचन मागें केलेंच आहे. त्यांत हें दाखविलें आहे कीं संस्कृत ही संग्रहणाची आणि अखिल भारतीय भाषा झाल्यानंतर तींत जें संग्रहित केलें गेलें त्याचें मूळ वाङ्मय नष्ट झालें असलें तरी देखील कांहीं स्मारकें राहिलींच असतील. सूतवाङ्मय प्राकृतांत असलें पाहिजे हेंहि

मागें सांगितलेंच आहे. कुरुयुद्धापासून निदान एक हजार वर्षेंपर्यंत दाक्षिणात्य सूतवाङ्मय प्राकृतांतच होतें आणि त्यांचीं स्मारकें प्राकृत भाषेंत राहिलीं आहेत. उदाहरणार्थ सूतवाङ्मयाचें संस्कृतीकरण झाल्यानंतर वीरांचीं नावें संस्कृत शब्दांनींच संरक्षिलीं जातात. आजच्या लोकांना "अभिमन्यु" हा शब्द ठाऊक आहे. तथापि "अहिमज्जू" हा प्राकृत वैयाकरणांनीं रक्षून ठेवलेला शब्द परिचित नाहीं. दक्षिणेकडे संस्कृत पंडित येऊन त्यांनीं स्थानिक वाङ्मयाचीं संस्कृत रूपांतरें केलीं आणि तीं केल्यानंतरच रामायणासारखें आर्ष महाकाव्य तयार झालें.

संस्कृत रामायणाचा काल तर बुद्धजन्माच्या नंतरचा असणें देखील शक्य आहे. प्राकृत काव्याचें संस्कृतीकरण बुद्धनिधनोत्तरकालीं झालें नाहीं कशावरून. तें सूत्रोत्तर कालीन आहे, याचे पुरावे रामायणांत जागोजाग आहेत. आणि रामास कवीनें सूत्रें पढलेला देखील बनविला आहे. यावरून असें दिसतें कीं बुद्धपूर्वकाळांत दक्षिणेंत संस्कृत पांडित्याची जी परंपरा उत्पन्न झाली ती देशी वाङ्मयाची संग्राहक आणि संरक्षक होती, आणि तिची वाङ्मयीन चळवळ जोराची असली पाहिजे. दक्षिणेकडील काव्यांचें भाषांतर होण्यास दक्षिणेकडील प्राकृत साहित्य देखील संस्कृत ग्रंथकारास संग्रहणास योग्य वाटलें असलें पाहिजे. याविषयीं अधिक विवेचन हालाच्या सप्तशतीच्या अनुषंगानें पुढें करण्यांत येईल; तेथें असें दाखविण्यांत येईल कीं संस्कृत काव्याचें आणि इतर साहित्याचें भवितव्य ठरण्यास प्राकृत काव्य आणि विशेषतः महाराष्ट्री काव्य कारण झालें. संस्कृत वाङ्मयानें आणि पांडित्यानें भारतीय संस्कृतीच्या गंभीर संस्कृतीची जोपासना केली आणि प्राकृत वाङ्मयानें भारतीय संस्कृतीचें लालित्य संवर्धित केलें. गंभीर क्षेत्रांत दाक्षिणात्यांची कामगिरी आहेच ती कात्यायन, वैयाकरण आणि आपस्तंब आणि बौधायन यांच्या शुल्बसूत्रांवरून व्यक्त होत आहे. व्याकरणाच्या क्षेत्रांत दाक्षिणात्य संस्कृत भाषेचें योग्य महत्त्व आणण्याचा प्रयत्न कात्यायनानें केला तर बौधायन आणि आपस्तंब यांनीं गणित आणि भूमिति यांची जोड वैदिक विद्येस दिली. ललित वाङ्मयाच्या क्षेत्रांत महाराष्ट्री काव्यानें संस्कृत काव्यावर केवळ मोठा परिणाम केला, एवढ्या विधानानें महत्त्ववर्णन पुरें होणार नाहीं. तर संस्कृत साहित्याचें, आणि त्याच्या शास्त्राचें अस्तित्त्वच महाराष्ट्री प्राकृत काव्यानें शक्य केलं असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

[ प्रस्तुत प्रकरणांत ज्ञानकोश विभाग ५ मधील व्याकरण-विषयक कांहीं गोष्टींत मतभेद दिसेल. तरी यांत जेथें भिन्नता आली आहे तेथें ज्ञानकोशांत पूर्वी व्यक्त केलेलें मत सोडून दिलें आहे असें समजावें. ]

---

*

प्रकरण ५५ वें.

# कुरुयुद्धोत्तर शासनसंस्थांच्या इतिहासांतील वैशिष्ट्यें

## ५११. शातवाहनकालीन इतिहास आणि तत्संबद्ध राजकारण.

५११. शातवाहन ऊर्फ आंध्र स्वतंत्र राजे असतां त्यांचा उल्लेख 'सेवक' असा कां यावा याविषयीं थोडेंसें विवेचन पाहिजे. त्या काळचें राजकारण समजल्याशिवाय या प्रश्नावर प्रकाश पडणार नाहीं. यासाठीं थोडेंसें राजकारणाचें स्वरूप स्पष्ट केलें पाहिजे. कोणीहि लेखकानें प्रस्तुत प्रश्नावर विवेचन केलेलें नाहीं म्हणून सविस्तर विवेचनाची आवश्यकता आहे. एका राज्याचा अधिपति दुसऱ्या राज्याचा नोकर कसा होतो यासंबंधानें स्पष्टीकरण अवश्य आहे आणि त्यासाठीं एकंदर अखिल भारतीय राजकीय पद्धतीची मीमांसा आवश्यक होते.

## ५११ अ. राजकीय परिस्थितीची विविधता

५११ अ. हिंदुस्थानचा राजकीय इतिहास अनेक घटनात्मक वैशिष्ट्यांनीं शासनशास्त्रीय नियमांनीं आणि विधिनिषेधांनीं भरलेला आहे. यूरोपांत राज्याचे प्रकार अनेक झाले, पण हिंदुस्थानांत तसे विविध प्रकार न होतां केवळ सुलतानशाहीच एकसारखी प्रचलित होती अशा तऱ्हेच्या कल्पना एका काळीं होत्या, त्या कल्पनांना अनेक धक्के मिळत मिळत त्या नाहींशा होण्याच्या मार्गांत आहेत. हिंदुस्थानामध्यें राजे लोकांचे परस्परसंबंध अनेक प्रकारें गुंतागुंतीचे होते, व आजहि आहेत. केवळ लहान सामंत राजे आणि त्यांवर अधिराज्य करणारा सम्राट एवढाच प्रकार नव्हता. राजा आणि प्रजा यांचे संबंध विविध होते, आणि साम्राज्यामध्यें देखील अनेक प्रकार होते. वैराज्यें म्हणजे लोकसत्ताक राज्यें होतीं. त्या सर्व शासनप्रकारांचें आणि तें शासन ज्या विधिनिषेधांनीं बद्ध होतें त्या नियमांचें ज्ञान आपणांस त्या कालाच्या इतिहासाचें अवगमन होण्यास अवश्य आहे.

प्रथम आपण आपलें अवलोकनक्षेत्र कुरुयुद्धाच्या कालापासून मौर्यागमनापर्यंतच करूं आणि नंतर झालेले फेरफार पूर्वीच्या स्थितीच्या ज्ञानाच्या साहाय्यानें समजून घेऊं.

कुरुयुद्धकालीं राष्ट्रांमध्यें अनेक प्रकार होते.

कोणत्याहि कालांत आपणांस राजकीय घटना अगदीं स्थिर दिसत नाहीं, तर नेहमीं स्थित्यंतरें होतांना दिसत असते. कुरुयुद्धकाळीं कोणतें सामाजिक स्थित्यंतर होत होतें ही गोष्ट अनेक विधानांवरून उघड होत आहे. जरासंधाचा विदर्भावर अधिकार चालत होता आणि तो वऱ्हाडपासून चौथाई वसूल करीत होता आणि त्याच्या त्या अधिराज्याच्या हक्कामुळेंच रुक्मिणीनें कृष्णाशीं लग्न करावें किंवा नाहीं हें सांगण्याचा त्यास अधिकार उत्पन्न झाला. जरासंधाचा विदर्भावर चौथाईचा हक्क सांगणारे श्लोक मागें ( परि. ९१ ) दिलेच आहेत. जरासंधाचें घराणें असुर समजलें जाई आणि तें बहुतकरून लोकांना परकीय वाटत होतें.

जरासंध हा मोठा राजा मानला जाई आणि त्याचा राजमंडळांत दर्जा बराच उच्च प्रकारचा मानला जात होता.

दक्षिणेकडे बलाढ्य राज्य "कुंतल" हें होतें. हस्तिनापूरचें राज्य फार महत्त्वाचें होतें असें जरी महाभारत सांगत आहे तरी इतर दुसरीं महत्त्वाचीं राज्यें अनेक होतीं. देशांतील राज्यें भारतीयुद्धांतील कोणत्या तरी पक्षाला मिळालीं असें महाभारतांत दाखविलें आहे आणि ती कल्पना पूर्ण करण्यासाठीं अनेक अखिल भारतांतील आणि इतर जवळच्या देशांतील राजे लोकांचीं वर्णनें प्रयत्नपूर्वक त्यांत आणलीं आहेत. तथापि हस्तिनापूरचें अधिराज्य इतर सर्व मानतात असें असल्याशिवाय इतर राजे लोकांना कोणत्यातरी विशिष्ट पक्षास मिळण्याची प्रवृत्ति होणार नाहीं. राज्यांतील यादवी वर्णन करतांना कुरुराज्य हें अखिलभारतव्यापक साम्राज्य होतें असें दाखविलें गेलें, तथापि त्या यादवीचें महत्त्व अनेक लोकांना असल्याशिवाय कोणता तरी पक्ष घेण्याची क्रिया इतरांकडून व्हावयाची नाहीं. ज्या राज्यास अनेक सामंत आहेत असेंच हस्तिनापूरचें राज्य असलें पाहिजे आणि कवींनीं त्या साम्राज्याचा विस्तार कल्पनेनें वाढविला असला पाहिजे.

महाराष्ट्रापर्यंत त्याचा विस्तार असणें अशक्य नाहीं. अश्मकांचा राजा आणि क्राथ देवावृध यांनीं त्या युद्धांत भाग घेतला होता असें महाभारत सांगत आहे.

भारती युद्धाच्या काळीं जनता एकस्वरूपी दिसत नाहीं. जरासंध असुर समजला जात होता. त्याप्रमाणेंच दुसरे असुर

राजे होते. अश्मक राष्ट्राचा पूर्वेतिहास असुरांपर्यंत आपणास नेतो. "अश्म" हें जर असुरांचें नगर असलें आणि अश्मक हें त्यांचें राष्ट्र असलें तर आजच्या महाराष्ट्रीयांत असुरांचें रक्त असलें पाहिजे यांत शंका नाहीं. असुर, बर्बर, वगैरे अनेक राष्ट्रें अनिष्ट लोकांचीं म्हणून उल्लेखिलीं आहेत त्या सर्वांस लोक एकाकाळीं परकीय मानीत असून तीं आज भारतीयांचे अंश झालीं आहेत. "असुरां"चे राजे असावेत आणि असुरांचीं कांहीं गणराज्यें असावींत ही शक्यता आहे. "सुरासुर" हा शब्द पुराणांस अत्यंत परिचयाचा आहे.

ऐतरेय ब्राह्मणाचा काल कुरुयुद्धापासून अदूर आहे असें धरून त्यांतील राष्ट्रविषयक विधानांकडेहि लक्ष देतां एक निराळेंच वैशिष्टय दृष्टीस पडतें. उत्तरकुरुसारख्या राष्ट्रास एकंदर राष्ट्रसंघामध्यें वैराच्या किंवा विजयाच्या आक्रमणापासून मुक्तता मिळाली होती. उत्तरकुरूंमध्यें वैयक्तिक विवाह नसून सामुच्चयिक विवाह होते. तेथें "कम्यूनिझम"चा कळस झाला होता.

## ५१२. गणराज्यें; गणांचें शासनसंस्थांत स्थान.

५१२. 'गण या नांवानें जी संस्था आपणास प्राचीनकाळीं दिसते ती केवळ संघटित मनुष्यसंघ या स्वरूपांत दिसत आहे. कांहीं ठिकाणीं गणराज्यें होतीं तर कांहीं ठिकाणीं गण म्हणजे केवळ संघटित स्वरूपाचे व्यापारी किंवा मुलकीसंघ होते. कुरुयुद्धकाळापासून शासनसंस्थांमध्यें स्थित्यंतर चालू होतें. मुसलमानी राजांच्या स्वारीच्या प्रसंगीं त्यांस लोकसत्ताक राष्ट्रें फारशीं दृष्टीस पडलीं नाहींत. चोहोंकडे देश राजशासित दिसत होता. त्या प्रकारची स्थिति प्राचीन काळापासून एकसारखी नव्हती. तर ती स्थिति लोकांच्या इच्छेनें व अनुभवानें निर्माण झाली होती. मोठें राष्ट्र तयार करावयाचें झालें तर लोकसत्ताक राज्यपद्धति उपयोगी पडत नाहीं; राजशासित राष्ट्रच अधिक उत्कर्ष पावतें असा अनुभव ज्याप्रमाणें प्राचीन यूरोपीयांस आला, त्याप्रमाणेंच भारतीयांस देखील आला. तरीदेखील राजाला चांगला सल्ला मिळावा आणि त्याच्या दुर्वृत्त आचरणाला नियामक कांहीं गोष्टी असाव्यात एवढें मात्र त्यांस वाटत होतीं आणि त्याची त्यांनीं सोयहि केली होती. लोकशासन नष्ट झालें नाहीं, तर लोकसंस्था आणि राजे यांमध्यें कर्तव्याची विभागणी झाली. लोकशासित शासनसंस्था राजशासित देशांत असतातच. मनुस्मृतीनें लोकांच्या गणांची व जातींची व्यवहारपद्धतीची चौकशी करून न्याय द्यावा असें सांगितलें आहे. जेव्हां एखादें शहर आपल्या संरक्षणासाठीं मोठ्या राज्याचा आश्रय घेत असे तेव्हां त्याची अंतर्गत व्यवस्था नष्ट होत नसे आणि यामुळें लोकसत्ताक राज्यव्यवस्था आणि राजायत्त राज्यव्यवस्था यांचा मिलाफ झालेला आढळून येई. पौर आणि जानपद यांच्या संघांस अधिकार होता आणि त्यांस खूष करणें राजास भाग पडे. राजाला आपल्या खासगी व्यवहारांत देखील पौरांचा आणि जानपदांचा पाठिंबा घ्यावा लागे. विदर्भाच्या एका राजाला जेव्हां असवर्णपरिग्रह करावयाची आवश्यकता भासली, तेव्हां ती ज्या व्यक्तीशीं संबंध संकल्पिला ती व्यक्ति असवर्ण नाहीं यासंबंधानें लोकांची खातरी करून द्यावी लागली अशी कथा मागें ( परि. १२८ ) आलीच आहे. एवंच गणराज्यें नसून एकसत्ताकराज्य असलें म्हणजे लोकमत उपेक्षिलें जाई असें होत नसे.

## ५१२ अ. राष्ट्रनाम आणि लोकनाम यांचें ऐक्य.

५१२. अ. प्राचीन काळीं अत्यंत लहान राष्ट्रांचा काळ होता व राष्ट्र म्हणजे 'लोक' समजत आणि त्यामुळें देशाचा उल्लेख करण्यासाठीं बहुवचन वापरण्यांत येई. "नाहं कलिंगान् जगाम" याचा अर्थ मी कालिंग देशांत गेलों नाहीं असा करावा असें जरी वैयाकरण सांगत असले तरी त्याचा खरा अर्थ असा कीं मी कलिंग लोकांत गेलों नाहीं असाच मूलतः होता.

## ५१३. देश जिंकल्यानें एका जातीचा दुसऱ्या जातीवर वरचष्मा.

५१३. एकाच स्थलावरील एखादी जात सायुध होऊन पूर्वीच्या अधिकारी जातीस नाहींशी करी तेव्हां त्या जातीचें नांव प्रदेशाला लागे. ओरिसाच्या भागाला उड्र, कलिंग, आणि उत्कल अशीं नांवें निरनिराळ्या काळांत चालू होतीं. ज्या काळांत उड्र जातीचें प्राधान्य असेल तेव्हां त्या भागाला व लोकांना "उड्राः" म्हणावें आणि कलिंगांचें (कलिंगी जातीचें) प्राधान्य असलें म्हणजे "कलिंगाः" म्हणावें. महाराष्ट्राच्या कांहीं भागाला "आंध्र" हें नांव पडलें त्याचें कारण गोदावरीच्या प्रदेशांतील आंध्र ही जात होय. शातवाहनांस आंध्र म्हणण्याचें कारण त्यांचें राज्य आंध्र प्रदेशांत झालें आणि त्यामुळें देशनाम राजाला लागलें. शातवाहनाचें तगरपुर हें आंध्रांत आलें पाहिजे अशीहि एक कल्पना पुढें आलेली आहे. सिरोंचा तहसिलींत 'नगर' नांवाचें गांव आहे, तें गोदावरीच्या उत्तरेस तगर आहे तेंच असावें, कारण तगर पैठण नाहीं. तगर हें पैठणहून निराळें असलें पाहिजे; कारण तगर आणि पैठण या दोन पेठांचा उल्लेख आहे. पूर्वकिनाऱ्याकडील माल तगरकडे जात असे. शालिवाहनानें तगरहून पैठणला आपली गादी नेली, वगैरेंची

आठवण अजून लोककथांत आहे, याच्या शेजारीं ब्राह्मणी विद्येचीं गावें अजूनहि आहेत, असें अब्दुल अझीझ † सांगत आहे. त्यांच्या पुराव्याला आणखी एक पुरावा जोडतां येईल तो हा कीं आंध्र जातीची वसती प्रामुख्यानें याच भागांत आहे.

विजयाचे परिणाम.

एका राजानें दुसऱ्या राजाचा प्रदेश घेतला म्हणजे कांहीं-काल त्या राजाच्या पहिल्या प्रजेचा वरचष्मा व्हावयाचाच; पण लवकरच सर्व प्रजेस समान वागविण्याचें धोरण उत्पन्न होई. जेत्याचें किंवा त्याच्या मुलाचें जित राजाच्या राजकन्येशीं लग्न होऊन दोन्ही राष्ट्रांचा तो राजा होण्यास अडचण नसे. राजकुल हें नेहमीं सामान्यजनतेपेक्षां निराळ्या रक्ताचें व भाषेचें असे. राजघराण्याचे संबंध नेहमीं इतर राजघराण्याशीं होत असल्यामुळें राजांस विशिष्ट राष्ट्रीयत्व अगर विशिष्ट जातित्व नसे आणि त्यामुळें अनेक प्रकारच्या जनतांस म्हणजे जातींस अगर राष्ट्रांस राजकुल हें त्रयस्थ वाटे. आणि त्यामुळें मोठें राज्य तयार होण्याची क्रिया राजसत्ताक पद्धतीनेंच होत असे आणि या कारणांमुळें प्राचीन ब्राह्मणास लोकराज्य हें अनुपयुक्त वाटे.

### ५१४. शासनसंस्थेखालील प्रदेशाची विस्तारक्षमता आणि त्या दृष्टीनें शासनसंस्थेच्या उपयुक्ततेचा विचार.

५१४. शासनसंस्थेचा इतिहास पहातांना ज्या गोष्टी पहावयाच्या असतात त्या म्हटल्या म्हणजे त्या शासनसंस्थांनीं किती जनता व्यापिली गेली, त्या शासनसंस्थांचा झालेला विकास होण्यास अंतर्गत कारणें झालीं कीं बाहेरील घडामोडी परिणामकारी झाल्या, आणि कोणत्या कारणांमुळें शासनसंस्था विशिष्ट स्वरूप पावल्या या होत. भारतीय शासनसंस्थांमध्यें लोकराज्याची मोठी संघटना झाली नाहीं तर साम्राज्य-स्वरूपी 'एकराद्' संघटना मोठाल्या होत गेल्या. साम्राज्यांच्या एकव्या अधिपतीस लोकनियंत्रण नव्हतें असें नाहीं, भारतीय इतिहासामध्यें ब्राह्मणांची जी कामगिरी झाली, तीमुळें लोकराज्य बऱ्याच अंशीं अनवश्य झालें. सामान्य जनतेला राजांनीं पिळून काढावें आणि छळावें याला नियंत्रक क्रिया ब्राह्मणांकडून हिंदुस्थानांत जितकी झाली तितकी अन्य देशांत लोकप्रतिनिधींच्या संस्थांकडून देखील झाली नसेल. लोकराज्यांत देखील सत्ताधारी वर्गाच्या अन्यायाविरुद्ध धैर्यानें वागणारा वर्ग क्वचितच असतो. सत्ताधारी वर्गास न भितां न्याय देणाऱ्या न्यायाधिशाची जी अपार तारीफ झालेली दिसते, तीवरून तसा वर्ग लोकराज्यांत देखील दुर्मिळच असला पाहिजे. ब्राह्मणाची अवध्यता, त्याची भिक्षापात्रास तयारी, त्याचें विद्याव्रत इत्यादि गुणामुळें न्यायाधिशाच्या जागीं त्यांची नेमणूक झाल्यामुळें समाजशासन जितकें धर्मयुक्त झालें असेल तितकें हिंदुस्थानाखेरीज इतरत्र झालें असेल अशी कल्पना सुलभ होत नाहीं. लोकनियुक्त न्यायाधिश असले म्हणजे बहुसंख्य समाजास रुचेल असाच न्याय देण्याकडे प्रवृत्ति होते ही गोष्ट आपणांस अमेरिकेसारख्या लोकशासित देशांत स्पष्ट दृष्टीस पडते. ब्राह्मणांचा लोकराज्यावर विश्वास नव्हता. सामान्य जनता भेवडावली जाते आणि तिला भेवडावून तिच्याकडून हव्या त्या गोष्टी पास करवून घेतां येतात याविषयीं साक्ष जर्मनींतील सध्यांच्या हिटलरशाहीनें चांगलीच दिली आहे. राजानें राज्यकार्य करावें आणि त्याच्या आदेशानें सर्वांनीं वागावें. राजानें न्याय आणि धर्म यांचीं बंधनें बाळगावीं म्हणजे राज्य चांगलें चालतें. लोकनियुक्त राज्यपद्धति श्रेयस्कर नाहीं असें ब्राह्मणांस नेहमीं वाटत असे. एवढेंच नव्हे तर अलबेरुणीसारख्या प्रवाशाला भारतीय जनतेची तशीच समजूत होती असें दिसून आलें. हिंदुस्थानांतल्या राजे लोकांसारखे राजे इतरत्र सांपडावयाचे नाहींत, आणि येथील पंडितवर्गासारखा पंडितवर्ग अन्यत्र असणें शक्य नाहीं, असा येथील लोकांचा विश्वास इतका पक्का होता कीं याच्या विरुद्ध कोणी विधान केलें तर त्याला ते अडाणी किंवा खोटें बोलणारा समजत. अलबेरुणीनें हें भारतीयांसंबंधानें विधान केलें तें त्यांच्या स्तुतीसाठीं केलें नसून दोष काढण्याच्या बुद्धीनें केलें आहे. आणि दोष काढतांना हिंदुस्थानची स्तुति त्याजकडून नकळत झाली आहे. हिंदुलोक इतरापेक्षां निराळे, ते त्यांच्या गर्वामुळें झाले आहेत आणि गर्वाला कांहीं औषध नाहीं असें विधान त्यानें केलें आहे. हिंदूंच्या गर्व बाळगण्याच्या ज्या बाबी त्यास दिसून आल्या त्याच्यामध्यें पंडितवर्ग व राजे यांच्याविषयीं असलेला अभिमान हा त्यानें उल्लेखिला आहे. यावरून प्राचीन भारतीयांनीं आपल्या तऱ्हेनें शासनसंस्था पूर्णतेस नेल्या होत्या असें दिसतें. अर्थशास्त्रानें पढविलेला राजधर्म अत्यंत कठिण होता आणि ज्याअर्थी आपल्या संस्थांबद्दल प्रजेला गर्व वाटत होता, त्याअर्थी प्राचीन ब्राह्मण्य आणि राजत्व या आपल्या अभिमान बाळगण्याजोग्या संस्था आहेत असें प्राचीनांस वाटत होतें हें स्पष्ट आहे.

### ५१५. गणराज्यपद्धतीविषयीं लोकांचा अविश्वास.

५१५. लोकांस लोकसत्ताक राज्यांत काय अडचणी दिसून

---

† Abdul Aziz—On the identification of Ancient town Tagara JASB. 1919.

आल्या याचा पुरावा आज आपल्यापाशीं स्पष्ट शब्दांत आहे. महाभारतांत गणराज्यांचें वर्णन केलें आहे. गणसत्ताक राज्यपद्धतिवर ज्ञानकोशांत लेख आहे त्यांत प्राचीन भारतांतील गणराज्यासंबंधीं माहिती व आधार दिलेले आहेतच. गण याचा अर्थ जात न करतां लोकशासित राष्ट्र असाच केला पाहिजे असें जयस्वाल दाखवीत आहेत. ‡ गण याचा अर्थ लोकशासित जनता असा केला पाहिजे; केवळ लोकायत्त शासनसंस्था असा करतां कामा नये अशा मताचें प्रतिपादन डॉ. टामस यांनीं केलें आहे. † फ्लीट यांनीं गण याचा अर्थ केवळ जाति असा केला होता. तो अर्थात् आज कोणी स्वीकारणार नाहीं. गण याचा अर्थ काय, त्यांच्यामध्यें राज्यव्यवस्था कशी होती यासंबंधानें माहिती देण्यासाठीं जयस्वाल यांनीं भारतश्लोकांचें उद्धरण केलें तें महत्त्वाचें असल्यामुळें पुढें देत आहे.

गणानां वृत्तिमिच्छामि श्रोतुं मतिमतां वर ६
यथा गणा प्रवर्द्धन्ते न भिन्द्यंते च भारत
अरींश्च विजिगीषंते सुहृदः प्राप्नुवंतिच्च ७
भेदमूलो विनाशोहि गणानामुपलक्षये
मंत्रसंवरणं दुःखं बहूनामिति मे मतिः ८
एतदिच्छाम्यहं श्रोतुं निखिलेन परंतप
यथा च्च ते न भिद्येरंस्तच्च मे वद पार्थिव ९

भीष्म उवाच

गणानां च कुलानां च राज्ञां भरतसत्तम
वैरसंदीपनविधौ लोभामर्षौ नराधिप १०
लोभमेको हि वृणुते ततोऽमर्षमनंतरम्
तौ क्षयव्ययसंयुक्तावन्योन्यंच्च विनाशिनौ ११
चारमंत्रबलादानैः सामदानविभेदनैः
क्षयव्ययभयोपायैः कर्षयन्तीतरे तरं १२
तयादानेन भिद्यंते गणाः संघातवृत्तयः
भिन्ना विमनसः सर्वे गच्छन्त्यरिवशं भयात् १३
भेदे गणा विनश्युर्हि भिन्नास्तु सुजयाः परैः
तस्मात् संघातयोगेन प्रयतेरन् गणाः सदा १४
अर्थाश्चैवाधिगम्यंते संघातबलपौरुषैः
बाह्याश्चमैत्रीं कुर्वन्ति तेषु संघातवृत्तिषु १५
ज्ञानवृद्धाः प्रशंसंति शुश्रूषंतः परस्परम्
विनिवृत्ताभिसंधानाः सुखमेधंतिसर्वशः १६
धर्मिष्ठान्व्यवहारांश्च स्थापयंतश्च शास्त्रतः
यथावत्प्रतिपश्यंतो विवर्द्धंते गणोत्तमाः १७
पुत्रान्भ्रातॄन्विगृहंतो विनयंतश्च तान्सदा
विनीतांश्च प्रगृह्णंतो विवर्द्धंते गणोत्तमाः १८
चारमंत्रविधानेषु कोषसन्निचयेषु च
नित्ययुक्ता महाबाहो वर्द्धंते सर्वतो गणाः १९
प्राज्ञान् शूरान् महोत्साहान् कर्मसु स्थितपौरुषान्
मानयंतः सदा युक्तान् विवर्द्धन्ते गणा नृप २०
द्रव्यवंतश्च शूराश्च शस्त्रज्ञाः शास्त्रपारगाः
कृच्छ्रास्वापत्सुसंमूढान् गणान् संतारयंति ते २१
क्रोधो भेदो भयं दंडः कर्षणं निग्रहो वधः
नयत्यरिवशं सद्यो गणान्भरतसत्तम २२
तस्मान्मानयितव्यास्ते गणमुख्याः प्रधानतः
लोकयात्रासमायत्ता भूयसी तेषु पार्थिव २३
मंत्रिगुप्तिः प्रधानेषु चारश्चारित्रकर्षण
न गणाःकृत्स्नशो मंत्रं श्रोतुमर्हन्ति भारत २४
गणमुख्यैस्तु संभूय कार्यं गणहितं मिथः
पृथग्गणस्य भिन्नस्य विततस्य ततोऽन्यथा २५
अर्थाःप्रत्यवसीदंति तथाऽनर्था भवन्तिच्च
तेषामन्योन्यभिन्नानां स्वशक्ति मनुतिष्ठताम् २६
निग्रहः पंडितैः कार्यः क्षिप्रमेवप्रधानतः
कुलेषु कलहा जाताः कुलवृद्धैरुपेक्षिता २७
गोत्रस्य नाशं कुर्वंति गणभेदस्य कारकम्
आभ्यंतरभयं रक्ष्यमसारं बाह्यतो भयम् २८
आभ्यंतरभयं राजन् सद्यो भूतानि कृंतति
अकस्मात् क्रोधमोहाभ्यां लोभाद्वापिस्वभावजात्
२९
अन्योन्यं नाभिभाषंते तत्पराभवलक्षणम्
जात्याच सदृशाः सर्वे कुलेन सदृशास्तथा ३०
नचोद्योगेन बुद्ध्या वा रूपद्रव्येण वा पुनः
भेदाश्चैव प्रदानाश्च भिन्दते रिपुभिर्गणाः ३१
तस्मात् संघातमेवाहुर्गणानां शरणं महत् ३२

हे बुद्धिमानांतील श्रेष्ठा, मी गणांची वृत्ति ऐकूं इच्छितों (६); हे भारता, गणांची वृद्धि कशी होते, आणि त्यांचा भेद कसा होत नाहीं, ते शत्रूंस कसे जिंकतात आणि मित्रप्राप्ति

---

‡ Jayaswal Republics in the Mahabharat J. B. O. 1915.

† J. R. A. S. 1915.

कशी करून घेतात ( ७ ) ? गणांचा विनाश भेदमूलक असतो असें मीं त्यांचें उपलक्षण करतों ( ८ ). गणांमध्यें अनेकांचें मंत्रसंवरण (मसलतीची गुप्तता) कठीण आहे असें मला वाटतें. हे थोर तपाच्या पुरुषा, मला साकल्यानें सांग कीं त्यांचा भेद कसा होणार नाहीं.

**भीष्म म्हणाला:**—हे भारतश्रेष्ठा, गणांच्या, कुलांच्या, किंवा राजांच्या वैरवृद्धीमध्यें लोभ आणि अमर्ष हे कारण होतात. एक लोभास पत्करितो (दुसऱ्याच्या ठायीं) त्याच्या नंतर अमर्ष उत्पन्न होतो, ते क्षय आणि व्यय यांही संयुक्त असे अन्योन्याचा नाश करतात. हेरांच्या मंत्राच्या बळामुळें आणि साम, दान आणि भेद यांच्या उपयोगानें इतर लोक त्यांचें क्षयव्ययोपायांनीं सहज आकर्षण करतात (१२). गणांमध्यें अगोदरच एकमेकांत भांडण्याची प्रवृत्ति असते, तीमुळें आणि दानाच्या योगानें त्यांत भेद उत्पन्न करणें सोपें होतें. एकदां त्यांच्यांत भेद पडला म्हणजे ते विमनस्क होतात, आणि भयामुळें शत्रूस वश होतात ( १३ ). भेदांच्या योगानें गण विनष्ट होतात, आणि एकदां ते भिन्न झाले म्हणजे शत्रूस जय मिळविणें सोपें होतें म्हणून गणांनीं जो प्रयत्न करावयाचा तो ऐक्यानें करावा. बल आणि पौरुष यांचें एकीकरण ज्यांनीं केलें आहे असे लोक अर्थप्राप्ति करून घेतात, आणि संघातवृत्तीचे जे असतील त्यांच्या बरोबर बाह्य मैत्री करतात.

ज्ञानवृद्ध प्रशंसा करतात. एकमेकांची शुश्रूषा करतात. अभिसंधानापासून निवृत्त होतात ( १६ ). धर्मिष्ठ व्यवहारांची स्थापना शास्त्रयुक्त करतात, आणि त्यांची अंमलबजावणी होते कीं नाहीं हें पहातात तेच गणोत्तम वृद्धि पावतात (१७). पुत्र आणि भ्राते यांची तरफदारी न करणें, त्यांना विनयी बनविणें आणि विनीत लोकांचा सत्कार करणें या गोष्टी जे करतात ते गणोत्तम वृद्धि पावतात ( १८ ).

हेरापासून माहिती मिळविणें, कोशसंग्रहण करणें या गोष्टींत जे नित्य युक्त आहेत त्याच गणांची सर्व बाजूंनीं वृद्धि होते (१९). शाहाण्यांना, शूरांना, उत्साही लोकांना, कामामध्यें कायमचें पौरुष दाखविणारांना आणि नेहेमीं उद्योगांत असणाऱ्यांना जे मान देतात, ते गण, हे राजा, वृद्धि पावतात ( २० ).

द्रव्यवान, शूर, शास्त्रज्ञ, शास्त्रवेत्ते आहेत ते संमूढ झालेल्या गणांना संकटांतून आणि आपत्तींतून तारतात ( २१ ). क्रोध, भेद, भय, दंड, कर्षण, निग्रह आणि वध याच्या योगानें नेहमीं गण अरिवश होतात ( २२ ). यासाठीं गणांचे जे "मुख्य" असतील तेच प्राधान्यानें संमानित करावे. पार्थिवा यांच्याठायीं लोकबल पुष्कळच असतें ( २३ ). हेरांची वृत्ति जाणणाऱ्या पुरुषाची, कारस्थानाची गुप्तता मंत्र्यांमार्फतच ठेवावी. गणांचीं कारस्थानें ऐकण्याची लायकीच नाहीं ( २४ ). गणांच्या मुख्यांनीं एकत्र होऊन गणहित गुप्तत्वानें साधावें. पृथक् झालेल्या, भिन्न झालेल्या, पसरलेल्या गणांचा अर्थ उलटपक्षीं खालावेल, आणि अनर्थ होतील. त्याअर्थीं एकमेकांपासून भिन्न असलेल्या गणांनीं आपल्या शक्तीचें संघटन करावें ( २५-२६ ).

कुलामध्यें कलह उत्पन्न झाले आणि कुलवृद्धांनीं ते उपेक्षिले तर त्यांचा निग्रह पंडितांनीं ताबडतोब करावा ( २७ ). ज्या गोष्टी गणभेदास कारक होतील त्यांमुळें गोत्रांचा नाश होतो. "आभ्यंतर" भय रक्षणार्ह आहे, बाहेरचें भय असार आहे ( २८ ). अंतर्गत भयामुळेंच, राजा, भूतमात्राचा नाश होतो. क्रोध, मोह, किंवा स्वाभाविक लोभ यांच्यामुळें देखील एकाएकीं नाश होतो ( २९ ).

एकमेकांशीं संभाषण करीत नाहींत. तसें करणें पराभवाचें लक्षण समजतात; कारण जन्मानें सर्व सारखे, तसेच कुलानें सर्व सारखेच ( ३० ). न्याय देण्याच्या उद्योगानें, बुद्धीनें, किंवा रुपये अगर द्रव्य देऊन पुन्हा शत्रु भेद किंवा प्रदान करून शत्रू भिन्न करतात ( ३१ ).

त्याअर्थीं संघटना हीच गणांचें मुख्य आश्रयस्थान आहे ( ३२ ).

### ५१६. लोकसत्ताक आणि भिन्नजातीयांच्या राज्यांत समतेची दुःसाध्यता.

५१६. एवंच, गणराज्यांची स्थिति राज्याच्या वाढीला विरोध करणारी प्राचीनांस भासली आणि त्यामुळें ती राज्यपद्धती कमी उपयोगाची ठरली. जेथें एकजातिसदृश लोकांचें राज्य आहे तेथें त्या लोकांना भिन्न जातीशीं समतेनें वागणें कठीण जातें आणि जेव्हां एकाजातीचें दुसऱ्या जातीवर राज्य होतें तेव्हां ती परिस्थिति लोकांस असुखकारक होते. एक जात दुसऱ्या जातीस पचनीं पाडूं शकत नाहीं. आणि त्यामुळें जिच्या हातीं अधिकार आला असेल ती दुसऱ्या जातीस चांगल्या तऱ्हेनें वागवीत नाहीं. या परिस्थितीमुळें गणराज्यें लोकांत नापसंत होऊन एकसत्तात्मक शासनसंस्था देशांत वृद्धिंगत झाल्या. देशांतील वाढ ज्या दिशेनें झाली तींत परकीय लोकांच्या आगमनानें फेरफार झाले नाहींत. परके राजे आले तेहि देशी बनले, आणि शासनसंस्था देशीच राहिल्या.

**५१७. असुर आणि इराणी लोकांचा शासनसंस्थेवर परिणाम.**

५१७. महाराष्ट्राच्या इतिहासांत कुरुयुद्धाच्या काळीं किंवा त्याच्या अगोदर असुरांचा उपद्रव होता व त्यांचीं राज्यें होतीं असें दिसून येतें; त्याअर्थी असुरांच्या संस्कृतीचा दाक्षिणात्य शासनपद्धतीवर कांहीं परिणाम झाला काय हा प्रश्न विचारणीय आहे. त्याविषयीं विशेष विचार आदिपर्वांतच सांपडेल. येथें त्यांच्या व इराणी लोकांच्या वर्चस्वामुळें शासनसंस्थांत काय फरक झाले याविषयीं केवळ अत्यंत स्थूलपणें मत देतां येईल.

असुर आणि इराणी या दोन लोकांचा संबंध आला त्यांतील इराणी लोकच जर विद्याधरांच्या कथांत चितारले गेले असले तर विद्याधरांचीं गणराज्यें होतीं तीं देखील आपल्याकडील पद्धतीनें म्हणजे आपल्या स्वतंत्र संस्था राखून साम्राज्यांत समाविष्ट झालीं असावींत. अलेक्झांडरला कांहीं गणराज्यांकडून प्रतिकार झाला हें आपणास ठाऊकच आहे.

असुरांच्या राज्यामुळें कांहीं विचित्र शासनसंस्था उत्पन्न झाल्या काय असा विचार करतां कोणत्याही तऱ्हेनें भिन्न परिस्थिति निर्माण झालेली दिसत नाहीं. राजानें राजपुरोहितास मानलें पहिजे ही परिस्थिति देवांप्रमाणेंच असुरांमध्येंही होती असें दाखविलें आहे. असुरांच्या देवता भिन्न असतील; तरी तेवढ्यामुळेंच समाजांत निराळेपणा प्राचीनकाळीं उत्पन्न होत नसे. असुरांची इष्ट देवता आणि इकडील देवता भवानी यांतील साम्य त्याप्रमाणेंच विद्यादेव आणि युद्धदेव या दोहोंचें आपल्याकडे त्याप्रमाणेंच असुरांत अस्तित्व यांच्यामुळें विवाहसंबंध आणि सामाजिक ऐक्य हींही निर्माण होत, आणि त्यामुळें सामाजिक भिन्नत्वच कांहीं पिढ्यांत नाहींसें होई, व एवंच असुरांच्या अस्तित्वाचा परिणाम शासनसंस्थांच्या इतिहासावर झालेला दिसत नाहीं. त्यांचा परिणाम जो धार्मिक आयुष्यावर झाला तो वारंवार उल्लेखिलाच आहे.

भारतीय इतिहासशास्त्राचीं वैशिष्ट्यें मांडण्याचे जे अनेक प्रयत्न झाले आहेत त्यांतील एका प्रयत्नांत असुरांचा इतिहास भारतीयांच्या पूर्वीचा आहे त्याची जी जाणीव भारतीयांनीं वारंवार दाखविली आहे ती होय असें म्हटलें आहे.†

† **Banarji Shastri.** Indian Historical tradition JBO 1927. बानर्जी शास्त्री यांच्या या भारतीय इतिहास शास्त्रावरील लेखांतील दुसरीं अनेक विधानें संशयास्पद तथापि विचार करण्याजोगीं आहेत. उदाहरणार्थ, परोक्ष प्रत्यक्ष, हे वारंवार येणारे शब्द ऐतिहासिक शास्त्रांतील संज्ञा आहेत असें दाखविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे.

असुरांच्या भारतावर परिणाम करण्याचा काल कुरुयुद्धापूर्वीपासून कुरुयुद्धाच्या नंतर अनेक शतकें असा यावा लागेल. कुरुयुद्धकालीन राजकीय स्थिति पूर्णपणें मांडण्यास सर्व पुराणांचें मंथन केलें पाहिजे. आणि त्यांतील साहित्याच्या ऐतिहासिकतेचा सूक्ष्मपणें विचार केला पाहिजे. कृष्णाच्या वेळेस जर बाणासुर होता तर त्याचा बाप वामनावतारीं म्हणजे इतका दूर कसा ? बळी व हिरण्यकशिपु यांच्यामध्यें अंतर काय तें दोनच पिढ्यांचें आहे. आजकालच्या उदाहरणावरील बायकी गाण्यांत देखील ही परंपरा संरक्षित झालेली आहे.

**प्रल्हादाचा पुत्र विरोचन बलि दानासुर ।**
**बळीचा सुत बाणासुर ।**
**त्या बाणानें करुनि तपस्या प्रसन्न गिरिजावर ।**
**करि; मागे सहस्र कर ।**
**पार्वतीच्या रुपासारखी कन्या दे सुंदर ।**
**मग हंसले गंगाधर ।**

या आजकालच्या स्त्रियांच्या गाण्यांतलें कुलपरंपराविषयक विधान पौराणिक माहितीप्रमाणें आहे हें पुढील श्लोकांवरून दिसून येईल:—

**हिरण्यकशिपोः पुत्राः चत्वारः प्रथितौजसः**
**अनुह्रादश्च ह्रादश्च प्रह्रादश्चैव वीर्यवान्**
**संह्रादश्चचतुर्थोऽभूद् ह्रादपुत्रो ह्रदस्तथा**
**विरोचनश्च प्राह्रादिर्बलिर्जज्ञे विरोचनात्**
**बलेः पुत्रशतं त्वासीद् बाणज्येष्ठं तपोधनाः †**

कृष्णकालीं जर बाणासुर होता, आणि जर हिरण्यकशिपु त्याच्या पणजाचा बाप होता, तर हिरण्यकशिपूचा काळ कुरुयुद्धापूर्वी १५० वर्षांपलीकडे जाणार नाहीं. आपणांस हिरण्यकशिपू आणि हिरण्याक्ष यांच्या कथा आद्य असुरकालीन दिसत आहेत. त्यावरून असुरकाल कुरुयुद्धाच्या अगोदर दोन शतकेंच सुरू झालेला दिसतो.

असुरकथांचें भारतीय इतिहासांत महत्त्व आहेच पण महाराष्ट्राच्या राजकीय व सामाजिक इतिहासांत विशेष आहे. रावणाचा काल आपणांस काढतां येणार नाहीं; रामकथा आणि रावण यांचा संबंधच जर कृत्रिम असला तर रामरावणांचें समकालीनत्वही गृहीत धरतां येणार नाहीं. उत्तरकांड म्हणून समाविष्ट केलेलें रावणाविषयींचें महाकाव्य बरेंच जुनें असलें तर त्यांतील असुरांच्या कथा अंशेंकरून

† अग्नि १९. ९. = ब्रह्मपुराण ३. ६८. ( आनंदाश्रम आवृत्त्या )

ऐतिहासिक असण्याची शक्यता आहे. त्या कथांवरून अश्मक-राष्ट्रसंस्थापनेस कारण झालेलें अश्मनगर कालकेयांच्या ताब्यांत होतें, कालकेय हे समुद्रांत राहणारे असुर होते आणि इल्वल नांवाचा असुर फार संपत्तिमान होता आणि त्याचा संहार करून अगस्त्यानें द्रव्य संपादन केलें इत्यादि असुरकथा पुराणांत विखुरल्या आहेत. (पद्म. सृ. १९; म. वनपर्व १०५) जर मराठी भाषेच्या घटनेंत आसुर अंश सांपडला तर आपणांस निश्चयात्मक विधान करतां येईल.

अश्म हें नगर प्रथम असुरांनीं वसविलें असावें, पुढें अश्म नगर व त्याच्या भोंवतालचा प्रदेश मिळून अश्मकराष्ट्र झालें असावें आणि तेथील राजकुलाचा पुढें इक्ष्वाकूंच्या घराण्याशीं संबंध जोडला गेला असावा असा इतिहास सूचित होत आहे. इक्ष्वाकूंच्या घराण्याशीं संबंध जोडणारे श्लोक पुढीलप्रमाणें आहेत

**ख्यातः कल्माषपादो वै नाम्ना मित्रसहो ऽभवत्**
**वसिष्ठस्तु महातेजाः क्षेत्रे कल्माषपादके**
**अश्मकं जनयामास, इक्ष्वाकु कुलवृद्धये ?**
**अश्मकस्यौरसो यस्तु मूलकस् तत्सुतोऽभवत्**
**अत्राप्युदाहरंतीमाम् मूलकं वै नृपं प्रति**
**स हि रामभयाद्राजा स्त्रीभिः परिवृतोऽवसत्**
**विवस्त्रास्त्राणमिच्छन् वै नारीकवचमीश्वराः**
**मूलकस्यापि धर्मात्मा राजा शतरथः स्मृतः**
**तस्माच्छतरथात्जज्ञे राजा त्विडबिदो बली**
**आसीत्व् ऐडविदः श्रीमान् कृतशर्मा प्रतापवान्**

ब्रह्मांडपुराण ६३, १७७ अ, (वेंकटेश्वर आवृत्ति) १८९०; लिंगपुराण ६६. २७७ अ, पंचानन तर्करत्न संपादित कलकत्ता; वायुपुराण ८८. १७७ आ, (आनंदाश्रम आवृत्ति).

या ओळींच्या ऐवजीं निराळ्या ओळी ब्रह्मपुराण (पुणें आनंदाश्रम आवृत्ति) हरिवंश (महाभारतांतील कलकत्ता आवृत्ति) शिवपुराण (धर्मसंहिता आवृत्ति. कलकत्ता, १८९०) यांत आहेत.

राजे स्वतः धार्मिक अधिकारी होऊन विशिष्ट देवतेचे अभिमानी बनतात असा परिस्थितीचा अनुभव हिरण्यकशिपूच्या काळीं भारतीयांनीं घेतला असला पाहिजे. आणि ती परिस्थिति भारतीयांस इतकी विचित्र वाटली कीं तिचा नाश करणें त्यांस अवतारकृत्य वाटलें असलें पाहिजे.

असुरांचा इतिहास आणि भारतीय इतिहास याची संगति कशी लावावी हा प्रश्न आहे. यासंबंधानें प्रयत्नहि बरेच झालेले आहेत. मार्टिन हौग यांनीं असें दाखविण्याचा प्रयत्न केला कीं असुराचे उपासक ते इराणी. इराणी आणि भारतीय आर्य यांच्यामध्यें मतविषयक द्वैत उत्पन्न होऊन राष्ट्रभेद उत्पन्न झाला. भारतीय संशोधनाच्या प्राथमिक काळांतलें हें मत होतें. त्याविषयीं विशेष चर्चा करण्यांत आज अर्थ नाहीं.

असुर हें मूळचें दैवत असीरियन लोकांचें. तो त्यांचा महाबलाढ्य राष्ट्रदेव होय. त्याच्यापासून तें इराणी लोकांनीं घेतलें आणि इराणी लोकांनीं भारतांत आल्यानंतर देखील असुर देवतेची पूजा चालू ठेवली. त्यामुळें वरुणस्तुतिपर सूक्तांत व इतर अनेक ठिकाणीं ऋग्वेदांत असुर याचा अर्थ सर्वेश्वर असा आहे. या दृष्टीनें पहातां वैदिक सूक्तांतील अत्यंत प्राचीन सूक्तें देखील असुर देवतेच्या इतिहासांतील तिसरी पायरी दाखवितात. पहिली पायरी असुरदेवमहत्त्वस्थापनेची, दुसरी असुरदेवमहत्त्व इंदो इराणी लोकांत प्रसृत होण्याची व तिसरी पायरी वैदिक वाङ्मयांत त्याच्या महत्त्वाची. वैदिक आर्यन लोक देशांत आल्यानंतर त्यांच्याकडून जुन्या आर्यन् देवतांचा हळू हळू त्याग झाला आणि शिव विष्णु या देश्य देवता स्वीकारल्या गेल्या. या स्थित्यंतरामध्यें ज्या देवतांना प्रथम निरोप मिळाला, त्यापैकीं "असुर" देव असावा. असुर हा देवाधिपति, इंद्र हा देवाधिपति, आणि शिव आणि विष्णु हेहि देव श्रेष्ठ. प्रथम असुरदेव गळाला आणि इंद्र आणि असुर हे एकमेकांचे शत्रु असल्यामुळें इंद्राला अप्रामुख्य आणण्यांत देशांतील असुरांचा देखील हात लागला असेल.

जगावर झालेल्या धार्मिक परिणामाचें श्रेय जें इराणास दिलें जात होतें तें आतां असुरांस दिलें जात आहे. सैतानकल्पना ख्रिस्ती आणि हिब्रू संप्रदायांनीं घेतली ती परशिअन लोकांपासून घेतली नसून बाबिलोनी लोकांपासून घेतली असें लोकांस वाटूं लागलें आहे. अजून पाश्चात्य संशोधनांत 'जिन' देवतांविषयीं किंवा त्यांच्या पिशाचीकरणाविषयीं उल्लेख नाहीं. † जर मध्यें मूर्तिध्वंसनाचा काळ आला नसता तर भारतीयांच्या देवैक्य स्थापन करण्याच्या पद्धतीला अधिक क्षेत्र मिळून तुर्कस्थानपासून गंगानदीपर्यंतच्या लोकांत एका काळीं उत्पन्न झालेलें साहश्य आज पुष्कळच जोरावलें असतें.

असुरांच्या शासनपद्धतीचा परिणाम भारतेतिहासांत शोधावयाचा झाल्यास आपण कुरुयुद्धपूर्व कालांत गेलें पाहिजे. कुरुयुद्धानंतरच्या कालांत असुर हा लुप्तप्राय होऊं लागलेला दिसतो. त्याचें भारतांत अस्तित्व असलें तरी त्याचें राजकीय

† प्रो. ए. बी. कुक यांनीं केंब्रिज युनिव्हर्सिटीपुढें दिलेलें व्याख्यान JRAS. 1934.

संस्थांच्या इतिहासांत महत्त्व नाहीं. असुरांच्यानंतर आलेले जे इराणी लोक त्यांनीं राजकीय क्षेत्रांत जर कांहीं विशेष क्रिया केली असेल तर ती क्षत्रपपद्धती आणण्याची होय.

### ५१८. राजमंडळांतील प्रामुख्याचें स्थानांतर आणि प्रमुख साम्राज्याचें एकंदर राजव्यवहारांत स्थान.

५१८. भारतीयुद्धाच्या वेळेस एक मोठें साम्राज्य आणि कांहीं स्वतंत्र राज्यें अशा प्रकारची स्थिति होती आणि तीपासून नंदाच्या कालापर्यंत एकंदर स्थित्यंतरें काय झालीं याचा अदमास पुढीलप्रमाणें होतो.

( १ ) कुरुयुद्धापासून अनेक पिढ्या पौरव राजघराणेंच राजमंडलांतलें प्रधान घराणें असावें.

( २ ) उदयनकालापर्यंत त्याचा उत्कर्ष एकसारखा असावा. तथापि हस्तिनापूर ही त्यांची राजधानी न राहतां कौशांबी ही झाली.

( ३ ) त्यानंतर कालांतरानें मगधास प्रामुख्य आलें.

( ४ ) जेव्हां मुख्य अधिराज्य दुर्बल होईल तेव्हां प्रत्येक राष्ट्राला आपापल्या बलावरच आपलें संरक्षण करण्याचा प्रसंग येईल, आणि त्यामुळें सम्राट कोणीतरी असणें इष्ट आहे हें तत्त्व राजमंडळांत मान्य झाल्यासारखेंहि होतें.

( ५ ) मुख्य एखादें साम्राज्य स्थापन झालें तरी त्याला प्रतिस्पर्धी लहान साम्राज्यें देखील अस्तित्त्वांत असत. उत्तरेंकडे गंगाथडींत एक साम्राज्य असावयाचें आणि एखादें लहानसें प्रतिस्पर्धी साम्राज्य महाराष्ट्रांत असावयाचें असा प्रकार होता. " भोज्य " म्हणजे भोजांचें साम्राज्य या नांवानें तें प्रतिस्पर्धी दाक्षिणात्य साम्राज्य प्रसिद्ध झालें.

( ६ ) विंध्योत्तर सत्ता आणि तिला प्रतिस्पर्धी अशी दाक्षिणात्य सत्ता अशा दोन सत्ता चालू रहाव्या याप्रकारचें राजव्यवहाराचें स्वरूप जें चालू झालें तें आज ब्रिटिश दिवाणगिरीच्या कारवाईस यशस्विता येईपर्यंत टिकलें आहे.

### ५१९. राष्ट्रें, त्याचीं स्थित्यंतरें आणि नांवांत फरक.

५१९. प्राचीन काळांत बऱ्याच प्रदेशांस अनेक राष्ट्रनामें वापरलीं गेलेलीं दिसत आहेत. वऱ्हाडास आज भोज, उद्यां क्रथकैशिक, तर परवां अश्मक अशीं नांवें लावलेलीं दिसत आहेत. याशिवाय विदर्भ हें नांव देखील चालू होतेंच. देशनाम शब्द एकवचनीं त्याचप्रमाणें अनेकवचनी वापरला जाऊन व्यक्त केलें जाई. कीकटाः कलिंगाः अशीं नांवें वापरलीं जात. यावरून कोणती सामाजिक स्थिति व्यक्त होते हें मागें सूचित केलेंच आहे. राष्ट्र हा शब्द राज्यवाचक जरी होता तरी तो प्रामुख्यानें लोकवाचक होता. म्हणजे राष्ट्र हें जातीच्या स्वरूपांत असावें, आणि ती गोष्ट दाखविण्यासाठीं अनेकवचनें वापरलीं जात. जेव्हां एका प्रदेशाला एकाद्या जातीचें नांव जाऊन दुसऱ्या जातीचें नांव लागे, तेव्हां त्या प्रदेशावर निराळ्या जातीची सत्ता स्थापन झाल्यानें तसें होई. तथापि नेहमीं नवीन सत्ता स्थापन होतांना जुन्या जातीची सहानुभूति मिळविण्यासाठीं कांहीं तरी प्रयत्न होई. त्या प्रयत्नाचा परिणाम म्हटला म्हणजे दोन जातीचीं नांवें राष्ट्राला मिळत. ही क्रिया होत असतां एका जातीचा राजा दुसऱ्या जातीची राजकन्या बायको करून दोन राष्ट्रांचें ऐक्य साधीत असावा. विशेषेंकरून जेव्हां शेजारचें राज्यच काबीज होई तेव्हां दोन्ही राष्ट्रनामें उपयोगिलीं जात. कुरु-पांचाल, शूररढ, भरुरढ, क्रथकैशिक हीं नांवें त्याच प्रकारचीं होत. राज्यास किंवा राष्ट्रास नपुंसकलिंगीं नाम वापरावें ही गोष्ट प्राचीनकाळीं अपरिचित नव्हती. साम्राज्यं, भोज्यं, स्वाराज्यं, वैराज्यं इत्यादि राष्ट्रांस स्वस्तिवाचन केल्याचा पुरावा ऐतरेय ब्राह्मणांतच आहे.

तीं नपूंसकलिंगी नामें जेव्हां राज्य विशिष्ट जातीच्या कक्षेच्या बाहेर पडे त्या काळाचीं दर्शक आहेत. साम्राज्य हा शब्दच अनेक राष्ट्रसमुच्चयांचा सूचक आहे. स्वाराज्यं, आणि वैराज्यं याचे अर्थ अगदीं निश्चयानें ठरवितां येत नाहींत. वैराज्यं याचा लोकसत्ताकराज्य असा अर्थ यूरोपीय पंडितांनीं केला तो आपल्याकडील अनेक पंडितांनीं मान्य केला आहे. " स्वाराज्यं " याचा अर्थ काय हा मात्र प्रश्न आहे. स्वाराज्यं म्हणजे स्वराजाच्या हाताखालील मुलुख; स्वराट् म्हणजे Independent rulers of the South असा अर्थ सांगून रमेशचंद्र दत्त स्वराट् शब्दाचा सुरत शब्दाशीं संबंध जोडतात.* आमच्या मतें तो अर्थ बरोबर नाहीं. प्रत्येक ठिकाणीं जर त्या त्या देशाचा राजा राज्य करीत असेल तर आणि लोकनामच जर राजास लागत असेल तर स्वराट् म्हणण्याचा अर्थ काय असा प्रश्न उत्पन्न होतो. देशांतील सर्व विविध प्रकारचीं शास्त्यें वर्णिण्यासाठीं ती यादी दिली आहे. आणि ती यादी आमच्या मतें स्वकालीन इतिहासाची म्हणजे राष्ट्रघटना आणि राष्ट्रसंबंध यांची दर्शक आहे. त्या काळांतील राजकीय स्थिति पुढीलप्रमाणें होती. अनेक राष्ट्रें एकीकृत करून एक मोठें तें साम्राज्य बनलें होतें. दुसरें एक लहानसें साम्राज्य बनलें होतें

---

* Civilization of Ancient India, Vol. I.

तें म्हटलें म्हणजे भोजांचें होय. भोजांनीं बराचसा प्रदेश आपल्या सत्तेखालीं आणला होता. भोज्य म्हणजे भोजांच्या तावडींत असलेला मुलुख व अशा रीतीनें भोज्य याचा अर्थ भोज जातीच्या अधिकाराखालीं असलेला प्रदेश असा झाला. यांत मुख्य राजा भोई असून आपलें राज्य भोयांच्याच पाठिराखेपणावर चालवीत असावा. असें जेव्हां साम्राज्य तयार होतें, तेव्हां सम्राटास जातिमुख्याचेंच स्वरूप रहातें. अशीं राज्यें अनेक असतात. अशा प्रसंगीं त्या जातींचें नांवच राज्यास लागणें स्वाभाविक आहे.

## ५२०. एका राजानें दुसऱ्या राजाकडे नोकरी करण्याची पद्धति.

५२०. एका राजानें दुसऱ्या राजाकडे नोकरी करण्याची क्रिया अनेक कारणांमुळें उत्पन्न होई.

एक तर प्राचीनकाळीं पगाराची पद्धति फार हळूहळू अमलांत येत होती. आणि पगाराची पद्धत जरी असली तरी पगार थकल्यास उत्पन्नाचा मुलुख तोडून देण्याची पद्धति दृष्टीस पडते. त्यामुळें लहान लहान राज्यांचें अस्तित्व उत्पन्न होई.

शिवाय एकाद्या राजाचा मुलगा दुसऱ्या राजाकडे नोकरीला जाई आणि मोठ्या पदावर चढे. पुढें तोच राजा आपल्या राज्याचा वारस होई. तरी त्याचें राज्य लहान असल्यास आपल्या राज्यावर कोणीतरी आपला प्रतिनिधि राखून नोकरी कायम ठेवी. याशिवाय मोठीं राज्यें देखील लहान राज्यें गिळंकृत करतांना त्या सर्व गोष्टी कायदेशीर करण्यासाठीं किंवा सुलभतेनें करण्यासाठीं कोठें वसूल करण्याचें त्रासदायक काम अंगावर घेऊन तेथील राजाला शांततेनें आणि चैनीनें रहाण्याची संधि देत. असे एका राज्याच्या अधिपतीनें दुसऱ्या ठिकाणीं नोकरी करण्याचे प्रकार अनेक कारणांनीं उत्पन्न होत असत. हे सर्व प्रकार आपणांस प्राचीन कथांतून पहावयास मिळतात. शुंग मौर्यांचे सेनापति झाले, पण त्यांचें स्वतःचें राज्य होतेंच असें कालिदास दाखवीत आहे. या प्रकारच्या पद्धतीचा उपयोग होऊन आपले व्याप वाढवीत असलेले शातवाहन यांनीं मगधाच्या राज्यांत एकादा अधिकार मिळविला देखील असेल; व तशी गोष्ट झाली असल्यास सेवकानें स्वामीला दूर करून राज्य घेतलें असा उल्लेख चुकीचा होणार नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीनें साताराचें अगर दिल्लीचें राज्य घेतलें तेव्हां तिला तोच म्हणजे सेवकानें केलेल्या स्वामिघाताचा दोष लावतां येईल.

---

# परिशिष्ट १

## चालुक्यकालीन लेख ( बदामी आणि ऐहोळी येथील ).

### १. चालुक्यलेख देण्याचें औचित्य.

१. चालुक्यपूर्वकालीन इतिहासाचीच जुळणी करतांना चालुक्यकालीन स्थितीचें ज्ञान आवश्यक होतें. ज्ञातापासून अज्ञाताकडे जावयाचें त्याचप्रमाणें उत्तरकालीन स्थितीचीं मूळें शोधावयाचीं हें संशोधकांचें कर्तव्य होय. चालुक्यपूर्वकालीन इतिहासासाठीं चालुक्यांच्या काळच्या लेखांचें ज्ञान आणि त्यासाठीं थोड्याशा लेखांचें अवतरण आवश्यक आहे. चालुक्यलेखांवरून त्याच्या अगोदरच्या राजकीय घडामोडींची, त्याचप्रमाणें धार्मिक स्थित्यंतरांचीं अंगें नजरेस येतात.

येथें चालुक्यांचे दोन लेख देण्यांत येत आहेत. एक बदामी येथील मंगलीशाचा; व दुसरा ऐहोळी येथील सत्याश्रय पुलकेशीचा.

चालुक्यांच्या उदयकालाचीं व परिस्थितीचीं कांहीं अंगें मंगलीशाच्या बदामी येथील लेखावरून स्पष्ट होत आहेत. शके ५०० च्या सुमारास मंगलीशाचा जन्म झाला. आणि मंगलीश आपल्या लेखांत आपले पूर्वज अनेक यज्ञांचे कर्ते होते आणि त्यांनीं अश्वमेधहि केला होता असा उल्लेख करतो. त्यावरून मंगलीशाच्या काळीं चालुक्य सत्तेचा प्रभातकाल नसून माध्यान्हकल्प काळ होता असें उघड होतें. पुलकेशीच्या ऐहोळीच्या लेखांत जें वैभव वर्णिलें आहे तें समजण्यास मंगलीशकालाचें ज्ञान अवश्य आहे. मंगलीशच्या लेखांत चालुक्याची सत्ता क्रमानें कशी वाढली याचीं दर्शकें आहेत.

### २. शातवाहनसत्ता आणि चालुक्य.

२. ज्याअर्थी शकनृपतीच्या कालापासून आपली कालगणना करणारे पहिलेच सम्राट् म्हणून आपणांस चालुक्य दिसून येतात, त्याअर्थी ज्या क्षेत्रांत वाकाटकांची, आणि गुप्तांची सत्ता पोचली नव्हती आणि ज्या प्रदेशांत आंध्रभृत्यांच्याच सत्तेची परंपरा उरली होती. अशा प्रदेशांत त्यांचा उदय झाला असला पाहिजे. चालुक्य आणि कदंब हे ज्याअर्थी शातवाहनाच्या बिरुदांचें इतकें काळजीपूर्वक अनुकरण करतात, त्याअर्थी शातवाहन हे चालुक्याचे पूर्वगामीच केवळ नव्हेत, तर आदर्शभूत घराणें, आणि बहुतकरून स्वामी घराणें असावे असें वाटतें.

### ३. चालुक्यांचा देवधर्म.

३. चालुक्यांच्या घराण्यांत श्री. विष्णूची उपासना चालू ठेवून श्रौतकर्मांचा परिपाठ होता. आणि या बाबतींत त्यांचा धर्म आजकालच्या कर्मठ ब्राह्मणाच्या पद्धतीपेक्षां निराळा दिसत नाहीं. पण या बाबतींत देखील ते शातवाहनांचेंच अनुकरण करीत आहेत. तथापि दुसरी एक गोष्ट अशी दिसते कीं, या काळांत श्रौतविधींना पौराणिक रूप प्राप्त होऊं लागलें होतें. मंगलीश याचा धर्म आणि त्याच्या पूर्वजांचा धर्म यांत अंतर पडूं लागलें होतें. थोर यज्ञाचें कर्तृत्त्व मंगलीशाच्या पूर्वजांस दिलें आहे. मंगलीशानें स्वतःला घेतलें नाहीं.

मंगलीशाच्या देवधर्माचें स्वरूप पौराणिक असलें तरी त्याला श्रौतधर्माची मखलाशी वापरली आहे. "सत्रकर्म सोळा ब्राह्मणांकडून करवावें आणि तें दररोज करवावें आणि उरलेलें परिव्राजक वर्गास भोज्य म्हणून द्यावें" असा त्यानें आपल्या दानपत्रांत आदेश सांगितला आहे. या वर्णनावरून तें सत्रकर्म नव्हतें असें स्पष्ट होतें. सोळा ब्राह्मणांना कांहींतरी कर्म करण्यास सांगावें, त्यांना त्याबद्दल जेवावयास द्यावें आणि उरलेलें अन्न परिव्राजक वर्गास द्यावें, एवढेंच काय तें त्यांत उद्दिष्ट दिसतें.

मंगलीशाच्या पूर्वजास अनेक यज्ञांचें व विशेषतः अश्वमेधाचें व तदनंतरच्या अवभृथस्नानाचें जें श्रेय या ताम्रपटांत दिलेलें आहे तें खोटें असेल असें नाहीं. ऐहोळीच अंकित लेख जरी जैन कवीनें जैन कार्यासाठीं लिहिला आहे तरी त्यांत देखील पहिल्या पुलकेशीला अश्वमेधाचें श्रेय दिलें आहे आणि तें गौरवपूर्वक दिलें आहे. यावरून त्यांचें यज्ञकर्तृत्त्वाचें विधान खरें आहे असें वाटतें.

### ४. बदामीचा लेख.

बदामीच्या लेखाचें प्रो. एगेलिंग यांनीं केलेलें वाचन पुढीलप्रमाणें आहे.†

†By Prof. J. Eggeling, London. An Inscription (of Mangalis'a) from Badami. The Indian Antiquary, Vol. III, Page 305.

स्वस्ति ॥ श्रीस्वामिपादानुध्यातानां मानव्य सगोत्राणां हारीतिपुत्राणां अग्निष्टोमाग्निचय-नवाजपेयपौण्डरीकबहुसुवर्ण्णाश्वमेधावभृथस्नान-पवित्रीकृतशिरसां चल्क्यानां वंशे संभूतः शक्तित्रयसंपन्नः चल्क्यवंशांबरपूर्णचंद्रोऽनेक-गुणगणालंकृतशरीरस्सर्व्वशास्त्रार्थतत्वनिविष्टबु-द्धिरतिबलपराक्रमोत्साहसंपन्नः श्रीमंगलीश्वरो रणविक्रान्तः प्रवर्ध्धमानराज्यसंवत्सरे द्वादशे शकनृपतिराज्याभिषेकसंवत्सरेष्वातिक्रान्तेषु पञ्च-सु शतेषु निजभुजावलंबितखड्गधारानमितनृपति-शिरोमकुटमणिप्रभारंजितपादयुगुलश्चतुस्सागर-पर्यन्तावनिविजयमंगलि ( मंगलै ) कागारः परम-भगवतो लयने महाविष्णुगृहमतिदैवमानुष्यकमत्य-द्भुतकर्म्मविरचित ( म् ) भूमिभागोपभागापरि-पर्यन्तातिशयदर्शनीयतमं कृत्वा तस्मिन् महाका-र्त्तिकपौर्ण्णमास्यां ब्राह्मणेभ्यो महाप्रदानान् दत्वा भगवतः प्रलयोदितार्कमण्डलाकारचक्रक्षपिताप-कारिपक्षस्य विष्णोः प्रतिमाप्रतिष्ठापनाभ्युदये निपिन्म ? लिङ्गेश्वरन्नाम ग्रामन्नारायणबल्युपहारार्थं षोडशसंख्येभ्यो ब्राह्मणेभ्यश्च सत्रनिबन्धं प्रति-दिनमनुविधानं कृत्वा शेषंच परिव्राजकभोज्यं दत्तवान्, सकलजगन्मण्डलावनसमर्थाय रथह-स्त्यश्वपदतिसंकुलानेकयुद्धलब्धजयपताकावल-म्बित चतुस्समुद्रोर्म्मिनिवारितयशः प्रतानोपशो-भिताय देवद्विजगुरुपूजिताय ज्येष्ठायास्मद्भ्रात्रे कीर्त्तिवर्म्मने पराक्रमेश्वराय तत्पुण्योपचयफलमा-दित्याग्निमहाजनसमक्षमुदकपूर्व्वं विश्राणितमस्म-द्भ्रातृशुश्रू ( षा ) णे यत्फलं तन्मह्यं स्यादिति नकैश्चि ( त् ) परिहापयितव्यः ॥

बहुभिर्व्वसुधा दत्ता बहुभिश्चानुपालिता ।
यस्य यस्य यदा भूमिस्तस्य तस्य तदा फलम् ॥
स्वदत्तां परदत्तां वा यत्नाद्रक्ष युधिष्ठिर ।
महीर्म्महीक्षितां श्रेष्ठं दानाच्छ्रेयोऽनुपालनम् ॥
स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत वसुंधराम् ।
श्वविष्ठायां कृमिर्भूत्वा पितृभिस्सह मज्जति ॥
व्यासगीताः श्लोकाः ॥

**५ बदामीच्या लेखाचें भाषांतर.**

विजय असो !

विष्णुपदाचें पूजन करणारे, मानव्य गोत्राचे, हारितीचे पुत्र, व ज्यांचीं शीर्षें, अग्निष्टोम, अग्निचयन, वाजपेय, पौण्डरीक, बहुसुर्व्वर्ण आणि अश्वमेध यज्ञ केल्यामुळें अवभृथ स्नानानें पावन झालीं आहेत अशा चल्क्यांच्या वंशांत—त्रिशक्तिमान् आणि असामान्य, सामर्थ्यवान्, शूर, आणि चिकाटीचा, चल्क्याच्या वंशांत जन्मलेला कुलचंद्रमा, सद्गुणमण्डित, ज्याचें मन सर्व शास्त्रतत्त्वांनीं सुसंस्कृत झालें असा, युद्धजेता—श्रीमंगलीश्वर, आपल्या वाढत्या राज्याच्या बाराव्या वर्षी शक राजाच्या राज्याभिषेकाला ५०० वर्षें झालीं असतांना ( शके ५०० मध्यें ) आपल्या खड्गानें मान खालीं वाकवि-ण्यास लावणाऱ्या राजांच्या मुकुटांच्या रत्नप्रभेनें आपले स्वतःचे पाय प्रकाशित करून आणि चतुस्सागरपरिवेष्टित अशा पृथ्वीला जिंकून महत् संमृद्धि पावल्यावर आणि महत् प्रयासानें आसपासच्या प्रदेशासह सर्व देवांत आणि मानवांत श्रेष्ठ अशा विष्णूचें रमणीय मन्दीर बांधून, व त्यांत कार्तिक पौर्णिमेस—अखेरच्या प्रलयाच्या वेळच्या सूर्यबिंबाएवढ्या चक्रानें ज्या विष्णूनें आपले सर्व रिपु ठार मारिले—त्या विष्णुमूर्तीची प्राणप्रतिष्ठा करून ब्राह्मणांना बरेंच दान केलें. त्यानें निपिन्नलिंगेश्वर ( ? ) ह्या गांवच्या जमीनसाऱ्याची व्यवस्था करून नारायणाच्या दररोजच्या बलि ( नैवेद्य ) करितां १६ ब्राह्मणांना दान देण्याकरितां व भिक्षूस योग्य असें अन्न देण्याकरितां त्याचा विनिमय करण्याची त्यानें व्यवस्था केली आहे.

हें दान( पत्र ) सूर्य, अग्नि, आणि सर्व जन यांच्या समक्ष, शौर्यवान्, देवांचें, ब्राह्मणांचें, व गुरूंचें ज्यानें पूजन केलें आहे अशा सर्व जगतावर राज्य करण्यास योग्य, रथ हत्ती, अश्व व सैन्य यांनीं गजबजलेल्या युद्धांत जय झाल्यामुळें जो कीर्तीनें मण्डित झाला आहे व ज्याची किर्ती चतुःसमुद्राच्या तीरापर्यंत पोहोंचली आहे, अशा माझ्या वडील बंधूच्या कल्याणार्थ व धर्मवृद्ध्यर्थ दिलें आहे.

पुष्कळांनीं जमीन दान केली आहे व पुष्कळांनीं तिचें जतन केलें आहे; तो ज्या वेळेस तिचें रक्षण करितो तो तिचें फल उपभोगितो. हे युधिष्ठिरा ! तूं किंवा इतर कोणी दिलेल्या जमिनीचें नीट रक्षण कर ! जमीन दान करणें ही राजेलोकांची उत्तम देणगी आहे. देण्यापेक्षां रक्षण करणें ही उत्तम गोष्ट आहे. स्वतःनें अगर दुसऱ्यानें दिलेली जमीन जो हरण करितो व तो आपल्या पूर्वजांसह श्वविष्टेंत ( पडून ) राहतो. ( ह्या ) कविता व्यासानें रचिल्या आहेत.

**६. दुसऱ्या पुलकेशीचा ऐहोळी येथील अंकित लेख. †**

पुलकेशीच्या काळच्या लेखांत मंगलीशाच्या लेखांतील

† संपादक कीलहार्न—Ep. Ind., Vol. VI, No. 1.

कांहीं मजकूर पुनरुच्चारित आहे, आणि ते पुनरुच्चारण ऐतिहासिकांस महत्त्वाचें आहे. हा लेख आधुनिक महाराष्ट्रविषयक लेखांनीं वारंवार उल्लेखिलेला असल्यामुळें मूळ आणि पूर्ण भाषांतर प्रत्येक वाचकास सहज उपलब्ध होणें अवश्य आहे.

( आर्या )

**जयति भगवान् जिनेंद्रो वीतजरामरणजन्मनो यस्य**
**ज्ञानसमुद्रान्तर्गतमखिलजगदन्तरीपमिव १.**

पवित्र जिनेंद्राचा विजय असो; तो अजर आहे; अमर आहे; जन्मरहित आहे; त्याच्या ज्ञानसिंधूंत जग हें केवळ एकाद्या लहानशा बेटाप्रमाणें आहे.

**तदनुचिरमपरिमेयश्चलुक्यकुलविपुलजलनिधिर्ज्जयति**
**पृथिवीमौलिललाम्नामयः प्रभवः पुरुषरत्नानाम् २.**

त्याचप्रमाणें मोजमाप करण्यास फार काळ लावील अशा व पृथ्वीच्या मुगुटांच्या ठायीं विराजमान् होणाऱ्या पुरुषरूपी उत्कृष्ट रत्नांचें जणूंकाय माहेरघरच असें असणाऱ्या चालुक्य घराण्याच्या विस्तृत समुद्राचा अखंड विजय असो !

**शूरे विदुषि च विभजन्दानं मानं च युगपदेकत्र**
**अविहितयाथासं [ ख् ] य् [ ओ ] [ ज ] यति च सत्याश्रयः सुचिरम् ३.**

शूर आणि विद्वान् यांचेवर देणग्या व बहुमान एकसारखा अर्पण करणारा जो सत्याश्रय त्याचा सतत विजय असो !

**पृथिवीवल्लभशब्दो येषामन्वर्थतां चिरं जातः**
**तद्वंशेषु जिगीषुषु तेषु बहुष्वप्यतीतेषु ४.**

त्या वंशांतील ज्या विजयी राजांना पृथ्वीवल्लभ ही पदवी बहुकाळ खरोखर अन्वर्थक होती. त्या वंशांत असे जिगीषु पुष्कळ होऊन गेल्यावर—

( शार्दूलविक्रीडित )

**नाना हेति शताभिघातपतितभ्रान्ताश्वपत्तिद्विपे**
**नृत्यद्भीमकबंधखड्गकिरणज्वालासहस्रे रणे**
**लक्ष्मीर्भावितचापलापि च कृता शौर्येण येनात्मसात् ( द् )**
**राजासीज्जयसिंहवल्लभ इति ख्यातश्चलुक्यान्वयः ५.**

त्यांचे पश्चात्, त्या चालुक्य घराण्यांत, जयसिंहवल्लभ नांवाचा राजा होऊन गेला. लढाईमध्यें—जेथें शस्त्रांचे तडाख्यांत सांपडून शेंकडों अश्व, हत्ती, आणि माणसें गोंधळून खालीं पडून त्यांचा चक्काचर होतो. जेथें शेंकडों शिरें तटलेलीं माणसांचीं धडें पाहून मनुष्य भीतीनें गांगरून जातो—जेथें तरवारींच्या पात्यांचें तेज विजेप्रमाणें तळपतें अशा भीषण लढाईंत, जातीनें चंचल असलेली विजयश्री त्यानें आत्मसात् केली.

( उपजाति )

**तदात्मजो भूद्रणरागनामा**
**दिव्यानुभावो जगदेकनाथः**
**अमानुषत्वं किल यस्य लोकः**
**सुप्तस्य जानाति वपुः प्रकर्षात् ६.**

त्याच्या पुत्राचें नांव रणराग—ज्याची कांति स्वर्गीय अशी होती, हा जणुकाय जगाचा सम्राट् होता. दैवी गुण व अलौकिक स्वभाव तो निद्रेंत असतांना सुद्धां त्याच्या भव्य शरिरामुळें दिसून येत.

( आर्या )

**तस्याभवत्तनुजः पोलकेशी यः श्रितेंदुकान्तिरपि**
**श्रीवल्लभोप्ययासीद् वातापिपुरी वधू वरताम्. ७.**

त्याचा पुत्र पुलकेशिन्–जो शशिकांतीनें आश्रय घेतलेला व लक्ष्मीचा प्रियकर असा जरी होता तरी पण वातापि पुरीचें पतित्त्व स्वीकारता झाला.

( रथोद्धता )

**यस्त्रिवर्गपदवीमलम् क्षितौ**
**नानुगन्तुमधुनापि राजकम्**
**भूश्च येन हयमेधयाजिना**
**प्रापितावभृथमज्जना बभौ ८.**

ज्याच्या त्रिवर्गसाधनाच्या मार्गाचें अनुकरण कुणाही राजास अजूनही साधलें नाहीं, आणि ज्याच्या हयमेधामुळें पृथ्वी अवभृथस्नान मिळविती झाली.

( औपच्छंदसिक )

**नलमौर्यकदंबकालरात्रिः**
**तनयस्तस्य बभू( व ) कीर्तिवर्मा**
**परदारनिवृत्तचित्तवृत्तेः**
**अपिधीर्यस्य रिपुश्रियानुकृष्टा ९.**

त्याचा मुलगा कीर्तिवर्मा हा नळ, मौर्य आणि कदंब आदिकरून राजांना मृत्यूच्या रात्रीसमान होऊन गेला. ज्याचें मन परस्त्रीशीं कधींही जरी संबंध ठेवीत नसे, तरी देखील शत्रुराजांच्या लक्ष्मीरूपी स्त्रियांनीं त्याला आकर्षण करून घेतलें होतें.

( द्रुतविलंबित )

**रणपराक्रमलब्धजयश्रिया**
**सपदि येन विरुग्न( ग्ण )मशेषतः**
**नृपतिगंधगजेन महौजसा**
**पृथुकदंबकदंबकदंबकः १०.**

ज्यानें, रणांगणांत पराक्रम गाजवून जयश्री मिळविली; आणि जी संपूर्ण त्यानें ताबडतोब विरुग्ण केली. आणि जो नृपतिरूप माजलेल्या आणि अत्यंत बलवान् हत्तीप्रमाणें होता. तो मोठ्या कदंबराज्यरूपी वृक्षांचा परिच्छेद करता झाला.

( वसंततिलका )

**तस्मिन् सुरेश्वरविभूतिगताभिलाषे**
**राजाभवत् तदनुजः किल मंगल् (ए) शः**
**यः पूर्व्वपश्चिमसमुद्रतटेश्रिताश्व-**
**सेनारजःपटविनिर्मितदिग्वितानः ११.**

जेव्हां त्यांस सुरेश्वराच्या म्हणजे स्वर्गाच्या राज्याची इच्छा झाली, ( म्हणजे तो मृत झाला ) त्यावेळीं त्याचा धाकटा भाऊ मंगलेश हा राजा झाला व त्यानें आपल्या पूर्व आणि पश्चिम समुद्राचे किनाऱ्यावर आपली अश्वसेना उतरविली. व सर्व दिशांना त्यानें राजाच्या सेनाधूलीच्या पटलाचें वितान लावलें.

( वंशस्थ )

**स्फुरन्मयूखैरसिदीपिकाशतैः**
**व्युदस्यमातंगतमिस्रसंचयम्**
**अवाप्तवान्यो रणरंगमन्दिरे**
**कटच्छुरिश्रीललनापरिग्रहम् १२.**

शत्रूच्या मातंग हत्तींच्या रांगा हाच कोणी अंधःकार, यास शेंकडों तरवाररूपी दिव्यांचे तेजानें दूर करून रणरूपी रंगमहालांत कटच्छुरीच्या लक्ष्मीरूपी स्त्रीचा ज्यानें परिग्रह मिळविला.

( मालिनी )

**पुनरपि च जिघृक्षोस्सैन्यमाक्रान्तसालम्**
**रुचिरबहुपताकं रेवतीद्वीपमाशु**
**सपदि महदुदन्वत्तोयसंक्रांतबिम्बम्**
**वरुणबलमिवाभूदागतं यस्य वाचा १३.**

शिवाय, जेव्हां रेवती बेट जिंकण्याची त्यास अनावर इच्छा झाली, आणि त्यावेळीं जेव्हां अनेक सुंदर पताका असलेलें त्याचें सैन्य तेथील तटबंदीवर चढलें तेव्हां तत्क्षणीं त्याच्या पाण्यांत पडलेल्या मोठ्या विस्तीर्ण प्रतिबिंबावरून आपल्या शब्दनिर्देशानें खुद्द वरुणाचेंच सैन्य गोळा झालें आहे कीं काय असा भास झाला (?)

( वसंततिलका )

**तस्याग्रजस्य तनये नहुषानुभागे ( वे )**
**लक्ष्म्याकिलाभिलषिते पुलकेशिनाम्नि**
**सासूयमात्मनि भवन्तमतःपितृव्यम्**
**ज्ञात्वापरुद्धचरितव्यवसाय बुद्धौ १४.**

जेव्हां त्याचा पुतण्या–थोरल्या भावाचा मुलगा पुलकेशी–जो केवळ नहुषाप्रमाणें भव्य दिसत होता, व लक्ष्मी ज्याचा अभिलाष करीत होती–त्यास–ज्यावेळीं आपल्या चुलत्यास आपणाबद्दल असूया उत्पन्न झाली आहे असें कळलें तेव्हां–तो–हद्दपार जाण्याचा निश्चय करिता झाला (?)

( मालिनी )

**स यदुपचितमंत्रोत्साहशक्तिप्रयोग-**
**क्षपितबलविशेषो मंगलेशस्समंतात्**
**स्वतनयगतराज्यारंभयत्नेन सार्द्धं**
**निजमतनु च राज्यं जीवितंचोज्झति स्म १५.**

नंतर मंगलेशाचे डाव सर्व बाजूंनीं त्याचे ( पुलकेशी ) बलानें व युक्तीनें–हाणून पाडल्यानें–मंगलेशानें स्वतःच्या मुलासाठीं राज्य मिळविण्याचा उपक्रम ज्यानें अंगिकारला होता त्यानें आपल्या योजनांचा स्वतःच्या शरिराचा राज्याचा आणि जीविताचा त्याग केला.

( स्रग्धरा )

**तावत्तच्छत्रभंगे जगदखिलमरात्यंधकारोपरुद्धम्**
**यस्यासह्यप्रतापद्युतिततिभिरिवाक्रांतमासीत्प्रभा-**
**तम्**
**नृत्यत्विद्युत्पताकैःप्रजविनि मरुति क्षुण्णपर्यंतभागैः**
**गर्ज्जद्भिर्व्वारिवाहैरलिकुलमलिनं व्योमयातं कदा-**
**वा १६.**

त्या छत्राच्या विनाशाबरोबर शत्रूच्या आगमनरूपी अंधःकारानें जग व्याप्त झालें. तथापि त्याचा असह्य प्रताप अशा तेजाच्या सततं आगमनानें प्रभातकाळ दिसूं लागला. आकाशांत मेघ वाऱ्यामुळें जोरानें संचार करीत आहेत आणि जर त्या मेघांना विजेची पताका आहे तर तें आकाश भुंग्याच्या थव्यानें काळें होईल काय ?

( मंदाक्रांताः )

**लब्ध्वाकालं भुवमुपगते जेतुमाप्पायिकाख्ये**
**गोविंदे च द्विरदनिकरैरुत्तराम् भैमरथ्याः**
**यस्यानीकैर्युधि भयरसज्ञत्वमेकः प्रयात-**
**स्तत्रावाप्तम् फलमुपकृतस्यापरेणापि सद्यः १७.**

नंतर चांगली संधी मिळतांच जय मिळविण्यासाठींच भूमीवर आलेले आप्पायिक आणि गोविंद नांवाच्या दोघांनीं भैमरथीच्या उत्तरेकडील देशावर आपल्या हत्तीसेना घेऊन चाल केली—त्यापैकीं एकास सैन्यासकट भयाचा अनुभव लढाईंत आला व दुसऱ्यास त्या श्रमाचें फळ मिळालें.

( मत्तेभविक्रीडित् )

**वरदातुंगतरंगरंगविलसद्धंसावलीमेखलां**
**वनवासीमवमृद्नतस्सुरपुरप्रस्पर्द्धिनीं संपदाम्**
**महता यस्य बलार्ण्णवेन परितस्संछादितोर्व्वीतलं**
**स्थलदुर्ग्गं जलदुर्ग्गतामिव गतं तत्तत्क्षणे पश्य-**
**ताम् १८.**

नंतर त्यानें ज्या वनवासी सभोवार असलेल्या वरदा नदीस घर मानणाऱ्या हंसाच्या पंक्तीनें एकाद्या कंबरपट्ट्याची शोभा आणली होती, आणि जिच्या संपत्तीनें—देवनगरीसही लाजविलें, अशा त्या वनवासीच्या किल्ल्याचे सभोवारची जमीन शत्रुसैन्यानें भरलेली होती व त्यामुळें वरून पाहाणारास ती जमीन सेनासमुद्रांतच आहे कीं काय अशी शंका येईल.

( इंद्रवज्रा )

**गंगालुपेंद्रा व्यसनानि सप्त—**
**हित्वा पुरोपार्ज्जितसंपदोऽपि**
**यस्यान्नभावोपनतास्सदासन्**
**आसन्नसेवामृतपानशौंडाः १९.**

गंगा आणि अल्प राजश्रेष्ठ राजे—यांनीं जरी सात व्यसनें सोडून दिलीं होतीं आणि त्यांच्या पाशीं जरी जवळ बसून पूर्वापार आलेली संपत्ति अन्नरूपानें त्यांजवळ होती तरी त्यांनीं जवळ राहून जी सेवा करावयाची त्या अमृतसेवनाचे योगानें नेहमीं मदोन्मत्त असत.

( अनुष्टुप् )

**कोंकणेषु यदादिष्टचंडदंडांबुवीचिभिः**
**उदस्तस्तार ता मौर्यपल्वलांबुसमृद्धयः २०.**

कोंकण प्रांतांत त्याच्या आदेशांत वागणाऱ्या सैन्यरूपी पर्वतप्राय लाटांनीं शत्रूच्या सैन्याच्या एकाद्या डबक्यांतील हालणाऱ्या तरंगाप्रमाणें मौर्यसमृद्धीला खालीं बसविलें.

( हरिणी )

**अपरजलधेर्लेक्ष्मीं यस्मिन्पुरीममितप्रभे**
**मदगजघटाकारैर्न्नावां शतैरवमृन्दति**
**जलदपटलानीकाकीर्ण्णन्नवोत्पलमेचकम्**
**जलनिधिरिवव्योम व्योम्नस्समो भवदम्बुधिः**
**२१.**

जेव्हां त्या अमितप्रभानें पश्चिमसमुद्रलक्ष्मी जी पुरी तीस वेढा दिला, त्यावेळीं त्याची शेकडों जहाजें रांगेंत उभे राहिलेल्या मदोन्मत्त हत्तींप्रमाणें दिसत होते. मेघाच्या पटलांनीं आकीर्ण झालेलें आकाश नूतन कमलांनीं युक्त अशा समुद्राप्रमाणें दिसत होतें व समुद्र आकाशाप्रमाणें दिसत होता.

( अनुष्टुप् )

**प्रतापोपनता यस्य लाटमालवगुर्जराः**
**दण्डोपनत सामन्तचर्याचार्या इवाभवन् २२.**

त्याचे प्रतापामुळें वश झालेले लाट, मालव, गुर्जर वगैरे राजे—शरण आलेल्यांनीं कसें वागावें याचेच जणूं काय आचार्य झाले.

( मालिनी )

**अपरिमितविभूतिस्फीतसामन्तसेना**
**मकुटमणिमयूखाक्क्रांतपादारविंदः**
**युधि पतितगजेंद्रानीकबीभत्सभूतो-**
**भयविगलितहर्षो येन चाकारि हर्षः २३.**

अपरिमित मोठेपणा आणि सामंत सेना यांचे मुगुटमणि असलेले शेकडों बलवान् राजे त्यांच्या मुगुटांतील रत्नांनीं ज्याचे चरणकमल व्यापले होते, आणि युद्धांत पडलेल्या गजेंद्राच्या सैन्यामुळें जो जुगुप्साविषय झाला होता, अशा हर्षास त्यानें विगलितहर्ष केलें.

**भुवमुरुभिरनीकैश्शासतो यस्य रेवा-**
**विविधपुलिनशोभावंध्यविंध्योपकंठ ( ष्ठः )**
**अधिकतरमराजत्स्वेन तेजो महिम्ना**
**शिखरिभिरिभवर्ज्योवर् (ष)माणास्वधैव २४.**

जेव्हां तो आपल्या असंख्य सैन्यासह राज्य करीत होता, त्यावेळीं विंध्याच्या आसपासचा प्रदेश जो रेवा नदीच्या

विविध वाळूचे तटांनीं सुशोभित होता त्यास कांहीं न करतां विंध्य समीपता प्राप्त झाली. आपल्या तेजाच्या मोठेपणानें तो जास्त शोभला. पृथ्वी पर्वतांनीं वर्षिली गेलेली अमृतमय दिसूं लागली (?)

**विधिवदुपचिताभिश्शक्तिभिश्शाक्ककल्पः**
**तिसृभिरपि गुणौघैस्स्वैच्छ माहाकुलाद्यैः**
**अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां**
**नवनवतिसहस्रग्रामभाजां त्रयाणां २५.**

ज्यानें तिन्ही शक्त्या विधियुक्त आपल्या काबीज केल्या आहेत आणि त्यामुळें जो इंद्रतुल्य दिसत आहे, त्याच्या उच्च घराण्यांतील जन्मामुळें व इतर उत्कृष्ट गुणामुळें, आणि त्याच्या इच्छाशक्तीनें त्यानें ९९ हजार खेडीं असलेल्या तिन्ही महाराष्ट्रांवर आपलें आधिपत्य मिळविलें.

( औपच्छंदासिक )

**गृहिणां स्वस्वगुणैस्त्रिवर्णतुंगा-**
**विहितान्यक्षितिपालमानभंगा**
**अभवदुपजातभीतिलिंगा**
**यदनीकेन स को(स)लाः कलिंगाः २६.**

घराण्यांतील गुणांनीं आणि त्रिवर्ग संपादन केल्यामुळें बलाढ्य झालेल्या त्यांनीं इतर राजांचा मानभंग केल्यामुळें—त्याच्या सैन्यामुळें ते कलिंग व कोसल राजे—भयाचें चिन्ह ज्यांत उत्पन्न झालें आहे असे झाले.

( अनुष्टुप् )

**पिष्टं पिष्टपुरं येन जातं दुर्ग्गमदुर्ग्गमन् ( म् )**
**चित्रं यस्य कलेर्वृत्तम् जातं दुर्ग्गम दुर्ग्गमम् २७.**

ज्यानें पिष्टपुराचें पीठ पाडलें आणि गमनास कठिण अशा दुर्गांच्या ठायीं जो जाता झाला, कलियुगांतील अतर्क्य मार्गांनीं सुद्धां किल्ल्यांत जाणें शक्य नव्हतें अशा ठिकाणीं तो गेला ही गोष्ट किती आश्चर्यकारक आहे.

( वसंततिलका )

**सन्नद्धवारणघटास्थगितान्तरालम्**
**नानायुधक्षतनरक्षतजांगरागम्**
**आसीज्जलं यदवमर्दितमभ्रगर्भे**
**कौनालमंबरमिवो [ज् ?] इतसान्ध्यरागम् २८.**

कुनाळ नदीचें पाणी जवळच नाना आयुधांनीं भोंसकल्या गेलेल्या माणसांच्या अंगांतील रंगानें लाल झाली होती व त्यांत हत्तींचीं शरीरें पडलेलीं होतीं. त्यामुळें संध्याकाळीं आकाश तांबडें लाल होऊन त्यांत ढग येतात त्याप्रमाणें दिसत होतें.

( शार्दूलविक्रीडितः )

**उद्धूतामलचाव ( म ) रध्वजशतच्छ ( त्र ) ध्रांध-कारैर्व्व ( ब्ब ) लैः**
**शौर्य्योत्साह रसोद्धतारिमथनैर्म्मौल ( ला ) दिभि-ष्षड्विधैः**
**आक्रान्तात्मबलोन्नतिं बलरजस्संच्छन्नकांचीपुरः**
**प्राकारान्तरितप्रतापमकरोद्यः पल्लवानाम् पतिम् २९.**

स्वच्छ चवऱ्या वारल्या जात होत्या, शेंकडों निशाणें, छत्रें आणि धूळ वर एकसारखी उडत होती आणि शौर्य व उत्साह यांचे जोरावर हल्ला करणाऱ्या शत्रूस त्यानें सहा प्रकारच्या कार्यमालिकांनीं जेरीस आणलें, त्याच्या मार्गामध्यें येणाऱ्या आणि आपल्या बळामुळें गर्विष्ट झालेल्या पल्लवांच्या पतीस—त्यानें आपल्या सैन्याचे धुळीच्या मागें लपून कांचीपूरच्या तटबंदीपाठीमागें पळवून लाविलें.

( प्रहर्षिणी )

**कावेरी द्रुतशफरी विलोलनेत्रा**
**चोळानां सपदि जयोद्यतस्ययस्य**
**प्रश्च्योतन्मदगजसेतुरुद्धनीरा**
**संस्पर्शं परिहरति स्म रत्नराशेः ३०.**

चोलांना घेण्याचा प्रयत्न करीत असतां कावेरीच्या प्रवाहांत तेथील शफरी विलोलनेत्राप्रमाणें दिसत होत्या. त्यांचे हत्ती—ज्यांच्या गंडस्थलांतून मद गळत होता असे—उभे असतांना एखाद्या धरणाप्रमाणें उभे होते व नदीस जणूं काय समुद्राकडे जाण्याची बंदीच करीत होते.

( अनुष्टुप् )

**चोळकेरळपाण्ड्यानाम् ( नां ) यो भूत्तत्रमहर्द्धये**
**पल्लवानीकनीहारतुहिनतरदीधितिः ३१.**

त्यानें चोल, केरळ, पांड्य इत्यादि नृपतींस वैभवास आणलें व पल्लव सैन्यरूपी धुक्यास आपल्या सहस्ररश्मिवत् सूर्याचे किरणानें घालवून दिलें.

( शार्दूलविक्रीडित )

**उत्साहप्रभुमंत्रशक्तिसहिते यस्मिन् समस्तादिशो**
**जित्वा भूमिपतीन्विसृज्य महितानाराध्यदेवद्विजान्**

**वातापीन्नगरीं प्रविश्य नगरीमेकामिवोर्व्वि (र्व्वी) मिमाम्**
**चंचन्नीरधिनीलनीरपरिखां सत्याश्रये शासति ३२.**

नंतर त्या उत्साह, प्रभुत्व आणि मंत्रशक्ति इत्यादि गुणांनीं परिपूर्ण असलेला अशा राजानें सर्व दिशा जिंकून आणि राजेलोकांना जिंकून श्रेष्ठांस निरोप देऊन, देवब्राह्मणांची सेवा करून व वातापी नगरींत शिरून तेथें एका लहान शहराप्रमाणें—जिला चंचल निळ्या पाण्याचा तट आहे—अशा पृथ्वीवर राज्य करीत आहे.

( अनुष्टुप् )

**त्रिंशत्सु त्रिसहस्रेषु भारतादाहवादितः**
**सप्ताद्बशतयुक्तेषु श (ग) तेष्वद्बेषु पंचसु ३३.**

आतां जेव्हां भारतयुद्धानंतर ३३७०५ वर्षें होऊन गेलीं,

**पंचाशत्सु कलौ काले षट्सु पंचशतासु च**
**समासु समतीतासु शकानामपि भूभुजाम् ३४.**

शिवाय कलियुगांतील शकराजांचीं ६१०० वर्षें होऊन गेलीं.

( वसंततिलका )

**तस्यांबुधित्रयनिवारितशासनस्य**
**सत्याश्रयस्य परमाप्तवताप्रसादं**
**शैलं जिनेन्द्रभवनम् भवनं महिम्नान्**
**निर्मापितं मतिमता रविकीर्तिनेदम् ३५.**

तेव्हां हें भव्य, मोठेपणाचें आगर जिनेंद्रमंदीर तिन्ही समुद्रापर्यंत राज्य करणाऱ्या सत्याश्रयाचे अत्यंत मर्जीतील अशा हुशार रविकीर्तीनें बांधलें.

( अनुष्टुप् )

**प्रशास्तेर्व्वसतेश्चास्याः (स्या) जिनस्यत्रिजगद्गुरोः**
**कर्ता कारयिता चापि रविकीर्तिः कृती स्वयम् ३६.**

याचें राज्य चालू असतां त्रिजगद्गुरु जिन याच्या मंदिराचा कर्ता आणि करविता रविकीर्ति कृतार्थ झाला आहे.

( आर्यागीति )

**येनायोजि न वेश्मस्थिरमर्थविधौ विवेकिना जिन-वेश्म**
**स विजयतां रविकीर्तिः कविताश्रितकालिदास-भारविकीर्तिः, ३७.**

जिनदेवालयास ज्या विचारवंतानें अर्थप्राप्तीकडे उपयोगिलें नाहीं असा आणि ज्याची कीर्ति कविताश्रित कालिदास किंवा भारवीच्या बरोबरीचो आहे अशा रविकीर्तींचा सदा विजय असो.

**मूलवळ्ळिविळमळूतिकवाड (म) च्छनूर्गेगवू-पुंळिगिरी गण्डवग्राम ( मा ) इति अस्य भुक्ति (:।) गिरि ( रे ) [ स्-त ] तात्पश्चिम् (आ) भिगत निमूवारिय्यार्व [ त् ] महा पथांतपुरस्यासि ( सी ) मा उत्तरतः दक्षिणतो.......ग...न.**

### ७. वऱ्हाडविषयीं अनिश्चय.

७. प्रस्तुत लेखावरून वऱ्हाड चालुक्यांनीं जिंकला होता असें निश्चितपणें सिद्ध होत नाहीं. वरदा नदी आणि वनवासीपुर हे दोन उल्लेख श्लोक १८ मध्यें आहेत त्यावरून दोन प्रकारचे निर्णय निघतील. एक निर्णय म्हटला म्हणजे वरदा नदी ही वनवासीजवळच कोंकणांत असावी. दुसरा निर्णय म्हटला म्हणजे वऱ्हाडांतील वर्धा नदीच्याकाठीं वनवासी नांवाचा एकादा किल्ला असावा. आतांपर्यंतचें मत दक्षिण कोकणांतील सुप्रसिद्ध वनवासीच्या उल्लेखास प्राधान्य देऊन वरदेविषयींचा उल्लेख विदर्भ नदीविषयीं नाहीं अशा तऱ्हेचें आहे.

### ८. कालविषयक श्लोकांच्या अर्थाबद्दल संशय.

८. कालविषयक श्लोकाचा काय अर्थ होतो त्याविषयीं अधिक स्पष्टीकरण हवें आहे. शब्दशः जो अर्थ होतो तो कांहीं भलताच होतो. यासाठीं त्यावर सविस्तर विवेचनाची आवश्यकता आहे; तथापि हें विवेचन येथें दिलें नाहीं.